# संपादकीय निवेदन

इंद्रादयोपि यस्यान्तं न ययुः शब्दवारिधेः ।
प्रक्रियां तस्य कृत्स्नस्य क्षमो वक्तुं नरः कथम् ॥

महाराष्ट्र शब्दकोशाचा हा सहावा विभाग आमच्या आश्रयदात्यांच्या हातीं देताना आम्हास फार आनंद होत आहे. पूर्वसंकल्पित पाच विभागात सर्व मराठी शब्दांचें संकलन करणें अशक्य झाल्यानें व कोशासारख्या सर्वसंग्राहक स्वरूपाच्या संदर्भग्रंथात काटकसर करणें अनिष्ट असल्यामुळें शब्दकोशाचे दोन विभाग अधिक करावे लागले यामुळें पूर्वींच्या अपेक्षेपेक्षा खर्चहि वाढला. या वाढत्या खर्चाकरिता पूर्वीप्रमाणेंच पाचव्या विभागाचा स्वीकार करताना सहाव्या विभागाकरिता आगाऊ पाच रुपये द्यावे अशी विनंति आम्हीं आमच्या भागीदार ग्राहकास केली व ती बहुतांशीं सर्व ग्राहकांनीं आनंदानें मान्य केली यावद्दल आम्ही त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानतों बाकीचे ग्राहकहि हा विभाग स्वीकारताना त्यांचें मूल्य देतील अशी आमची खात्री आहे तथापि ग्राहकसंख्येपेक्षा काहीं ग्रंथ अधिक काढणें जरूर असल्यामुळें त्यात काहीं रक्कम गुंतून राहिली व आतापर्यंतच्या अशा प्रकारच्या खडश प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथाची ग्राहकसंख्या अल्प का होईना तथापि काहीं प्रमाणात घटत जाते असा जो अनुभव आहे तो याहि ग्रंथाच्या बाबतींत आल्यामुळें या विभागाच्या छपाईच्या कामीं फार दिरंगाई झाली तथापि आमच्या काहीं मित्राच्या साहाय्यामुळें आम्हास हा विभाग आज तडीस नेता आला यावद्दल आम्ही त्यांचे फार अभारी आहों आमच्या साहाय्यकाचे नामनिर्देशपूर्वक आभार संपूर्ण ग्रंथाच्या अखेरीस आम्हास मानावयाचेच आहेत, तेव्हा आम्ही सध्या त्याचा नामनिर्देश करीत नाहीं.

या विभागात घृ अक्षरापर्यंतचे शब्द आले आहेत यापुढील सातव्या विभागात पुढील ज्ञ पर्यंतच्या अक्षरातील सर्व शब्द येऊन हें कार्य पूर्ण होईल

सध्याच्या आर्थिक मंदीमुळें नवीन ग्राहक मिळणें फार कठिण झालें आहे तथापि त्यातूनहि आमचे प्रयत्न चालू आहेत व महाराष्ट्रातील मराठी भाषेच्या अभिमानी अशा आमच्या ग्राहकाच्या व जनतेच्या सहानुभूतीनें हें कार्य शेवटास जाईल असा आम्हास पूर्ण भरवसा आहे तरी सर्व महाराष्ट्रीय जनता आम्हावर आजवर दाखविलेला लोभ कायम ठेवून हे कार्य आमच्या हातून पूर्ण करून घेवो व या वाङ्मययज्ञाच्या अवभृत स्नानाचा दिवस लवकर उदय पावो अशी त्या जगन्नियत्याजवळ प्रार्थना करून हें निवेदन पुरें करतों.

यशवंत रामकृष्ण दाते

# प्रस्तावना



## मराठी भाषेचें व्याकरण व शब्दसिद्धि



यद्यपि बहुनाधीषे पठ पुत्र तथापि व्याकरणम्।

विषयप्रवेशः—भाषा प्रथम उत्पन्न कशी होते व त्यानंतर तिची अनेक अंगांनीं वाढ कशी होते, तिच्या स्वरूपांत कालांतरामुळें व स्थलांतरामुळें फरक कसकसे पडत जातात, असे फरक पडत असले तरी तिच्या विशिष्ट रूपास स्थिरता प्राप्त होण्याची क्रिया कसकशी चालत असते, विशेषतः भाषा लिखित स्वरूपात आल्यानंतर तिला स्थैर्य प्राप्त होऊन शिष्ट भाषा म्हणून तिच्यांतीलच एका प्रकारास अधिक मान्यता प्राप्त होऊन त्या शिष्ट स्वरूपाचें महत्त्व वाढत जाऊन इतर प्रकारांस गौणत्व कसें प्राप्त होतें व अशा रीतीनें लिखित, ग्रांथिक अथवा शिष्ट भाषेचें रूप अधिकाधिक निश्चित व कमी बदलणारें कसें होतें, वगैरे गोष्टी आपण दुसऱ्या विभागाच्या प्रस्तावनेंत अवलोकन केल्या आहेत. अशा तऱ्हेनें भाषेचें एक शिष्ट स्वरूप निश्चित व मान्यता पावलेलें धरून स्थिर झाल्यावर त्या स्वरूपासंबंधीं कांहीं निश्चित नियम बांधतां येतात. असे जे भाषेच्या निश्चित स्वरूपासंबंधीं शिष्टसंमत नियम त्यांसच आपण व्याकरण म्हणतों.

व्याकरणाचें स्वरूपः—वेदकालीं किंवा तदुत्तरकालीं जेव्हां तत्कालीन भाषेस स्थैर्य प्राप्त होण्याची वेळ आली तेव्हांच त्या भाषेचें व्याकरण तयार करण्याची जरूरी वाटूं लागली व भाषेस कांहीं तरी नियम पाहिजेत अशी जाणीव उत्पन्न झाली. हीच गोष्ट आपणांस पुढील आख्यायिकेंत आढळून येते. ' वाग्वै पराच्यव्याकृतावदत्ते देवा इंद्रमनुब्रुवन्निमां नो वाचं व्याकुर्विति। तामिन्द्रो मध्यतोऽवक्रम्य व्याकरोत्तस्मादियं व्याकृता वागुद्यते।'—तैसं. ( वाणी प्रथम अव्याकृत स्थितींत होती तेव्हां देव इन्द्राकडे गेले आणि म्हणाले आमच्या वाणीस व्याकृत कर तेव्हां इन्द्रानें तिचें व्याकरण केलें. ) यावरून कोणत्याहि भाषेचें व्याकरण होण्यापूर्वी ती भाषा दीर्घ कालपर्यंत प्रचारात असते व तिला हळूं हळूं नियमबद्ध स्वरूप प्राप्त होऊन तिचें व्याकरण बनतें. प्रत्येक भाषेंत अनेक बोली प्रचलित असतात. बारा कोसांवर भाषा बदलते असें आपण म्हणतों म्हणजे एकच भाषेचें भिन्नभिन्न स्वरूप आपणास तिच्या एकंदर क्षेत्राच्या निरनिराळ्या भागात आढळतें. परंतु सर्वांस गम्य व सर्वांस साधारण असें एक भाषेचें विशेषतः लिखित भाषेचें स्वरूप शिष्टसंमत असतें व या शिष्टसंमत भाषेचेंच प्रथम व्याकरण तयार होतें. व्याकरणकाराचेंहि मुख्य काम भाषेंतील कोणते प्रकार व रूपें शिष्टसंमत आहेत हें सांगण्याचें असतें परंतु असें एकदा सांगून तें ग्रंथगत होऊन सर्वमान्य झालें म्हणजे त्यास नियमाचें स्वरूप प्राप्त होतें व या नियमास सुसंगत असेल तें शुद्ध व विसंगत असेल तें अशुद्ध असें मानण्याची प्रथा पडते. त्यामुळें यानंतर होणारें लेखन या नियमास शक्य तों अनुसरूनच होत गेल्यामुळें या नियमाचें सामर्थ्य वाढत जातें व तें अधिकाधिक व्यापक बनून सर्व भाषेचें क्षेत्र आक्रमण करतें आणि सर्व भाषेस नियंत्रित करून एकरूपांत आणण्याचें कार्य करतें. अशा तऱ्हेनें त्या विशिष्ट भाषेचें व्याकरण प्रथम सर्वमान्य होऊन सर्व क्षेत्र आक्रमण करितें त्या भाषेस विशेष महत्त्व येऊन इतर बोली अगर त्या भाषेचे स्थानिक प्रकार गौणत्व पावून हळूंहळूं लोप पावतात. संस्कृत भाषेमध्यें पाणिनीपूर्व व पाणिनीकालीन किंवा तदुत्तर अनेक व्याकरणकार झाले व त्यामुळें पाणिनी-कालीन किंवा तदुत्तरकालीं कांहीं महत्त्वाच्या ग्रंथांतूनहि अपाणिनीय प्रयोग आपणास आढळतात, त्यास कांहीं अलीकडील लोक व्याकरणदृष्ट्या अशुद्ध म्हणतील पण ते तसे नसून तत्कालीन रूढ प्रयोगच होत. पण जसजसें

पाणिनीय व्याकरणास महत्त्व प्राप्त होऊन इतर व्याकरणें मागें पडलीं व पाणिनीय व्याकरणास अनुसरणारे प्रयोग तेवढेच शुद्ध असें मानलें जाऊ लागलें तसतसे इतर प्रयोग अशुद्ध मानण्याकडे प्रवृत्ति होऊन, भाषा पाणिनीय व्याकरणानें बद्ध झाली व तिला स्थिर व अविकृत असें स्वरूप प्राप्त झालें पण तिची स्वाभाविक वाढ खुटली व म्हणून संस्कृत भाषेस मृतभाषा म्हणून काहीं लोक संबोधू लागले. वास्तविक तिचा प्रचार कमी झाला असें नव्हे तर ती नियमांनीं निबद्ध झाल्यामुळें तिची वाढ खुटली एवढेंच, असो.

**मराठीचीं प्राचीन व्याकरणें :**—सामान्यत: देशी भाषा पृथक्पणें अशा सातव्या शतकात अस्तित्वात आल्या असाव्या असें आपण चवथ्या विभागाच्या प्रस्तावनेंत पाहिलेंच आहे. त्यानंतर या भाषाची वाढ होऊन त्यात महत्त्वाची अशी ग्रंथरचना होऊ लागण्यास दोनतीन शतकांचा तरी अवधि त्या काळच्या प्रगतीच्या गतीच्या मानानें लागला असावा, व बाराव्या-तेराव्या शतकात अमृतानुभव, ज्ञानेश्वरीसारखे ग्रंथ निर्माण करण्याची पात्रता ज्या भाषेमध्यें आली त्या भाषेस यापूर्वींच दोनतीन शतकें तरी शिष्टसंमत व प्रौढ असें स्वरूप प्राप्त झालें असलें पाहिजे हें निर्विवाद आहे व असें स्वरूप प्राप्त झाल्याबरोबर हें स्वरूप निश्चित करण्यासाठीं तत्कालीन ग्रंथकारास व पंडितास त्या भाषेच्या व्याकरणाची आवश्यकता भासली असली पाहिजे, त्याप्रमाणें त्यांनीं प्रयत्नहि केले असले पाहिजेत. परंतु ज्याप्रमाणें या काळातील वाङ्मय आपणास अज्ञात आहे त्याप्रमाणें त्या काळातील व्याकरणाचे प्रयत्नहि आपणास अज्ञात आहेत, तथापि योग्य संशोधन झाल्यास मराठी व्याकरणाच्या उगमातील निरनिराळ्या पायऱ्या आपणास अवगत झाल्याशिवाय रहाणार नाहींत असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

**महानुभावी व्याकरणें**:—ज्ञानेश्वरकालीन अथवा तत्पूर्वकालीन मराठी वाङ्मयाचा एक भाग आपणास महानुभावी वाङ्मय म्हणून परिचित आहे. या पद्यामध्यें गद्य व पद्य दोन्ही प्रकारची ग्रंथरचना झालेली आपणास आढळून येते. या ग्रंथकारासहि व्याकरणाचें महत्त्व ठाऊक असून त्यांनींहि आपल्या भाषेचें व्याकरण करण्याचे प्रयत्न केल्याचें आपणास दिसून येतें. प्रसिद्ध महानुभाव ग्रंथकार भास्करभट्ट अथवा कवीश्वर व्यास यांचें महाराष्ट्र भाषाभाष्य अथवा सुभाष्य अशा काहीं तरी नावाचें एक मराठी भाषेचें व्याकरण होतें अशा तऱ्हेचा उल्लेख त्यांच्या वाङ्मयात आढळतो. यावरून त्यास भाषाघोष असेंहि म्हणत. आनेराज व्यास यांनींहि लक्षण रत्नाकर या नावाचा एक व्याकरण प्रबंध रचल्याचा उल्लेख आहे. त्यानंतर पंडित भीष्माचार्य यांनीं नामविभक्ति व पंचवार्तिक असें व्याकरण संबंधीं ग्रंथ लिहिल्याचें आढळतें. महानुभावी व्याकरणकारासंबंधीं खालील पद्यामध्यें उल्लेख आढळतात.

'माहींभट्टीं व्याकर्णावरी। संस्कृत भाषा मंजरी। रचितें जहालें केशवसूरी। परमार्थ हेतु ॥ १ ॥ मूळ व्याकरणाचे नि आधारें। सुभाषानिबंधु बोलिला कविश्वरें। जो छंदन भाषेसी होऊन उरें। महाराष्ट्रीये ॥ २ ॥ भाषा प्रबोध, भाषा प्रदीपिका। गौड महाराष्ट्री पीठिका। अष्टौ व्याकरणाचा अवाका। उमचविला ॥ ३ ॥ श्री भास्करें गोपाळा आज्ञापिलें। तें लक्षण रत्नाकर बोलिलें। मग पंचवार्तिक निरोपिते जहालें। भीष्ममुनि ॥ ४ ॥ लिंगत्रय विवचना। दृष्टांतोपपत्ति न्याय प्रमाणा। उपपत्ति अनुपपत्ती शङ्कार्णे। दामोदरु प्रणितु ॥ ५ ॥ ऐसे भाषा निबंध महात्म मार्गींचे प्रसिद्ध। लिङ्गत्रय पदार्थभेद। कवीश्वरकृत ॥ ६ ॥'

आता महानुभावीय वृद्धान्वयात असें म्हटलें आहे कीं, तघलखाच्या स्वारींत महानुभावी धर्मग्रंथाचा नाश झाला व कवीश्वर वधवर्णनात 'विशेषासहित देह त्यजीयेलें। हीरोनिया नेलें। पुस्तकातें' असा उल्लेख आहे. यावरून एका काळीं महानुभावी ग्रंथाचा नाश झाला होता ही गोष्ट स्पष्ट आहे. अशा तऱ्हेनें एकदा एखाद्या आपत्तीमध्यें मूळ ग्रंथाचा नाश झाला म्हणजे पुनरुज्जीवनाच्या वेळीं जुने ग्रंथ म्हणून अनेक नवीनच ग्रंथ प्रसृत होण्याची भीति असते, ही गोष्ट चिनी वाङ्मयावर जेव्हा ख्रि. पू. तिसऱ्या शतकात एका बादशहानें होळी करण्याचा प्रसंग आणला व त्या नंतर जें ग्रंथपुनरुज्जीवन झालें त्यात असे अनेक बनावट ग्रंथ तयार करण्यात आले, यावरून स्पष्ट होते, असो.

सध्या जो पंचवार्तिक या नावाचा महानुभावी व्याकरण ग्रंथ आहे त्यावरून आपणास एवढें तरी निश्चित माहीत होतें कीं, महानुभावी ग्रंथकारांनीं व्याकरण शास्त्रावर विचार केला होता. तो कितपत प्रगत होता हें आपण पंचवार्तिकावरून पाहूं.

पंचवार्तिक—यांत १ सूत्रलक्षण, २ सूत्रप्रकृतिलक्षण, ३ सूत्रकारकलक्षण, ४ सूत्रव्याख्यानलक्षण व ५ सूत्रस्वरूपलक्षण अशीं पांच प्रकरणें आहेत.

१ सूत्रलक्षणांत (अ) वचन (आ) वाक्य (इ) प्रकरण व (ई) महावाक्य असे सूत्रांचे चार भेद सांगून तीन पदांचें सूत्र तें वचन, सहा वचनांचें सूत्र तें वाक्य, बारा वाक्यांचें सूत्र तें प्रकरण व बारा प्रकरणांचें सूत्र तें महावाक्य अशीं यांचीं लक्षणें दिलीं आहेत.

(अ) पुन्हां वचनांचे एकपदी, द्विपदी व त्रिपदी असे भेद सांगितले आहेत. नंतर पदें, सलिंग, अलिंग व क्रिया या तीन प्रकारच्या असतात असें सांगून सलिंगांचें पुलिंग, स्त्रीलिंग व नपुंसकलिंग असे भेद वर्णिले आहेत. तसेंच सलिंग पदांस एकवचन, द्विवचन व बहुवचन अशीं तीन वचनें असतात असें सोदाहरण नमूद केलें आहे. पण द्विवचन व बहुवचन एकत्रच केलीं आहेत. सलिंग पदांची पुन्हां नाम व सर्वनाम अशी विभागणी करून त्यांचे पुन्हां केवळ व संयुक्त असे दोन वर्ग कल्पिले आहेत. नंतर केवळ पदें कृदन्त किंवा तद्धित प्रत्ययें करून सिद्ध होतात असें सांगितलें आहे व त्यांचीं उदाहरणें दिलीं आहेत. संयुक्त पदें समासानें होतात असें म्हटलें आहे. समासांमध्यें अव्ययीभाव, तत्पुरुष, बहुव्रीहि व द्वंद्व समासांचे प्रकार वर्णन करून तत्पुरुषाचे विभक्तितत्पुरुष, कर्मधारय व द्विगु असे भेद दाखविले आहेत. यानंतर संधिप्रकरण दिलें आहे. यानंतर सिद्धनामें कांहीं विशेषणें व कांहीं विशेष्यें असतात व सर्वनामें केवळ विशेषणेंच असतात असें सांगितलें आहे. अव्ययाबद्दल 'अलिंगें तियेंचि अन्वयें' म्हणून उदाहरणें दिलीं आहेत. क्रियांचे सलिंगा व अलिंगा असे भेद करून, भूत, भविष्य, वर्तमान हे काळभेदहि सांगितले आहेत. तसेंच क्रियेचीं तीन वचनें व तीन पुरुष असें सांगून सकर्मक व अकर्मक भेदहि दाखविले आहेत. यानंतर कर्तरि, कर्मणि व भावे प्रयोग वर्णिले आहेत.

(आ) वाक्यविचारांत वाक्याचे चार पदांपासून अठरा पदांपर्यंत असे १५ भेद करून त्यांचीं उदाहरणें दिलीं आहेत. वाक्यांचे पुन्हां केवळवाक्य व संयुक्तवाक्य असे भेद केले आहेत.

(इ) प्रकरणविचारात तीन वाक्यांपासून बारा वाक्यांपर्यंत प्रकरणाचे दहा भेद कल्पिले आहेत.

(ई) महावाक्याचे पुन्हां तीन प्रकरणापासून बारा प्रकरणापर्यंत दहा भेद केले आहेत.

२ सूत्रप्रकृतिलक्षणांत सूत्राची दशधा प्रकृति पुढील श्लोकांत वर्णन करून त्यांची फोड केली आहे 'संज्ञा च परिभाषाच विधिर्नियम एव च। अतिदेशोऽपवादश्च विभाषा च निपातनम्॥ १॥ प्रतिषेधोऽधिकारश्च सूत्रंतद्दशधाविदुः।

३ सूत्रकारक लक्षणांत प्रथमेपासून सप्तमीपर्यंत सात विभक्ति सांगितल्या आहेत व त्यांचे अर्थहि दिले आहेत. 'संबोधनीं प्रथमा विभक्ति वर्ते' असें सांगितलें आहे. प्रथमा विभक्तीचे कर्ता, कर्म व संबोधन; द्वितीयेचे कर्म, अत्यत संयोग व प्रतिशब्द; तृतीयेचे कर्ता, साधन, सहार्थक व विनार्थक; चतुर्थीचे संप्रदान व प्रयोजन; पंचमीचा अपादान; षष्ठीचे संबंध व शब्दयोग आणि सप्तमीचा अधिकरण असे अर्थ दिले आहेत. नंतर विभक्तींचे प्रत्यय दिले आहेत.

४ सूत्रव्याख्यान लक्षणांत पदच्छेद, पदार्थोक्ति, विग्रह, वाक्ययोजना, आक्षेप व समाधान या सहा प्रकारांनीं सूत्राचा अर्थ प्रकाशित होतो म्हणून त्यास सूत्रव्याख्यान म्हणतात, असें सांगून या सहा अंगांची फोड केली आहे.

५ यानंतर पांचवे वार्तिक सूत्रस्वरूपलक्षण यामध्यें सूत्राचीं पुढील बत्तीस लक्षणें सांगून त्यांचें विवरण केलें आहे. १ प्रतिज्ञा, २ प्रमाण, ३ दृष्टान्त, ४ उपपत्ति, ५ व्याप्ति, ६ विषयप्रदान, ७ विशेष प्रबोधक, ८ उत्सर्ग, ९ अपवाद, १० निषेध, ११ न्याय, १२ विरोधपरिहार, १३ काकु, १४ कक्षा, १५ भावार्थ, १६ प्रकरण, १७ अस्तित्व १८ निर्देश, १९ निर्णयो, २० पक्ष, २१ प्रभेद, २२ आशंका, २३ आक्षेप, २४ कार्य, २५ लक्षण, २६ स्वरूप, २७ कारण, २८ हेतु, २९ संबंध, ३० प्रनीति, ३१ विशेषण ३२ प्रतिज्ञा.

महानुभावी व्याकरणग्रंथ कोणी अथवा केव्हां रचले याबद्दल जरी वादविवाद चालू असले तरी महानुभावी ग्रंथकारांनीं मराठी भाषेच्या व्याकरणाचा विचार केला होता व त्यावर आपली कांहीं रचना केली होती हें निःसंशय. वरील पंचवार्तिकांवरून त्यांनीं आपलें व्याकरण संस्कृत व्याकरणास अनुसरूनच रचलेलें दिसतें. मराठी ही संस्कृत-

पाणिनीय व्याकरणास महत्त्व प्राप्त होऊन इतर व्याकरणें मागें पडलीं व पाणिनीय व्याकरणास अनुसरणारे प्रयोग तेवढेच शुद्ध असें मानलें जाऊं लागलें तसतसे इतर प्रयोग अशुद्ध मानण्याकडे प्रवृत्ति होऊन, भाषा पाणिनीय व्याकरणानें बद्ध झाली व तिला स्थिर व अविकृत असें स्वरूप प्राप्त झालें पण तिची स्वाभाविक वाढ खुंटली व म्हणून संस्कृत भाषेस मृतभाषा म्हणून कांहीं लोक संबोधूं लागले. वास्तविक तिचा प्रचार कमी झाला असें नव्हे तर ती नियमांनीं निबद्ध झाल्यामुळें तिची वाढ खुंटली एवढेंच; असो.

मराठीचीं प्राचीन व्याकरणें :—सामान्यतः देशी भाषा पृथक्पणें अशा सातव्या शतकांत अस्तित्वांत आल्या असाव्या असें आपण चवथ्या विभागाच्या प्रस्तावनेंत पाहिलेंच आहे. त्यानंतर या भाषांची वाढ होऊन त्यांत महत्त्वाची अशी ग्रंथरचना होऊं लागण्यास दोनतीन शतकांचा तरी अवधि त्या कालच्या प्रगतीच्या गतीच्या मानानें लागला असावा; व बाराव्या-तेराव्या शतकांत अमृतानुभव, ज्ञानेश्वरीसारखे ग्रंथ निर्माण करण्याची पात्रता ज्या भाषेमध्यें आली त्या भाषेस यापूर्वीच दोनतीन शतकें तरी शिष्टसंमत व प्रौढ असें स्वरूप प्राप्त झालें असलें पाहिजे हें निर्विवाद आहे व असें स्वरूप प्राप्त झाल्याबरोबर हें स्वरूप निश्चित करण्यासाठीं तत्कालीन ग्रंथकारांस व पंडितांस त्या भाषेच्या व्याकरणाची आवश्यकता भासली असली पाहिजे; त्याप्रमाणें त्यांनीं प्रयत्नहि केले असले पाहिजेत. परंतु ज्याप्रमाणें या कालांतील वाङ्मय आपणास अज्ञात आहे त्याप्रमाणें त्या कालांतील व्याकरणाचे प्रयत्नहि आपणास अज्ञात आहेत, तथापि योग्य संशोधन झाल्यास मराठी व्याकरणाच्या उगमांतील निरनिराळ्या पायऱ्या आपणांस अवगत झाल्याशिवाय रहाणार नाहींत असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

महानुभावी व्याकरणें:—ज्ञानेश्वरकालीन अथवा तत्पूर्वकालीन मराठी वाङ्मयाचा एक भाग आपणांस महानुभावी वाङ्मय म्हणून परिचित आहे. या पंथामध्यें गद्य व पद्य दोन्ही प्रकारची ग्रंथरचना झालेली आपणांस आढळून येते. या ग्रंथकारांसहि व्याकरणाचें महत्त्व ठाऊक असून त्यांनींहि आपल्या भाषेचें व्याकरण करण्याचे प्रयत्न केल्याचें आपणास दिसून येतें. प्रसिद्ध महानुभाव ग्रंथकार भास्करभट्ट अथवा कवीश्वर व्यास यांचें महाराष्ट्र भाषाभाष्य अथवा सुभाष्य अशा कांहीं तरी नावाचें एक मराठी भाषेचें व्याकरण होतें अशा तऱ्हेचा उल्लेख त्यांच्या वाङ्मयांत आढळतो. यावरून त्यास भाषाबोध असेंहि म्हणत. आनेराज व्यास यानींहि लक्षण रत्नाकर या नांवाचा एक व्याकरण प्रबंध रचल्याचा उल्लेख आहे. त्यानंतर पंडित भीष्माचार्य यानीं नामविभाक्ति व पंचवार्तिक असे व्याकरण संबंधी ग्रंथ लिहिल्याचें आढळतें. महानुभावी व्याकरणकारसंबंधीं खालील पद्यांमध्यें उल्लेख आढळतात.

'माहींभट्टी व्याकर्णावरी । संस्कृत भाषा मंजरी । रचितें जहालें केशवसूरी । परमार्थ हेतु ॥ १ ॥ मूळ व्याकरणाचे नि आधारें । सुभाषानिबंधु बोलिला कविश्वरें । जो छप्पन्न भाषेसी होऊन उरें । महाराष्ट्रीये ॥ २ ॥ भाषा प्रबोध, भाषा प्रदीपिका । गौड महाराष्ट्री पीठिका । अष्टौ व्याकरणाचा अवाका । उमचविला ॥ ३ ॥ श्री भास्करें गोपाळा आज्ञापिलें । तें लक्षण रत्नाकर बोलिलें । मग पंचवार्तिक निरोपिते जहालें । भीष्ममुनि ॥ ४ ॥ लिंगनय विवंचना । दृष्टांतोपपत्ति न्याय प्रमाणा । उपपत्ति अनुपपत्ती शङ्कार्णे । दामोदरु प्रणितु ॥ ५ ॥ ऐसे भाषा निबंध महात्म मार्गीचे प्रसिद्ध । लिङ्गनय पदार्थभेद । कवीश्वरकृत ॥ ६ ॥'

आतां महानुभावीय वृद्धान्वयांत असें म्हटलें आहे कीं, तवलकांच्या स्वारींत महानुभावी धर्मग्रंथांचा नाश झाला व कवीश्वर वंशवर्णनांत 'विशेषासहित देह त्यजीयेलें । हीरोनियां नेलें । पुस्तकातें' असा उल्लेख आहे. यावरून एका काळीं महानुभावी ग्रंथांचा नाश झाला होता ही गोष्ट स्पष्ट आहे. अशा तऱ्हेनें एकदां एखाद्या आपत्तीमध्यें मूळ ग्रंथांचा नाश झाला म्हणजे पुनरुज्जीवनाच्या वेळीं जुने ग्रंथ म्हणून अनेक नवीनच ग्रंथ प्रसृत होण्याची भीति असते, ही गोष्ट चिनी वाङ्मयावर जेव्हां ख्रि. पू. तिसऱ्या शतकांत एका बादशहानें होळी करण्याचा प्रसंग आणला व त्यानंतर जें ग्रंथपुनरुज्जीवन झालें त्यांत असे अनेक बनावट ग्रंथ तयार करण्यांत आले, यावरून स्पष्ट होते; असो.

सध्या जो पंचवार्तिक या नांवाचा महानुभावी व्याकरण ग्रंथ आहे त्यावरून आपणांस एवढें तरी निश्चित माहीत होतें कीं, महानुभावी ग्रंथकारांनीं व्याकरण-शास्त्रावर विचार केला होता. तो कितपत प्रगत होता हें आपण पंचवार्तिकावरून पाहूं.

पंचवार्तिक—यांत १ सूत्रलक्षण, २ सूत्रप्रकृतिलक्षण, ३ सूत्रकारकलक्षण, ४ सूत्रव्याख्यानलक्षण व ५ सूत्रस्वरुपलक्षण अशीं पाच प्रकरणें आहेत.

१ सूत्रलक्षणात (अ) वचन (आ) वाक्य (इ) प्रकरण व (ई) महावाक्य असे सूत्राचे चार भेद सागून तीन पदाचें सूत्र तें वचन, सहा वचनाचें सूत्र तें वाक्य, बारा वाक्याचें सूत्र तें प्रकरण व बारा प्रकरणाचें सूत्र तें महावाक्य अशीं याचीं लक्षणें दिलीं आहेत.

(अ) पुन्हा वचनाचे एकपदी, द्विपदी व त्रिपदी असे भेद सागितले आहेत. नतर पदें, सलिंग, अलिंग व क्रिया या तीन प्रकारच्या असतात असें सागून सलिंगाचें पुल्लिंग, स्त्रीलिंग व नपुंसकलिंग असे भेद वर्णिले आहेत. तसेंच सलिंग पदास एकवचन, द्विवचन व बहुवचन अशीं तीन वचनें लागतात असें सोदाहरण नमूद केलें आहे. पण द्विवचन व बहुवचन एकत्रच केलीं आहेत. सलिंग पदाची पुन्हा नाम व सर्वनाम अशी विभागणी करून त्याचे पुन्हा केवळ व सयुक्त असें दोन वर्ग कल्पिले आहेत. नतर केवळ पदें कृदन्त किंवा तद्धित प्रत्ययें करून सिद्ध होतात असें सागितल आहे व त्याचीं उदाहरणें दिलीं आहेत. सयुक्त पदें समासानें होतात असें म्हटलें आहे. समासामध्यें अव्ययीभाव, तत्पुरुष, बहुव्रीहि व द्वद्व समासाचे प्रकार वर्णन करून तत्पुरुषाचे विभक्तितत्पुरुष, कर्मधारय व द्विगु असे भेद दाखविले आहेत. यानतर सधिप्रकरण दिलें आहे. यानतर सिद्धनामें काहीं विशेषणें व काहीं विशेष्यें असतात व सर्वनामें केवळ विशेषणेंच असतात असें सागितलें आहे. अव्ययाबद्दल 'अलिंगें तिर्येचि अन्वयें' म्हणून उदाहरणें दिलीं आहेत. क्रियाचे सलिंगा व अलिंगा असे भेद करून, भूत, भविष्य, वर्तमान हे काळभेदहि सागितले आहेत. तसेंच क्रियेचीं तीन वचनें व तीन पुरुष असें सागून सकर्मक व अकर्मक भेदहि दाखविले आहेत. यानतर कर्तरि, कर्मणि व भावे प्रयोग वर्णिले आहेत.

(आ) वाक्यविचारात वाक्याचे चार पदापासून अठरा पदापर्यंत असे १५ भेद करून त्याचीं उदाहरणें दिलीं आहेत. वाक्याचे पुन्हा केवळवाक्य व सयुक्तवाक्य असे भेद केले आहेत.

(इ) प्रकरणविचारात तीन वाक्यापासून बारा वाक्यापर्यंत प्रकरणाचे दहा भेद कल्पिले आहेत.

(ई) महावाक्याचे पुन्हा तीन प्रकरणापासून बारा प्रकरणापर्यंत दहा भेद केले आहेत.

२ सूत्रप्रकृतिलक्षणात सूत्राची दशधा प्रकृति पुढील श्लोकात वर्णन करून त्याची फोड केली आहे 'संज्ञा च परिभाषाच विधिर्नियम एव च। अतिदेशोऽपवादश्च विभाषा च निपातनम्॥ १॥ प्रतिषेधोऽधिकारश्च सूत्रतद्दशधाविदु'।

३ सूत्रकारक लक्षणात प्रथमेपासून सप्तमीपर्यंत सात विभक्ति सागितल्या आहेत व त्याचे अर्थहि दिले आहेत. 'सबोधनीं प्रथमा विभक्ति वर्ते' असें सागितलें आहे. प्रथमा विभक्तीचे कर्ता, कर्म व सबोधन, द्वितीयेचे कर्म, अत्यत सयोग व प्रतिशब्द, तृतीयेचे कर्ता, साधन, सहार्थक व विनार्थक, चतुर्थीचे सप्रदान व प्रयोजन, पचमीचा अपादान, षष्ठीचे सबध व शब्दयोग आणि सप्तमीचा अधिकरण असे अर्थ दिले आहेत. नतर विभक्तींचे प्रत्यय दिले आहेत.

४ सूत्रव्याख्यान लक्षणात पदच्छेद, पदार्थोक्ति, विग्रह, वाक्ययोजना, आक्षेप व समाधान या सहा प्रकारानीं सूत्राचा अर्थ प्रकाशित होतो म्हणून त्यास सूत्रव्याख्यान म्हणतात, असें सागून या सहा अगाची फोड केली आहे.

५ यानतर पाचवे वार्तिक सूत्रस्वरूपलक्षण यामध्यें सूत्राचीं पुढील बत्तीस लक्षणें सागून त्याचें विवरण केलें आहे. १ प्रतिज्ञा, २ प्रमाण, ३ दृष्टान्त, ४ उपपत्ति, ५ व्याप्ति, ६ विषयप्रदान, ७ विशेष प्रबोधक, ८ उत्सर्ग, ९ अपवाद, १० निषेध, ११ न्याय, १२ विरोधपरिहार, १३ काकु, १४ कक्षा, १५ भावार्थ, १६ प्रकरण, १७ अस्तित्व १८ निर्देश, १९ निर्णयो, २० पक्ष, २१ प्रभेद, २२ आशका, २३ आक्षेप, २४ कार्य, २५ लक्षण, २६ स्वरूप, २७ कारण, २८ हेतु, २९ सबध, ३० प्रतीति, ३१ विशेषण ३२ प्रतिष्ठा.

महानुभावी व्याकरणग्रथ कोणी अथवा केव्हा रचले याबद्दल जरी वादविवाद चालू असले तरी महानुभावी ग्रथकारानीं मराठी भाषेच्या व्याकरणाचा विचार केला होता व त्यावर आपली काहीं रचना केली होती हें नि सशय. वरील पचवार्तिकावरून त्यानीं आपलें व्याकरण सस्कृत व्याकरणास अनुसरूनच रचलेलें दिसतें. मराठी ही सस्कृत-

संभव भाषा असून तीवर इतर भाषांचा त्या वेळीं फारसा संस्कार झाला नसल्यामुळें तीच पद्धति :अनुसरणें साहजिक होतें. वरील व्याकरणांत आपणांस नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद व अव्यय या शब्दांच्या जाती पाडलेल्या आढळतात. तसेंच एकवचन व बहुवचन, तिन्ही लिंगें व सात विभक्ति यांचा विचार केलेला आढळतो. तसेंच कृदन्त व तद्धित शब्दांचाहि विचार आढळतो. तसेंच संधिविचार व समासविचारहि केलेला आढळतो. क्रियापदाच्या बाबतींत तीन काळ व तीन प्रयोग, सकर्मक-अकर्मकादि भेद दाखविलेले आढळतात. पुढील वार्तिकांत वाक्यांचे प्रकार व वाक्याचे पृथक्करणाचाहि विचार आढळतो.

**महानुभावी व्याकरणानंतरचीं व्याकरणें:**—महानुभावी ग्रंथकारानंतर तत्कालीन भाषेच्या व्याकरणाचा प्रयत्न केलेला आपणांस कोठें उपलब्ध होत नाहीं. ज्ञानेश्वरी ग्रंथाची भाषा बरीच जुनी असून ज्ञानेश्वरकालीन भाषेत व एकनाथकालीन भाषेत फरक पडला होता हें आपणास एकनाथानें ज्ञानेश्वरीची प्रति शुद्ध केली ( म्हणजे तत्कालीन रूढ भाषेंत लिहिली ) या ज्ञानेश्वरींतील उल्लेखावरून दिसून येतें. राजवाडे यांनीं संपादन केलेल्या ज्ञानेश्वरीची भाषा सांप्रदायिक ज्ञानेश्वरीहून जुनी असून त्या भाषेचें त्यांनीं व्याकरणहि लिहिलें आहे. परंतु ज्ञानेश्वरकालापासून इंग्रजी अंमलापर्यंतच्या कालात रूढ असलेल्या भाषेचें व्याकरण इतक्या दीर्घकालांत कोणी केलेलें आढळत नाहीं. मध्यंतरींच्या निरनिराळ्या कालखंडांत प्रचलित असलेल्या मराठी भाषेच्या निरनिराळ्या अवस्थांचीं व्याकरणें रचण्याचें कार्य अद्याप व्हावयाचें आहे.

**इंग्रजी अंमलांतील व्याकरणांची उत्पत्ति:**—यानंतर मराठी भाषेच्या व्याकरणाची आवश्यकता विशेषतः जे पाश्चात्य लोक हिंदुस्थानांत येऊन स्थायिक होऊन राहिले व आपल्या राज्याचा व धर्माचा प्रसार करण्याचें कार्य करू लागले त्यास भासली. विशेषतः धर्मप्रसाराच्या कामीं येथील सामान्य जनतेशीं संबंध येऊं लागल्यामुळें त्यांच्या भाषेचें ज्ञान या परदेशीय धर्मोपदेशकांस आवश्यक झालें व तें मिळविण्याकरितां त्यांस येथील देश्य भाषाच्या व्याकरणाची जरूरी भासूं लागली. हीच गोष्ट थोरल्या शास्त्रीबोवांनीं आपल्या व्याकरणावरील निबंधांत पुढें दिल्याप्रमाणें उल्लेखिली आहे. "ज्याची जी जन्मभाषा नव्हे त्यास ती येण्यास व्याकरणाचा जसा उपयोग होतो तसा तो त्याची ती जन्मभाषा आहे त्यास पडत नाहीं. मराठी लोकांस संस्कृत व इंग्रजी वगैरे भाषा येण्यास त्या भाषांच्या व्याकरणाचें ज्ञान जसें आवश्यक आहे तसें त्यांस मराठी भाषा येण्यास तिच्या व्याकरणाचें ज्ञान आवश्यक आहे असें म्हणतां येत नाहीं." अर्थात् आज या मताचा कोणी विद्वान् स्वीकार करणार नाहीं. येथील देश्य भाषाचें ज्ञान पाश्चात्यांनीं आपणास येत असणाऱ्या पाश्चात्य भाषांशीं तुलनात्मक रीतीनें मिळविण्याचा प्रयत्न केल्यामुळें त्यांनीं जीं देशी भाषाचीं व्याकरणें रचलीं, तीं पाश्चात्त्य भाषाच्या व्याकरणाच्या वळणावर गेलीं हें स्वाभाविकच होय.

हिंदुस्थानात खिस्ती धर्माचा प्रसार करणारे पहिले मिशनरी पोर्तुगीज होत. त्यांनीं गोमंतक प्रांत जिंकल्यावर तेथील धर्म व भाषा नष्ट करण्याचा पद्धतशीर प्रयत्न केला व धर्मप्रसाराकरितां म्हणून प्रथम देशी भाषांचा अभ्यास केला. त्या वेळीं गोमंतकात जरी कोंकणी हीच मराठीची बोली प्रचलित होती तरी तेथील कानडी राजसत्तेमुळें लिपी कानडी वापरण्यांत येत असे. त्यामुळें तत्कालीन पाद्री मिशनऱ्यांनीं गोमंतकी कोंकणी भाषेसच कानडी समजून त्या नांवानेंच तिचें व्याकरण तयार केलें. असें व्याकरण प्रथम फादर स्टीव्हन्स यानें इ. स. १६४० त रायतूर येथें छापलें. त्याचें नांव 'कानडी भाषेचें व्याकरण' ( Arte da Zingoa Canarim ) असें आहे. यावेरीज गोमंतकी बोली मराठीचीं अनेक व्याकरणें तयार झाल्याचे उल्लेख आढळतात; परंतु तीं हस्तलिखिताच्या रूपांतच असून छापलीं गेल्याचें दिसत नाहीं. १९ व्या, विसाव्या शतकात अलीकडे कांहीं कोंकणी भाषेचीं व्याकरणें छापलीं गेलीं आहेत; पण तीं व्याकरणाच्या इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाचीं नाहींत.

अशा तऱ्हेचें मराठी भाषेचें व्याकरण करण्याचे प्रयत्न वसईकडाल पोर्तुगीजांनींहि केले असावेत. असें एक व्याकरण रोम येथें इ. स. १७७८ सालीं छापलेलें आढळतें; त्याचें नांव 'ग्रामाटिका मरास्टा' ( Grammatica Marasta a mais vulgar que se practica nos reinos de Nizamaxa e Idalaxa Rom. 1778 ). त्याची दुसरी आवृत्ति लिस्बन येथें १८२५ त प्रसिद्ध झाल्याचा उल्लेख आढळतो; असेंच एक व्याकरण 'उत्तरेकडील कोंकणी बोलीचें व्याकरण—' Grammatica da Lingua Concani no dialecto

do Norte Composta no secalo XVII por Rum missionaris Portuguez e agroa pela primeria vez dala a estampa ( por Joachim Helisdoro da cunha Rivara. ) या नावाचें सतराव्या शतकात लिहिलेलें १८५८ साली नवें गोवें येथें कुन्जरिव्हारनें छापून प्रसिद्ध केलेलें आढळतें. याच सुमारास १८५४ मध्यें फिलिप नेरी पिअर्स यानीं मुंबईत एक Grammatica Maratha Explicada em Lingua Portuguza या नावाचें व्याकरण प्रसिद्ध केलें व १८७० मध्यें सूर्याजी आनंदराव देशपांडे यानीं एक मराठी व्याकरण लिहिलें आहे.

एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं श्रीरामपूर येथें इंग्लिश मिशनऱ्यानीं देशी भाषाचे कोश व व्याकरणें रचण्याचें कार्य चालविलें होतें, त्यापैकीं डॉ. विल्यम केरी यानें इ. स. १८०५ सालीं पंडित वैद्यनाथ शास्त्री याच्या साहाय्यानें मराठी भाषेचें व्याकरण इंग्रजींत लिहिलेलें प्रसिद्ध आहे (Grammer of the Mahratta Language, with Dialogues of familiar subjects Carey William ) यापुढें इ स. १८२६ सालीं महमद इब्राहिम मक्बा ( नालवा ? ) यान केलेलें व व्हॉन्स केनेडी यानें सुधारलेलें एक व्याकरण, प्रसिद्ध झाल्याचा दाखला आढळतो. यानतर इंग्रजानीं मराठी व्याकरणासंबधीं केलेले प्रयत्न, म्हणजे जे. बॅल्टाइनचें एडिंबरा येथें छापलेलें व्याकरण ( Mahratta Grammar Edinburgh 1839 ), रे. जे. स्टीव्हन्सन याचें मुंबईस १८४३ सालीं छापलेलें ( The principles of Mahratta Grammar Bombay 1843 ), तसेंच १८४८ सालीं मुंबईस निघालेलें एक व्याकरण ( Marathee Grammar Bombay 1848 ), ई. बर्जेस याचें मराठी भाषेचें व्याकरण ( Grammar of the Marathi Language Bombay 1854. ) व एच्. एस् के. बेलायर्स व असवेडकर याचें १८६८ सालीं प्रसिद्ध झालेलें मराठी भाषेचें व्याकरण, हे होत.

अमेरिकन मिशनचें व्याकरण —वरील सर्व व्याकरणें युरोपीय लोकांकरिता प्राय लिहिलीं असल्यामुळें इंग्रजी भाषेंत आहेत. परंतु १८४८ सालीं प्रसिद्ध झालेलें व्याकरण अहमदनगर येथील अमेरिकन मिशननें तयार केलेलें असून अमेरिकन मिशन प्रेस मुंबईमध्यें छापलें आहे पण तें सर्व मराठींत आहे. या व्याकरणातील विशेष म्हणजे शब्दाच्या जाती, नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, उपसर्ग, उभयान्वित व केवळप्रयोग अशा सात केल्या आहेत. विशेषणामध्यें नाम, विशेषण व क्रियाविशेषण असा भेद केला आहे. शब्दयोगी अव्ययास उपसर्ग सज्ञा दिली आहे. सामान्य रूपास कार्यरूप असें म्हटलें आहे. नामाचे फक्त सामान्य व विशेष असे दोनच भेद केले आहेत विभक्ति फक्त प्रथमा, कर्म विभक्ति व सबोधन विभक्ति अशा तीन कल्पिल्या आहेत. सामान्यरूप होण्याच्या प्रकारावरून नामाचे वर्ग केले आहेत. सर्वनामाचे पुरुष, दर्शक, परस्परसबधीं, प्रश्नार्थक व सामान्य असे भेद केले आहेत. विशेषणाचे गुण व सख्या असे दोन भेद केले आहेत. विभक्तिप्रत्यय व शब्दयोगी अव्ययें सर्व उपसर्ग या सदरात घातलीं आहेत व त्याची एक यादी दिली आहे. याची सख्या ९४ असून त्यात आसपास, तागाईत, रूबरू, समक्षा-समक्ष, हुजूर, चा, ची, चें, तें, णें याचाहि समावेश केला आहे क्रियापदाचे सकर्मक, अकर्मक व कर्मणी असे भेद केले आहेत. तसेंच आणखी नियमित, अनियमित, साहाय्यकारक, प्रयोजक, अपूर्ण व भावी असेंहि भेद केले आहेत. क्रियापदास पुरुष, वचन, लिंग, काळ व रूपभेद असतात असें सागितलें आहे व रूपभेदाचे निश्चयार्थ, सकेतार्थ, धर्मार्थ, शक्यार्थ, सशयार्थ, आज्ञार्थ आणि सामान्यार्थ असे प्रकार वर्णिले आहेत. यात विध्यर्थाबद्दल धर्मार्थ शब्द वापरला आहे, स्वार्थाबद्दल सामान्यार्थ वापरला आहे. काळामध्यें वर्तमानाचे सामान्य, अपूर्ण व रीति, भूतकाळाचे अपूर्ण, पूर्ण, सामान्य, भूतभूत, रीतिभूत व भविष्य काळाचे वर्तमान व भूतभविष्य असे भेद दाखविले आहेत. यानतर निरनिराळ्या क्रियापदाचीं रूपें दिलीं आहेत क्रियाविशेषणाचे भेदाचा नेम नाहीं असें सागून सख्या, क्रम, स्थळ, काळ, परिणाम, रीति, सशय, निश्चय, निषेध, परस्परसबध इतक्या प्रकारचीं उदाहरणें दिलीं आहेत उभया-न्विताचे योजक व भेदक असे दोन प्रकार केले आहेत. नतर वाक्यरचनेसबधीं काहीं नियम दिले आहेत व काहीं वाक्याचें व्याकरण चालवून दाखविलें आहे याप्रमाणें या व्याकरणाचें सामान्य स्वरूप आहे

इंग्रजी अमलातील मराठी व्याकरणाची वाढ — अव्वल इंग्रजींत शिक्षणसस्था स्थापन झाल्या, त्यात मराठी व्याकरण प्राय तोंडीं शिकवीत, व्याकरणाचीं काहीं लेखी टिपणें असत तीं विद्यार्थी उतरून घेत व ग्रथावरून व्याकरण लावलें जाई. पण व्याकरणाचीं छापलेलीं पुस्तकें नव्हतीं.

कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं १८६५।६६ सालीं व्याकरणावर निबंध लिहिले त्यात त्यांनीं तत्पूर्वी छापलेल्या चार व्याकरणाचा कालानुक्रमानें उल्लेख केला आहे. त्यातः—

"पहिलें"—जावेकर याचें बाल-व्याकरण. हा ग्रंथ फारच लहान आहे व त्यात मूळ विषयाचें दिक्प्रदर्शन-सुद्धा पुरें नाहीं" असा उल्लेख आहे.

"दुसरें:—व्याकरण गंगाधरशास्त्री फडके याचें. हें व्याकरण पहिल्यापेक्षा मोठें असून त्यात विषयसंग्रहही पुष्कळ आहे व त्या विषयाचें विवरणही बरेंच केलें आहे. तरी ह्या ग्रंथात काहीं विषय सोडले आहेत व त्याचें उपपादन केलें आहे त्याचें तें उपपादन कितीएक अशीं न्यून आहे व किती एक ठिकाणीं दूषणग्रस्तही आहे." फडके याचें हें व्याकरण प्रश्नोत्तर आहे. तें १८३६ त प्रथम छापलें व तें दादोबाच्याही अवलोकनात आलें होतें असें त्याच्या व्याकरणाच्या प्रस्तावनेवरून दिसतें.

तिसरें.—दादोबा याचें व्याकरण. दादोबानीं प्रथम प्रश्नोत्तररूपानेंच आपलें व्याकरण लिहिलें होतें, पण दुसरीं दोन व्याकरणें प्रश्नोत्तर आहेत असें पाहून त्यानीं आपल्या पुस्तकाचें मूळचें स्वरूप बदलून सारें पुस्तक पुनः साध्या विवेचनाचे स्वरूपात अगदीं थोड्या अवकाशात लिहिलें (प्रस्तावना पहा). अर्थात् छापलेल्या व्याकरणात कालानुक्रमानें दादोबाचें व्याकरण हें तिसरें होय. दादोबाच्या व्याकरणाची पहिली आवृत्ति १८३६ त कृष्णाजी गणपत याच्या शिळाछापावर छापिली असून तींत १९२ पृष्ठें होतीं. हें तत्पूर्वीच्या व्याकरणापेक्षा फारच श्रेष्ठ प्रतीचें होतें. दुसरी आवृत्ति १८५० त छापताना ती सुधारून पुष्कळच वाढविली. इतकी कीं, दादोबा त्यासंबधानें म्हणतात, "त्या ग्रंथाची विस्तारानें नवीन रचना करावी लागली." अशी सुधारणा इतर व्याकरणात झाली नाहीं, यामुळें तीं मागें पडलीं व पुढें पुष्कळ वर्षें दादोबाचें व्याकरण हेंच प्रमाणभूत होऊन राहिलें, ही गोष्ट यथाक्रमच झाली.

चवथें.—रा. गंगाधर रामचंद्र टिळक याचें लघुव्याकरण. हा ग्रंथ वर सांगितलेल्या दोन ग्रंथाचा (फडके व दादोबा) व विशेषतः दादोक्त व्याकरणाचा केवळ थोडाफार संक्षेप आहे. यात वर सांगितलेल्या ग्रंथाचे गुण नसता त्यातील कितीएक दोष मात्र आहेत. शाळेंतील मुलास जुन्या चालीप्रमाणें व्याकरणातील काहीं ढोबळ ढोबळ गोष्टी सांगण्यास टिपणादाखल हा ग्रंथ उपयोगीं पडला तरी मराठी व्याकरणरूप विषयाचें विशेष व्यक्तीकरण होण्यास हा ग्रंथ अगदीं योग्य नाहीं, असें कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात.

कृष्णशास्त्री चिपळूणकर हे ट्रे. कॉलेजचे प्रिन्सिपॉल झाल्यावर त्याचें मराठी व्याकरणाकडे विशेष लक्ष वेधलें. दादोबाचे व्याकरणात त्यास अनेक उणीवा व दोषस्थळें दिसलीं, तेव्हा त्याचें दिग्दर्शन करून आपल्या मताचें सविस्तर उपपादन करण्यासाठीं त्यानीं शालापत्रक या मासिकातून १८६५ त 'मराठी व्याकरणावर निबंध' लिहिण्यास सुरवात करून एकंदर २५ निबंध लिहिले त्यात वर्णापासून वाक्यरचनेपर्यंत व्याकरणाच्या बहुतेक अंगाचा परामर्श घेतला. या निबंधातील मतावर कित्येकानीं काढलेल्या मार्मिक शंका आणि त्यावर शास्त्रीबोवानीं दिलेलीं सविस्तर व समर्पक उत्तरें शालापत्रकात प्रसिद्ध झालीं. हे निबंध, या पत्रव्यवहारासह स्वतंत्र पुस्तकरूपानें रा. भि. जोशी यानीं (आपले ३ निबंध जोडून) १८९३ त प्रसिद्ध केले. यामुळें ते आज कोणासही उपलब्ध होण्याजोगे आहेत.

चिपळूणकराचे हे निबंध शालापत्रकात सुरू असता किंबहुना त्याच्याही जरा आधींपासून दुसरे एक विद्वान् गृहस्थ मराठी व्याकरणाची स्वतंत्रपणें रचना करीत होते. ते म्हणजे कृष्णशास्त्री गोडबोले हे होत. हे त्या वेळच्या जाड्या विद्वानापैकीं एक होते. संस्कृत आणि मराठी या भाषाप्रमाणेंच इंग्रजी भाषेचाही त्यानीं सूक्ष्म अभ्यास केला होता व तदनुषंगानें फारसी व अरबी भाषेचेंहि ज्ञान संपादिलें होतें. यानीं व्याकरणाखेरीज मराठी ग्रहलाघव, ज्योतिःशास्त्र, बीजगणित, इंग्रजी अंकगणित, इंग्रजी भाषेचें निरूपण (इ.), इंग्रजी भाषेचें आणखी निरूपण (इ.), भूमितीचें भाषांतर, वास्तुशोधन, वेदांचें पुरातनत्व (इ.) इत्यादि ग्रंथ केले आहेत. त्यावरून त्याची सर्वगामी सूक्ष्म बुद्धि आणि दृढ व्यासंग हे गुण प्रतीत होतात. अशा विद्वान् गृहस्थाकडून झालेलें 'मराठी भाषेचें नवीन व्याकरण'ही त्याच्या योग्यतेस साजेसेंच निपजलें. हें १८६७ त छापलें.

सन १८६२ त दक्षिणा प्रैझ कमिटीनें मराठी व्याकरणाचे संबंधानें एक जाहिरात दिली. कृष्णशास्त्री चिपळूणकर हे या वेळीं या कमिटीचे सेक्रेटरी होते. त्याच्याच सहीनें ही जाहिरात ऑक्टोबर १८६२ च्या शालापत्रकात

प्रसिद्ध झाली आहे. हींत मराठी व्याकरण कसें असावें याचें सामान्य दिग्दर्शन सुंदर रीतीनें केलें आहे. तें बर्याच चिपळूणकर यांनींच केलें असून त्यांत मराठी व्याकरण कसें असावें यासंबंधाचे त्यांचे विचार प्रतीत झाले आहेत. या जाहिरातीस अनुसरून गोडबोले यांनीं आपल्या व्याकरणाची रचना केली. ही जाहिरात पुढीलप्रमाणें होती:—

" जाहिरात–मराठी व्याकरणाविषयीं:—मराठी व्याकरणावर उत्तम प्रतीचा ग्रंथ कोणी तयार केल्यास दक्षिणा प्रैझ कमिटी त्या ग्रंथकर्त्यास उत्कृष्ट प्रतीचें बक्षीस देण्यास सिद्ध आहे. हा ग्रंथ मराठी भाषेंत असावा व त्यांतील विषयप्रतिपादन करण्याची शैली युरोपियन अर्वाचीन व्याकरणासारखी असावी. म्हणजे ग्रंथकर्त्यानें एकदोन उदाहरणांवरून एखादा व्यापक नियम बनवून त्यावरून इतर उदाहरणांची उपपत्ति काढण्यास लागूं नये. तर जीं वास्तविक उदाहरणें असतील त्यांवरून नियम बांधावे. तसेंच भाषा कसकशी बदलत गेली याच धोरणानें ग्रंथकारानें शब्दसिद्धीचे व वाक्यरचनेचे नियम बांधून त्यांचें निरूपण करताना मूळच्या संस्कृत भाषेंतून प्राकृत भाषा, जिला बालभाषा म्हणतात तिच्या द्वारें व जुन्या मराठी भाषेच्या ( ज्ञानेश्वरीच्या वगैरे भाषेच्या ) द्वारें हल्लींची मराठी भाषा कशी निपजली हें संभवेल व शोभेल तितकें दाखवावें. तसेंच हल्लींच्या मराठींत फारसी व आरबी शब्द मिसळले आहेत त्यांचेंही प्रकृतिप्रत्ययरूपानें विवेचन या ग्रंथांत केलेंच असावें. त्याप्रमाणेंच जुन्या मराठी कवींच्या ग्रंथांतील शब्दांची व शब्दरचनेची उपपत्ति होईल असे नियम या ग्रंथांत असावे. या ग्रंथांतील सिद्धांत एकदेशी नसतां होतील तितके व्यापक असावे. ज्याचा ग्रंथ उत्तम होईल त्यास प्रथम ५०० रुपये दक्षिणा प्रैझ कमिटी देईल व त्या ग्रंथाच्या विक्रीच्या पैशांतून आणखी ५०० रुपये त्यास मिळतील. याप्रमाणें एकंदर एक हजार रुपये ग्रंथकर्त्यास मिळतील.

( सही ) कृष्णशास्त्री चिपळूणकर,
सेक्रेटरी, "नियामक दक्षिणा प्रैझ कमिटी."

चांगलें मराठी व्याकरण कसें असलें पाहिजे याविषयीं चिपळूणकरांची कल्पना वरील जाहिरातीवरून व्यक्त होते. त्यांनीं दादोबांच्या ग्रंथाकडे याच दृष्टीनें पाहिलें आहे आणि याच दृष्टीनें आपल्या निबंधांत अनेक मुद्द्यांचें मोठ्या मार्मिकपणें सविस्तर उपपादन केलें आहे. यामुळें विद्यमान मराठी व्याकरणग्रंथांत त्यांच्या या निबंधाची योग्यता असामान्य आहे. त्यांचे लेखणींतून उर्वरित विषयाचेंही असेंच विवेचन झालें असतें तर या निबंधास पूर्णत्व येऊन मोठा लाभ झाला असता. त्यांनीं व्याकरणाचा जो इतका खोल विचार केला आहे त्यावरून मराठीचें स्वतंत्र व्याकरण स्वतःच लिहिण्याचा विचारही त्यांचे मनांत असावा असें अनुमान होतें व त्यांचे हातून असें व्याकरण तयार झालें असतें तर महाराष्ट्र भाषेस तो एक बहुमोल अलंकारच मिळाला असता यांत शंका नाहीं. तथापि त्यांच्या या २५ निबंधांत ऐतिहासिक दृष्टीनें व्याकरण विषयाचें सोपपत्तिक व व्यापक विवेचन करण्याची जी पद्धति दाखवून दिली आहे ती पुढील ग्रंथकर्त्यांस मार्गदर्शक झाली आहे यांत शंका नाहीं.

वर उद्धृत केलेल्या जाहिरातीस अनुसरून म्हणजे एक प्रकारें कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्याच मार्गदर्शित्वानें कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं आपल्या व्याकरणाची रचना केली आणि त्याचा तो हस्तलेखही छापण्यापूर्वी चिपळूणकरांनीं पाहिलेला होता. गोडबोले यांचें हें व्याकरण दक्षिणा प्रैझ कमिटीच्या पसंतीस उतरून त्यास यथायोग्य बक्षीसही मिळालें.

यानंतर दादोबांना आपल्या व्याकरणाची नवी आवृत्ति तयार करतांना या दोन ग्रंथांतील मतांचा विचार करणें अवश्यच होतें व तसा तो त्यांनीं केल्यामुळेंच त्यास सातव्या आवृत्तींत बरीच सुधारणा करूनही आपल्या मताच्या विवेचनार्थ व पुष्ट्यर्थ एक स्वतंत्र ग्रंथ लिहावयाची आवश्यकता भासली. " मोठ्या महाराष्ट्र व्याकरणाच्या सातव्या आवृत्तीची पूरणिका " असें या ग्रंथाचें नामाभिधान असून तो १८८१ त प्रसिद्ध झाला आहे. याचीं २१५ पृष्ठें आहेत.

येथवर केलेल्या विवेचनावरून असें दिसून येईल कीं सन १८३६ त दादोबांनीं व्याकरण छापल्यापासून सन १८८१ मध्यें पूरणिका रचिली तेथपर्यंतचा ४५ वर्षांचा काल हा व्याकरणरचनेच्या दृष्टीनें इंग्रजी अंमलांतील पहिला कालखंड धरावयास हरकत नाहीं. या कालखंडांत कोणा व्याकरणकारानें कोणती भर घातली हें पहावयाचें तर चार ग्रंथ विचारांत घेतले पाहिजेत.

१ दादोबाचे व्याकरणाची १८५१ त छापलेली दुसरी आवृत्ति.

२ कृष्णशास्त्री चिपळूणकरकृत मराठी व्याकरणावरील निबंध.

३ कृष्णशास्त्री गोडबोलेकृत मराठी भाषेचें नवीन व्याकरण.

४ दादोक्त व्याकरणाची सातवी आवृत्ति, तिचे पूरणिकेसह.

मराठी भाषेचे स्थलपरत्वें अनेक प्रकार नमूद करून आपण कोणत्या प्रकारच्या भाषेचें व्याकरण लिहिणार याविषयीं दादोबा म्हणतात, " महाराष्ट्र देशाचा मध्यभाग जो पुणें प्रांत त्यांत जी भाषा राजकीय आणि विद्वान् लोक बोलतात तिचें अनुसरण या व्याकरणांत केलें आहे."

दादोबाचें व्याकरण --दादोबानीं आपल्या व्याकरणासाठीं भाषेची स्थलकालमर्यादा कोणती ठरविली होती हें पाहिल्यानंतर त्यांनीं आपल्या दृष्टीपुढें व्याकरणाचा कोणता आदर्श ठेविला होता असा आणखी एक प्रश्न उपस्थित होतो. त्यांना संस्कृत येत नव्हतें, इंग्रजी व्याकरण येत होतें आणि त्याच व्याकरणाचें अंधानुकरण त्यांनीं केलें असून त्यामुळें त्यांचें व्याकरण सदोष झालें आहे, असा आक्षेप क्वचित् काढण्यांत येतो. त्यांच्या व्याकरणाच्या पहिल्या आवृत्तीसंबंधानें असा आक्षेप घेण्यास कदाचित् काहीं जागा असली तरी दुसऱ्या आवृत्तीसंबंधानें तसें म्हणतां येईल असें दिसत नाहीं. पहिल्या आवृत्तीच्या वेळीं त्यांचें वय विशीच्या आंत असल्यानें त्यावेळीं त्यांचे विचार तितके परिपक्व झाले नसणें शक्य आहे. परंतु त्यानंतर त्यांनीं संस्कृत व्याकरणाचें चांगलें अध्ययन करून लघुकौमुदीचें मराठींत सविस्तर विवरणासह भाषांतरहि बरेचसें केलें होतें आणि मराठी भाषेचें सर्वांगपूर्ण व्याकरण तयार करण्याचें ध्येय सतत दृष्टीपुढें ठेवून दहाबारा वर्षें सूक्ष्म अवलोकन व परिशीलन चालविलें होतें. त्याचेंच फळ म्हणजे त्यांच्या व्याकरणाची द्वितीयावृत्ति होय. या आवृत्तीवरून पाहतां त्यांनीं संस्कृत व्याकरण किंवा इंग्रजी व्याकरण असा कोणताहि एकच एक आदर्श पुढें ठेविल्याचें दिसून येत नाहीं. तर त्या काळीं जी मराठी भाषा शिष्ट जनांच्या बोलण्यांत व लिहिण्यांत रूढ होती तीस लागू होईल असें तिचें स्वतंत्रपणें व्याकरण रचावयाचें हेंच त्यांचें उद्दिष्ट असून त्याप्रमाणें त्यांनीं भाषेंतील रूपविशेषांचें परिगणन करून त्यास नियमांत गोंवण्यासाठीं परिश्रमाची शिकस्त केल्याचें दिसून येतें. मराठी भाषा ही संस्कृताशीं विशेष संबद्ध असल्यामुळें संस्कृत व्याकरणांतील पुष्कळशी परिभाषा मराठी व्याकरणास उपयोगीं पडण्याजोगी आहे व तिचा शक्य तितका स्वीकार दादोबानींहि केलाच आहे. स्वर, व्यंजन, नाम, सर्वनाम, विशेषण, विशेष्य, क्रियापद, धातु, काळ इत्यादि संज्ञा, लिंगाचीं व विभक्तींचीं नांवें, वर्णांचीं स्थानें, संधि नियम, विभक्तींची संख्या, समासांचीं नांवें व लक्षणें, कर्ता, कर्म, करण, इत्यादि कारकार्थ वगैरे बहुतेक सारी परिभाषा त्यांनीं संस्कृत व्याकरणांतूनच घेतली आहे तथापि त्यांनीं इंग्रजी व्याकरणांतील पद्धति ही बरीच उचललेली आहे शब्दांच्या ८ जाति करणें, नामाचे सामान्य, विशेष व भाववाचक असे प्रकार करणें, सर्वनामाचे पुरुषवाचक, दर्शक, संबंधी, प्रश्नार्थक व सामान्य असे ५ प्रकार कल्पिणें, क्रियापदाला रूप, भेद वगैरे मानणें यासारख्या पुष्कळ गोष्टी त्यांनीं इंग्रजी व्याकरणांतून घेतल्या आहेत हें स्पष्ट आहे. याप्रमाणें त्यांनीं इंग्रजी व संस्कृत व्याकरणांतील पद्धतींचा अवलंब केला असला तरी त्यांचें अंधानुकरण केलें नाहीं. मराठी भाषेचा स्वतंत्रपणें अभ्यास करून तीस उपयुक्त होतील तेवढ्याच गोष्टी व त्याही मराठीस साजतील अशा बेतानें त्यांत फरक करून त्यांनीं घेतल्या आहेत व यांत अयुक्त असें काहीं नाहीं त्यांच्याशीं इतर वैय्याकरणांचा मतभेद होणें साहजिक आहे. त्यांनीं स्वीकारलेल्या कित्येक गोष्टी व त्यांनीं केलेल्या कित्येक व्यवस्था इतरास मान्य होणें न होणें हा भाग अगदीं वेगळा आहे. त्यांच्या कित्येक गोष्टी आज विद्वानास न पटल्या व त्यांत काहीं फरक करावासा त्यास वाटला तरी तेवढ्या वरून त्यांनीं इंग्रजी व्याकरणाचें अंधानुकरण केलें असा दोषारोप करणें युक्त होणार नाहीं असें आम्हास वाटतें.

त्यांनीं वर्णविचार, शब्दविचार व वाक्यविचार असे व्याकरणाचे मुख्य ३ विभाग पाडले आहेत. वर्णविचारांत वर्णांचें परिगणन, स्वर-व्यंजनें असे भेद, जोडाक्षरांची बनावट, वर्णांचीं स्थानें व तदनुसार वर्णांचें वर्गीकरण, आणि स्वरसंधीचे व व्यंजनसंधीचे नियम इतका विषय घेतला आहे शब्दविचारांत शब्दांच्या ८ जाति, नामाचे सामान्य, विशेष व भाववाचक असे ३ प्रकार, तीन लिंगें व त्याशिवाय सामान्य लिंग, लिंग ओळखण्याचे नियम, दोन वचनें, एकच वचन असणारे शब्द, संबोधनासह आठ विभक्ति, सामान्य रूपाचे प्रकार, उपांत्यास होणारे विकार,

सर्वनामाचे पुरुषवाचक, संबंधी, दर्शक, प्रश्नार्थक व सामान्य असे ५ प्रकार, विशेषणाचे गुणविशेषण व संख्याविशेषण असे २ प्रकार आणि संख्याविशेषणात संख्यापूरक, क्रमवाचक, आवृत्तिवाचक व संख्यावाचक असे पोटप्रकार, क्रियापदाचे सकर्मक, अकर्मक, उभयविध असे भेद, भावकर्तृक, सहाय, प्रयोजक व शक्य क्रियापदें, क्रियापदाचे रूप, भेद, प्रयोग, अर्थ व काळ, संयुक्त क्रियापदाचे संयुक्त काळ, धातुसाधित शब्द, अस, नस, हो, दे हे धातु चालवून दाखविणें, कर्तरि, कर्मणि, भावि, भावकर्तरि व कर्मकर्तरि प्रयोग आणि सिद्ध व गौण क्रियापदें, क्रियाविशेषण अव्ययामध्यें शुद्ध अव्ययें, धातुसाधित क्रियाविशेषण आणि मूळचीं गुणविशेषणें असणारीं क्रियाविशेषणें याशिवाय क्रि० वि० अव्ययाचे स्थलवाचक, कालवाचक, संख्यावाचक, क्रमवाचक, निश्चयवाचक व अनुकरणवाचक, असे प्रकार; उभयान्वयी अव्ययाचे समुच्चयवाचक, पक्षांतर बोधक, न्यूनत्वबोधक, कारणबोधक व संकेतबोधक असे ५ प्रकार, शब्दयोगी अव्ययामध्ये शुद्ध शब्दयोगी अव्यय हा एक प्रकार आणि केवलप्रयोगी अव्ययात धिक्कार, दुःख, तिरस्कार, हर्ष, धन्यता, आर्जव व आश्चर्य दर्शविणारीं अव्ययें, साधित शब्दामध्यें निरनिराळे प्रत्यय लागून होणारे नाना प्रकारचे धातुसाधित व शब्दसाधित शब्द, समासाचे ८ प्रकार, द्वंद्वामध्यें समाहार द्वंद्व, कारकामध्यें प्रत्येक विभक्तीचे समजणारे अनेक अर्थ, षष्ठीच्या संबंधाचे 'अंगांगीभाव' वगैरे प्रकार, वाक्य विचारात वाक्यरचनेचे मुख्य ३० नियम, लेखन-पद्धति, विरामचिन्हें आणि वाचनपद्धति, आणि नमुन्याशब्दावरून प्रथावरून व्याकरण चालवून दाखविणें. इतके विषय दीक्षितांच्या व्याकरणात समाविष्ट झाले आहेत

गोडबोले व्याकरण :—गोडबोले यांच्या व्याकरणात प्रथम जगातील भाषाचे तुराणी, शमी व आर्य असे ३ वर्ग सांगितले असून अनेक आर्य भाषात कसें साम्य आहे तें लॅटिन, संस्कृत, ग्रीक, फारशी, इंग्रजी, मराठी आणि जर्मन भाषांतील अनेक शब्दांवरून दाखविलें आहे. चिपळूणकरांच्या मताप्रमाणेंच यात व्याकरणाचे शब्दविचार व वाक्यविचार असे २ भाग केले आहेत. वर्णांचें वर्गीकरण संस्कृत व्याकरणास अनुसरून केलें आहे. पण ख्, घ् इत्यादि महाप्राण वर्ण क्, ग् इत्यादि अल्पप्राण वर्णांत हकार मिळून झाले असल्यामुळें ते वास्तविक संयुक्तवर्ण आहेत आणि लिपींतील तीं तीं अक्षरेंही क्+ह्=ख अशीं संयोगानेंच बनलीं आहेत असें प्रतिपादिलें आहे.

स्वरसंधि, व्यंजनसंधि व विसर्गसंधि यांचे नियम संस्कृत व्याकरणास अनुसरून सविस्तर दिले असून त्यांचे तेथील अपवादही दिले आहेत! मराठी व्याकरणाचे दृष्टीनें हा संधिविचार अधिक पाल्हाळाचा झाला, असेंही वाटणें शक्य आहे.

यांचें सर्वनामाचे विवेचन अगदीं अभिनवच आहे. ते सर्वनामास शब्दांच्या मुख्य वर्गांत गणीत नाहींत किंवा चिपळूणकरांच्या मताप्रमाणें नामाच्या पोटवर्गांतही मानीत नाहींत. त्यांचीं सर्वनामें नामात्मक, विशेषणात्मक, आणि क्रियाविशेषणात्मक अशीं ३ प्रकारचीं आहेत! प्रातिपदिकाऐवजीं येणारें तें सर्वनाम असा त्याचा अर्थ आहे आणि प्रातिपदिकें पदार्थबोधक (नामें), गुणबोधक (विशेषण), आणि क्रियाबोधक अशीं तीन प्रकारचीं असल्यामुळें त्यांच्या ऐवजीं येणारीं सर्वनामेंही (त्यांच्या कल्पनेप्रमाणें) सहजच उपर्युक्त तीन प्रकारचीं झालीं. मी, तूं, हा, जो, इ. शब्द स्वतंत्रपणें (पुढें नाम न घालतां) योजले जातील तेव्हा तीं नामात्मक सर्वनामें. त्यापुढें नामाची योजना असेल तर तीं विशेषणात्मक सर्वनामें. यांचे पुरुषवाचक, दर्शक, संबंधी, प्रश्नार्थक व अनिश्चित संख्यार्थक असे पाच प्रकार केले आहेत. 'त्या भिकाऱ्यानें' यात त्या हें 'पुरुषवाचक विशेषणात्मक सर्वनाम.' जो पदार्थ यात, जो हें 'संबंधी विशेषणात्मक सर्वनाम.' आणि रामा स्वतः गेला यात स्वतः हें 'पुरुषवाचक क्रियाविशेषणात्मक सर्वनाम.' तेथें, तेथून, एथवर, तोंपर्यंत, तेवीं, तेव्हा, कसा, तद्वत्, इ. शेंकडों क्रियाविशेषणात्मक सर्वनामेंच! यांचे पुनः दर्शक, संबंधी, प्रश्नार्थक इत्यादि पोटवर्ग व त्यांचे पुनः स्थलवाचक वगैरे प्रतिपोटवर्ग सांगितले आहेत. केवलप्रयोगी अव्यय हें एकटें संबंध वाक्याचें काम करतें, तें वाक्याचा भाग होऊं शकत नाहीं, म्हणून गोडबोले या शब्दास 'व्याकरणांत अनवश्यक' म्हणतात आणि वर्गीकरणातून गाळतात. त्यांचीं सर्वनामेंही स्वतंत्र न राहतां नामें, विशेषणें व क्रियाविशेषणें यांचे पोटात विभागलीं जातात म्हणून त्यांचे शब्दाचे वर्ग ६ होतात. १ नाम, २ विशेषण, ३ क्रियाविशेषण, ४ क्रियापद, ५ शब्दयोगी अव्यय व ६ उभयान्वयी अव्यय.

नामाचे विशेष, सामान्य व भाववाचक असे ३ वर्ग केले आहेत. फळ, लष्कर वगैरे समूहार्थक नामें सामान्य नामांत आणि सोनें, लाकूड इ. द्रव्यवाचक नामें भाववाचक नामांत समाविष्ट होतील असें त्यांचें म्हणणें आहे.

विशेषणाचे गुणवाचक व संख्यावाचक असे दोन भेद केले आहेत. संख्या हाही एक गुणच असल्यामुळे वास्तविक गुणविशेषणातच संख्यादर्शकाचाही समावेश होतो. परंतु दोहोंस कांहीं कार्यें भिन्न होतात म्हणून दोन वर्ग मानणें बरें, असें धारण सांगितलें आहे. संस्कृत विशेषणाचीं तरतमभावानें होणारीं रूपें सविस्तर दिलीं आहेत. कर्तृ–करीयस्–करिष्ठ, वृद्ध–वर्षीयस्–वर्षिष्ठ, वसुमत्–वसीयस्–वसिष्ठ इ० रूपांची माहिती मराठी व्याकरणात तितकीशी आवश्यक वाटत नाहीं.

षष्ठी विभक्ति मानिलेली नाहीं. रामाचा इ. रूपें विशेषणेंच मानिलीं आहेत. हिंदुस्थानी, गुजराथी व सिंधी या भाषांत हीं रूपें विशेष्यनिघ्नच म्हणजे विशेषणेंच आहेत असें सोदाहरण दाखविलें आहे.

संस्कृत नामाच्या लिंगासबंधाचे व पुल्लिंगी नामावरून स्त्रीलिंगी नामें बनविण्यासंबंधाचे नियम संस्कृत व्याकरणानुसार सविस्तर दिले आहेत. त्यात करीष, मरत्, रज्जू, धामन्, मघवत्–मघोनी, ब्रह्मन्–ब्रह्माणी, उपाध्यायी, उपाध्यायानी, आचार्यानी इ. मराठींत प्राय न येणारे संस्कृत शब्द पुष्कळ आले आहेत.

चिपळूणकराच्या मताप्रमाणेंच जो तो यातील थो हा प्रथमैकवचनाचा प्रत्यय, व वास्तविक हे मूळ आकारान्त शब्द असें प्रतिपादिलें आहे. संस्कृतांतील आकारान्त किंवा ईकारान्त नामावरून मराठींत अकारान्त स्त्रीलिंगी नामें कशीं आलीं आहेत हें सुमारें पाऊणशें नामाचे मूळ संस्कृत शब्द देऊन दाखविलें आहे.

विभक्ति, प्रत्ययावरून मानिल्या आहेत. द्वितीया व षष्ठी गाळली आहे. त हा सप्तमीचा प्रत्यय न धरता तेथें आत हें शब्दयोगी अव्यय धरलें आहे आणि मराठींत सप्तमी विभक्तीचीं रूपें सर्व शब्दांचीं होत नसल्यामुळें मराठींत सार्वत्रिक अशा वास्तविक प्रथमा, तृतीया, चतुर्थी, व पंचमी आणि संबोधन अशा पांचच विभक्ति मानिल्या आहेत.

जंद, लिथुयानी, स्लॅवोनी, लॅटिन, ग्रीक, तुर्कोनी, आणि सध्याची इंग्लिश या भाषांत कोणकोणत्या विभक्तींचीं रूपें आहेत व कोणत्या विभक्ती नाहींत ही माहिती दिली आहे.

संस्कृतावरून विभक्तिप्रत्ययाची उपपत्ति पुढीलप्रमाणें दिली आहे

| स | म | स | म | स | म | स | म | स | म |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| न— | नें, | भि — | हीं, | स्य— | स, | नाम्— | ना, | अन्ते— | तें, |

स्मिन्–ई पंचमीचा हून हा प्रत्यय प्राकृतातील पंचमीचा एकवचनी हि व अनेकवचनी हिंतो प्रत्यय आहे त्यावरून आला आहे. ला, शीं या प्रत्ययाची उपपत्ति दिलेली नाहीं

क्रियापदाची व्याख्या चिपळूणकराप्रमाणेंच 'ज्या शब्दानें कियेचें ज्ञान कालासबंधानें होतें तो शब्द' अशी केली आहे. काहीं धातुसाधितावरून कालसंबंध कळतो, पण विधान होत नाहीं, म्हणजे वाक्य पुरें होत नाहीं, म्हणून ते क्रियापदें नव्हत, अशी टीप दिली आहे. पुढें दामले यांनी या टीपेंतील अटीचा मूळ व्याख्येंत समावेश करून क्रियापदाचे व्याख्येस पूर्णत्व आणिलें आहे तथापि ह्या अटीची आवश्यकता मूळ गोडबोले यास प्रतीत झाली असल्यामुळें क्रियापदाचे व्याख्येस पूर्णता आणण्याचें मुख्य श्रेय त्यासच दिलें पाहिजे.

दादोबानीं प्रयोगाचें नाव भावी ( भावसबंधीं ) असें विशेषणरूप योजिलें होतें. चिपळूणकरानीं भाव हा मराठी शब्द धरून त्याच्या सप्तमीचें रूप भावी असें योजिलें होतें. पण गोडबोले यानीं मूळ संस्कृताप्रमाणें भावे ( संस्कृतसप्तमी ) असें नाव योजिलें व तेंच आज प्राय रूढ आहे.

दादोबाप्रमाणेंच संयुक्त क्रियापदें मानिलीं आहेत, पण सहाय धातु दादोबानीं १६ सांगितले होते. त्यातील दे, बस, पाह, ठेव, टाक, घे आणि नलगे इतके कमी करून सहाय धातूंची संख्या नियमित केली आहे गोडबोल्याचे मतानें अस, नस, हो, ये, पाहिजे, नये, नको, जा आणि लाग एवढ्या ९ च धातूंच्या योगें संयुक्त क्रियापदें होतात.

संस्कृत आख्यात व कृत् प्रत्ययावरून मराठींतील क्रियापदाचे सर्व काळचे प्रत्यय कसकसे आले हें सोपपत्तिक सोदाहरण दाखविलें आहे, आणि साधित शब्दाचें प्रकरण बरेंच पूर्णत्वास नेलें आहे पूर्व वैय्याकरणानीं संस्कृतातील आणि मराठींतील साधित शब्दांचीच बनावट दिली होती, अरबी व फारसी भाषेंतून मराठींत आलेले शब्द

कसकसे साधलेले आहेत, हें बहुतेक कांहींच सांगितलें नव्हतें. पण गोडबोले यांनीं तें विस्तारपूर्वक सांगितले आहेत; आणि तेणेंकरून मराठी व्याकरणांत ही मोठीच नवीन भर टाकिली आहे. दामले यांनीं आपल्या शास्त्रीय व्याकरणांतील हें प्रकरण बहुतांशीं गोडबोले यांच्या व्याकरणाच्याच आधारें लिहिलेलें आहे आणि या विषयांत गोडबोले यांच्यापुढें मजल कोणत्याहि व्याकरणानें अजून केलेली नाहीं. मराठींत पुष्कळ द्राविडी शब्दहि आहेत, परंतु त्यांचें विवेचन अवश्य असूनहि गोडबोले यांनीं (वेळाच्या अभावीं) केलेलें नाहीं.

गोडबोले यांनीं वाक्यविचारांतहि पुष्कळ नवीन भर घातली आहे. दादोबांनीं उद्देश्य व विधेय यापलीकडे वाक्यविभागाचा अर्थदृष्टीनें संबंध कांहींच विवेचिला नव्हता. चिपळूणकरांनीं प्रयोगरचनेच्या दृष्टीनेंच काय तें वाक्यविचाराचें विवेचन केलें आहे. गोडबोले यांनीं वाक्यांचे शुद्ध व संयुक्त हे प्रकार, संयुक्तांत उभयप्रधान आणि गौणप्रधान (मिश्र) वाक्यें, गौणवाक्यांचें नामदर्शक, विशेषणदर्शक, क्रियाविशेषणदर्शक, असे तीन प्रकार आणि संक्षिप्त वाक्यें किंवा वाक्यांश इत्यादिकांचें विवेचन केलें आहे. सारांश हा वाक्यविचाराचा भाग गोडबोले यांनीं मराठी व्याकरणास नवीनच जोडला असें म्हणावयास हरकत नाहीं. हा भाग यांच्या व्याकरणाच्या १८६७ त प्रसिद्ध झालेल्या पहिल्या आवृत्तींत नव्हता. तो (आणि छंदोविचार हा भागहि) त्यांनीं १८७४ त छापलेल्या द्वितीयावृत्तींत घातला. वाक्यविचाराचा व्याकरणाशीं तादृश संबंध नाहीं असें पुष्कळ विद्वानांचें मत होतें, पण तें यांस पटलें नाहीं. यासंबधानें ते लिहितात, "कितीएक म्हणतात कीं, वाक्यविचार मराठींत परकीय आहे आणि तो तिच्या व्याकरणांत आणूं लागल्यास इंग्रजी व्याकरणांतील वाक्यविचाराचा उतारा आणि अनुकरण होईल, परंतु लेखनांत आलेल्या इंग्रजी वगैरे भाषांप्रमाणेंच मराठी भाषेसही स्वरूपसिद्ध वाक्यनिर्बंध आहेत असें बहुत सबळ प्रमाणांनीं दाखवितां येईल. प्रस्तुत विषयाचे उपपादनांत विशेषावरून सामान्याचें अनुमान करण्याची रीति योजिली आहे. मराठी भाषेंतील प्रयोग आणि संप्रदाय ताडून पाहिल्यानें येणारीं सामान्य अनुमानें किंवा नियम प्रथम देऊन उदाहरणांनीं आणि प्राचीन कवींच्या लेखांनीं त्यांचें स्पष्टीकरण केलें आहे." याप्रमाणें यांनीं व्याकरणास वाक्यविचाराची जोड दिली आहे, तथापि वाक्यपृथक्करणाचें विस्तृत विवेचन त्यांनीं केलेलें नाहीं. तें काम पुढें लवकरच आगरकर यांनीं वाक्यमीमांसा हें पुस्तक लिहून केलें.

वाक्यविचार आणि पद्यविचार याप्रमाणें गोडबोले, यांनीं प्राकृत भाषेचें संक्षिप्त व्याकरण आणि संस्कृत-प्राकृत मराठी शब्दांचा कोश म्हणजेच शब्दव्युत्पत्ति हेही नवीन भाग पुरवणीरूपानें आपल्या व्याकरणास जोडून त्याच्या उपयुक्ततेंत आणखी भर घातली आहे

अशा प्रकारें, ऐतिहासिक दृष्टि, शास्त्रीय मांडणी, अनेक भाषांच्या तुलनेनें विवेचन, प्रत्ययादिकांची संस्कृत व प्राकृत भाषेच्या द्वारें उपपत्ति, यवनी शब्दसाधनिकेचा विचार, वाक्यविचार, पद्यविचार (छंदःशास्त्र), पद्यांत येणाऱ्या रूपांचा विशेष विचार, प्राकृत भाषेचें व्याकरण आणि शब्दव्युत्पत्ति इत्यादि अनेक अंगांची जोड गोडबोले यांनीं आपल्या व्याकरणास दिली असून मराठी व्याकरणविषयक ग्रंथांत बहुमोल भर घातली आहे यांत शंका नाहीं.

**विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें मत** —विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं व्याकरण विषयावर साक्षात् असें विशेष कांहीं लिहिलेलें नाहीं. तथापि त्यांनीं १८७४ त निबंधमाला सुरू केल्यावर पहिल्याच वर्षीं 'लेखनशुद्धि' हा जो निबंध लिहिला आहे त्यांत व्याकरणाचा खरा अधिकार काय यासंबंधीं मोठें मार्मिक विवेचन केलें आहे. "मराठी भाषेमध्यें भाषेंतील रूढ शब्द व रूढ प्रयोग बळेंच फिरविण्याचा आज बरींच वर्षें उद्योग चालू आहे," असा प्रस्ताव करून वर्णशुद्धि, वाक्यशुद्धि व शब्दशुद्धि यासंबधानें अनेक उदाहरणें देऊन मोठें समर्पक विवेचन केलें आहे. आणि या निबंधाचे शेवटीं "या अशांत एकंदर आपणांकडून आम्हीं काय सिद्ध केलें तें थोडक्यांत सांगतों," असें म्हणून त्यांतील सार पुढीलप्रमाणें दिलें आहे. "भाषेचें म्हणजे पडून गेलेल्या रूढीचें सामर्थ्य केवढें आहे व त्यापुढें व्याकरण किती पंगु, हें दाखवून तीस अटकाव करूं जाणें हें किती वेडेपणाचें काम आहे तें दर्शविलें. त्यावरून असें सांगावयाचें कीं, जेथें रूढीचा आणि व्याकरणाचा विरोध पडतो तेथें "शास्त्राद्रूढिर्बलीयसी" याच वचनास प्रायः अनुसरणें उत्तम. तसेंच वर्ण, शब्द किंवा वाक्य हीं कशीं लिहावीं असा जेथें म्हणून संदेह पडेल तेथें पारखरून केवळ उच्चारावरच प्रमाण धरून चालावें. हा नियम अत्यंत संयुक्तिक, साधा आणि सोपा असून यामुळें लेखी भाषेंत चोहोंकडे एकदम मेळ बसून जाईल हें उघड आहे."

दादोबाची तक्रार —दादोबास मात्र भाषेने व्याकरणाचे नियमास सोडून स्वैराचार करावा हें इष्ट वाटत नव्हतें असें पुरवणीमधील त्याच्या पुढील उद्गारावरून वाटतें. दादोबा म्हणतात, "जनाच्या रूढीपुढें आणि लोकांच्या विचित्र शब्दप्रयोगापुढें, पापुढ्या वैय्याकरणाचें काहींच चालत नाहीं. त्यानीं निमूटपणें त्याचे ते प्रयोग ऐकत असावें, आणि जरी ते धडधडीत त्याच्या व्याकरणाच्या नियमास विरुद्ध असले, तरी ती उदाहरणें मानून आवश्यकानीं पोटकें वाढवीत जावीं, हेंच त्यानें काम. पहा, विलेव धातु धडधडीत अकर्मक असता लोक भूतकालीं त्यास कर्मे लावून सकर्मक धरितात, आणि पुन त्याच्या लिंगवचनाचा आधार न धरिता भूळना कर्तरि प्रयोग तसाच कायम ठेवितात, आता त्याचीं तोंडे कोणी धरावीं. उदाह. मी गणा म्हालों, मी आपुठ केलें, ती दहीभात जेवली, ते वाट चुकले, तू वैभव पावलास, तू दूध प्यालास इ. अशी नित्यश. लोकांच्या तोंडातून वाक्यें ऐकण्यात येतात." दादोबानें आपल्या व्याकरणाच्या प्रस्तावनेंतहि म्हटलें आहे कीं, 'साप्रत जी महाराष्ट्र भाषा लिहिण्यात अभ्यासत्या आढळते ती मोडून ग्रहण केलेले जे नियम त्यास अनुसरून, ही भाषा नीट सारखी व्यवस्थेवर आणण्याविषयीं ते (लोक) उद्युक्त होत गेले, म्हणने माझ्या इतक्या श्रमाचें साफल्य झालें, असें मी मानीन."

निबंधमालाकाराची टीका.—निबधमालेंतील 'भाषापद्धति' या निबधात व्याकरणाचा साक्षात् सबध येत नाहीं, तथापि 'व्याकरण म्हणजे भाषेचें शास्त्र' यातील शास्त्र शब्दाचा व्यापक अर्थ घेतल्यास त्यात भाषापद्धतीचाहि समावेश होऊ शकेल. उत्तम भाषापद्धतीचे शुद्धत्व, प्रौढत्व आणि सुबोधत्व हे जे मुख्य तीन गुण त्यातील पहिला गुण शुद्धत्व हा तर व्याकरणावरच बहुतांशीं अवलबून आहे. तें असो, पण येथें या निबधाचा उल्लेख करण्याचें दुसरेंहि एक कारण आहे, तें असें कीं, या निबधात विशिष्ट भाषेचा नमुना म्हणून दादोबाकृत महाराष्ट्र भाषेचें व्याकरणाच्या प्रस्तावनेंतील उतारा दिला आहे आणि त्यातील 'गाल्ववशौनकशाकटायनशाकटायनादि जे प्रातिशाख्यादि वेदव्याकरण भाष्यकार', 'विद्वज्जनचित्तचकोरास चद्रीभूत होऊन' इत्यादि प्रकारच्या भाषारचनेस अनुसरून पुढील मत प्रदर्शित केलें आहे.

"या उताऱ्यात वरील ग्रथकर्त्याची नेहमींची तऱ्हा पूर्णपणें लक्षात येते. ती सर्वांस माहीतच आहे कीं, संस्कृतातले मोठमोठाले शब्द व लाब लाब समास घालून देण्याची हौस होय. ............तिजवर (वरील भाषारचनेवर) दोष एवढाच येतो कीं, ती असावी त्यापेक्षा दुर्बोध झालेली असून ग्रथकारानें आपलें पांडित्य मिरविण्याच्या उद्देशानें तिची योजना केली आहे असा वाचकाचा समज होतो."

वरीलसारख्या टीकेमुळें, निबधमालाकाराचें मन आपणाविषयीं कलुषित आहे अशी दादोबाची समजूत झाली होती. पण इतरत्र मालाकारानीं दादोबास पाणिनीची व त्याच्या व्याकरणास महाभाष्याची उपमा दिली आहे. त्या प्रकारच्या उल्लेखावरून मालाकाराची दृष्टि निवळत चालली असें दादोबास वाटून त्यानीं समाधान व्यक्त केलें आहे. दादोबा म्हणतात, "अलीकडील नव्या तरुण विद्वान गृहस्थामध्यें मोठे रसिक व मर्मज्ञ व त्याच्या महाराष्ट्र लेखणीस हात धरणारा असा मला क्वचित विरळा दिसतो, असे जे निबधमालाकार त्याची आम्हाविषयींची आजपर्यंतची जी थोडी वक्रदृष्टि होती तीहि आता सरळ प्रेमयुक्त अशी त्याची कृपादृष्टि होत चालली आहे, हेंहि आता त्याच्या लेखावरून आमच्या अनुभवास आणून देत आहेत"

लोकहितवादी व व्याकरण —व्याकरणाच्या अनुपयुक्ततेविषयीं लोकहितवादींनीं पुढील उद्गार काढिले आहेत. "व्याकरणाचें पधरा वर्षे अध्ययन केलें, त्यापासून अमुक उपयोग होतो असें मला दाखवून द्यावें, म्हणजे मी वास्तविक म्हणेन. परतु मीं शोध केला आहे, त्यावरून मला तर वाटतें कीं, मनुष्यास लाकडें तोडावयाचें कसब शिकविलें तर बरें, परतु हें व्याकरण नको. यात काहींच अर्थ नाहीं केवळ मूर्ख होण्याची विद्या आहे." निबधमालाकारानीं या उद्गाराचा खरपूस समाचार घेतला आहे.

मराठी भाषेचें मध्यम व्याकरण —हें व्याकरण दादोकृत मोठ्या व्याकरणाहून लहान आणि लघु व्याकरणाहून मोठें असल्यामुळें याचें नामाभिधान मध्यम व्याकरण असें करण्यात आलें. मराठी शाळांतून सहाव्या इयत्तेपर्यंत हायस्कुलातून मॅट्रिक्युलेशन व स्कूल फायनल परीक्षापर्यंत आणि ट्रेनिंग कॉलेजात पहिल्या वर्षाचे परीक्षेपर्यंत उपयोगी पडावें अशा हेतूचें हें आहे. या कामीं दादोकृत लघुव्याकरण अपुरें पडे व मोठें व्याकरण अधिक मोठें वाटे म्हणून मध्यम मानाचें हें व्याकरण डायरेक्टरसाहेबाच्या हुकुमावरून तयार करण्यात आलें. रावजी सदाशिवशास्त्री

गोडबोले यांनीं नारायण पांडुरंगशास्त्री साठे व नारायण धोंडदेव जोशी यांच्या साहाय्यानें १८८५ ते ८७ या काळांत हें व्याकरण तयार केलें, तें पुढें १८९७ त (म्हणजे रावजीशास्त्री यांचे मृत्यूनंतर ६ वर्षांनीं) छापलें. प्रस्तुत पुस्तकांतील विशेष गोष्टी थोडक्यांत पुढीलप्रमाणें सांगतां येतील.—

(१) शब्दांच्या ८ जाति मानिल्या आहेत पण 'क्रियाविशेषण अव्यय' या संज्ञेऐवजीं 'विशेषणात्मक अव्यय' अशी संज्ञा योजिली आहे. दादोबांनीं क्रि. वि. अ. ही संज्ञा योजिली. या संज्ञेवर दोन प्रकारें आक्षेप येतात. एक तर या संज्ञेनें दर्शविले जाणारे शब्द सर्वदा क्रियेशींच अन्वित असतात असे नाहीं. तर ते कधीं कधीं विशेषणांशीं दुसऱ्या क्रि. वि. अव्ययांशीं व क्वचित् नामांशींही अन्वित असतात; यामुळें त्यांस क्रि. वि. म्हणणें सयुक्तिक दिसत नाहीं. ही अडचण लक्षांत घेऊन प्रस्तुत पुस्तकांत क्रि. वि. अ. या संज्ञेऐवजीं 'विशेषणात्मक अव्यय' अशी संज्ञा योजिली आहे व तेणेंकरून ही अडचण दूर होते. परंतु क्रि. वि. अ. या संज्ञेवर दुसराहि एक आक्षेप निघतो तो असा कीं, ही संज्ञा सर्वथा स्वतंत्र दिसत नाहीं. 'विशेषण' ही जी सव्ययातील एका वर्गाची संज्ञा ती सामान्य अर्थानें या संज्ञेच्या पोटांत समाविष्ट झाली आहे, यामुळें विशेषण या एका शब्दाचा एकदा पारिभाषिक अर्थ व एकदां सामान्य अर्थ घ्यावा लागतो व तेणेंकरून सशास्त्रतेस बाध येतो. प्रस्तुत पुस्तकांत योजिलेल्या "विशेषणात्मक अव्यय" या संज्ञेनेंहि वरील आक्षेपाचें निरसन होत नाहींच. तथापि क्रि. वि. अव्यय संज्ञेपेक्षा ही विशेषणात्मक अ. ही संज्ञा अधिक प्रशस्त होय यांत शंका नाहीं. तथापि ही नवी संज्ञा रूढ न होतां जुनी दादोक्त क्रि. वि. अ. हीच संज्ञा आजवर कायम राहिली आहे व इतकी रूढ झालेली ही संज्ञा यापुढें बदलली जाणें दुरापास्तच आहे.

(२) सर्वनामांचे पुरुषवाचक आणि दर्शक असे मुख्य दोन प्रकार केले आहेत. नामाऐवजीं योजलें जाईल तेव्हा तें पुरुषवाचक आणि विशेषणासारखें योजिलें जाईल तेव्हा तें दर्शक सर्वनाम. अशा प्रकारें प्रत्येक सर्वनाम स्थलपरत्वें दोन्ही प्रकारचें संभवतें. उदा० मी येईन; तूं जा; कोणी म्हणतात कीं इ., काय पाहिजे, यांत मी, तूं, कोणी व काय हीं पुरुषवाचक सर्वनामें आणि मी ब्राम्हण नित्य स्नान करितों; तूं शिपाई तरवार गाजविनोस; कोणी मनुष्य येऊन गेला. यांत मी, तूं कोणी, हीं दर्शक सर्वनामें. पुरुषवाचक किंवा दर्शक सर्वनामांचे पुनः संबंधी प्रश्नार्थक व सामान्य हे पोट प्रकार होतील. अ त ज क हीं अनेक सर्वनामांचीं मूळरूपें होत. अ पासून हा अमुक, अमका, असा, असला, असलाला. इतका, एवढा इ० सर्वनामें बनलीं आहेत इ० विवेचन केलें आहे आणि किती; कैक; एक, परस्पर, उभयतां, स्वतः इ० पुष्कळ शब्दांची सर्वनामांत गणना केली आहे.

(३) शब्दयोगी अव्ययांचे 'सामान्यरूप करणारीं' व 'सामान्यरूप न करणारीं' असे दोन वर्ग केले असून या दुसऱ्या वर्गांत पुढील पांच पोटवर्ग केले आहेत. (१) संग्रहबोधक—तरी, देखील, पण, ही, सुद्धां इ० (२) निश्चयबोधक—च, तर, म्हणून इ० (३) केवलत्वबोधक -केवळ, च, चीं, पण, वरील, फक्त, मात्र इ० (४) प्रश्नार्थक—का, कीं, ना. इ० (५) पादपूरक—वै, नी इ०

(४) विशेषणात्मक अव्ययांचे कालबोधक, स्थलबोधक व प्रकारबोधक असे तीन वर्ग केले असून प्रकारबोधकाचे पोटात गुणबोधक, निश्चयबोधक, संशयबोधक, प्रश्नबोधक, अहेतुबोधक, हेतुबोधक, अनुकरणबोधक निषेधबोधक, तारतम्यबोधक, तुलनाबोधक इ० पोटवर्ग केले आहेत.

(५) विध्यर्थ आणि संकेतार्थ असे दोनच अर्थ मानिले आहेत. 'तुम्ही काम करा' आणि 'तुम्हीं काम करावें' हें दोन्ही विध्यर्थच; अर्थात् क्रियापदाचे रूपावरून अर्थ मानिले नसून ते त्या रूपावरून दर्शित होणाऱ्या आज्ञा, उपदेश इ० अर्थावरूनच मानिले आहेत. संकेतार्थहि क्रियापदाचे रूपावरून मानिला नाहीं. अर्थावरूनच मानला आहे. तो गेला तर काम होईल, मी देणार असलों तर इ० तो आला नाहीं म्हणून मी जात नाहीं; जात गेला, देणार असलों व आला नाहीं या क्रियापदाचे संकेतार्थ मानिले आहेत.

(६) संयुक्त क्रियापदें मानिलीं असून सहाय धातूंचे पुढील चार प्रकार केले आहेत. काल.तर बोधक—अस. निषेध बोधक—नस, नको, नये. प्रयोगांतर बोधक—जा; हो. विशेषार्थक—आण, टाक, पाड, घे, चल, चाल, चूक, जा, टाक, ठेव, दे, पड, पाह, पाहिजे, बस, ये, राह, लाग, शक, सुट, सोड इ० संयुक्त क्रियापदांतर्गत धातुसाधितें कोणते प्रत्यय लागून झालेलीं असतात व ती तीं कोणत्या सहाय धातूंशीं संयुक्त होतात हें सविस्तर दिलें

आहे. आणि 'फेकून, देत आहे' यासारखीं तीन अवयवांची व 'देऊन टाकीत चालला आहे' 'फेकून यावें लागत आहे' 'करूं देता यावें लागेल' इत्यादि चार अवयवांचीं हीं संयुक्त क्रियापदें दिलीं आहेत.

(७) अनेक चमत्कारिक वाक्यांचे प्रयोग ठरविले आहेत. उदा०-(अ) रामा जाण्याचें (किंवा जावयाचें) पत्करतो-सकर्मक कर्तरि. येथें जाण्याचें (जावयाचें) याची योजना जाणें या प्रथमान्ताऐवजीं आहे असें समजावें. (आ) माझें जाण्याचें (जावयाचें) ठरलें—अकर्मक कर्तरि येथें जाण्याचें याची योजना प्रथमान्ताऐवजीं आहे. (इ) पाणी तापायला पाहिजे. तापायला हें प्रथमान्ताऐवजीं आलें. पाणी हा तापणें याचा कर्ता व तापायला (तापणें) हा पाहिजे याचा कर्ता-अकर्मक कर्तरि प्रयोग. (ई) त्याला मारता उपयोगी नाहीं. मारता=मारणें मारता हा कर्ता नाहीं हें क्रियापद. (उ) त्याला बोलून व्यर्थ आहे. बोलून=बोलणें. बोलून हा कर्ता आहे, कि. अकर्मक कर्तरि प्रयोग. (ऊ) बाजीरावास पुणें इंग्रजास द्यावें लागलें. बाजीरावास हा कर्ता, पुणें हें कर्म, द्यावें लागलें क्रि. कर्मणि प्रयोग. (ए) त्यानें देण्याचें नाकारलें. देण्याचें=देणें हें कर्म. (ऐ) मला आंबा पाहिजे. मला हा कर्ता, आंबा हें कर्म, कर्मणि. (ओ) मला आंबा नको. मला हा कर्ता, आंबा हें कर्म, कर्मणि. (औ) मला आंबा हवा. मला हा कर्ता, आंबा हें कर्म, कर्मणि.

(८) समासाचे शब्दार्थप्राधान्यावरून मुख्य ४ प्रकार केले आहेत.

(९) शब्दांचें वर्गीकरण देखील सिद्ध-साधित; सव्यय-अव्यय; यौगिक-रूढ-योगरूढ-यौगिकरूढ असें त्रिविध केलें असून साधितात प्राकृतिक-सामासिक असे पोटवर्ग केले आहेत; यावरून या वर्गीकरणातहि शास्त्रीयतेची चुणूक दिसते.

(१०) प्राकृतिक साधित शब्द साधण्याचे नानाप्रकार सविस्तर दिले आहेत. प्रथम नामें, विशेषणें, धातु व अव्ययें यांचे प्रत्येकीं नामसाधित, विशेषणसाधितें, धातुसाधित व अव्ययसाधित असे चार चार प्रकार सांगितले आहेत व सोळा प्रकाराचे पुन्हा पुष्कळसे पोटप्रकार देऊन प्रत्येक पोटप्रकार कोणत्या प्रत्ययानीं होतो ते प्रत्यय सोदाहरण दिले आहेत. उदाहरणार्थ, नामसाधित नामाचें स्वार्थदर्शक, कुत्सितत्वदर्शक इ० २२ प्रकार कल्पिले असून या सर्वांत मिळून ८६ प्रत्यय दिले आहेत ! सारांश, हा प्राकृतिक साधित शब्दाचा भाग सूक्ष्म वर्गीकरण करून विशेष विस्तारानें दिला आहे.

(११) सर्व व्याख्या शक्य तितक्या व्यापक व शास्त्रदृष्ट्या शुध्द बनविण्याचा प्रयत्न केला आहे. त्याच प्रमाणें या व्याकरणात सर्वनियम जसे शुद्ध स्वरूपात दिले आहेत तसे ते इतर मराठी व्याकरणात (दामले यांचे शास्त्रीय व्याकरणात देखील) क्वचितच आढळतील.

(१२) वाक्यपृथक्करण, व्युत्पत्ति, छंदःशास्त्र, अलंकार इत्यादि भाग या व्याकरणात नाहींत, आणि या व्याकरणाचें प्रयोजन पाहता हे भाग नाहींत हें युक्तच होय असें दिसून येईल.

भिडेकृत मराठी भाषेचें व्याकरण :—मध्यम व्याकरणानंतर स्वतंत्र त्याच्या खालोखाल असें हें पुस्तक धुळें ट्रेनिंग स्कूलचे हेडमास्तर बा. वि. भिडे यांनीं लिहिलें. यात कांहीं नवे विचार असून वादग्रस्त मुद्द्यांचा निर्णय ऊहापोह करून केला आहे हा यातील विशेष आहे. या व्याकरणात पुढील गोष्टी दिसून येतात'—

(१) राजानें ज्याना इ. स्थळीं जा व ज्या यातील आ या स्वराचा उच्चार कंठ्य नसून तालुकंठ्य आहे. येथें अधोरेखित 'आ'काराचा उच्चार पुढील इंग्रजी शब्दातील a च्या उच्चारासारखा म्हणजेच तालुकंठ्य आहे आणि येथील 'य'कार हें य् व्यंजन नसून ती केवळ तालुकंठ्य उच्चारची खूण आहे. घ्यानें than, जिन्यांत gant, मुलग्यास gas, प्याले pallid, नक्यानें fan, हिऱ्यानें Ran, करित्ये, देशपांड्ये यातही य् हें व्यंजन नसून तें एकाराच्या तालुकंठ्य तालव्य उच्चाराचें दर्शकचिन्ह आहे. (२) नामाचें सामान्य व विशेष, असे दोनच प्रकार केले आहेत. सोनें, कळप, सौंदर्य, दया हीं सामान्यनामेंच असें कारणें देऊन ठरविलें आहे. (३) द्वितीया, षष्ठीसुद्धा ८ विभक्ति मानल्या आहेत. द्वितीया ही सप्रत्यय अप्रत्यय अशी दुहेरी मानिली आहे. कर्मणि प्रयोगाव्यतिरिक्त कर्म असता ती द्वितीया, मग प्रत्यय असो नसो, ज्ञानम् ही जशी संस्कृतात प्रथमा व द्वितीया होते किंवा ज्ञानाभ्याम् ही जशी तृ० च० पचमी होते तशी मराठींत ज्ञान ही प्रथमा

द्वितीया व ज्ञानास ही द्वि० चतुर्थी होण्यास हरकत नाहीं असें प्रतिपादिलें आहे. (४) काठीनें, घरीं, धरून हीं वाक्यात अर्थदृष्टया क्रियाविशेषणें असताही त्यास आपण विभक्ति म्हणतों. तर घराचा इत्यादि अर्थदृष्टया विशेषणें होत असली तरी षष्ठी विभक्ति म्हणावयास काय चिंता आहे असें विवेचिलें आहे. (५) गळ्यात म्हणजे गळ्याच्या आत नव्हे. असेंच हातात, पायात, डोक्यात याचा अर्थही आत या अव्ययाचे योजनेनें येत नाहीं म्हणून त हा सप्तमीचा प्रत्यय होय असा कोटिक्रम केला आहे. (६) गंगा, रमा याचीं संबोधनरूपें मूळ शब्दासारखीं किंवा एकारान्त दिलीं आहेत. येकारान्त केलीं नाहींत. येथें भाषेचा बदलता स्वभाव विचारात घेतला आहे. (७) सकर्मक धातु म्हणजे 'ज्या धातूनें दर्शित क्रियेचा अर्थ पूर्ण होण्यास दुसऱ्या शब्दाची अपेक्षा असते ते धातु' अशी केली आहे. येथें अपेक्षा असलेले शब्द कोणत्या प्रकारचे,इत्यादि सांगण्याची आवश्यकता असल्यामुळें ही व्याख्या जरी अपूर्ण असली तरी ती बरीच सूचक आहे यात शंका नाहीं. दामले यास कर्माचें लक्षण बनविताना या सूचक व्याख्येचा उपयोग झाला असावा असें वाटतें. (८) पुष्कळ प्रयोग चमत्कारिक केले आहेत. उदा० गोविंदाच्यानें ओझें उचलतें-*अकर्मक कर्तरि. गोविंदाच्यानें (गोविंदाचें बळ) हें करण. गोविंदाला ओझें उचलतें. गोविंदाला-हेत्वर्थी* च० गोविंदाला बसता येतें. बसणें हा कर्ता बसता येतें क्रियापद. (गगू गाणें गातें याप्रमाणें बसणें बसता येतें) मला जावें लागतें-जाणें हा कर्ता, जावें लागतें क्रियापद. मला कामें करावीं लागतात. कामें हा कर्ता, करावीं लागतात क्रिया पद, अकर्मक कर्तरि प्रयोग. गोविंदानें गेलें पाहिजे. गोविंदानें हा कर्ता, भावे प्रयोग. गोविंदाला गेलें पाहिजे, जाणें हा कर्ता, गेलें पाहिजे क्रि० अक. कर्तरि. रामानें कामें केलीं पाहिजेत-कर्मणिप्रयोग रामाला कामें केलीं पाहिजेत कामें हा कर्ता केलीं पाहिजेत क्रि अकर्मककर्तरि प्रयोग. ही प्रयोग करण्याची पद्धति मान्य होण्याजोगी नसली तरी ग्रंथकारानें स्वतंत्र बुद्धीनें विचार केल्याची द्योतक आहे. सारांश, ह्या लहानशा व्याकरणातही कित्येक नवीन विचार आले असून ते पुढील व्याकरणकारांनीं पाहण्याजोगे आहेत.

नवलकर याचें "स्टूडंट्स मराठी ग्रामर"— मराठी न कळणाऱ्या लोकास इंग्रजीच्या द्वारा मराठी शिकण्यात उपयोगी पडावें म्हणून हें व्याकरण तयार करण्यात आलें आहे. मराठींत शब्दांतील वर्णोच्चार कसकसे होतात, लिंग, वचन, विभक्ति इ० विकाराच्या योगानें शब्दात बदल कसकसे होतात, इत्यादिकांसंबधानें ह्या व्याकरणात सविस्तर माहिती दिली आहे. ती परकीयास मराठी शिकताना फार उपयोगी पडण्याजोगी आहे. यानीं शब्दाच्या जाती अर्थावरून ठरविल्या आहेत. उभयान्वयी अव्ययास वाक्ययोगी म्हटलें आहे. नामामध्यें समुदायवाचक हा भेद कल्पिला आहे. विभक्ति, षष्ठी, कर्म अशा अर्थानें मानाव्यात असें सुचविलें आहे चतुर्थीस दानी विभक्ति असें नाव सुचविलें आहे. तथापि निव्वळ मराठी व्याकरणाच्या दृष्टीनें या पुस्तकाकडे पाहता, याच्या योगानें मराठीच्या व्याकरणात कांहीं विशेष भर पडली आहे असें आढळत नाहीं. नाहीं म्हणावयास कित्येक शब्दाची व्युत्पत्ति संस्कृत व प्राकृत भाषाच्या द्वारें कसकशी संभवते तें दाखविलें आहे व मधून मधून अनेक भाषाच्या स्वभावासंबधानें कांहीं *तुलनात्मक माहिती इंग्रजी पुस्तकातून उद्धृत केलेली आहे. या पुस्तकाची दुसरी आवृत्ति १८८० त निघाली. तिसरी* आवृत्ति १८९४ त छापलेली आहे. खेर यानींहि असेंच एक व्याकरण १८७९ त लिहिलें आहे.

जोशाचें प्रौढबोध व्याकरण —मध्यतरीं इ. स. १८८८ साली श्री. रा. भि. जोशी यानीं आपलें 'प्रौढ-बोध' व्याकरण लिहिलें. यानीं चिपळूणकराच्या बऱ्याच सूचना स्वीकारून त्या प्रत्यक्ष अमलात आणण्याचा प्रयत्न केला आहे, परतु वाक्यपृथक्करणाचा भाग इंग्रजी व्याकरणाच्या वळणावर नेऊन एकदर व्याकरणात बरीच ढवळाढवळ केली त्यामुळें व्याकरणविषयक विचारामध्यें मुळींच प्रगति झाली नाहीं असें तज्ज्ञाचें मत आहे

गुर्जीकराचें सुबोध व्याकरण —या व्याकरणावर श्री. रा. भि. गुर्जीकर यानीं विविधज्ञानविस्तारात विस्तृत टीका केली आहे. त्यानंतर त्यानीं स्वत 'सुबोध व्याकरण' लिहिलें. त्यांत द्वितीया व चतुर्थी भिन्न विभक्ती मानल्या असून त्याचे प्रत्ययहि स्वतंत्र दिले आहेत. कर्तरि, कर्मणि व भावे प्रयोग या ऐवजीं कर्त्याचें, कर्माचें व क्रियापदाचें प्राधान्य अशा संज्ञा योजिल्या आहेत. त्यानीं आख्यात शब्दाचीहि योजना केली आहे. तसेंच पुरुषास संस्कृतप्रमाणें उत्तम, मध्यम या संज्ञा वापरून तृतीय पुरुषास अन्य संज्ञा वापरली आहे.

इतर व्याकरणकार '—या काळात व्याकरणावर बरीच चर्चा चालू असून तींत निपळूणकर पितापुत्रा-प्रमाणेंच हातवळणे, आचार्य, वैद्य, पाध्ये, भते, पराजपे, प्रो. ना. दा. मनहरी वगैरे अनेक विद्वानानीं भाग घेतला

होता. प्रो. आगरकराचा वाक्यमीमांसा हा ग्रंथहि बराच महत्त्वाचा असून एका नवीन अंगाची त्यामुळें व्याकरणात भर पडली.

**दामले यांचें शास्त्रीय मराठी व्याकरण**—दादोबा व कृष्णशास्त्री गोडबोले यांच्यानंतर मराठी व्याकरणात महत्त्वाच्या सुधारणा सुचविणारा व विचारास विशेष चालना देणारा ग्रंथ म्हणजे श्री. मो. के. दामले यांचें 'शास्त्रीय मराठी व्याकरण' हा होय. हा १९११ त प्रसिद्ध झाला. या सुमारें एक हजार पृष्ठांच्या प्रधान व्याकरणविषयक ग्रंथाचा विवेचक ऊहापोह केला असून मागील ग्रंथकाराच्या भागानें चिकित्सक दृष्टीनें निरीक्षण करून व त्यातील दोष दाखवून स्वत च्या मतांचें मंडन केलें आहे. यांनीं आपल्या व्याकरणात अनुस्वार, विसर्गास स्वरादि ही संज्ञा सुचविली आहे. शब्दाचे विकारी व अविकारी हे भेद सविभक्तिक व अविभक्तिक यांच्याऐवजीं कल्पिले आहेत; व विकारी शब्दांचे नाम, सर्वनाम, विशेषण व धातु अथवा क्रिया असे भेद करून अविकारी अथवा अव्ययाचे भेद रूढच ठेवले आहेत. नामाचे धर्मवाचक (भाववाचक) व धर्मिवाचक असे भेद करुन धर्मिवाचकांत सामान्य व विशेष असे भेद केले आहेत. सर्वनामाचे पुरुषवाचक, आत्मवाचक, दर्शक, संबंधी, प्रश्नार्थक व अनिश्चित असे सहा भेद केले आहेत. व एकंदर सर्वनामें फक्त नऊ मानिलीं आहेत, तीं—मी, तू, आपण, स्वत., तो, हा, जो, कोण व काय. विशेषणाचे सार्वनामिक, गुण व संख्या असे तीन भेद केले आहेत. धातूचे सकर्मक व अकर्मक असे भेद केले आहेत. तसेंच सिद्ध व साधित असे भेद केले आहेत. क्रियाविशेषणाचे रूपावरून सिद्ध, साधित व स्थानिक असे भेद करून अर्थमूलक म्हणून स्थल, काल, संख्या (परिमाण), व रीतिवाचक असे वर्ग कल्पिले आहेत. शब्दयोगी अव्ययाच्या वर्गीकरणाची विशेष आवश्यकता नाहीं असे सांगितलें, पण एक कोष्टक दिलें आहे. या प्रकरणात सामान्यरूपाबद्दल विस्तृत ऊहापोह केला आहे. उभयान्वयी अव्ययाचे प्रधानवाक्यसूचक व गौणवाक्यसूचक असे भेद केले आहेत, व त्याचे पुन्हा पोटभेद केले आहेत. केवल प्रयोगी अव्ययानीं सूचित होणाऱ्या निरनिराळ्या वृत्ति दाखविल्या आहेत.

नामाच्या अन्त्यावरून व प्रत्ययावरून लिंगनिर्णय करण्याचे नियम केले आहेत. सामान्य लिंग मानण्याची गरज नाहीं असें दाखविलें आहे. नामाचें अनेकवचन करताना होणारे विकार दाखविले आहेत. विभक्ति किती मानाव्या यासंबंधीं विस्तृत ऊहापोह करून द्वितीया गाळून सात विभक्ति मानल्या आहेत व त्याचे प्रत्यय देऊन ते लावताना होणारे विकार दाखविले आहेत व नंतर विभक्त्यर्थी करणारी अव्ययें दिलीं आहेत. नंतर सर्वनामें व विकरणें दाखविलीं आहेत. क्रियापदाच्या प्रत्ययास आख्यात प्रत्यय अशी संज्ञा वापरली आहे व त्याची संख्या सांगितली आहे व त्यास प्रथम ताख्यात (वर्तमान काल), द्वितीय ताख्यात (संकेतार्थ), लाख्यात (भूतकाळ), वाख्यात (विध्यर्थ), ई-आख्यात (रीतिभूतकाळ), ऊ-आख्यात (आज्ञार्थ), ईलाख्यात (भविष्यकाळ) अशा संज्ञा वापरल्या आहेत. नंतर या आख्यतांचे प्रत्यय देऊन ते कसे लागतात याचें विवेचन केलें आहे. तसेंच कर्तरि, कर्मणि व भावे या संज्ञाचें स्पष्टीकरण के आहे. नंतर व्युत्पत्ति प्रकरणात साधित शब्द कसे बनतात तें दाखविलें आहे. नंतर वाक्य-विचार या भागात वाक्यरचनेमध्यें विभक्त्यर्थ, आख्यातार्थ, संयुक्त क्रियापद, प्रयोग, कर्ता, कर्म व क्रियापद हे विषय विवेचिले आहेत. व वाक्यपृथक्करणामध्यें वाक्याच्या निरनिराळ्या जातींचा व अवयवाचा विचार केला आहे.

**राजवाडे यांचीं पुस्तकें** —दामले यांच्या शास्त्रीय व्याकरणावर टीकात्मक म्हणून रा. वि. का. राजवाडे यांनीं सुबन्त व तिङन्त विचार म्हणून दोन उत्कृष्ट निबंध लिहिले आहेत. रा. राजवाडे यांची दृष्टि भाषेचा ऐतिहासिक दृष्टीनें अभ्यास करावयाचा होती व तशी दृष्टि अद्यापपर्यंत रा. गोडबोले यांशिवाय कोणत्याच व्याकरण-कारानीं वापरली नसल्यामुळें आतापर्यंत शालेय मराठी भाषेचीं व्याकरणें मराठीच्या प्रकृतीच्या दृष्टीनें अपुरींच पडतात. मध्यंतरीं रा. ना. वि. आपटे यांनीं एक विचारप्रवर्तक असें व्याकरण लिहिलें आहे. यानंतर मराठी भाषेंत अनेक शालोपयोगी व्याकरणें झालीं परंतु ऐतिहासिक अथवा शास्त्रीय दृष्टीने सखोल विचार करणारें व्याकरण अद्यापि तयार झालें नाहीं.

**शालोपयोगी व्याकरणें** —दामले यांच्या शास्त्रीय मराठी व्याकरणानंतर जरी सोपपत्तिक व शास्त्रीय दृष्टीनें विचार करणारा चांगला व्याकरण ग्रंथ तयार झाला नाहीं. तरी मराठी व्याकरणासंबंधीं जे मतभेद व घोटाळे वारंवार नजरेस येत ते काढून टाकून शाळेमध्यें शिकविण्याच्या दृष्टीनें व्याकरणास निश्चित स्वरूप यावें याकरिता सरकारी

शिक्षणखात्याकडून एक समिति नेमण्यांत आली होती. या समितीनें एक प्रश्न पत्रिका काढून - अनेक विद्वानांचीं व व्याकरणकारांचीं मतें मागवून आपले निर्णय प्रसिद्ध केले. व त्या निर्णयांस अनुसरून सांप्रत शालोपयोगी मराठी व्याकरणावरील पुस्तकें अनेक शिक्षकांकडून तयार करण्यांत येत आहेत.

तथापि या निर्णयानीं अनेक विद्वान् लोकांचें समाधान झालें नाहीं; व मराठी व्याकरणाचा पाया अधिक शास्त्रशुद्ध तत्त्वावर घातला जाऊन मराठी भाषेच्या प्रकृतीस अनुसरून तिचें व्याकरण लिहिलें जावें, अशा तऱ्हेचा प्रयत्न करणें आवश्यक होतें. या उद्देशास धरून कोल्हापूर येथें १९३२ च्या डिसेंबरमध्यें भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनामध्यें एक समिति नेमण्यात आली. या समितीचे कार्यवाह रा. य. रा. दाते हे होते. या समितीनें अनेक विद्वानांकडून सूचना मागवून त्यांस अनुसरून एक प्रश्न-पत्रिका तयार केली व त्या प्रश्न-पत्रिकेवर अनेक विद्वानांचीं मतें मागविणें व अनेक विद्वानांशीं प्रत्यक्ष चर्चा करणें हीं कार्यें दोनतीन वर्षें करून आपले कांहीं प्राथमिक निर्णय बडोदें येथील साहित्य संमेलनापुढें मांडले व त्यानंतर त्यावर अधिक चर्चा करून इंदूर येथील साहित्य संमेलनापुढें आपले निर्णय मांडले. या समितीचे निर्णय पुढें दिले आहेत.

## व्याकरण समितीचे निर्णय

**रचनापद्धतिः** — मराठी व्याकरणाची रचनापद्धति तिचा विशिष्ट स्वभाव लक्षात घेऊन करणें अवश्य असल्यानें ती कोणत्याच भाषेच्या व्याकरणाला पूर्णांशानें अनुसरून होणार नाहीं. परंतु मराठी भाषेची परंपरा ही संस्कृत, प्राकृत अपभ्रंशादि भाषास विशेष अनुसरून असल्यानें त्या भाषाच्या व्याकरणाचा मुख्य आधार घेऊन मराठीच्या व्याकरणाची रचना करावी; तसेंच परभाषांतील ज्या गोष्टींचें अनुकरण मराठीनें केलेलें आहे, त्या गोष्टी अनिष्ट नसतील तर त्याचा समावेशहि 'मराठी व्याकरणा'त करण्यास हरकत नाहीं.

**वर्णविचारः**—स्वरांची संख्या–यांमध्यें निर्विवाद स्वर म्हणजे अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ऐ, ओ, औ आहेत. बाकी राहिलेल्याचा विचार करूं. दीर्घ ॡ हा स्वर मराठींत नाहीं आणि संस्कृतातहि नाहीं. म्हणून तो गाळावा. ऱ्हस्व ऋ मराठींत आहेच. ऱ्हस्व ऌ संस्कृतात आहे. मराठींत तो फक्त तत्सम शब्दांत येतो कीं तद्भव शब्दात येतो येवढाच प्रश्न; परंतु तो कोणत्याहि शब्दात आला तरी त्याचें अस्तित्व आहेच. दीर्घ ॠ मराठींत येत नसल्यामुळें तो गाळण्याचा प्रश्न उत्पन्न होतो. परंतु संस्कृतातील वर्णांपैकीं ॠ विना बाकी सर्व वर्ण मराठींत आलेले असल्यामुळें व मराठीमधील संधि-विचार प्रायः संस्कृतप्रमाणें असल्यामुळें पितृ + ऋण अशासारख्या संस्कृत उदाहरणात त्याची आवश्यकता उत्पन्न होते. म्हणून दीर्घ 'ॠ' मराठींतून गाळूं नये असे आम्हास वाटतें. अं, अः—अनुस्वार आणि विसर्ग याना 'अ' स्वर जोडून अं, अः हे झालेले आहेत. याना जरी स्वराच्या संख्येंत दाखल केलेलें असलें तरी त्याना अनुस्वार आणि विसर्ग अशीं नावें आहेत. अर्थात् उपयोगाच्या दृष्टीनें वाद नसून त्याना स्वराच्या यादींत घालावें कीं नाहीं व स्वरामध्यें घालावयाचे नसल्यास कोठें घालावें हाच मुख्यतः वादाचा प्रश्न आहे. अनुस्वार आणि विसर्ग हे स्वर नाहींत. कारण (१) त्याचा उच्चार स्वतंत्रपणें करता येत नाहीं; (२) स्वर व्यंजनाला जोडून आले म्हणजे अक्षर तयार होतें, पण अनुस्वार आणि विसर्ग हे व्यंजनाला जोडून आले तरी अक्षर बनत नाहीं. अनुस्वार आणि विसर्ग हीं व्यंजनेंहि नाहींत. कारण (१) व्यंजनाला स्वर जोडून अक्षर बनलें तरी वाचताना आपण प्रथम व्यंजनाचा उच्चार करतों. परंतु अनुस्वाराचा उच्चार स्वरानंतर होतो. (२) जोडाक्षरामध्यें दोन व्यंजनें यावीं लागतात. पण अनुस्वार वा विसर्ग दोन व्यंजनांपैकीं एका ठिकाणीं येऊन चालत नाहीं. आता अनुस्वार किंवा विसर्ग पुढें आला असता त्यामुळें जोडाक्षराप्रमाणें वृत्तामध्यें मागील स्वरास गुरुत्व येतें हें खरें; तथापि तेवढ्यावरून अनुस्वार व विसर्ग याचें व्यंजनत्व सिद्ध होत नाहीं. म्हणून त्याचा समावेश स्वर किंवा व्यंजनें यामध्यें न करता त्याचा स्वतंत्र वर्ग करावा.

एतावता अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ए, ऐ ओ, औ, हे स्वर आणि ं अनुस्वार व ः विसर्ग हे 'अयोगवाह' समजावे. अयोगवाहांचें स्थान स्वरानंतर व व्यंजनापूर्वी म्हणजे सध्याचें आहे तेथेच ठेवणें युक्त आहे.

**व्यंजनांची संख्या :**—व्यंजनाच्या संख्येंत ङ, ञ, क्ष, ज्ञ, हीं चार वादग्रस्त होत. ण, न, म, याचा उपयोग

स्वतंत्रपणें शब्दात होतो; तसा ङ्, ञ्, याचा होत नाहीं. परंतु त्याचा उपयोग संस्कृत तत्सम शब्दात होतो. उदा०— वाङ्मय, पराङ्मुख. ञ् अनुनासिकाचा उच्चार मराठींत करण्याची प्रायः रूढी नाहीं. परंतु कांचन, तंजावर, जंजाळ अशा शब्दातून तो स्पष्टपणें दिसतो. म्हणून ङ्, ञ्, यांना व्यंजनाच्या संख्येंतून गाळण्याची आवश्यकता वाटत नाहीं. क्ष्, ज्ञ्, यांची गणना सध्या व्यंजनामध्यें होत असली तरी तीं जोड व्यंजनें असल्यानें तीं व्यंजनाच्या संख्येंतून गाळावीं.

अंतःस्थाचाक्रम य्, र्, ल्, व् असा असावा किंवा य्, व्, र्, ल् असा असावा ? इ, उ, ऋ, ऌ यांस होणारे आदेश अनुक्रमें य्, व्, र्, ल् असे आहेत. उलट य्, व्, र्, ल्, यांचें संप्रसारण इ, उ, ऋ, ऌ असें होतें. या दृष्टीनें य्, व्, र्, ल् असा क्रम रूढ करणें सकृद्दर्शनीं आवश्यक वाटतें. उलट य्, व्, र्, ल् असा अंतःस्थाचा क्रम बदलण्याऐवजीं सध्या असलेला स्वराचा क्रम इ, ऋ, ऌ, उ. असा बदलण्यानेंहि उपरिनिर्दिष्ट अडचण दूर होईल हें खरें. पण त्यायोगें पुष्कळ ठिकाणीं फेरफार करावा लागेल. म्हणून अंत स्थाचा क्रम बदलावयाचा तर तो य्, व्, र्, ल् असा बदलणें इष्ट होईल. परंतु वर्णमालेंत अंतःस्थाचा असलेला क्रम स्थानभेदानें ठरलेला दिसतो. व्यंजनापुरता विचार केल्यास क वर्ग कंठ्य, च वर्ग तालव्य, ट वर्ग मूर्धन्य, त वर्ग दंत्य, प वर्ग ओष्ठ्य, असा स्थानक्रम आहे. याच क्रमानुसार य्, र्, ल्, व् हा अंतःस्थाचा क्रम लावलेला आहे. य् तालव्य, र् मूर्धन्य, ल् दंत्य आणि व् दंत्यौष्ठ्य अशीं स्थानें असल्यानें क्रम एका तत्त्वानें केलेला दिसतो. पुढचा क्रम पाहिल्यासहि श् तालव्य, ष मूर्धन्य, स् दंत्य बरोबरच आहे. ळ् मराठी म्हणून शेवटीं देणें युक्त ह् चा संबंध स् शीं अधिक म्हणून तो स् नंतर असावा.

कंठ्य, तालव्य, मूर्धन्य, दंत्य, ओष्ठ्य हा स्थानक्रम बरोबर नसून वास्तविक क वर्ग, ट वर्ग, च वर्ग, त वर्ग आणि प वर्ग अशी व्यवस्था पाहिजे असा एक प्रश्न आहे. या दृष्टीनें स्वराचा क्रम अ, आ, ऋ, ॠ, इ, ई, ऌ, उ, ऊ, ए, ऐ, ओ, औ, व व्यंजनाचा क्रम क, ट, च, त, प असे वर्ग ह्, य्, ल्, व्, ह्, ष्, श्, स्, ळ असा लागतो. यामध्यें ह् चें स्थान प वर्गानंतर किंवा सध्याप्रमाणें स् पुढें येण्यासहि प्रत्यवाय नाहीं.

क्रम बदलल्यास तो कसा लागेल हें पाहिलें, तरी क वर्गानंतर च वर्गास स्थान का दिलें गेलें याचाहि विचार करणें अवश्य आहे. द्राविडी भाषांतून ट वर्ग मागाहून घेतला गेला असें मानलें तरी त्याला च वर्गानंतरचें स्थान कां दिलें गेलें असा प्रश्न उत्पन्न होतो. मुखांतील स्थानाचा क्रम कोणता हाहि वादग्रस्त प्रश्न आहे. जिभेचें टोंक आतून बाहेर ज्या क्रमानें लागतें त्या क्रमानें कंठ, तालु, मूर्धा...इत्यादि क्रम आहे असें काहींचें म्हणणें आहे. उच्चाराच्या वेळीं जेथून वायु निघतो तें त्याचें स्थान या दृष्टीनें विद्यमान क्रम बरोबर आहे असें काहींचें म्हणणें आहे. परंतु प्रातिशाख्यामध्यें कंठ्य, मूर्धन्य, तालु, दंत्य, ओष्ठ्य असा क्रम नमूद असून 'ट' इत्यादींचा उच्चार स्पष्ट केल्यास तो क्रम बरोबर दिसतो. तथापि सध्याच्या क्रमामध्यें बदल करण्यापासून व्यवहारदृष्ट्या फायद्यापेक्षा अडचणी अधिक उत्पन्न होण्याचा संभव असल्यानें आज वर्णांच्या क्रमात बदल करावा असें आम्हाला वाटत नाहीं.

## शब्दांचें वर्गीकरण

- शब्द
  - सव्यय
    - सविभक्तिक
      - नाम
      - सर्वनाम
      - विशेषण
    - धातु
  - अव्यय
    - क्रिया वि. अ.
    - शब्दयोगी अ.
    - उभयान्वयी अ.
    - केवल प्र. अ.

## नामाचें वर्गीकरण




रूपसिद्धीच्या दृष्टीनें नामाचे पोटप्रकार पाडता येत नाहींत. परतु रूपसिद्धीच्या दृष्टीनें नामाच्या पोटप्रकाराची आवश्यकता नसली तरी भाषेच्या अभ्यासाच्या दृष्टीनें त्याची आवश्यकता आहे असें आम्हास वाटत. वर्गीकरण करताना ' रूपसिद्धि व अर्थ हें एकच भेदक तत्त्व लावणें इष्ट आहे ' हें ल्क्षात घेऊन शक्य तितकें शास्त्रशुद्ध वर्गीकरण करण्याचा आम्ही प्रयत्न केला आहे.

सर्वनामें .—सर्व प्रकारच्या नामाकरिता ज्या शब्दाचा उपयोग करता येतो व ज्यास वाक्यात त्या नामांचा अर्थ प्राप्त होतो त्या शब्दास सर्वनामें म्हणावें अशासारखी सर्वनामाची व्याख्या स्वीकारावी. सर्वनामानीं प्रथम, द्वितीय व तृतीय यापैकीं कोणता तरी पुरुष दर्शविला जातो त्यापैकीं मी आम्ही ( कधीं कधीं आपण, स्वत ) यानीं प्रथम पुरुष, तू तुम्ही ( कधीं कधीं आपण, स्वत ) यानीं द्वितीय पुरुष आणि बाकी सगळीं सर्वनामें ( व नामें ) यानीं तृतीय पुरुष दर्शविला जातो.

पुरुष हें भेदक तत्त्व मानून सर्वनामाचे प्रकार करावयाचे तर ( १ ) प्रथम पुरुषवाचक सर्वनामें ,( २ ) द्वितीय पुरुषवाचक सर्वनामें व ( ३ ) तृतीय पुरुषवाचक सर्वनामें असे प्रकार करावे लागतील, अर्थाच्या दृष्टीनें अधिक प्रकार करावयाचे तर ते तृतीय पुरुषवाचकाचे होतील, ते म्हणजे दर्शक, सबधी, प्रश्नार्थक व सामान्य हे होत.

मी, तू, तो, हा, जो, कोण, कोणी, काय, आपण, स्वत हीं सर्वनामे होत. वाक्यदर्शक ' असें ' शब्दाचा उपयोग सर्वनाम म्हणून होतो

सर्वनामाचे प्रकार —प्रथम पुरुषवाचक-मी-आम्ही, आपण, स्वत ( कधीं कधीं ). द्वितीय पुरुषवाचक-तू-तुम्ही. तृतीय पुरुषवाचक-आपण, स्वत ( कधीं कधीं ) दर्शक-तो, ती, तें,-ते, त्या, तीं, हा, ही, हें हे, ह्या,हीं, असें सबधी -जो, जी, जें-जे, ज्या, जीं. प्रश्नार्थक-कोण, काय. सामान्य-कोण, कोणी, काय, आपण, स्वत . सार्वनामिक विशेषणवाद-मराठीची प्रवृत्तिच अशी आहे कीं, आधिक्य दाखविण्यासाठीं एका शब्दाचा दोनदा उच्चार करतात. त्याचप्रमाणें निर्देश स्पष्ट होण्यासाठीं नामापाठीमागें नाम किंवा सर्वनाम घालण्याची रूढी आहे तसेंच नामामागें नाम घातलें असता मागल्या नामाची जात नामाऐवजीं विशेषण सागण्याची रूढी नाहीं. ' अकबर बादशहा ' असें म्हटलें असता अकबर व बादशहा या दोन शब्दा कीं एकाची जात विशेषण व एकाची जात नाम असें काहीं सागितलें जात नाहीं. ' रामा घरीं नव्हता ' आणि ' रामा तेथें नव्हता ' यापैकीं पहिल्या वाक्यात ' घरीं ' ही अधिकरणार्थी सप्तमी असें सागतात, ' तेथें ' प्रमाणें स्थलवाचक क्रियाविशेषण म्हणून सागितलें जात नाहीं. याच न्यायानें नामामागें सर्वनाम दिसलें ( उदा०—हा मनुष्य ) तर त्या सर्वनामाला विशेषण म्हणण्याची आवश्यकता आहे असें आम्हाला वाटत नाहीं.

विशेषण —पदार्थाचा गुण किंवा सख्या दाखविणारा जो शब्द त्याला विशेषण म्हणावें. विशेषणाचे प्रकार दोन-( १ ) गुणविशेषणें व ( २ ) सख्याविशेषणें. ' विधि विशेषणें ' हा स्थानभेदानें होणारा प्रकार अवश्य तर सागावा.

परंतु त्याचा समावेश वरील प्रकारांतच होतो विशेषणें हीं नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, अव्यय या सर्वांचे गुण दर्शविण्यासाठीं येतात, म्हणजे विशेषणाचें विशेष्य हें सर्व जातींत असू शकतें. अर्थात् त्या दृष्टीनें विशेषणाचे अनेक प्रकार होतील. परंतु तितके करण्याची आवश्यकता दिसत नाहीं.

संयुक्त क्रियापदें:—धातूनें बोधित क्रियेचें विधान क्रियेचे काल, प्रयोग इत्यादि व्याकरणदृष्ट्या करताना सांगण्यासाठीं प्रयोजिला जाणारा धातु सहाय धातु होय, व या दोन्हीं धातूंनीं बनलेलें क्रियापद तें संयुक्त क्रियापद होय. संयुक्त काळ मानावे.

विभक्ति विचार.—ज्याच्या प्रातिपदिकाचा पदशब्द होतो त्या प्रत्ययाला (व प्रत्यययुक्त शब्दालाहि) विभक्ति म्हणतात. अर्थात् रूपावरून विभक्त्या मानाव्या. प्रथमा, तृतीया, पंचमी, सप्तमी, संबोधन या विभक्त्यांच्या रूपाबद्दल वाद नाहीं. ज्याअर्थी विभक्ति ठरविण्यासाठीं प्रातिपदिकाचें वाक्यगत रूप पहावयाचें किंवा विभक्ति म्हणजे प्रत्यय त्याअर्थी द्वितीया व चतुर्थी या दोन विभक्त्यांचीं रूपें सारखीं असल्यामुळें त्यापैकीं एक विभक्ति गाळणें अवश्य आहे. एक विभक्ति गाळणाऱ्या वैय्याकरणांनीं द्वितीया गाळलेली आहे. गाळली तर चतुर्थी गाळावी असें काहींनीं म्हटलेलें आहे. गाळली तर चतुर्थी गाळावी हें अधिक इष्ट दिसतें. परंतु गाळणाऱ्या वैय्याकरणांनीं द्वितीया गाळलेली असल्यानें एक विभक्ति गाळावयाची झाल्यास द्वितीया गाळणें युक्त होईल. परंतु ही सूचना मान्य होण्यासारखी नसेल तर निदान अप्रत्यय द्वितीया गाळून (कारण रूपावरून विभक्ति विचार केल्यावर अप्रत्यय द्वितीयेचीं रूपें प्रथमेचीं होत हें स्पष्ट आहे) सप्रत्यय द्वितीया व चतुर्थी मानाव्या 'रामा आंबा खातो' अशासारख्या वाक्यात आंबा शब्दाची विभक्ति प्रथमा असून तिचा अर्थ कर्म आहे असें म्हणावें. षष्ठीच्या प्रत्ययाचीं रूपें लिंगवचनाप्रमाणें बदलतात; परंतु तेवढ्यावरून षष्ठ्यंत रूपें विभक्तिरूपें नव्हेत असें म्हणता येत नाहीं, कारण षष्ठीचे प्रत्यय लागण्यापूर्वी सविभक्तिकाचें सामान्यरूप होतें. त्याचप्रमाणें कधीं कधीं षष्ठीचा संबंध क्रियापदाशींहि असतो.

आख्यात व्यवस्था:—नामादिकांना होणारा विकार म्हणजे विभक्ति, त्याचप्रमाणें धातूंना क्रियापद होण्याकरिता होणारा विकार म्हणजे आख्यात होय प्रायः समानार्थक विभक्तिरूपाचे गट करून त्यांना प्रथमादि क्रमवाचक अर्थहीन नावें दिलीं, त्याचप्रमाणें आख्यात रूपाचे समानार्थक गट करून त्यांना विभक्तिप्रमाणें नावें देणें युक्त दिसतें. अर्थ विचार न घेऊन ज्याप्रमाणें कारकार्थाची योजना केलेली आहे त्याप्रमाणेंच काळ व अर्थ सांगण्याची योजना आख्यानाच्या बाबतींत करावी असें म्हणणारा एक पक्ष आहे. तात्त्विक दृष्ट्या ही विचारसरणी कोणालाहि मान्य होण्यासारखी आहे प्राय लाख्याताचा रूपें भूतकाळ दर्शवितात, ताख्याताचीं रूपें वर्तमानकाळ दर्शवितात, व्याख्यातांचीं रूपें विध्यर्थ दर्शवितात वगैरे. म्हणून लाख्याताला भूतकाळ, ताख्याताला वर्तमानकाळ, व्याख्याताला विध्यर्थ अशीं नावें दिलीं जातात यामुळें कधीं कधीं रूपावरून मानला जाणारा काळ व प्रत्यक्ष काळ यामध्यें फरक आढळतो. ही अडचण दूर होण्यासाठीं प्रत्यक्ष असणारा काळ सांगावा, आणि रूपासाठीं अवश्य तर कोणता प्रत्यय लागलेला आहे, तें सांगावें. विभक्तीप्रमाणें आख्यात प्रत्ययांना क्रमवाचक नावें देऊन व्यवस्था करण्यानें विभक्तीपेक्षाहि अधिक वादग्रस्त प्रश्न उत्पन्न होणारे असल्यानें तशी व्यवस्था करणें सोईचें होणार नाहीं असें आम्हास वाटतें.

वाक्य पृथक्करण —मराठी भाषा ही विभक्तिप्रचुर असल्यामुळें वाक्याचा अर्थबोध होण्यास अडचण पडत नाहीं हें खरें असलें तरी वाक्यातील प्रत्येक शब्दाचें व्याकरण करणें आणि वाक्य पृथक्करण हीं एकमेकास पूरक आहेत. म्हणून वाक्य-पृथक्करण हा भाग मराठींत ठेवण्यास हरकत नाहीं.

प्रयोग —वाक्यातील क्रियापदाचें त्याच्या कर्त्याशीं किंवा कर्माशीं पुरुष, लिंग, वचन या बाबतींत जें साधर्म्य त्याला प्रयोग म्हणतात प्रकार ३—(१) कर्तरी, (२) कर्मणि, (३) भावे.

वादग्रस्त प्रयोग निर्णय —त्यानें कथा श्रवण केली—त्यानें कर्ता, कथा कर्म, केली क्रियापद, कर्मणि प्रयोग. मी स्नान केलें.—कर्तरि. वैद्यानें रोग्याला बरा केला —कर्मणि त्याचें लिहून झालें.—लिहिणें हा अध्याहृत कर्ता, लिहून झालें क्रियापद, कर्तरि. मला गावीं जाणें आहे.—जाणें कर्ता, कर्तरि. मला स्वप्न पडलें.—स्वप्न कर्ता, पडलें क्रियापद; कर्तरि.

सभा :—नारायण गोविंद चापेकर, यशवंत रामकृष्ण दाते, वासुदेव कृष्ण भावे, गोविंद पांडुरंग पावटे, दिनकर धोंडो पराजपे, कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, राजाराम दामोदर देसाई.

या निर्णयास वरील निर्णय देणाऱ्यांपैकी रा. गो पां पावटे यांनीं आपली भिन्न मतपत्रिका जोडली असून तींत "पाणिनीची व्या० रचना पद्धति कोणत्या तात्त्विक पायावर उभारली आहे व त्याचा मराठी व्या० रचनेशीं कसकसा संबंध पुळतो, या गोष्टींचा विचार जसा आजपर्यंतच्या व्याकरणांनीं केला नाहीं, तसाच तो प्रस्तुत सभासदांनीहि केला नसावा म्हणून त्यांना व इतर वाचकांना त्याची ओळख करून देणें क्रमप्राप्त आहे," असें म्हणून ती रचनापद्धति त्यांनीं थोडक्यात दिली आहे.

**सन १९३६ चीं व्याकरण परिषद**—त्यानंतर दादोबा पांडुरंग यांच्या व्याकरणशताब्दीच्या निमित्तानें १९३६ सालीं पुणें येथें एक व्याकरण परिषद भरविण्यात आली होती त्या परिषदेनें विशेषत मराठी भाषेच्या व्याकरणाची रचना कशी असावी व शब्दांचें वर्गीकरण कसें करावें या दोन प्रश्नांची चर्चा केली अशीच चर्चा सर्व प्रश्नांची व्हावी असा तिचा उद्देश होता, पण त्यानंतर अद्यापि तसा प्रसंग पुन्हा आला नाहीं. असो

**आजचें व्याकरण कसें असावें?**—मराठी भाषा ही संस्कृत भाषेपासून महाराष्ट्री प्राकृत व अपभ्रंश यांच्या द्वारें प्रस्तुत रूपांत परिणत झालेली असून तिच्यावर सान्निध्यामुळें कानडी, तेलगी वगैरे द्राविड भाषांचा व राजकीय वर्चस्वामुळें अरबी व फारसी भाषा यांचा व नंतर इंग्रजी भाषेचा बराच परिणाम झाला असल्यामुळें सांप्रतच्या मराठी भाषेचें व्याकरण करावयाचें तें तिच्या जरी प्राकृतिक स्वरूपावर आधारलेलें असलें तरी सांप्रतच्या रूढ पद्धतीस अनुसरून स्वतंत्र रीतीनें तयार होणें अवश्य आहे. व जे नवे नवे प्रकार संप्रत भाषेंत व्याकरणांत रूढ होत आहेत त्यांचाहि अंगीकार या व्याकरणानें केला पाहिजे हें निर्विवाद होय आतापर्यंत जी मराठी व्याकरणाची रचना, विशेषत इंग्रजी अमदानीपासून झाली ती ऐतिहासिक दृष्टीचा मुळींच अवलंब न करतां केवळ कांहीं तरी सांचा पुढें ठेवून त्यास धरून अनुकरणात्मक पद्धतीनें झाली परंतु सांप्रत कोणत्याहि विषयाची मांडणी करावयाची म्हणजे ती त्या विषयाची वाढ ऐतिहासिक दृष्टीनें कसकशी होत गेली हें निरनिराळ्या पायऱ्या दाखवून करणें म्हणजे ती त्या विषयाच्या मूळ प्रकृतीचा जो इतर आनुषंगिक कारणांस अनुलक्षून विकास होतो त्यास अनुसरून होते व अशाच पद्धतीनें आज प्रत्येक शास्त्राचा व विषयाचा अभ्यास करण्याची प्रथा पडत चालली आहे व ती अत्यंत इष्ट आहे मराठी व्याकरणांत ऐतिहासिक पद्धतीचा अवलंब कै० श्री वि. का राजवाडे यांनींच केलेला आढळतो त्यांनींच ज्ञानेश्वरीचें व्याकरण आणि सुबंत व तिङंत विचार लिहिले पण त्याच पद्धतीनें मराठीच्या संपूर्ण व्याकरणाचें विवेचन केलें नाहीं व तसा प्रयत्न आजपर्यंत इतरहि कोणी केला नसल्यामुळें मराठी भाषेचें शास्त्रशुद्ध व पद्धतशीर व्याकरण अद्यापि तयार व्हावयाचें आहे असें म्हटलें पाहिजे असो

**मराठीची शब्दसंपत्ति**—आतापर्यंत मराठी भाषेच्या रचनेच्या दृष्टीनें व्याकरणाचा विचार केला, त्यानंतर मराठी भाषेचें जें महत्त्वाचें दुसरें अंग म्हणजे त्या भाषेंतील शब्दसंपत्ति, तीसबंधीं विचार करूं मराठी भाषा ही संस्कृत समान असल्यामुळें मराठी भाषेंत कांहीं शब्द जसेच्या तसेच संस्कृत भाषेंतून आले आहेत, यास तत्सम असें म्हणतात यानंतर संस्कृत भाषेमधून ज्या निरनिराळ्या प्राकृत भाषा निघाल्या त्यांपैकीं महाराष्ट्रीय प्राकृत भाषाच मराठीला जरी मूळ आधार असला तरी पाली, मागधी, वगैरे प्राकृत भाषांचाहि परिणाम मराठीवर कांहीं बाबतींत झाला आहे ही गोष्ट चवथ्या विभागाच्या प्रस्तावनेंत आपण पाहिलीच आहे तेव्हां अशा तऱ्हेनें संस्कृत भाषेपासून अपभ्रंश पावून मराठींत अनेक शब्द आले आहेत, त्यास तद्भव असें म्हणतात याशिवाय जी या प्रदेशांतील मूळची भाषा होती तिचेहि कांहीं शब्द त्या भाषेंत टिकून राहिले असून त्यांची व्युत्पत्ति कोणत्याच संस्कृत शब्दापासून संभवत नाहीं, त्यास देश्य असें म्हणतात. याशिवाय मराठीमध्यें अरबी व फारसी शब्द व अरबी व फारसी भाषांच्या धर्तीवर बनलेलेहि कांहीं शब्द आहेत व आज तर इंग्रजी भाषेमधून कांहीं शब्द जसेच्या तसेच अगर रूपांतर पावून मराठींत येत आहेत व मध्यंतरी पोर्तुगीज व फ्रेंच इत्यादि भाषांतूनहि कांहीं आले आहेत, तरी यापुढें संस्कृत, अरबी व फारसी या भाषांमधून मराठींत शब्द कसे सिद्ध होत गेले ते थोडक्यांत पाहूं व त्याचप्रमाणें मराठींतहि याच क्रियांनीं एका शब्दापासून दुसरे शब्द बनविण्याची क्रिया कसकशी होत असते त्याचेंहि दिग्दर्शन करण्यांत येईल. कारण, मूळ कोशांत जरी बरेच साधित शब्द दिले

असले तरी सर्व साधित शब्द देणें शक्य नाहीं. याकरितां असे साधित शब्द बनण्याची पद्धति व त्यांची कांहीं उदाहरणें येथें दिलीं म्हणजे त्यांवरून अशा प्रकारच्या साधित शब्दांचा अर्थ कळणें सुलभ होईल.

साधित शब्दः—संस्कृत मार्गेत जे उपसर्ग आहेत ते निरनिराळ्या धातूंस लागून त्यांपासून अनेक साधित शब्द निरनिराळ्या अर्थाचे तयार होतात. अशा कांहीं शब्दांचीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत. अति—फार, पलीकडे, अधिक, प्रमाणापलीकडे–अतिक्रम, अतिरेक, अत्युक्ति, अतिशय इ. अधि—वर्चस्व, योग्यतेनें किंवा मानानें वर अधिकार, अधिपति इ. अनु—मागें, बराबर, जवळ, सारखें, साहचर्य, सादृश्य–अनुभव, अनुज, अनुरूप इ. अप—कमी, योग्यतेनें खालीं, न्यूनत्व–अपगत, अपशकून, अपकर्ष इ. अपि—(क्वचित् पि) सान्निध्य, जवळ, वर–अपिधान, पिधान, अपिनद्ध इ. अभि—पुढें, समीप, सर्वत्र, चोहोंकडे;–अभिज्ञ, अभिरुचि, अभिमान इ. अव—न्यूनत्व, पासून, खालीं, अप्रतिष्ठा–अवनत, अवकृपा, अवतार इ. आ—पर्यंत, कडे, थोडा, हलका;–आज्ञा, आकार, आनंद, आदर, आयुध इ. [ कितीएक धातूंच्या मागें 'आ' लागल्यानें त्यांचा अर्थ मूळ अर्थाच्या उलट होतो. उदा० गमन–जाणें. आगमन–येणें. दान–देणें. आदान–घेणें. ] उत् किंवा उद्—वर, उंच, बाहेर;–उत्कर्ष, उत्तेजन, उत्प्रेक्षा, उत्तान. उप—संनिध; योग्यतेनें खालीं, कडेस;–उपनेत्र, उपक्रम, उपकार इ. दुस्, दुर्—कठीण, दुष्ट, निंद्य, वाईट;–दुर्गुण, दुराचार, दुःख इ. नि—अत्यंत, रहित, आंत, मध्यें;–निधन, निबंध, नियोग. निस्, निर्—अभाव, बाहेर, शिवाय, उलट;–निराकार, निष्कारण, निषेध, निष्कृति इ. परा—विपरीत, मागें, उलट–पराजय, पराभव इ. परि—सभोंवतीं–परिकर, परिसर, परिचर्या. प्र—पुढें, बाहेर, दूर, अधिक, वर्चस्व–प्रभात, प्रताप, प्रदेश, प्रकार इ. प्रति—पुनः, मागें, उलट, बदल–प्रतिबिंब, प्रतिशब्द, प्रत्यक्ष, प्रतिवादी. वि—वेगळा, विशेष, अधिक, गेलेला–विरक्त, वियोग, विराम. सम्—चांगलें, एकत्र, बरोबर–संगम, संभव, संबंध, संसार इ. सु—चांगलें, सोपें, पुष्कळ–सुकर, सुप्रभात, सुख इ. कधीं कधीं दोन दोन तीन तीन उपसर्गहि एका शब्दांत दृष्टीस पडतात. उदा०—अत्युत्कृष्ट, अध्याक्षेप, व्यवधान, सुसंगति, प्रत्यपवाद, संप्रदान, व्याकरण इ.

या उपसर्गांशिवाय दुसरीं कित्येक अव्ययें व विशेषणें शब्दांच्यापूर्वी येऊन साधित शब्द बनतात. उपसर्गांप्रमाणें हीं केव्हांहि निरर्थक नसतात. यांना अनेक भिन्न अर्थहि नसतात. त्यांची अर्थासह यादी पुढें दिली आहे.

अ—( शब्दाचें आद्याक्षर स्वर असल्यास अ बद्दल 'अन्' येतो ) अभाव, निषेध;–अनक, अक्रम, अधर्म, अनादर, अनर्थ, अनपत्य. अद्—आश्चर्यदर्शक;–अद्भुत. अधस्—खालीं, खालच्या भागीं;–अधःपात, अधोमुख इ. अंतर्—आत, मध्यें;–अंतर्द्वार, अंतपुर, अंतःकरण इ. अमा—जवळ, बरोबर, संनिध;–अमावास्या, अमात्य इ. अलम्—शोभा ( हें कृ धातूत्पन्न शब्दांपूर्वी लागतें )–अलंकार, अलंकरण इ. आविर् स्–उघड, दृश्य;—, आविर्भूत, आविर्भाव, आविष्करण इ. आशु—लवकर, वेगानें,–आशुग ( वायु, बाण ); आशुव्रीहि ( लवकर पिकणारें भात–हळवें भात). इति—असें, ह्या प्रकारें, शेवट;–इत्यर्थ, इतिहास (इति–ह–आस असें असें झालें) इतिवृत्त, इत्यादि इ. इत्थम्—ह्या प्रमाणें;–इत्थंभूत. ईषत्—किंचित्, थोडें,–ईषद्धीर. उच्चैः—उंच, मोठ्यानें;–उच्चैःश्रवा, उच्चैर्घोष इ. उरि, उरी, ऊरी–विस्तार, अंगीकार–उरीकृत ( स्वीकारलेला ). कु, का—वाईट, दुष्ट, हलकें, थोडें–कुधर्म, कुवासना, कुपुरुष, कु ( का ) पथ इ. चिरम् ( र )–दीर्घकालपर्यंत— चिरकाल, चिरंजीवि इ. दिवा—दिवसास–दिवाकर, दिवाभीत इ. धिक्—निंदाव्यंजक–धिक्कार, धिक्कृत इ. नाना—निरनिराळे, बहुत;–नानारूप, नानाविध. न—निषेधदर्शक;–नक्षत्र, नास्तिक इ. पश्चात्—नंतर, मागें;–पश्चात्ताप, पश्चाद्द्वार इ. पुनः—फिरून–पुनर्भव, पुनर्विवाह. पुरस्—पुढें, पूर्वी;–पुरस्कर्ता, पुरोगामी, पुरश्चरण इ. पुरा—मागें, पूर्वी–पुरावृत्त, पुरातन इ. पृथक्—वेगळे, दूरदूर, बहुत;–पृथक्करण, पृथग्विध, पृथग्जन इ. प्राक्—पूर्वी, पूर्व;–प्राक्कर्म, प्राक्तन इ. प्रातर—सकाळीं;–प्रातःकाल, प्रातःसंध्या. प्रादुर्—उघड, दृश्य;–प्रादुर्भाव, प्रादुर्बुद्धि. बहिर् ( स् ) बाहेर, बाहेरल्या बाजूस–बहिर्द्वार, बहिष्कार इ. शम्—सुख, भाग्योदय;—शंकर, शंभु, शंकाक इ. स—सह, युक्त, प्रमाणें—सजीव, सफल, सजाति. सह—युक्त, बरोबर;–सहज, सहवास, सहगमन इ. सायं—संध्याकाळीं–सायंकाल, सायंसंध्या इ. स्वयम्—स्वतां, आपण;—स्वयंभू, स्वयंवर, स्वयंपाक इ. स्वर्—आकाश, परलोक;–स्वर्णदी, स्वर्वेश्या इ.

कृ आणि भू या धातूंचे पाठीमागें असेच कांहीं शब्दविशेषांवरून नामें व विशेषणें बहुधा ईकारांत अव्ययात्मक

होऊन येतात. उदा० समीकरण, वर्गीकरण, स्वीकार, स्पष्टीकरण, पुञ्जीकृत, दूरीकरण, भस्मीभूत, कारणीभूत, पाण्डीभवन इ.

पुढें दिलेले शब्द उपसर्गांमुळेंच साधलेले आहेत पण ते मराठी आहेत. अ—न;-अजाणता, असमंजस, अपुरे, अनोळखी ( अन्+ओळखी ). अड, आड—लहान, थोडे,असाधारण, अपुरें-आडगाव, आडवाट्या, अडगळी. अद—अर्धे ( स. अर्धपासून ) अदमण, अदशेर ( अच्छेर ), अदमुरें ( अर्धे मुरलेले दही ). अव—हीन, कमी;- अवजड, अवकळ, अवघड, अवताण. दु—दूषित, दुष्ट, वाईट;-दुवेत, दुष्काळ. ना—अभाव, अपुरें;-नाइलाज. नि—रहित, अभिन्न,-निक्षेप, निकामी, निजोरी, निधड्या, निनावी. निर्—निष्-रहित-निर्फळ, निर्धास्त, निष्काळजी. पड—दुसरा, गौण;-पडजीभ, पडसाद. पडचाकर, पडताळा. पण—प्र, प्रवर्ष-पणजा, पणतोंड, पणतु. फट—फार, उघड, स्पष्ट;-फटफजिती, फटलटी, फटकळ. भर—पुरा, मुख्य-भरदिवसा, भरराती, भरधाव.

कृदन्तें व तद्धितें.—याशिवाय संस्कृत भाषेंत धातूंत निरनिराळे प्रत्यय लागून कृदन्तें व तद्धितें बनतात व मराठी भाषेंत तीं तशींच वापरलीं जातात. त्यांचीं कांहीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत. प्रत्ययघटित कृदन्तें अ -चुर्,—चोर, सृप्-सर्प, कृ-कर, बुध्-बुध. अक—कृ-कारक, नी-नायक, बाध्-बाधक. अन—नंद्-नंदन, मद्-मदन, रम्-रमण, आना—विद्-वेदना, रच्-रचना. अनीय—दृश्-दर्शनीय, कम्-कमनीय. आ—इष्-इच्छा, कथ्-कथा. अस्—सृ-सरस्, तम्-तमस्, वच्-वचस्. आलु—स्पृह्-स्पृहयालु, शी-शीयालु. इ—हृ-हरी, भृ-भरी. इन्—युज्-योगी, दुष्-दोषी, द्रुह्-द्रोही. इस्—सृप्-सर्पिस्, अर्च्-अर्चिस्. इष्णु—सह्-सहिष्णु, जी-जयिष्णु. उ—भिक्ष्-भिक्षु, इच्छ्-इच्छु. उक—भिक्ष्-भिक्षुक, भू-भावुक. उर्—भास्-भासुर, भञ्ज्-भंगुर. उस्—चक्ष्-चक्षुस्, यज्-यजुस् ऊक—दश्-दंदशूक, जागृ-जागरूक. त—कृ-कृत, मृ-मृत. ता—दा-दाता, नी-नेता. तव्य—कृ-कर्तव्य, भू-भवितव्य. ति—कृ-कृति, भू—भूति, गम्—गति. त्र—नी—नेत्र, पा—पात्र. त्रिम—कृ—कृत्रिम न—यत्—यत्न. स्वप्-स्वप्न. मन्—दा—दामन्(दावें), छद्-छद्म, नम्-नाम. य -रम्-रम्य, गम्-गम्य. या—विद्-विद्या, चर्-चर्या. र्-नम्-नम्र, हिंस्-हिंस्र. रु—दा—दारु, मि—मेरु. वर—भास्—भास्वर, स्था—स्थावर.

प्रत्ययघटित तद्धितें—अ-भृगु-भार्गव, यदु-यादव, चक्षुः-चाक्षुष, विष्णु-वैष्णव, शुचि-शौच, मुनि-मौन, लघु-लाघव. अक—मीमांसा-मीमांसक, न्याय-नैयायिक. आट—आल-वाचाट, वाचाल. आमह—पितामह, मातामह. इ— दाशरथि, कार्ष्णि. इक—वार्षिक, मासिक, लौकिक इत—पुष्पित, फलित, दुःखित. इन—धनी, अर्थी, पक्षी इन—मलिन, मलिन. इम—अग्रिम, अतिम. इमा—गरिमा, लघिमा, महिमा. इय—यज्ञिय, राष्ट्रीय इल—तुंदिल, पंकिल. ईन—कुलीन, शालीन, नवीन. ईमस—मलीमस. ईय—त्वदीय, मदीय. उल—मातुल, एय—कौंतेय, वैनतेय. क—पुत्रक, बालक. कट—निकट, उत्कट, प्रकट. कल्प—द्वीपकल्प चित्—कचित्, किंचित्, कदाचित् ठ—कर्मठ, जरठ. तन—सनातन, चिरंतन. तस्—स्वरतः, वर्णतः, काल्तः. त्य—अत्रत्य, तत्रत्य. ता—गुरुता, कविता, समता. त्व—गुरुत्व, ब्राह्मणत्व. धेय—नामधेय, भागधेय. म—मध्यम, अधम. मय—काष्ठमय, मासमय. मत्—श्रीमत्, गुरुमत्, धीमत् मिन्—स्वामी, वाग्मी. य—जाड्य,वाणिज्य, स्थाप्य, शांडिल्य, वायव्य. र—मधुर, मुखर, पाण्डुर. ल—वत्सल, पांसुल. लु—श्रद्धालु, कृपालु, दयालु व—केशव, राजीव. वत—वान-धनवान्, विद्यावान्, वल—कृषीवल, शिलावल. विन्—मायावी, तेजस्वी. व्य—पितृव्य, भ्रातृव्य. श.—क्रमशः, कणशः.

सामासिक शब्द सिद्धिः—खालीं दिलेले शब्द आरंभीं किंवा शेवटीं येऊन कांहीं सामासिक शब्द मराठींत होतात. त्यांचीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत.

अंकित—युक्त,विशिष्ट, चिन्हित-मुद्रांकित, स्नेहांकित, नामांकित इ. अतीत—पलीकडे गेलेला-मर्यादातीत, मायातीत, गुणातीत, इ. अधीन—ताब्यांत गेलेला, दास-पराधीन, व्यसनाधीन, विषयाधीन, इ. अध्यक्ष—सूत्रधार, व्यवस्थापक-वादाध्यक्ष, शालाध्यक्ष, कोशाध्यक्ष, इ. अनुरूप—योग्य, पाहिजे तसा-गुणानुरूप, योग्यतानुरूप, मर्जीनुरूप, इ. अपह—नाशक, दूर करणारा-शोकापह, दुःखापह, सुखापह, इ. अनुसार—प्रमाणें, धरून-कर्मानुसार, वेळेनुसार, वेळेनसार इ. अंतर—अन्य, दुसरा-भाषांतर, वनांतर, रूपांतर, देशांतर, इ. अन्वित—युक्त असलेला-गुणान्वित, पुत्रान्वित, इ. अर्थी—( अर्थिन् ) इच्छा धरणारा, मागणारा-विद्यार्थी, पुत्रार्थी, अन्नार्थी इ. अर्ह—योग्य

लायक, शोभणारें-पूजार्ह, गुणार्ह, दोषार्ह. अवरोध—प्रतिबंध, अडचण-प्राणावरोध, मानावरोध, मलावरोध, इ. आकीर्ण—व्याप्त, भरलेलें-जलाकीर्ण, मेघाकीर्ण, जनाकीर्ण इ. आकुल—व्याप्त, पीडित-चिंताकुल, शोकाकुल इ. आक्रांत—आच्छादित, व्याप्त-चिंताक्रांत, शोकाक्रांत, पादाक्रांत इ. आचार—विधि, धर्म-कुलाचार, पापाचार, शिष्टाचार इ. आढ्य—परिपूर्ण, समर्थ, निपुण, पराक्रमी गुणाढ्य, धनाढ्य इ. आतुर—दुःख, व्याप्त, उतावळा,-चिंतातुर, भयातुर, विद्यातुर इ. आपन्न—विशिष्ट, युक्त, पीडित-दुःखापन्न, दोषापन्न, विपदापन्न इ. आरूढ—चढलेला,-पदारूढ, अधिकारारूढ इ. आर्त—पीडित, भरलेला-क्षुधार्त, शोकार्त इ. आवह—प्राप्त करून देणारें-हितावह, सुखावह, दुःखावह इ. आविष्ट—व्याप्त, भरलेला-क्रोधाविष्ट, शोकाविष्ट इ. आशय—साठा, संग्रह, पात्र, स्थान-पुण्याशय, पापाशय, महाशय इ. आरोप—लावणें, चिकटविणें, लागू करणें-दोषारोप, गुणारोप इ. आस्पद—स्थान, आगर-दोषास्पद, सहायास्पद, स्नानास्पद इ. उन्मुख—कडे तोंड केलेला, तत्पर, तयार-मरणोन्मुख, दुःखोन्मुख. उत्तर—मोठा, श्रेष्ठ-लोकोत्तर. कर—करणारा,-दिनकर, प्रभाकर, दिवाकर. करी—स्वामी, धनी-भाडेकरी, कामकरी, ओझेकरी. कामुक—इच्छा करणारा,-मोक्षकामुक. विद्याकामुक. कार—करणारा, बनवणारा-चर्मकार, ग्रंथकार, सुवर्णकार. गम्य—जाण्यास योग्य, प्राप्त होणारा, कळणारा-विचारगम्य, मनोगम्य. गोचर—गम्य, कळणारा,-दृग्गोचर, इंद्रियगोचर. ग्रस्त—पीडलेला, व्यापलेला-चिंताग्रस्त, भयग्रस्त, वाद्ग्रस्त. घ्न—नाशक-शत्रुघ्न, कृतघ्न. चर—फिरणारे, चालणारे-जलचर, खेचर, भूचर. चिंतक—विचार करणारा-आमचिंतक, हितचिंतक. च्युत—पडलेला, खालीं आलेला-धर्मच्युत, स्वर्गच्युत. ज—जन्मलेला, उत्पन्न झालेला-स्वेदज, अंडज, पूर्वज. जात—उत्पन्न झालेला, जन्म घेतला-धनजात, क्रोधजात. जात—समुदाय-वस्तुजात. जीवी—राहणारा, उपजीवन करणारा-मांसजीवी, चिरजीव. दर्शी—पाहणारा-गुणदर्शी, दूरदर्शी. धर, धारक—घेणारा, जवळ असणारा-चक्रधर, गदाधर. नाशक—नाहींसें करणारा-कष्टनाशक, पापनाशक. निष्ठ—तत्पर, निमग्न-कर्मनिष्ठ, स्वार्थनिष्ठ. पर, परायण—रत, निमग्न, लुब्ध-ज्ञानपर, भक्तिपर, ईश्वरपरायण, भक्तिपरायण. बाह्य—सोडून, उलट, विरुद्ध, बाहेर-धर्मबाह्य, रीतिबाह्य बुद्धि—मन, आवड-दुर्बुद्धि, विषयबुद्धि भ्रष्ट—पतन, दूषण-बुद्धिभ्रष्ट, मतिभ्रष्ट. भूत—झालेला, स्थितीला गेलेला-विषयभूत, भस्मीभूत, सारभूत, प्रमाणभूत. मय—भरलेला, व्याप्त-सुवर्णमय-मयी ( स्त्री ) पाषाणमय, वाङ्मय. मात्र—केवळ, सरासरी, पर्यंत-क्षणमात्र, अणुमात्र ( मराठी-नखमात्र, तिळमात्र ) रूप—प्रतिमा, स्वरूपाचें, मूर्तिमत-तीर्थरूप तेजोरूप, रुद्ररूप श—क्रमानें, एकेक-अक्षरशः, शब्दशः, क्रमशः शाली—भूषित, युक्त-गुणशाली, भाग्यशाली, वैभवशाली. शील-कल असलेला, ओढा असलेला-सहनशील, दानशील, धर्मशील, भक्तिशील. शून्य-रहित, वांचून, अभाव-ज्ञानशून्य, अक्कलशून्य, तर्कशून्य. शूर—उदार, धाडसी, सढळ,-दानशूर, कर्मशूर, आरंभशूर. साध्य—होण्यास योग्य, हातीं लागणारें, कष्टसाध्य, द्रव्यसाध्य. स्थ-राहणारा, असणारा,-मार्गस्थ, देशस्थ, कोंकणस्थ. हत—ठार केलेला मारलेला, तडाखा दिलेला-दैवहत. हर, हर्ता, हारक, हारी,—नेणारा, नाहींसें करणारा,-तापहर, विघ्नहर. मनोहर, पापहर्ता, विषहारक, मनोहारी. हीन—अभाव, नसणें-द्रव्यहीन, बुद्धिहीन, श्रद्धाहीन. ज्ञ—जाणणारा, पाहणारा-मनोज्ञ, सुज्ञ, अज्ञ, दैवज्ञ. दार—स्वामित्व, अंगीं असणें-ठाणेदार, अणीदार, खुबीदार. पट्टी—आवेश, जोर, निंदा, दोष-धूळपट्टी, हजामपट्टी, खरडपट्टी. वार—क्रमानें, एकेक, निरनिराळ्या-गांववार, तालुकेवार, असामीवार. सर—थोडें, काहींसें-पिवळसर, काळसर, आटोपसर. शीर, सीर—अनुसरून, बरोबर-रुजूशीर, कायदेशीर अनुभवशीर.

मराठी कृदन्तें अथवा साधुसाधितें.—आतापर्यंत मराठींत जे संस्कृतमधून तत्सम शब्द आले आहेत त्यापैकीं प्रत्ययघटित व इतर साधित शब्द दिले आहेत. याखेरीज तद्भव अथवा देश्य असेहि साधित शब्द अनेक बनत असतात, त्याचीं उदाहरणें कांहीं पुढें दिलीं आहेत.

अ—मेळ, फेर, खोट, फूट, तूट, लूट, उतार, बिघाड, मोड, तोड, मुरड ( पीठ ), मोड ( विळी ), गाळ. आ—घसरा, पुकारा, झगडा, ठेचा, भरडा, ठेंचा, चाखा, हिसका, झरा, ओढा, खंगडा, नाचा, सुका, धुरा, चारा, तोटा, मेळा, रगाडा, पसारा, उकाडा. आई—खोदाई, चराई, चढाई, बढाई उतराई. आऊ—टिकाऊ, लढाऊ, दिखाऊ. आट—कलकलाट, गडगडाट, सुळसुळाट. आड—भगाड, खांडाड. आडा-डी—नासाडा-डी चुराडा. आडी-डू—खिलाडी, खेळाडू. आडी—कुबाडी, चिळकाडी. आणा—फुटाणा, घाटाणा. आणू—जिवाणू, उठाणू. आप—मिलाप. आर—चुकार, सुटार. आरा—बंधारा, फुगारा, आरी—पुजारी, ओतारी, रंगारी, ओकारी,

**मत्स्य**—पु १ मासा मच्छ, एक जलचर प्राणी २ एकमेकांना छेदणाऱ्या दोन वर्तुळांत समान असा भाग ३ मनुष्याच्या तळ हातावर किंवा तळपायावर रेषांची बनलेली विशिष्ट आकृति हें चांगल्या नशिबाचें लक्षण समजतात ४ तीळ (मनुष्य इ०च्या शरीरावरील) ५ विष्णूचा पहिला अवतार [स] ०घ्न-पु मासे मारणारा धीवर तो मत्स्य मत्स्यघ्न विदारी। तव लेह निघे त्याचे उदरीं।'—एभा १ ३८४ ०जयंती-स्त्री विष्णूनें ज्या दिवशीं मत्स्यावतार धारण केला तो दिवस चैत्र शुद्ध प्रतिपदा [स] ०देश-पु कानपूर मिरजापूर इ० प्रदेश —अक्षप १ ३४ ०पुराण-न अठरा पुराणांपैकीं एक ०यन्त्र न १ मच्छयन्त्र पहा २ मासा वसविलेलें फिरतें वेधण्याकरितां केलेलें यन्त्र **मत्स्यावतार**-पु विष्णूच्या दहा अवतारांपैकीं पहिला [मत्स्य+अव तार] **मत्स्यासन**-न पद्मासन घालून नंतर तसेंच पाठीवर उताणें निजणें व हाताचा कवा घालून डाव्या हातानें उजव्या हातानें बावखड व उजव्या हातानें डाव्या हाताचें बावखड धरणें आणि दोन्ही हाताच्या तिढ्यावर डोकें ठेवणें —सयोग ३१८. **मत्स्याहारी** वि मांस खाणारा याच्या उलट शाकाहारी [स मत्स्य+आहारी] **मत्स्यी**-स्त्री (काव्य) माशाची मादी [स] **मत्स्यीं(स्त्ये)द्रनाथ** पु नवनाथांपैकीं एक नवनाथ पहा निरालंबदर्शी अनुपम्य राजा। नमस्कार मत्स्यींद्रनाथासि माझा। —अकक २ २०२ **मत्स्येंद्रासन** न योगशास्त्रांतील एक आसन **मत्स्योदरी** स्त्री काशी येथील भैरवाच्या देवळापर्यंत आलेला गंगा नदीचा पूर [मत्स्य+उदर]

**मथक**—न मुख्य ठाणें ठिकाणा माल्टा (वेलेटा) बंदर भूमध्य समुद्रांतील अत्यंत महत्त्वाचें नौकांखत्याचें आणि वैमानिक खात्याचें मथक आहे —किर्लोस्कर मासिक जून १९३६ (इ) हेडक्वॉर्टर्स [स मस्तिष्क मस्तक]

**मथणें**—अक्रि संगनमत करणें एकत्र होणें 'त दोघ मथले आणि घर फाडलें [मत]

**म(म)थणें**—उक्रि १ घुसळणें, मंथन करणें ना तरी शब्द ब्रह्माब्धि। मथिलेणे व्यासबुद्धि। —ज्ञा १ ५१ २ वादविवाद चर्चा साधाघाट करणें ३ छाननी संशोधन परीक्षण करणें ४ एखाद्या गोष्टीविषयीं (मनात) विचार मनन चिंतन करणें ५ अनुकूल करून घेणें वळविणें ६ (काव्य) ठार मारणें श्वेत हयें अवघ शुतायुनामा रणांगणीं मथिला। मोकर्ण ३ २५ ७ पराभव करणें तव बळ मथितो त्यातें मारुनि सार्थी रणीं निज स्वार्था।'—मोकर्ण १२ ३ ८ घासणें मंथन करणें जैसें काष्ठ काष्ठ मथिज। तेथ वन्हि एक उपजे।'—ज्ञा १ २४३ [म मंथन] **मंथणी-नी**-स्त्री १ रवी घुसळणी २ मथण्याची घुसळण्याची क्रिया ३ सोनाराचें मणि तयार करण्याचें हत्यार **मयगा-ना**-स्त्री ताक करण्याचा डेरा मायणी

**म(मं)थन**—न १ दहीं इ० घुसळण्याची क्रिया कुंकुमादि दर्शुनि मथनालागीं आरंभिती।'—घनश्यामाची भूपाळी पृ २१ २ अग्निहोत्र्यानें अरणी नावाच्या लाकडावरील खळगीत लाकडाचा शंकु सामर्थ्याप्रमाणें फिरवून अग्नि उत्पन्न करण्याची क्रिया ३ (ल) वादविवाद चर्चा, वाटाघाट ऊहापोह 'अध्यात्मविद्या भेदाभेद। मथन जेथें।'—दा १ ८ ५ ४ वध जखमी करणें 'तेव्हां करील कोणी भक्ता त्वद्वैर मन्मथन राजा।'—मोभीष्म १ ८७ [स] ०सार-पु (काव्य) चंद्र (हा समुद्रमंथनापासून निघाला म्हणून) 'कि मथनसाराचें बीज। घरू म्हणति प्रळयबीज।' ०साराचें बीज-न १ काहीं अशक्य किंवा अविद्यमान वस्तु २ लोणी नवनीत **मथरी**-स्त्री घुसळताना रवीभोंवतीं गुंडाळलेली दोरी **मथान मथा**-पु १ मंथन करण्याचा दंड रवी २ (अरणीवर) घासून अग्नि उत्पन्न करण्याचें लाकूड आणिवीं हृदयारणीं मथा। विवेकु केला। —ज्ञा ४ १३० **मथित**-न १ वादविवाद चर्चा वाटाघाट २ लोणी हे शब्दब्रह्माचें मथितें। श्रीनिवासप्रज्ञानि हातें।'—ज्ञा १५ ५७१ ३ तत्त्व साराश 'तेंनें आनंदें बोल्तु। भक्तीचें मथितु वासुदेवाप्रती।'—एभा ५ ४८८ —वि १ घुसळलेलें मंथन केलेलें (दहीं इ०) २ (ल) चर्चिलेला व टाघाट केलेला (विषय) **मथितार्थ** पु वादाचा निष्कर्ष तात्पर्य साराश रहस्य 'तंव उद्धव म्हणे अनंत।' ज्ञानमथितार्थ सांगत। —एभा १५ १० **मथितोष्ण मंथोष्ण**—वि नुकतेंच घुसळल्यानें गरम झालेलें (ताक)

**मथव(वि)णें**—उक्रि वश करणें वळविणें रघोजीनें शियास मथवून भोपाळ काबीज करावयाचें ठरविलें।'—विवि ८ ७ १३९ [मथणें]

**मथ(था)ळा**—पु १ हुंडी देणारा हुंडीवर श्रीकाराच्या खालीं करतो ती सही २ डोकें माथा ३ लेखाच्या माथ्यावर लिहिलें असतें तें लेखाचें नाव शिरोनाम (इ) हेडिंग अर्थ सूचक प्रश्नाच्या मथळ्याखालीं जो एक निबंध लिहिला आहे' —केले १ १४८ ४ समईच्या वरची बैठक बूड [माथा]

**मथा**—पु (कुमारी) १ मडक्यांना मिलई देण्यासाठीं कुंभार ज्याचा उपयोग करतात तो काचेचा मणि २ (सा) अशा मण्याची माळ या माळेनें मातीचें भांडें तल लवून घासतात [स मथ]

**मथाटी**—स्त्री (व) बैलाच्या शिंगाभोंवतीं बांधलेली दुहेरी जाड दोरी [माथा]

**मथित**—स्त्री (विणकाम) कापडास ताण देण्याचें एक उपकरण; मती मतीत पहा

**मथुरी**—स्त्री एक लहान वृक्ष

मद—पु १ धुंदी, कैफ, मत्तपणा (दारू, धन, विद्या, कुलीनता इ०मुळें आलेला) (समासांत उत्तरपदी) धन-विद्या-स्वरूप-तारुण्य-मद २ उत्कट कामेच्छा, कामवासना ३ माज लेल्या हत्तीच्या गंडस्थळांतून निघणारा चिकट द्रव्याचा स्राव 'प्रकृतिकर्णांच्या चाळीं। उठिला मदपानिळीं।'—ज्ञा १७ ६ ४ पुष्परस, फलरस ५ गर्व, ताठा, अभिमान, भरारी 'संपत्ति मदु सांडिजे। कुरवडी करनी।'—ज्ञा ६ ३८१ ६ वेड, उन्माद ७ आसव, मद्य, दारू ८ रंगेलपणा, चेष्टा, ख्याल, विलास (तारुण्यांतील) 'वती वडे चावुनि दाम दांतें। गोधु रिती ह्या प्रमदामदांतें।' [स] ०कारी—वि कैफ उत्पन्न करणारें, कैफी ०गज—पु उन्मत्त हत्ती ०त्रय—पु विद्या, धन व कुल (किंवा तारुण्य, धन व सत्ता) या तिहींचा मद 'अहंकाराचिया चळिया। वरि मदत्रयाचिया उकळिया।'—ज्ञा ७ ७५ ०मुख—पु (ल) मदोन्मत्त हत्ती 'जैसा सिंहाचिया हाका। गुर्गांतु हाय मदमुखा।'—ज्ञा १ २१५ ०विव्हल-ळ—वि कामविकारानें विव्हल, वश झालेला मदणें—अक्रि मत्त होणें, माजणें, झिंगणें 'गाति किती किति नाचति हासति त निजती रडती मदले।—गंगाधर, रस कल्लोल २० मदात्यय—पु १ मदामुळें झालेला अतिशयित विकार २ गर्व, ताठा इ०चा नाश मदात्यय-वायु—पु उन्माद, उन्मादवायु मदांध—वि (द्रव्य, विद्या इ०च्या) गर्वानें ज्याचा विचार नष्ट झाला आहे असा, उन्मत्त [स मद+अंध] मदिणी—स्त्री हत्तीण —शर मदोत्कट—वि गंडस्थळांतून मदस्राव होत असलेला (हत्ती) [स मद+उत्कट] मदोन्मत्त—वि (श्रीमती, विद्या, कुल इ०नीं) माजलेला, उन्मत्त, धुंद झालेला [स मद+उन्मत्त]

मद—पु (वे) कचऱ्यासहित भात मळलेलें पण स्वच्छ न केलेलें भात, मदन [स मृद्-मर्द्]

मंद—पु शनि हा ग्रह —वि १ ज्यास फारसा वेग, चलाखी नाहीं असा, सुस्त, धिमा २ (ल) मूर्ख, मंद्र निर्बुद्ध 'रजागी महा मंद। जाण प्रसिद्ध उद्धवा।'—एभा १३ २४० ३ जड, आळशी, सुस्त ४ अस्पष्ट, किंचित् अंध (दृष्टि) ५ अंधुक, प्रभाहीन, निस्तेज (प्रकाश) 'जेवीं सूर्योदयापुढें चांदू। होय मंदु निजतेजें।'—एभा १३ ४७० ६ सौम्य, गालातल्या गालांत केलेलें (हास्य) 'वदन मिरवे मंदहर्षिनें।' ७ हळु हळु वाहणारी सौम्य (वाऱ्याची झुळुक) ८ नक्षत्र।०श अधमदादि प्रकारापैकीं एक वर्ग यांत मृग, आश्लेषा, हस्त अनुराधा, उत्तराषाढा, शततारका व अश्विनी हीं नक्षत्रें येतात हें नक्षत्र असताना हरविलेली वस्तु लवकर सांपडत नाहीं ९ बारीक, हलका (आवाज ध्वनि) १० सामर्थ्यहीन, असमर्थ, कमजोर 'त्याचे उपदेशीं ब्रह्मा मंदु। मासनिही बोध न करवे।'—एभा १३ १५८ [स] ०पडणें—१ संथपणानें, सुस्ताईनें चालणें (काम, धंदा) 'हल्लीं तुमचे कामाचें मंद पडलें आहे'—शाको २ कमजोर होणें (मांग, आजार) ०केंद्र—न (ज्यो) मंदोच्च पक्ष [म] ०गति-गामी—वि ज्याला फारसा वेग नाहीं असा, कमी वेगाचा [स] ०फल—न (ज्यो.) मध्यम ग्रहाला ज्या फलाचा संस्कार करावा असता मंदस्पष्ट ग्रह होतो असें गणितागत अंशात्मक फल —माधवचंद्रोबा कोश [स] ०बुद्धि-मति—वि जड बुद्धीचा, मंद्र [स] ०भाग्य—वि कमनशिबी, दुर्दैवी ०मधुर—वि १ गोड, आल्हाददायक (फळ, वास, आवाज, वाद्य, काव्य इ०) २ सौम्य, मोहक, रम्य (वारा, हास्य, गाणें बोलणें) ०रूप—न १ सूक्ष्मरूप —मनरा 'जो हा ठावबन्हीं मंदरूपें। उदयाचिलपणें हारप।'—अमृ १.३८ २ स्थिरपणा, अचंचलपणा ०वाणी—स्त्री भाषणांत सावकाशी, ओघ, किंवा आवेशयुक्तता नसणें, वक्तृत्वाचा अभाव 'माझी अतिमंदवाणी। तयाची महिमा काय वाणी।'—वि सावकाश, छाप न पडण्यासारखें बोलणारा, बोलण्यांत अकुशल [सं] ०वात—पु सौम्य, झुळु झुळु वाहणारा वारा, वाऱ्याची झुळुक 'गंगातटीं सविती मंदवातें।' [स] ०वार-वासर—पु शनिवार [स] ०वाहकता—स्त्री (शाप) पदार्थांतून उष्णता लवकर जात नाहीं असा पदार्थाचा गुणधर्म (इं) बॅड कंडक्शन ०विसर्जक—वि (शाप) जो लवकर उष्णता बाहेर टाकीत नाहीं असा (पदार्थ) (इ) बॅड रेडिएटर ०वीर्य—वि सौम्य गुणाचें, प्रभावाचें (औषध इ०) ०वेळ-वेळा—स्त्री (ज्यो) ज्या समयीं आरंभिलेलें कार्य लवकर तडीस जात नाहीं तो समय, प्रतिकूल वेळ (क्रि० लागणें) ०शोषक—वि (शाप) जो उष्णता लवकर शोषित नाहीं असा (पदार्थ) (इ) बॅड ॲब्सॉर्बर ०सुगंध—वि सौम्य व सुवासिक (वारा, वाऱ्याची झुळुक) ०स्मित-हास्य—न गालातल्या गालांत हसणें 'मंदस्मित वदनीं मिरवे।'—वि गालातल्या गालांत हसणारा, हसतमुख ०स्मित वदन—न हास्यमुख प्रसन्नमुख मंदणें—अक्रि १ कमी, मंद होणें, 'मती मंदली पातकाचें नि गुणें।'—राक १ पू १५ २ थांबणें 'मी वंदीन पदारविंद म्हणुनी जाता पथीं मंदली।'—आ शबरी ४ ३ मंद होणें, थकणें 'मथिता मंदले देव दैत्य।'—मुआदि ४ ११२ मंदवा—पु (प्रा) मंदाई पहा मंदा—पु मंदी, मंदाई पहा —वि १ स्वस्त २ चलती, मोसम, हंगाम नसलेला मंदाई—स्त्री १ सुस्तपणा धीमेपणा, स्वस्थपणा, ढिलाई (काम, धंदा, इ० मध्यें) २ कमजोरपणा (साथ, रोग इ०चा) ३ स्वस्ताई, उतार (भाव इ० मध्यें) मंदाग—स्त्री सौम्य अग्नि [मंद+आग] मंदागीं—क्रिवि १ सौम्य अग्नीवर (शिजविणें, भाजणें) 'ती भाजी मंदागीं शिजू द्या' २ सौम्य बारीक ज्योतीनें (दिवा जळणें) मंदाग्नि—पु (ल) मंद जठराग्नि, पचनशक्ति

कमजोर असणें -वि ज्याचा जठराग्नि प्रदीप्त नाहीं असा (मनुष्य) मदावणें-अक्रि (शब्दश व ल) मद होणें, कमी होणें, रेंगाळणें, आळसावणें 'मग सुखानुभूतीचीं घेणीं देणीं। मदावों लागती।'-ज्ञा १६ १२ मदाविणें-सक्रि सौम्य, मद कमी करणें मंदावा-पु (शब्दश व ल) मदपणा, सुस्तपणा, आळस मंदाळणी वि ज्यात मीठ कमी घातलें आहे असा (पदार्थ)[मंद+अलवण-अळणी] मंदी-स्त्री मदाई पहा मंदोच्च-नपु ग्रहाच्या कक्षेतील सूर्यापासून अति दूरचा बिंदु; सूर्योच्च याच्या उलट शीघ्रोच्च [स मंद+उच्च] मंदोष्ण-वि साधारण उष्ण, कोंवट [स मंद+उष्ण]

मदगडी-ढी—स्त्री महादरखानीपेक्षा हलका मध्यम प्रतीचा दौलताबादी कागद मधघडी पहा

मदगर्भ-र्भी—पुस्त्री मधगर्भ पहा

मद(दा)ड मद्दड, मंदट-ड—वि मदबुद्धि सुस्त जड, मठ्ठ

मदत-द—स्त्री साहाय्य -वि साहाय्य करणारा, जोडीदार, मदतनीस पाठिंबा देणारा 'मी तुला मदत आहें भिऊ नको' [अर मदद्] ०इमदाद-स्त्री साहाय्य, निकडीची मदत 'जूद-तर खर्चाची मदत-इमदाद पोख्ता ऐवज दऊन रवाना करून पाठवावें'।-पया ३ ८७ [अर इम्दाद्=मदत] ०खर्च-पु खर्ची मदत करण्याबद्दल दिलेला पैका 'आणि मुलाजमत जालिया मदतखर्चेंही उमदा देतील'।-रा ८ २१२ ०गार-नीस-वि १ उपकारकर्ता, मदत, आश्रय देणारा २ सहाय्यक, जोडीदार, दुय्यम (कारकून लेखक इ०) [फा मद्‌दगार] ०गारी-निशी-स्त्री सहाय्य करणें, मदत करणें 'नाईक यास गुसलपें तुम्ही मदतगारी करून '-रा २२ २३ [फा मदद्‌गारी] ०मादा-स्त्री निर्वाहासाठीं दिलेली मदत 'मदत माश म्हणजे निर्वाहाकरितां -वाड-सनदा ८३ [अर मआश्=जीवन] मदती-वि मदत करणारा, मदतगार 'मसलतीस मदती असणें'-रा १५ ३६३

मदत-द—स्त्री एक प्रकारचा ओढण्याचा पैकी पदार्थ (अफू विहयाची पानें इ० पासून केलेला) [स मद हि मद]

मदती—स्त्री (संगीत) अठराव्या श्रुतीचें नाव [स]

मदन—न कणसें एकदां झुडवून काढलेलें गोंडासहित धान्य, दाणे व भूस यांचें मिश्रण ह्याला पहिलें मदन असेंहि म्हणतात दुसऱ्यांदा झुडवून निघालेल्या धान्यास दुसरें किंवा आकणाचें मदन म्हणतात व तिसऱ्यांदा कणसें झुडवून निघालेल्या धान्यास तिसरें किंवा निकणाचें मदन म्हणतात परंतु कांहीं प्रांतांत वेगवेगळ्या झुडवणीवरून धान्याचे रास, आकण निकण, व मणी किंवा रास, कोरें, मातेरें, फजट किंवा वरळें असेहि प्रकार करतात. हे शब्द (त्याच्या अनुक्रमाप्रमाणें) पहा [स मर्दन, प्रा मद्दन] म्ह० पहिली रास, दुसरें आकण, तिसरें निकण, चौथा मणी त्यास वळता धणी

मदन—पु १ कामदेव २ काम, संभोगविषयींची इच्छा विषयविकार [स] (मुखावरून तोंडावरून, स्वरूपावरून) ०ओंवाळून टाकणें-ओंवाळणें-एखाद्या मनुष्याचें सौंदर्य मदनापेक्षाहि अधिक आहे असें दाखविण्यासाठीं योजितात ०कामेश्वर-पु एक कामोद्दीपक रासायनिक औषध ०तात-पु कृष्ण 'मदनतात मनमोहन मुरली वाजवी कुंजवनीं।' ०फळ-न गेळफळ ०बाण-पु १ मदनाचे बाण आयुधें हे पाच आहेत (अ) (फुलें) अरविंद अशोक चूत नवमल्लिका व नीलोत्पल (आ) (विकार) उन्मादन तापन, शोषण, स्तंभन व संमोहन 'बाधि मदन बाण घे प्राणदान दे दावि हरी वदना।'-देप ७४ २ एक फुलझाड; जाईची एक जात 'तिनें एक मदनबाणाचें पुष्प खोंविलें।'-चंद्र ५४१ ०मस्त-वि कामविकारानें बफाम, उन्मत्त झालेला ०मूर्ति-स्त्री १ कामदेव २ सुंदर सुस्वरूप मनुष्य, मदनाचा पुतळा मदनाचा पुतळा-पु अत्यंत सुंदर मनुष्य पाहीन ना आता वसला मदनाचा पुतळा दिला नवरा मिळतो तो।'-पत्रोपे मदनाची छडी-स्त्री अत्यंत सुंदर स्त्री 'तू कशी सुरेख मदनाची छडी आहेस'-मृ १ मदनांतक, मदनारी पु शिव, शंकर 'अशेषाही रक्षामाझारीं। शंकर जो मदनारी।'-ज्ञा १० २२५ [स मदन+अंतक, अरि]

मदनजर—न लक्ष्य, ध्यान 'याजकरितां मसल्हतीस मदनजर राखून '-पया ४६९ [फा मद्-द-नजर =कृपावलोकन, उत्तेजन]

मदनाई(य)क—पु माळेंतील मधला मणि, हिरा 'मदनाईक बदामी '-वाडमा १ १५९ [स मध्यनायक]

मदनी—स्त्री एक झाड गेळ मदनफल पहा

मंदर, मंदराचल—पु देवदानवांनीं ज्यानें समुद्रमंथन केलें तो पर्वत 'देखा मंदराचेनि अंगरगें। ठायीं ठायीं श्वापदांचीं दाटें।'-ज्ञा ११ २५७ [स]

मदलस—स्त्री (प्र) मजलस पहा मदलसी-स्त्री सभा -मव ६७

मदलस-सा—पु मांडव छत इ०चा मध्यभाग चांदणी 'हिरियाच्या मदलसा झळकती। -राधि ३६ ५९ निळयाच्या मदलसा जडित। वरी मुक्तांचे राजहंस खेळत।, -ह २ २१ [स मध्य+लग्=चिकटणें ? मसलंद पहा]

मदवा—स्त्री उंची रेशमी वस्त्र, (सामा) वस्त्र 'आतां अविद्येचिया गावीं। मोहाची मदनि मदवी।'-ज्ञा १८ ६६०

' मदवीयेची वरी चोळी। विरडे कादिलें मुक्ताफळीं। ' –कथा ४ ८४६ [?]

**मंदा**—स्त्री (संगीत) तिसऱ्या श्रुतीचें नाव

**मंदा**—पु घोड्याच्या लगामाचा प्रकार –अश्वप १ १८५

**मंदाकिनी**—स्त्री १ आकाशगंगा, आकाशातील चांदण्याचा शुभ्र पट्टा ' नील गगनावरी सुंदर। मंदाकिनीचोघ दिसे शुभ्र।' २ भागीरथी नदी [सं]

**मंदाक्रांता**—स्त्री एक वृत्त. याच्या चरणात सतरा अक्षरें व म, भ, न, त, त, ग, ग हे गण असतात उदा० ' हाहा देवी हृदय फुटतें देह माझा गळाला। वाटे शून्य त्रिभुवन मला, अंत रात्मा जळाला।' [सं]

**मदार**—स्त्रीपु १ उंटाच्या पाठीवर असणारा उंच भाग, वशिंड २ भिस्त, दृष्टि, लक्ष्य ' अक्षरावर मदार नाहीं अर्थावर आहे ' ३ मुसलमानांचें थडगें ' तुका म्हणे वावी। मोडूनि मदार बांधावी।' –तुगा ६२२ ४ मुख्य आधार केंद्र, सत्ता ' पादशाही मदार आपलें हातास आला असता ' –इम ९८ ५ आस, भार ' इब्राहीम आदीलशानें पादशाही कारभाराचा मदार महाराजाचे सिरीं टाकिला ' –इम ९७ ६ इतबार ' त्या फौजेंत अवघा मदार तुमचाच आहे ' –पया १८९ ७ ठराव ' तेव्हा मदार झाला कीं अक्षय तृतियेस निरोप द्यावा ' –ख ५ २५९३ [अर मदार्]

**मंदार**—पु १ पांढ-या रुईचें झाड मांदार २ एक कल्पवृक्ष ३ एक पुष्पवृक्ष [सं] ०माला–स्त्री एक वृत्त, अश्वधाटी याच्या चरणात तेवीस अक्षरें व त, त त, त, त त त ग हे आठ गण असतात उदा० ' वाचाळ मी नीट पाचारितों धीट याचा नयो वीट साचा हरी।' [सं]

**मदारुलमहाम**—पु १ राजसत्तेचा मुख्य केंद्र, आस २ मुख्य प्रधान, कारभारी ३ नाना फडणविसाचा किताब [अर मदारुल्महाम्म्]

**मदारी**—पु जादूगार, बहुरूपी, डोंबारी, गारुडी, नजरबंदीचे खेळ करणारा ज्याच्यावर सर्व खेळ अवलंबून आहे असा [मदार दि]

**मदालसा**—स्त्री मस्त स्त्री

**मदिर**—पु घोड्याच्या खुराचा खालील भाग –अश्वप १ ६४

**मंदि(दी)र**—न १ गृह, घर (समासात) राज–देव–हृदय–मंदिर २ देवालय, देऊळ (समासात) शिव–विष्णु–दत्त –मंदिर [सं]

**मदिरा**—स्त्री दारू, मद्य [सं]

**मदीय**—वि माझा [सं]

**मंदील**—पु न जरीची काडी, काठ असलेलें पागोटें, फेंग इ० [अर मिन्दील्]

**मंदोदरी**—स्त्री १ बेडकी २ रावणाच्या बायकोचें नाव [सं मंद+उदरी]

**मंदोरा**—पु (प्र) मणगुळी पहा

**मंदोसरी**—स्त्री (माण) पाडणीचें वरचें ढकू मंदोसरी पहा.

**मंदोसा**—पु दाराच्या दोन चौकटींना काटकोनात बांधणारा चौरस तुकडा

**मद्द**—पु (सराफी) (हिऱ्यांच्या खाणींतील) कठिण रेतीचा गठ्ठा

**मद्ड**—वि मठ्ठ, जड, मंदबुद्धि मदड पहा ' झुलु किंवा हॉटेन्टॉट लोकांसारखे बुद्धीनें ते खास मद्ड नाहींत ' –सास २ ३५१ [का मद्डु=मूर्खपणा]

**मद्य**—न मदिरा, दारू [सं] ०पा–पी–वि दारू पिणारा, दारुड्या, ' मद्यपाआंगींचें वस्त्र। का लेपाहातींचें शस्त्र।' –ज्ञा १३ ५३२ ०पान–न दारू पिणें ०पाननिषेध–पु दारू पिण्याबद्दल निषेध, दारू न पिण्याबद्दलची चळवळ ' सरकारनें द्रव्यशोषणाकडे नजर देऊन मद्यपाननिषेधाचे पाय तोडावे ' –के १ २५९ ०मंड–पु सातूच्या दारूवरील फेसाळ साय, सुरामंड, कारोत्तर ०सार–न (शाप) अल्कोहल

**मंद्र**—पु नाभिस्थानचा गंभीर नाद एक स्वर, ध्वनि [सं] ०नाद–पु (संगीत) हृदयातून निघणारा नाद ह्या नादाचा उपयोग जवळच्याशीं बोलताना करतात ०सप्तक–न (संगीत) मंद्रनादयुक्त सात स्वरांचा समुदाय ०स्वर–पु (संगीत) रागालाप सुरू असतां तो मंद्रसप्तकातील अमुक स्वरापर्यंत जावा अशी मर्यादा दाखविणारा त्या सप्तकातील स्वर

**मद्रा**—पु कापडाची एक जात, अल्वण –मुंव्या १२३

**मद्राशी–सी**—वि मद्रास प्रांतासंबधीं ०चप्पल–स्त्री चप्पल (वाहाणा)ची एक जात

**मध**—स्त्रीपु १ मधमाशा गोळा करतात तो गोड रस, दाट द्रव २ फुलातील रस, मकरंद ३ फणसातील गोड द्रव, गऱ्यातील पाणी गऱ्याची सालें वाळवून एकत्र रचून ठेविलीं असतां त्यातून जो द्रव निघतो तो [सं मधु] **मधाचें बोट लावून ठेवणें–लावणें–दाखविणें**–(ल) लालूच, आशा दाखविणें ०पिंपळी–स्त्री मध आणि पिंपळी याची एक औषधी कृती ०पुळी, मधरा–(प्र) मधुपुळी, मधुरा पहा ०पोळें–न, मधमाशा जेथें मध साठवितात तें घर ०माशी–स्त्री मध गोळा करणारी माशी ०शर्करा–स्त्री फळें, मध इ० गोड पदार्थांत सापडणारी साखर, फलशर्करा (इं) ग्ल्युकोज ०व(ो)–न मध आणि पाणी

याचे मिश्रण [मध+पाणी] ०घलें–न तांदुळाच्या पिठाचें गोड विरडें –गृशि ३५३ मधाळ–वि मधानें किंवा गोड रसानें युक्त (फणस, खजूर इ०) [मध+आळ प्रत्यय]

**मध**—वि मध्य याचा अप समासांत पूर्वपदीं योजितात ०कांडें–पेरें–न ऊसाचा मध्यभाग ०गर्भ–र्भी–पुस्त्री मधला भाग, आतील भाग, अंतर्भूत प्रदेश ०घडी–वि फार उंची नव्हे फार हलकाहि नव्हे असा दौलताबादी (कागद) उत्तम प्रतीच्या कागदाला बहादुरखानी असें म्हणत मदगडी पहा ०घर–न घराचें मधलें दालन, माजघर ०चा–वि मधला, मध्यभागचा, मध्यें असलेला [मध्य] **मधचेमधीं, मधच्यामध्यें**–क्रिवि मधच्यामधें पहा ०भाग–पु मधला भाग, (प्र) मध्यभाग पहा ०लंड–वि १ मध्यमप्रतीचा, अगदीं चांगलाहि नाहीं किंवा अगदीं वाईटहि नाहीं असा २ धड इकडे नाहीं किंवा तिकडे नाहीं असा, अधांत्रीं असलेला ०ला–वि मध्यावरचा; मधचा **मधल्यामधें**–क्रिवि १ उगीच, विनाकारण २ अधिकार नसतां लुडबूड करून मधच्यामध्यें पहा **मधल्या घांटेस येणें**–इष्ट वस्तु न मिळविता येणें ०लाटी–टी–स्त्री वलाटी व खालाटी यांच्या मधला प्रदेश, देश व कोंकण यांच्या मधला प्रदेश [मधला+टाय] **मधवा मधवेला, मधिवला**–वि सर्वांत वडील व सर्वांत लहान यांच्या मधला (भाऊ, बहीण) **मधास**–क्रिवि (अशिष्ट) मध्यें, मध्यमार्गी (व) मधात (खा) मधार, मझार **मधीं**–क्रिवि मध्यें, आत [मध्य] **मधील**–वि मधला, आंतला, मध्यावरचा **मधून**–क्रिवि १ मध्यापासून, आतून २ हूनें पहा **मधून विस्तव न जाणें**–क्रिवि दोघांमध्यें वैमनस्य असणें **मधें**–क्रिवि मध्यें पहा **मधामध**–क्रिवि मध्यमार्गी अगदीं मध्यावर

**मधु**—न १ मध मधुविषीं मधुमक्षिका। लोभिणी जैसी।' –ज्ञा १३.५०२ २ फुलांतील रस, पुष्परस ३ मोहाच्या फुलापासून काढलेली दारू (सामा) मद्य –पु १ चैत्र महिना २ वसंत ऋतु –वि (अक्षरश व ल) गोड, मधुर 'सावो हळु हळु मृदु मधु हित मित बोलोनि चित्त वळवावें।'–मोवन ४.३६ [स] ०कर–पु भ्रमर, भुंगा मधुकर वनवन फिरत करी गुंजारवाला।'[स] ०करी–स्त्री १ भ्रमरी 'मधुरसादोषें। मधुकरी जच जैसें।' –ज्ञा १३.७८६ २ शिजविलेल्या अन्नाची भिक्षा, माधुकरी पहा मधुकरी संन्याशासी। स्वधर्मासी अति विहित।' –एभा १८.२३१ –पु अशी भिक्षा मागणारा ब्राह्मण ०कुल्या–स्त्रीअव १ (शब्दश) मधाचे पाट २ (घृतकुल्या इ० शब्दाप्रमाणें उपयोग) पदार्थाची रेलचेल, जवळची रास [स] ०क्रिया–स्त्री मधुकरी पहा 'आता अमृता म्हणोनि मधुक्रिया। शुचिर्भूत सोंवळें होऊनियां। आणिज अन्न मेळऊनियां।'–स्वादि ५.५.१५ ०चंद्र–पु विवाह झाल्यानंतरचा पहिला महिना, आनंदमास (इ) हनीमून 'चालस्य आपल्या मधुचंद्राला' –सुदर्शन पृ ७१ ०प–पु १ भ्रमर, भुंगा 'मधुपास जसा पद्माप्रति आणि बळेंकरूनि तो वास।'–मोसभा १.५६ २ मद्यपी, दारुड्या [स] ०पर्क–पु १ (विवाहांत) नवरामुलगा वधूच्या घरीं आल्यावर कन्येचा पिता दहीं, मध इ० समर्पण करून त्याची वस्त्रादिकांनीं पूजा करतो तो विधि 'वर वरिष्ठ कृष्णदेवो। मनीं धरूनी हाचि भावो। मधुपर्क विधी पहावो। पूजा विधान करीतसे।'–एरुस्व ६.५ २ यजमानानें ऋत्विजाचें करावयाचें आदरातिथ्य ३ शिष्ट, साधु इ०चा आदरातिथ्यविधि [स] ०पुळी–स्त्री पाठीवर होणारी असाध्य पुळी, काळपुळी ०प्रमेह–पु मधुमेहाचा एक प्रकार [स] ०मक्षिका–माशी–स्त्री मधमाशी ०मक्षिकान्याय–व्रत–पु कोणत्याहि ठिकाणीं जेवढें चांगलें असेल तवढें घेणें, संकलन, संग्रह ०मादसारंग–पु (संगीत) एक राग ह्या रागांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल मध्यम, पंचम, कोमल निषाद, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति औडुव–औडुव वादी ऋषभ संवादी पंचम गानसमय मध्यान्ह ०माधवी–स्त्री (संगीत) एक राग-प्रकार, रागिणी ०मालती–स्त्री एक फुलझाड ०मेह–पु १ लघवींतून शरीरांतील साखर जाते असा मूत्ररोग २ अशी रोगदूषित लघवी [स] ०यष्टि–यष्टिका–स्त्री १ ऊस २ ज्येष्ठमध [स] ०रस–पु फुलांतील मध

**मधुर**—पु १ षड्रसांतील एक रस २ मद्य 'दैत्यासी मधुर। घालितसे।'–कालिका १२.१८ –वि गोड, मोहक रम्य, चित्ताकर्षक (शब्दश व ल) ०ता–स्त्री गोडी 'का वचनागाची जैसी। मधुरता पहिली।' –ज्ञा १८.७९६ ०वर्ण–पु कानाला गोड लागणारीं अक्षरें वर्णे उदा० ङ ञ ण न, म **मधुराई**–स्त्री गोडपणा, मधुरपणा (शब्दश व ल) **मधुराम्ल**–वि आंबटगोड (फळ इ०) [स मधुर+अम्ल] **मधुरिमा**–पुस्त्री माधुर्य, गोडी 'सृष्टीला दर्दिवरामुळें प्राप्त होणारी मोहक मधुरिमा विनोदानें येणें शक्य नाहीं'–साहित्यसेवकांस अनावृत पत्रें ६ **मधुरोष्ण** वि किंचित् उष्ण, कोंबट [मधुर+उष्ण]

**मधुरतीं**—क्रिवि (व) १ मध्यस्थी 'मोठे माठे लोक मधुरतीं पडले' २ (व) काकळुत अजीजी विनवणी करून

**मधुरा**—पु ज्यांत गळ्याच्या आसपास बारीक पुळ्या येतात असा ताप या तापांत वायु झाला असतां त्यास वेडामधुरा म्हणतात

**मधुवा**—स्त्री (महानु) मधमाशी, मोहोळमाशी 'सींधु पतगु मधुकरू। गजु मधुवा कृष्णमारू।' –भाए २६७

**मध्य**—पु १ मधला भाग, केंद्र २ कबर, कटिप्रदेश 'पहावया कृश मध्यरचना। स्त्रीचीं लेवें आइली जाणा।' –एरुस्व १.३३ ३ गर्भ, गाभा –वि १ मध्यभागचा, मधला, २ मध्यम,

[सं.] ०कटिबंध-पु. समशीतोष्ण कटिबंध. ०केंद्र-(ज्यो.) दीर्घवर्तुळातील दोन विशिष्ट बिंदूंपैकीं प्रत्येक. (इं.) फोकस. ०गृह-न. घराचा मधला भाग; माजघर. ०त्वचा-स्त्री. शरीरावरील बाह्यत्वचेच्या खालची त्वचा. ०दंती-वि. चार दांत उगवले आहेत असा (घोडा). -मसाप २.५४. ०देश-पु. १ कोंकण व देश याच्यामधील कोल्हापूर, पुणें, नाशीक इ० प्रदेश; गोदावरी व कृष्णा आणि सह्याद्रि व बालाघाट याच्यामधील प्रदेश. ३ डांग किंवा मावळ आणि देश याच्या मधील प्रदेश. ४ कोणत्याहि देशाचा मधला प्रदेश. ५ हिंदुस्थानचा कुरुक्षेत्र, प्रयाग, हिमालय आणि विंध्य याच्या मधला प्रदेश. ६ क्रांतिवृत्त आणि उष्णकटिबंध याच्या मधला प्रदेश. ०नाडी-स्त्री. (फलज्यो.) नक्षत्राच्या तीन वर्गापैकीं दुसरा; नाडी पहा. ०नाद-पु. (संगीत) कंठातून निघणारा नाद. साहजिक बोलण्यात ह्याचा उपयोग करतात. मंद्रनादाच्या दुप्पट मध्यनाद असतो. ०पटल-न. १ छाती व पोट यामधील पडदा. २ यंत्राच्या आतील आवरण. (इं) डायाफ्राम. ०पद-न. (गणित) त्रैराशिकातील मधली रक्कम. ०पदें-नअव. मध्यमपदें. (इं.) मीन्स. ०परिमाण-न. मधलें मान; अणु व अनंतत्व यांमधील परिमाण. -वि. असल्या परिमाणाचा (प्रत्येक जड पदार्थ). ०पाती-वि. मध्येंच पाडणारें, सोडणारें. 'माझा भक्तिमार्ग केवळ। ज्ञान तें विकळ मध्यपाती।' -एभा ११.१५२९. ०प्रमाण-न. (गणित) मध्यम-मध्यपद. (इं.) मीन. ०बिंदु-पु. (गणित) वर्तुळांतील ज्या बिंदूपासुन परिघापर्यंत काढलेल्या सर्व सरळ रेषा समान असतात तो बिंदु; वर्तुलमध्य. ०भाग-पु मधला भाग; मध्य. ०मिश्रगणित-न मध्यप्रमाणदर्शक मिश्रगणित; एका जातीच्या अनेक पदार्थांच्या मिश्रणाचा दर काढण्याचें गणित, सरासरी. याच्या उलट व्युत्क्रममिश्रगणित मिश्रगणित पहा. ०रात्र-पुस्त्री. रात्रीचा मध्य; भररात्रीचा समय. ०रेषा-स्त्री. (ज्यो.) विषुववृत्त (पृथ्वी किंवा इतर खगोलाचें) हें वृत्त ध्रुवापासून सारख्या अंतरावर असतें. ०लग्न-न. (ज्यो.) आकाशांतील डोक्यावरचा बिंदु; खस्वस्तिक. ०लंड-वि. मधलंड पहा ०लय-पु. (संगीत) तालामधील, द्रुतलयीच्या दुप्पटीचा काल ०लोक-पु. स्वर्ग आणि पाताळ याच्यामधील लोक; मृत्युलोक; पृथ्वी. ०वर्ती-वि. १ मधोमध असणारा; मधला. २ मध्यस्थ; दोघामधील व्यवहार ज्याच्या विद्यमानें होतो तो. ३ मध्यस्थीचा; मध्यस्थविषयक. ४ मुख्य; सर्वश्रेष्ठ, सार्वभौम. (इं.) सेंट्रल, 'गंगाजळी (रिझर्व) बँक ही एक मध्यवर्ती बँकच होय.' -के २५ २ ३६. ०वर्तीसरकार-न. मुख्य, सार्वभौम सरकार. उदा० हिंदुस्थान सरकार. प्रांतिक सरकार याचें मांडलिक असतें. ०व्रती -व्रता, मध्याव्रती-वि. (अर्थ) मध्यवर्ती अर्थ २ पहा. ०सप्तक-न. (संगीत) मध्यनादयुक्त सात स्वराचा समुदाय. ०स्थ-वि. १ मध्यभागीं असणारा; मध्यवर्ती. 'तो मध्यस्थु गा गिरिवरां। मेरु जैसा।' -ज्ञा १५.१०२. २ तिन्हाईतपणानें निर्णय करणारा; पंचाचें काम करणारा; लवाद. ०स्थकी-स्थगिरी, मध्य(ध्या)व्रती, मध्यस्थी-स्त्री. १ मध्यस्थाचें काम; तिन्हाईतपणानें निर्णय करणें; पंचाईती; तिन्हाइती. मध्यंतरीं-क्रिवि. १ मधल्या काळात, अवकाशात; २ मधल्या स्थलीं. ३ मधल्या प्रतींत. मध्यंदिन-पु. यजुर्वेदाच्या वाजसनेयी शाखेचा ब्राह्मण.(प्र.) माध्यंदिन. मध्यांक-पु. त्रैराशिकांतील दुसरें किंवा मधलें पद. [मध्य+अंक] मध्याकर्षप्रेरणा-स्त्री. पदार्थास एका बिंदूभोंवतीं फिरविणारी प्रेरणा. -यंमू २१९. (इं.) सेंट्रिपीटल. मध्यांगस्नान-न. मोठ्याशा पातेल्यात किंवा लोखंडाच्या पिपात नाभीपासून गुडघ्यापर्यंत अंगाचा भाग पाण्यात बुडवून बाकीचा भाग कोरडा ठेवून केलेलें स्नान. -आगर ३.७. [मध्य+अंग+स्नान] मध्यान्ह-पु न. १ दिवसाचा मध्य; दुपार. 'तारुण्याचा मध्यान्हीं। न चलेचि विवेक वाहाणी।' -कृ १. मध्यान्हरेखा-स्त्री. याम्योत्तर वृत्त. मध्यान्ह-काल-समय-पु. १ दुपारची वेळ; दोनप्रहराचा काळ. २ (ल.) जेवण (दुपारचें) ३ निर्वाह; उपजीविका. म्ह० अंतकाळापेक्षा मध्यान्हकाळ कठीण. मध्यान्ह काळाचें कठीण-पोटास मिळावयाचें कठीण; अत्यंत गरिबीची स्थिति. ०रात्र, मध्यानरात-त्र-स्त्री. रात्रीचा बारा वाजण्याचा समय; ऐनरात्र. मध्यान्हाचें-न. दुपारचें जेवण. (क्रि० करणें; गांठणें; उरकणें). मध्यान्ही-स्त्री. एक फुलझाड आणि त्याचें फूल. मध्योत्सारिणी-वि. पदार्थास मध्यापासुन दूर नेणारी; केंद्रत्यागी (प्रेरणा); (इं.) सेंट्रिफ्यूगल.

मध्यम—पु १ (संगीत) सात स्वरांपैकीं चौथ्या स्वराचें नाव; म. स्वरसप्तक पहा. २ रजोगुण. 'तेव्हां गुणचि गुणातें आटी। तमातें घोटी मध्यमू।' -एभा १०.३५०. -वि. १ मधला. २ साधारण; सामान्य; मधल्या प्रतीचा. [सं.] ०ग्राम-पु. (संगीत) सप्त स्वरातील तीन अवधीपैकीं एक अवधि. ह्यांतील सहा स्वर षड्जग्रामाप्रमाणें असत परंतु पंचम स्वराचा ध्वनि षड्जग्रामांतील पंचमस्वराच्या ध्वनीपेक्षा एक श्रुतीनें कमी असे. हा ग्राम प्रचारात असता (१५ व्या शतकापर्यंत) पंचमस्वर अचल नव्हता. पंचमस्वर अचल झाला तेव्हां मध्यमग्राम प्रचारातून गेला. ०पदलोपी समास-पु दोन शब्दाच्या मधल्या पदाचा ज्यांत लोप होतो असा समास. जसें-साकरभात, लाकुडकाम. ०वयस्क-वि. मध्यम वयाचा (सुमारें चाळिशीचा) मध्यमा-स्त्री. १ मधलें बोट. २ नुकतीच वयात आलेली मुलगी. ३ परा, पश्यंती मध्यमा व वैखरी हे जे वाणीचे चार भेद त्यातील (कंठस्थान-स्थित मननात्मक) तिसरा भेद. 'जया बुद्धिया उद्देशासाठीं।

पश्यती मध्यमा पोटीं । ' –ज्ञा १६ २० ४ सुषुम्ना नाडी 'हृदयकमळीं कला यारा । मध्यमाद्वारा चालिले । ' –एभा १२ ६ ५ एक छद याचे चार चरण असुन प्रत्येक चरणात तीन अक्षरें असतात [ स ] ०वती–स्त्री ( सगीत ) एका तालाचें नाव यात नऊ मात्रा व चार विभाग असतात

**मध्यें**—क्रिवि १ मध्यभागीं २ आत, गर्भात ३ मध्यतरीं, मधल्या वेळात ' मी नसता मध्येंच मामलेदार त्यानीं केले ' ४ ठायीं, अगीं, मधें [ मध्य ] ०तोंड घालणें–चाललेल्या सभा षणात ज्याचा सबध नाहीं अशा माणसानें मध्येंच बोलू लागणें ०मध्यें–क्रिवि मधून मधून, मध्यतरीं, काहीं वेळानें

**मध्रा**—पु ( प्र ) मधुरा पहा

**मध्रा**—स्त्री अव (एव मवर–रूढ नाहीं) भाजलेल्या जागे वर तुवडी लाविल्यानें तेथें उत्पन्न होतात ते फोड [ मधुरा ]

**मध्व**—पु १ द्वैतमताचा प्रस्थापक आचार्य २ यानें काढलेला वैष्णवातील एक सप्रदाय, त्यातील व्यक्ति ०गुळ–न ( गो ) पाढऱ्या रगाचें बाटोळे वागें ( ही पवित्र वांग्याची जात मध्वा चार्यांनीं उत्पन्न केली अशी समजूत आहे ) –गोमातकाचा इति हास ९ ०मत–न १ मध्वाचार्यांनी पुरस्कारिलेलें मत २ हें मत मानणारा पथ, मध्वसप्रदाय

**मन**—न १ चित्त, चित्तशक्ति, बुद्धि, विचार, तर्क, स्मृति इ० चें अधिष्ठान अत करणचतुष्टय आणि अत करण पचक पहा २ अत करण हृदय, भाव, रस, विकार इ० चें अधिष्ठान, सुखदु खादिकाचें ज्ञान करून देणारें इंद्रिय ३ सदसद्विवेकबुद्धि, बरें वाईट समजण्याची शक्ति अतर्याम ' ज्याचें मन त्यास ग्वाही देतें ' ४ जाणीव आत्मबोध, भान, सावधपणा, शुद्धि ५ सकल्पवि कल्पात्मक अत करणवृत्ति इच्छा, निश्चयशक्ति ' सकल्प विकल्प तेंचि मन । ' –दा १७ ८ ६ ६ आवड अत करणाची ओढ, प्रवृत्ति, खुषी, मर्जी ७ माया ८ प्रेम लक्ष [ स ] तुजवरिमन ईचें यापरी का इयला । ' –र४२ ९ ध्यान म्ह० १ मनीं वसे तें स्वप्नीं दिसे २ मन राजा मन प्रजा ३ मनात एक, जनात एक ४ मनांत मांडे, पदरात धोंडे ५ मनीं नाहीं भाव, देवा मला पाव ६ मनीं वसे तें स्वप्नीं दिसे ७ मान जना, अपमान मना ८ मन जाणे पापा माय जाणे मुलाचे बापा ९ मनास मानेल तो सौदा ( वाप्र ) ०उठणें–उडणें–आवडेनासा होणें, कटाळा तिटकारा, वीट येणें. ' ह्या सवलादी अगरल्यावरून अलीकडे माझें मन उडालें आहे ' ०कापणें–दुःख होणें भीति वाटणें ' व्यूटोरस्कादिक नव मेले मन कांपतें वधायाला । ' –मोभीष्म ९ ६२ ०खचणें–कचरणें–हिंमत सुटणें, हातपाय गळाठणें ०खाणें–आपण केलेल्या वाईट कृत्यावद्दल स्वत शाच वाईट वाटणें, टोंचणी लागणें, पश्चात्ताप होणें ०गडबडणें–भीतीनें भरणें, गागरणें, घाबरणें. 'गडबडतें मन वेडें, माणुस मीं मीं म्हणोनि वडबडतें । ' –मोशल्य ४ ४९ ०घालणें–देणें–लावणें–मन एकाग्र करणें, लक्ष लावणें ०जाणें–इच्छा होणें ०तुटणें–मनात कटाळा, अप्रीति उत्पन्न होणें, मन पराङ्मुख होणें म्ह० तुटलें मन आणि फुटलें मोतीं साधत नाहीं ०थोडक्यासाठीं निसरडें करणें–क्षुल्लक फायद्या साठीं निश्चयापासुन पराङ्मुख होणें ०दुग्ध्यांत पडणें–संशयात पडणें, गोंधळणें 'आता माझें मन दुग्ध्यात पडलें ' –याळ २ १९५ ०धरणें–१ एखाद्याच्या मनाप्रमाणें वागणें २ हांजी हांजी करणें ' आदर देखोनि मन धरी । कीर्तीविण स्तुती करी । ' –दा २ १० २५ ०पाहणें–मनाची परीक्षा करणें, (एखाद्याच्या) मनाचा कल अजमावणें, एखद्याचे विचार त्याचें भाषण, वागणूक इ० वरून ठरविणें ०बसणें–लागणें–(काहीं गोष्ट करावयास ) अनु कूल होणें, अतिशय आवडणें, आसक्त होणें, प्रिय वाटू लागणें ' नको कचा मज टाकुनि जाऊ, तुजवरि मन हें बसलें रे । ' ०मनाविणें–मन वळविणें, मर्जी सपादणें, अनुकूल करून घेणें ०मानेल तसें करणें–इच्छेस येईल तसें करणें, स्वैर वर्तन करणें, स्वच्छदानें वागणें ०मारणें–इच्छा मारणें, इच्छा दाबून टाकणें ०मिळणें–उभयताच्या आवडीनिवडी सारख्या असणें ' स्त्री पुरुषाचीं मनें मिळालीं नाहींत तर त्यांचा ससार सुखावह होऊ शकत नाहीं ' ०मुंडणें–इच्छा नाहींशी करणें ' आधीं मन मुंडा व्यर्थ मुंडिता मुंडा । '–मृ ६५ ०मोठें करणें–उदारपणा दाखविणें, थोरपणानें वागणें ०मोडणें–एखाद्याची आशा विफल करणें, एखाद्याच्या इच्छेविरुद्ध वागणें, दु ख देणें ' जयाचेनि शब्दें मन मोडे । तो एक पढतमूर्ख । ' –दा २ १० ६ ०विटणें–कटाळा, वीट येणें ' बहुवीरक्षय घडला, तेणें बहुजीवितासि मन विटलें । ' –मोभीष्म ११ ७४ मनात आणणें–सकल्प, निश्चय करणें, मना वर घेणें मनात(मनीं)कढविणें–मनातल्या मनात रागानें चूर करणें जळफळावयास लावणें ' निजतजें भानुला मनीं कढवी । ' –मोविराट ३ १२० मनात(मनीं)कालवणें–अत करणात अति शय कष्टी होणें, अतिशय दु ख होणें 'बहुत दु ख मनीं जरि कालव । भिउनि त्यास तयास न बोलवे । ' मनात गाठ ठेवणें–मनात वैरभाव, द्वेषबुद्धि, सूड घेण्याची इच्छा जागृत ठेवणें, अढी, धरणें मनात गाठ बांधणें–घालणें–नीट ध्यानात धरून ठेवणें, मनात गोष्ट पक्की ठेवणें मनात चरचरणें–मनास काळजी, भीति वाटणें, दु ख होणें मनात ठेवणें–एखादी गोष्ट गुप्त राखणें, वाच्यता न करणें मनात नवेमण जळणें–मनातल्या मनात सतापणें, मनात द्वेष, सूड घेण्याची इच्छा जागृत ठेवणें मनांत भरणें–पसत पडणें, आवडणें मनात(मनीं)मांडे खाणें–व्यर्थ मनोरथ करणें, मनोराज्य करणें मनात(मनीं) म्हणणें–स्वगत बोलणें, स्वतशीं पुटपुटणें. मनांतल्या मनात

जळणें–आतल्या आत जळफळणें,रागानें धुमसत राहणें. **मनांतून उतरणें**–आवडेनासा होणें, कंटाळा, वीट येणें **मनानें करणें**–(कोणाची सल्ला न घेता) स्वतःच्या विचारानें करणें **मनानें घेणें**–मनाचा ग्रह होणें, मत बनणें **मनाला द्रव येणें**–मनात दया, प्रेम इ० कोमल भावना उत्पन्न होणें **मनाला लावून घेणें**–अतिशय दुःख वाटणें 'कल्पनेला सुचतील त्या गोष्टी मनाला लावून घेत बसल म्हणजे सांगितलं अस पुढां अर्शी लागा यचं नाहीं'–एक ४१ **मनावर घेणें-धरणें**–एखादी गोष्ट पत्करणें, तीन मन घालणें, सिद्धीस नेण्यास झटणें 'झटता तुझा सखा तरि होतें हित, परि न हा मनावरि घे।'–मोभीष्म ३.३. **मनावर लिहून ठेवणें**–कायमची आठवण ठेवणें, स्मृति पटलावर कोरून ठेवणें **मनास(मनां)आणणें**–१ लक्ष देणें, मानून घेणें 'आम्ही वडें वगडें गातों मनाशीं आणा।'–ऐपो १४२ २ समजून घेणें 'म्हणे पैल ते कोण लल्ना। का तप करिते आर्णी मना।'–ह २६.२९ ३ मनावर घेणें, महत्त्वाचें मानणें, 'मी रागाच्या वेळीं बोललों तें मनास आणू नका' **मनास येणें-वाटणें**–आवडणें, पसत पडणें 'वाळूबाई! पाहिलीस का भावजय? येते का मनास?'–पतोंधे **मनीं ठेवणें**–गुप्त ठेवणें 'चाल पुरा, हें मनींच ठेवून। –मोविराट ६.५२ **मनीं जाण होणें**–ओळखणें,जाणणें **मनीं धरणें-वागविणें**–लक्ष्यात असु दणें 'ह्यालागीं तुम्हांशीं बोधिलें। मनीं धराल म्हणोनिया।' **मनींमानसीं-मनोमानसीं-मनोमनीं नसणें**–(एखादी गोष्ट)अगदीं मनात देखील आलेली नसणें, स्वप्नींहि नसणें **मनो मन(य)साक्ष**–१ मन मनाची साक्ष देतें ज्याना परस्पराविषयीं तिटकारा किंवा प्रेम वाटतें अशा मनुष्यास उद्देशून योजतात, एखाद्या गोष्टीबद्दल एकमेकाचे विचार एकमेकाना अंतर्मनानें कळतात या अर्थी २ मन स्वतः साक्षी आहे, स्वतःच्या मनातील अभिप्राय, उद्देश, भाव इच्छा इ० स्वतःस माहीत असतात साधित शब्द– **मनाचा**–वि मनासबधीं, अतःकरणाचा **मनाची आशा-ओढ-धांव**–स्त्री मनाचा कल, रोख सामाशब्द– **०उथळा**–वि मोकळ्या मनाचा, साधा, छक्केपजे न जाणणारा **०ओळख**–स्त्री एखाद्याच्या मनाची परीक्षा, स्वभावाविषयीं बनविलेलें मत 'कोणाशीं वाईट बोलु नये का? तर मनओळख होते' **०कपटी**–वि दुष्ट अतःकरणाचा, लबाड **मन.कल्पित**–वि कल्पनेनें, तर्कानें केलेलें, काल्पनिक **मनकवडा**–पु दुसऱ्याचें मन वेधून घेण्याची शक्ति 'मन माझें मोहिलेंस नवळे आहे तुझ्यापाशीं मन कवडा।'–प्रला १६१ –वि दुसऱ्याच्या मनातील विचार ओळख णारा **०कामना**–स्त्री अतःकरणातील इच्छा [मन+कामना] **०कुजका**–वि हलक्या मनाचा, दुष्ट, विश्वासघातकी **मन कृत**–वि मनानें केलेलें, मानसिक **०कोवळा**–वि प्रेमळ, शुद्ध अतःकरणाचा **मनखोडी**–स्त्री मनोविकार 'देवनाथ तुज हात जोडि मनखोडी सकळ सांडी।'–देप ६३ **मनच्या मनीं**–क्रिवि मनातल्या मनात, आपलें म्हणणें काय आहे हें न सागता **०गाहून**–क्रिवि मन लावून, अंतःकरणपूर्वक, एकाग्रतेनें **०देवता**–स्त्री अंतःकरणातील देवता १ मन, अतःकरणातील तर्क, आशा इ०ची प्रेरक शक्ति (क्रि० रुचणें, वाहणें) 'सदा सस्ताई होईल की महागाई? तुमची मनदेवता काय रुचते?' २ सदसद्विवेकबुद्धि, न्यायबुद्धि **०धरणी**–स्त्री मर्जी सपादन करणें, आर्जव, खुशामत (क्रि० करणें) **०धरणीचा**–वि दुसऱ्याचीं आर्जवें, खुशामत करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा, मर्जी सपादणारा **०पाखुळका, मनाची पाकुळका, मन पिंगळा-ळी**–स्त्री वन्यापाईट गोष्टी करण्याची प्रेरणा करणारी मनातील देवता, मनोदेवता **मन पीडा**–स्त्री मानसिक त्रास, दुःख, काळजी इ० **मन पूत**–क्रिवि (मनाला जें पवित्र, शुद्ध वाटतें त्याप्रमाणें) मनास येईल तसें, वाटल तसें 'कोणी वाटेल तें भलभलतें करू लागला म्हणजे तो मन पूत वागतो असें आपण म्हणतों'–गीर १२५ म्ह० मन पूत समाचरेत्। **मन पूर्वक**–क्रिवि १ मनापासून २ जाणून बुजून, मुद्दाम **मन.प्रिय**–वि मनाला आनद देणारें, समाधानकारक **मनभाव**–पु उत्सुकता, श्रद्धा, भक्ति, मनोभाव 'मनभाव असल्यावाचून कार्य सिद्धीस जात नाहीं' [सं मनोभाव] **०भूक**–स्त्री काल्पनिक, खोटी भूक, नेहमीच्या सरावामुळें वाटणारी भूक **०भोळा**–वि साधा, गरीब, निष्कपटी **०मन**–स्त्री (व) मनधरणी, खुशामत, आर्जव **०मानेसें**–क्रिवि मनास वाटेल तसें, मन पूत 'वर्तति मनमानेसें सुरतप्रदा अपतिका स्त्रिया वटवी।'–मोसभा ६.२० **०मान्य**–वि स्वेच्छाचारी, स्वच्छदी, बेताल **०मिळाऊ**–वि सर्वांशीं मिळून मिसळून राहणारा, गोड स्वभावाचा **०मुक्त**–क्रिवि यथेच्छ, अमर्यादपणें, मनमुराद, मनाची इच्छा पूर्ण होईपर्यंत **०मुराद**–वि १ मनोहर, आल्हादकारक आनंददायक २ विपुल, यथेच्छ मनसोक्त, मनाची तृप्ति होईल इतकें (जेवणातील पक्वान्न) [अर मुराद=ईप्सित] **०मेळ**–वि १ आवडतें, प्रिय, मनोहर २ शास्त्र इ० चा फारसा विचार न करता दोन्ही पक्षाच्या समतीनें झालेलें (लग्न) **०मोकळा**–वि खुल्या दिलाचा, सरळ, निष्कपट **०मोकळें करून**–क्रिवि खुल्या अंतःकरणानें सकोच, भीति, लाज इ० सोडून **०मोठा**–वि १ उदार अतःकरणाचा २ उदार, सढळ, मोकळ्या हाताचा **०मोड**–स्त्री हिरमोड, निराशा 'नको करू मनमोड।'–पला २२४ **०मोहतिर**–न मनाचा, मनानें ठरविलेला मुहूर्त **०मोहन**–वि मनाला खुष करणारा, रमणीय, आवडता, प्रिय 'मनमोहन यादवराणा। कोणी जाउनि आणा।' **०मौज**–स्त्री १ गमतीचा विचार, कल्पना २ लहर, नाद, छद

०मौजा-करणें-स्वत ०या (रंगेल, अनिर्बंध) इच्छा तृप्त करणें. ०मौजी-उया-वि १ लहरी, छांदिष्ट, चचलबुद्धि २ मिजासखोर, दिमाखी ०लज्जा-स्त्री स्वाभाविक, नैसर्गिक लाज, मनोदेवतेची टोंचणी, भीति शरम, शिष्टाचार, संभावितपणा 'तुला मनलज्जा नाहीं जनलज्जा तर धर' ०वळख-स्त्री मनओळख पहा मनश्शांति स्त्री मनाची शांतता मन संतोष-पु मनाचें समाधान, मनास होणारा आनंद मनसमजावणी-समजावशी-स्त्री रागावलेल्या, दु खी, सचिंत माणसाचें सांत्वन, समाधान करणें ०समजूत-स्त्री ग्रह मत, समज, भावना 'सर्व मनुष्यांची मनसमजूत एकसारखी असत नाहीं' ०समर्पण-न (काव्य) मन अर्पण करणें मनसाराम-पु (विनोदानें) मन. 'मनसारामाचे स्वाधीन सर्व इंद्रियें आहेत' ०सुटका-स्त्री मन एखाद्या गोष्टीपासून परावृत्त होणें ०सूत्र-न इच्छानुरूप सत्ता चालविणारें, वागणारें, मन ०सोक-क्रिवि यथेच्छ, स्वैर, स्वच्छंद मन पूत पहा 'पशुपक्षी यांचा मनसोक्त व्यवहार आहे' ०सोद्दिष्ट-वि मनात योजिलेलें ठरविलेलें, निश्चित केलेलें मनस्तप्त-वि १ दु खदायक २ अनुतापी, दु खपीडित मनस्ताप-पु (मनाला होणारा त्रास) दु ख शोक, पश्चात्ताप, हुरहुर, खिन्नता इ० मन(न)स्थिति-स्त्री १ मनाची स्थिति, मानसिक अवस्था, भावना २ मन 'माझी मनस्थिति चंचल आहे' ०हल्का-वि दुर्बल, क्षुद्र मनाचा मनाकलित-वि मनानें आकलन केलेलें मनाजीपंत-पु (विनोदानें) मन मनाजोगा-वि जसा हवा तसा, मनासारखा मनापासून-क्रिवि खरोखरी, बेंबीच्या देठापासून, अतिशय पार मनापून-क्रिवि खरोखरी मनायोग-ग्य-वि क्रिवि (अप) मनोयोग्य पहा मनास येईल तसें-क्रिवि स्वेच्छेनें, मर्जीप्रमाणें मनासारखा-वि इच्छेसारखा, आवडीचा जसा पाहिजे तसा मनुवाई-स्त्री मन मनेच्छ च्छा-क्रिवि मनसोक्त, यथेच्छ, मनाचें समाधान होईपर्यंत नदी पुलिनी गंगातिरीं। क्रीडा करिती मनेच्छा।' [मन+इच्छा] मनेच्छा-स्त्री मनाची इच्छा, प्रवृत्ति कल मनेप्सित-न मनोवांछा मनाची इच्छा -वि मनानें इच्छिलेलें, मनोवांछित [मन+ईप्सित] मनोगत-न मनीषा, हेतु उद्देश, विचार, इच्छा श्रीकृष्णवाणीतें वाद्विती। जाणे श्रीपती मनोगत।'-एहस्व १५ १३८ -वि मनात असलेलें ठरविलेलें 'कुंभाराचा मनोगत जो आकार असतो तो घटावर उत्पन्न होत असतो' मनोगति-स्त्री १ मनाची वृत्ति, क्रिया, विचार २ मनाचा, विचाराचा प्रवाह, पोंच मनाची धांव, आकलन ३ इच्छेचा कल प्रवृत्ति 'हा आपल्या मनोगतीनें चालतो-वागतो-करतो' -वि मनाप्रमाणें वागणारा, चालणारा, विचाराप्रमाणें चचल -क्रिवि मनाच्या गतीप्रमाणें अतिशय कल्पनातीत वेगानें 'आला गेला मनोगती।'-मारुतिस्तोत्र मनोगम्य-वि मनाला जाणता येण्यासारखें, मनानें आकलन होण्यासारखें मनोज-पु मदन, काम 'मनोज मध्यस्थवरू निघाला।' -सारुह २ ६० मनोजय-पु मनाचा जय, आत्मनिग्रह, मनोनिग्रह 'तैसा मनोजयें प्रचारु। बुद्धींद्रियांचा।'-ज्ञा १६ १८४ मनोजव-वि मनाच्या गतीनें जाणारा फार त्वरेनें जाणारा मनोत्साह-पु मानसिक उत्साह, आनंद आवड 'ज्याचा जसा मनोत्साह तसें तो करितो' मनोदय-पु १ हेतु, विचार, आशय २ इच्छा, कल, प्रवृत्ति मनोद्देश-पु मनातील योजना, हेतु, बेत, विचार मनोधर्म-पु १ (प्रेम, द्वेष, काम, क्रोध, मत्सर इ०) अत करणाची भावना, विकार 'न निघे मनोधर्मीं। अरोचक।'-ज्ञा १८ ६५७ २ मनाची शक्ति (विचार कल्पना, सदसद्विवेकबुद्धि इ०) ३ (सामा) चित्तवृत्ति, मनोगुण 'आहार मिळाल्या उत्तम। हरिखेजेना मनोधर्म।'-एभा १८ २३६ ४ मनाची चंचलता 'तव आतु त्राय मोडे। मनोधर्माची।'-ज्ञा ६ २११ ५ हेतु बेत, विचार -वि मनोगतीप्रमाणें वागणारा 'सहचर मनोधर्मु। देवाचा जो।'-ज्ञा १७ ३३ मनोधारण-णा-नस्त्री मन राखणें, मनधरणी मनोनिग्रह-पु मनाला ताब्यात ठेवणें, मनोजय, संयमन मनोनीत-वि मनानें पसंत केलेलें, स्वीकारिलेलें मनोनुकूल-वि एखाद्याच्या मनाप्रमाणें, मनाला पसंत पडण्यासारखें मनोनुभूत-वि मनानें अनुभविलेलें, सहन केलेलें, उपभोगिलेलें मनोभंग-पु इच्छा बेत, आशा इ० फलद्रूप न होणें, निराशा मनोभव-पु १ मदन, काम २ कामेच्छा, विषयेच्छा मनोभाव-पु १ हेतु विचार २ भक्ति, श्रद्धा ३ प्रीति मनोभावें, मनोभावें करून, मनोभावापासून, मनोभावानें-क्रिवि अंत करणपूर्वक मनापासून श्रद्धेनें 'मनोभावें ईश्वराची सेवा करावी' मनोभिराम वि मनाला तुष्ट करणारा, आनंदप्रदायक, मोहक, चित्ताकर्षक 'तेव्हां तरी तारकशक्ति राम। देईल आम्हांसि मनोभिराम।' मनोमय-वि मन कल्पित, काल्पनिक अत करणांतील, मानसिक मनोमय कोश-पु चैतन्याच्या पाच (अन्न-प्राण-मन-विज्ञान-आनंद) कोशापैकीं तिसरा पचकोश पहा मनोमयसत्यवाद-पु एकाच वस्तुविषयीं निरनिराळ्या लोकांच्या मनांत सारख्याच कल्पना असतात असें मत, सादृश्यवाद (इ) कन्सेप्च्युअलिझम् -नीति ४०६ मनोयाग-पु मन लागणें, लक्ष्य अवधान मनोयोग्य-वि मनपसत, समाधानकारक, संतोषकारक मनोरंजक-वि मनाला रमविणारें, करमणूक करणारें, चित्ताकर्षक मनोरंजन-न १ करमणूक, गमत, मौज २ मनास वाटणारा आनंद, उल्हास मनोरथ-पु इच्छा, बेत हेतु, उद्देश, योजना 'होईलिया वैकुंठनायक। मनोरथ पूर्ण करील।'-व्य ५ मनोरथ-सृष्टि-

स्त्री मनोराज्य, काल्पनिक सृष्टि **मनोरम**–वि १ मनाला रम विणारें, मोहक २ आनंददायक, संतोषकारक, **मनोरमा**–स्त्री १ सुंदर स्त्री २ (सकेतानें) बायको, पत्नी **मनोराज्य**–न भावी उत्कर्षाविषयींचे कल्पनातरंग, हवेंतील मनोरे **मनोविकार, मनोविकृति**–पुस्त्री मनांत उद्भवणारे कामक्रोधादि विकार प्रत्येकीं, भावना, मनोवृत्ति **मनोवृत्ति**–स्त्री १ मनाची स्थिति चित्तवृत्ति स्वभाव २ मनाचा व्यापार, विचार, भावना, विकार इ० 'ह्या मनोवृत्ति देवपरायण झाल्या ' **मनोवेग**–पु मनाची गति, अत्यंत जलद गति मनोगति पहा 'मनोवेगें तात्काळीं। पातले विश्वेश्वराजवळी।'–गुच ४१ १५७ **मनोवेद्य**–वि मनानें, अंतःकरणानें जाणता येण्याजोगें **मनोव्यापार**–पु मानसिक संकल्पादि व्यवहार, विकार, विचार इ० **मनोहत**–वि निराश, हताश **मनोहर**–पु खंडोबाचा प्रसाद (नैवेद्य) –टीप्र ७५२. –वि मोहक, आल्हादकारक, रमणीय, सुंदर **मनोहारी, मनोज्ञ**–वि चित्ताकर्षक, रमणीय, सुंदर मोहक **मनौनि**–क्रिवि मनापासुन, मनातून 'तैसें मनौनि धनवरी। विश्रमानें आल्या अवसरी।'–ज्ञा १६ ८७ **मनोरें-रा**–नपु मनाची इच्छा 'का जे ल्वेयाचे लळे सरती। मनोरथाचे मनोरे पुरती।'–ज्ञा ९ ३. **बरव्या मनानें**–क्रिवि शुद्ध मनानें, चांगल्या, प्रामाणिक हेतूनें 'सीता स्वयंवर असें बरव्या मनानें अवलक्षुनि शास्त्र अव लोकिलें ' **मोकळ्या मनानें**–क्रिवि खुल्या दिलानें, स्वतःचें मन, हेतु भावना इ० स्पष्ट रीतीनें सांगून मन मोकळें करून

**मनखुरा**—पु (सोनारी) एक हत्यार मणखुरा पहा

**मनगट**—न घडकामाची चौकोनी लोखंडी कांब खरवाई पहा

**मनग(क)ट, मनगटी**—मणगट मणगटी पहा 'तेथ पुढां तुझे पुष्पांजुलि। सैवगी मनकटाचा।'–भाए ४५१ **मन गटांतील मासा मरणें**–असमर्थ असणें

**मनचव**—वि (जरतारी धंदा) मध्यम

**मनजात**—स्त्री (गो) मोती, मुखी जात (पाळींव जनाव रांना उद्देशून कोंकणात उपयोग )–सह्याद्रीच्या पायथ्याशीं ३०६

**मनणें**—सकि १ मानणें, पटणें, आवडणें 'जरी उतरला धरामार। हें शारंगधर न मनीच।'–एभा १ २७० २ ध्यानांत, लक्ष्यांत घेणें. 'कां निद्रेचे घाय तिखट। एकही न मनी ब्रह्मनिष्ठ।' –मुवन ४ १२६ ३ वाटणें, भासणें –एभा ३ ६१ [सं मन्]

**मनन**—न विचार करणें; चिंतन, ध्यास 'श्रवण म्हणिजे ऐकावें। मनन म्हणिजे मनीं धरावें।'–दा १८ १०८ **०शील**–वि मनन, चिंतन विचार करण्याचा स्वभाव असलेला

**मनवणें**—अकि मान्य होणें, मानलें जाणें 'तप शुद्धीचिया आशा। तो लेपु न मनव जैसा।'–ज्ञा १७ १०८ **मनचि**[?]– घाको ६. ४

सक्ति जागृत करणें, उत्सुक करणें 'चित्ता चेतविसी मना मन- विसी सर्वेंद्रिया चाळिसी।'–निमा २ २.

**मनवारी**—वि मनोरशाई लोखंडाची एक जात –मुव्या ९३

**मनशा-सा-स्या, मनीषा**—स्त्री इच्छा, वासना, हेतु, मनीषा पहा 'आशा मनशा तृष्णा कल्पना।'–शिली १ १२७ [मन+आशा] **मनशामोड**–स्त्री इच्छिलेली वस्तु मिळाल्या मुळें झालेलें समाधान, संतोष, तृप्तता

**मनशी(सी, स)ळ**—नपु एक तांबूस रंगाचा औषधी धातु [स मन शिल]

**मनसब, मन्सब**—पु १ (मुसलमानी अमदानींत) घोड दळातील एक अधिकाराची जागा २ अमुक इतक्या घोडेस्वारांचें पथक पदरीं ठेवण्याचा अधिकार ३ या हुद्द्याच्या दिमतीसाठीं दिलेली जहागीर. [अर मन्सब्] **०दार**–पु मनसब धारण कर णारा अधिकारी, एक लष्करी हुद्देदार [फा मन्सब्दार्]

**मनसुत्र-त्री**—(अप) मंत्रसूत्र-त्री पहा

**मनसुबा-भा, मनसोबा**—पु १ उद्देश, हेतु, मनोगत २ विचार, ठराव, मसलत 'परंतु मनसुबा कांहीं लांबणीवर पडला आहे '–समारो १ १३९ ३ युक्ति, हिकमत ४ अंगीकृत कार्य, मोहीम ५ मनसुबी पहा [अर मन्सुबा] **मनसुबदार**–वि युक्तिवान्, अक्कल लढविणारा, कल्पक, योजना तयार करणारा **मन्सुबेबाज**–वि युक्तिवान्, अक्कल लढविणारा, मुत्सद्दी 'शिपाईगिरीची व मन्सुबेबाजपणाची शर्त करून यशास पात्र व्हावें ऐसेंच आहा '–पया ३३२ [फा मन्सुबा+बाझ]

**मनसुबी-फी, मन्सोबी**—स्त्री १ किरकोळ दाव्याची चौकशी, न्यायनिवाडा, निकाल 'आमची मनसुबी नारो बावाजी याजपाशीं पडली '–समारो ३ १२३ २ पंचाईत, लवाद, मध्यस्थी. [अर मन्सब् फा मुन्सिफी] **मनसु(सो)बदार**– पु न्यायकोर्टातील अधिकारी, मुनसफ, न्यायाधीश

**मन(सू)सुर, मन्सूर**—पु १ राजाचें आज्ञापत्र, सनद २ मोहोर, शिक्का 'वरी मनसुर सद्गुरुरूपाचा। हिशेब सख्याचा पुसिला।'–भवि ४५ ६७ [अर मन्शूर्]

**मनसूर**—वि १ मदत झालेला २ यशस्वी –आदिलशाही फर्मानें [अर मन्सूर्]

**मनसोटी**—स्त्री (कातकरी) मसणवटी, स्मशान 'तुम्ही तें प्रेत मनसोटीवर घऊन जा '–मसाप १ ३ ३१ [मसणवटी]

**मनस्वी**—वि १ मन स्वाधीन असलेला, मन जिंकणारा, संयमी 'मृत्यु न म्हणे हा मनस्वी।'–दा ३ ९ २६ २ बेफिकीर, स्वैर वर्तणुकीचा, अमर्याद ३ स्वच्छंदी, लहरी, हट्टी (काम, बागाइत, स्वभाव, मनुष्य) ४ बेसुमार निर्भय छातीचा 'स्वातंत्र्यासारख्या गोष्टी ज्यांना जिवंत दयाच्या

आहेत अशा जिगीषूनीं मनस्वी म्हणजे लोकमान्य टिळकांप्रमाणें निधड्या छातीचें झालें पाहिजे '–धर्मशास्त्रविचार ( काणेकृत ) ५ पुष्कळ अतोनात विपुल, अतिशय उदा० मनस्वी–पाऊस–ऊन–थंडी मनस्वी उच–खोल–लठ्ठ इ० क्रियाविशेषणाप्रमाणेंहि योजतात जसें–मनस्वी लिहितो–वाचतो **मनस्वार**–वि ( ग्रा ) मनस्वी अर्थ ५ पहा

**मना**—स्त्री १ मनाई प्रतिबंध काणी कोटहीन जाऊं लागल्यास मना करणें –सभासद ४७ २ निषेध, हरकत –वि वद केलेलें ज्याला प्रतिबंध करण्यांत आला आहे असा, निवृत्त निषिद्ध जप्त ( क्रि० करणें, होणें ) [ अर मन्अ ] ०**चिठ्ठी**–स्त्री पूर्वीचा हुकूम रद्द केला आहे अशा अर्थाची चिठ्ठी (हवाला ०) मना करण्याविषयींचें पत्र, उलट हुकमाची चिठ्ठी पहा मनाई ०**मोरदला**–पु देणें, घेणें इ० सवधाचें सकट हुपत्या प्रयुक्त्या करून टाळणें ( क्रि० करणें होणें ) ०**रोखा**–पु मनाई हुकूम **मनाई**–स्त्री १ बंदी निषेध प्रतिबंध २ कुळाला हवाला न करण्याविषयींचा सावकाराचा हुकूम ०**पत्र**–न प्रतिबंधक हुकूम –रा ८ १५७ ०**हुकूम**–पु ( कायदा ) अमुक गोष्ट करूं नये अशाबद्दलचा कोर्टाचा हुकूम, ताकीद ( इं ) इन्जंक्शन

**मनाग**—क्रिवि १ क्षणभर २ अल्प, किंचित् विसरचिन पडावा मनाक । [ स मनाक् ] ०**स्पर्शस्वर**–पु ( संगीत ) विवादी स्वर पहा

**मनावणी**—स्त्री मन वळविणें आनंद मनधरणी **मनाविणें**–सक्रि वश करणें अनुकूल करून घेणें मन वळविणें **मनेरा**–पु १ मन २ व्यापार –शर **मनरी**–वि मनरूपी –शर

**मनाघर**—न ( मुंबई ) लढाऊ जहाज गलबत [ इं मॅन ऑफ वॉर ]

**मनि–नी**—पु राग म्या म्हणत याचा मनिहि न धरावा।' –शिगीता १ १५ [ स मन्यु–राग ]

**मनी**—स्त्री ( बालभाषा ) मांजर ती पहा मनी आली। म्याव म्याव वाली। येग मन खेळू आपण। [ ध्व ]

**मनु**—पु १ ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत जे चवदा अधिकारी होतात ते प्रत्येक प्रत्येक कल्पांत चौदा मनु असतात चौदा मनु मन्वंतर पहा 'स्वायंभू मुख्य वडील। चारी मनु।' –ज्ञा १० ९३ २ एक ऋषि व स्मृतिकार ३ अनुकूल काळ हंगाम 'धान्य कापावयाचा मनु आला ' ४ मनुष्य मानव ५ ( सांकेतिक ) चौदा या संख्येबद्दल संज्ञा [ स ] ०**पालटणें** ( ल ) परिस्थिति बदलणें क्रांति मन्वंतर होणें **मन्वंतर**–न १ दुसरा मनु काळ २ मनूचा शक, देवांचे ७१ पर्याय ( युगें ) किंवा ३०,६७,२०,००० वर्षें, प्रत्येक मन्वंतरांत नवा मनु इंद्र व इतर देवता येतात ३ ( ल ) ( एखाद्याच्या उत्कर्षाची वैभवाची सत्तेची ) अमदानी, काळ, अनुकूल काळ हंगाम 'तुमचें मन्वंतर गेलें आमचें मन्वंतर आलें म्हणून त्या लोकांनीं भडकावल्या ' ४ क्रांति 'सर्वत्र मन्वंतर फिरून निकड दिसे अस्वास्थ्य क्षणभंगुरता आणि अशाश्वती मूर्तिमंत दिसूं लागली ' –गुजराथचा इतिहास [ मनु+अंतर ]

**मनुका**—स्त्री वाळलेली काळी द्राक्षें एकवचन मनूक [ अर मुनक्का ]

**मनुज**—पु १ मनुष्य, मानव २ मानवजाति [ स ]

**मनुरी**—स्त्री ( कों ) कद काठ माजर काठेदार

**मनुष्य**—पुन १ मानव नर तीचा इसम, माणूस, मानव २ कर्तृत्ववान् पराक्रमी समर्थ माणूस, पुरुष 'राज्यात कोणी मनुष्य नव्हता म्हणून राज्य बुडालें ' [ स ] **मनुष्यांतून उठणें**–१ लोकरीति, शिष्टाचार इ० सोडून वागणें स्वैरवर्तन करणें २ सर्वस्व गेल्यामुळें अत्यंत हीन दीन विपन्न दशेंत येणें ३ मरणोन्मुख होणें मरावयास टेकणें, रोगामुळें व्यवहारांत निरुपयोगी होणें (याच्या उलट) **मनुष्यांत येणें**–जम बसणें धंदा ०व्यवहार यांची स्थिरस्थावर होणें (एखाद्या) **मनुष्यास, हातीं धरणें**–१ एखाद्याला मदत करणें २ त्याला मदतनीस घेणें सामादाम– ०**ऋण**–न (मनुष्याला असलेलें कर्ज) मनुष्यानें करावयाचीं कर्तव्यें ( मनुष्यानें यामध्यें देवऋण ऋषिऋण व पितृऋण अशा तीन्हींचीं ऋणें फेडावयाचीं असतात ) ०**कला**–**ळा**–स्त्री १ मनुष्याचें कौशल्य चातुर्य २ मनुष्याची हुशारी विशेषत आपल्याला ईश्वरी साक्षात्कार झाला आहे आपण ईश्वराचे अंश आहों असें पसरविलेलें थोतांड ३ (चेहऱ्यावर दिसणारें) तेज, कांति मनुष्यलक्षणस्वरूप याच्या तोंडावर मनुष्यकळा नाहीं ' ०**की**–स्त्री मनुष्यपण पहा ०**गण**–पु १ नक्षत्रावरून पडलेल्या तीन वर्गांपैकीं एक, पूर्वात्रय उत्तरात्रय रोहिणी भरणी आणि आर्द्रा ह्या नऊ नक्षत्रावर जन्मलेल्या मनुष्याचा वर्ग बाकीचे दोन देवगण आणि राक्षसगण २ मानवजाति ०**तीर्थ** न तीर्थ पहा ०**देव**–पु राजा 'राचो कसा असावा निश्चयचि तुझा मनुष्य देवाचा।' मोकर्ण ८० २३ ०**पण पणा**–नपु १ मनुष्यानें मनुष्याशीं किंवा समाजांत योग्य प्रकारें वागण्याचा स्वभाव माणुसकी, सभ्यपणें, शिष्टाचारास धरून वागण्याची पद्धत २ भलेपणा दयार्द्रपणा विनय इ० गुण ०**बल** ब सत्याबल सघबल अनेक माणसांची मदत ( इं ) मॅनपावर 'हें काम एकट्याचें नव्हे मनुष्यबल पाहिजे २ मनुष्यामुळें प्राप्त होणारें सामर्थ्य (सैन्य नोकर चाकर ) याच्या उलट वित्तबल द्रव्यबल इ० ०**यज्ञ**–पु १ पंचमहायज्ञांपैकीं एक अतिथितर्पण २ नरमेध ०**लोक**–पु इहलोक पृथ्वी ०**वाणी** स्त्री मनुष्याचा आवाज

येलणें ०हानि-नी-स्त्री मनुष्याचा नाश मनुष्यहानीसारखी हानी नाहीं 'मनुष्यागम्य-वि मनुष्याला साध्य न होणारें, मानवी शक्तीच्या बाहेरचें

**मनूख, मनुक्ष**—पु (अशिष्ट पुण) मनुष्य 'मनुख वेषें अवतला।' -उपा ८६० 'स्ये त्या मनुक्षानें जन्माया होवे होत' -हाकाध ५९

**मॅनेजर**—पु कारभारी, व्यवस्थापक, प्रमुख [इं]

**मनेर, मनेरी, मन्यार**—न मणेर मणेरी, मण्यार पहा

**मनेवार**—पु बदखोर 'आपण हरामखोर मनेवार चञा उरकास गोदामाल देऊनु सोडउनु घेउनु।' -इम ६६ [अर मन्अ?]

**मनोती**—स्त्री १ मढाई पहा व्याजाखेरीज दिलेला जास्त मोबदला २ रक्कम घेतानाच कापून घेतलेलें व्याज [हिं मनौति]

**मनोरा**—पु १ आतून पोकळ असा उंच स्तंभ (दगड, चुना इ०चा) २ विहीर इ०च्या बाजूस बांधलेला दगडी खांब, बुरूज ३ दीपस्तंभ दीपमाळ मिनार पहा [अर मनार]

**मनोरा**—पु (व) बारीक तुकडा, चीप काच पडला तर मनार मनारे झाले त्याचे '

**मनाळी**—स्त्री (सुतारी व) खादण्याचें एक हत्यार

**मन्मथ**—पु मदन, काम 'भीमकी पढातम सभोंवर्ते। तब वीर भेदिले मन्मथें।' -एरुस्व ७५७ [स]

**मन्या**—स्त्री मानेची मागची शीर [स] ०स्तंभ-पु ज्यात मान इकडतिकडे वळविता येत नाहीं असा रोग मानधरणें

**मन्यु**—पु राग, क्रोध [स]

**मप-म**—अ गाडी नांगर इ० हाकणाराकडून डाव्या बाजूच्या बैलास जलद चालण्याचा इशारा देण्याचा शब्द याच्या उलट उजव्या हाताच्या बैलास पप अशा शब्दानें इशारत देतात

**मप, मपस**—शब माझ्याजवळ, मजपाशीं मप नाहीं हत्यार मुमळाचा घाव लागला। -ऐपो ७१ [मजपाशीं अप]

**मपला-ली-लें**-वि (व) माझा-झी-झें मपासून, मपून-क्रिवि (घाटी) मजपासून, माझ्यापासून

**मपितला**—वि परिमित, मोजका 'मपितला बोली बोलिजे।' -माज्ञा ६ ३५० [स मा=मापणें]

**मफलीस**—वि गरीब, कामकरी वर्गातील (सडा शब्दास जोडून सरकारी कागदपत्रीं उपयोग) सडामफलीस पहा [अर मुफ्लिस्]

**मफौरा**—पु तीन पीळ असलेल्या गळ्याती अलंकारविशेष 'माणीकीं खचीत मुडे मफौर। -धवळ उत्तरार्धे ४२ [का मुप्पुरि=तीन पीळ]

**मबरज**—पु टाचणिका, आर [फा मिह्माज्, हिं मम्रीज्]

**मबादा**—अ १ देव करो तसें न होवो २ कदाचित् 'मबादा त्याजवळोन कांहीं तफावत नजरेस आला तर आम्हास सांगावें ' -रा १ १४६ [फा म+बादा]

**मम**—वि (अस्मद्ची षष्ठी विभक्ति) (काव्यात उपयोग) माझा 'मम आत्मा गमला हा।' -स्वयंवर [स] ०म्हणणें-१ आपला म्हणणें, स्वीकारणें २ कबूल करणें, जाणें ३ मान्य करणें ४ कोणी जें म्हणेल त्याला संमति देणें दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिणें (भिक्षुक यजमानाला मम म्हणण्यास सांगून आपण पुढें त्याचीं वचनें उच्चारतो यावरून) ०कार-पु माझेपणा, ममत्व 'ममकार अहंकार त्यागुनि होसील मुक्त गेहींच।' -मोशांति ३ ५१ ०त्व-न माझेपणा, ममता, प्रेम 'कीं ममत्वें वसुदेवा-। दिका सकळा।' -ज्ञा ९ ४६७

**ममता**—स्त्री १ आपलेपणाची, आत्मीयतेची भावना, माझेपणा २ माया, प्रेम, प्रीति ३ महत्त्वाकांक्षा, अभिमान ४(ल) मत्ता [स ममत्व, प्रा ममत्त, हिं] ०लावणें-लावून घेणें-प्रेमळ वर्तनानें दुसऱ्याची प्रीति संपादणें ०ग्रह-पु आपलेपणाची भावना (क्रि० वरणें) **ममतालु-लू**-वि मायाळु, दयाळु, प्रेमळ **ममतास्पद**-न ममत्वबुद्धि ठेवण्याला, प्रेमाला पात्र, प्रेमाचा विषय (मूल, बायको इ०) [ममता+आस्पद] **ममतेशाल**-वि मायाळु, प्रेमळ 'कुशल ज्या त्या ममतेशील धनि।' -अफग ४९

**ममलकतमदार**—पु (राज्याचा आधारस्तंभ) एक किताब 'सताजी घोरपडे यास हिंदुराव ममल्कतमदार ऐसा किताब दिल्हा' -मराठियांचे चरित्र पृ ३३ [फा मम्लुकत्-मदार]

**ममालिक**—पु देश, राज्य [अर ममालिक-मम्लुकतचें अव]

**ममुला**—पु (व) अतिशय जाडी भाकर, रोट, रोडगा.

**मम्नुनी**—स्त्री आभिनी, मनधरणी 'त्याची मम्नुनी करून आपली तकसीर माफ करून घेऊन' -दिमरा १ ७५ [अर मम्नुनी]

**मय**—स्त्री एक रानटी जनावर

**मय**—अ एक संस्कृत प्रत्यय १ भरलेला, पूर्ण, व्याप्त. समासांत उत्तरपदीं येतो उदा० जल-आनंद-वृक्ष-धान्य-मय 'समुद्रात जाऊन पाहिलें तों जलमय सर्व दिसूं लागलें' २ एखाद्या (वस्तूचा) केलेला, बनविलेला उदा० सुवर्ण-धातु-सिकता-मय सुवर्णमय प्रतिमा करावी।' [स]

**मयंक**—पु चंद्र 'जैसा तारामाजी मयंक शोभायमान।' -कथा ३ ३ १९ [स मयु=हरिण+अंक=चिन्ह] ०पत्र-न चंद्राकृति निशाण, ध्वज 'नाहादली नेणों मयंकपत्रें।' -वेसीस्व ६ ७५

मयत, मरतापदा गि, मया, मयातैन—मैयत इ० पहा

मयदा मयदान, मयदालक्डी, मयल, मयलखोर—मैदा, मैदान मैदालकडी, मैल, मैलखोर, इ० पहा

मयना—पु एक पक्षी मैना पहा

मयना—पु (विह) मायना, माना पहा.

मयाल—स्त्री (ना व) तुळई

मयासुर—पु एक शिल्पकार राक्षस [स मय+असुर]

मयासुरी प्रकार-पु (क) नाटकी, खोटी, घटोत्कची गोष्ट

मयाळ—वि १ मवाळ, २ मायाळु 'आर्तांमी निन्हां मयालु।'-दाव ३९४ [मवाळ]

मयाळ-ळी—स्त्री एक प्रकारची भाजी

मयूख—पु १ सूर्यकिरण, प्रकाशकिरण, तेज, कांति २ (धर्मशास्त्र) एक टीकाग्रंथ [स]

मयूर—पु. १ मोर, एक सुंदर पक्षी २ तुरा, मयूरशिखा, ३ एक वनस्पति [स] ०कुंचा-पु मोराच्या पिसाची चवरी 'मयूरकुंचे दाग्मि धोहरी।'—महिपतीकृत पांडुरंगस्तोत्र ७७. ०पत्र-न मोराचें पीस 'तया मुकुटाचे हळवटीं। सुपमयूर पत्राची वेटी।'-एरुस्व १ ६५ ०पिच्छ-न मोराचा पिसारा 'मस्तकीं मुगुट आणि किरीटी। सर्वांवरी झिलमिलख्याची दाटी। त्यावरी मयूरपिच्छाची वेटी।'-अय ६९ ०ललित(करण)-न (नृत्य) पाय वृश्चिक करून व पाठीमागें पुष्कळ वळवून पाठीमागेंच उंच करणें, हात वेष्टित करणें व त्रिक वाकडें करणें ०शिखा-शिख-शिखर-स्त्रीन १ एक फुलझाड २ (ए) करडई मयूरासन-न एक योगासन हाताचे तळवे जमीनीवर टेवून कोंपरावर शरीराचा तोल सांभाळणें [मयूर+आसन] मयूरी-स्त्री १ मोराची मादी, लांडोर २ एक प्रकारची अश्वगति तों निघाल्या अश्वरत्नाच्या हारी। दाखविती गती नाना परी। अश्वी नाकुळी हंसी मयूरी।'-जै ४ ९९ मयोर-पु (अप) मयूर मोर

मये—शब्द सह, बरोबर, 'रामजीपंत टकल मये लक्ष्मण पंत गेले होते'-रा १ १८४ [फा मइ]

मर—स्त्रीन (पीक झाड, लाकूड, दगड, कापड इ० चा) सडलेला, मेलेला, विडलेला, न रा पावलेला भाग २ पूर्णपणें जळून गेलेलें पीक, ३ पिसावरील कीड 'मारत ना मर असेल ती काढून जाळून टाकावी'-शेतकी-डायरी ० ११ -न कुंभार इ० च्या भट्टीतील पूर्णपणें जळून गेलेलें जळवण याच्या उलट करळ -स्त्री मरण्याची स्थिति मरणोन्मुख अवस्था (क्रि० येणें लागणें, मरीस येणें जाणें) [मरणें] मरीं जाणें-मरणाच्या पायास लागणें मरीं मरणें-जिवाकडे न पाहता अतिशय काबाडकष्ट करणें. मरीस येणें-जाणें-मर येणें

मरक—न अपस्मार, फेपरें, झुरें [सं]

मरकत, मरगज—पु एक प्रकारचें रत्न, पाच 'जैसा परिमळ जाहला मरगजा।'-ज्ञा ११ ६०१ [स मरकत]

मरकव—पुन १ वाहन २ (जकातखात्यात) गाढव [अर मर्कब्]

मरक(कु)ळी—स्त्री मर (-स्त्री.) पहा

मरकाड—स्त्री (व) अवकृपा, संकट 'आमच्यावर सगळी मरकाड खचली'

मरकाड्या—वि अत्यंत अशक्त माणूस, रोडका, मरद्कडा [मरणें+काडी]

मरकेपणा—पु (व) रोगीपणा

मरगड—स्त्री (ना) मरणाची साथ, मरगळ

मरगण-त, मरग(क)ळ—स्त्री थकल्यामुळें येणारी अर्धमेल्यासारखी स्थिति, थकवा, ग्लानि मर-मरकळ पहा [मरणें+गळणें] ०घेणें-मारणें, मरगणें, मरगळीस येणें-१ अति दाय दमल्यामुळें पडणें, अंग टाकणें ग्लानि येणें २ दमल्याचें ढोंग करणें (हटी बैल, घोडा, माणूस यांनीं)

मरग(क)ळ—वि अगदीं दमल्याचा बहाणा करून बैठक मारून बसलेला (माणूस, जनावर) मरगळणें-अक्रि दमून जाणें नित्राण होणें, शक्तिगत होणें. मरगळा येणें-जागा सोडून न हालणें

मरगी-की—स्त्री १ महामारी, साथीचा रोग २ मोंबळ, चक्कर, घेरी ३ फेपरें, अपस्मार [सं मरक]

मरगूत—स्त्री १ मृत्युगति, मरणावस्था २ दुर्दैवाची परमावधि, मृत्यु (क्रि० येणें, मरणें, घेणें, मरगुतीस येणें) 'त्याला मरगुतीनें घेरलें तो काय वाचायचा?' ३ मरगळ पहा [मरणें+गति]

मरचला—पु वालाचा एक प्रकार याच्या शेंगचें सालपट नरम असतें -कृषि ३३०

मरज—पु मरकत पहा

मरजसखाका—पु घोड्याचा एक रोग हा ठेंव लागल्यामुळें होतो -अश्वप ० २९९ [अर मरज्=रोग]

मरड—स्त्री (गो) १ कमी पाण्याची भातशेती २ माळ जमीन [का मरड=खड, वाळू]

मरडादहीं—न (व) साय काढून घेतलेल्या दुधाचें दहीं

मरडी टाकळी—स्त्री टाकळ्याची एक जात

मरण—न १ मृत्यु प्राण जाणें २ (ल.) हानि, तोटा, नुकसान 'सोन्याचे नाण्यास कांहींहि मरण नाहीं' न्यूनता नाहीं असें येथदर सांगतांना योजतात 'उदा० या व्यापारांत हजार रुपयास मरण नाहीं' (निखालस निव्वळतील) ३ मोठा धोका,

सकट ४ जिवावरची गोष्ट, प्राणाशीं गाठ, प्राणसकट 'त्या मार्गानें जाऊ नको, तथे मोठें मरण आहे' ५ अत्यत अप्रिय, कष्टाळशाणी गोष्ट 'लोकाजवळ कर्ज मागणें हें मला मोठें मरण आहे' [स] (वाप्र) ०जाणणें-समजणें-कळणें-कळूं लागणें-सकटाची जाणीव होणें (कोणाच्या घरीं) मरणाची वाजत्रीं वाजणें-कोणत्याहि सकटाला तोंड देणें, मरण्यास तयार असणें **मरणाच्या दारीं बसणें-पंथास लागणें-टेकणें**-आसन्नमरण होणें, आता मरतो की मग मरतो अशा स्थितींत असणें **मरणादारीं कीं तोरणादारीं (जावें इ०)** शुभ प्रसगीं किंवा अशुभ प्रसगीं हजर रहावें **मरणानें जिंकलेला-जिंकला**-वि मरावयास टेंकलेला, मरणद्वारीं असलेला **मरणामाथा-माथेस येणें-पावणें**-मरायला लागल्या-प्रमाणें होणें, पूर्णपणें थकून जाणें 'हा पाच कोस जमीन चालला म्हणजे मरणामाथा येतो' **मरणाला रात्र आडवी करणें**-मरण, एखादा कठिण प्रसग काहीं तरी युक्ति योजून लावणीवर ढकलणें **मरणीं घालणें**-मरू घालणें 'ऐसा कलहाच्या नारद-मुनी। मरणीं घातल्या कृष्णकामिनी।' -जै ७१ १११ **मरणीं मरणें-१** एखाद्यासाठीं मरण पतकरणें, जीव धोक्यात घालणें २ एखाद्याच्या सेवेस तत्पर असणें **(आजचें) मरण उद्यावर लोटणें**-सध्याचा कठिण प्रसग लावणीवर टाकणें **(आपल्या) मरणानें मरणें-१** नैसर्गिक रीतीनें मरणें २ (स्वतःच्या दुष्कर्माबद्दल शिक्षा म्हणून) स्वत वर संकट ओढून घेणें **(उद्याचें) मरण आज आणणें**-कालातरानें गुदरणारा अनिष्ट प्रसंग आताच ओढवून घेणें **खितपणीचें मरण**-न खितपत पडून राहिल्यानतर प्राप्त होणारें मरण 'ज्या अगावरी केलें शयन। तेथून अग हलवू नेणे। खितपणीचें आलें मरण। निंदकजन बोलति।' सामाशब्द- ०कळा-स्त्री आजार काळजी इ० मुळें चेहऱ्यावर येतो तो फिक्टपणा, निस्तेजपणा, प्रेतकळा ०तरण-न मरणें आणि जगणें मृत्यु आणि जीवन 'मरणतरण ईश्वराचे स्वाधीन' ०दशा स्त्री कठिण प्रसग, जिवावरचें सकट ०पंथ-पु मृत्यूचा मार्ग. (क्रि० टेंकणें, लागणें) ०प्राय-न मरणा सारखें सकट 'कोणी मागितलेली वस्तु नाहीं म्हणावयास मला मरणप्राय होतें -वि मरणाइतकें दु सह कठिण ०मूळ-न १ मरणास बोलावणें 'मज न्यावया आला उतावीळ। तत्काळ झाला मरणमूळ।' -कथा १ ६ ९१ २ अत्यत त्रासाचें, कष्टाचें काम, जिवावरची गोष्ट, जीवघेणा प्रसग. ०सोंग-साध नपु मरणाचें कलेलें ढोंग वहाणा (क्रि० घेणें, आणणें) **मरणा**-वि (राजा) अगदीं मरावयास टेकलेला, अत्यत अशक्त, मरतुकडा **मरणेच्छा**-स्त्री मरणाची इच्छा **मरणोन्मुख**-वि आसन्नमरण, मरणाच्या पथास लागलेला **मरणें**-अक्रि १ मरण पावणें, वारणें २ शुष्क होणें, वाळणें, कोळपणें, कोमेजणें (झाड, रोप इ०) ३ (ल) (दिलेलें कर्ज व्यापारात घातलेलें भाडवल इ०) बुडणें, नुकसान पावणें, किफायतशीर न होणें ४ (मुलाच्या खेळातील गडी, सोंगटी इ०) निरुपयोगी, बाद होणें, खेळातून निघणें 'दोन गडी मेले' ५ येडीनें कडकून जाणें, नाश पावणें ६ (पारा, सोनें इ० चा) गुणधर्म नाहींसा होणें, भस्मदशा पावणें ७ सवेदनाशून्य होणें, बधिर, मद्ह होणें 'नित्य मार खाल्ला असता पाठीचें रक्त मरतें' ८ आटून जाणें, नाहींसें होणें (पाणी, रक्त, रस, ओलावा इ०) ९ बरें होणें, नाहींसें होणें (गळू, नायटा इ०) १० (खड्यात) साठून रहाणें, न वहाणें (पाणी) ११ कंटाळवाणा होणें, फुकट जाणें, निरुपयोगी होणें (वेळ) १२ मोडणें, जाणें, नाहींशी होणें (तहान, भूक, वासना इ०-वेळेवर तृप्त न झाल्यामुळें) 'पाहण्याविषयीं त्याची दृष्टि मेली' १३ उडणें, नष्ट होणें, लुप्त होणें (आशा प्रीति, इच्छा, मनोवृत्ति इ०) १४ ताजेपणा, सत्त्वादा नाहींसा होणें, बेचव होणें (पाणी इ०) १५ दुखणाईत होणें, आजारानें खितपत पडणें 'हा तीन वर्षे मरतो आहे' १६ पराकाष्ठेचा तोटा, नुक्सान सोसणें 'त्या साखरेच्या व्यापारात हा हजार रुपयाला मेला' १७ अत्यत कष्ट सोसणें, जिवापाड काम करणें, कामानें बेजार होणें 'तुम्ही सारे बसता आणि म्या एकट्यानें मरावें हें ठीक नाहीं' १८ अतिशय उत्सुक, उत्कंठित होणें, उतावीळ होणें 'एवढा मरतोस का? उद्या तुझें काम होईल' १९ खालीं बसणें, कमी होणें (धूळ) **(दृष्टि, नजर) मरणें**-एखादी वस्तु नित्य पाहण्यात आल्यानें तिजविषयीं औत्सुक्य कमी होणें, उदासीनता येणें **मरण्याजिण्यास उपयोगी (कामास) पडणें**-ऐन अडचणीच्या प्रसगीं उपयोगी येणें **मरतां मरतां वांचणें**-भयकर दुखण्यातून, प्राणसंकटातून वाचणें **मरतां मरतां हातपाय झाडणें**-शेवटचा जोराचा प्रयत्न करून पाहणें **मरमरून जाणें-पडणें**-अतिशय आसक्त उत्कंठित उत्सुक होणें, वेडा होणें **मरमर मर**-क्रिवि अत्यत श्रमानें, कष्टानें **मरीं मरणें**-जिवाची पर्वा न करता कष्ट करणें **मरू घालणें**-मरणार म्हणून टाकून देणें, मरणाच्या दारीं असणें, टेंकणें 'त्वरींच मरू घातला कुमर। हा तयावरी झपटावा।' **मरू घातलेला**-वि मरणार अशा समजुतीनें टाकून दिलेला **मरून जिणें**-पुनर्जन्म होणें, मरता मरता वाचणें 'गोविंदामृत दृष्टिवृष्टि करिता आता मरूनी जितों।' **मरून पडणें**-अतिशय मोठें घोस, झुबक येणें (झाडावर फळाचे) 'आंबे यदा मरून पडले आहेत' **मरूं मरूं करणें**-लवकरच प्राण जाईल असा रग दिसणें **मरोमरोसें (मरमरेसें) करणें**-सतावणें, गाजणें, अत्यत त्रास देणें **मेला जसा**-वि अति शरमिंदा, लज्जित,

मेल्यासारखा मेल्याचा पाड जाणें-होणें-१ हलका लेखिले जाणें, मान्यता कमी होणें २ गोंधळणें, गांगरलेले होणें

**मरत**—वि मेलेलें, मृत [ स मृत ] ०मढें ढें-न अतिशय अशक्त मनुष्य मरतुकडा **०मढ्यासारखा**-वि मृता सारखा **०चड-घडा**-स्त्रीपु मरणाची गाय ( क्रि० देणें ) **०वांझ-ज**-स्त्री १ जिची मुलें लहानपणींच मरतात अशी स्त्री 'धाकुटा सरिसे गेलें । तों मरतवांझ न व पडिलें ।' -दा ३ ३ ३९ २ ( वऱ्हाडी ) मरतांना एकहि मूल जिवंत नसलेली स्त्री **०संभाळ**-पु १ मरावयास टेकलेले माणूस, पशु इ०ची शुश्रूषा २ प्रेमपूर्वक केलेलें संगोपन, आस्था काळजी ( क्रि० घेणें ) ३ कोणत्याहि गोष्टीचा केलेला अतिरेक ( जेवण, झोंपणें, बसणें, लिहिणें इ०चा ) शक्यतोपर्यंत पिच्छा पुरविणें ( क्रि० घेणें ) **मरटेकणें**-अक्रि मरावयाच्या बेतात असणें, मरावयास टेकणें **मरता आहार**-पु मरणोन्मुख माणसाचें इच्छेचें खाणें **मरताक**-न ( कुण ) १ मृताची और्ध्वदेहिक क्रिया, दिवस २ मरण, मृत्यु ३ मृत मनुष्य प्रेत मुडदा [ स मृतक ] **मरती कळा**-स्त्री १ मरणाच्या वेळीं चेहऱ्यावर दिसतो तो फिकटपणा, प्रेतकळा २ आजाऱ्यासारखा दिसणारा माणूस **मरती भावना**-स्त्री मरण जवळ येऊन ठेपलें आहे असें आंतून समजतें अशी मुद्रा **मरती रात्र**-स्त्री ऐन रात्रीचा समय ( स्वप्न चें म्हणणें खरें आहे हें ज्याला साक्षी ठेवून दाखवावयाचें त्यापैकीं एक प्रमाण ) मरती रात्र झाली आहे खोटें बोलत नाहीं ' काळी रात्र मरत्या वळचणीखालीं बसणें पहा **मरतुकडा मरतु(त)गडा**-वि अगदीं अशक्त रोडका मरतमढें **मरमर**-स्त्री १ धोक्याच्या परिस्थितींत प्राणावरच्या संकटांत अविचारानें शिरणें, फाजील धाडसी साहसी वृत्ति ( वेडपा वैदाशीण इ०ची ) ( क्रि० देणें; लागणें, घेणें ) २ उपहास टवाळकी म्ह० आपली हाण ( हानि ) आणि जगाची मरमर ३ कुरकुर पटी मेगला दावदार । जाची मरमर समागीं । **०घेणें** १ अत्यंत क्षीण मरणासन्न होणें २ मरणाची धास्ती घेणें हाय खाणें **मरमरा, मरवडा**-पु १ मरमर अर्थ १ पहा २ ( निंदार्थी ) पराकाष्ठेचा अशक्तपणा मरणप्राय स्थिति तुला काय मरवडा आला ! **मरवड**-स्त्री मरण रोग इ०ची साथ ( माणूस जनावर इ०ची )

**मरतबा**—पु दर्जा पदवी योग्यता [ अर मर्तब ]

**मरद, मरदगानी, मरदमाणूस मरदा मरदाना मरदाई मरदाना**—मर्द, मर्दगानी इ० पहा

**मरदणें मरदळणें**—सक्रि १ चोळणें मर्दन करणें ( तेलानें अंग, वाटणें फरा इ० ) २ चेपणें रगडणें मर्दन करणें ३ ( आकाश ढगांनीं ) आच्छादित होणें व्यापणें [ स मर्दन ]

**मरफा**—पु एक प्रकारचें वाद्य लहान टिमकी नगारा मर्फा पहा [ का मर्फा ] **मरफेकरी**-पु मरफा वाजविणारा

**मरमत-तलब**—वि मरामत मागणारा दुरुस्ती पाहिजे असलेला ' जागा मरमततलब आहे सबब दुरुस्ती करावयास माफी लाऊन . ' -रा ७ २१९

**मरल-ळ**—पुस्त्री गोड पाण्यांत राहणारा एक उंची मासा याची लांबी सुमारें ३ फूट असते [ स मरोली ]

**मरवा**—पु एक सुगंधी वनस्पति [ स मरुक, प्रा मरुअ, हिं मरुआ-वा ]

**मरसा**—पु शोकगीत ( विशेषत हसन आणि हुसेन ह्यांच्या विषयीं मुसलमान लोक मोहरमांत गातात तें गीत ) [ अर मर्सिय ]

**मरहूम**—वि मृत, माजी, कैलासवासी [ अर मर्हूम् ]

**मरळ**—स्त्री मरगळ पहा

**मरठदेडी**—स्त्री ( व ) गर्भाधानाचा दुसरा दिवस [ का ]

**मरळा**—वि अतिशय थकलेला अशक्त ' पाहतां भिन्नो गोठ्यांतील पशु बैल तसा मरळा ।' -देप ९९ [ मरण-मरगळणें ]

**मराठ, मऱ्हाट**—वि ( ल ) १ स्पष्ट २ सोपें -मनचें 'स्वभावें तयाचें मऱ्हाट बोलणें ' -दावि ३९० [ महार ष्ट्र ]

**मराठा**—वि १ मराठी देश, लोक इ०संबंधीचा महाराष्ट्रीय, दक्षिणी २ महाराष्ट्रांतील क्षत्रिय जात ( ब्राह्मण आणि कुणबी यांच्या मधली ) यांना कधीं राव, मराठे असें म्हणतात हे बंदोबस्त सरकार करतात ३ ( तामा ) कुणबी शूद्र लोकांबद्दल योजावयाचा शब्द ब्राह्मण-पांढरपेशा आणि अस्पृश्य यांच्या मधला वर्ग [ स महाराष्ट्र प्रा मरहट्ट, मरह ] **मराठी**-स्त्री महाराष्ट्रांतील मुख्य प्रचलित भाषा ' मराठी असे आमुची मायबोली ।' -वि मराठे लोकांसंबंधीचा मराठ्याचा **०बाणा**-पु मराठे लोकांचा स्वाभाविक धैर्यपणा, शौर्य बाजपणा **०भाषा**-स्त्री. संस्कृत-प्राकृतापासून झालेली एक भाषा, मराठी **०मोळा, मराठमोळा**-पु १ मराठे लोकांतील चालीरीति ( समुच्चयानें ), बाळबोध वळण ' तुम्ही आपणास पवार म्हणविता पण तुमच्या घरीं मराठमोळा दिसत नाहीं ' २ ( विशेषत ) मराठ्यांतील शुद्ध, पडद्याची चाल कुलीनपणा, जुनें वळण ' मराठमोळा जुना ! अजुन चाल लोक छिनाल म्हणतील नवी नारी उघडु भुजा ।' -होला १४३ **०वैखरी**-स्त्री मराठी भाषा ' मी वाखाणिली मराठी वैखरी । ' -विपु ७ १४७ **मराठेशाही**-स्त्री मराठ्यांचें राज्य, अमदानी निपजणार कोण धनाजी । तारण्या मराठेशाही-दापुढें ।' -विक १० **मराठेशाही पागोटें**-न पागोट्याची एक तऱ्हा

**मराठी**—स्त्री एक औषधी वनस्पति हिचीं फुलें पिवळीं असुन अक्कलकाढ्यासारखा त्याचा उपयोग होतो वगु -४ १२८

**मराड**—पु पावसाळ्यांत भिजल्यामुळें निरुपयोगी झालेला घरावरचा पडा -बदलापूर २९ **मराडी**-वि केंबळी देण्यानें शाकारलेलें ( घर ) -बदलापूर २९

**मरात(ती)ब**—पुस्त्री १ (विद्या पराक्रम इ० बद्दल) पदवी, सन्मानार्थ योजावयाचा शब्द जसें-भट्टाचार्य, समशेरबहादर 'राजे असा मरातीब मेळविला'-रा ४ २३ २ दर्जा, बहुमान 'त्याचा मरातब दादासाहेबांनीं वाढविला'-रा १९ ९१ ३ —अब गोष्ट, मजकूर. लिहावयाचे मरातब बोलण्यात यतील त्या प्रमाणें तुम्ही लिहावें'-रा५ १५६ [अर मरातिब्-मर्तबाचें अव]

**मरादबा**—पु स्नेहसबध मैत्री 'मला पत्र दोस्तीचें मरा दबाचें आहे'-रा ५ १५९ [अर मुरावत]

**मरारा**—पु (राजा कु) वोंब धालेल्या नारळाच्या पोटात बनतो तो मगज

**मरामत, मरम(म्म)त**—स्त्री १ चागल्या स्थितींत राखणें, दुरुस्त ठेवणें २ दुरुस्ती, डागडुजी, निगा, साभाळ, (क्रि०राखणें करणें) 'यथें हवेलीचे मरामतस दीडशें रुपये लागले हवेलीची ज्या ठिकाणीं जरूर मरमत करणें होतें तेथें केली आहे'-रा ६ ५९२ ३ नागरणें, खत घालणें इ० (शेताच्या मशागतीतील), (कणीक) तिंबणें, घोळसावणें, (चिखल नरम करण्यासाठीं) तुडविणें, (रेशीम) कातणें, स्वच्छ करणें, (एखादें मिश्रण बनविताना), मिसळणें, मर्दणें, वाटणें इ० अनेक कामें (समुच्चयानें) ४ (चुनीनें) कारामत, खुबी, चातुर्य 'या पुरुषाची मरामत दुस न्याम यणार नाहीं' ५ (चुनीनें) मरातब [अर मरम्मत्]

**मरामर-मरी**—स्त्री मरणाची, आजाराची फार मोठी साथ (क्रि० चालणें, लागणें, होणें) [मरणें]

**मराल-ळ**—पु (काव्य) हस पक्षी 'आले देवें कदा चित मराळ।'-मारणें २८ १७ [स मराल] **मरालिका, मराळी**—स्त्री १ (काव्य) हसी २ देवी, देवता 'जयजय कासारमराळिके।' ३ सुदर, नाजूक स्त्री

**मरिगळा-गळ**—स्त्री आकार, आकृति, मूर्ति 'सकल देखिलें रणमडळ। परि न दखे दक्षमरिगळ।'-कथा ३ १४ २०५

**मरी**—स्त्री १ साथ (पटकी इ०ची), जरीमरी २ आसन्न मरणाची स्थिति, मरणदशा 'माझी आई मरीस आली' [स मरक] **०आई**-स्त्री अडाणी लोकाची एक देवी मृत्युदेवता, साथीची देवता 'मरी आईचा कोरडा वाजतो।'-भज ७४ 'मरीआई रोडगा वाहिन तुला।'

**मरीच**—न वाळी मिरीं 'जीरं, सुटी मरीचें हळदि बहु तशी हिंगही दालचीनी।'-सारद्व ३ ४८ [स]

**मरीयल, मरेल**—वि (ना) निस्त्राण, मरतकुडा (मनुष्य) [मरणें]

**मरु**—पु १ मारवाड देश २ निर्जल, रेताड प्रदेश, वाळ वट ३ एक पर्वत [स] **०देश-धन्व-भूमि**-१ मारवाड २ निर्जल, ओसाड प्रदेश 'तृषार्ता मरुदेशीं। झळे अमृतें वोळली जैसी।'-ज्ञा १८ १६१

**मरुआ**—स्त्री एकप्रकारचें धान्य, नाचणी -कृषि २८२

**मरुत्**—पु वायु, वारा [सं] **०सख**-पु अग्नि **मरुद्गण**-पु एक देवतावर्ग यात ४९ देवता आहेत. 'मरुद्गणाच्या वर्गी। मरीचि म्हणे मी शार्ङ्गी।'-ज्ञा १० २२२ [स]

**मरूळ**—वि वालुमिश्रित, पुळणवट, रेताड (जमीन, भुई, देश, प्रात, शेत, रान इ०) **०फडाची**-वि दोन नद्याच्या सगमाजवळच्या बेचक्यातील सोंडाची (जमीन) -कृषि १६

**मरोड**—स्त्री अत्यत आजारीपणाची स्थिति (विशे) मरवड पहा

**मरोड, मरोडकानवला, मरोडशेंग, मरोडणी, मरोडणें**—मुरुड इ० पहा

**मरोडा**—पु पोटदुखी, मुरडा (क्रि० येणें, होणें, निघणें, उठणें, करणें) [मुरडा]

**मरोडा**—पु जनावरास होणारा साथीचा रोग, मरी, मरवडा पहा

**मर्कट**—पु माकड, तावडया तोंडाची एक वानरजात 'आधींच मर्कट तशातहि मद्य प्याला।' [स] **०चेष्टा**-स्त्री पोरकट चाळे खोडया, माकडचेष्टा

**मर्कूम**—वि लिखित, लिहिलेलें 'आ साहेबानीं मुसफल मर्कूम केलें तें जाहीर आलें'-पया ४८४ [अर मर्कूम्]

**मर्गज**—पु पाच, मरकत 'साङ्गनी कठिणत्वाचें डिंब। सचेतन मर्गजस्तभ।'-एरुस्व १ २५ [स] **मर्गजामणी**-पु मरकतमणी 'मर्गजामणीचे घोंसे।'-शिशु ४०९

**मर्गळ**—वि अडाणी -शर मरगळ पहा

**मर्जी**—स्त्री १ समति, इच्छा, आवड, पसती 'यजमानाचे मर्जीप्रमाणें वर्तावें' २ सुप्रसन्नता, कृपा, लोभ 'आताशीं त्याजवर मर्जी आहे' ३ स्वभाव, तब्यत, अतःकरणवृत्ति 'त्या पुरुषाची मर्जी कठीण' [अर मर्ज़ी] म्ह० मर्जी देवाची मिथ्या धाव मनाची **०खप्पा-बारीक होणें-जात राहणें**-नाखूष असणें, आवडनासा होणें 'श्रीमन स्वामींची बहुतच मर्जी बारीक जाली आहे'-रा १ २२८ **०जिंकणें**-आपलासा करून घेणें, मीड, दरारा चपणें, भीति नाहींशी होणें, उब जिंकणें पहा **मर्जीतून उतरणें-जाणें**-आवडनासा होणें, लोभ कृपा नाहींशी होणें **०बसणें** लोभ जडणें **०मोडणें**-एखाद्याला अप्रिय असें काहीं करणें, मन मोडणें, मर्जीविरुद्ध वागणें **०राखणें संभाळणें**-एखाद्याची कृपा लोभ टिकवणें, नाखूष न होईल अशा तऱ्हेनें वागणें **०संपादणें**-कृपा, लोभ सपादणें **मर्जीस उतरणें**-आवडणें, मनास येणें, पसत पडणें **०अजूर-आर्जू**-स्त्री

इच्छा -दिमरा १ २२२ ०खेरीज-क्रिवि ओरिवाहेर, इच्छेबाहेर 'आम्ही आजपावेतो तुमच्या मर्जीखेरीज नाहीं '-दिमरा २. १२४ ०माफक-क्रिवि मर्जीप्रमाणें (वर्तणें, होणें इ०) ०मिजाज-स्त्री प्रकृति, तब्येत 'नबाबाची मर्जीमिजाज विलक्षण जाली '-रा ३ ४११ ०मुबारक-स्त्री शुभेच्छा 'स्वामींचे मर्जी मुबारकेंत आल्यास मी विजयदुर्गाहून पुण्यास दर्शन ' -ऐटी १ ६७ ०रक्षण-न मर्जी, इच्छा, कृपा सांभाळणें ०संपादन-न कृपा, लोभ संपादन करणें

मर्तबान—न चिनी मातीचें भांडें, बरणी 'तीन जोडपा मर्तबानाच्या चिनीच्या, बरतीं झाकणी मुलामादार कुल्पी मज बूत '-रा २२ ३५ [अर मर्तबान्]

मर्त्य—पु मनुष्य, मानव -वि मरणशील, मरणारा [सं]

मर्द—पु १ पुरुष 'गाभाचा अम्मल दारवानी बायकी नव्द, गाजा मर्द हाय मर्द '-बाय ४ २ २ शूर, पराक्रमी, हिंमतदार मनुष्य 'पैका नाम राखा इज्जत व यश मर्दांचें '-प्रच ८८ ३ नवरा, स्त्रिया आपल्या नावापुढें व नवऱ्याच्या नावापूर्वी योजतात. ४ रखेली (मदारीण, कैकाडीण) आपल्या यजमानाच्या (विशेषत मुसलमान) नावापूर्वी हा शब्द पत्रांतून योजिते ' राणू मर्द इसमखान खडीवाले '[फेस मर्द, फा मर्द्] ०गाजी-माणूस-पु शूर, मर्द गडी, पराक्रमी माणूस मर्दा, मर्दाना-नी-वि १ शूर, धैर्यवान -मराभा ३६ २ (विशेषत मर्दानी) पुरुषी याच्या उलट जनानी [फा मर्दाना-नी] मर्दाई, मर्दपणा-स्त्रीपु १ धैर्य, धीटपणा, शौर्य, पराक्रम, पौरुष २ शौर्याची, पराक्रमाची कृत्यें मर्दाची मिशी स्त्री (पुरुषत्वाचें लक्षण) प्रौढी मारताना, दम देताना, धाक दाखवितांना पुरुष योजतात मर्दानगिरी, मर्दानगी-स्त्री मर्दुमकी, शौर्य, पौरुष 'ह जागा मर्दानगिरीची आहे '-ऐरपुले १ २१ परंतु टिपूची मर्दानगी व दिलेरी पाहून हे आपले चित्तांत भय मानून आहेत '-पदमव १०८ मर्दाना-पुरुषाची बैठक 'पार करून जनान्यात असतात येकादे-दिवसां आत दोन तीन घटिका मर्दाना करून काहीं जाव-साल होतो ' -रा ७ ११९ -वि मर्दा पहा मर्दानी-र्ना-वि १ पुरुषास योग्य साजेसें (वस्त्र, पोषाख इ०) याच्या उलट जनानी 'शिकारीसारखी मर्दानी मौज नाहीं असे पुरुष म्हणतात -बाय ३ ३ ' २ पुरुषी पुरुषांचा (आवाज इ०) ३ पुरुषी आवाजाची जरूरी असलेलें (गाणें इ०) ४ पुरुषासवर्धी ०खेळ-पु अंगमर्द मर्दीचा, पराक्रमाचा, ताकदीचा प्रयोग, खेळ मर्दामर्दी-स्त्री शौर्य, पौरुष पराक्रम मर्दुमी -क्रिवि १ धिगाईनें, शौर्यानें, मर्दपणानें २ पुरुषी धडाडीनें, उत्स्फूर्तानें इसमाच्या लोकांनीं कोणासच मदामर्दी शिडी टेंकून चढले '-बय ७४ 'त्यानें पैसा जवळ नसता मर्दामर्दी लग्न केलें ' ३ अतिशय श्रमानें, कष्टानें 'मर्दामर्दी तो चोर धरला ' ४ मोठ्या जुलमानें, सक्तीनें मर्दामर्दी तो बायको-जगरा 'मर्दी, मर्दुमी-स्त्री १ शौर्य, पराक्रम, साहस 'परशुराम रामचंद्र यांनी माठे मर्दुमीनें लढाई दिली ' -रा ११ ६१०४ २ शौर्याचें पराक्रमाचें, साहसी कृत्य-[फा]

मर्दुम-पु मनुष्य, माणूस [फा मर्दुम्] मर्दुमकी-मर्दी पहा 'मर्दुमकी शाबासकीचा मालक '-मोग्रचिटणव ६५

मर्देजान—वि गुदद्यांत दुसरें हाड राहतें असा (घोडा) असा घोडा खराब समजतात -अश्व १ १०४

मर्दणें—सक्रि १ चोळणें, चेपणें, रगडणें इ०; मर्दन करणें २ ठार मारणें 'तो करावया बदोद्वार। म्यां मर्दिला शतासुर।' -एभा २१ ३०३ [सं मर्दन] मर्दन-न १ चोळणें २ मळ करण्याची, चूर्ण करण्याची क्रिया; चुरडणें, चुरणें, दळणें, रगडणें इ० ३ (काव्य) कतल, ठार मारणें नाश [सं] मर्दनं गुणवर्धनं-(संस्कृत सुभाषित) १ औषधी द्रव्यें जों जों अधिक खलावीं तों तों तीं अधिक गुणकारी होतात २ विद्याभ्यास छडी मारल्यानें त्याची बुद्धि अधिक तरतर होते मर्दना-स्त्री स्नान, न्हाणें 'मग एव होय मर्दना। स्वामी माहेया।'-ऋ ७४ मर्दन्या-पु अंग रगडणारा मर्दित-वि १ मर्दन केलेलें, चोळलेलें, चपलेलें २ चुरडलेलें

मर्दल-ळ—पु एक वाद्य, तबला 'पणवादिकें ढोल। आनक तें मर्दळ।'-भीता १ ७७२ [सं मर्दल]

मर्दवाण—न लिसपान, उटीचें भांडें -राव्यको ३ १५ [फा]

मर्फा—पु लहान टिमकी, नगारा ह्यावर टिपरीनें ठोका मारून ताशाच्या मेळ्यामध्यें तालाची लय दाखविण्याकडे उपयोग करतात 'ताशे मर्फे ते अपूर्व किती वाजती।'-ऐपो ११९ [फा] मर्फाची, मर्फेकरी-पु मर्फा वाजविणारा -समारो २ ३

मर्म—न १ गूढ शक्ति, सूक्ष्म गुणधर्म, कार्यसाधक गुण (याचें अनुमान कार्यावरून होतें) 'सर्व पदार्थांमध्यें जीं ईश्वरानें मर्में ठेविलीं आहेत तीं थोडीच समजतात ' २ (शरीरादिकाचा) नाजूक भाग, अवयव; जिव्हाळी, वर्म ३ छिद्र, उणेपणा, व्यंग 'मर्म उघडिता, मानी पुरुष बुडाले प्रेतें, जड तरेले।'-मोआदि २४४७ ४ रहस्य गूढार्थ, खरा आतला हेतु (भाषण, लेख इ० चा,); तात्पर्य ५ मेख, मुद्दा, खोंच, रोख ६ कला, खुबी, गूढविद्या, युक्ति, गुरुकिल्ली (एखादें कोडें, रचना, क्रिया, धंदा इ० ची) 'अद्यापि श्लोक लावण्याचें मर्म तुला समजलें नाहीं ' 'घड्याळातलें मर्म कळत नाहीं '७ शत्रु अरि, नाशक, भंजक, उलट आणि प्रतिक्रिया करणाऱ्या गुणाची वस्तु 'केळ्यानें मर्म तूप, गव्हाचें मर्म काकडी '[सं] ०भेद-पु १ नाजूक भागावर

केलेला आघात, जिव्हाळीं झालेली जखम २ ( ल ) जिव्हाळीं लागणें, झोंबणें, मर्मस्पर्श ३ वर्म, युक्ति, वेत शोधून काढणें, खुबी, रहस्य हुडकणें, बिंग बाहेर काढणें, गूढपरिज्ञान ४ एखाद्याचा उणेपणा, व्यंग, दोष इ० चा स्फोट करणें, एखाद्याच्या मनाला झोंबेल अशा गोष्टी उघड करणें **०भेदक-भेदी, वेधक वेधी**-वि जिव्हाळीं स्पर्श करणारा, नाजूक भागाला जखम करणारा, बिंग उघडकीस आणणारा ( अक्षरश व ल ) **०वेत्ता**-वि मर्म जाणणारा, मर्मज्ञ **०स्थल-स्थान**-न १ नाजूक भाग, जिव्हाळी २ ( ल ) दोष, उणीव असलेलें स्थान, व्यंग **०स्पृक्**-वि नाजुक भागावर स्पर्श करणारा, जखम करणारा, चावा घेणारा ( अक्षरश व ल ), मर्मभेदी **०ज्ञ**-वि १ मर्म, गूढ, खुबी जाणणारा २ अत्यंत कुशल, निपुण, पंडित **मर्मणा**-वि मर्मज्ञ (अप ) 'मानवा सुजाणा मर्मणा सुजाणा।'-देप ११३. **मर्मान्वेषण**-न एखाद्याचें मर्म, उणेपणा शोधून काढणें, छिद्रान्वेषण ( अक्षरश व ल ) **मर्मान्वेषी**-वि मर्म, दोष, उणें शोधणारा, छिद्रान्वेषी **मर्मी**-वि १ गुप्त, गूढ गोष्टी जाणणारा २ एखाद्या गोष्टींत अत्यंत निपुण, कुशल, मर्मज्ञ ३ मर्मभेदी, भेदक, झोंबणारें, टीकात्मक ( भाषण ) **मर्मीक**-वि. (प्र ) मार्मिक पहा **मर्मोद्घाटक**-वि एखाद्याचें मर्म, दोषस्थल, कमीपणा उघडकीस आणणारा, मर्मभेदी **मर्मोद्घाटन**-न एखाद्याचें व्यंग, उणें, दोष उघडकीस आणणें, मर्मभेद

**मर्मर**—पु संगमरवरी दगड, आरसपान [ ग्री मार्मारो (मार्मेरो=प्रकाशणें ), लॅ मार्मोर, फा मर्मर ] **मर्मरी**-वि संगमरवरी, आरसपानी

**मर्यंत-ल**—वि. (व.) अत्यंत अशक्त, मरतुकडा [ मरणें हिं मरियल]

**मऱ्या**-वि अत्यंत रोड,मरतो आहे असा दिसणारा (माणूस, जनावर ) [ मरणें ]

**मर्यादा**—स्त्री १ सीमा, शेवट, इयत्ता, कड, हद्द ( स्थल, काल, क्रिया इ०ची ) २ ( ल ) संप्रदाय-शास्त्रसिद्ध रूढी, बंधन, दाब, नियम, अट 'जो विप्र आजिपासुनि मद्यप्राशन करील तो पापी। ब्रह्मघ्नासम निश्चित असि मर्यादा स्वयें कवि स्थापी।' -मोआदि ९ ५३ ३ शिष्टाचार, वर्तनाचा योग्यपणा, व्यवस्थित सभ्य वागणूक, विनीतता 'आजकालच्या मुलींना मर्यादाच कमी-एवढीच नाहीं म्हटलें तरी चालेल ' [ स ] **०मोडणें**-मर्यादा सीमा ओलांडणें, नियमबाह्य, क्रम सोडून वर्तन करणें **०राखणें**-आदरानें, शिष्टाचाराप्रमाणें वागणें **मर्याद**-शअ पावेतों, पर्यंत, अखेर, जसें-आकंठमर्याद भोजन केलें, श्रावण-काल-नदी-मर्याद **०दृष्टि**-स्त्री नजरकैद, साधी अटक 'रायें पाचारुनि तत। मर्याददृष्टि ठेविलें।'-ज्ञानप्रदीप १०१७ **०वेल, मर्यादावेल**-स्त्री समुद्रकाठची एक वेल 'जैसी मर्यादावेल उल्लंघून। प्रवेश नकरी समुद्रजीवन।'-भवि **०शीर-ल-ळ**-वि सभ्यपणानें वागणारा, शिष्टाचार न उल्लंघिणारा, विनीत, अदबशीर

शको ६ ५

**मऱ्यान**—स्त्री ( चंद्रपुरी ) घरामागील लहान वाडी

**मर्वारीद्**—पु मोतीं, मौक्तिक 'माळा.मर्वारीद '-ऐटि १११ [ फा ]

**मर्सूल**—वि प्रेषित, रवाना केलेलें [ अर मुर्सल ]

**मर्हमत, मऱ्हामत**—स्त्री कृपादान, दान 'जमीन मऱ्हामत केली असे '-रा ८ ६८ 'वगाऱ्याची सनद मुबारक-जगयास मर्हमत जाली -ऐटि १८ -वि दत्त स्वयंदत्त -राव्य ८ ४० [अर मर्हमत् ]

**मऱ्हाटा, मऱ्हाटी, मऱ्हाटी मोळा**— मराठा इ० पहा 'मजविवंकु सांगावा। मऱ्हाटा जी।' -ज्ञा ३ १७ जैशची नाव तरि मऱ्हाटी। परि षड्-दर्शनातें दळवटी।' -ऋ २४

**मऱ्हाटें**—न मराठ्याचें राज्य, अमदानी 'नी मी जव वर्ते तव मऱ्हाटें वर्तेल।' -नागदेवाचार्यस्मृति ९७

**मऱ्हाटें**—वि प्राकृत, सुगम 'येक म्हणती मऱ्हाट काये। हें तों भल्यासि ऐकों नये। -दा ७ १ ३८

**मऱ्हाष्ट-ष्ट्र**—(प्र ) महाराष्ट्र पहा 'पाहिलें नस्ता संस्कृती। रीग नाहीं मऱ्हाष्टग्रंथीं।' -दा ५ ६ ३३

**मल**—पु १ घाण, केर, कचरा २ शरीरांतील विष्ठा, मूत्र, घाम, शेंबूड, रक्त, नखें, अश्रु इ० उत्सर्ग ३ गाळ, रेंदा ४ गंज, कीट, तांबरा ५ दुष्ट वासना, दु स्वभाव, नैतिक पाप स्ववत्स मल भक्षिती परि न सर्वैया वाटती।'-केका ५८ मळ पहा [ स ] **०द्वार**-न ज्या वाटेनें विष्ठा पडते तो शरीराचा भाग, गुद **०पृष्ठ**-न पुस्तकाच्या आरंभीचें कोरें पान **०मास**-पु अधिक महिना 'मलमास क्रमल्या नंतर घेऊन जाणें '-पेद ८ ३८ **०मूत्र**-न ( भीतीमुळें ) विष्ठा, मूत्र यांचा उत्सर्ग होणें ( क्रि० करणें, होणें ) 'व्याघ्र पाहताच मलमूत्र झालें ' **०वस्त्र**-न केरकचऱ्यापासून रक्षण करण्यासाठीं घातलेलें वस्त्र ( देवाची मूर्ती इ०वर ) गवसणी, खोळ **०विसर्ग-विसर्जन**-पुन पोटांतील मळाचा उत्सर्ग, झाडा मलमूत्र पहा ( क्रि० करणें, होणें) **०शुद्धि**-स्त्री पोटांतील मळाचा उत्सर्ग झाल्यामुळें वाटणारी आंतड्याची शुद्धता, शौच **०स्नान, मलापकर्षस्नान** न केवळ शरीर स्वच्छ करण्यासाठींच केलेलें स्नान, याच्या उलट मंगलस्नान, अभ्यंगस्नान **मलावरोध मलावष्टंभ**-पु शौचास साफ न होणें, बद्धकोष्ठता **मलाशय,मलाचा कोठा**-पु आंतड्यांतील मलाची पिशवी, मलमार्ग **मलिन**-वि १ घाणेरडा, मळलेला, मळकट, खराब २ आचारहीन, पातकी 'मलिन कुटिल नीरस जडमजड पुनर्भवपणें हि कच पाच।'-मोआदि३ ६४

'यांधी मणिग्रमें यहु पुगला मलिन स्वभाव कपटानें।' –मोसभा ४.५५. ४ अपवित्र, अमंगळ; आत्मशुद्धतेकडे दुर्लक्ष करणारा. ५ अस्पष्ट, निस्तेज, उपरियन नसलेली (आवृत्ति नसल्यानें विद्या इ०) **मलोत्सर्ग, मलोत्सर्जन**-पुन. मलविसर्ग पहा.

**मलई**—स्त्री साय; दूध इ०पदार्थांवरील पापुद्रा. [हिं.]

**मलई**—स्त्री. १ दांडगाई; धिंगामस्ती; बखेडा; बेढावा, दंगा. (क्रि० करणें, मांडणें; माजविणें). 'कोळ्यांनीं रान तिसांन मलई करून सरकारचा मुलुख खराब केला.' –थोमारो १.२४५. २ गोंधळ, आरडाओरड; दंगल; गडबड (जमाव, सभा इ०ची). 'दक्षिणा घेतेवेळेस मलई केवढी!' ३ मनुष्यांचा अव्यवस्थित जमाव, घोळका, संकर (सर्व जातींचा, सोवळें-ओवळें इ०चा); गर्दी. 'त्यास धर्माधिकारी ब्राह्मणास मिळून मलई करितात.' –थाडसभा ३.१२० ४ (यावरून) खाणावळ; भटारखाना इ० [मल्ल. किंवा फा मला=जमाव] ०दार घिस्सा–पु (मल्लविद्या) एक हात जोडीदाराच्या फुल्यावर चढींत हात घालून आपला दुसरा हात जोडीदाराच्या डोक्यावर ठेवून त्याच बाजूचा आपला पाय जोडीदाराच्या आपल्याकडील हाताच्या कोपराच्या खवणींत घालून जोडीदारास चीत करणें.

**मलऊन**—वि शापित,शापार्ह; बहिष्कृत.' जमियत शायस्ता पैदा करून मिरा मलऊनानें मुलूक काबीज केला आहे. तो दस्तबज् पादशाहजीच्या आणील.' –रा १७.१६. [अर. मल्ऊन]

**मल(लि)कंवरी**—वि. मलिकंबराच्या अमदानींत शुरू झालेली (मोजणी, दर, धारा, शिरस्ता, तनखा, कमाल इ०). [मलिकंबर]

**मलखांब**—पु अंगात चपळता येण्यासाठीं कसरत करण्याकरिता तालमींत पुरलेला वाटोळा खांब [सं. मल्लस्तंभ]

**मलंग**—पु फकीराचा एक पंथ; दरवेशी. [हिं.]

**मलगंडा**—पु (व) अव्वल माल [का. गंडा=वरचढ]

**मलतंडी**—स्त्री. जोंधळ्याचें हलकें पीक –कृषि २६६.

**मलपणें**—अक्रि (वाप्र) १ उलट चालणें; चालतांना या बाजूस एकदां आणि त्या बाजूस एकदा असें होणें (विशेषतः मूल) 'सावळ्या बाणाचें मूल। कोणाचें एथें मलपत चालें।' २ (सामा) इकडून तिकडे हालणें; डोलणें 'मलपत घुसळिते गवळणी। तिचा पदर ढळतो मेदिनीं।' ३ चळवळणें; हलणें. 'लवथवित मलपे दोंद। वेष्ठित कर नागवंद।' –दा १.२ १६.

**मलरी**—स्त्री. (कु हेट) डोळ्याची पापणी.

**मलवारी**—वि. मलबार प्रांतासंबंधींचा. [सं. मलय, मलबार]

**मलम**—नपु जखम, खरूज इ०वर चोळण्याचें स्निग्ध औषध; अंजन, लेप. [फा. मल्हम्; अर मर्हम्] ०पट्टी–स्त्री जीवर मलम पसरून जखम इ०वर लावतात ती कापड, कागद, पान इ०ची पट्टी.

**मलमल-ली**—स्त्री. तलम, बारीक सुताचें कापड. [हिं.]

**मलमा**—पु १ पडक्या घराचें दगड, विटा, चुना इ०अव्यवस्थित पडलेलें सामान. २ (ना.) विहिरींतील गाळ (दगड, माती इ०). ३ (मल्माला उपयोगी असे) धाडोरे, धासकट वगैरे. [मल्म]

**मलय**—पु १ हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरील अरबी समुद्राला समांतर असी एक पर्वताची रांग; मलबारघाट. २ या पर्वताच्या लगतची किनाऱ्याची पट्टी; मलबारप्रांत. ३ मलाया द्वीपकल्प. [सं. द्रा. मल्ये=पर्वत] **मलयाग(गा)र**–पु. मलयपर्वतावरील चंदनाची एक उंची जात. 'कृष्णागर मलयागर परिमळ। देवदार वृक्ष तेथें।' –ह २३.१००. [सं मलय+अगरु]

**मलयानिल**–पु मलयपर्वतावरील सुगंधी वारा. 'सहजें मलयानिळु मंदु सुगंधु। तया अमृताचा होय स्वादु।' –ज्ञा ४.२२०.

**मलयी**–वि. मलाया द्वीपकल्पासंबंधाचा (रहिवासी, जिन्नस).

**मलया**—पु एक प्रकारचा मासा

**मलयी, मलाई**—स्त्री मलई पहा

**मलसूत्र-त्री**—(प्र.) मळसूत्र पहा.

**मलाधीजांव**—पु जांबाची एक जात –कृषि ७२०. [मलाक?]

**मलाड**—न मावळ प्रांत.

**मलिका**—स्त्री. राणी. [अर] ०मुअज्जमा–स्त्री. थोर राणी; महाराणी.

**मलिदा**—पु १ दूध, साखर, लोणी इ० पदार्थ कणकेमध्यें घालून केलेलें मुसलमान लोक पिरास देतात तें पक्वान्न २ (ल.) तिंबलेली, मळलेली, ठेंचलेली कोणतीहि वस्तु. ३ (सामा.) खुराक; पौष्टिक अन्न. 'न्याय असा जगतीं, दिसे कीं। चाकरा मलिदा मिळे धन्याला धत्तूरा हातीं।' [फा. मालिदा] ०करणें–१ गुधडणें. २ तिंबणें; बडविणें, कणीक मऊ करणें

**मलियाड**—पु मलबार प्रांत –अभप १ ३४.

**मलीक**—पु राजा. [अर. मलिक्] ०नवीस–पु राजचिटणीस. ०मैदान–स्त्री. रणराजा; विजापूर येथील सुप्रसिद्ध तोफेचें नाव. (चुकीनें) मुलुखमैदान.

**मलुहाकेदार**—पु (संगीत) एक राग. ह्यात षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात आरोहात ऋषभ व धैवत वर्ज्य. जाति औडुव संपूर्ण वादी मध्यम, संवादि षड्ज गानसमय रात्रीचा पहिला प्रहर.

**मलूल-र**—वि. १ क्लांत; निस्तेज; कोमेजलेला; उदास. 'मलूल होऊन शर्मिंदी जाहली.' –भाअ १८३४. २ खिन्न, शोकग्रस्त. ३ अशक्त, कमजोर, गरीब, निर्वीर्य (प्राणी, माणूस).

४ नादुरुस्त (गात्र, अवयव) ५ मऊ, नरम, निर्जीव (कातडें) [अर मलूल]

**मलेथी**—स्त्री ज्यष्टमधाचें मूळ

**मलेरिया**—पु डास चावून येणारा हिंवताप, कर्दमोत्थित ज्वर [इं]

**मल्फूफ**—वि गुडाळलेलें 'पत्र बाबासाहेबाचे पत्रात मल्फूफ करून पाठविलें '–रा १ १९० [अर मल्फूफ्]

**मल्बूस**—पु कापड –वि पेहरलेला 'रजाई शाल्नामी मल्बूस-खास इनायत जाली '–दिमरा २ १३७ [अर]

**मल्या**—पु गोड पाण्यात राहणारा एक मासा

**मल्ल**—पु १ पहिलवान, जेठी २ धदवार्इक मुष्टियुद्ध करणारा, मुष्टियोद्धा, ठोंसाठोंसीवाला ३ (ल) धडधाकट, धट्टाकट्टा, मजबूत, जोमदार मनुष्य [स] ०क्रीडा–स्त्री आखाड्यातील कुस्ती, डावपेंच, मुष्टियुद्ध ०खाव–पु मल्खाव पहा ०भू–स्त्री १ कुस्ती इ० खेळण्यासाठीं केलेली जागा, आखाडा २ (ल) युद्धक्षेत्र; रणभूमि ०युद्ध–न कुस्ती, बाहुयुद्ध 'रथाखालीं उतरून। मल्युद्ध आरंभिलें।'. मल्लई–स्त्री गोंधळ, गोंगाट, दाडगाई मलई पहा मल्ली–वि समर्थ. –शर.

**मल्ला**—पु घोड्याच्या पायास होणारा एक रोग –अश्वप २ २८२

**मल्लाररा(शा)ई मल्हारराई**—वि. मल्हारराव रास्ते यानीं पाडलेलें (नाणें, रुपया इ०), मल्हाररावरास्ते याच्या राज्यासबंधीं

**मल्लारि-री, मल्हारी-र**—पु शिवाचा एक अवतार, खंडोबा, खंडराव 'माता म्हणे म्हारी पूर्ण। हरि तुजवरी क्षोभला।'–ह ९ १९९ [स मल्ल+अरि]

**मल्लाह**—पु (काशी) नावाडी [अर]

**मल्लिका**—स्त्री १ ज्याचे पाय आणि चोंच पिंगट आहेत असा हंस २ पांढरी जाई, मोगरा [स] **मल्लिकार्जुन**–पु बारा ज्योतिर्लिंगापैकीं एक **मल्लिकाक्ष**–वि ज्याच्या डोळ्यातील बाहुली काहीं पाढरी आणि काहीं काळी अशा रंगेनें वेष्टिली आहे असा (घोडा) –अश्वप १ २१

**मल्लु-ल्लू**—पु (ना व) वानर, माकड

**मल्हार**—पु (संगीत) एक राग 'अलापिता मल्हार येव तर्ठी मेघमडळा-हुन गळती। –प्रला २३६.

**मवकुफ**—वि तहकूब, थांबविलेलें 'स्वारी तिकडील स्वारी मवकुफ।'–दावि २९३ [अर मौकूफ्]

**मवणें**—सक्रि १ लिहून ठेवणें दाखल करणें 'सिसे वेंचि तया मविजे। वही जरीं।'–ज्ञा १८ ९१२ २ मोजणें 'साउली वरी न मवे।'–अमृ ५ २६ [स मा–मापव, प्रा मव] **मवणी**–स्त्री १ गणना, मोजणी, माप 'तें येक नक्षत्र प्रतिदिनीं मोगिजेतसे चंद्रें गगनीं। या चचळपणाची मवणी। श्रेष्ठ करोतु सुखें।'–स्वादि १२ २ ४० २ घोकणी 'ते योगपटाची मवणी। जीवीं अनियम चिंतवणी।'–ज्ञा १६ ३३२ **मावता**–वि मोजणारा 'साउलीवरी न मवबे। मविलें जैसें।'–अमृ ५ २६ **मविलें**–वि मोजलेलें

**मवसर, मव्सर**—पु १ पैसा, धन, वित्त २ ताकद, ऐपत, सामर्थ्य 'कर्ज–बाम जालें तें वारायास मव्सर नाहीं '–वाडशाछ ८३ –वि १ लायक, समर्थ, ऐपतदार 'त्यास हे नादार यावयास मवसर नाहींत '–वाडथाबा २ २४ २ प्राप्त अनुकूल 'ताळुक्याची तमाम तारुत व ताराजी होऊन कोठील पैसा या दिवसात मवसर नाहीं '–रा ५ १४५ [अर मुव स्सल्] **०हाल**–क्रिवि ऐपतीप्रमाणें 'मवसर–हाल गुन्हेगारी '–इंऐ ५ ४९

**मवसुफ-फ**—वि उपर्युक्त, मशारनिल्हे, वर दर्शविलेले 'त्यास हलीं नवाब मवसुफ याजकडे यावयाचा करार केला असे '–समारो १ ३२८ [अर मौसुफ]

**मवा**—पु विशिष्ट पिकावर पडणारा एक रोग

**मवाई**—स्त्री (काव्य) मऊपणा, मृदुता [मऊ]

**मवाखजा**—पु भाडण 'काहीं मवाखजा मध्यें नसावा '–दिमरा १ ४५ [अर मुवाखज़ा]

**मवाग**—स्त्री मदाग्नि सौम्य आच [मऊ+आग] **मवागीं टाकणें**–मद अग्नीवर ठेवणें, धरणें **मवागी-ग्नी**–स्त्रीपु मद अग्नि 'निजबोध मवाग्नीनें तातविलीं।'–सप्र १५ ७ **मवागीत**–वि सौम्य, मद (विस्तव, आंच) **मवागींत मवागीं**–क्रिवि शक लागल असें मदाग्नीवर (शिजविणें इ०), मद ज्यार्तीनें, सौम्यपणें (विस्तव पेटणें, जळणें)

**मवागी-री**–स्त्री १ लोणी इ० स्निग्ध पदार्थ 'लोणकडे शुद्ध नाहीं कडूपणाची मवारी।'–सला ८१ २ तुपावरचा कणीचा पापुद्रा 'तुपावर चागली मवारी आली आहे' ३ कातडें नरमावण्याच्या क्रियेंत लावतात तीं दहीं, हळद इ० द्रव्यें समुच्च यानें गोरसन पहा [मऊ]

**मवाज(जी)न**—पु मशिदीची वाग पुकारणारा, मोअजीन [अर मुअज़्ज़िन्] **मवाजनी**–स्त्री मवाजनाची वृत्ति, काम 'शख अबदुल समद यास खिजमत मवाजनीची मशीद मजकूरची चालवीत आहों '–वाडसनदा २८

**मवाजने-नवीस**—पु अस्सलावरून ताडून पाहून नक्कल दप्तरीं नमूद करणारा 'मवाजनेनवीस त्याच दप्तरीं नक्कल लिव्हून लाविली '–रा २० १८. [अर मुवाज़ना=तुलना]

**मवाजा-ज्या**—पु चर्चा, ऊहापोह हजरत बरखास्त झालियावर तुम्हीं आम्हीं बसून तहनाम्याचा मवाज्या करू '-रा ५ ७ [अर मुवाजआ]

**मवाझी**—स्त्री जुळती आदिलशाही फर्मानें [अर ]

**मवाफी(फि)क**—क्रिवि ' प्रमाणें माफक ' तावीद असे त्या मवाफीक चालविजे '-रा १५ १६७ [अर मुवाफिक्]

**मवाली**—वि गुंड, उडाणटप्पू पुंड ' त्या गावात मवाली लोकांनीं अत्याचार केले '-के १७ ५ ३० मवाशी-सी पहा [ ? सि मवाली=व्यसनी ]

**मवाली-पन्हा**—वि उच्च गुणांनीं युक्त -रा १५ ५६ [अर मआली ]

**मवास**—पु १ लुटारूच्या टोळीचा नायक स्वतंत्र अधिपति, राजा इ० ' परंतु जमीनदार मवास मोठमोठे आहेत ' -इम २६१ २ लुटारू, बडखोर; चोर सपत्तिस तो मवास येउनि । '-अमृत २७ ३ अनिर्बंद्ध वागणारीं, आडदांड, अटकणारीं गुरेंढोरें, बदमाष लोक इ० समुच्चयानें ४ लुटारूची टोळी [अर मुआसी] **मवाशी-सी**-स्त्री लुटारूची राहणी, सरणी, लुटारूपणा -पया ८३ -पु बडखोर, लुटारू, पुंड मवास पहा [अर मुआसी ]

**मवाळ**—वि १ तेल इ० स्निग्ध पदार्थ लावल्यानें नरम पडलेलें २ (ल) आकर्षक हळुवार मृदु (भाषण वागणूक स्वभाव इ०) त वेंचिती मनें मवाळें। चकोरतलगें । '-ज्ञा१ ५६ ३ (सामा) मऊ मृदु नरम मृदु मवाळ वालुका पहा हो । दुग्धवर्ण जलप्रवाहो -मुआदि २२ ३५ ४ समुद्रकाठची, बांध घालून खारें पाणी न येईल अशी केलेली, खार जमिनींतील मउ असरलेली (जमीन) ५ राजकारणात सरकारच्या धोरणास विशेष विरोध न करणारा प्रागतिक (एक पक्ष) [स मृदुल-मडल-मवळ-मवाळ राजवाडे ग्रथमाला मऊ] **मवाळ पक्ष**-पु सरकारजवळ नम्रपणानें न्याय दाद मागणारा राजकारणातील पक्ष (इ) मॉडरेट पार्टी याजबद्दल बनविलेला प्रतिशब्द याच्या उलट जहाल पक्ष **मवाळी** स्त्री १ तल पाणी इ०त्वचा मऊ करणारा पदार्थ मवाग २ (ल) मऊपणा सौम्यपणा मार्दव नरमाई सर्पा ऱ्गीची मवाळी। -मुआदि ३५ १३० **मवाळु**-वि मायाळु प्रमळ मृदु मवाळ दिसाचा दयाळु मनाचा मवाळु । '-राम ५६

**मवाळें**—न हत्तीच्या दाताना घातलेलें कडें बट वडें शेंची हत्तीचे दातास मवाळें बसवून घणें -ऐरापुप्र ९ ५०१

**मवेश**—पु मायचा स्वामी -शर [स माया म माव+ ईश ]

**मवेशी**—स्त्री १ हक्काचा माल मालमत्ता ' आपण मवेशी नेली असेल ती देवावी -रा २२ ३९ २ गुरें-ढोरें [अर.] ०इस्पितळ-न गुराचा दवाखाना

**मव्जुद**—वि मौजूद पहा [फा ]

**मव्हर**—पु (व) पुढारी अग्रणी, म्होरक्या -क्रिवि पुढें, म्होर [स मुखर] **मव्हरें**-क्रिवि (खा) पुढें म्होर

**मश**—स्त्री मस पहा

**मश(स, श्य)क**—पु १ चिलट डास, मच्छर ' कीं राजहसा पुढें मशका ' लघू मश्यकाच परी रूप केले।'-राक ४८ २ (ल) क पदार्थ 'द्वारका पाहता वाटे थोडें । मशक त्यापुढें सत्य लोक । '-एरुस्व ३ १४ [स मशक ]

**मशक**—न १ पाणी ठेवण्याची चर्मी पिशवी, पखाल मसक २ एक वाद्य [अर मश्क् ]

**मशगूल, मश्गूल**—वि तत्पर गढलेला, दग, चुर, निमग्न -रा २० २८६ [अर मश्घूल]

**मशमूल**—वि प्रविष्ट केला गेलेला, सामील केलेला -आदिलशाही फर्मानें [अर मश्मूल ]

**मश(स)रु, मश्रू**—स्त्री गर्भरेशमी कापड, गजनीचें कापड [अर मश्रूअ]

**मशहूल-अनाम मश्हूल अनाम मशुरुल् अनाम**—पु (लोकप्रसिद्ध लोकमान्य या अर्थी) सरकारी सनद कागदपत्र इ० त ज्यास पत्र लिहितात त्यास योजावयाची एक सन्मानाची पदवी जसें मश्हूल अनाम रामचद्र देशमुख [अर मश्हूर =प्रसिद्ध+अनाम्=लोक ]

**मशहूर मश्हूर**—वि मश्हूर प्रख्यात प्रसिद्ध ' दुनियाईंत दोही दौलतींची एगानगत मशहूर रा ५ ३१ [अर मश्हूर] **मशहुरुल-मश्हूरुल हजरत** वि (एक मायना) राजप्रसिद्ध राज्यमान्य

**मशाप(य)ख मषायक**—पु धर्मात्मा धर्मशास्त्रज्ञ ' अलीजाह यानीं कोणी मशाएख पीर-जादा शाह त्याचे लकीर्शी निका लाविला -रा ५ १०७ [अर मशाइख्]

**मशाग(क)त**—स्त्री १ मेहनत परिश्रम श्रम कष्ट मशागत कलिया लेवाम सरजाम करून द्यावा -सभासद २३ २ सवा चाकरी तैसच अण्णाजीपत यानीं माटी मशागत केली यास्तव यथारीती सन्मान केला -चित्रगुप्त ५ ३ मजुरी वेतन मजी मशागत द्यावन दे म्हणून मी जातों ' ४ काबाडकष्ट करून अत्यत परिश्रमानें (शेत इ०) तयार करणें शाची नरी मशागत केली तर्में पिकतें ' ५ निगा, काळजी [अर मशक्कत्] **मशाग ती**-वि १ मशागत करणारा कष्टाचीं कामें करून पोट भरणारा मजूर २ कष्टाळू उद्योगी कामसु मेहनती

**मशारनिलें-ल्हे, मशार्निलें-ल्हे**—वि वर सांगितलेला, उपरिनिर्दिष्ट मजकूर (मनुष्याच्या नावाबद्दल, एकदा येऊन गेल्यानंतर पुन्हा आल्यावर विशेषत सनदा, दप्तरी पत्रें, दस्त ऐवज इ० त उपयोग) 'सालगुदस्तापासून मशारनिलेचा अमल मागलाकडे दिला '-थोमारो ११३ [अर मशारुन्-इलैह्]

**मशाल**—स्त्री काठीच्या टोंकास चिंध्या गुंडाळून केलेली दिवटी, हिलाल (क्रि० चेतणें, पेटणें, लावणें) [अर मश्अल्] **०पाजळणें-दिवसा लावणें**-(ल) प्रसिद्धि पावणें **मशालची-जी**-पु मशाल, दिवटी धरणारा, दिवट्या 'मशालची याची तैनात सर्कारातून पावत आहे '-रा ७ [अर मश्अल्ची] म्ह० १ दस घर ज्यादा मागना पण मशालजी रखना २ उल्लूका भाई मशालजी

**मशिंग**—पु (गो) शेवग्याचें झाड

**मशी**—स्त्री (गुज) बाजरीवरील कीड ही बाजरीच्या काडाचीं पानें खात व त्यामुळें काड कमजोर होतें -कृषि २८१ [स मषी ?]

**मशी-षी-सी**—स्त्री १ काळी शाई 'मग काजळा आणि मसी। न दिसे विवंचना जैसी। -ज्ञा १७ ७० २ काजळी 'कीर्तीच्या वदनासि लाविति मषी वाटूनिया लेप हा।'-मोकृष्ण ७४ १४ ३ चुलीवर ठेवलेल्या भांड्याच्या बुडावर जमतो तो काळा थर ४ जळलेल्या चिरगूट, कागद इ० ची राख [स मषी] **०पात्र**-न दौत **मसीपत्र**-न शाईनें लिहिलेला कागद 'मसीपत्र ते कव्हड।'-राज्ञाभग

**मशीं-सीं**—(काव्य) माझ्याशीं, मला, मजशीं 'मसीं आता कृष्णा तिळभरि दुजाभाव न धरी।'-सारुह ६ १५७

**मशी(सी)द**—स्त्री १ मुसलमानाचें प्रार्थनामंदिर २ (ल) मनुष्य-वस्तुरहित मोठें घर, वाडा इ० भयाण जागा ३ चुन्यानें घुमटी पाढरी केलेली जागा [अर मस्जिद्] म्ह० (सामा) चुकला फकीर मशिदींत शोधावा नमाज करता मशीद गळ्यात पडली

**मशीन**—न १ यत्र २ शिवण्याचें यत्र [इ] **०मारणें**-मशीन चालवून कापडा शिवणें

**मशा(शे)री**—स्त्री १ मशी पहा २ (कु) तंबाखु जाळून तयार केलेलें दातवण [मशी]

**मशेर**—पु एक मासा -प्राणिमो ८१

**मश्राफ**—पु खर्च, व्ययलेख -राज्यको ८ ९७ [अर मसारफ]

**मश्रूदारेस-ओळ, मशादर रेघ-ओळ**—स्त्री मसुदर रेघ पहा

**मश्वरा**—पु सल्लामसलत, जावसाल '(जनेरल कोट) काहीं मश्वरा करावयास आला आहे '-दिमरा १ ९१ [अर]

**मश्हूद**—वि व्यक्त, सिद्ध 'मश्हूद आ के '-प्या ३८३ [अर मश्हूद्]

**मस**—पु शरीरावरचा लहान काळा ठिपका, तीळ, चामखीळ [स माष, प्रा मस]

**मस**—स्त्री १ काजळ, चुलीवर ठेवलेल्या भांड्याच्या बुडाचा काळा थर, मशी पहा 'का अधारासि मसीं माखिलें।'-एभा २१.१८६ २ (ल) डाग कलंक [स मषी] **तोंडास मस लागणें**-काहीं एक आरोप येऊन अप्रतिष्ठा होणें, तोंड काळें होणें **मसकूट**-क्रिवि अत्यंत, अतिशय, फार ह्या अर्थी काळा या शब्दास जोडून येणारा शब्द जसें-काळा मसकूट

**मस**—सना (राजा) मला 'मस ठाव नाहीं!'

**मस**—क्रिवि (व) पुरेसा, पुष्कळ, रगड, खूप, मस्त पहा [मस्त]

**मसक**—क्रिवि (संगीत) गाता गाता किंवा वाजविता वाजविता एकदम जलदीनें वरील तिसऱ्या स्वरावर जाणें

**मसक**—स्त्री १ खांकेंत अडकविण्याची पाण्याची कातडी पिशवी, पखाल 'येर वेठ्या पोट भरी। चाम मसकाचे परी।'-तुगा २५५१ २ पोट [फा मश्क्] **०भिस्ती**-पु खांद्यावरून पखाल वाहणारा भिस्ती, याच्या उलट बैलभिस्ती

**मसकणें**—अकि तुकडे तुकडे, चुरा होणें (पोळी इ०चा) (सामा) जाणें ह्या क्रियापदाबरोबर उपयोग जसें-मसकून जाणें

**मसकणें**—(विरु) मुसकणें, मुसकटणें पहा

**मसकती**—वि मसकतचा, मसकत शहरासंबंधींचा

**मसका**—पु १ लोणी २ मिश्रण [फा मस्क, हिं मस्का]

**मसंड**—न (गो) मसणवट मसण पहा

**मसण**—न प्रेतें जाळण्याची किंवा पुरण्याची जागा, स्मशान 'अग्नीचा परम सण क्षणात मासे पुरी भयंकर मसण।'-मो रामायणें १ ३४३ [स स्मशान, प्रा मसाण] म्ह० आचरट खाणें मसणात जाणें **०उठणें**-ज्या ठिकाणीं लढाईत भयंकर प्राणहानि झाली असेल किंवा जेथें असंख्य लोक जाळले गेले अस तील अशा जागेबद्दल योजतात **०जागविणें**-स्मशानातील पिशा चाना उठवून त्याना काहीं अद्भुत करावयास लावणें **०माजणें**-भरमसाट अतिशय दाट वाढणें (गवत, गवत इ०) **मसणात गोवऱ्या-हाडें जाणें**-मरणाच्या पंथाला लागलेला असणें वयातीत असणें **मसणात-मसणीं दिवा लावणें**-कोणतेंहि उच्छृंखलपणाचें अशास्त्रीय, अयोग्य, निरर्थक कृत्य करणें **मस णात देखील फावल्याचा उपद्रव**-कोणत्याहि स्थळीं-परि स्थितींत विश्रांति न मिळणें **मसणांतून आढून काढणें**-अनक

उपाय करून मरणोन्मुख माणसाला बरें करणें **मसणांतून ओढून काढलेला**-वि कोणतेंहि काम करण्यास असमर्थ, अत्यंत अशक्त, रोड किडकिडीत (माणूस) **०कुटी**-स्त्री (गो) स्मशानभूमि **०खाई**-स्त्री १ प्रेतें जाळण्याची गोरगट अशी जमीन २ (ल) सूड मार्टे (स्मशानाप्रमाणें) भयाण ओसाड पर **०खुंट**-पु आरिष्ट, बायकामुळें इ० नसून विना व द्रव्य घेना-येच असलेला अमङ्गळ, घरपुरा माणूस **०फर्टे**-न (गो) १ स्मशानांत दिड वण्याकरितां शिप्रविनात तें अग २ (ल) रुचि मसलेंत चेंगन **०घट-टी-टा**-स्त्रीपु स्मशानभूमि **मसणा**-वि १ ज्याचें नांव आपणास माहीत नाहीं किंवा ज्याचें नांव मागणें अप्रिय किंवा इष्ट नाहीं अशा माणसाबद्दल योजनांत फलाणा, कोणीतरी, गोमाजी २ रागामध्यें संबोधनार्थ योजावयाचा शब्द 'अरे मसण्या तुला शंभर वेळ सांगितलें तरी तू तसाच'

**मसंदणें, मसंदळणें**—सक्रि (य) जास्त कुसकरणें, चुर गळणें, दाबणें फार हाताळणें, खराब करणें (खाद्यपदार्थ, वणीक, फुलें इ० मृदु पदार्थ)

**मसन, मसनखाई, मसनखुंट**—मसण, मसणखाई इ० पहा

**मसनद मस्नद**—स्त्री गादी, सिंहासन, तख्त 'फिरोन फत्तेच्या मस्नदीवर बसविला।'-इम २४० [अर मस्नद्] **०नशी**-स्त्री १ सिंहासनारोहण २ राजधानी 'कर्नाट् मकाण नामो मस्नदनशीचे। -पया ४७५ [फा मस्नदनिशीनी] **०नशीन**-वि गादी-तख्तनशीन, तख्तावर बसलेला, असलेला (राजा) [फा मस्नद्निशीन्]

**मसबदार**—पु १ मुनसफ न्यायाधीश २ पंचाईतीचा सभा सद एर पंच मनसबदार पहा [फा मन्सब्दार]

**मसमी भिकण**—स्त्रीअव (गो) मुडमुगाच्या शेंगा

**मसमू**—वि पक्का, कायम, स्थिर केलेला, ठरविलेला (शब्दश व ल) [अर मुसम्मम्]

**मसरें**—नअव १ खडक २ म्हशी व रेडे यांचा थाळका [म्हैस]

**मसरत-नमन**—वि आनंददायक खत मसरत-नमत पाठविलें तें नक्त वस्ती पावोंचलें'-पया ४६४ [अर मसर्रत्= आनंद फा मसर्रत् नमत्]

**मसलत मसल्त**—स्त्री १ विचारविनिमय करणें योजना, बेत निश्चय करणें २ युक्ति बेत कट डाव हिकमत मोंगलाई मसलत =कपटव्यवहार ३ सल्ला, योग्य विचार उपदेश (क्रि० सांगणें) ४ हुशारीनें केलेली यातना प्रयत्न हा लोकापासून मोठ्या मसलतीनें पैका ओरपला' ५ मोहीम स्वारी 'भागा नगर व विजापूर दोनी मसलती तरून हस्तगत जाली'-मराचिस १९ ६ अंगीकृत कार्य 'सर्वांनीं एके जागा राहून मसलत बुड वावी हें टीक नाहीं'-भाव ८ ७ युद्धाची तयारी, फौजफाटा 'करवीरकरांची मसलत म्हणजे थोडी असा समज हुजूर आहे, परंतु याचा पेंच उत्कृष्ट.'-ख ११ ५७६४ -वि योग्य, इष्ट, उचित याउपर इकडे येणें मसलत नाहीं, माळव्यात रहावें'-ऐच १७ [अर मस्लहत्] **०पडणें**-पचाईत पडणें, पेंचात सांप डणें, युक्ति, इलाज केला पाहिजे असा प्रसंग प्राप्त होणें 'तुम्ही करा म्हणतां पण मला मोटी मसलत पडली' **०दार-गार**-वि सल्लागार, मंत्री, मनसुबदार **मसलतबाज, मसलती**-वि १ धूर्त, चतुर, कारवाज, धोरणी २ मसलतदार पहा **०शीर**-पु सल्लागार 'निशाणास तुम्हीच मसलतशीर सोबतीस दुसरें कोण्ही नाहीं'-स ८४५ -वि माहितगार, मोहिमेवर असलेला 'खावंद मसलतशीर असल्यास तुम्ही एक दोन सालचा अगाऊ ऐवज सरकारांत द्यावा'-रा १ ३३६

**मसलंद**—स्त्री अंबारीचा मध्यभाग (ह्यावर घुमटी असते), महालाची बसण्याची जागा आणि खवासखाना यांच्यामधील (मालकाची बसण्याची) जागा [अर मसनद् ?]

**मसा**—पु १ मांसवृद्धि, चामखीळ, मस २ घोड्याच्या पायास होणारा एक रोग [स माष हिं मसा]

**मसाण, मसाणखुंट**—मसण, मसणखुंट इ० पहा

**मसाद**—स्त्री १ जमिनीची मोजणी २ (व) मातीच्या भिंतीचें तीन हात उंचीचें बांधकाम [अर मसाहत] **मसादी**-वि जमिनीच्या मापणीचा (खरडा, दिशेव, वरीज, अटकळ)

**मसादा**—पु मदत, त्यासाठीं दिलेला पैसा 'लोकास जमि-यत आणावयाकरितां मसादा दिला आहे'-रा ५ १००. [अर मुसाअदा]

**मसान्या ऊद**—पु (व) कंदिर, काडचोर, काळमांजर

**मसार**—वि विरल मुळीक नसलेली, वाळूमिश्रित (जमीन) [का मसार=तांबडी जमीन]

**मसारगर्भ मासरमणि**—पु एक रत्न हें हल्लीं प्रचारात नाहीं याच अंगीं एकत्र केलेलें दूध आणि पाणी निरनिराळें कर ण्याचा धर्म असतो याचा रंग श्याम असतो [स मसारक, हिं मसार=पाचू, मरकत]

**मसाला**—पु १ कांहीं खाद्य, पेय, औषध इ० अधिक गुण कर व रुचिकर करण्यासाठीं घालतात ते पदार्थ समुच्चयानें (भाजीत हिंग मिरें इ०-सिरीत, लाइत लवंग वेलदोडे इ० -जनावराच्या पौष्टिक औषधात गूळ, मेदा भाग इ०) २ तोंडीं लावणें, खार लोणचें, व्यंजन ३ (सामा) मिश्रणातील द्रव्यें जसें-चुन्याचा मसाला रंगाचा मसाला ४ सरकारनें जबानीसाठीं बोलावलेल्या आरोपीपासून न्याय देण्यापूर्वी घेतलेला पैसा खर्च 'त्यावरून सरकारातून राजश्री बाळाजी महादेव याजकडे मनसबीविशीं पत्र

दिल्हे त्यानीं आपल्यास मसाला करून आणिले '–योमारो २ १५२ ५ वसुल करावयास गेलेल्या शिपायाला सरकारी चिठ्ठीत लिहिलेलें द्यावें लागतें तें द्रव्य 'त्याजवर कोपायमान होऊन ढालाईन व दहा हजार रुपये मसाला करून पाठविले '–भाव १०१ ६ निरनिराळया निमित्तानें बसविलेले दंड, दस्त 'त्या वरून तुम्हीं लोहवाडीच्या पाटलास वीस रुपये मसाला घेतला '–वाग्बाबा २ ७८ ७ सामान सामुग्री साहित्य ८ (ओतकाम) डामर आणि विस्कर याचा एकजीव करून केलेली ओतकामाची माती [अर मसाल्हि मस्लहतचें अव ] **मसालेदार**–वि मसाल्यानें युक्त, मसाला घालून स्वादिष्ट केलेला ( खाद्य, पेय इ० पदार्थ )

**मसि(सी)हा**—पु तारणारा, ख्रिस्त –वि इसवी, ख्रिस्ती 'सन १७९६ मसीहा '–पदमव ८५ [अर मसीह]

**मसुदररघ-ओळ**—स्त्री शूद्र मुसलमान किंवा स्वत पेक्षा हलक्या दर्जाच्या लोकास लिहिलेल्या पत्राच्या चार रकान्यापैकीं पहिल्या तीन रकान्यात ओढलेली रेघ [ हिं मस्तर+म रघ]

**मसु(सो)दा**—पु कच्चा खर्डा, पक्क करण्यापूर्वीचें पहिले लिखाण आराखडा 'मसोदही पाठवून, तेथून ठरून खचित आज्ञा आल्यावर इनायत-नामे त्याप्रमाणें द्याव '–रा ५ १९५ [अर मुस्वद]

**मसुरा**—पु धान्य साठविण्यासाठीं भिंतींत ठेविलेली पोकळ जागा

**मसुरल् दौलत-हजरत**—वि राजमान्य [फा ]

**मसूर**—स्त्री एक प्रकारचें द्विदल धान्य [स ] **मसूरी मिरची**–स्त्री मिरचीची एक जात **मसूरिका, मसूरी, मसूर्या देवी**–स्त्री देवीच्या रोगाचा एक प्रकार ह्यात अंगा वर मसुरीच्या आकाराचे फोड येतात

**मसूरघोडी**—स्त्री मुलाचा एक खेळ –मखेपु ९१

**मसैरें**—न १ अंधार काळोख 'तें अज्ञान जैं समूळ तुटे। तैं भ्रातींचें मसैरें फिटे।'–ज्ञा ५ ८३ २ काजळ [मस मशी]

**मसोटी**—स्त्री (वे ) स्मशान, मसणवट

**मस्क**—पु कस्तुरी [फा मुश्क्]

**मस्करी**—पु सन्यासी [स मस्करिन्]

**मस्करी**—स्त्री थट्टा चेष्टा विनोद टवाळी कुचाळी [अर मस्खरा=गमत्या ] **मस्करीचा कुस्करी-होणें**–चेष्टेचें पर्यवसान भांडणात होणें **मस्कऱ्या**–पु विदूषक गमत्या [अर मस्खरा]

**मस्त**—वि मत्त पहा १ धुंद उन्मत्त गर्विष्ठ २ धष्टपुष्ट लठ्ठ मोठा ३ (कुण ) विपुल पुष्कळ भरपूर खूप 'सुर समस्त इच्यावर निश्चयें। सुरस मस्त असें वदले स्वयें। –र ४७ ४ (व ) मनाजोगा चागला [फा मस्त=तर्र] म्ह० पडेल हस्त तर पिकेल मस्त **०खोर**–वि मस्तीखोर उन्मत्त 'आला अफजल मस्तखोर वर्पगी ग्रासावयाला झणीं।'–चित्रगुप्त ११ **०जाप** (गा )मस्ती येणें **०चाल**–वि उन्मत्त माजलेला मार्कोरी, मगरूर **मस्ता-स्त्या**–वि १ अमली पदार्थाच्या सेवनानें तर्र झालेला, पिंगलेला २ (ल ) उन्मत्त उर्मट चढेल ३ उधळलेला, बेफाम सुटलेला ( घोडा ) **मस्तावणें** अक्रि मस्त होणें माजणें, गर्वानें फुगून जाणें, मगरूर होणें

**मस्तक**—पुन १ डोकें शिर २ कोणत्याहि पदार्थाचा वरचा भाग शिरोभाग [स ] म्ह० दोन हस्तक आणि तिसरें मस्तक **०टेंगणें, करणें**–नम्रतेनें वागणें गर्व ताठा, अभिमान सोडून देणें करी मस्तक टेंगणा। लागे संताचिया चरणा। –तुगा **०डोलविणें**–मान्यता स्वीकार अनुमोदन समाधान इ० दर्शविण्यावरिता मान डोलविणें 'सोडुनि समाधि मस्तक डोलविलें, आयकोन देवाचें।'–मोभीष्म २ ५ **०हुंगणें**–अवघ्राण, मोठया मनुष्यानें प्रेमाचें लक्षण म्हणून लहा नाच्या डोक्याचा वास घेणें हुंगुनि मस्तक हस्तें कुरवाळी तो पितामह त्वरित। –मोशाति ७ ११ **मस्तकीं मारणें**–माथीं मारणें एखाद्यावर सोंपविणें **०द्वार**–न टाळू 'नाकीं तोंडीं बैसेल मास। मस्तकद्वारें सांडी श्वास।'–दा ३ १ ३६ **०पट्टा**–स्त्री खिडकीच्या किंवा दाराच्या चौकटीची वरची पट्टी **०विज्ञान**–न मानसशास्त्राचा एक प्रकार या शास्त्राच्या योगानें माणसाच्या स्वभावाचें व बौद्धिक शक्तीचें ज्ञान होतें (इ ) फ्रिनॉलॉजी **मस्तकावघ्राण** न आप्तस्थाना भेटताना प्रेमाचें चिन्ह म्हणून मस्तक हुंगणें [मस्तक+अवघ्राण ]

**मस्तराळ**—पुन हजरीपुस्तक नावनिशी इसमवारी [इ मस्टररोल अप ]

**मस्ती**—स्त्री १ अमल कैफ झिंगलेपणाची स्थिति (शब्दश व ल ) २ ताठा गर्व अभिमान माज, गुर्मी ३ कैफ चढून किंवा दर्पाच्या भरात केलेल्या चेष्टा, दांडगाईचे खेळ खोडया ४ हत्ती उंट इ० च्या गंडस्थळातून गळणारा मदाचा स्राव उन्माद मद [फा ] **०येणें** उन्मत्त होणें अंगात गुर्मी येणें **०खोर**–वि मस्त

**मस्तु**—न दह्यावरचें पाणी योर १ १५५ [स ]

**मस्तुती**—स्त्री बराच अहद व लाबरुंद असा जमिनीचा पट्टा –मसाप १ २ ९ [का मस्तुदीर=वर्तुळाकार परिघ]

**मस्तुरें**—न (व ना ) तोडेसारखा हातात घालण्याचा दागिना

**मस्तुलुंग**—न मस्तकातील मेंदू मगज [स ] **०शास्त्र**–न मस्तिष्कविज्ञानशास्त्र मस्तकसामुद्रिक (इ ) फ्रनॉलॉजी

मस्तूर—स्त्री (कों नाविक) तागाची दोरी हिचें एक टोंक (पाचर) बारीक व दुसरें जाड असतें [मस्तूल=शोलकाठी]

मस्तूर—वि लिहिलेला –आदिलशाही फर्मानें [अर]

मस्रूर—वि आनंदित 'हमेशा मोहबदनामा इस्लाग करोन मस्रूर करीत जाणें '–रा १० १६४ [अर मस्रूर]

मस्विदा—पु मसुदा पहा 'पत्राचें मस्विदे मशारनिल्हे याजपाशीं दिले '–रा ३ ३३६ [अर मुसव्वदा]

महक, मह(हे)कार—स्त्री (व ना) सुगंध, सुवास, घमघमाट वास

महकमा—पु (व) मोकदमडळ 'तुमच्या महकम्यांत लोक किती ?' [अर महक्मा–न्याय कचेरी]

महकूफ-फ—वि तहकूब, रहित, तात्पुरतें किंवा कायमचें बंद 'असें ठरून लढाई महकूफ झाली '–दम १९४ [अर मौकूफ] महकुफी–स्त्री तात्पुरती किंवा कायमची थांबणूक, तहकुबी, बंदी 'आज प्रतिनिधी पंत जाणार होते, परंतु सुतें महकुबी जाली '–ख ११ ६०७४.

महज(जी)द—स्त्री मशीद 'महजदी बांधोन पुजार। ठाईं ठाईं स्थापिले।'–नव २३.१७८ 'कोठें महजीद आहे तेथें त्याचें स्मरण करून बांग देतात ' –बाइसनदा १५०. [फा मस्जिद]

महजब—पु धर्मपंथ, धर्म 'हिंदु अगर मुसल्मान होऊन इस्कील करील त्यास आपले महजबाची सौगंद असे '–रा १५ १५६ [अर मझहब्]

महजर—पु १ बादशहानें दिलेली सनद, सनदपत्र 'गोत महजर करून घेतला होता तो माघारा घेतला असे '–समारो १६८ २ हुकुमनामा, करारपत्र, निकाल निवाडापत्र 'ज्याही भक्ताची घालुनिया वरि । महजर करीं आहे माझ्या।'–तुगा १२२३ ३ दाव्याचे कागदपत्र पुरावा, कैफीयत [अर महज़र]

महजूद—वि जिवंत विद्यमान, उपस्थित, हजर 'आम्ही तो महजूद आहों '–रा ११९५ [अर मौजूद]

महडणें, महडवणी, महडविणें—(प्र) मढणें इ०पहा

महत्—वि १ मोठा; बडा विस्तृत २ (ला.) थोर, वरच्या दर्जाचा, उत्कृष्ट कोणत्यादि गुणात श्रेष्ठ जसें–महाबुद्धिमान्, महाल्वाड, महासोदा महत् हा शब्द कर्मधारय आणि बहुव्रीहि समासांत महा असा होतो आणि तत्पुरुष समासांत तसाच राहतो जसें महादेव, महाबाहु व महत्पूजा, महत्सेवा ३ अतिशय फार, अत्यंत जसें–महाप्रचंड महातीक्ष्ण इ० [स] महत्तामहत्–वि (व) मोठ्यांतला मोठा; सर्वात मोठा महत्तत्त्व–न सत्त्व रज, तम या तीन गुणांची साम्यावस्था; मूळमाया, गुणसाम्य 'सत्त्वगुणापासून महत्तत्व उत्पन्न झालें '–टिळे ४ ३६१ महत्तमसाधारण भाजक–पु दिलेल्या सर्व संख्यांना पूर्ण भाग जाईल अशी सर्वांत मोठी संख्या; महदंतर–न फार मोठें अंतर, तफावत, वेगळेपणा महदहंबुद्धि–स्त्री महत्तत्त्व, अहंकार बुद्धि 'एवं महदहंबुद्धि। मनें महाभूत समृद्धि।'–माज्ञा १५ १०५ महदादिदेहांत–क्रिवि महत्तत्त्वापासुन स्थूल देहापर्यंत 'महदादि देहांतें। इयें आवडेंचि भूतें।'–ज्ञा १६७ महद्ब्रह्म–न मूळ मन्न 'तया महद्ब्रह्मातें व्याली। दैविकी इच्छा।'–ज्ञा ११ ५११ महद्भूत–वि विलक्षण, असामान्य, चमत्कारिक महद्वृत्त–न गोलाचें वर्तुळ, खगोलीय वृत्त महती–स्त्री मोठेपणा; महत्त्व 'त्याचेनि माशी त्रैलोकीं ख्याती। मज महती त्याचेनी।' –एभा १४ २६९ महतीवीणा–स्त्री नारदाच्या वीणेचें नाव महत्त्व न मोठेपणा, योग्यता, लौकिक, प्रतिष्ठा, किंमत महती पहा 'रायानी पाटिल महत्व रक्षी।'–ऐपो ३२ ०उतरणें–योग्यता, प्रतिष्ठा कमी होणें ०घाटविणें–फुशारकी, बढाई मारणें ०दर्शक–वि पदार्थाचें माप, लांबी, रुंदी इ० दाखवि णारें (परिमाण) ०मापन–न गणितशास्त्राचा एक विभाग, आकारमान मोजण्याची विद्या, मापनशास्त्र. महत्त्वाकांक्षा–स्त्री मोठेपणाची इच्छा, हाव जिगीषा 'कर्तबगार लोकांच्या बढाला महत्त्वाकांक्षा म्हणतात '–विधिलिखित २१ महा–वि १ महत् पहा २ थोर बडा 'हे एक महा आहेत ' 'तो काय एक महा आहे ' ०अर्बुद–न एक हजार दशकोटि ही संख्या ०ऊर–पु (अप) महापूर, अतिशय मोठा पूर ०एकादशी–स्त्री आषाढशुद्ध व कार्तिक शुद्ध एकादशी ०कंद–पु १ मोठ्या जातीचा कंद २ लसूण ०कल्प–पु ब्रह्मदेवाच्या शंभर वर्षांचा काल, ब्रह्मदेवाचें आयुष्य, महाप्रलय, कल्प पहा ०काल–ळ–पु १ प्रलय काळचा शंकराचा अवतार 'महाकाळ उभा चिरीन बाणीं।' २ बारा ज्योतिर्लिंगापैकीं एक (उज्जनी येथील) ०काली–स्त्री १ पार्वती २ प्रचंड तोफ, महाकाळी –बार ०काव्य–न वीररसप्रधान, मोठें, अभिजात, रामायण–महाभारताप्रमाणें काव्य, (इ) एपिक 'आर्ष महाकाव्यांत कोण कोणते गुण असावे यावद्दल पुढें विवेचन येईलच ' ०काश–न अवकाश, अफाट पोकळी याच्या उलट घटाकाश मठाकाश [महा+आकाश] ०कुल–कुलीन–वि थोर, उच्च कुलांतील, कुलीन ०खळें–न मोठें अंगण ०गाणी–नी–वि गानकुशल 'उत्तर देशींच्या महागाणी। गुर्जरिणी अतिगोरा।'–मुरशु १२२ ०गिरी–पु मोठा पर्वत हिमालय 'किं मक्षिकाचेनि धडकें। महागिरी पडों शके।'–एकनाथ–मानदलहरी ४२ –स्त्री १ तीनशें खंडीपर्यंत वजन नेणारें जहाज, गलबत, मालाचें तारू, 'सबब त्याजकडे दोन महागिन्या मरून गवत व एक महागिरी भर लाकडे देविलीं असे,'–समारो ३१६ २ मोठें तारू,

शिवाइ, मतला ०ग्रह-ग्राह-पु मोठी सुसर, मोठा मगर 'गज करवडी महाग्राह।'-एहस्र १० ८० -एभा २० ३५० ०जन-पु १ काहीं गुण, विद्या इ० मुळें थोर श्रेष्ठ माणूस 'परंतु हृदयीं महाजन भयास मी मानितों।'-भक्त मयूरकेका ७५ २ व्यापारी, उदमी, सावकार ३ गाव, कसबा इ० तील व्यापाराला नियम, शिस्त घालून दगारा, त्यावर देखरेख करणारा व कर वसूल करणारा सरकारी अधिकारी ह्या अर्थी महाजनी असाहि शब्द आहे ४ पंच ०जनकी-स्त्री महाजनाचें काम, अधिकार ०झाळा-पु एक मासा -प्राणिमो ८१ ०तल-न सप्तपातालापैकीं एक, नाग व असुर यांचें स्थान ०ताप-पु (तंजा) शोभेच्या दारूचा एक प्रकार, चंद्रज्योति महताब पहा ०तेज-न १ ब्रह्म २ सूर्य 'हें अपार कैसनि कवळावें। महातेज कवणें धवळावें'-ज्ञा १ ७४

महात्मा-पु १ महानुभव पंथातील व्यक्ति २ मोठा धैर्यवान, पराक्रमी मनुष्य 'तैसे महात्मा सूक्ष्मबुद्धी। असावे खाड देवळीं।' -भाए ४९३ गौतमबुद्ध, गांधी यांस संबोधितात -वि १ थोर मनाचा, उदार, महानुभाव 'परते धर्म महात्मा, स्तविला बहु नारदादि साधूनीं।'-मोभीष्म १९९ [महा+आत्मा] ०द्वंदा-वि महामत्सरी; कट्टर द्वेष्टा 'छंदि फंदि महादंदि। रावण पडिला तुझ्या बंदि।'-ज्ञानप्रदीप २६६ [स महाद्वंद्वी] ०दशा-स्त्री (ज्योतिष) कुंडलीतील मुख्य ग्रहाची बाधा अंतर्दशा पहा. ०दान-न (मोठें दान) हत्ती इ० षोडशदानांपैकीं एक, षोडशमहादानें पहा ०देव-पु १ शंकर, शिव 'महादेव म्हणावया कारण। ब्रह्मयासि. जाण या हेतु।'-एभा १३ २७९ २ (विणकाम) हातमागाच्या फणीचा वरचा अवयव दांडा फळी ह्या आणि तळचा दांडा किंवा पार्वती मिळून फणीची चौकट होते या फणीच्या चौकटीस महादेवपार्वती किंवा हात्यादांडी असेंहि म्हणतात ०देवाचें देणें-न कपाळवाणें व दीर्घकाल टिकणारें काम ०देवापुढचा-वि (शब्दश) नंदी, (ल) मूर्ख निर्बुद्ध ०देवा-स्त्री १ पार्वती दुर्गा २ एक प्रकारची वनस्पति हिचे बीं महादेवाच्या पिंडीच्या आकाराप्रमाणें असतें ०देवी सहादेवी-स्त्री (माण) चैत्री पौर्णिमेस तिन्हीसाजचे वेळीं एखाद्या भिंतीवर जीं महादेवी सहादेवी म्हणून दोन गधाचीं बाहुलीं काढून त्याची पूजा करतात तीं -मसाप ४ ४ २५९ ०देव-(माण) सर्व जातींचे लोक ०द्वार-न. (मंदिराचा किंवा राजवाड्याचा) बाहेरचा किंवा मुख्य दरवाजा 'भक्त गर्जती महाद्वारीं। त्यासी थाव दर्शन।'-सुपाळी विठ्ठलाची पृ २२ ०द्वीप-न (मोठें बेट) खंड 'तयाफळाचें हें महाद्वीप। पातली प्रभु।'-ज्ञा १६ ३२ ०नदी-स्त्री मोठी नदी, उगमापासून शभर योजनावर वाहात जाणारी नदी ०नवमी-स्त्री १ आश्विन शुद्ध नवमी नवरात्राचा शेवटचा दिवस २ रामनवमी -शास्त्रीको ०नवरात्र-न घटो ६ ६ आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून विजयादशमीपर्यंतचा काल ०नस-पु स्वयपाकघर ०नक्षत्र-न सूर्यनक्षत्र ०नाड-पु महाजना सारखा एक वतनदार 'महाजन व महानाड पेठ मनकूर याचें नावें सनद कीं, -घोमारो १ १४ [महा+नाड-ड] ०निंब-पु एक प्रकारचें झाड ०निद्रा-स्त्री मरण, मृत्यु 'तिसरें प्रमाण महानिद्रा म्हणजे मृत्यु हें होय।'-दि ४ ४८१

महानुभाव-पु श्रीचक्रधरानें स्थापिलेला एक द्वैतवादी पंथ या पंथात श्रीकृष्ण भक्ति प्रमुख आहे [महा+अनुभाव]-वि १ ज्यानें कामक्रोधादि विकार जिंकले आहेत असा, महात्मा २ उदार थोर पुरुष एव पिंडारकीं ऋषि सर्व। शापानुग्रही महानुभाव।'-एभा १ ३३६ ३ प्रशस्त अनुभवाचा, ब्रह्मानुभवी 'ऐसे ज महानुभाव। जे दैविये प्रकृतीचें दैव'-ज्ञा ९ १९४ ४ विद्या बुद्धि पराक्रम इ० गुणांनीं श्रेष्ठ मनुष्य, महाप्रतापी ०नेटका-वि परिपूर्ण पूर्णपणें,व्यवस्थित 'यज्ञ मुनिचा राख महानेटका। -मारामायणें त्रि सप्तमत्रमय रामायण ३ ०नैवेद्य-पुन पंचपक्वान्नमय अन्नाचें ताट वाढून देवाला दाखवितात तो नैवेद्य (साखर दूध इ०चा छोटा नैवेद्य होतो) ०न्यास-पु पूजा करतांना शरीराच्या विवक्षित भागांना स्पर्श करून करावयाचा न्यास याचाच दुसरा प्रकार लघुन्यास ०पट्ट-पु (महान्) महापट, ध्वज 'आहो जी देवा। पैलु दखिला महारडांचा मेळावा।'-शिशु १०३३ [महापट] ०प(पं)थ-पु १ मृत्यु मरण मृत्यूची वाट 'न दशील सत्यवत। तरी करीन हाचि महापथ।'-वसा ६ ८ २ निर्याणाचा मार्ग 'लागले महापथी तत्काळची।'-एभा ३१ २९८ ०पद-न ब्रह्मपद 'कीं श्रुति हे महापदीं। पैगी जाहली।'-ज्ञा १३ ३७१ ०पद्म-पु १ एक, दह, शत ह्या श्रेणींतील तेराव्या स्थानची सख्या (एकावर बारा शून्यें इतका आकडा) २ कुबेराच्या नवनिधीपैकीं एक निधि नवनिधी पहा ०पातक-न ब्रह्महत्या दारू पिणें, सुवर्णाची चोरी गुरूच्या पत्नीवरोबर किंवा स्वतःच्या मातेबरोबर सभोग आणि यांपैकीं एखादें पातक करणाराशीं मैत्री अशा पाच मोठ्या पातकांपैकीं प्रत्येक ०पातकी वि १ ज्याच्या हातून महापातक घडलें आहे असा २ अत्यंत पापी, दुराचारी म्ह० स्वमानघातकी महापातकी ०पाप-पी-महापातक-स्त्री पहा ०पीठ न विष्णूच्या चक्रानें झालेले शक्ती-पार्वतीच्या शरीराचे तुकडे ज्या ठिकाणीं पडले असें मानतात त्या अत्यंत पवित्र स्थानांपैकीं प्रत्येक अशीं स्थानें माहतीन आहेत तुळजापूर मातापूर आणि कोल्हापूर, हीं तीन व अर्धें सप्तशृंग औंट पीठ पहा ०पुरुष पु १ ईश्वर २ साधु पुरुष सत्पुरुष, ब्रह्मनिष्ठ मनुष्य महापुरुषांचें चित्त। जाल्या वस्तुगत।-ज्ञा १३ ७८९ ३ मेलेल्या ब्राह्मणाचें पिशाच ०पू(पु)जा-स्त्री ब्रह्ममासि इत्यादि विवक्षित प्रसंगास अनुसरून करतात ती मोठी पूजा ०पूर-पु नदीस येणारा मोठा पूर लोंढा

'महापूरें झाडें जाती । तेथें लव्हाळे राहती।'–तुगा १०४३. ०प्रयास–पु मोठे परिश्रम, कष्ट, प्रयत्न खटाटोप ०प्रलय–पु १ प्रत्येक ४३२००००००० वर्षांनीं होणारा सर्व जगाचा नाश २ ब्रह्मदेवाच्या शंभर वर्षांनीं होणारा सर्व (देव, ब्राह्मण, साधु, ब्रह्मा यासह) विश्वाचा नाश 'जो ब्रह्याच्या स्थूळ देहाचें मरण। तो महाप्रलय जाण।' महाकल्प पहा ०प्रयास–पुभव फार मोठे कष्ट श्रम, प्रयत्न ०प्रसाद–पु १ धार्मिक किंवा देवाच्या उत्सवानंतर वाटण्यात येतो तो फुलें, मिठाई जेवण इ०रूप प्रसाद २ देव, गुरु इ०पासुन मिळालेली प्रसादाची वस्तु (कृपा, अनुग्रह म्हणुन) ३ (शब्दशः व ल) मोठी कृपा, अनुग्रह 'महाप्रसादाचेनि द्वारें। सप्रेम सुखें दुस्ती।' ०प्रस्थान–न (मोठा प्रवास) १ यथार्थ ब्रह्मज्ञानानंतर येणारा मृत्यु २ (ल) मरण, मृत्यु ०प्राण–पु १ मोठ्या जोरानें व प्रयासानें केलेला उच्चार हकारयुक्त उच्चार २ जोरानें आणि प्रयासानें उच्चारण्याचा वर्ण जसें–ख, घ, छ, झ, ठ, ढ थ ध, फ भ आणि ह अल्पप्राण आणि बाह्य प्रयत्न पहा ०फणी–पु मोठा साप ०फल–ळ–न मोठें उत्कृष्ट फळ, नारळ, फणस इ० ०बलि–ळी–पु पिशाच्चादिकास संतुष्ट करण्यासाठीं मांस, अन्न इ० चा बलि अर्पण करावयाचा पदार्थ ०बळी–वि अत्यंत प्रबळ सामर्थ्यवान् 'महाबळी प्राणदाता सकळां उठवी बळें।'–मारुतिस्तोत्र ०बळा युद्धी–स्त्री दृढ पानाचें आलें ०भाग–वि १ अतिशय भाग्यवान् 'नित्य निष्काम अतिप्रीतीं। मज भजती महाभाग।'–एभा २४ ३३५ २ सद्गुणी सद्‌गुणी ०भारत–न व्यासप्रणीत कौरव–पांडवांच्या युद्धाचें भारतीयांचे पवित्र असें एक महाकाव्य महापुराण ०भूत–न पृथ्वी आप तेज वायु आणि आकाश ह्या पंचमहाभूतांपैकीं प्रत्येक 'तरी होसी गा तूं परब्रह्म। जें या महाभूतां विसवतें धाम।'–ज्ञा १० १४९. ०भेड–वि अत्यंत भित्रा भेकड 'मग विराटाचनि महाभेडें उत्तरें।'–ज्ञा ११ ४६९ ०मणि–पु मौल्यवान् रत्न, हिरा, माणिक इ० 'वांचोटी आणि महामणी। मेरु मणक सम नव्हे।'–ह १ ८४ ०मति–मना–वि थोर अंतःकरणाचा, उदार मनाचा, महात्मा ०मंत्र–पु निरनिराळ्या देवताचा मुख्य मंत्र जसें–गायत्री हा ब्राह्मणाचा महामंत्र 'महामंत्र आत्मप्रा प्तीची खाणी।' ०मंत्री–पु मुख्यप्रधान, मुख्य मंत्री सल्लागार ०महोपाध्याय–पु मोठ्या शास्त्र्याला देतात ती एक सन्मानाची सरकारी पदवी ०मात्र–पु हत्ती हाकणारा, महात 'मुरडावया मस्त हस्ती। महामात्र दोन्हीं हस्तीं। अंकुश हाणी तैसा श्रीपती। मर्मोद्घाटनें करीतसे।'–यथादी २ १६ ०माया–स्त्री १ पार्वती, दुर्गा २ जगदुत्पादक शक्ति, सर्व संसाराला प्रपंचाला कारणीभूत अशी देवता, आदिमाया मूलप्रकृति ३ जादूगार, शमको ०मार–पु मोठा मार फटका 'शुळबाणाचा महामार।'–मुवन ३ ३८ ०मारी–स्त्री १ महामृत्यु 'तेथ मचेतना मुरारी। न मरत्या महामारी।'–एभा २८ २५० २ (ल.) प्रणमकष्ट 'तिचेनि योगें महामारी। पातली हे जाणिजे।'–मुवन ७ १८७ ३ पटकी या साथीचा रोग ४ या रोगाची अधिष्ठात्री, दुर्गादेवी ५ जिवापाड श्रम, शिकस्तीचा प्रयत्न ६ हाणाहाणी, मारामारी, मोठें युद्ध 'दोघे झुंजतां महामारी'–मुवन ३ ३६ 'तैसी मांडिली महामारी।'–कथा २ २ ६० ०मृत्यु–पु मरण, मृत्यु (अपमृत्युविषयीं बोलतांना उपयोग) अर्थ–'अपमृत्युचा महामृत्यु झाला' ०मृत्युंजय–(वैद्यक) एक औषध ०वैद्य न तोफ ०यज्ञ–याग–पु मोठा यज्ञ, पंच महायज्ञांपैकीं प्रत्येक, पंचमहायज्ञ पहा 'तरी महायाग प्रमुखें। कर्मे निफज नाहीं अचुकें।'–ज्ञा १८ १६६ ०यात्रा–स्त्री १ काशीयात्रा २ (ल) मरण, मृत्यु 'माधी पेशवाई सकट सकळांला महायात्रेला धाडील'–भस्तंमा १६२ महाप्रस्थान पहा ०रथ–रथी–पु १ शस्त्रास्त्रांत प्रवीण असुन दहा हजार धनुर्धारी योद्ध्यांबरोबर एकटाच लढणारा योद्धा 'महारथी श्रेष्ठ। द्रुपद वीर।'–ज्ञा १ ९८ २ (ल) अतिशय हुशार, कर्तबगार पुरुष किंवा मोठा बच्चा ०रस–न १ आम्र २ पक्वान्न –मनःपो ०राज–पु १ सार्वभौम राजा, सम्राट् २ (आदरार्थी) श्रेष्ठ माणुस ३ जैन गुजराथी वैष्णव लोकांचा गुरु ०रात्रि–स्त्री महाशिवरात्र माघ वद्य चतुर्दशी ०राष्ट्र–नपु मराठे लोकांचा देश उत्तरेस नर्मदानदी, दक्षिणेस कर्नाटक पूर्वेस तेलंगण आणि पश्चिमेस समुद्र यांनीं मर्यादित असलेला प्रदेश मुंबई इलाख्यांतील एक विभाग ०राष्ट्र–राष्ट्रीय–वि महाराष्ट्रदेशासंबधाचे (लोक, भाषा, रिवाज इ०) ०राष्ट्र–भाषा–स्त्री मराठी भाषा, संस्कृत–प्राकृत भाषेपासुन झालेली एक देशी भाषा ०राष्ट्री–एक जुनी प्राकृत भाषा ०रुख–पु एक प्रकारचें झाड, महावृक्ष 'कवँन लागला महारुखा। म्हणे पुढती न दिसे निका।'–मुआदि ३३ २९ ०रुद्र–पु १ रुद्राभिषेकाचा एक प्रकार अकरा लघुरुद्र, लघुरुद्राच्या उलट शब्द महारुद्र २ मारुती 'महारुद्र आज्ञेप्रमाणें निघाला।'–राक ११ ०रुद्री–पु (गु) बाजरीची मोठी जात हिचें कांड फार उंच होतें –कृषि २७७ ०रोग–पु १ अत्यंत दुःखदायक असा रोग याचे आठ प्रकार आहेत–वात व्याधि, अश्मरी कुष्ठ मेह उदर, भगंदर अर्श आणि संग्रहणी कांहींच्या मतें हे नऊ आहेत त्यांत राजयक्ष्मा हा एक जास्त असुन कुष्ठाऐवजीं कुष्ठ व संग्रहणीऐवजी ऐवजीं महणी अशीं नावें आहेत २ रक्तपिती गलित कुष्ठ महार्घ–वि १ महाग दुष्प्राप्य 'महार्घ्येंचि परमार्थ जाला।'–सारुद १ २१ २ मौल्यवान् [स महा+अर्घ] महार्णव–पु मोठा समुद्र, महासागर 'वनीं रणीं जलाग्निसंकटीं। महार्णवीं पर्वत–वास दुर्घटीं।'–वामन

स्फुट श्लोक ३५ (नवनीत पृ १३७) –न १ (ल.) मोठें, दीर्घकाल चाललेलें भांडण, युद्ध लढाई 'दोघा मांडलें महार्णव। दाविती बळ प्रौढीगौरव।'–निगा २४ २ प्रसिद्धि; डांगोरा; जघन्यत्व ३ लहान काम, प्रकरण, गोष्ट इ० ला मोठें रूप वाढून सांगणें, राईचा पर्वत करणें 'एवढयाशा गोष्टीचें त्वा लागलेंच महार्णव केलेंस' [स महा+अर्णव] ०लय–पु १ आश्रयस्थान, आश्रम, धर्मशाळा २ देऊळ ३ परमात्मा ४ भाद्रपद वद्यपक्षांतील पितरप्रीत्यर्थ केलेलें श्राद्ध पक्ष, मृतपितृकानें भाद्रपद शुद्ध पौर्णिमेपासून अमावास्येपर्यंत दररोज करावयाचें श्राद्ध हें रोज करणें अशक्य असल्यास १५ दिवसांतून एका उक्त दिवशीं करावें [महा+आलय] ०लक्ष्मी–स्त्री १ विष्णुपत्नी २ अश्विन शुद्ध अष्टमीस पूजावयाची एक देवता, त्या देवतेचें व्रत ३ भगवती कोल्हापूरची देवी ४ (ना) ज्येष्ठागौरी, भाद्रपद शुद्ध नवमीस पूजा करावयाच्या देवता ०लिंग–न बारा ज्योतिर्लिंगापैकीं प्रत्येक ०वटी, माहावटी–स्त्री राजमार्ग 'हे कपटाची कस(व)टी। अनृत्याची माहावटी।'–भाए ७५५ ०वस्त्र–न उंची, सुंदर वस्त्र प्रतिष्ठित वस्त्र, शालजोडी इ० ०वाक्य–न वेदांतातील जीवब्रह्मांचें ऐक्य दाखविणारें तत्त्वमसि आदि वाक्य हीं चार वेदांचीं चार आहेत 'तो महावाक्याचेनि नांवें। गुरुरूपें चेनि यावें।'–ज्ञा १८ ४०४ २ गायत्री मंत्र ०वात–पु (तासीं ८० मैल वेगाचा) सोसाटयाचा वारा, झंझावात, तुफान 'महावात सुटला म्हणुनि कां कंप येत भूधरा।'–सौभद्र ०विषुव–न मेष संपात हरिपद ०वृत्त–न ज्या वृत्ताची पातळी गोलाच्या मध्य बिंदूतून जाते तें वृत्त मोठें वर्तुळ ०वाजा–वि. मोठया थाटाची, तेजस्वी 'सतोपोनी महाराजा। सभा रचित महवाजा।'–गुच ३४ ९७ [महा+ओजस्] ०व्याधि–पु महारोग रक्तपित्ती ०शब्द–पु वोंब गाखध्वनि ०शय–पु १ थोर पुरुष, महात्मा २ मोठया माणसास महाराज रावसाहेब याप्रमाणे संबोधावयाचा शब्द [स महा+आशय, व मोंशे फ्रें मुस्ये (मॉसिय)] ०शिवरात्र–त्रि–स्त्री माघ वद्य चतुर्दशी ०शून्य–न जें कार्यांच नाहीं असें जें शून्यास अधिष्ठानरूप ब्रह्म तें, परब्रह्म 'आता महाशून्याचिया डोहीं। जेथ गगनासीचि ठावा नाहीं।'–ज्ञा ६ ३१५ महाश्मी–स्त्री अश्विन शुद्ध अष्टमी ०सरणी–स्त्री स्वर्गमार्ग 'ह्मोडनि सुयोधनाचा शोकातें वरो पिता महासरणी।'–मोभीष्म ११ १५ ०सागर–पु पृथ्वीवरील पाण्याचा सागराहून मोठा साठा, महासमुद्र उदा० हिंदी महासागर ०सिद्धांत–पु एकमेवाद्वितीय ब्रह्म हा मुख्य सिद्धांत 'आणि महासिद्धांतापारीं। श्रुति हारपती शब्देसीं।' –ज्ञा १५ ४३४ ०सिद्धि–स्त्री अष्टमहासिद्धी पहा 'जेथ महासिद्धींचीं भांडारें। अमृताचीं कोठारें।'–ज्ञा ६ ३२१ ०सुख–न ब्रह्मसुख, ब्रह्मसाक्षात्कार. 'जेथ परमानंदु केवळु। महासुखाचा।'–ज्ञा १ १४. ०स्म(श्म)शान–न काशीक्षेत्र 'सदाशिव बैसला निजासनीं। महाश्मशानीं निजवस्ती।'–एभा २ ३१ ०क्षेत्र–न काशीक्षेत्र. –रा ३ ४७६ महेंद्र–पु १ हिंदुस्थानांतील पर्वताच्या सात रांगांपैकीं एक २ इंद्राचें नांव 'हे महेंद्रपदही पाविजेल। परि मोह हा न फिटेल।'–ज्ञा २ ६५ [महा+इंद्र] महेश, महेश्वर–पु शिव, शंकर [महा+ईश्वर] महेश्वरी पातळ–न महेश्वर नांवाच्या गांवीं (इंदूर संस्थान) तयार झालेलें वस्त्र, पातळ 'आधींच कवर बारिक त्यावर महेश्वरी पातळ वसलें।' –होला ८९ महोत्सव, महोत्साह–पु मोठा उत्सव आनंद दायक प्रसंग [महा+उत्सव] महोदधि–पु १ महासागर, मोठा समुद्र 'महोदधीं का मिनले। खात जैसे।'–ज्ञा १५ ३१७ २ हिंदीमहासागर [महा+उदधि] महोदय–पु माघ किंवा पौष महिन्यांत सोमवारीं सूर्योदयीं अमावास्यारंभ, श्रवण नक्षत्राचा मध्य आणि व्यतिपाताचा शेवट याचा योग, एक मोठें पर्व [महा+उदय] महौजा–वि तेजस्वी, ज्याचें तेज मोठें आहे असा, सामर्थ्यवान् पुरुष श्याम महौजा ओढित होता वळेचि मजला जो। –मावन १३ ८८ [महा+ओज] महान्–वि १ मोठा, विस्तृत, थोर २ उशीरा पिकणारें (धान्य, पीक), गरवें ३ दोन किंवा अनेक वर्षें टिकणारें (झाड, मिरची, कापूस, पाढरी तूर इ०)

**महंत**—पु १ बैरागी, गोसावी इ०च्या आखाडयाचा मुख्य नायक, (कायदा) पारमार्थिक शिक्षणसंस्थेतील आचार्य 'महंतें महंत करावें।'–दा ११ १० २५ २ (सामा) ऋषि साधु 'तरी महंताचिया वोही। घरा आलियाही वाढी।'–ज्ञा १७ ३४७ ३ पंडित इ०मध्यें मुख्य मनुष्य, पुढारी, श्रेष्ठ दर्जाचा मनुष्य ४ (शीख धर्मातील) सेवादार –वि थोर, श्रेष्ठ [स महत् हिं] ०पण महंता–नस्त्री थोरपणा, मोठेपणा, योग्यता तैसें आप णयाआपण। मानिता महंतपण।'–ज्ञा १६ ३७८ महंती–स्त्री १ महंताचा दर्जा, अधिकार, गुण, थोरपणा इ० २ (ल) मोठेपणा, थोरपणा, प्रौढी, थोरवी 'लोकप्रतिष्ठा महंती। वैसावें अश्वीं गजीं रथीं। –एरुस्व ६ ६५

**महतकदम महतकदम**—क्रिवि पूर्वी 'या वननास हक लवाजिमा महतकदम चाल्ला असेल त्याप्रमाणें तुम्हांस करार केला असे' –रा ८ ५२ [अर मा–तकदम्]

**महताप–ब**—स्त्री १ चंद्रज्योत, आतषबाजीच्या जिनसांतील एक २ हिलाल 'महताबा लावून रात्रीं परस्परें गोळागोळी जाली'–ख ८ ४१३० ३ चंद्र, चांदणें ४ (ल) सुंदर स्त्री [फा महताब्] महतापी–स्त्री वर चांदणी घातलेला मांडव, (सामा) मांडव –ख १० ५४२० [फा महताबी]

**महतारी**—स्त्री १ म्हातारी 'इच्छी महतारी पुत्रसंतान।' –दावि २८३ २ (खा व) आई [म्हातारी]

**महदर, महदरेघ-ओळ**—स्त्री मसुदरेघ पहा

**महदूद**—वि निश्चित मर्यादेतील, मर्यादित (गाव इ०) 'गावाची, जमिनीची हद्द महदूद करून दिली' [अर महदूद]

**महब्बतअजाम**—क्रिवि प्रेमपूर्वक सप्रेम [फा]

**महमाय**—स्त्री १ दुर्गादेवी २ माया, असत् महामाया पहा [महामाया अप]

**महमुदी**—स्त्री १ एक फुलझाड २ एक प्रकारचें सुती वस्त्र, तलम पण घट्ट विणीचें कापड महामुदी पहा –वाडमा १ १५७ [फा]

**महर्ग-र्घ**—वि महाग भारी किंमतीचें, मौल्यवान् [स महार्घ] महर्ग(र्घ)ता-स्त्री १ महागाई २ उणीव कमतरता

**महर्लोक**—३ सूर्य आणि आकाशस्थ ज्योतींचें वसतिस्थान सप्तलोक पहा [स]

**महर्षि**—पु मोठा ऋषि, तपस्वी 'राजर्षि, महर्षि सकळ येथें न्यूनाचि भूमिपाळसभा।' –मोसभा ११० [सं महा+ऋषि]

**महल**—पु १ राजवाडा, प्रासाद, महाल २ खातें –आदिल शाही फर्मानें [फा]

**महला-ल्ला**—पु शहराचा भाग, पेठ, पुरा, मोहल्ला [अर महल्ला]

**महशूर**—वि प्रसिद्ध प्रख्यात, माहीत असलेला [अर मश्हूर]

**महसरा**—पु १ वेढा २ उपद्रव 'रघाजी भोसले सेना साहेब सुभा यांनीं मसलत करून संस्थानास महसरा दिल्हा' –वाड्या ८१ [अर मह्सूर]

**महसरा**—पु जमाव भार [अर महशर]

**महसूफ**—वि उपरिनिर्दिष्ट मजकूर 'ज्या अर्थी खान महसूफ यांनींही खातर्जमेचें पत्र लिहिलें असें' –ख १ ५०२२ [अर मौसूफ]

**महसूल**—पु धारा जमाबंदी वसूल जकात [अर] महसुली-वि ज्यापासून वसूल यावयाचा असें (गाव कुळ शेत इ०)

**महा**—पु महिना मास माह [अर माह] महावार-स्त्री (व) १ महिन्याचा पगार 'महावार शंभर रुपये' २ मासिक हप्ता 'दारूच्या दुकानाची महावार पाठविली' –क्रिवि महिन्याच्या महिन्यास दरमहा माहवार महा-यँ-महा-क्रिवि दर महिन्यानें, महिन्याच्या महिन्यास [फा]

**महा**—वि (व) मास्त

**म-कार**—पु (कर.) त्रास दगदग

**महाग**—वि १ ज्याला वाजवीपेक्षा जास्त किंमत पडते असा, ज्यास्त भावाचा, मोलाचा २ जरूर असलेलें, मिळण्यास कठिण असलेलें जसें-अन्नास-वस्त्रास-महाग [स महार्घ, प्रा महग्घ] •होणें-मिळण्यास कठिण होणें, दुष्प्राप्य होणें •लागणें-त्रासदायक, नुकसानकारक होणें महागणें-अक्रि महाग होणें

**महागरा-ग्या**-वि महाग दरानें विकणारा (वाणी) महागाई-स्त्री १ बाजारात नियम नेहमींपेक्षा अधिक किंमतीनें विकलें जात असण्याची स्थिति, महर्गता २ कमतरता, उणीव ३ महर्गतेच्या दिवसांत नोकरांना देण्याचा विशेषभत्ता. 'लहान पगाराच्या नोकरास महागाई देण्याबद्दल हुकूम सुटला आहे' –टि १ ५७९

**महाडी**—स्त्री (कुलाबा) भाताची एक जात त्याचा दाणा लांबट असतो [? महाड]

**महाडुळ**—न एक प्रकारचा साप 'अज्ञानाचें जें वारुळ। त्यात दोरीचें महाडुळ।' –अमृत ११० माडुळ पहा

**महात**—त—पु हत्तीला हाकणारा, माहामात्र, महावत 'लीलेनें द्विदिभांचा न मद अवस्थापिता महात रणीं।' –मोभीष्म २२ [स महामात्र, प्रा महामत्त हिं महावत]

**महातारचळ, महातारडा, महातारा**—(ग्र) म्हातार चळ इ० पहा

**महात्याक दिवस**—पु (ना) दिवसाचा तिसरा प्रहर [महा+अत्यय+दिवस ?]

**महादकादा**—पु (अशिष्ट) महाबळेश्वराकडे होणारें भुई कमळ, कंदाड

**महाफा**—पु एक प्रकारचा मेणा, पालखी (स्त्रियासाठीं) [अर मुहाफ]

**महामात्र**—पु माहूत 'प्रावृट् मदात तरता जेंवि गजा निजहिता महामात्र।' –मोभीष्म ८ १३ [स]

**महामुदी**—स्त्री तलम पण घट्ट विणीचें कापड, मखमल [अर महमूदी]

**महामूर**—स्त्री धान्यादिकाची विपुलता समृद्धि भरपूरपणा –वि १ पुष्कळ, विपुल भरपूर अतिशय २ बंद केलेलें लावलेलें (खिंडी इ०चें दार, दरवाजा, खिडकी) (क्रि० करणें, होणें) 'दरवाजे किल्ल्याचे रायगड याचे महामूर राखावे दिंडी मात्र उघडी असाव्यात' –मराचिस २ ३ पुरें झालेलें परणी इ० सर्व कर्में केलेलें, पूर्ण्वास, पिकावेतों आलेलें (शेत पीक इ०) 'शेत पिकून महामूर झालें' ४ गाढ स्वस्थ भरपूर (झोंप नींद निजणें) ५ आकंठ भरपूर सगळच (जेवणें, खाणें, भोजन) [अर मअमुर] महामुरी-स्त्री. १ विपुलता

समृद्धि 'द्रव्याची लष्करात महामुरी झाली' २ (दार, खिडकी इ०ची) बंदपणाची, दरवाजा लावलेली स्थिति ३ (शेत, पीक इ०ची) पूर्णावस्था, लागवड.

**महार**—पु एक अंत्यज, अस्पृश्य जाति, अतिशूद्र परवारी पहा [स महा+अरि किंवा आर्य; महा+अर (पर्वताच्या गुहेंत राहणारा), मृत+हर=मेलेलें जनावर ओढणारा, मेर=गावाची कड?] म्ह० महाराची भाई शामार घेऊ (मला काय त्याचें) **०कचका**–पु जोराजोरानें, आरडाओरडयाचें भांडण (महार नेहमीं भांडतात त्याप्रमाणें) **०कवडी**–स्त्री एक जातीची कवडी **०कावळा**–पु डोंबकावळा **०की**–स्त्री १ गावच्या महाराचें काम, हक्क, वतन, अधिकार २ (ल) कोणतेंहि हलकें, नीच, कष्टाचें काम **०गजाल**–स्त्री गडबड, गोंगाट, दंगल, आरडाओरड **०चावडी**–स्त्री अस्पृश्यांना गावच्या चावडींत येऊन बसता येत नाहीं म्हणून बहुतक खेडयांत गावचावडीखेरीज दुसरी एक चावडी असते ती –गागा ५५ **०पुंज**–पु शेतकऱ्यांनीं आपल्या उत्पन्नांतील जो भाग गावच्या महाराचा हक्क म्हणून सरकारात भरावयाचा तो **०पार**–पु न गावांतील हलक्या जातीचे लोक **०पारगा**–पु पागेमध्यें घोडयाची नोकरी करण्यासाठीं ठेवलेला महारजातीचा मनुष्य **०भाद्दवी**–स्त्री भाद्रपद महिन्यात ववींच्या यात्रेकरिता येणारा खर्च भागावा म्हणून महाराला जमिनीच्या उत्पन्नापैकीं द्यावयाचा भाग, किंवा कांहीं देणगी **०महारकी**–स्त्री, महाराच्या इनामजमिनीवरील कर **०व(वा)डा-वण**–पुन १ महार लोकांची राहण्याची जागा २ (ल) सोंवळ्याओंवळ्या सबधानें अतिशय अव्यवस्था 'त्याचे घरीं सारा महारवाडा आहे मी कांहीं जेवावयास जात नाहीं' म्ह० जेथें गाव तेथें महारवडा **०शिमाळा-ड्डाळा-हडका-रहाटी**–पुस्त्री गावचीं मेलेलीं गुरें टाकण्यासाठीं महाराला नेमून दिलेली जागा **महारडा**–पु (तिरस्कारार्थी) महार **महारवा**–वि महार लोकांनीं तयार केलेली (टापली करमुगी, सुप इ०)

**महारका**—स्त्री चांगलें तलम कापड (धोतर जोडयाच्या उपयोगी) [स महार्घ?]

**महाल**—पु १ तालुक्याचा पोटभाग, पेटा देश पहा 'साराश उभयतां महालचें मनो प्राबल्य जहालें आहे' –पया ६१ २ ह्या पोटभागीं कामें करावयाची जागा कोर्ट कचेरी ३ यांत चालणारीं कामें ४ स्थान 'पाकाशय, जलस्थान फलस्थान, वसनागार आदिकरून हे नाजूक महाल –मराआ १० ५ घरांतील स्त्रियांची वसण्याउठण्याची जागा अंतःपुर, राण्या राणीवसा 'श्रीच्या दर्शनाम महालसहव मान गेले' –ब्रव ९४ ६ मोठा, भव्य वाडा, प्रासाद, राजवाडा, मंदिर, ७ कोठारगृह ८ सावकार, पेढीवाला इ०चा व्याप, विस्तार, पसारा. ९ खंडोबा, जोतिबा इ० च्या भेटीस पाल इ० गावाहून जेजुरीकडे जावयाला निघालेली पालखी, काठी इ०ची मिरवणूक १० राजस्त्री, बेगमाच्या नावापुढें लावावयाचा बहुमानार्थक शब्द उ० नूरमहाल, जिनत् महाल इ० [अर महल्ल] **०मजकुरावर-घाला घालणें-लोटणें-टाकणें-नेणें-देणें**–कांहीं एक गोष्ट ज्यावेळीं करणें जरूर आहे त्यावेळीं न करता लांवणीवर टाकणें, टाळणें, पुढें ढकलणें **०मजकुरावर पडणें-येणें**–पुढें ढकलणें, उडवाउडवी करणें **महालीं उल्फा मोईन**–पु महालास येणाऱ्या सरकारी कामगाराचा सरबराई खर्च सामाशब्द– **०करी-दार**–पु महालासबधाची जमाबदी, बंदोबस्त इ० कामें पाहणारा सरकारी अधिकारी **०करा**–पु रत्नागिरीकडील चामारातील जात पाटील **०झडती**–स्त्री महालाच्या जमाबंदीचें कच्चें वार्षिक पत्रक **०दफ्तर**–न पेशवे दफ्तराचा एक भाग यांतील कागद महालांतील असत –इनाम ४६ **०दार**–पु (जुनें) मालदार रक्षक, पहारेकरी **०पेटा**–पु महालाचा पोटभाग यावर महालकरी असतो **०मजकूर**–पु १ ज्याचा नुकताच उल्लेख केला आहे असा महाल, वर उल्लेखिलला महाल, प्रदेश २ सर्व महालाचा एकूण खर्च, देशव्यय –राव्यको ९.१७ **०मवशी-सा**–स्त्री चीज वस्त, गुरें ढोरें 'महालमवेसी मागों लागले' –इए ५ १००. **०शिबंदी**–स्त्री महालातील कामासाठीं नेमलेले शिपाई (पोलीस, वसुली नोकर)

**महाल**—पु न्हावी, महाली. हा लग्नांतील सोयरीक जुळविण्याचें काम करतो म्हणून मध्यस्थ, हिंदुस्थानांत कांहीं जातींतील सोयरीक जुळविण्याचें काम न्हाव्याकडे असतें

**महाला, महालया, महाली-ल्या**—पु न्हावी

**महाव(वं)त**—पु माहूत, महात, हत्ती हांकणारा 'गज आदळले गजानीं। महावत महावतांसीं।' –एरुस्व ८ ३९ [सं महामात्र, प्रा महमत्त, [हिं]

**महावळुंग-गी**—(प्र) महाळुंग-गी पहा

**महासरा**—पु वटा; परिघ महसरा पहा 'घुमक करून महासरा उठविला –रा १० ३३१ [अर महसूर, मुहासरा] **०देणें**–वढणें, वढा घालणें

**महाळ-ल**—पु १ भाद्रपद वद्यांत पितराप्रीत्यर्थ केलेलें श्राद्ध महालय पहा २ भाद्रपदपक्ष, पितृपधरवडा [स महालय] **०वडा**–पु (कुण) पितृपक्षाच्या वर्षीं करतात तो वडा **०घस वसा**–पु (राजा) भाद्रपद वद्यपक्ष [महाळ+वासर]

**महाळागायशी**—पु उद्दटपणें गांवाची पृच्छा करणारास उत्तरादाखल दिलेलें कांहीं तरी नाव, गमाजी कापशा पहा

**महाळुंग-गी**—नस्त्री एक प्रकारचें कागदी लिंबाच्या जातीचें झाड व त्याचें फळ. [स मातुलुंग]

**महिख**—पु १ म्हैस, रेडा २ महिषासुर 'सुवर्णाचिया महिखा। नाशु केला।'—ज्ञा १८ ४४४ [स महिष]

**महिना**—पु १ साधारणपणें तीस दिवसाचा काल, मास २ मासिक वेतन ह्या अवधीचा पगार 'मासे सरकारातून सहा महिने यावयाचे आहेत' [स मास, फा माहीना,] **महिन्याच्या काठीं**-क्रिवि महिना भरल्यावर, महिनाभर काम केल्यावर 'महिन्याचे काठीं शभर रुपये मिळतात' **महिनखत**-न (ना) दरमहिन्याला ठराविक रक्कम फेडण्याच्या करारानें केलेलें खत **महिनदारीण**-स्त्री (ना व) मोलकरीण महिने करू **महिने(न)दार**-पु १ दर महिन्याला अमुक पगार अशा ठरावानें कामाला लाविलेला नोकर २ आळीपाळीनें एक एक महिना काम करावें अशा वाटणीप्रमाणें त्या त्या महिन्याची ज्याची पाळी असेल तो इसम **महिनेभरू**-पु कामाकडे लक्ष न देता माझा महिना भरतो कव्हा व मला पगार मिळतो कव्हां अशा बुद्धीनें काम करणारा नोकर, भाडोत्री नोकर **महिन(न)माल, महिने(न)महाल**-वि मासिक, महिन्याच्या बोलीनें लाविलेला, ठरविलेला (चाकर, चाकरी, पगार, रोजमुरा, खर्च, जमाखर्च हिशेब) **महिने(न)माह**-क्रिवि महिन्यास, प्रत्येक महिन्याला, दरमहा महिनमहा खर्चाचा तक्ता'—स्वारी नियम ४० **महिनेवाला**-पु (कु) देवळाच्या उत्पन्नांतून ज्याला दर महिन्यास ठराविक धर्मादाय मिळतो तो मनुष्य

**महिमहि जाणें**—अक्रि (व) नवल, कौतुक वाटणें

**महिमा**—पुस्त्री १ मोठेपणा, थोरवी, वैभव, प्रभाव ख्याति 'तो शरीरीचि परी महिमा। ऐसी पाव।'—ज्ञा ६ ४८० २ (सामा) मोठेपणा, थोरवी ३ अष्टमहासिद्धींपैकीं एक, हवें तितकें मोठें होण्याचें सामर्थ्य अणिमा महिमा लघिमादिस्थिति। या तिन्ही देहसिद्धींची प्राप्ती।—एभा १५ ४३ [स] **महिमान**-न (काव्य) १ मोठेपणा, थोरवी महिमा 'याभि अग्र पूजचा सन्मान। श्रेष्ठ देवामाजीं महिमान।—एभा १३ २७९ २ महत्त्व, सामर्थ्य विचारिता शब्दमहिमान। शब्द स्वरूपें ज्ञानघन।—एभा १३ ३३८

**महिमान**—पु १ पाहुणा अतिथि तिन्हाईत, मेहमान—मान पहा २ फिरस्ता शेतकरी [फा मिह्मान्]

**महिर(रा)प-ब**—स्त्री कमान, देवळी, मेहराप पहा [अर मिह्राब्]

**महिला**—स्त्री (काव्य) १ स्त्री, बायको २ (विशेषत) पत्नी 'साज सखी अखिला कृत्यभरें सुमति आमुची महिला।'—मासभा ४ ७२ ३ माती [स]

**महिष**—पु रेडा टोणगा 'मनोमहिषाचेनि मुंड। दिधली वळी।'—ज्ञा १२ ५३ [स] **महिषी**-स्त्री १ म्हैस २ पट्टराणी ३ मुख्य स्त्री 'होऊनि तया शूद्रमहिषी। होती पापिणी दुराचारी।'—गुच ७ १६२ [स]

**मही**—स्त्री १ पृथ्वी २ एक नदी [स] ॰**तल**-न पाताळ ॰**धर, महीध्र**-१ पर्वत २ शेष नावाचा सर्प ॰**पाल-ळ**-पु राजा ॰**सुत**-पु १ मंगळ नावाचा ग्रह २ (ल) बोरू 'महीसुत सरसाविला। सरमाऊन द्विधा केला।'—दा १५ ६ ३

**महींग**—न नांगरलेली जमीन साफ करण्याचें हत्यार

**महूतपण**—न १ मोटेपणा, महत्त्व २ अहंकार [महान्]

**महीस**—स्त्री म्हैस महिषी [स महिषी]

**महुडा**—पु (काव्य) ढग मेघ 'मग प्रचंड तेज प्रगटलें। संगें महुडें विराले। निःशेष शोखिलें। प्रळयोदक।' [मेघ]

**महुर**—पु मोहर 'जे सोहंभावमहुरें। मोडोनि आला।'—ज्ञा ५ १४९

**महु(हू)र**—वि मधुर गोड 'जैसें महुर का म्हणिजे। विषखदातें।'—ज्ञा ५ ११७ [स मधुर, प्रा महुर] **महुरता**-स्त्री माधुर्य, गोडी 'का वचनागाची जैसी। महुरता पहिली।'—माज्ञा १८ ७९६

**महुरणें**—अक्रि मोर्चा वळविणें, मिरविणें [मोहर]

**महुरी**—स्त्री मोहरी राई 'आदींचि द्रव्यें सुरखुरीं। वरी परिवडिजती महुरी।—माज्ञा १७ १४६

**महुरें**—न (महानु) नागाचें विष 'महुरें घाली दाढे। एसे केवि होय।'—भाए ७३७

**महूचळ**—वि (महानु) मचूळ मोहाच्या फुलाच्या वासा सारखें नंदनवनींचें रडुळ। मानसमरोवरीच महूचळ।—शिशु ६४४ [मचूळ]

**महेळा, म्हे म्हेळी म्हेळारु**—स्त्री (महानु) बायको, स्त्री 'म्हळीयची शिवी द'—सिद्धांतसूत्रपाठ [महिला]

**मळ**—पु १ घाण केरकचरा रेंदा २ विष्ठा 'मज उपन तांचि मळसा त्यजिलें याहून काय अत्याग।'—मोभीष्म १२ ५६ ३ पाप, पापवासना जाळूनिया मळ। बाळवर्गी नाचती।'—तुगा ७६७ ४ कर्मीपणा म्हणे कर्मनिष्ठा मळु। ठविला देखों।'—ज्ञा १८ ६२ ५ दोष म्हणे तुम्ही निष्पाप निर्मळ। तव तुमचेनि दर्शनें तत्काळ। नासती सकळ कळिमळ। ऐसे निजनिर्मळ तुम्ही सर्व।—एभा २ २४३ —स्त्री (राजा) अंगावरच्या मळाची वळी मळी [स मल] **मळई**-स्त्री १ पावसानें किंवा नदीच्या प्रवाहानें वहात आलेली माती, पानें, कचरा इ॰ २ अशा जागवर केलेलें बागाईत ३ मासे धरण्याचें जाळें —बदलापूर ४ साय (प्र) मलई पहा **मळकट**-न १ पाप 'जें त्रिविधीं मळकटा। तू साहिलासि सुभगा।'—माज्ञा १५ ५८१ २ मळाचें पुट थर 'हे कळिमळाचीं मळकटें। नामोद्वारें नासती।'—एभा ४ २५१

-वि मळलेला, घाणेरडा, मलिन **मळकटणें**-अक्रि मळणें, घाणेरडें, मलिन होणें **मळकटा**-पु मळाचा थर, लेप 'धुऊनिया मळकटा। बुद्धीचा तेणें।'-ज्ञा १८ १०११ **मळका**-वि घाणेरडा, मळलेला, मलिन **मळकी**-स्त्री १ नदीच्या प्रवाहावरोवर आलेला गाळ २ गाळ साठून झालेली जमीन मळई ३ (वे) अशा जमिनीवर केलेली लागवड मळई पहा **मळको(खो)रा**-वि मळकट रंगाचें नवीनपणाचा तजेला कमी झाला आहे असें (नाणें) **मळघा(खा)ऊ-धाऊ**-वि १ जो मळला असला तरी मळलेला दिसत नाहीं असा (रंग) २ कष्ट, आजार इ० न चर फटता सोसणारा ३ बाहेरून सुंदर पण आतून घाणेरडा दिसणारा (मनुष्य, पदार्थ) **मळगा(घा)उणें**-सक्रि खराब, घाण करणें, मळविणें मलिन करणें, **मळणें**-अक्रि १ मलिन घाण होणें २ मोहानें व्याप्त होणें 'मळलें हातें मन परि कलें त्वा शुद्ध, तुजकडे वळलें। -मोकर्ण ४३ २३ **मळमास मळयागर मळशुध्दि**-मलमास इ० पहा **मळावणें**-सक्रि १ मळानें युक्त करणें, घाणेरडे करणें २ (पराभव इ०नीं तोंड) उतरविणें. 'पळवी सुयोधनातें, त्यासकट तदाश्रितानें मळवी।'-माविराट ६ १४४ **मळाचा कोठा**-पु मलाशय **मळा**-स्त्री १ अगावरल्या मळाचा वळी २ पावसानें किंवा नदीच्या प्रवाहा बरोबर वाहून येतो तो गाळ (स'मा) चिखल आतां गगचें एक पाणी। परि नलें आनानीं वाहणीं। एक मळी एक आणि। शुद्धत्व जैसें।'-ज्ञा १७ १९६ ३ नदीकाठची बागाइती जमीन, मळई 'काळी मळी पाडरा चोळ। परी ते केवळ वसुधाची।' -एभा ४ २६० ४ अशा जमिनीवर केलेली बागाइती शेती, लागवड ५ साखर गूळ इ० शुद्ध करताना निघतो तो मळ ६ वोण त्यादि पदार्थावर येते ती मळकट साय ७(राजा) मोठ्या शेतात बाध घालून पाडतात ते लहान खोंचे भाग प्रत्येकी ८ (व) नदी काठची पडीत जमीन ९ (न्हावी धदा) डोक्यातील मळ काढण्या साठीं कोईचें केलेलें साधन -वि (जुन्नरी) मळकट धुरकट रंग असलेली (मेंढी) 'ही मेंढी मळी आहे' **मळी(ळि)ण**-वि १ मळलेला घाणेरडा, ओंगळ, अस्वच्छ २ (ल) पापानें युक्त पापी दोषी ३ तयार नसलेली, विसरलेली (विद्या, कला इ०) ४ म्लान मळूल कृपाच्या ढेंकरें न ढवेल पुष्टी। रूप दावी कष्टी मळिण वरी।'-तुगा २८०६ [स मलिन]

**मळक-की**—स्त्री (ना व) मळमळ वांतीची भावना

**मळगा(घा)घणें**—अक्रि १ फार रहदारीमुळें मिजो तुडविला जाणें रुळणें, (रस्ता इ०) २ फार वापरल्यामुळें गुळगुळीत होणें, झिजणें, जीर्ण होणें (पदार्थ) ३ अगवळणी पडणें, अनुभविक असणें, सवय परिपाठ असणें (कला, कृति, धदा इ० मध्यें) [मळणें]

**मळगी-घी**—स्त्री (वे वर्हा) बाजारातील कायमची बाधलेलीं दुकानें (समुच्चयार्थी), ठाम बाजार, याच्या उलट मेण बाजार [का मळगिगु=ठाम असणें]

**मळणें**—सक्रि १ धान्य कणसातून तुडवून, झोडपून बाहेर काढणें, तुडविणें (धान्य) २ (गुन्हाळघर वों) ऊस चरकात घालून रस काढणें, पिळणें 'गूळ मळणें =गूळ तयार करणें ३ तिंबणें, मऊ करणें (कणीक) ४ चेपणें रगडणें चोळणें (हात, पाय इ०) ५ (घोड्याला) खरारा, मालीश करणें ६ अगास उटी, उटणें लावणें ७ (ल) रहदारीनें वाट पाडणें, रस्ता रुळविणें (मार्ग मळणें) मळलेला मार्ग मोडून आपला मुलगा किंचित बाजूला गला '-कले १ ३१० [सं मर्दन, प्रा मल्न प मळना, गु मळवु हिं मलना, सिं मल्नु] **मळण**-न १ (राजा) उसाचा रस गुळासाठीं कढविणें २ गूळ घर, गूळ तयार करण्याची जागा **मळणकर**-पु मळणी करणारा, धान्य मळणारा [मळणी+कर] **मळणतळण**-न स्वयपाकाचीं कामें (सर्व साधारण) कणीक तिंबणें तळणें इ०कामें **मळणी**-स्त्री १ कणसें झोडपून, बैलाकडून तुडवून धान्य काढणें (क्रि० काढणें, करणें घालणें) २ उसाचा रस काढण्याची क्रिया ३ (ल) मळणीचा हगाम ०घालणें-धिंगामस्ती धावाधाव करणें, धुळींत खेळणें (लहान मुलानीं) **मळणीवर येणें**-काहीं एक पदार्थ तयार झाल्य वर यणें आरत्या वरी यणें **मळीव**-वि १ मळलेलें, झोडपलेलें, तुडविलेलें (धान्य) २ तिंबलेलें, चेपलेलें; पिळलेलें इ०

**मळभ-व**—न १ अभ्र, आभाळ ढगाचा समुदाय २ आकाशाची अभ्राच्छादित स्थिति ३ (वे कु) आकाश [स मल+अभ्र] **मळभभर**-क्रिवि पुष्कळ अतिशय बेसुमार (बोलणें, खाणें) **मळभी**-स्त्री (समुदायातून) निराळा झालेला ढग, लहान ढग **मळवट**-स्त्री (कु गो) अभ्र मेघाचा समुदाय **मळाव**-न (कु) १ अभ्र, ढग २ ढगानीं युक्त असें आकाश

**मळमळ**—स्त्री १ पित्तामुळें कळकट पदार्थ खाण्यात आल्यामुळें वांती होईलसें वाटणें, उमासा (क्रि० येणें) २(ल) काहीं सशय आल्यामुळें मनास वाटणारी अस्वस्थता, चित्ताची सशयात्मकता (क्रि० फेडणें, घालणें फिरणें जाणें) 'माझ्या घराचा झाडा घेऊन तुम्हीं आपल्या मनाची मळमळ फेडून टाका' [ध्व] **मळमळणें**-अकर्तृकक्रि वांती होईल अशा भावनेनें युक्त होणें उमळणें, उमसणें मला मळमळतें', 'पोटात मळमळतें **मळ**-**मळी**-स्त्री वीट तिरस्कार उमासा **मळमळीत**-वि १ बचव पाणचट योग्य प्रमाणापेक्षा कमी मारमसाला असलेला (खाद्य पदार्थ) २ पाणचट, कवकवीत (फळ) ३ मेंगळूळ, सौम्य, वेंदील (मनुष्य) ४ नीरस, तडफ नसलेलें (गाणें, भाषण, वागणूक) ५

मोगल, तजहीन, घाणेरडें दिसणारें, बोजड ( धातूचें माडें, शस्त्र इत्यादि ) ६ ढिला, सैल, अव्यवस्थित; नीटनेटका नसलेला (पदार्थ, कामाची पद्धत) म्ह० मलमलीत सौभाग्यापेक्षा मळखळीत वैधव्य बरें

**मळय(यें)पाचौर**—न (महानु ) पाच सुगधाचें वस्त्र 'ब्रह्मसुखाचें मळयपाचौर। जि। कवणा वेचिलें।' –भाए १२५ 'सर्व सुखाचें मळयेंपाचौर। जाण माझें स्वरूप।' –भाए ६६२ [स मलय+पच]

**मळयो, मळया**—पु गोड्या पाण्यांतील एक मासा; खवली मासा

**मळ(ळि)वट**—पु लग्न, मुज इ० प्रसगीं स्त्रियांनीं कपाळभर लाविलेलें कुकू किंवा पुरुषानीं तसेंच लाविलेलें गध, गधलेप ( क्रि० भरणें, लावणें ) 'तही कलें कृष्णार्पण। निजभाळीं मळवट।' –एरुस्व १ ६७ 'ल्लाटीं शोभ मळिवट। मृगमदाचा।' –कथा ३. १५ ३१ –न (कुमारी धदा) घाणावर तयार केलेलें व थोपटण्या पूर्वीचें मडकें –वदलापूर ६६ –वि फार मळी साचून तयार झालेली ( पाढरी जमीन ) –कृषि १५

**मळवटी**—स्त्री अग वरच्या मळाची वळवटी, मळी [मळ+वर्णे]

**मळवड्या**—पु काळा तीळ –कृषि ३४९

**मळवा**—पु (कु) सडकावरचा मळ खाणारा मासा मळयो पहा [मळ]

**मळवाचें**—न (ढोराचा धदा) गाईम्हशींचें टाकलेलें चामडें

**मळसु(सू)त्र**—न पेंच आट असलेला खिळ्यासारखा पदार्थ फिरकीचा खिळा (इ) स्क्रू ०फिरविणें-दाबणें-चालणें-(ल) एखाद्याचा मूळ हेतु बदलून अन्य गोष्टीकडे त्यास प्रवृत्त करणें मनाविरुद्ध गोष्ट करावयास लावणें मन वळविणें **मळसूत्री**-वि मळसूत्रानें बसविलेला (पदार्थ) ०प्रदक्षिणा-स्त्री शकराच्या भोंवती जी विशिष्ट (तिरकी) प्रकारची घालतात ती प्रदक्षिणा सोमसूत्री प्रदक्षिणा पहा

**मळहीर**—वि घोड्याचा एक रग –अश्वप १ २८

**मळा**—पु १ फळफळावळ, भाजीपाला इ०ची लागवड, बागाईत २ बागाईत पिकें करण्याची जमीन ३ दुपिकी जमीन ४ तिळाची एक जात [स माला] ०(ळ्या)एरंड-पु मळ्यात लागवड केलेलें एरडाचें झाड याच्या उलट शेत एरड ह्या दोहोंस अनुक्रमें मोठा एरड आणि बारीक एरड असेंहि म्हणतात **मळेकरी** पु १ बागाईत करणारा मळ्याचा मालक याच्या उलट शेतकरी २ मळ्याची मशागत करणारा **मळेजमीन**-स्त्री मळ्यासाठीं योग्य असलेली बागाइती जमीन **मळेवागी**-स्त्री मळ्यात लागवड केलेलें वांग्याचें झाड **मळेवागें**-न त्याचें फळ **मळेवाफ्याची पेरणी**-स्त्री पाऊस पडल्यानतर केलेली पेरणी जी जमीन पावसापूर्वी नागरतां येत नाहीं अशा जमिनींत या प्रकारची पेरणी होते –कृषि २२४ **मळ्यागहू**-पु मळ्यात तयार झालेला गहू पाटस्थळांत झालेला गहू ह्याच्या उलट शेत गहू

**मळ्या**—पु तांबूस तेलकट रग –वि तांबूस पिंगट रगाचा, भुरा (बैल, गाय इ०)

**मक्षिका**—स्त्री माशी [स] ०पात-पु अडचण, विघ्न, अपशकून, माशी शिंकणें 'कोठें तरी मक्षिकापात झाल्यानें म्हणा सभेपुढें पुरावा वाचण्याचें काम निघालें नाहीं' –नि ४ १२७ **प्रथमग्रासे मक्षिकापात** –एखाद्या गोष्टीस प्रारभ करावयाच्या वेळीं कांहीं तरी हरकत, अडचण एकदम उपस्थित होणें

**मा, मा**—क्रिवि नको, नाहीं 'तद्र वळीं मा-भणौनि न घसरे चालता। दुनी ढहुडी आगें घालिता।' –शिशु ५६२ २ नकर 'न यावया मा जिभ लाज ना दे।' –आविश्वा २३ ३ ना, होय ना? (प्रश्नार्थक अव्यय) 'तुम्हीं वक्राकारवीं चादिर्णे। चरळ पहा मा।' –ज्ञा ११ १५६ ४ मग नतर 'मा एक जन्म यये दोजोका। मा काई होइल ते पाहिजे।' –चक्रधर सि सू 'सुर्यो रात्री पा मारील। मा आपणया उदो करील।' –अमृ ६ २१ ५ जरी यद्यपि तान्हेल्या मृगतृष्णा। न भल्या सीण जे सणा। मा भेग्लया कोणा। काय भेग्लें।' –अमृ ७ २१० ६ तरी पण 'मा चद्रासि उणें। स्फुरतें का।' –अमृ ७ १७२ ७ तर मग 'तेवीं हरिभक्ता देहाचा अभावा। मा काळ कणवा घालील घावा।' –एभा २ ६८३ [स]

**मा**—स्त्री १ माता, आई २ लक्ष्मी विष्णुपत्नी 'भगे अश्वत्थामा अश्वत्था मा क्वचित् सदा हरिला।' –माविराट ५ ३८ [स मातृ प्रा माइ माउ] ०साहब-स्त्री राणी राजमाता

**मा(मा)ई**—स्त्री १ आई किंवा वडील यास हाक मारण्याचा शब्द, (सामा) एखाद्या वडील बाईस लोकांनीं हाक मारण्याचा शब्द २ (बालभाषा) मांजर [स मातृका प्रा माइआ]

**माइ(इ)क**—वि १ मायिक मायावी २ मिथ्या अशाश्वत हें सकळही जाणभाव। माईक माया।' –दा ३ १० ४९ ३ माया करणारा यापरी महीत माईक। कोणी नाहीं मज लागीं।' –नव २४ १६६ [स मायिक]

**माई(इ)ण माइणी नी**—स्त्री मायणी पहा

**माईण-न**—स्त्री एक वनस्पति हें झाड ओंवळ्याच्या झाडा सारखें असून पानेंहि ओंव्याच्या पानाप्रमाणें लहान असतात [स मायिनी] **माईणमूळ**-न वरील वनस्पतीचें मूळ या मुळाचें लोणचें घालतात हें औषधी आहे

**माईदळ**—क्रिवि ( अदिष्ट ) पुष्कळ, भरपूर मायदळ पहा

**माई(य)फळ**—न माजूफल मायफळ [ हिं ]

**माउंदें**—न ( महानु ) मावदें पहा ' माहिंभटीं माउदें केलें '

**माउ(ऊ)ली**—स्त्री ( काव्य ) १ मावली, आई ' सासुरवासें शीणली । तियें भेटे जैंवि माउली ।'–ज्ञ ११ २ आईसारखी कोणतीहि भली स्त्री 'त्या माउलीच्या सद्गुणाचें कीर्तन करावें तें थोडेंच '–विवि १० २१८ ३ जलदेवता [स मातृ] **माउल पण–पणा**–नपु १ आईची माया, दयाळूपणा, ( सामा ) माणुसकी [माउली+पण, पणा] **माउ(ऊ, व)शी–सी**–स्त्री १ मावशी, आईची बहीण २ ( ल ) साप नमाता ' ध्रुव पितयाचे अर्की बैसला । तव माउशियेनें ढकलिला ।'–कथा ७ १० ८

**माऊसबहीण**–स्त्री मावशीची मुलगी [मावशी+बहीण] **माऊसभाऊ**–पु मावशीचा मुलगा **माऊ(व)सा**–पु मावशीचा नवरा

**माऊ**—स्त्री ( व ) खाटस ताण देण्यासाठीं पायगतच्या दोरात पिळवटलेली लांब काठी

**माऊ**—स्त्री ( कों ) जखम, क्षत वगैरे झाल्यावर त्या जागीं राहणारी खूण, चट्टा, वण

**मांऊ**—न १ ( बालभाषा ) माजर २ ( व ) आईनें घास, आमा [ ध्व ]

**माऊत–द**—पु महात हत्ती हाकणारा [ स महामात्र, म महात ]

**माऊन**—न एक सारक औषध

**माकड**—नपु १ मर्कट, वानर याचें शेंपूट आखुड असून तोंड तांबडें असतें माकड अगर वानर हा सस्तन वर्गातील द्विहस्त प्राण्यामध्यें मोडतो याच्या अनेक जाती असून त्यापैकीं कांहींचें माणसाशीं पुष्कळ सादृश्य आहे २ कवड्याच्या खेळात न उजवितां राहिलेला–अगावर डाव आलेला–घवघा गडी [ स मर्कट प्रा मक्कड ] म्ह० १ माकड मारलें आणि पाप हरलें=निरुपयोगी शिक्षेबद्दल म्हणतात २ माकडाला काकडी ( मिळणें )=थोड्याशा लाभावर सतुष्ट होणें ३ घर साकड आणि बायको माकड ०चेष्टा–स्त्री वानरचेष्टा; हाड चाळे ०टोपी–स्त्री कानटोपी ०तोंड्या–वि माकडासारखें तोंड असलेला ०निंबू–न माकडनिंबोणाचें फळ ०निंबोणी–निंबूण–स्त्री नेहमीं हिरवें असणारें एक काटेरी झाड, माकडी अर्थ ४ पहा ०फुगडी–स्त्री मुलींचा एक खेळ ०मिठी–स्त्री घट्टमिठी, कवटाळणें मगरमिठी ०मेवा–पु हलकी निःसत्व, भूक तृप्त न करणारी फळें अन्न विड्याचीं पानें भुईमुगाच्या शेंगा, ऊस, खरबुजें फळफळावळ इ० विशेषत हरभरा [ माकड+मेवा ] ०वस्ती–स्त्री वन्य वृक्षमय, डोंगराळ प्रदेश ०शिंगी–शेंगूळ–शिंदळ–नस्त्री एक वनस्पति ०शेंडा–पु एक प्रकारचें गवत ०हाड–न पाठीच्या कण्याच्या शेवटीं असलेलें गुदद्वारावरचें हाड [ स मर्कटास्थि ] **माकडी**–स्त्री ( कों ) १ वल्हें अडकविण्याच्या खुंटीचें भोंक २ ( गो ) तुळई ३ एक वेल व तिची शेंग, कुहरी ४ लिंबुणीच्या जातीचें रानटी झाड याचीं पानें निंबुणीप्रमाणें असतात पण यास काटे असतात फळें बारीक सुपारी एवढीं असतात ५ पकड ६ ( कु ) ( दाराची ) कडी

**माकडीचें झाड**–स्त्रीन एक झाड रात्रीं प्रवास करतांना डाक नेणारे जासूद व इतर लोक याच्या लाकडाचा मशालीकरिता उपयोग करतात याचें एक टोंक थोडेसें चेंचून मग तें पेटवितात हें फार तैलयुक्त असतें

**मा( मा )क( ख )ण**—न बैल रेडा, घोडा इ०च्या पाठीवर पाणी आणण्यासाठीं घागरी ठेवण्याकरिता केलेली लांकडी, लोखंडी चौकट सागड [ का मकणि ] **माकण**–स्त्री ( मल्लविद्या ) एक डाव जोडीदाराच्या पाठीवर माकण घातल्याप्रमाणें आपले दोन गुडघे आपल्या बाजूच्या बगडीजवळ टेकून आपलीं दोन्हीं कोपरें एक जोडीदाराच्या बगलेंत व दुसरें त्याच्या जाघाडांत, घालून त्याचा हात कम काढल्याप्रमाणें काढून व त्याचा पाय गुडघ्याच्या ल्वर्णीत हात घालून धरून, त्याला आपल्या माडयावर चीत करणें **माक( ख )ण्या**–वि १ माकण वाहणारा ( रेडा, बैल, घोडा इ० ) २ पाठीवर माकण घातलेल्या जनावरास हाकणारा, नेणारा

**माकता, माकतेकरी**—वि भिकारी, याचक [ मागता अप ]

**माकत्यान, माकत्या( त्या )न–नी–नें, मागत्यान–नी–नें**—क्रिवि पुन , फिरून [ मागती, माग+नें ]

**माकंद**—पु आम्रवृक्ष [ स ]

**माका**—पु भृंगिराज एक औषधी वनस्पति ही ओलसर जमिनींत बाराहि महिने होते ही वातहारक आहे श्राद्धामध्यें पितराच्या पूजेस वापरतात माक्यात काळा माका म्हणून एक जात आहे यास काळीं फुलें येतात हा गुणानें जास्त आहे [ स मार्कव ]

**माका माज**—सना ( राजा कु ) मला [ मी ] म्ह० ( गो ) माका तुका पडना, वड वाद्रूक घडाना, माका तुका पडता, वडे वाद्रूक घडता=मन एक असलें म्हणजे वाटतील त्या गोष्टी मनुष्यें एकमेकासाठीं करतात

**माकुडजावप**—अक्रि ( गो ) मक्र पडणें

**माकुल**—पु ( कों ) एक मासा, माशाची एक जात ०धाणा **माकुला**–वि ( राजा ) देखणा सुदर, रम्य नेटका, सुबक चिमुकला, चिमणा ( मनुष्य, वस्तु )

**माकूल**—पु ( कों ) रुदरी लाकडाच्या माडावरील पिंढीचा आडवा पट

**माकूल**—वि १ प्रौढ सभ्य; जाणता २ पसत रास्त, न्यायाचें ३ उदार, सन्मान्य पूज्य, योग्य ४ शाहाणा, अक्कल वान —पाव १८ ' याजकरिता तुम्ही राजास माकूल करून पर स्पर्रें ' –वाडबाबा १ १५५ ५ मुबलक ' सरंजामही माकूल दिघला जाईल ' –रा ८ २०७ [ अर मअकूल]

**माकोजी**—पु मुडामाकोजी पहा

**मांकोडा**—पु मुंगळा डोंगळा ' कीं वळघौनि झाडा। एखादा करी माकोडा।' –ऋ ३० ' गुळीं आवडी माकोडि यासी।' –एभा ३१.३०३ [ गुज मकोडा]

**माख**—पु ( महानु ) उडीद ' माख न साधे ' [स माष]

**माखटणी**—स्त्री ( राजा ) माखणी **माखटणें**–सक्रि (राजा ) भाकरी इ०कास तूप इ० चोपडणें [ प्रा म्रक्षण=चोपडणें] **माखण(न), माखट्टण**–न ( राजा ) १ लोणी, तेल चोप डणें ( सामा ) ओशट व चोपडण्याचा पदार्थ २ लोणी ' दुग्ध माखण दधी विकनारी।' –आनवरसचरित्र २९ ३ (व ) तेल ' भाकरीवर माखण पाहिजे ' ४ लेपणें; चोपडणें ' माखण झालें कुसरी।' –दसीस्व १० १० ५ ( कों कशोळी ) अभ्यंगस्नान **माखणी**–स्त्री चोपडणें **माखणें**–सक्रि १ चोपडणें, भरणें, लेपणें (ओशट द्रव्यानें शरीर इ० ) ' नावाडी घेऊनी चंदना रसी। आगा माखिजतु पाहे मासी।' –शिशु २८ २ चिखल इ०नीं शरीर भरणें ३ ( ना ) बैलगाडीला ओंगण लावणें [ स म्रक्षण, प्रा मक्खण माखन गुज माखण] **माखण्यावालपापडी**–स्त्री वालाची एक जात, याच्या शेंगाची पक्व भाजी करतात, वाळवून दाणे काढीत नाहीत, दाणा वाटोळा असतो –कृषि ३३४

**मॉखार**—वि ( कु ) हाडापरानें सुदृढ, देखणी ( मुलगी )

**माखी**—स्त्री ( खा ) माशी ' सरावनात माख्या भलत्याच त्रास देतात ' [ स मक्षिका]

**माग**—पु १ ज्यावर कोष्टी कापड विणतो तें कापड विण ण्याचें साधन, यंत्र २ विणताना पावडा खालीं जाण्याकरिता केलेली खळी [ स माग्=चालणें हालणें] ०**दोर**–पु वशारन आणि कापड यास ताण देण्याचा दोर ( सुनाचा अवाडीचा )

**माग**—पु १ रस्ता, मार्ग ' निज शिबिरापासुनि गुरुपुत्र रथाच्या धरूनि मागातें। धावे भीमक ।' –मोऐषिक १ ३४ २ पायरव, चाहूल, चिन्ह ३ पत्ता, शोध ' हारतलें न देखिजे। तव माग न साहिजे।' –ज्ञा १८ १५० ४ तपास थांग, छडा, पत्ता ( क्रि० लावणें, लागणें, काढणें ) ५ ( राजा ) मळा, बाग यातील झाडास पाणी देण्याकरिता केलेला मार्ग पाट पाणी जाण्याचा मार्ग ६ पाटाच्या एका भागानें पाणी दिलेली झाडाची रांग ७ –स्त्री ( कों ) मासे धरण्याचें मोठें जाळें [ स मार्ग प्रा माग्ग] ( वाप्र ) ०**काढणें**–**लावणें**–एखादा मनुष्य कोणत्या वाटेनें गेला, त्याचा तपास त्याच्या रस्त्यावर उमटलेल्या पावलांच्या अनुरोधानें करणें, ठावठिकाणा लावणें काढणें, पाठलाग करणें ०**लागणें-उरणें**–पत्ता, तपास लागणें, अवशेष राहणें सामा शब्द– ०**काढु–काढ्या**–वि चोर इ०चा माग, पत्ता काढणारा, लावणारा [ माग+काढणें ] ०**मू(मो)स-मुद्दा**–पु छडा, पत्ता, ठावठिकाणा थांग ( क्रि० लावणें, लागणें, काढणें, निघणें, पाडणें, पडणें ) [माग+मूस] **मू(मो)स-मुद्दा मोडणें**–सर्व ठावठिकाणा नाहींसा करणें, प्रत्येक मुद्दयापत्त्यावरून बोळा फिरविणें ०**लाव्या**–वि पत्ता काढणारा, थांग लावणारा; पाठलाग करणारा (चोर, पळ पुटे इ०काचा) [मार्ग+लागणें **मागाडा–ड्या**–वि १ वाटाड्या ' सर्वं मागाडा धरा।' –गीता २ २४९५ २ चोर इ०चा माग काढणारा; तपास लावणारा ' मळ्यानीळु मागाडा।' –भाए ४२६ **मागारी**–पु १ ( कु ) सोबती २ पति नवरा पाहुणा ३ मूळ आलेला मनुष्य **मागारीण**–स्त्री ( कु ) लग्न झालेली स्वतःची बायको **मागावचें**–क्रि ( गो ) माग काढणें **मागा(गो)वा–वें**–पुन १ मार्ग वाट दीक्षा कित्ता ' घेती तयाचे मागावा। आचरावया।' –ज्ञा १७४१ २ अनुकरण, अनुसरणें; त्या मार्गानें जाणें ' तसा व्यासाचा मागोवा घेतु।' –ज्ञा १८ १७२२ **मागोसा**–पु पत्ता, मागमूस, चाहूल ' त्यांच्या पाव लाचा मागोसा घेतघेत माणसांनीं थूरेनसचा पत्ता लावला ' –क १२ ७ २०

**मांग**—पु एक हिंदु जात व तींतील व्यक्ति फाशी देण्याचें काम याचेकडे असे यांच्यातील कांहीं सांकेतिक शब्द– हिडका= मारामारी कुडतुल=पेटी धादल खडल=फोडणें कुडपळ=गाडी गागल=चांभार पेहणें=पळून जाणें घुमर=दार तवला=खुनासहित दरोडा शेंग=मालाचा वाटा पडम, भुरा=युरोपियन हलक, हल्वा=सोनें किंवा चोरीचा माल दुवक पुकणी=बंदूक कूड, कुडच=घर नादी खवडी=घरफोडी घे बोद=दिवा चिलड= कुलूप खारपे, दमुल–पैसा ऊन=चादणें झुनीर मुरसी=पोलीस ताड=दोरी हुरकत पडा, हुराकडा=पळ तोलकला=निजला निल गटी=काठी धड्डल कटनूल=तलवार, हत्यार मूर, नली=चोरी इ० –गुजा [ स मातंग ] (अगात) **मांग शिरणें–येणें**–रागावणें त्वेष चढणें ०**गारु(रो)डी**–पु मांगांतील एक पोटजात हे म्हशी विकतात व भादरतात याच्या टोळ्या गावाबाहेर पालात उतरतात, ढोल वाजवून नजरबंदीचा खेळ करतात धान्य, मेंढ्या इ० चोर तात ०**गारूड**–न १ मांगगारुड्याची जादुगारी, मूठ फेकणें **मांगटा–डा**–पु १(निंदार्थी) म ग २मांगाचा भाट व उपाध्याय अस्पृ ४७ **मांगणी**–स्त्री मांग जातीची स्त्री **मांगणीची पत्री**– स्त्री अमावास्या सकाळ किंवा महापर्व आलें असता भीक मागत फिरणाऱ्या मांगणीच्या टोपलींत ( दु खें व महबाधा नाहींशी

करण्यात हिचा उपयोग होतो म्हणून ) टाकलेलीं द्रव्यें (धान्य, तल, मीठ इ० ) **मागणीचें पत्तर**–न वरील भीक मागणाऱ्या माग णीचें तरसाळें, पोखरलेला भोपळा. **मांग हृदय-यी**–वि निष्ठुर अत करणाचा, निर्दय, पाषाणहृदय [ माग+हृदय ] **माग(गो) ळी**–स्त्री १ थोरल्या दिवाळीच्या दिवशीं माग लोक मोळाचा ओढण्याकरिता दोर वळून चावडीवर ठेवितात तो २ मुर्जीत मुज्याच्या कमरेस बाधावयाची मोळाची दोरी 'आणि स्वध र्माची मागळी । बाधे वाचेच्या पिंपळी।'–ज्ञा १३ ६५८ [ माग+वळी ] **मांगिणी**–स्त्री एक क्षुद्र देवता 'पूजा जोगिणी मागिणी।'–दावि ६३ **मागेला**–पु गुजराथेंत मागास म्हणतात

**मागचा, मागला, मागील**—वि १ पूर्वीचा, पूर्वकालीन २ पाठीमागचा, पश्चात् भागीं असणा-या जागचा ३ काळानें मागून येणारा उदा० मागचा जमाखर्च, मागची युक्ति [ मागें ] म्ह० १ येरे माझ्या मागल्या कण्या भाकरी चागल्या=पुष्कळ दिवस शिकविलें तरी मूळची सवय, खोडसोडीत नाहीं उद्देशून अशास म्हणतात २ येरे माझ्या मागल्या पाप न जाई बोंबल्या **०पाय**–पु उतार, मार्गे येणें, कमी होणें ( रोग, दुखणें इ० ) **मागल्या पायीं**–क्रिवि न यावता परतून, त्वकर

**मागठा**—पु ( ना ) हातमाग

**मागणी**—स्त्री १ ल्मासाठीं वधूपक्षाजवळ वरपक्षानें केलेलें मागणें, वाङ्‌निश्चय २ याचना, मागणें [ स मार्ग्=शोधणें, म मागणें ] **०करणें-घालणें**–आमच्या यथें आपली मुलगी या असें वरपक्षानें वधूपक्षास म्हणणें **मागणें**–न १ काहीं एक पदार्थ स्वत स द्यावयाविषयीं विनति करणें २ मागावयास आलेला किंवा गेलेला मनुष्य **०मागणें**–सक्रि या म्हणणें, याचना करणें, विचारणें [ स मार्ग्=शोधणें, प्रे ि मगार, पोर्तु जि मागिणार ] आज्ञा **मागणें**–परवानगी घेणें **मागणें मागणेंकरी, मागता, मागतेकरी**–पु भिक्षेकरी, मागणारा, याचक 'तें कवीं दैन्य फेडीति। मागतयाचीं।'–शिशु १५० धिकारिति अज्ञ जसे मागतया भीक सर्वदा भगणा।'–मोआदि २२ ३४ **मागरा-माग्या**–वि पाहिजे ती वस्तु मागणारा, मागण्याची, याचना करण्याची सवय असलेला **मागीव**–वि मागून आणलेला, उसनवार [ मागणें ]

**मागता, मागतेन, मागुतमागुता माघरेन माग त्यान**—क्रिवि लागलीच, पुन पुन 'निरूपणमिष ज्ञानकथा। मागुतमागुता सागत।'–एमा ११ २५१

**मागता**—स्त्री माघार माघार घेणें मागानि मागती सति घ।'–मोवन १२ ७५ [ मागें ]

**मागध**—पु १ बदी, भाट कवि 'अठरा मागध करिती वर्णन। सगुण निर्गुण चरित्रें।'–स्वादि १० १६ २ क्षत्रिय स्त्रीस वैश्यापासून झालेला मुलगा, एक सकर जात 'तेचि सतति प्रसिद्ध। सूत वैदेह मागध। ऐशिया नामाचें जें पद। तें जाण शुद्ध प्रतिलोमज।'–एमा २० ३१ [ स ] **०देश**–पु गया जिल्हा –अश्वप १ ३४ **मागधी**–स्त्री ( साहित्य ) एक पदरचना पद्धती, हीस रीति असें साहित्यशास्त्रात नाव दिलें आहे ही रीति कोमल कठोर, मध्यम अशी तीन प्रकारची आहे, यापैकीं एक 'वैदर्भी तशि मागधी स्फुट अम्हा घेवोत रीती अशा।'–कम १ २ [ स ]

**मागप, मागपणें**—मागस, मागसणें पहा

**मा(मा)गर**—पु ( राजा कु ) १ शेतकामाच्या हगामात रहावयाकरिता, शेतात तात्पुरती बाधलेली झोपडी २ –न कोठार ( गवत, सर्पण इ०चें ) ३ ( बे ) प्रवासी बैलगाड्याचे बैल बाघ ण्याची जागा, येथें याना जकात पडते **०घर**–न ( राजा कु ) मागराप्रमाणें असलेलें लावट, उघडें घर

**मागलट, मागासणी**—स्त्री १ मागें सरणें, फिरणें, पर तणें ( सकट, करार इ०कापासून ) ( क्रि० पडणें, टाकणें ) २ ( कु ) तपास, छडा, माग ३ दिरगाई, दिवसगत 'मला दुखणें आलें म्हणून शेत मागलटीस पडलें ' [मागें+लोटणें] **मागलटणें, मागसावणें**–अक्रि ( एखादें काम ) मागें पडणें, योग्य वेळीं तयार न होईल इतकें सुस्ताईनें केलें जाणें किंवा लाबणीवर टाकणें **मागलटीवर टाकणें**–(एखादें काम ) दिवस गतीवर टाकणें, तें मागें पडेल इतक्या सुस्ताईनें करणें

**मागलटीस, मागासणीस येणें**—फिका पडणें, वाईट स्थिति यणें

**मागलवल्या**—पु बैलगाडीस मागें टकण लावावयाचा धट –मसाप २ २५२ [ मागें ]

**मागलिक**—न मगल शुभ कार्य ( लग्न, मुज इ० ), किंवा तत्सबधीं मडप इ० रचना –वि १ लग्न इ० मगल कार्याच्या सबधाचा २ शुभ, मगल भाग्यसूचक [ स मगल ] **०स्नान**–न मगलकार्यांत ( अभ्यग व उष्णोदकानें ) करावयाचें स्नान [ सं ] **मागल्य**–न १ मगल कार्यें (लग्न इ०) २ सुदैव, कल्याण **०ततु**–पु मगळसूत्र **०वस्तु**–नअव सुवासिनीचे अलंकार 'मागल्यवस्तु स्वकर करोनि। –दावि ४५८

**मागस**—वि १ मागसलेला, उशीराचा, याच्या उलट आगस ( पीक इ० ) २ उशीराचें, योग्य काळानतरचें ( दर्णे ) –क्रिवि मागाहून, उशिरा ते तरी बहुत युगाचे राक्षस। रामलक्ष्मण जाहले मागस। –क्था ३ १ १४९ [ मागें ] **मागसणें** अक्रि १ विलब लागणें दिवसगत होणें लावणें 'यदा पाऊस मागासला म्हणून धान्यें मागसलीं ' २ मागें राहणें; मागसणींत पडणें(मनुष्य, काम)

म्ह० मागसली ती मागसली, मागाहून आली ती गरम्दार माली **मागसलेला वर्ग**–पु शिक्षणाच्या बाबतींत सुशिक्षिताच्या मागें असलेला वर्ग जाति **मागसाडणें**–अक्रि (कों) अवरणें, मागें टाकणें [मागें+सांडणें] **मागसावणें**–अक्रि (कों) मागस केले जाणें मागें, पाठीमागें टाकलें जाणें [मागसणें] **मागा-गा**–क्रिवि १ मागें मावारें 'आशीवाद घेऊनी द्विजा। मागा परतवी सहित प्रजा।' –मुआदि १५ ४९ २ पूर्वी 'मागा यागिये समर्थ। त्याचाहि निज स्वार्थ।' –दा१ ९ ११ **मागाऊ(हू)न**–क्रिवि नतर **मागाडा**–क्रिवि मागें –घर **मागात**–क्रिवि उशीरा उशीरानें (धान्य पिकणें वाढणें) याच्या उलट अगात **मागातली**–स्त्री (कों राजा) चुलीच्या मागची चुलीच्या उचीइतकी भितीपर्यतची सपाट जागा **मागिलीकडे**–क्रिवि अतर्मुख प्रत्यगात्म्याकडे (वृत्ति फिरविणें) –ह्नो

**मागिलवट**—स्त्रीपु मागलट अर्थ २ पहा त्या शब्दाप्रमाणें कारक विभक्तीशिवाय व मागिलवटीस मागिलवटचास या रूपां व्यतिरिक्त हा शब्द क्वचितच योजितात

**मागी**—स्त्री (राजा) १ मागणी अर्थ १ पहा २ शोध –शर ३ सबध, सदर्भ दूर ठेली कथेची मागी।' –एभा ११ ६९० ४ आचरण, मार्ग आमची मागी अति शुद्ध।' –एभा २९ ८९ ५ सबध विचारसरणी हें अतक्यें तर्केना मागी। –एभा २२ ४११ ६ मार्ग पत्ता मागमूस अतियत्नें लक्षिलीं न वचेचि मागी। –एभा २२ ४१४ ७ खूण चिन्ह ऐक विरक्तीची मागी। –एभा २२ ६४७ [स मार्ग् प्रा मागणें]

**मागीर**—क्रिवि (गो) मग नतर

**मागील**—वि मागचा पहा [मागें प्रा मगि] **०ओढण**–नस्त्री मागच्या काळापासुन आताच्या काळापर्यंत चालत आलेला सप्रदाय पूर्वापर चाल **०दार**–न (हट) घराची मागची बाजू **०पायाचा टाळ** पु अश्व घोड्याचे चालताना मागील दोन्ही पाय एकमेकावर आपटणें पाय अडकत चालण्याची क्रिया **मागिलल्यो**–न (कर) (विटीदाडूचा खेळ) चिनीच्या मागच्या टोकापासुन मोजणें **मागील** वि (कों) उशीरा पक्णारें कमें मेहान (धान्याचें पीक) [मागील]

**मागुत-ता-ती-तें मागुतेन मागौता माघुता**—क्रिवि (काव्य) १ पुन्हा फिरुन पुढें मागुता राम जोडेल कैचा। –राम २५ २ लगेच पुढें मागुता शोक जीवी धरावा। –रा ६१ ३ मागें वही सारूनि मागतीं। –एरुस्व १ ६० [मागें]

**मागु(घु)न मागाहून**—क्रिवि १ नतर पश्चात् मागो माग २ पाठीमागच्या बाजूनें पाटीकडून [मागें] म्ह० मागून पुढून बाप नवरा **मागून आलेलें लोण पुढें पोंचविणें** पूर्वीपासुन चालत आलेले परिपाठ पुढें चालू ठेवणें (आटया पाटयाच्या खेळांत सर्व पाटया ओलाडून परत येऊ लागलेल्या गड्यास 'ता लोण घेऊन यत आह' असें म्हणतात त्यावरून)

**मागुली**—स्त्री लडिवाळपणानें वासरास म्हणतात

**मागें-गें**—क्रिवि १ गतकालीं पूर्वी अगोदर २ पाठीकड पार्श्वभागीं तो माझ्या मागें उभा होता ' ३ नतर पश्चात् माझ्या मागें मुलाचें कसें होईल याची मला काळजी वाटते ' ४ (ल) वर अवलबून माझ्या मागें हजार कामें आहेत ' [स मार्ग्=शोधणें] म्ह० १ पुढें पाठ मागें सपाट २ मागें एक पुढें एक–पुढें एक बोलणें आणि मागें विरुद्ध बोलणें करणें बोलणें व कृति यात फरक असणें 'मागें यक पुढें यक। ऐसा कदापि नाहीं दडक।' –दा १९ ४ १८ **०घेणें-फिरणें-सरणें-होणें-हटणें**–उलट खाणें, परावृत्त होणें सोडून देणें मी हें काम पत्करलें ते पत्करलें आता मी मागें घ्यावयाचा नाहीं ' **०टाकणें**–१ (पैसा इ०) शिल्लक ठेवणें २ भीतिप्रस्तास पाठीशीं घालणें मला शार्वें औवदान टाकावें मागें।' –ऐपो १५९ **०पडणें**–१ खर्च न होता शिल्लक राहणें गाठीं पडणें (द्रव्य) 'काटकसरीनें खर्च करा म्हणजे चार पैसे मागें पडतील २ साफ बरा होणें निखालस जाणें (दुखणें त्रास) 'माधी पोट दुखी अगदीं मागें पडली ' ३ आठवणींतून जाणें आमच्या बरोबर फिरावयास या म्हणजे तुमच्या आईच्या मरणाचें दु ख मागें पडेल ' ४ रद्द होणें मोडणें हा नियम आता मागें पडला ' ५ प्रगति कमी होणें रामा महिनाभर आजारी होता म्हणून मागें पडला ' ६ फिक्का पडणें महत्त्व कमी होणें 'मिरजकर बुवाच्या कथा पुण्यास सुरू होताच इतर सर्व हरिदास मागें पडले ' **०पाडणें**–(मिळकत वेतन इ०कातून) शिल्लक टाकणें सग्रही टाकणें **०राहणें** पिछाडीला असणें लोकांपुढें प्रसिद्धीस न येणें **०लागणें**–(एखाद्याचा) पिच्छा पुरविणें तगादा करणें **०पाय**–वि पिशाच्चयोनि तुका म्हणे मागें पाय। तया जाय स्थळाशीं। –तुगा ६५८ **मागें पुढें** क्रिवि १ आजूबाजूस 'मागेंपुढें पाहून चाल दाडग्यासारखा चालू नको २ दोन्ही दिशाकडे सोईनिबद्द दोन्हीपक्षी (शब्दश व ल) मागेंपुढें पाहून काय करणें तें कर ' ३ लवकर किंवा उशिरा आगेंमागें केव्हाना केव्हा ,तुम्ही असें करता परतु मागेंपुढें जाचील ' ४ अस्ताव्यस्तपणें व्युत्क्रमानें (पडलेल्या वस्तू बोललेल्या कल्पना गोष्टी) हा ग्रथ मागेंपुढें झाला आहे नीट कर ५ क कू टगळमगळ करून हा मागेंपुढें करू लागला ६ केव्हा तरी कधी तरी आणखी एखाद्या वेळेस पुढच्या किंवा मागच्या बाजूस **०करणें**–माघार घेऊ लागणें काकू करणें **०कोणी नसणें**–वडील माणूस किंवा सतति नसणें आईबाप बायकापोरें याशिवाय असणें **०न पाहणें**–मुळींच न

कचरणें 'मला चोर भेटले तेव्हा मी मागेंपुढें न पाहता त्याच्या अंगावर तुटून पडलों' ०पाहून वागणें-दूरवरचा विचार करून, शहाणपणानें चालणें **मागमोरा(मोहरा)**-वि पाठमोरा [ वे ] **मागोमाग** क्रिवि लागलीच, पाठोपाठ [ मागें द्वि ] **मागोती, मागौता, मागौतिआं, माघौतीं**-क्रिवि १ पुन्हा. 'तो दैववशें मागौता। जळेंचि लाहे।'-ऋ ६२ 'मागौतिआ निग लिआ। पवनवेगें।'-शिशु ९०८ 'माघौतीं न यों सर्वथा।' -भाए ३२३ २ माघारी, परत 'स्वयवरा आली उर्वशी। ते मागौती पाठवीलि साधुतीं।'-शिशु २०२ [ मागें ]

**मांगेरी**—स्त्री ( कु ) गलवत [ महागिरी ]

**मागेला-ल्या**—पु कोंकणातील एक जात व तींतील व्यक्ति

**मागो(घो)टा-ठा, मागोटी**—पुली घोडा, बैल इ० पशूंच्या शेपटीच्या खालून नेलेला खोगीराचा वद, पट्टा [ मागें ]

**मागोदर**—क्रिवि ( कर ) नतर, शेवटीं 'अगोदर व मागो दर मिळून दीड महिना मोडला' [ अगोदरच्या उलट ]

**मांगोरा**—पु ( कु बे ) गवत, झाडाचा पातेरा ओढण्याचें लाकडी दातालें मगेरा पहा

**माघ-ग**—पु चैत्रादि महिन्यातील अकरावा महिना [ सं ] म्ह०माघीं अळें आणि वेंदरीं फळ (गो) माग वाचूया, मागीर शिमगो खेळूया=माघ महिन्यातून जगल्यावर मग शिमग्यात खेळूया ( दूरच्या व हातात नसलेल्या गोष्टी सागणाराविषयीं ही म्हण योज तात). ०घटा-स्नान **माघोटा**-पुन. माधवा(श्रीकृष्णा)प्रीत्यर्थ पौषी पौर्णिमेपासून माघी पौर्णिमेपर्यंत सूर्योदयापूर्वी नित्य निय मानें स्नान करणें [ स माघ+टाव ] **माघा-घी**-वि माघ महि न्यासवधीं **माघोटी**-स्त्री १ माघात पडणारा पाऊस २ माघ स्नान पहा

**माघड**—स्त्री ( व घाटी ) सरकी पेरण्याकरिता नळयाच्या वर लावलेली एक प्रकारची लाकडी वाटी, टवळें, चाडें

**माघणी-णें**—( प्र ) मागणी-णें

**माघां**—क्रिवि मागें [ प्रा ]

**माघार**—स्त्री १ ( शब्दश व ल ) मागें घेणें, उलट मारणें, कचरणें २ उतरती कळा लागणें, मागें पडणें (काम, नशीब इ० ) (क्रि०घेणें) ३ मागें हटणें, फिरणें, (क्रि०घेणें) ४ परत येणें ५ उलटणें, परतणें (तापइ०) 'ज्वरानें माघार घेतली' [ स मार्ग= रस्ता, मागें ] **माघारणें**-अक्रि १ मागें घेणें, फिरणें ( शब्दश व ल ) शक्रोनि देवऋषिवचनातें। माघारले सुर सकळ।' -मुआदि ४ १५९ २ उतरती कळा, ऱ्हास पावणें ३ मागें हटणें, मुरडणें ४ परतणें, उलटणें इ० ५ मूळपदावर येणें ( माघार घेणें या शब्दापेक्षा माघारणें हा शब्द कमी प्रचारात आहे ) -सक्रि ( काव्य ) मागें सारणें, मागें टाकणें, अतिक्रम करणें, मागें पाडणें 'माघारोनि मनपवनातें। सत्रसदना पातला।'-मुआदि ११ ५७ [ माघार ] **माघारपण**-न १ नुकतेंच लग्न झालेल्या मुलीनें सासर-हून माहेरीं काहीं दिवस रहावयास परत येणें, माहेरपण २ तिचें माहेराहून सासरीं परत येणें, ( क्रि० करणें ) [ माघारा+पण ] **माघारा(रां)रीं-रें, माघारिआ**-क्रिवि. परत, पुन्हा परत, उलट **माघारा काढणें**-मागें घेणें 'माघारा भीम काढला तूर्ण।' -मोद्री ३ ३४ **माघारी**-वि १ ( वों ) नुकतेंच लग्न झालेल्या मुलाच्या अथवा मुलीच्या बरोबर माहेरीं किंवा श्वशुरगृहीं जाणारें ( मनुष्य ) २ सासरच्या मुलीला माहेरीं आणण्याकरिता गेलेला, पाठविलेला ( मनुष्य ) [ माघारा ] **माघारीण**-स्त्री १ ( वों ) सासऱ्याहून माहेरीं किंवा माहेराहून सासरीं काहीं दिवस रहावयास जाणारी, नुकतेंच लग्न झालेली मुलगी २ ( सामा ) तरुण पत्नी, मालकीण, गृहिणी [ माघारा ]

**माघावा**—पु माग [ स मार्ग्, प्रा ]

**माघील माघील ओढण, माघून, माघें, माघेंपुढें, माघोटा, माघोमाघ**—मागील, मागील ओढ इ० पहा

**माघु-घू**—पु मागें, माग [ स मार्ग् ]

**माघोडा**—क्रिवि मागोमाग [ प्रा ] **माघोवा**-पु माग, पत्ता -क्रिवि आपले मागें, माघा, मागें 'चरण घेती माघोवा।' सिस १४ [ स मार्ग ]

**माघौता-ती-तें**—क्रिवि पुन्हा, परत मागौता पहा 'कोण्ही कोणातें भजता। ते ही त्यातें भजे माघौता।'-रास ४ २९५. [ मागुता ]

**माच**—पु १ फोडलेल्या अथवा लहान धोंडयानीं भरलेला किंवा भरावयाचा गच्ची, पाया इ०काचा मध्य, आभ्यतर भाग २ गच्ची इ० करताना जमिनींत घातलेलें भरण ( क्रि० भरणें, घालणें )

**माच**—अ शेळी, मेंढी याची गणती करताना विसावरील सख्येस लावतात तो प्रत्यय उदा० शेळी माच एक्वीस मेंढी माचे बावीस विसाच्या आतील सख्येस शुद्ध शब्द लावतात ०बकरी-स्त्री माचातील बकरी, वीस सख्येहून अधिक असलेली बकरी

**माच**—पु १ माचोळी, माळोंचा, माचा २ माळा, माडव, सोपान 'कीं प्रासादाचेनि मोपें। आकाशा माच बाधले जैसें।' -ऋ १६ 'नातरी सहारतेजाचिया ज्वाळा। तोडोनि माचु बाधला अतराळा।'-ज्ञा ११ ३०३ ३ ( वों ) पेंढा, गवत सर्पण इ० ठेवण्यासाठीं जमिनीवर धोंडे माडून किंवा मेढी पुरून त्यावर आडवीं उभीं लाकडें घालून केलेला माळा ४ आश्रय ५ ठिकाण ६ ( व ) माकण ( पाणी आणण्याची ) ७ ( व ) आढी ( आंबे इ० पिकविण्यासाठीं घातलेली ) 'आंब्याचा माच' ९ खाट,

पलग [स मच्=धारण करणें, स मच] **माचण** स्त्री ल्हान माचा

**माचकणा**—पु पाटीचा कणा [माज+कणा]

**माचग, मोरचग**—न एक वाद्य –दहु ३६

**माचण**—स्त्री (नाविक) गलबताची गति बदलताना शीड पालटण्याची क्रिया [द] •घेणें-नागमोडीच्या मार्गानें जहाज हाकारून वाऱ्याच्या विरुद्ध दिशेनं मार्गक्रमण करणें

**माचण**—स्त्री भरणी, भर (क्रि० भरणें) [माचणें]

**माचणें**–सक्रि १ (व) दाबून नरम करणें 'आवा माचला' २ दगड इ०नीं भरणें (गच्ची, जमीन पाया, भिंत, विहीर, खळगा, भोंक इ०चा मध्यभाग) 'पत्रासा चिऱ्यानीं बांधिलें,माचोनी।' –व ५०० ३ मेगा चिलणी भरणें या क्रियापदाचें कर्म भर लेली जागा किंवा भरण्यास लाविलेलें द्रव्य हें असतें उदा०जमीन माचली विहीर माचली, पाया माचला गार माचली, खडे माचले इ०

**माचयाल(वल) माचील माचेल**—स्त्रीन (कु गो) मिरवणुकीचे वळीं नवरदेवास ज्यांत बसवितात ती पालखी, मेणा इ० [स मच]

**माचळ**—पु १कोरळ वृक्ष याचें पान खाण्यास योग्य असतें २ एक विशिष्ट खाण्याजोगें गवत

**माचळी**—स्त्री अडणी तिवई (जेवण्याचें ताट ठेवण्याची) 'आसन सोरठा उर्णपर्गी। पुढां माचळी चौंपुटी।' –ऋ ८०. [स मच]

**माचा माचवा**—पु १ काथ्यानें विणलेला एक विशिष्ट आकाराचा पलग गजिल कुशशयनोनचि कुणेनें हे पलग ह माचा' –मोभादि ३४ २३ २ पलग मचक दूत श्रासाति घर्ती म्हणुनि सुमति ते जोडिती पाय माच। –मोकृष्ण ७२ ५३ ३ शेताच्या राखणीसाठीं चार खांबावर केलेली बसण्याची जागा, माळा ४ माच्याचा दूर ५ पाण्याचा पाट ओलांडून पलीकडे जाण्यासाठीं केलेली वाट माचव्या माच्यापाशीं गाडी आली –खराद [स मचक प्रा मंचओ; अप मचऊ] **माचाड**—स्त्री मोटनें पाणी वर काढण्याकरितां जिला मोटचा नाडा (दोर) बांधतात ती मोटच्या तोंडावरील लाकडी चौकट **माचाळ**—न माचा अर्थ ३ पहा **माचा**–स्त्री १ पर्वताच्या पायथ्याजवळील किंवा पायथा व शिखर यांच्या मधील सपाट जमीन उपत्यका २ किल्ल्याच्या तटाखालील उताराचा भाग ३ माचा साट ४ (व) खुर्ची घोरख समोर खालीं पाय सोडून बसण्याचा छोटा ठकडा ५ घर सुगवर आडवीं उभीं लाकडें टाकून केलेली चवकट (उन्हांत धान्य इ०वाळत घालण्यासाठीं पेंढा टवण्यासाठीं) ६ वासरें करडें इ०कांकरितां मुंग व फळ्या पुरून (केलेलें आवार; कोंड वाडा कोंकण [स मच्=धारण करणें मच] **माचु(चों-चो)डा**–पु (कों) (भात नाचणी इ०काच्या) पेंढ्याचा विडा पेंढी **माचो**–पु (कु) दोऱ्यानीं विणलेला पलग, चोपाळा **माचो(चु)ळा**–स्त्री १ पेटी, धान्याचें गोण इ० ठेवण्याची घडवंची २ लहानसा माच, माळोचा गवत पेंढे इ०साठीं केलेली उंच जागा.

**माचिगाणें**—न दिंडी गाण्याचा एक प्रकार 'डफगाणें माचिगाणें।' –दा १२ ५ ६ [प्रा]

**माचूळ**—वि बेचव मचूळ पहा

**माचेमार**—पु खेटरानें,पायपोसानें दिलेला मार [मोची+मार]

**माज**—पु १ (राज) स्वयंपाकाच्या भांड्यास तें न जळावें म्हणून बाहेरून लावण्याची राख व माती २ भांड्यास राख व माती फासण्याची क्रिया ३ अशी राख, माती फासलेली स्थिति, केलेला लेप [माजणें]

**माज**—पु १ (कों) एक मासा २ (माण) माचा

**माज**—पु (काव्य) मध्य कंबर, मधला भाग (शरीर, टेकडी, घर याचा) 'सिंह देखोनि जिचा माज। मुख न दावी मनुष्यात।' [स मध्य आर्मेजि मझ युरोपियन जि मस्करे] •बांधणें–कंबर बांधणें 'दुष्ट वाढे जो तो उपाव आधीं, दनुज रोषें बोलोनि माज बांधी। –आमहा ६ •सोडणें–कंबर सोडणें 'सुदव नामा द्विज माज सोडी।' –साह्ह ५ ३८ •घर–नपु घराचा मध्य भाग मध्य गृह पडशाळेच्या आंतील मुख्य खोली [स मध्यगृह] •पट पट्टा–पु कमरप (विशेषत नायकाचा) 'अचाट दळ अवळाचें कैमें प्रबळ माजलें। माजपट्टयानें माज बांधलें।' –अमृत २३

**माज**—पु १ मैथुनेच्छा, उधान मस्ती (ग्रामहिंस्रादिकाम ऋतु प्राप्त झाला असता उत्पन्न होणारी) (क्रि० येणें करणें) २ मद फुगा तोरा धुंदी गर्व, अहंभाव ३ आधिक्य, रेलचेल वृद्धि तैसी रजनमें हारवी। जें सत्त्व माजु मिरवी।' –ज्ञा १४ १९९ ४ (औषधांतील) मादक गुण कैफ 'कनकाचिया फळा। आतु माज बाहेरी मौळा।' –ज्ञा १८ ६५८ ५ खळबळ 'तरि विंदु चनि माज। जळचरा भय सुपने।' –ज्ञा १२ १६५ ६ हातमागाच्या सुतास पाजण करतेवळीं ज्या वेळीस सुत ताणतात त्या वेळीची ताणण्याची दोरी ७ गाण्यांतील एक राग राग पहा [स मद प्रा मज्ज] •करणें–पशूंना ठराविक मुदतीनें मैथुनेच्छा उत्पन्न होणें माजास येणें **माज मोडणें**–(कर्त्याची षष्टी) माज शांत होणें पशूंना ठराविक मुदतीनें मैथुनेच्छा होण्याचें बंद होणें २ (ल) मोह मोडणें गुरमी जिरणें •मारणें–(कमाची षष्टी) गोड मोडणें माज जिरविणें **माजावर येणें**–फळणीस येणें सामासशब्द– •क–वि मत्त, धुंद झालेला (मद्य औषध, मान इ०कानीं) [स मादक] •गेला–वि सदैव डाफारणारा,

मगरूर, मस्तवाल ०मोड-पु (विशवत म्हैस, घोडी यांची) मैथुनेच्छा क्षमविणें [ माज+मोड ] माजरा-माजिरा-वि १ मादक विशिष्ट धान्यें व वनस्पतींमधर्षी योजतात उदा ०माजरा हरीक माजरा गोंवल, माजरी सडमावळी, इ०याच्या उलट गोडा हरीक, गोडा गोंवल इ० २ बेहोष, उन्मत्त, शेफारलेला, मगरूर 'जो सावध घे मदिरा। तो होउनि ठाके माजिरा।' –ज्ञा १७ ११३ ३ चोखदळपा, चवपाल माजऱ्या हरीक-पु हरकाची मादक काळया टरफलाची जत याच्या उलट गोडाहरीक माजरु-रू-वि (व) १मस्तवाल २ नाजलेला माजरें-न मादक असलेलें भन्य, वनस्पति माडयानें उत्पन्न होणारा कैफ, धुंदी –वि कैफ उत्पन्न करणारें माजवण-न १ उन्मत्तपण २ मादक पदार्थ का माजवण दीन मर्केग।' –ज्ञा ३९ ३ अधिकना 'चचळपणाचें माजवण। घतलें जेणें।' –स्वादि १५. १८ ०चणें-अक्रि माजणें ०विणें-सक्रि उन्माद आणणें जास्त, अधिक करणें माजिवटा-पु १ उन्माद, गुगी 'पातल्या मरणाचा माजिवटा।' –ज्ञा ८२०८ २ मरण माजिरडें-वि मस्त

मा(मां)जण—न १ देवाच्या मूर्तीला तेल शेंदूर इ०लावणें लेपणें २ असा लेप लावण्याचें द्रव्य ३ माज स्वयपाकाच्या भाडयावर फासण्याची राख व माती [ स मार्जन ] मा(मा)जणें-सक्रि १ तेल शेंदूर इ०कानीं देवाच्या मूर्तीस लप लावण माती, राख इ०स्वयपाकाच्याभाडयावर फासणें २ फासणें, गेपडणें मारवणें त्याला काय बक्षीस तर तेलशेंदराचें माजणें –नामना ३२ माजविणें-सक्रि १ (खडू माती इ०) पाटीवर फासणें २ शेंदूर राख माती इ०नीं देवाची मूर्ती, शरीर, स्वयपाकाची भाडीं इ०) मारवणें [ मार्जन ]

माजणें—अक्रि १ मादक पदार्थ औषधें याचा अमल, चढणें, कैफ चढणें झिंगणें, धुंद होणें २ फुगणें शेफारणें, चढून जाऊन तोरेबाज दाडगा, उन्मत्त होणें माजो वाहुबळें न छात्र।' –मोउद्योग १३१५ ३ मर्यादेबाहेर पुष्ट मस्त धुंद हाणें (पुराक खीरपुरी इ०कानीं) ४पुष्कळ पूर्णपणें उफाडयानें वाढणें फोफावणें (पीक) ५ मुलुखभर पसरणें, दूरवर प्रसृत होणें (बातमी, गोष्ट) 'बातमी माजली' ६ वाढणें, वृद्धि पावणें, सर्व बाजूनीं विस्तार होणें (धदा, गाव रान याचा) 'कारखाना माजला, वस्ती माजली झाडी माजली' ७ अमर्याद वाढणें फुगणें 'दरिद्र माजलें, महागाई माजली गोंधळ माजला' ८ सवकणें (जीभ, हात इ०) 'जिव्हा माजली हात माजला' [ स मद् माद प्रा मज्ज ] म्ह० माजली महारीण फोपसाला जहार

मा(मा)जर—न १ एक ल्हान ग्राम्य जनावर, त्रिशी याचा रग पाढरा, काळा, पिवळा, उदी मुगी इ०, येस मऊ, नुळवुळीत डोळे घारे व शपूट लाव असतें हें उंदीर मारून खातें खास अधारात फार चागलें दिसतें रानमाजराची जात फार क्रर असते २ गाजराचा गाभा, मुठा [ स मार्जार, प्रा मज्जार ] म्ह० १ मांजराचे गळयात घाट कोणी बाधावी ? =(स्वमरक्षणार्थ युक्ति म्हणून सर्व उंदरानीं, माजराच्या गळयात घाट बाधल्यानें तिचा आवाज होऊन माजर आलेलें कळेल, असें ठरविलें पण घाट बाधण्यास कोणी पुढें होईना यावरून) दिसण्यात सोपी पण करण्यास अशक्य अशी गोष्ट २ (व) माजरीचे दात तिच्या पिलास लात नाहींत=आपलें मनुष्य किंतीहि बोललें तरी राग यत नाहीं ३ माजर गेलें लुगी आणि आणल्या चार मुठी ०आडवें येणें-(ल) एखाद्या कामास अडथळा होणें, येणें (माजर आडवें आल्यानें कार्य सिद्धीस अडथळा यतो अशी समजूत आहे यावरून) ०मारणें-पाप करणें, (मार्जारवध हें एक पातक आहे यावरून ल) अपराध, गुन्हा करणें माझ्या घरात मांजर व्याली काय ?–ज्यानें भेटीस यावयाचें मोडलें आहे त्यास म्हणतात मांजराची मावशी-स्त्री विधुदी (कारण माजर ह्या प्राण्यास मारीत नाहीं) मांजराचे पाय-पुअव (ल) गिचमिड चिडविड अक्षर कुत्र्याचे पाय या शब्दाशीं सामान्यत जोडून उपयोग मांजराचे पाय कुत्र्यावर करणें-एखाद्या गोष्टींत काम तर काहीं तरी लटपट, गडबड करणें सामाशब्द– ०झांक-प-सधिप्रकाश व रात्र याच्या दरम्यानची वेळ (यावेळीं मानरें दृष्टीस पडत नाहींत यावरून) ०डोळ्या-वि माजराच्या डोळयाप्रमाणें डोळ असलेला, घारडोळ्या ०मुतवणी-न कोमट पाणी, द्रव ०वेल-स्त्री तांदुळाची एक जात मांजरी-स्त्री १ खारेंत होणारी गाठ (या गाठीवर उपाय म्हणून तीवर लोणी लावून तें माजराकडून चाटवितात यावरून) खाकमाजरी पहा २ धुसळखांबाच्या खीच्या फासाच्या दोन्या प्रत्येकी, माजरें मादिरें ३माजराना फार प्रिय असलेली एक वनस्पति ४ (कों) किसणी, विळी ५ (कों) माजराची स्त्री, भाटी ६ (गो) चटई (ल्हावळयाची) ०ऊघळप-(कों) अयत्न गुडाळणें माजरूं-न माजर (कोणत्याही गोष्टी–लडिवाळपणानें, तिरस्कारानें) मांजरें-न घुसळखांबाची दोरी मांजऱ्या-स्त्रीअव उदयामाजऱ्या पहा

मां(मा)ज(द)रपाट—पु मद्रीपोलम येथील जाडया भरडया कापडाची एक जात

माजरी—स्त्री गवताबरोबर उगवणारें एक तृण

माजवळ—वि (गो) मध्यम

माजवी—स्त्री (राजा) टेंकडीच्या उतरणीवर केलेला चौथरा, माची [ मच्य माज ]

माजा—पु मायफळ [ फा माजू ]

माजा—वि (काव्य) माझा 'कोण निवारील शाप हा माजा।' –मोआदि २६ [ प्रा ]

**माजा-ज्या-झा**—पु १ मेण, तेल, अडयाचा वलक आणि काचेची पूड यांचें दाट मिश्रण, खळ २ हें मिश्रण लावलेला पत गाचा दोर [स मड, हिं ]

**माजाड**—न १ पाठीचा कणा व कवर याचा सांधा २ कटि प्रदेश माज ( निंदेनें तिरस्कारानें ) [ माज=कवर ]

**माजिटा**—पु उत्कर्ष -हवो [ प्रा ]

**माजिठें**—न १ ( मदाहु ) मजिष्ठ 'ऐसी भीतभणा नेहटी। सपोतें माजिठीं।'-श्र ६९ २ तांबडें वस्त्र 'प्रणवाचिये पेठे। जाहलें शब्द ब्रह्म माजिठें।'-ज्ञा ६ १०९ [स मजिष्ठ]

**माजिला**—वि मधला [स मध्य] **माजिवटा**-पु १ मध्यभाग मध्य 'शातीचा माजिवटा। ठाकिला जेणें।'-ज्ञा १२ १४३ २ भर ऐसीया वोधाचा माजिवटा।'-ज्ञा १८, ११८७ **माजिवटें-डें**-क्रिवि मध्यें आत

**माजिवडा-डा**—वि मध्याचा आश्रय करून राहणारा -क्रिवि मध्यें 'जयें आकाराचिया मानिवडा। येणें जाणें पडे निवाडा।'-सिस ६ १३७

**माजी**—वि १ भूतकालीन गत २ रद्द गैरचालू अनुपस्थित ( क्रि० पडणें ) हा नवा रुपया होताच तो रुपया माजी पडला' 'माजी-मामलेदार कारकून' [अर माझी=गत] **०करणें-पाडणें-घालणें**-रद्द करणें

**माजी जीं**—क्रिवि (काव्य) आत मध्यें मधें 'विपरीत झालें लीन होय। मार्जी अज्ञानासी।'-विउ ३ ४१ [स मध्य, प्रा मध्ये मज्झ माज्झ सिं मझु हिं माझ माझ व माझ] **माजीवटा**-क्रिवि मध्यें यालागी सहज भजनामाजीवटा। आइला ता पैठा अनहकृती। -एभा २ ४३९

**माजी**—( सांकेतिक ) आठ सख्या

**माजु**—पु १ मध्यभाग कंबर माज 'अतिशयें माजु साना। होता अभिमान पंचानना। -एभा १४ ४९२ २ मस्ती, माज [ मध्य ]

**माजुळणी**—स्त्री (ना ) राजगवाडी

**माजूफल**—न मायफळ [स ]

**माजू(जु)म**—स्त्री साखर, बदाम, पिस्ते इ० मसाला घालून बनविलेल्या भागच्या वडया [अर मअजून] **माजुमी**-वि १ माजूम खाण्याची सवय असलेला २ माजूम मिसळलेला ( वर्फी इ० पदार्थ )

**माजूर**—वि (अशिष्ट) माहीत [अर मआजूर]

**माजूर-माजोरा-री**—वि चढेल, उन्मत्त गर्विष्ठ मस्त वाल माजलेला **माजुरकी माजुरी**-स्त्री गुरमी मगरुरी मिजाज -रि मस्तवाल उन्मत्त गर्विष्ठ **माजुरमत**-न आड दाड मत; अडपणानें, हटानें धरलेला मुद्दा ( क्रि० धरणें )

**माज्या**—पु मोटच्या वरच्या बाजूचा तुकडा

**माझा**—वि स्वतःच्या, माजा मम मी शब्दाचें षष्ठीचें रूप [स अस्मत् ] म्ह० माझी बाई गुणाची पायलीभर चुनाची= रडत असलेल्या मुलीस समजावितांना घरचें म्हणतात **०मी** क्रिवि मी एकटा दुसऱ्याची मदत न घेता **माझिये**-क्रिवि माझ्या 'मनीं माझिये हीत ऐसेंचि होतें।'-राक १ ३७ **माझें**-वि मी याचें षष्ठीचें नपुसकलिंगी रूप [स अस्मत प्रा मज्झ=माझें] म्ह० १ माझें मला होईना अन् पावणा दळून खाईना २ (व) माझेंच नाक वर=हरला तरी ज्याची मुजोरी जात नाहीं अशा माणसासवधीं **माझें तुझें म्हणणें**-(आचरणात) पक्षपात करणें माझें तुझें हें म्हणशील जेव्हां।'-सारह ७ १२१ [प्रा ] **माझेंमाझें म्हणणें**-न सर्व ठिकाणीं आपलेपणा दर्श विणें सर्व माझेंच आहे असें म्हणणें 'माझें माझें म्हणतोसी। म्हणौनिया। -दा ३ १० ५० **माझ्या(मज)कडे तरी पहा**-माझी तरी दया येउदे नादा एकत्र, नको द्वेष करू मजकडेचि वा! पाहे।'-मोउद्योग २१ ११ **माझ्या बापा च्यानें हें होणार नाहीं**-हें करण्यास मी अत्यत असमर्थ आहे **माझ्या वरत**-क्रिवि ( व ) माझ्याध्यानं माझ्याकडून

**माझारीं**—शअ १ (काव्य) आत मधें मध्यें 'पै ध्याता आपणचि परी। ध्यानरूप वृत्तिमाझारीं।'-ज्ञा १८ १०३३ २ -क्रिवि मध्यभागीं दिसती उचित पदें माझारीं।'-ज्ञा १८ [स मध्य]

**माट**—पु (गो ) अति गोड खाल्यामुळें तोंडास बसलेली मिठी [मिटणें ]

**माटकुला**—वि ल्हान आकाराचा चिमुकला

**माटमु(मू)ट**—स्त्री भयामुळें उद्भवलेली चिंता ( क्रि० करण ) -क्रिवि धागधुग होऊन भयभीत होऊन 'माझा जीव माटमुट करतो [ध्व ]

**माट्या माठ्या**—पु (व) सोसाटयाचा वारा; वावटळ

**माटव**—पु (कु ) माडव [स मडप]

**माटवी**—स्त्री (कु ) गणपती इ०च्या मूर्तीवर फळें वगैरे बांधण्याकरितां केलेली लाकडी मडपी, माळी [स मडप] **०बांधणें**-(कु ) गणेशचतुर्थीला गणपतीवर लाकडी चौकटीस फळें इ० बाधणें

**मा(मा)टु(टू)ळणें**—अकि सुकणें, वाढ खुंटणें 'नाना फळतिय वले। केळींची वाढी माटुळे।'-ज्ञा १८ १०८२

**माठ**—पुस्त्री एक पालेभाजी ही सवत्र व सर्वकाळीं होत तांबडा व पांढरा असे याचे दोन प्रकार आहत लावल्यापासुन तीन आठवड्यात खाण्याजोगी होत [स मारिश]

**माठ**—पु पसरट असा मातीचा घडा, रांजण —स्त्री (कु) चिक्कण माती असलेली जागा [स मृद्+घट, मृत्तिका+घट] ०ळी–स्त्री (कु) मातीचें ल्हान भांडें

**माठ**—वि १ पापटसर, खलपट, किंचित् उतरतें (छप्पर इ०), याच्या उलट खर किंवा पाणढाळ २ ठिल्ल, खुजट (मनुष्य, पशु) ३ मंदमति, जडबुद्धि 'विश्वाचे माठ। त्याचे कपाळीं तें माट।'–तुगा ३४६० [माठणें] ०घोसाळें–न घोसाळ्याची एक जात –कृषि ५९५ **माठणें**–अक्रि १ (जखम, क्षत इ०) भरणें आणि बरें होणें २ झिजणें, बोथटणें (धार, टोंक) ३ उग्रता कमी होणें –सक्रि टाकीनें सारखा व गुळगुळीत करणें; साफ करणें (गुंडे, चिरे) ४ हलके हलके ठोकून गुळगुळीत करणें (दागिने, गोठ, वडें, जोडवीं इ०) ५ (धातूच्या नव्या भाड्याचे) पोचे काढणें; साफ करणें ६ (ल) ठोकून नरम वश करणें **माठरणें**–अक्रि १ जड, सुस्त, मद्द होणें २ डागळणें, सुकणें, कोमेजणें, टवटवी नाहींशी होणें (वनस्पति इ०ची) ३ भरून येणें, बरी होणें (जखम), मठारणें –सक्रि १ घडणें, आकार, रूप देणें २ (ल) आपल्या इच्छेप्रमाणें घडविणें वळविणें ३ मठारणें या अर्थीहि योजितात **माठलें**–न १ (पळी, चमचा इ०कांचें) तोंड २ समईचें टवळें ३ ताक करावयाच्या रवीचा माथा, बोंड ४ ल्हान मुलाचें चापट व पातळ करभूषण **माठवण**–न १ जखम भरून येण्यासाठीं लावलेलें औषध, माठणारें मलम २ मठारणारा, माठणारा व्रण **माठ(ठा)ळणें**–सक्रि १ (हलकें ठोकून) नव्या भांड्याचे पोचे साफ करणें २ भांडें घडणें उतरणें ३ एखादी वस्तु, भांडें यावर हलका हात फिरविण्यानें साफ व गुळगुळीत करून त्यास आकार आणणें, हलके हाताच्या चोपानें सारखी करणें (जमीन इ०) ४ (ल) आज्ञाधारक करणें, आपल्या इच्छेप्रमाणें वळविणें –अक्रि १ बरी होणें, भरणें, मठारणें (जखम) २ मद, जड होणें (बुद्धि, मन) मद्द होणें, जड, सुस्त, मादा होणें (शरीर, मनुष्य) ३ वाढ खुटणें, झकावी, तेज, दम गमावणें (झाड, वनस्पति यांचें) **माठा–ठ्या**–वि जड, ठोंब्या, जडबुद्धि, मदमति **माठी**–स्त्री बायकांच्या हाता तील धातूची पोकळ बांगडी **माठीव**–वि टाकीनें सारखा व गुळगुळीत केलेला, उत्तम घडलेला (इमारतीचा दगड) **माठें**–न (कु) १ प्रेत जाळलेल्या जागेवरील बांधकाम (मशीद, थडगें, छत्री, वृंदावन इ०) २ दोन्ही टोकास उघडी असलेली, पडदी नसलेली शेतांतील पडवी, सोपा इ०, दुपाखी ढेलज, पडसाळ

**माड**—पु (कु) समईच्या चाढ्याचा खालचा भाग (भांडें पितळी व खालीं लांकडी दांडा अशा)

**माड**—पु नारळाचें झाड म्ह० आडो माडो समुद्रासारखा वाढो (मुलाला न्हाऊ घालताना स्त्रिया म्हणतात) =माडाप्रमाणें उंच व समुद्राप्रमाणें विस्तार पावो या अर्थी ०उतरणें, चढणें–माडाची माडी काढणें व विकणें सामाशब्द– ०पीर–पु ताडी पिण्याचें व्यसन असणारा, नारळ्सत [माड+फा पीर] ०बाग–पु (हेट) नारळीच्या झाडाचा बाग **माडागूण, मांडागूल**–ळ–नपु (गो) नारळी, ताड यांस येणारा शेवटचा तुरा, कोंका, पोय [माड+अग्र, अग्र] **माडागोड**–पु (गो) माडीपासून तयार केलेला गूळ

**मांड**—पु १ रचणें, व्यवस्थित ठेवणें (काम, कारखाना याकरितां–हत्यारें, उपकरणें, साहित्य इ०) २ केलेली रचना, मांडणी (क्रि० मांडणें) ३ देखावा, व्यवस्था 'दावूनियां मांड। पुरे न करीती भांड।'–तुगा ३११५ ४ विस्तार, पसारा ५ वैभव 'काळीं सहारीना मांड त्याचा सारा मी हरी।' –मोरा मायणें १२५२ ६ (गो) दुकान ७ (वों राजा कु) पिशाचादिकांस बलि देण्याचे वेळीं भगतानें देव–देवतांची स्थापना करण्याचा विधि (क्रि० भरणें) ८ होळीच्या सणामध्यें ग्रामदेवतेस कौल लावणें ८ ठेवलेलेपणा, मांडलेलेपणा, स्थिरावलेली स्थिति (मांडणें या क्रियापदासह उपयोग करतात) ९ (संगीत) एक राग ह्यांत षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति संपूर्ण–संपूर्ण वादी षड्ज, संवादी पंचम, गानसमय सार्वकालिक १० (वों) झोडलेल्या भाताची रास [मांडणें] ०काढप–(गो) दुकान उघडणें. ०घालप–(गो) दुकान स्थापन करणें **मांडणावळ**–स्त्री १ मांडणें, व्यवस्थित ठेवणें याबद्दल द्यावयाचें मोल, किंमत २ मांडणी, मांडणूक **मांडणी–मांडणूक**–स्त्री १ मांडणें, मोकळेपणीं व व्यवस्थित रीतीनें पसरणें, थाटणें लावणें, रचणें 'जमीनीवर प्रथम टाहाळ ची मांडणी करावी मग वर गवत घालावें' २ व्यवस्थित रचना 'तदन्याय वृक्षपाषाणीं। आणिली ज्यानें गंधर्वमांडणी।'–नव १९ ४८ ३ सांगाडा, नुसती बांधणी, बंदिस्ती (इमारतीची) **मांडणें**–सक्रि १ मोकळेपणीं व व्यवस्थितपणें पसरणें, ठेवणें रचणें (काम, धंदा याकरितां–साहित्य, सामान, जरूरीच्या गोष्टी) २ स्थापन करणें उघडणें (दुकान, व्यापार) ३ लिहिणें, वहींत दाखल करणें (खर्चाच्या बाबी, टाचण) ४ तयार केलेल्या चिखलांत रोपापाठीमागून रोप याप्रमाणें लावणें, आवटणें (नाचणी, वरी इ०चीं रोपें–आवटणी करताना) ५ प्रतिपादणें मना सर्वथा मिथ्य मांडू नकोरे।' –राम १९ ६ व्यापणें जी मूर्ती मूतळ मांडिलें।' –ज्ञा ११.२८६ ७ पाळणें देह सांडावा ना मांडावा।' –एभा २० १४९ ८ प्रवर्तणें, चालविणें, दाखविणें, प्रदर्शित करणें इ० 'वज्जा मांडला, सोदगिरी, मांडली, फजिती मांडली' ९ कडाक्यानें व यथेच्छ चालू करणें 'त्यानें गालीप्रदान मांडलें–लत्ताप्रहार मांडला–हग

शको ६ ८

माडले-चष्टा माडल्या '-अक्रि १ इच्छेप्रमाणें लाग्ण्यास सधि मिळणें फावणें 'अधारी रात्र आली म्हणज चोराचें माडतें २ वनणें तयार होणें निघणें 'बाजरीच्या कणगात अझून दाणा माडला नाहीं ३ आरभ होणें 'जैसा प्रळयकाळ माडला।'-ज्ञा १ १५८ [स मड्=शोभविणें] माडपूस-स्त्री मांडणें, नोंद करणें व पुसणें, लिहिणें व तपासणें 'प्रत्येक वस्तुची लेखी पावती दप्तरात माडपूस होत आहे '-के २० ५ ३६ मांडली-स्त्री मडण रचना 'म्हणौनि निवृत्तीचि माडली। सुनि प्रवृत्ति तळीं।'-ज्ञा १८ ७०४

माड—स्त्री १ माडीस होणारा रोग यानें सर्व माडी सुजून मांडीचें हाड कुजतें २ योग्य बैठक (घोड्यावरची लिहिताना घातलेली) (क्रि० जमणें बसणें, साधणें) ३ स्वाराच्या टोळीचा हल्ला (क्रि० करणें) ४ घोडस्वाराची टोळी 'दाटती माड माडिला'-ऐपो २३२ [माडी] ०माडणें-जमविणें-घोड्या वर चागलें बसता येणें 'जमवून माड घोड्याला।'-सग्राम १२४ ०गादी-स्त्री घोड्यावर बसणाऱ्याच्या माडया गच्च व सोईस्कर बसण्याकरिता खोगराच्या पुढील भागीं केलेली गादी [मांडी+गादी] ०चोळणा-चेपणें-चेपणी-पुनस्त्री माडीचोळणा इ० पहा लाडी विजार ०पत्र-न (माडीवर घेउन दत्तविधान करितात यावरून) दत्तकपत्र दत्तक घेण्याविषयींचा लेख, करार [माडी+पत्र] ०पुत्र पु दत्तक घेतलेला मुलगा [माडी+पुत्र] ०माड-स्त्री माडीमाड पहा ०वर्त-पु घोड्याच्या माडीवरील भोंवरा -अश्वप १ १०१

माड—न भाज्या मीठ इ० ठेवण्याचें दाड्याचें लाकडी पडगें

माड—स्त्री एक शाक भाजी माठ

माडकी—स्त्री (कु) वेडकी [स मड्क]

माडगा—पु (कों) कळकाची एक जात लाटीच्या उप योगी बाबू कळक माणगा पहा

माडगें—न (निनाम) डाळ तादूळ एकत्र शिजवून केलेली खिचडी २ (माण) हुलग्याच्या पिठाचें पातळसर पिठलें वहण हें ज्वर आलेल्या माणसास देतात यान घाम येतो

माडण—स्त्री (कासारी धदा) एखाद्या पत्र्यास भोंक पाडत वेळी तो पत्रा ज्यावर ठेवतात तें साधन [माडणें]

माडलि(ळी)क—पु मडलावर राज्य करणारा राजा सार्व भौमाच्या ताब्यातला राजा सस्थानिक याच्या उल्ट सार्वभौम [स मडल]

माडव माडौ—पु १ (लग्न मुज इ० शुभकार्याकरिता घातलेला) मडप, आच्छादिलेली जागा शामीआना २ द्राक्षी इ० वेल चढून फैलावण्याकरितां केलेला कमानदार ररता ३ दव स अर्पण केलेला हमला ४ (रा) झाल पेरणीदान करण्याचें यज्ञपात्र [स मडप] म्ह० घुरक्याचा माडव=पालव प्रतिग्रह येलणें मियासाहबानीं घुरक्याचे माडव यथास्थित रचला ' -नि ०खडणी खण्णी-स्त्री शूद्र लोकात होणाऱ्या लग्न व इतर विशिष्ट धार्मिक प्रसगीं जोशी उपाध्याय यांचा दक्षिणेचा हक ०डहाळे-पुअव माडवावर पसरण्याचे लावण्याचे वृक्षाचे डहाळे -गोपु ६१ ०देवता प्रतिष्ठा-शोभा-(प्र) मडप देवता इ० पहा ०परतणी-णें-स्त्रीन लग्नमासीनतर वधूपक्षानें वरपक्षास दिलेली मेजवानी, जेवणावळ [मांडव+परतणी] ०मेड-ढ-स्त्री माडवाची पहिल्यानें पुरलेली, मुख्य मेढ सामा न्यत मेढ ०मेड(ढ) रोवणें-(ल) मनापासून काम करा वयास लागणें आरभिणें मांडवस, माडव आवस-स्त्री १ फाल्गुन वद्य अमावास्या या दिवशीं शेतकरी लोक मांडवदार ठेवतात माडवी-स्त्री १ देवापुढें ठाणावयाची लाकडी जाळीदार चौकट मडपी भाडी २ (राजा) देवळातील मूर्ति जेथें स्थापन केलेली असत तो गाभारा ३ ल्हान माडव 'हे कामाची माडवी।' -ज्ञा १३ ९९१ ४ बंदरातील आयात निर्गत मालाकरिता केलेली वखार, कोठी जकातघर बाजार उभारण्यासाठीं जागा -वसईची मोहीम ५ (ना) विड्याच्या पानाची एक जात [माडव]

माडवप—सक्रि (गो) तुडविणें

माड वावर—न लेणें वावर पहा

माडस ढानस—न (कु) एक पक्वान्नविशेष

माडळ—स्त्री टोकणी मुसळ मोगर इ० काच्या टोकाला घातलेली कडी, वसू, मामणी [स मडल] माडळी—स्त्री (खा) गाडीच्या चाकाची धाव

माडा—पु (गो) एक ल्हान माशाची जात

माडा—पु मदिर प्रासाद अविनाचिया माडा जवळीं।' -शिशु ४४५ [माठ मठ]

माडा—स्त्री माता 'माडाचीं सप्रेमळें चित्तें।' -दाव ३१९ [स माता गु माडी=आई]

माडा—स्त्री ल्हान झाड रोपडा रोपा (उपटून दुसरी कडे लावता देण्यासारखा) [माड ¹] -नि स्त्रीच्या पिका करिता दमदार होण्यासाठीं तयार केलेली १ खरीपाच्या पेरणीच्या वळीं न परता पड टाकलेली (जमीन) अशा जमीनींत पिक लेलें धान्य दाणा पीक खागा पहा

माडा—पु गव्हाच्या पिठाचें केलेलें अतिशय पातळ पापु द्याचें एक पक्वान [स मडक का मडिग] म्ह० सुमण झाली म्हणुन कांहीं हाताचे माडे करीत नाहीं (धाप्र) तोंडाचे माडे-पुअव थोरमोड थापवाची माडे करणारीचा ढोंबूड काढला पाहिजे-ज्याच्या कडून आपणास काम करून

घ्यावयाचें आहे त्याची मनधरणी केली पाहिजे. त्यास खूप ठेवले पाहिजे याअर्थी.

**मांडावळ**—स्त्री. माडणी; माडणूक पहा.

**माडी**—स्त्री. (ना. अशिष्ट) आई. माता पहा. [ सं. माता-माया-माडा; सिं. अमडी; गु. माडी ]

**माडी, माडी पुणे(नें)व**—स्त्री. (व.) कोजागिरी; अश्विन शुद्ध पौर्णिमा.

**माडी**—स्त्री. माडाच्या पोईपासून स्रवलेला रस; मादक रस. (ताडापासून ताडी याप्रमाणें नारळापासून माडी काढतात).

**माडी**—स्त्री. वरचा मजला. 'माड्या गोपुरें कळसाेरें।'

**माडी**—स्त्री. अळवाचें लाव मूळ; आतुड व वाटोळया मुळास मुडळी म्हणतात मुडळी पहा. ०**अ(आ)ळू**-न. गोंवा-फोंडा प्रांतातील वरील अळवाची जात

**मांडी**—स्त्री. १ गुडघ्यापासून कमरेपर्यंतचा पायाचा भाग; जांघ. २ बसण्याचा एक प्रकार; बैठक ( पाहुण्यांची, लिहिणाराची इ०). ३ लगामाच्या बाहेरील बाजूच्या दोन कांबी, कड्या [मंडण] (वाप्र)(**आपली**)**मांडी उघडतां आपणासच लाज वाटते**-स्वतःचीं दुष्कृत्यें उघड करताना स्वतःस लाज वाटते; स्वतःचीं व्यंगें उघडकीस आणण्याचें कर्म कठीण आहे ०**चे उसें करणें-वर मान ठेवणें**-दुसऱ्याच्या मांडीवर आपलें डोकें टेकणें, त्याच्यावर विनदिक्कत विश्वास ठेवणें; आपली मान दुसऱ्याच्या हातांत देणें. ०**ठोकणें**-बैठक मारणें. ०**ठों(टे)कून उभें राहणें**-दृढ व्यास इ० सज्ज होऊन उभें राहणें. ०**ठो(टे)कून बसणें**-(गायन, लेखन इ०काविषयीं) आपली उत्कंठा, तयारी दाखविणें. ०**देणें**-मरणोन्मुख (वडील) मनुष्याच्या मानेखालीं मांडी ठेवणें. 'वृद्ध व्याकुळ होता मांडी द्यावयासि या समीप रहा।' —मोउद्योग १२.७०. ०**पालटणें**-संततीविषयीं नवऱ्यापासून निराश झालेल्या स्त्रीनें संततिसाठीं परपुरुषगमन करणें ०**बांधणें**-निश्चय करणें. 'अधिकें जेवजेव औषधी। सेवायाचि मांडी बांधी।' —ज्ञा १८.१५५. ०**मोडणें**-१ लेखनव्यवसायास योग्य असें दृढ आसन घालणें २ लिहिण्यासाठीं घातलेली मांडी बदलणें; विचलित करणें 'पंचवीस वर्षे ते मांडी न मोडता लिहीत असत' —कोरकि ६४. ०**वर घेणें देणें**-एखाद्याशीं बरोबरीनें वागणें ०**वर घेणें-बसविणें**-दत्तक घेणें ०**वर देणें**-दत्तक देणें ०**वर मांडी टाकून-घालून बसणें**-निरुद्योगी, स्वस्थ बसणें **मांडीस मांडी टेकून बसणें**-१ एखाद्याशीं स्पर्धा करणें, टक्कर देणें २ बरोबरी करणें **मांडीखालचा**-वि नेहमींचा बसायाचा, पूर्ण संवयीचा (घोडा) 'स्वाराच्या मांडीखालचा घोडा असावा.' सामाशब्द- ०**चेपणें, चेपणा**-नस्त्री लग्नसमारंभात सुनमुखाचे वेळीं वरमातेस वधूच्या आईनें द्यावयाचें लुगडें किंवा इतर वस्त्र. नवऱ्या मुलीस आपल्या मांडीवर बसवितांना वरमातेनें हें लुगडें आपल्या मांडीखालीं ठेवण्याची चाल आहे त्यावरून. [ मांडी=चेपणें ] ०**चोळणा**-पु निवळ मांड्या झांकणारा चोळणा, विजार; मांडचोळणा पहा. ०**मोड**-स्त्री. लेखनाचा दृढ व्यासंग; मेहनत, कमालत; शीण; परिश्रम. [ मांडी+मोडणें ]

**माडु**—पु. (ना. व.) स्तन; थान.

**माडुक**—पु बेडुक. [ सं. मण्डूक ]

**मांडुकली**—स्त्री. (कों) लहानसा मांडव; हलका व तुजवी मांडव. [ मांडव ]

**मांडुक्य**—न अथर्व वेदातील एका शाखेचें उपनिषद्. [ सं. ]

**मांडुल-ली**—न (कु) एक लाकडी पात्र.

**माडू-डु**—पु हरिणाच्या दोन जोडलेल्या शिंगांना पोलादी पातीं बसविलेलें हत्यार. म्ह० सोयऱ्यात साडू, हत्यारात माडू, भोजनात लाडू.

**मा(मां)डू(डु)ळ**—न. १ सापाची एक जात. २ दोन डोकीं किंवा दोन तोंडें असलेला एक प्राणी; दुतोंडें.

**माडें**—न. मसाला घालून केलेलें हुलग्याच्या पिठाचें कालवण. माडगें.

**माडें**—न खरीपाच्या वेळीं मोकळ्या टाकलेल्या जमीनींत रबीच्या वेळीं काढलेलें पीक. माडा पहा.

**मांडें**—न. मांडणी; विस्तार, उत्कर्ष होणें. 'वंशावरी वंशाचें मांडें।' —ज्ञा १५.१२८.

**मांडेबांध**—पु प्रभाव, तेज. [ प्रा. ]

**मांडो**—पु (गो) किरिस्ताव लोकातील एक घरगुती समारंभ.

**माडोकी-ळी**—स्त्री. अळूची मुडळी; मुळी.

**मांडावा-वा**—पु मांडणी, विस्तार [ मांडणें ]

**माडोस**—स्त्री (व.) चैत्र शुद्ध प्रतिपदा (प्र) तत्पूर्वीचा दिवस म्हणजे फाल्गुन वद्य अमावास्या. माडअवस पहा

**माडौनें**—सक्रि. (गो) तुडविणे.

**माड्या**—पु अळवाची एक जात; अळवाची मुडळी.

**माढ(ढा)ण**—न (कों) मीठ, मसाला इ० ठेवण्याचें लाकडी पाळें, हें ताड, माड इ०च्या खोडाचें कोरून केलेलें असतें.

**माढा**—वि माडा पहा

**माण**—स्त्री. १ (गुराच्या) मानेस होणारा दाह सूज; रोग. २ चिक्कण माती ३ लिस्स, हलकी, भाभरीत माती ४ पाणी ठेवण्याचें रुद तोंडाचें मडकें ५ जात्याची वर्तुळाकार मळण मांडण, माडणी पहा ६ उंसाच्या चरकाच्या तळाशीं रस साठविण्याकरिता ठेवलेलें मांडें 'जैसा गुळउसाचा घाणा। रसु जाये पैं हेरी माणा।'

-एमा १५ १७ ७ मोटया जातीचा बायू, याला ताज असें म्हण तात ८ या (खडकाचा, मातीचा) ९ (गुज) जोंधळ्याचे कोवळे मोड खाल्ल्यामुळें गुरांना होणारा रोग [मान] माणगें-न १ मानेचा दाह ६ पडगें, पाळें माढण पहा ३ गुरांस होणारा एक रोग **माण जमीन**-स्त्री चिकण मातीची जमीन.

**माणकी**—स्त्री (गो) माशाची एक लहान जात.

**माणकी, माणकुली**—स्त्री लहान माणीक 'हिरकणी माणकुली।' -स्वादि ९.५ ६७ [माणिक]

**माणकुला**—वि (राजा) लहान व सुंदर, रम्याकृति, चिमुकला [माणिक]

**माणगा, माणगारा, माणा**—पु (राजा) लांब जातीचा चिवा, बांबू

**माणवक**—न एक समवृत्त याच्या चरणात अक्षरें आठ य भ, त, ल, ग हे गण असतात [स]

**माणा**—पु १ माणगा पहा २ एक वृक्ष

**माणिव**—स्त्री मृदुता, मऊपणा 'ताया सरला माणिव आली, सहज झाली लीनता।' -दत्तपदें ६८ [स मृदु]

**माणी**—स्त्री मायणी, वस्तु वर्तुलाकार मडण, काठीला खालीं बसविलेली शेंबी, कडें

**माणी(णि)क(क्य)**—न एक तांबडें रत्न; लाल नावाचें रत्न; हें कुरुदाचें असून हिऱ्याच्या खालोखाल कठिण असतें यानें विद्युत न उत्पन्न होत याच्या खाणी ब्रह्मदेशात आढळतात काहींचा रंग गुलाबी व काळसर अगर सफेत असतो याच्या पोटजाती -श्याम, तारा लाल, माणकी चुनी लालडी, लालडी (हीं लहान लालाचीं नावें), करिपोक यकाऊ जर्दा, रोण (हीं कमी दर्जाचीं माणकें), सौगंधिक, नीलगंधि कदकारिक मधुजीवी शिखंडिक, गौरिकाख्य, इद्रगोपी, सीमंत्क कुसुम, गोक्षुर इ० [स माणिक्य] म्ह० कोळशातलें माणिक **माशानें माणिक गिळणें**-झालेला तोटा पुन पूर्ण भरून येणें अशक्य असणें, दुसऱ्याच्या हातीं गेलेली वस्तु परत मिळणें अशक्य होणें याअर्थी उपयोग सामाशब्द-

**०चौक**-पु जेथें लवाजम्याचे लोक रागेनें उभे र हतात, खेळ खेळतात असें मोठ्या लोकाच्या घरापुढील आवार घातलेलें मैदान

**०चौकडी**-स्त्री (राजा) उत्सवप्रसंगीं बायकानीं भिंतीवर काढलेल्या रेखाकित आकृतीपैकीं एक [माणीक+चौकडी]

**०पेजण**-न (व) गव्हाच्या रव्याचा, उकडीचा एक पदार्थ, फळ

**०वात**-स्त्री १ पुढें माणकासारखी गोळी व मागें बोटभर लांब अशी बारीक सुतासारखी कलेली कापसाची वात २ हातानें पाच धाग्याची मिळून वळलेली, दिव्यात घालावयाची वात

**०विद्यान्या**-वि (व) फाजील नाजूक (माणूस) **माणिकुली**-स्त्री लहान माणिक

**माणूस**—पुस्त्रीन १ मानव, मनुष्य, मानवी प्राणी २ (कु) रखेली, अंगवस्त्र ३ मानव, मनुष्यजाति ४ -पुस्त्री रोज दारीनें कामावर लावलेला मजूर, गडी. सामान्यत श्रेष्ठ दर्जाच्या मनुष्याची कोमलता, नाजुकपणा यापासून तों रानटीपणा, राकटपणा, दाडगेपणा इ० अवस्था दाखविण्यासाठीं माणूस, शब्दास जोडून काणूस, टेकस व टोमस हे तीन शब्द योजितात उदा० माणूस काणूस, माणूस टेकस, माणूस टोमस इ० (समासांत) रानमाणूस, जळमाणूस, बाईलमाणूस इ० [स मनुष्य, आर्मेनि मनुस, पोर्तु जि मनु मनुश] म्ह० १ (व) माणूस फिरलें तर फिरलें पण घराचे वासेहि फिरले=घरातल्या मुख्य माणसाची नाराजी झाली ती झालीच पण त्यामुळें घरांतील लहानमोठीं सर्वच माणसें विरुद्ध झालीं २ (व) माणसातला, रांडया बायकातला देशपांड्या=पुरुष मडळींत काहींच चालत नाहीं पण बायकात मात्र बढाई मारणारा (बाग्र) **माणसाकाणसीं**-मानवी प्राण्यावद्दल **भरल्या माणसांतून उठविणें-काढणें-घालविणें**-समाजातून बाहेर टाकणें **माणसानें बाय बोला बयाचें**-(बायकी) १ आतां काहीं बोलावयाचें उरलेंच नाहीं या अर्थी उद्गार २ आता यापुढें शब्द करणें-काढणें व्यर्थ **माणुसाचें काणूस होणें**-आजार, दु ख, काळजी यांमुळें मनुष्य विदकिडीत, कृश होणें, दरिद्री व दु खी होणें **माणूस काणूस-ओळखणें-जाणणें-पाहणें-ध्यानांत धरणें**-माणसा माणसातील भेद लक्षात आणावा, कोण चांगला, कोण वाईट ओळखावा. **माणस(सा)ळणें, माणसाधणें**-अक्रि १ माणसाच्या सवयीचा होणें, क्रूरपणा टाकून गरीब होणें, (रानटी पशु) २ मनुष्य खाण्यास चटकावणें (मनुष्याच्या रक्ताची एकदां चव घेतलेला वाघ, लांडगा इ०) **माणसाचा अवतार-कांदा-टेंक**-पु ठोंब्या, दगड मनुष्य सामाशब्द- **०कंटाळ्या-गंधारा-गध्या-घाण्या-घाण**-वि एकल्कोंडा, मनुष्याच्या संगतीचा कंटाळा करणारा [माणूस+कंटाळणें, गंध, घाण] **०पण-पणा**-नपु माणुसकी पहा **०बळ**-न १ माणसांच्या सख्येचें बळ, सघशक्ति 'हें काम एकट्याचें नव्हे माणुसबळ पाहिजे' २ मनुष्यरूप शक्ति (सैन्य, नोकर इ०) [दव्यबळ द्रव्यबळ, पुण्यबळ याच्याहून भिन्न शक्ति **०मान्या**-वि १ माणसें मारणारा, मानवहत्यारा, खुनी २ (ल) क्रूर, निर्दय **माणसामाणसीं**-क्रिवि १ आपल्या नोकरा-चाकरां मार्फत २ मनुष्याहून मानवी प्राण्यावद्दल **माणुसकी**-स्त्री १ सुधारलेल्या मनुष्याचे गुण व भावना, चालीव रीती, सभ्यता, शिष्टता सुजनता, थोरपणा; मनुष्यातील सात्त्विक गुण 'या सात्त्विक गुणांच्या समुच्चयास आपण तूर्त माणुसकी असें नाव देऊं' -गीर ९२ ३ मानवी धर्माची जाणीव, मानुषी दयाधर्म, मनुष्यपण ४ व्यवस्थित वर्तन, नियमितपणा व मनमिळाऊपणा

**माणें**—न (गा) गुणी ०पडप-लागप-अक्रि (गो) गुणी यणें

**मा(य)णें**—अक्रि राहणें, समावणें (भांडें, जागा इ० कांत-कांहीं वस्तु) 'घटाकार आकार मातींत माती। असे मातसें सर्वेहि ज्यांत माती।' [सं मा=मापणें, हिं माना]

**माण्या**—पु माणगा, ल्हान जातीचा बापू

**मात**—पु (कों) धारा 'वरच्या रानचा शिगनी मात।' —मसाप ४ २६४

**मात, मातु**—स्त्री १ (बुद्धिबळक्रीडा) प्रतिपक्षीयाच्या राजास मोहऱ्याच्या मा-यांत बिनतोड घरणें, कोंडमारा करणें 'दावू हात करू मात। मारू लाथ काळासी।'—तुगा २ (काव्य) मोठें काम, महत्कृत्य, मर्दुमकीचें काम, चमत्कार, अद्भुत कृत्य 'एक बाई सांगतें मात त्याची।' ३ (काव्य) काम, कार्य, बात, खबर, गोष्ट (क्रि० उठणें उडणें, उठवणें, उडवणें) 'कन्त्रीची मात साग आमुदा परात।' ४ थाट वैभव, ऐश्वर्य, चकचकाट, झकझकाट, शानदार व दिव्य देखावा, समारंभ 'गाण्याची-जेवणाची-प्रयोजनाची-लग्नाची-मात' ५ प्राचुर्य, वैपुल्य, स्वस्ताई, सुलभता, 'धान्याची-साखरेची-जिनसाची-मात. ६ बोलणें, भाषण 'त्याची नायकाची मात।'—परमा २ १६ ७ शर्य 'जरीपट कयानें केली मात।'—ऐपो १८५ ८ (तजा) प्रतिकार, विषावर उपाय [सं मात्रा अर मात्, ते मात=शब्द] (वाप्र) ०करणें-१ (बुद्धिबळक्रीडा) प्रतिपक्षाच्या राजाला अडविणें २ बुद्धीचें, कुशलतेचें कृत्य करून प्रतिपक्षाला जिंकणें ३ अघटित, अप्रतिम, विचित्र, लोकोत्तर कृत्य करणें ०खाणें-पराजित होणें

**मातकदम**—क्रिवि फार पूर्वीपासून [अर मातक़्दम=भूत काल]

**मातकर**—वि तापद, वाईट 'विरह तुझा अत्यंत मातकर वर्ठि प्राण उरले।'—दप २७ [मातणें]

**मातक्यान-नीं-नें**—क्रिवि माश्त्यान पहा

**मातंग**—पु १ हत्ती 'मस्त चालती पुढें मातंग।'—ऐपो २१३ २ मांग 'मोह मातंग आमुचें कुळीं।'—एरुस्व १७ ३७

**मातगा**—वि १ सहज शफारणारा स्वतःच्या उत्कर्षे होताच पूर्वीची परिचित माणसें वस्तु इ०कांचा तिरस्कार व अनादर करणारा २ अहमन्य गर्विष्ठ ३ खरमस्त तापट (घोडा) [सं मद्]

**मातण-न**—स्त्री सामान्यत माचण पहा ०करणें-(हुट नाविक) शीड फिरविणें ०घेणें-माचण घेणें पहा

**मातणें**—अक्रि १ शेफारणें, गवानें फुगणें 'मर्दी शत्रुचमूला शौर्यमदें बहुत मातलील जो।'—मोभीष्म ७५ २ चागलें चागलें खायला घातल्यामुळें पुड व अडिवाळ होणें उन्मत्त होणें ३ जोरानें फैलावणें (वनस्पति) ४ भरून वाहू लागणें, ओथंबणें, भरून येणें 'ब्रह्मानदें कोंदली साचार। प्रेमबळें मातोनिया।' [सं मद्] म्हण० १ बोकड मात आणि आपल्या तोंडीं मुतें २ (गो) माजलेल्या हुंदराक हत्ती म्हणून जाता=उंदीर माजला तरी तो हत्ती होत नाहीं **मातलेपण**—न मस्तपणा 'कैसें प्रतिवदनीं मातलेपण। आवडायें।'—ज्ञा ११ ३४१ **माताइ**—स्त्री (महानु) मस्ती, मताचा आग्रह, उन्मत्तपणा, वेड 'माताइ ते वादी दिग्गजु सकळा। भूमडळींचे।'—शिशु ७५ [मत्ताई=माताई] **माता वळा-ळें**-वि (महानु) १ वेडा 'कान्यें जाहलीं मातवळीं।'—शिशु ८५ २ मस्त, गुंग 'प्रबंधें होती मातावळें। कविजनाचें।'—शिशु १५ [मत्त+आवलि]

**मातब(ब्ब)र**—वि १ आदराई, अब्रूदार, सन्मान्य, योग्य २ थोर, श्रीमान्, प्रतिष्ठित 'पुढील स्वारीस जो कोणी सरदार मातबर यईल तो बदोबस्त करील'—इम २६१ ३ मोटा, मोठा धोटा, स्थूल ४ महत्त्वाचा, मौल्यवान 'तहनाम्यासारख मातबर कागदपत्र अर्थ लावण्याकरिता पुढें यावयाचे होते'—ग्रास २ १९३ [अर मुअतबर्] **मातब(ब्ब)री**-स्त्री १ मान्यता योग्यी, श्रेष्ठता २ पत, प्रतिष्ठा 'जें कर्तव्य तें सत्यवतीनें मातबरीनें आपली इभ्रत शाह याजवरी पडोन नक्ष होय तें करावें'—ख १ २४० ३ महत्त्व, किंमत 'परार्थबुद्धीला स्वार्थाची मात ब्बरी काय होय!'—टि ४ ३०२

**मातम-मी**—नस्त्री १ शोक, दुःख 'पातशहानीं दोन दिवस बहुत मातम केलें'—दिमरा२ ८४ २ दुखवटा 'सुल्तान खान जमातदार यास मातमीचें खलअत जालें'—रा ११८६ [फा मातम् अर मअतम्] ०पु(र्सि र्सी)दशी-स्त्री दुखवटा दुखवट्याचीं वस्त्रें, दुखवट्यासंबधीं विचारपूस 'हमसिरा बेगमेस एक दुशाला पलेदार मात्मपुर्शीचा'—दिमरा [फा मातम्पुर्सी]

**मातल**—न १ वेळ घडली २ उशीर 'अमामाइवाचें यावयास मातल जालें'—इम ६८ [अर मुअत्तल्]

**माता**—स्त्री १ आई समासांत मातृ असें रूप होतें उदा० मातृकुल मातृगोत्र २ देवाची शक्ति, त्याची पत्नी ३ देवी (रोग) [सं मातृ झें मातर् ग्री मेर लॅ मेनर पोर्तु जि बाता मींदाई (माझी आई)] ०काढ्या-पु (व) देवी डॉक्टर ०पितरें नअव आईबाप समुच्चयानें [सं मातापितृ] ०मह-पु आईचा बाप [सं] ०मही-स्त्री आईची आई [सं]

**मातायते**—वि (महानु) माजलेले, मातलेलें 'दैत्य रगडा मातायते पाडडा।'—गस्तो ८२

**माती**—स्त्री १ पृथ्वी दगडावाचून पृथ्वीचा अंश मृत्तिका, धूळ २ (ल) स्थूल शरीर 'कीर्तनासी जाता तुझी जड झाली माती।'—तुगा २९८७ ३ (ल) नाश नासाडी दुर्दशा 'पोरानें ससाराची माती करून टाकली' ४ अगदीं कांहीं नाहीं

अनेकवचनीं योजनात [ स ] मातृ(तृ)का-स्त्री १ वर्णमालेंतील एक वर्ग, अ पासून ह पर्यंत अक्षरें 'ओंकार मातृकासकट। तोचि जाणावा वकुंठ।' -एरुस्व १४२ २ आई अथवा दाई ३ देवता ह्या आठ देवता आहेत-ब्राह्मी माहेश्वरी, कौमारी वैष्णवी, वाराही, इंद्राणी चामुंडा किंवा चौवरी, चर्चिका लग्न इ० मंगल कृत्यांत यांचें पूजन करितात याहून भिन्नहि मातृका सांगितल्या आहेत व त्यांची संख्या एके ठिकाणीं सोळा व दुसरे ठिकाणीं सात अशी आहे 'पांडु अधिष्ठात्री तेयिंची। मातृका गा। ' ज्ञा ६१२७ ४ मूर्च्छना, सुर, स्वर ५ (नृत्य) दोन करणांचा समुदाय [ स ] ०का(वर्ण)न्यास-पु दक्षिणाचार पूजेसंबंधीं विधि, एक न्यासविधि ह्यांत स्वरव्यंजनात्मक पन्नास वर्ण तोंडानें म्हणून शास्त्रविधीप्रमाणें कर्मकर्त्यानें किंवा उपाध्यायानें पूजावयाच्या मूर्तीच्या पन्नास अवयवास हातानें स्पर्श करावयाचा अमतो ०का पूजन-स्वमाता इ० त्याचप्रमाणें गौरी इ० सोळा आणि ब्राह्मी इ० सात मिळून तेवीस देवतांचें मंगल कार्यांतील पूजन गणपति, दुर्गा, व स्तोष्पति व क्षेत्रपाल यांचें पूजनहि मातृकापूजनाबरोबरच होतें मातृत्व-न मातेचा संबंध, स्थिति स्वभाव, धर्म आईपणा [ स ] मात्रागमन-न १ मातेशीं मैथुन २ (ल) महापातकांपैकीं एक पातक [ स मातृ+गमन ] मात्रागमनी-वि १ मातृगमन केल्याचा दोष असलेला २ (ल) मादरचोद, लबाड (मनुष्य) [ स मातृ+गमनी ]

मातें—सना (काव्य) मला, मजला 'काय बोल गा मातें।' -मो, पं ११६८ [ मी ]

मतेर—न (कों) पु (जखमेंतील)

माते(रये)रा-रें, मातेराम्तेरा—पुन १ आंत माती, कचरा मिसळलेला पदार्थ (धान्य, साखर इ०) २ धान्य इ० कांडून वेंचून काढलेला कचरा ३ (ल) पूर्ण नाश (क्रि० करणें) 'तवीं पार्थे सैन्याचा केला मातेरा।' -जै ८८ ३५ ४ खराबी, दुर्दशा धूळधाण (वस्तु काम, अन्न इ०काची) (क्रि० करणें) ह्या अर्थाकरितां माती, धूळ पीठ चुराडा, राख इ० शब्द पहा ५ अप्रतिष्ठा 'तुका म्हणे चोरा होय भूषण मातेरा।' -तुगा ६२४ -वि माती कचरा आंत मिसळलेला (दाणा पीठ साखर इ०) [ माती ]

मातोळी—स्त्री (कु) शणवी ब्राह्मणांतील कांहीं घराण्यांत दरवर्षी शूद्र स्त्रीला नारळ तेल फुलें देऊन भोजन घालण्याचा एक कुळाचार [ माता ]

मात्मसाद—पु महात्मा, साधु 'त्रिदंडी संन्यासी जटिल गोसावी बैरागी मात्मसाद असे पाखंडी आहेत' -पेशवेकालीन महाराष्ट्र ४३२

मात्र—न १ दृश्य तात्त्विकद्रव्याचें प्राथमिक सूक्ष्म, अदृश्य चिन्ह २ समुदाय, सगळी जात-वर्ग, साकल्य, वस्तुजात 'मनुष्यमात्र पापी आहे' -क्रिवि १ केवळ, फक्त, नुसता, च, बरीक उदा० काडी-क्षण-वितस्ति-मात्र 'भात मात्र खा, भाजी पाला, तुला वर्ज्य' २ यत्किंचित्, थोडेसें 'या दवतींत मात्रसें पाणी घालून आण' [ स ]

मात्र—स्त्री अभ्रातील मात्रा मात्रा अर्थ १ पहा

मात्रा—स्त्री १ एकार, ओकार दाखविण्यासाठीं अक्षराच्या डोक्यावर दिलेली तिरसें रेघ जसें -क वर एक मात्रा दिल्यानें के, का वर दिल्यानें को होतो के व कों हीं द्विमात्रक अक्षरें आहेत २ प्रणवाचे तीन अवयव, भाग प्रत्येकी, अकार उकार, मकार इ० ३ ऱ्हस्व स्वर अथवा कोणताहि वर्ण उच्चारण्यास लागणारा काल, वर्ण 'मात्राचिया त्रिपुटिया।' -अमृ १५८ ४ (छंद शास्त्र) परिमाण, गणाक्षर, गायनांतील किंवा दुसरें कोणतेंहि स्वराचें कालमान ५ इयत्ता, एक लहान परिमाण 'मृदंगाचे आवाजापेक्षां विण्याचा सूर एक मात्रा अधिक आहे' ६ रसायन (गोळीच्या, चुणाच्या रूपानें असलेलें) ७ (ल) रोगघ्न औषधी पदार्थ, औषध, औषधाचें मिश्रण प्रमाण (खनिज पदार्थांचें किंवा वनस्पतींचें केलेलें) 'जेणें विठ्ठल मात्रा घ्यावी। तेणें पथ्य सभाळावी।' ८ काममर्यादा चुटकी वाजविण्यास किंवा पापणीची उघडझाप होण्यास लागणारा काळ, सशक्त, निरोगी मनुष्याच्या नाडीच्या दोन ठोक्यांमधील काळ ९ संपत्ति जिनगी, द्रव्य, ऐवज, पैसा, माल 'मात्रा आणावी मजपासीं। नाहीं तरि सुकाल प्राणासीं।' १० (महानु) सामानसुमान कपडालत्ता, वस्त्रपात्र 'घ्या गा मात्रा प्रयानु कीजताय।' ११ भोजनसामग्री, फराळाचें साहित्य; भिक्षेची झोळी 'तें धन तेणें मात्रेमध्यें घातलें असे।' -पच १२७ १२ (महानु) आहार 'मात्रेवर न राहे।' १३ (अध्यात्म) वासनाचा विषय, इंद्रियविषय, वृत्तिविषय १४ हिंमत धैर्य 'त्याच्यापुढें जास्त बोलण्याची कुणाची मात्रा नव्हती' -इप २४ [ स ] (वाप्र) ०चालू न देणें-विरुद्ध पक्षाचे बेत हाणून पाडणें ०न चालणें-इलाज न चालणें, सामर्थ्याची प्रौढी कुचकामाची ठरणें (वैद्यानें रोग्याला दिलेली मात्रा लागू पडली नाहीं म्हणजे मात्रा चालली नाहीं असें म्हणतात यावरून) ०लागू पडणें-इलाज यशस्वी होणें ०वर असणें-वर्चस्व असणें सामाशब्द- ०त्रय-न अकार, उकार मकार ह्या प्रणवाच्या तीन मात्रा 'अकार उकार मकार। मात्रात्रय हें।' -विपू ४७८ [ स ] ०पद्धति-स्त्री (गणित) दशांशमापन पद्धति, (इं) मेट्रिक सिस्टीम

मांत्रिक—वि १ मंत्रज्ञ, जादूगार २ मंत्रापासून उत्पन्न होणारा, मंत्रानें उत्पन्न केलेला, मंत्रासंबंधीं उदा० मांत्रिक-आवा-भात-

तालुक्यावर अमल चालवून जमाबंदीचा वसूल घेणारा अधिकारी [फा मआमिल्तदार] ०दारी-स्त्री मामलतदाराचे अधिकार, काम, इ० इ० मामला-पु १ मामलत २ (ल) काम, कृत्य 'मामला कठिण दिसतो' ३ बाब, बाजू 'तव ते व्याप र मुडाले। मामले आणी सेकले।'-स्वादि २ ? १८ म्हृ० पकाधकीचा म मला

मामलत—स्त्री १ मायाळूपणानें (अपराध) माफ करणें, शिक्षा करण्याचें सामर्थ्य असून बापापुता इ०आर्जव करणें (क्रि० करणें) २ पवा, मुलाजा 'पुन्हा अपराध केलास तर मामलत करणार नाहीं' [काकलूत द्रि] मामुलता-स्त्री १ काकलूत; विनंति (क्रि० करणें, दाखविणें) २ दयेनें दुर्लक्ष करणें, हेळसांड करणें

मामा—पु १ आईचा भाऊ २ (आदरानें) बायकोचा बाप, सासरा 'आणिक फिन्न 'सभाळ मामा' याजीबोवाला बोलला।' -ऐपो ७० ३ कोणीहि पुरुष मनुष्य; गावमामा ४ (निंदार्थी) निरक्षर व कामांत अनिपुण मनुष्य ५ (घोंगें) रात्री उडया मारणारा उंदीर (रात्री उंदीर शब्दाचा उच्चार करणें अशुभ समजतात) ६ (अश्लील) लहान मुलाची सुल्ली [स मामक, प्रा मामा] म्हृ० कामापुरता मामा ०वनविणें-मूळ लावणें, वेश करणें, फसविणें मामाजी-पु (आदरानें) नवऱ्याचा बाप, सासरा याम म्हणतात 'देवव्रत मामाजी प्रभु याचें राज्य भारतावसदा।' -मोउद्योग ११५९ मामी(मि), मामी(मि)स-स्त्री (कों) १ म माची बायको मातुलानी २ बायकोची आई, सासू (मामानें भाच्यास मुलगी देण्याची धोडें काडें चाल आहे त्यावरून) 'सून म्हणे मामास ऐका। लोणी कृष्णें लाविलें मुखा।' -ह ६ १२० मामे-वि मातुलकुलातील भाऊ, बहीण यांच्या नात्याचा उल्लेख करताना मामा या शब्दाचें होणारें रूप, सामाशब्द- ०बहीण-स्त्री मामाची मुलगी ०भाऊ-पु मामाचा मुलगा ०सासरा-पु नवऱ्याचा किंवा बायकोचा मामा ०सासू-स्त्री मामेसासऱ्याची बायको नवऱ्याची किंवा बायकोची मामी

मामीर—अ (गा) मग, नतर

मामुजी—पु (व) उंदीर

मामुरी—पु आबादी सपन्नता 'रयतमामुरीवर नदर देऊन '-इम ७५ [फा मअमूरी] मा(मा)मूर-वि सपन्न, समृद्ध आबाद 'मुलुक मामूर होत नाहीं'-रा१६४४ [अर मअमूर]

मामूल—पु १ वहिवाट, साधारण रीत, चाल, दस्तुर 'नजरा माफक-मामूल गुजराणल्या '-दिमरा २९६ २ उमेदवार, उत्तेजित 'मोकदमास कौलु-बोल देऊन मामूल करून लावणी उगवणी करणें '-रा १५ ३१ -वि रूढ, सामान्य नहमीचा प्राचीन, जुना 'तुर्त मामूल वहिवाट कशी आहे याची योग्य चौकशी करून . '-टि १२३८ [अर मअमूल] ०चाल-वहिवाट-स्त्री पूर्वीपासून चालत आलेली पद्धत, चाल, रूढी मामुली-वि रोजच्या व्यवहारांतील, सामान्य, किरकोळ, जुजबी

माय—स्त्री १ आई 'तुम्हींहि बळि बांधिला म्हणुनि मामुची माय जी '-केका ८८ २ (कों) सासू [स मातृका, लॅ मॅटर, इ मदर, प्रा माउआ, सि प हिं माउ(उ), ते मम्मा, उर्दू अम्मा, मा; का अव्वा] म्हृ० १ माय मरो पण मावशी उरो २ (व) माय सदी बेटी गहू सदी रोटी (यात्र) ०मावशी नाहीं-मावशी पहात नाहीं-विषयवासना तृप्त करण्यासाठी अगम्यगमन सुद्धा वर्ज्य न करणाऱ्या मनुष्यासबधी म्हणतात माय विणें-१ आई प्रसूत होणें, मातेनें विशिष्ट गुणांनीं युक्त अशा पुत्रास जन्म देणें २ (ल) (एखादें काम करण्याविषयीं) छाती, धाडस, हिंमत होणें 'मला शिवी देण्यास कोणाची माय व्याली आहे तें पाहतो' सामाशब्द- ०भाग-न १ शरीराचा अतिशय कोमल, नाजुक भाग. २ गुदभ्रशातील बाहेर आलेलें आतडें, गुदभ्रश ३ बाहेर आलेला गर्भाशय आणि गर्भाशयभ्रश ४ योनि; स्त्रियाच्या किंवा मादीच्या जननेंद्रियाच्या आतील जननविषयक अग, इंद्रिय 'तिला बाळंत होताना फार त्रास झाला व मायभाग बाहेर आलें' [माय+भग] ०आजा-पु आईचा बाप, मातामह ०आजी-स्त्री आईची आई, मातामही ०गोसावण-स्त्री राजा किंवा राजेश्वरी देवीच्या कुळधर्मांत सवाष्ण म्हणून सांगितलेली विधवा या कुळधर्मांत एक घरचें मेहूण, एक बाहेरचें मेहूण, एक ब्राह्मण, एक सुवासिनी, एक ब्रह्मचारी आणि एक विधवा अशीं सात माणसें (ब्रह्मचारी अर्धा माणूस) भोजनास बोलावतात विधवेस मायगोसावीण म्हणतात व देवी मानून तिचें पूजन करितात हा कुलाचार पुष्कळ ब्राह्मण कुटुंबात आहे माय(ये)चा पूत-पु १ खऱ्या आईचा पुत्र, पराक्रमी, प्रतापवान, महत्कृत्य करणारा मनुष्य 'असे परिणाम उत्पन्न करणारा कायदा कोणत्या मायचा पूत निर्माण करण्यास तयार आहे '-टि ४ ९२ २ निंदा, उपहास इ० कर्तव्य असताहि याचा उपयोग करितात [माय=आई+पूत-पुत्र] मायचि मी मायचि मी चूत-उद्गा (कों) (अश्लील) अपशब्द एक शिवी 'तुझ्या मायचि मी चूत साल्या' ०झवी-उद्गा (हेट) एक शिवी; आईशीं वाईट कर्म करणारा या अर्थी ०थळ-न आईचें म्हणजे जन्माचें स्थळ, जन्मभूमि असतुष्ट पक्षानें आपल्या गावात किंवा भोंवरगावीं झालेल्या निकालावर पूर्वग्रहदूषित नसलेल्या नि क्षपाती अशा परस्थळीं फिरून चौकशी व्हावी अशी विनंति करताना योजलेला शब्द उदा० 'हें मी मायथळ मानितों दुसरें थळ मला द्या' ०देश-पु जन्मभूमि ०पोट-न अतिशय शांततेची व सुरक्षिततेची जागा, आसरा, थारा,

रपण्याची जागा, शरणस्थान -रि १ आश्रय देणारा, रक्षक, पालक (देव, राजा, धनी, लोक, राज्य, देश, गांव, ठिकाणा इ० ) 'जे अर्पिती अनाथांचें मायपोट।' -ज्ञा ८ १९५ २ गरीव, निरुपद्रवी (गाय, घोडा, हत्ती इ०) ०यहीण-स्त्री आदरानें बोलतांना स्त्रीविषयी योजावयाचा शब्द, आईसारखी किंवा बहिणीसारखी मानिलेली स्त्री 'मायबहिणी विठाबाई। लागला छंद तुझे पायीं।' [ माय+बहीण] ०बहिण घेणें-(व) आई बहिणीवरून शिव्या देणें ०बाप-पुअव आई व बाप, आईबापें उदा० (व) माय बाप हेल्या लेकर पाहिले बोला=आईबाप सराफ व मुलें बिळबिळीत ०भाषा-बोली-स्त्री स्वतःची भाषा माय(उ)ली-स्त्री १ आईस लडिवाळपणें संबोधण्याचा शब्द २ (सामा) आई किंवा आदरणीय, आवडतें वडील स्त्रीमाणूस ०मावशी-स्त्री १ मातेसमान किंवा प्रौढ स्त्री २ मातृस्थानीय किंवा अनुल्लंघ्यवचन असलेली नातवाईक स्त्री (क्रि० ओळखणें, जाणणें, मानणें, पाहणें इ०) गोमास व दिवस्व हे शब्द पहा [ माय+मावशी] ०माहेर-न १ आईचें घर, माहेर २ आश्रय, थारा ३ आश्रयदान, (क्रि० करणें) ०मूर्ति-वि दिसण्यात सभावित परतु महा लुच्चा मनुष्य ०(माये)राणी-स्त्री १ स्त्रिया व खालच्या जातींतील लोक यानीं पूज्य मानलेली पिशाच देवता, एक क्षुद्र देवता 'जासमाता मायराणी। बाळावगुळा मान विणी।' -दा ४ ५ १६ २ जलदेवता 'जळीच्या मेसको माय राणी।' -दा ३ २ २७ ३ (व) एक देवी हिची पूजा दिवा ळीत होते 'आमच्या घरीं मायराणीचा कुळाचार आहे' ४ (निंदेनें) करजी नावाचें पक्वान्न उदा० अडस्याची मायराणी सापिकियाचा शेंदूर मायराणीचे दिवे-पुअव आंत तूप घालून व वात लावून मायराणीस समर्पण केलेले कणकेच लहान लहान दिवे मायकांचा हा आषाढांतील एक कुळाचार आहे, या दिव्या सारखे कणकेच दिवे करून बायका खातात म्हणून-मायराणीचे दिवे खाले फिरफिरून घरास येते-असें एखाद्या धीट ल्चाळ व त्रासदायक स्त्रीसबंधीं रागानें म्हणतात ०वणी-स्त्री १ कुलीन स्त्री २ गर्भार स्त्री 'मायवणी घाल्या धाय । गर्भे आवतणें न पाहे।' -तुगा २३४८ [प्रा] ०वत्-न महारास आई किंवा पालक याच्या ठिकाणीं असलेल्या गावच्या सर्व दुसऱ्या जाती, या जातीपैकीं एक व्यक्ति ०वाण-न (व) नवऱ्या मुलाच्या आईला द्यावयाचे वाण 'मायवाणासाठीं लुगडें घ्यायला हवें

**मायणी-नी**—स्त्री मुसळ ठोकणें, जात्याचें पाळें, जात्याचा आंतील खुंग इ० काना बसविलेलें लोखंडी कडे

**मायतें**—न (वर) दोन प्रहरचें जेवण 'मायतें झाल्या बरोबरच मी इकडे आलों'

**मायतो**—पु (गो) अर्धा दिवस
शको ६ १०

**मायदळ**—पु मृदग मांदळ पहा [प्रा]

**मायंदळ-ळा, मायं(दा)धाल**—वि पुष्कळ, भरपूर, ढीग, मोप, मस्त 'समागमें त स्वार पायदळ, अती मायदळ,' -देप (कटिबप २ १०४) [(अशिट) महान्+दळ]

**मायना**—पु १ भावार्थ, अभिप्राय, आशय २ पत्रांतील आरंभीं लिहिण्याचे औपचारिक सप्रदाय माना अर्थ २ पहा ३ दर्जा 'आपण महाराज छत्रपती याच सेनापती आणि श्रीमंत हे पन्त प्रधान, उभयतांचा बरोबरीचा मायना' -इय ८९ [अर मअना]

**मायना, माना**—पु (कों) फायदा, नफा

**मायपत्री**—स्त्री छोटी, नरमी जायपत्री.

**मायफळ**—न एक औषधी फळ; माजूफळ हें सुपारीपेक्षां बारीक असतें यास कोणी तुरटें असेंहि म्हणतात हें विशेषत लहान मुलांच्या आजारावर फार उपयोगी पडतें [स मायाफल हिं माजूफल]

**माय(ये)वणी**—स्त्री कुलीन स्त्री 'कीं मायवणी पाविजे।' -माज्ञा १६ १४४ (पाठ) [स महावर्णिनी]

**माया**—स्त्री १ सृष्टि निर्माण करण्यास साधनीभूत अशी ईश्वरशक्ति 'इद्रो मायाभि पुरुरूप ईयते'=इंद्र आपल्या मायेनें अनेक रूपें धारण करतो' -ऋग्व ६ ४७ १८ -गीर २२१ २ सृष्टिप्रपच नामरूपात्मक जगत्; जग हें अमूर्त नित्य, अद्वितीय अशा ब्रह्मतत्त्वापासून उत्पन्न झालें असतां तें द्वन्द्वमय व मिश्रस्थिति आहे अशी त्याच्या स्वरूपाची ऐंद्रजालिकता पुराणांत मायेवर चेतनधर्मारोप करून तिला स्त्री व ब्रह्मयाची सहधर्म चारिणी आणि सुष्टीनें सृष्टीची रचना व विस्तार मानिलें आहे ३ कपट कृत्रिम गारुड, ऐंद्रजाल, मोह घालणारी ईश्वराची शक्ति 'हे आदिपुरुषाची माया।' -ज्ञा १ २०३ ४ अवस्तूच्या ठायीं वस्तुत्वबुद्धि मिथ्या कल्पना, अवस्तूच्या ठिकाणीं वस्तुत्वाचा भास, खोटा भ्रम 'पैल जळ हे माया।' -ज्ञा १३ १०३० तैसी हे जाण माया।' -ज्ञा २ १४० ५ नाशवत रूप 'म्हणून विकारी किंवा नाशवत नामरूपासच माया ही सज्ञा देऊन' -गीर २१७ ६ अविद्या अज्ञान 'तैसा विश्वस्वप्नेंसी माया। नीद सांडनि धनजया।' -ज्ञा १८ ४०५ ७ स्नेह प्रेम ममता 'तैसि करिल काय माय मायेतें?' मोअनुशासन ४ ३५ ८ दया, करुणा, अनुकंपा ९ भाग [स] उदा० माया वेडी गु फेडी=काम कितीहि विळसवाणें, नीच असो तें करण्यास माया प्रवृत्त करते (वाप्र) ०निवारणें-मायेचें पटल घालविणें दूर करणें 'कृपादृष्टीनें पाहसी जया। तयाची माया निवारिसी।' ०साख ळणें-अति प्रेम करणें अपुर्वाई करणें मायेक गेल्र सेवेक

चुकलें-(गो.) माया करायला दुसरीकडे गेले पण त्यामुळें कर्तव्य चुकल्यें मायेचें तोंड खालीं-निराळें-माया, ममता ही वरपागी, दिखाऊ नसून, ती प्रकट होण्यापेक्षा अप्रकट रहाण्यातच विशेष आहे, ममता नम्र असते मायेंत अटकणें-घोंटाळणें-पडणें-फसणें, मायेनें गुंतणें-गोवणें-गुंडाळणें-प्रपंचाच्या फेऱ्यांत सापडणें, प्रवृत्तिमार्गे चालविणें मायेनें मगाळणें-(कु )द्रव, पाझर फुटणें सामाशब्द-०चक्र-न मायेप्रमाणें मानलेलें पांचभौतिक जग 'जय जय मायाचक्रचालका।' [स माया+चक्र] ०जाल(ळ), मायापाश-नपु १ जग हें पांचभौतिक असून ब्रह्माहून भिन्न आहे असा विश्वास उत्पन्न करणारें, बुद्धि व इंद्रियें यावर टाकलेलें मायेचें जाळें २ मोह [स] ०तीत-वि मायाशक्तीच्या पलीकडे गेलेला (सत्पुरुष, ईश्वर) [स माया+अतीत] ०पटल-पडळ-न मायेचें घुंगट, आच्छादन, जग हें वस्तुत ब्रह्मच असताना त्यास भिन्न सत्ता आहे असें भासविणारा मायेनें जगास दिलेला आकार व छटा [सं माया+पटल] ०पुर-न (ल) शरीर ०ब्रह्म-न मायावेष्टित ब्रह्म [स माया+ब्रह्म] ०भान-न मायेचा भ्रम, झापड 'निरोपिलें ब्रह्मज्ञान। जेणें तुटे मायाभान।' -दा ७ १ ६१ [स] ०ममता-स्त्री दया, माया, स्नेह, प्रीति ०मय-वि मायारूप, मायेनें कल्पित 'मायामय जग सारें। अवघें दोन दिवसाचें वारें।' [स] ०मयविकार-पुअव प्रापंचिक बदल, रूपांतरें, घडामोड व स्थित्यंतरें होणारा प्रपंच 'नव्हते मायामय विकार। तेथें झाला स्फुरणगजर।' ०रूपी-वि १ मायिक, फसवणारें रूप, मुद्रा, आकार असलेला २ कृत्रिम, बाहेरून सुरेख पण आंतून नीच, बाहेर आंत एक बाहेर एक अशा स्वभावाचा (मनुष्य, सचेतन पदार्थ) [स] ०लाघव न जगत् हें ब्रह्मविस्तार नव्हे तर द्रव्यात्मक सृष्टि आहे अशी मनुष्याची वंचना करण्यात दिसून येणारें मायेचें कौशल्य, अवस्तूच्या ठिकाणीं वस्तुत्वबुद्धि उत्पन्न करणारें मायेचें कौशल्य [स] मायालु-ळू-वि १ ममताळू, प्रेमळ २ (ल) जादुगार [स] ०वंत-वि मायामय ०वाद-पु सर्व बाह्य जग असत्, मायारूप असून या जगाच्या बुडाशीं असणारें ब्रह्मतत्त्व तेवढेंच सत् आहे असें प्रतिपादणारें मत मायावादाचा पुरस्कार मुख्यत्वें अद्वैतमतवाद्यांनीं केलेला आहे [स] ०वान्-वंत-वि ,मायिक (जगत सर्व दृश्य विषय) [स] मायावी-वि १ मायिक गारुडी २ मायेचा नियंता (जगात दिसणाऱ्या त्याच्या अद्भुत कौशल्यावरून ईश्वरास म्हणतात) ३ खोटा, वरपगी, कपटी, लबाड (भाषण वर्तन, मनुष्य) 'हे अविद्या तरी मायावी।' -अमृ ६ ४३ [स माया+विन्(प्रत्यय)] ०वेष-पु मायिक वेष 'वीं वेउनि माया वेषीचें लेणें।' -ऋ ५ मायाळी-स्त्री प्रेमळ स्त्री 'तव कोणी मायाळी दटतीशी।' -दावि ११५ मायि(यी)क-वि १ ऐंद्रजालिक, मायेनें रचिलेला २ जगत् हें वस्तुत अमूर्त आणि ब्रह्मस्वरूप असता तें पांचभौतिक व स्थूल आहे असें भासवून वंचना करणारा (जग, जडसृष्टि) ३ खोटा, लटका, असत्य, पोकळ जसें- मायिक कारभार-धंदा-सुख-दु ख-संपत्ति-दरिद्र-बोलणें-रडणें-करणें 'आणिक नलगे मायिक पदार्थ।' -तुगा १०७० ४ माया करणारा 'यापरी महीतें मायिक। कोणी नसे मज लागी।' -नव १४ १६६. [स माया+इक (प्रत्यय)] मायिकवृत्ति-स्त्री वंचितवृत्ति, स्थिति, जडाच्या ठिकाणीं भासणारें सत्यत्व, सृष्टिभिन्नता, ब्रह्म व माया यांच्या ऐक्यत्वाविषयीं भ्रम 'मायिकवृत्तीचा झणी धरिशी संग। इंद्रियाचा पांग खाडी रया।' [स] मायेक-वि मायावी, खोटें -दार [मायिक] मायेचा अवतार, मायाअवतार-पु परमेश्वराचा मायिक अवतार (ईश्वराचे सर्व अवतार कारण आत्मज्ञान नसलेल्या व मूढ अशा माणसास मात्र हे अवतार खरे भासतात) मायेचा गोंधळ-पु प्रपंच, संसार मायेचा पदर-पु प्रेमाचें बंधन बाळगणारा मनुष्य (पुत्र, भाऊ, बांधव, आई, बाप इ०) मायेचा पदार्थ-मनुष्य-माणूस-पु स्नेह, प्रीति असलेला मनुष्य

माया—स्त्री १ पुंजी, ऐवज, मालमत्ता, पैसा, दव्योलें 'त्याच्या जवळ पुरीच माया आहे' २ वस्त्र इ० शिवताना दोरा निसटू नये म्हणून शिवणीच्या बाहेर सोडलेला वस्त्रादि कांचा भाग, दोरी सोडलेली जागा, समास (मांचा विणताना त्याच्या गाताचा, एका रेषेंत खिळे ठोकताना लाकडाच्या फळीचा सोडलेला भाग इ०) 'हा वस्त्र केवळ कांठ्यावरोबर कापू नको, थोडी माया राख'

मायोर—न (खि) माहेर घर

मार—पु मदन 'मानी अहंकृति शिवें असि मार-मातें।' -वामन, रुक्मिणीविलास २ [स मृ=मरणें]

मार—पु १ ठोक, चोप, ताडण (क्रि० देणें) 'दंते झाले वीर सुभद्राकृष्णाकुमार मारा ज्या।' -मोभीष्म ७ ३८ २ बंदूक, तोफ इ० कांच्या गोळ्याचा प्रक्षेप, हल्ला, भडिमार 'त्याच्या गुलालाचा मार। आमच्या वेण्या झाल्या लाल।' -मसाप २ ३० ३ (ल) हल्ला, गर्दी, कहर 'ते तसें बोलतात, हे असें बोलतात एकुण मला दोहोंकडून मार' ४ प्राण हरण करणें 'तरी मारें उणें काळकूट।' -ज्ञा १७ १३९ ५ निग्रह करणें 'मनाचा हन मारु।' -ज्ञा ६ २८९ ६ विपुलता, कडेलोट, रेलचेल 'सालम जकुरीं अभ्याचा मार झाला आहे' ७ एखाद्या गोष्टीचा धबडगा, भारी प्रमाण 'त्या विहिरीवर सगळे गांवाचा आठ दिवस मार पडताच आटली' ८ क्रियेचा झपाटा अतिरेक, निष्काळजीपणा दाखविणाऱ्या भाषणसंप्रदायांत प्रकर्षार्थी व पादपूरणार्थी

योजतात उदा० 'मार पगडी पेहून, मार हीलनें धावतो.' ९ न्यायालिक अधारें जमीनीचें माप अगें– विठ्ठलंनी–पादरी–मुल्तानी–मार [मारणें] (ग्राम्य) ०खेणें–१ त्रिडवणें २ एखादास थोपटणें, ठोकणें. ०पडणें–मारा पडणें, हल्ला होणें. 'बहु बोग मागें धारिला मार पडली दुरुराविला।'–ऐपो २८१ ०पचणें–माराला पात्र, विदय होणें, मार मिळणें ०मारणें–देणें–निधडानें व नेटानें हल्ला करणें (अभ्यास, काम इ०वावर) मार मार, मारे मारे करणें–फिरणें–हिंडणें–करीत फिरणें–आपलें दुःख सांगत फिरणें ०कूट–स्त्री मारणें व धव कणें, कुटणें व कुटणें. [मारणें+कुटणें] ०कूट–झोड–पीट, माराकुटी करणें–क्रि बेदम ठोकणें, मारणें, पिटणें [मारणें+कुटणें] ०खाऊ–वि नेहमी मार खाणारा. ०गिरी–स्त्री १ तोफांच्या किंवा बंदुकीच्या गोळ्यांचा हल्ला, मारा, भडिमार २ शस्त्र फेंकण्याचें कौशल्य ३ नेमक्या ठिकाणीं गोळा इ० चा ण्याजोगी किल्ला इ० कांवर केलेली सोय 'या किल्ल्याची बुरूंदद्रून मारगिरी चापली' ४ माराचा प्रयोग, मारा [मार+फा गरी] ०झोड–स्त्री मारणें, झोडणें, कुदलणें [मारणें+झोडणें] ०पकड–स्त्री कुस्ती खेळण्याच्या प्रकारांपैकी एक व साधारण बरोबरीचा प्रकार–के २६ ११.२५ ०पीट–स्त्री झाडणें व दांडणें, मार ठोक, मारहाण [मारणें+पिटणें] ०वण–स्त्री (एखाद्याबद्दल) मारविण्याची क्रिया 'जेथें नसे मारण। जेथें नसे मारवण।'–यथार्दी २ ५७६ [मारवणें] ०हाण, माराहाण–स्त्री हाणणें व ठोकणें, मारणें व झोडणें मार, अघात इ० मारकट–कणा, मारका–वि १ (कों.) हुंदाडण्यास, लाथा झाडण्यास सवक लेला २ मारण्याची सवय, खोड असलेला [मारणें] मारकौ(टुं)ढा–वि (व ना) मारका, अंगावर धावून येणारा (बैल इ०) मारका–पु दवडगा व ओझें, जीव घेणारा, लोळवणारा, जमिनदोस्त करणारा (विशेषत कामाचा) दवडगा (क्रि० लावणें, पडणें, बसणें, असणें) [मार] मारसा–वि (राजा) मारका, हुदाडण्याची व लाथा झाडण्याची संवय असलेला

**मारई**—स्त्री, मोटी शिंप हिच्यातील मांसास मारवी म्हणतात मारवी पहा

**मारक**—पु १ सार्थीचा रोग, मरी, सांथ २ मारेकरी, यम 'झालों धन्य त्रिजगीं, भास पळ प्राकृतास मारकसा।'–मोभीष्म १० १०३ –वि १ मारणारें, नाश करणारें २ (ल) प्रतिकारक भंजक, दोषापहारक (औषध इ०) 'कोकमराल घृताचें मारक आहे'

**मारका**—पु पिशाचाचा एक प्रकार; (कु वडोळी) सर्व भुताचा राजा [मारणें]

**मारका-खा**—पु (ना) भयंकर मारामारी, युद्ध, मुकाबला

**मारग**—पु १ (काव्य) रस्ता, मार्ग 'पाहा ह्या मारगें। बोल देतो आमच्या मागें।' २ (माग) रानांत जाऊन तेथें स्वयंपाक करून दैवीस नैवेद्य समर्पण करणें व या रीतीनें देवीचा माग घेणें [सं मार्ग, प्रा मग्ग] ०मळणें–एखाद्या देवतेस जाऊन कान्दावर पुढें त्याच मार्गावर जाऊन स्वयंपाक करून कुलदेवतेस नैवेद्य दाखवून सवाष्ण व ब्राह्मण जेऊं घालणें

**मारगुंडया**—पु एक वनस्पति

**मारजांभळ**—न एक इमारतीच्या उपयोगी लाकडाचें झाड

**मारंडी**—स्त्री (राजा) क्रुद्ध झालेल्या देवतेच्या कोपामुळें (गोवरांत, कुदवांत इ०) होणारा म्हणून सार्थीचा मानलेला त्रासदायक आजार [मारणें]

**मारण**—न १ मारणें, वध, हिंसा २ शत्रूच्या नाशार्थ योजिलेला मंत्र, जादू इ०. 'जारण मारण' [सं]

**मारणी**—स्त्री. (काव्य) १ प्रहार, मार २ हल्ला, घाल 'अनेक शस्त्रांची मारणी। युद्ध जाणे साधक।' ३ वेग ४ (बंदूक, तोफा, रोंगून उडविण्याकरितां शिपायाच्या स्टर्थवीत राखलेलें) तिरकस उतरतें भोंक जंगी पहा [मारणें]

**मारणें**—सक्रि १ ठार करणें, जीव घेणें व्युत्पत्तिदृष्ट्या, 'मृ' ह्या धातूस अनुसरून जरी हा अर्थ प्राथमिक आहे तथापि तो मारणें ह्या क्रियापदाच्या ऊन प्रत्ययान्त रूपाशीं टाकणें हें क्रियापद योजलें असतां, अथवा मारणें क्रियापद कांहीं विशिष्ट क्रियाविशेषणांशीं किंवा क्रियाविशेषण असलेल्या जीव ह्या शब्दाशीं योजिलें असतां मात्र होतो उदा० मारून टाकणें, ठार मारणें, अगदीं मारणें, निःशेष मारणें=जिवानशीं–जिवानें–जिवें–मारणें. २ ताडन करणें, ठोकणें, पिटणें, हाणणें (कोणत्याहि साधनानें) ३ जिंकणें, पराभव करणें ४ (पारा, वंग इ० कांच्या) तीव्रतेचा नाश करणें ५ हल्ला करणें (घर, गांव, प्रवाशी इ० कावर) ६ लुबाडणें, अंगावर तुटून पडून (ठार मारून, ठोकून, जुलूम करून) हिरावणें, हिसकावून घेणें 'सोनें–खजाना–हुंडी–मारली' ७ काबीज करणें, वश करणें, दमन करणें (मनोविकार, इच्छा, वासना) ८ ठोकणें (खिळे, खुंटया, मेखा) ९ लावणें, बसविणें, न हालेसा करणें (कुलुपें, बांस, बिडया, कोणतीहि वस्तु इ० जरूर घट बसणें असा अर्थ असतां योजतात) १० (सोनारी धंदा) कोणत्याहि जिनसाला पैलू पाडणें किंवा विशिष्ट आकार देणें, ठसा उठवणें वगैर उदा० घटगावर बिल्वर मारणें ११ सभाळणें, निभावणें, निभावून नेणें, पार पाडणें 'ही एवढी आणीबाणीची वेळ मारून न्या म्हणजे झालें' १२ लिहिणें 'पत्रकावर शेरा मारला पाहिजे' १३ करणें ह्या क्रियापदाच्या विस्तृत अर्थी (जोर, जल्दी, झटपट, चटपट इ० क्रिया दाखविणें असता) उपयोग करितात उदा० एवढें काम मारतों आणि येतों.' करणें याच्या अनेक अर्थी योजलेल्या

मारणें क्रियापदाचे काहीं अर्थ –उडविणें (बंदूक) लुटणें (लढाई), लगावणें (तरवार, चाबूक, छडी), फेकणें, झुगारणें (अस्त्र) घालणें (घाला), आरंभणें (धाव, नृत्य, ताण, जोर, दम यत्न), ठोकणें (तटू), फक्‌दिशीं आत टाकणें, फेकणें (तोंडात–मिष्टान्न, घास, बकाणा), गट्ट करणें, खाणें (पैसा, माल), चलाखीनें व हुशारीनें मिळविणें, कमावणें (धंद्यातील नफा), उदा० त्या व्यापारात त्या दोनशें रुपये मारले, कर्कशपणें व मोठ्यानें उच्चारणें (आरड, हाक, आरोळी, कुकारा), झपाट्यानें, चलाखीनें करणें (मौज कौतुक, ख्याल, वाष्कळ गोष्टी), –'चल लौकर हात मार, फडशा करून टाक' याप्रमाणें जोरानें, झटकन्‌ केलेलें कृत्य दाखविण्याकरितां योजलेल्या 'मारणें क्रियापदाचीं उदाहरणें असंख्य आहेत यावरून जोर, दम, चलाखी, उत्कल ह्या अर्थाच्या द्योतक अशा घालणें, टाकणें, लावणें, पाडणें हाणणें, टाकणें इ० अर्थ च्या क्रियापदांच्या वर्गांतीलच मारणें हें क्रियापद असल्याचें दिसून येतें १४–अंकि लागणें, परिणाम होणें 'ह्या तळ्याची ओल त्या च्या ओटीवर मारती' 'काय शब्दाची झळक, चकाकी मारती' १५ शरीरात एकदम उत्पन्न होणें, उठणें (चमक धमक, लचक, शूल, कळ, उसण इ०), 'शीर–डोई–डोसकें–मस्तक–मारतें' [स मृ=मरणें, ग्रैंजि मर, पोर्तु जि मारार] म्ह० १ मारशील (जाळशील) तर पुढें जाशील=जर तू मला मारशील तर तू पुढें जाशील (तुला पुढें काय होईल तें समजेल) मारण्याचा धाक घालणारास ताकीद देताना म्हणतात २ मारावा हत्ती लुटावा भंडार (वाप्र) छटा. छाया मारणें–सारखेपणाची लकेर असणें तुमच्या बोलण्यात तीर्थरूपाच्या बोलण्याची छाया मारती' झोप मारणें डुकल्या मारणें–निद्राग्रस्त होणें, पडणें वास–घाण–मारणें–(एखाद्या वस्तूचा) वास रंग रुचि, छटा, लकेर झाक असणें मजा मारणें–चैन करणें मौज करणें

**मार(र)इ, मारांडी**—स्त्री खारवणात उगवणारी एक कांटेरी वनस्पति

**मारदा**—पु नारळ, ताडाचें फळ इ०कांत येणारा आवळ्या सारखा अकालपिंड, कोंवळा मोड

**मारपाचो**—पु (गो) चौकोनी दगड **मारपी**–पु (कु) खाणींतून चिरे काढणारा मनुष्य

**मारफत-ती**—स्त्री (विशेषत देण्याघेण्याच्या व्यवहारात) एखाद्या मनुष्याची गुजारत, विद्यमानता, मुखत्यारी, ओळख 'जें काहीं द्यावयाचें घ्यावयाचें असेल तें हरीपंताचे मारफतीनें घे–दे' –क्रिवि सवधानें, निसबतीनें, कडून तर्फेनें 'मी त्याचे मारफत तीन आलों=मी त्याजकडून (त्याच्या नांवानें–वतीनें, त्याज कडून अखत्यारी घेऊन) आलों' [अर मुआरफत]

**मारपन द**—स्त्री १ (व ना) धिंड मिरवणूक २ पोळ्याच्या दुसऱ्या दिवशीं गांवातील इडापिडा, रोगराई बाहेर नेऊन घालविण्या- साठीं सोंगें वगैरे काढून मिरवणूक काढतात ती, वरसातींत रोगराई उत्पन्न करणारी मारबत नावाची देवता, -हिच्या प्रीत्यर्थ वरील मिरवणूक काढतात त्यावेळीं गांवाबाहेर जाळण्यात येणारी बांबू व कागद यांची केलेली अक्राळविक्राळ, प्रचंड स्त्रीरूपी प्रतिमा ०खेदणें–(ना) (एखाद्यास) हाकून लावणें, (एखाद्याची) हुर्यो उडविणें

**मारवा**—पु (संगीत) एक राग ह्यात षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, तीव्र मध्यम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर असतात जाति षाडव–षाडव वादी ऋषभ संवादी धैवत गानसमय दिवसाचा चवथा प्रहर [हिं] ०थाट–पु (संगीत) एक थाट ह्याचे शुद्ध षड्ज, कोमल ऋषभ, शुद्ध गांधार, तीव्र मध्यम, शुद्ध पंचम, शुद्ध धैवत व शुद्ध निषाद असे सात स्वर असतात

**मारवाडी**—पु मारवाड देशातील व्यापारधंदा करणारी एक जात व तींतील व्यक्ति –वि १ मारवाड देशासंबंधीं २ तद्देशीय (व्यापार करणारे लोक) ३ (ल) धूर्त, शठ, कृपण, काव बाज, व्यवहारदक्ष [स मरु] म्ह० मारवाडी मित्र नाहीं पाय खाना पवित्र नाहीं ०पणा–पु कंजूषपणा,

**मारवी**—स्त्री मोठ्या जातीचा शिंपमासा याच्या शिंपेला माराई म्हणतात माराई पहा

**मारवेल-ळ**—पुस्त्री १ एक समुद्रकिनाऱ्यावर उगवणारा वेल २ एक प्रकारचें हरळीसारखें गवत, हें गुरांना चांगलें मानवतें 'कन्हवेलु मारवलु गोंडाळी।'–गीता २ ५२८६

**मारा**—पु १ (किल्ला इ० कावर केलेला हल्ला तोफांच्या गोळ्यांचा वर्षाव, मार 'किल्ल्याच्या पूर्व बाजूनेंच मारा केल्या मुळें यश आलें' २ तोफेची रोख ३ नमक्या ठिकाणीं गोळा लागू होण्याजोगें संधान 'त्या मोरच्यानें मारा चांगला साधला' 'त्या किल्ल्यास दोन मारे आहेत तिसरेकडून कोटून' गोळा लागू व्हावयाचा नाहीं' ३ तोफेचा, बंदुकीचा, आटोवा, पोंच, टप्पा. ४ एखाद्या सार्थीच्या रोगानें महापुरानें घेतलेला बळी 'महामारीनें त्या गावाचे दोन मारे घतले' 'ही नदी प्रतिवर्षी एक मारा घेते' ५ भडिमार, मार, माराचा विषय होणें, मार बसणें माझा चहूंकडून मारा होतो' ६ (किंवा मार) चंगळ, विपुलता (बऱ्या किंवा वाईट गोष्टीची) ७ बुद्धिबळादि खेळात एका किंवा अनेक घरांवर चालू शकणारी मोहऱ्याची मारक शक्ति ८ वेग, रोंखा, जोर, सपाटा 'पधरा खेडीं पुराच्या माऱ्यात सांपडलीं' –के २६ ७ ३० माऱ्याचे आत येणें–माराच्या टप्प्यात येणें **माराकुटी**–स्त्री १ मारकूट, मारपीट २ (सोंगट्यांचा खेळ) मारामारी (यात कोणत्याहि खेळाडूनें दुसऱ्या कोणा चीहि नरद मारावयाची असते) **माराडी**–स्त्री (कु) कुचंबणा **मारामार-री**–स्त्री १ परस्पर लढणें, मारणें, युद्ध, लढाई २

(ल )अतिशय श्रम (उपजीविकेची साधनें इ० मिळविण्याकरिता केलेले ) 'दिवसभर मारामार करावी तेव्हा कोठें दोन आणे हातीं येणार ' ३(अशिष्ट) पराकाष्ठेचा झपाटा व गडबड, गर्दी (रोजच्या कामाची ) ४ पराकाष्ठेची विपुलता ( पदार्थाची ) 'कामाची–गाण्याची–धावण्याची – प्रयोजनाची – मारामार ' ५ पचाईत, अडचण ६ ( कायदा ) दोन किंवा अधिक इसमानीं सार्वजनिक जागीं केलेली झुंज [ मारणें द्वि ] ०**पडणें–होणें**–पचाईत पडणें पचाईत होणें, अडचण पडणें ' गोऱ्याना तेथें धान्य–पाणी मिळण्याची मारामार पडली ' –के १७ ४ ३० **माराहाण**–स्त्री मारहाण **मारिजेसिल**–क्रि मारला जाशील **मारू**–वि १ मारणारा. २ मोहक, नखरेबाज, चित्ताकर्षक, मनोहर (डोळे, अलंकार इ० ) ३ भेदक, बोंचणारें, पदय (भाषण) ४ (गो ) लबाड **मारून**–क्रिवि आवेश, पूर्णपणा, विपुलता इ० दाखविणारें वाक्यालंकारभूत क्रियाविशेषण ' मारून तेल लाव आणि वळकट चोळ ' ' आज मारून हजारों रुपये धर्म केला ' **मारून उरता न ठेवणें**–बेदम मारणें, मरेमरे तों मार देणें ' त्याला मारून उरता ठेवला नाहीं ' **मारून पीठ–पिठार करणें**–(एखाद्यास) ठेचणें, बदडणें, बेफाम मारणें **मारून भूस भरणें**–अगदीं बेदम मार देणें, मरेमरे तों ठोकणें ०**मारून–मारता मात भरणें**–मारून नरम आणणें बशुद्ध करणें, बेदम मारणें **मारून येषप**–(गो ) मिरगी, झिट येणें **मारून कुटून–धमकून–मुटकून**–क्रिवि नाना प्रकारच्या युक्त्या व प्रयत्न करून, जबरदस्तीनें, जुलमानें, पुष्कळ श्रमानें, मोठ्या कष्टानें, वारंवार प्रयत्न केल्यावर (क्रि० अलेवळे साधणें, करणें) ' एकदा मारून कुटून घर बाघलसें केलें ' [मारणें+कुटणें, मारणें+मुटकणें ] **मारे**–क्रिवि ( वाक्यालंकारार्थी किंवा पादपूर्णार्थक शब्द ) आवेशानें मार अर्थ ८ पहा ' मारे मुसळाखालीं एकेकाची टाळकीं फोडून टाकीन '–नामना ८६ **मारेकरी**–पु एखाद्याच्या सांगीवरून दगानें एखाद्यास ठार मारणारा, वेतन घेऊन मनुष्य वधाचें काम करणारा [ मारणें+करी ]

**माराक**—पुन ( महानु ) शस्त्र, बाण ' कदर्पाचेया माराका। गाक्षावीणि ते। '–भाए ४२१

**मारा घेणें**—क्रि परेमरें या खेळात आपलें फरें झाल्यावर विरुद्ध पक्षाचा खडा उचलून घणें

**माराणु**—पु १ लक्ष्मीपति विष्णु २ कृष्ण ३ राम [मा= लक्ष्मी+राणा ]

**मारि–री**—स्त्री मरी, महामारी ' मारी लक्षहि न तदिपु हुनि अधिक प्राणिजात सारील। '–मोभीष्म १० १६ [ स मृ= मारणें ]

**मारि(र)ता**—वि मारणारा [मारणें] म्ह० १ मारत्याचा हात धरवेल पण बोलत्याचें तोंड धरवत नाहीं, किंवा मारत्याचे हात धरवतात, पण बोलणाराचें तोंड धरवत नाहीं २ मारत्याच्या मागें पळत्या पुढें **मारता पीर**–वि १ वस्ताद, जबरदस्त उतारा; बरकडी ' त्याचा मारता पीर मी आहें मजपुढें येऊ द्या ' 'हें औषध पित्ताचा मारता पीर आहे ' २ तडखपणानें मारणारा इसम [ मारणें+फा पीर ] **मारती**–स्त्री १लढाऊ फौज ' मारती तीस हजार। '–ऐपो २३२ २ ( पत्त्याचा खेळ ) आपणाजवळ ज्या रगाचें पान नाहीं व जी आपण हुकुमानें मारतों अशी बाजू, कगाय **मारपेंच**–पु डावपेंच, कावेदावे, छक्केपंजे, युक्तिप्रयुक्ति

**मारुत**—पु १ वायु वारा, हवा २ ज्यावळीं प्राणवायु आतून निघून गगनाला मिळतो त्या स्थितींतील कुंडलिनीचें नाव ' ते वळीं कुडलिनी हे भाष जाये। मग मारुत ऐसें नाम होये। ' –ज्ञा ६ ३०१ [सं ] **मारुति–ती**–पु १ वायुपुत्र, हनुमान् २ क्वचित् भीमालाहि म्हणतात ' शिक्वी मारतिला भगदत्ते हृदयात बाण शिरकविला। '–मोभीष्म ५४८ **मारुतीचें(ची) शेंपूट**–नस्त्री (सीताशुद्धीसाठीं लकेंत गेलेल्या मारुतीच्या शेंपटाला राक्षसानीं चिंध्या बाघल्या पण तें इतकें लाबलें कीं सपदना यावरून ( ल ) लाबत जाणारें काम, लाबट गोष्ट; पाल्हाळ ०**लांबणें**–अक्रि अशा रीतीनें काम लावविलें जाणें

**मारूज**—पु अर्ज ' हुजूर मारूज पोंहचविला '–वाडमा१ ६६ –वि प्रविष्ट, श्रुत ' सावदास अर्ज मारूज करून पाहीन ' –रा ५ ७२ [अर मअरूझ] ०**मी(मे)दारद**–पु अर्ज, विनति करतो या अर्थाचा फार्शी अर्ज, पत्रें इ०कांतील मायना [फा मअरूज् मिदारद्=मी अर्ज करतों ]

**मारूमिती**—स्त्री एका महिन्याच्या पौर्णिमेपासुन दुसऱ्या महिन्याच्या पौर्णिमेपर्यंत महिना मोजण्याची उत्तरहिंदुस्थानांतील रीति व या पद्धतीनें केलेले मारवाड्याचे हिशेब

**मारोंव**—स्त्री (गो ) तुमान

**मार्क**—पु गुण, परीक्षेमध्यें प्रश्नाच्या उत्तरास मिळालेले गुणाक स्त्री –स्त्री चिन्ह, खूण [ इ ]

**मार्कंडेय**—पु १ एक ऋषि, मार्कंडेयपुराणाचा कर्ता २ (मार्कंडेय हा चिरजीव आहे या समजुतीवरून ल ) अतिशय म्हातारा मनुष्य [ स मार्कंडेय ] **मार्कंडेयाचें आयुष्य**–न दीर्घायुष्य

**मार्ग**—पु १ रस्ता, पथ, वाट २ पथ, सप्रदाय ३ (ल ) रीति पद्धति, मोड, सरणी, धाटी, वहिवाट, चाल, परिपाठ ' गुरुजन दती वरासि कन्या, या। मार्गासि लघिता मी प्रभुजी होईन पात्र अन्याया। '–मोआदि ८ ३४ ४ मोक्ष, स्वर्ग अथवा एखादा सुखप्रद लोक गाठण्याचा रस्ता धर्ममार्ग, उपासनामार्ग

व ज्ञानमार्ग असे हे तीन मार्ग आहेत. कांहीं लोक यांतच सिद्धांत मार्ग, योगमार्ग व वैराग्यमार्ग यांचा समावेश करतात. ५ (संगीत) ताल देण्याची एक पद्धति. ध्रुव, चित्र, वार्तिक व दक्षिण असे हे चार मार्ग आहेत. [ सं मृग्=शोध करणें ] (वाप्र.) ०धरणें–१ निघणें, आपल्या मार्गाला लागणें. २ रस्ता रोखणें; रस्त्याला उपद्रव देणें, वाट मारीत बसणें. ०फुटणें–१ रस्ता, वाट आवळणें. 'सुंदरी समीराची गति । मार्ग न फुटे चालावया।' २ एका वाटेस दुसरा फाटा फुटणें. ०मळणें–१ मारग मळणें पहा. २ वागेंत भोजन करण्याकरितां व मौजा मारण्याकरितां जाणें; वन-भोजनासाठीं सहल करणें. **मार्गावर येणें–सुधारणें. मार्गी लागणें**–१ (आपल्या उद्दिष्ट प्रवासाचा) मार्ग धरणें, निघणें. २ मरणाच्या पंथास असणें. ३ (एखादें कार्य करण्याच्या किंवा तें कसें करावें हें समजण्याच्या) पंथास लागणें. ४ आरंभिलें जाणें; सुरू होणें (काम, गोष्ट) सामाशब्द– ०क्रमण–न. रस्ता, वाट चालणें [सं] ०गीत–न (संगीत) गांधर्वगीताचा एक प्रकार. [सं] ०घ्न–वि (काव्य) रस्तेलुटारू; वाटमाऱ्या 'दुर्वेळघातक मार्गघ्न।' [सं. मार्ग+हन्] ०ताल–पु. (संगीत) प्राचीन तालाचा प्रकार हे प्रचारांतून नष्ट होऊन अनेक शतकें झालीं आहेत [सं.] ०त्रय–न. तीन मार्ग. मार्ग अर्थ ४ पहा. [सं.] ०दर्शक–वि. वाटाड्या, रस्ता दाखविणारा. ०पालीबंधन–न. १ दर्भ किंवा मोळ यांचा दोर वळून तो गावाबाहेर पूर्वदिशेकडे दोन झाडास किंवा खांबास दोहींकडे बांधून त्याखालून गावकऱ्यांनीं गावांत प्रवेश करण्याचा विधि. २ मोळाचा दोर वळून एका टोकास हीनवर्णीय व दुसऱ्या टोकास श्रेष्ठवर्णीय यांनीं धरून ताणून ओढावयाचा विधि, मागोळी [सं.] ०प्रतीक्षा–स्त्री. एखाद्याची वाट पाहणें [सं] ०भेद–पु १ मार्गाची भिन्नता, रस्त्याचा पालट २ मार्गाच्या भिन्नतेमुळें किंवा पालटामुळें होणारी चूक ३ पद्धतीचा भेद 'हल्लीं या बाबतींत जो कांहीं मतभेद दृष्टीस पडतो तो मार्गभेदामुळें झाला आहे'–टि १.४९९. ०रूढी–स्त्री. (महानु) पंथातील प्रचलित वर्तन. 'प्रमाणपुरुष तयाची मार्गरूढी।' ०संगीत–न १ जें भरताला ब्रह्मदेवानें शिकविल्या-वर त्यानें अप्सरा व गंधर्व यांच्या कडून शंकरापुढें गावविलें तें संगीत त्याच्या नियमांत बदल व्हावयाचा नसतो. दुसरें देशी संगीत २ प्रचारांतून नष्ट झालेलें संगीत [सं.] ०स्थ–वि. यात्रे करू, प्रवासी, मुसाफर 'मार्गस्थ देवदर्शनासी आले।'–सप्र ८.२१. **मार्गाची**–वि सरळ, न्यायाची. 'ही मार्गाचीच गोष्ट होती' **मार्गाटन**–न वाट, मार्ग, रस्ता चालणें. [सं. मार्ग+अटन] **मार्गामार्ग**–पु सरळ मार्ग व आडमार्ग; योग्य-अयोग्य मार्ग 'का जे मार्गामार्ग देखावे।'–ज्ञा ८.२३९. [सं] **मार्गाक्रमण**–न (ज्योतिष) नक्षत्राच्या क्रमानें अंतर्प्रवेशाचें पूर्वेस जाणें. [सं.] **मार्गीचलन**–न. (ज्योतिष) ग्रहाचें नक्षत्रक्रमानें पश्चिमेकडून पूर्वेकडे गमन. [सं.]

**मार्गण**—पु. शर; बाण. 'मग असंख्य सोडोनि मार्गण।' –जै २०.११७. [सं. मृग्]

**मार्गशिर**—पु. मार्गशीर्ष महिना. [सं. मार्गशीर्ष] **मार्ग-शिरी–शीर्षी–शीर्षी**–वि मार्गशीर्ष महिन्यासंबंधीं. **मार्ग-शीर्ष–शीर, मार्गेश्व(स)र**–पु चैत्रादि महिन्यांतील नववा महिना.

**मार्च**—पु. १ इंग्रजी वर्षाचा तिसरा महिना. २ सैन्याचें कूच. [इं]

**मार्जन**—न १ सिंचन, शिंपडणें. २ दर्भाग्रानीं अथवा विशिष्ट मंत्र म्हणून उजव्या हाताच्या बोटाच्या अग्रांनीं हृदय व शरीर यांवर पाणी शिंपडणें. ३ स्नानानें, धुण्यानें, पुसण्यानें, सुवासिक उटण्यानें इ० शरीर स्वच्छ करणें. ४ (ग्रामा.) धुणें, घासणें; स्वच्छ करणें. ५ झाड; संमार्जन. 'केशर कस्तूरीचीं मार्जनें।' –वेसीस्व ८.८८. ६ (महानु.) मुखमार्जन, तोंड धुणें. [सं. मृज्= पवित्र करणें] **मार्जनी**—स्त्री. १ केरसुणी; झाडणी; कुंचली, झाडण्याचें, पुसण्याचें कोणतेंहि साधन २ (संगीत) तेराव्या श्रुतीचें नांव. [सं.]

**मार्जा(र्जे)र**—पुन गावांतील किंवा रानांतील मांजर. 'सुगंध-मृगें आणि मार्जारें।'–दा ४.५.२८ [सं मार्ज्=ध्वनि करणें]

**मार्तंड**—पु (कवि.) १ सूर्य 'सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा। उडी घालितो संकटीं स्वामी तैसा।'–राम ३७. २ खंडेराव किंवा खंडोबा 'पाहोनि मार्तंडा जेजुरवासी।'–दावि १७६. [सं.]

**मार्तु(र्तृ)ल**—पु (कर) डिसमीस, चावी, (इं) स्क्रुड्रायव्हर.

**मार्त्तिक**—वि. मातीचा, मृत्तिकामय [सं मृत्तिका]

**मार्दव**—न १ मृदुपणा. २ सौम्यता, कोमलता, शांति. [सं]

**मार्फत**—स्त्री मारफत पहा.

**मार्मिक**—वि १ रहस्य, मर्म जाणणारा, अंतर्गत खुब्या, भावार्थ भेदणारा. २ भेदक, वेधक, बारीक, खोल, सूक्ष्म (तर्क, अनुमान, कल्पना) ३ भेदणारें, टोंचणारें, खोंचणारें, दंशक. (भाषण) [सं]

**मार्वत**—पु (व) पोळ्याच्या सणांतील दुसरा दिवस. मारबत पहा.

**मार्सो**—स्त्री (गो.) लीख, क

**माल**—पु मल्ल 'माल मर्दूनि मालखडा।'–एभा ३१.२४१ [सं मल्ल] ०खडा–पु अजिंक्य मल्ल 'चाणूर मुष्टिका दीधला विडा। युद्ध करावया मालखडा।'–कथा ४६.३८.

मालखंड-पु. (महानु.) युद्धभूमि; कुस्तीची जागा. 'गिरी गजरगडा मालखडा प्रवेशे।'-गस्तो. 'मालखंडा जें केलें क्षात्र।' -एभा ३१.३८१. मालगंठी-स्त्री. (महानु.) मल्ल बांधतात त्याप्रमाणें कास बांधण्याचा प्रकार; विशिष्ट प्रकारें गांठ देऊन वस्त्र नेसण्याची पद्धत. 'तो पीतांबरु असे वेढिला। मालगंठी।'-दाव २२४. [सं. मल्ल+ग्रंथि] ०जेठी-पु. मल्ल. मालातिणें, मालाथ(थि)णें-सक्रि. १ (महानु.) मल्लविद्येनें वेढणें; मोहित करणें. 'चेणें, अहंकारें मालाथिलं।'-ज्ञाप्र ६.३२. २ निस्तेज होणें, करणें. ३ नि.शेष होणें. 'भीतरीं मालाथिलें। साभिळासे।' -कालिका २६.४०. ४ आश्रय, आंगीकार करणें. 'तैसा प्रकृति हे आसुर। एकली नोहे गोचर। जवं एकाधें शरीर। मालहातीना।' -ज्ञा १६.२७७. [प्रा.]

माल—पु परिणाम; शेवट. [अर. मआल्] मालअन्देशी-स्त्री. परिणामाचा अगोदर विचार करणें. 'मालअन्देसी.'-पेभ ६०. [अर. मआल्=परिणाम]

माल—पु. १ मत्ता; वित्त; द्रव्य; संपत्ति. २ जिन्नस; सौदा; विक्रीचा पदार्थ; जिनसपान्नस. ३ किंमतीची वस्तु. 'हा आठ रुपयांचा माल आहे.' ४ (कायदा) प्रत्येक जातीची जंगम जिंदगी. ५ जमाबंदी. 'मालाचें (रेव्हेन्यूचें) काम.'-निजामविजय १४.१२.३१. [अर. माल्] (वाप्र.) ०खाणें-(व.) मेवा, मिठाई इ० गोड पदार्थ खाणें. माल केमाल, मालचा माल-वाढ, सुधारणा होणाऱ्या किंवा घट, अपकार होणाऱ्या कामीं लावल्यावरहि ज्याच्यामध्यें बरावाईट असा कांहींच बदल होत नाहीं असा पदार्थ (पैसा, माल इ०) ०वथरणें-(व.) पीक चांगलें येणें; मालावरचा नाग-वि. १ पैशाचा उपयोग न करतां त्याचें केवळ रक्षण करणारा (कृपण मनुष्य). २ श्रमाशिवाय आयती संपत्ति ज्यास मिळालेली आहे असा (इसम). सामाशब्द- ०असबाब-पु. चीजवस्त वगैरे संपत्ति. ०कटनी-काटणी-काटी-स्त्री. १ शेताच्या कापणीसाठीं सरकारची परवानगी मिळण्याबद्दल दिलेली रक्कम; फी. २ पिकाची कापणी. ०काळी-स्त्री. (व ना.) शेतजमीनीचा सरकारसारा. 'वऱ्हाडची मालकाळी किती?' ०खरा-वि. पूर्ण किंमतीचा (घेंचलेलें किंवा विकत झालेलें असलें तरी जें धातूच्या धातूचें असतें असें नाणें इ०). [माल+खरा] ०खाना-पु. कोठी. ०चाटी-चाटया-पु. शाळेतील उपगुरु [माल+चाटया] ०जामिनकी-स्त्री. मालजामिनाचा अधिकार, काम. ०जामीन-पु मालाचा, पैशाचा जामीन; अमुक रक्कम अमुकवेळीं देईन अशी हमी देणारा. -रा१६.५०. याच्या उलट हाजीर जामीन. ०टाल-पु. चोज वस्त; माल आणि इतर सामान. [माल हिं] ०दार-वि. (व.) श्रीमंत. 'गावांत मालदार लोक आहेत.' ०धनी-पु मालाचा, जिन्नसाचा धनी. ०पिसा-वि. मालाचा नाश झाल्यानें किंवा तो नष्ट होण्याच्या भीतीनें वेड लागलेला. ०पिसें-न. मालाच्या नाशामुळें किंवा नाशाच्या भयामुळें लागलेलें वेड. ०बंदी-वि. १ ऐवजदार; किंमतवान; मोलवान. २ घणसर द्रव्याचा भक्कम (बांधणी, मांडणूक). ०बिसात-स्त्री. मालमत्ता. ०मत्ता-स्त्री. (व्यापक.) सर्व धनदौलत, जिंदगी, इस्टेट; रोकड, माल, चीजवस्त इ० सामान. [अर. माल+मताअ] ०मवेशा-शी-स्त्री. चीजवस्त; गुरेंढोरें; मालमत्ता. [अर. मवेशी] ०मसाला-पु. (व्यापक.) १ मिश्रणाचीं द्रव्यें. २ इमारती इ० कामासाठीं लागणारें दगड, विटा, चुना, लाकूडफाटा इ० सामान. ३ उपयुक्त वस्तु, सामग्री. [माल+मसाला] ०मस्त-वि. संपत्तीनें चढलेला; धनगर्वित; धनोन्मत्त. [अर. माल्+फा. मस्त=मत्त] ०मालिक-पु. धनी. 'तरी मालमालिक व्हा त्याचे।'-दावि ८. ०मालीयत-स्त्री. मालमत्ता. 'संस्थानामध्यें मालमालीयत व स्वभाव...' -वाडबावा १.१३४. ०मिल(ळ)कत-स्त्री. माल व चीजवस्त; जंगम व स्थावर मालमत्ता. [अर.] ०मुद्दल-न. झालेल्या खर्चाच्या किंवा आगाऊ दिलेल्या पैशाच्या बरोबरीचा जिन्नस. उदा० माझें मालमुद्दल उभें राहिलें-आलें-हातास लागलें. -क्रिवि. १ बरोबर किंमतीला (क्रि० विकणें; विकत घेणें; करणें इ०) २ मूळ किंमतीला. ०मोल-वि. योग्य किंमत दिलेला; त्याच्या किंमतीला घेतलेला, विकलेला, मांडलेला. -क्रिवि. योग्य किंमत देऊन. (क्रि० विकत घेणें; विकणें; मांडणें; गहाण ठेवणें इ०). ०मोल किंमत-स्त्री. योग्य किंमत. ०वाडी-पु. (गो.) कुलवाडी; कूळ; शेतकरी. 'गावातल्या समद्या कुलवाडी मालवाड्याशीं काय हाय? जो तो कसा तरी उपासानें दीस लोटतोय.'-चैत्रावळ-महाराष्ट्र शारदा, जून १९३५. ०शिकाऱ्या-वि. (व.) उत्तम पदार्थांवर हात मारावयास सेवकलेला. ०साईर-न. मालावरील जकात. 'कसबो कसबो कराडा मालसाईर सुधी तुमपर राखो.' -वाडबावा१.२१. ०हराऊ-वि तोटा, नुकसान, खराबी करणारा. (प्राणी, वस्तु, काम याची). माल(ली)क-वि. १ धनी; स्वामी. २ अधिपति, शास्ता, अधिकारी. ३ हक्कदार; जो एखादें काम पाहतो किंवा ज्याचें तें काम आहे असा मनुष्य. 'मासा बाप जामीन राहिला आहे तो त्या गोष्टीचा मालक त्यास काय तें विचारा' ४ (कायदा) पति, नवरा. ५ (कायदा) एखाद्या कंपनीचा, मंडळाचा गुमास्ता, मॅनेजिंग एजंट. ६ (युद्ध) टोळीचा नायक. ७ देशस्थी. ८ जमीनदार. [अर. मालिक; मालक] मालकी-स्त्री. धनीपणा; स्वामित्व. सत्ता. [मालक] मालकीयत-स्त्री. स्वामित्व. 'मालकीयत व खाविन्दी.'-दिमरा १.२०७. [हिं] माल गुजा(झा)र-पु १ जमीन संबंधानें

देणारा, जमीनदार २ सरकारचा वसूल जमा करून देणारा ३ (व) पाटील [फा मालगुझार] ०गुजा(झा)री-स्त्री १ सरकारसारा देणें २मालगुजाऱ्याचा हक्क माल(लि)म-पु गलबताचा हिशेब व व्यवस्था पाहणारा अधिकारी, नाखवा मालत, मालयत, मालियत, मालीयत मालिस्त-स्त्री मिळकत, उत्पन्न, वसूल, मालमत्ता त्यांची मालयतें पारच गेली'-ख ११ ५५५५ 'माणसास न मारावें, मालत घेऊन सोडून यावें'-भाकै २६ [अर मालीयत] माली-वि वसुलासबंधी 'माली व मुल्की' -वाडसमा ३ २४ [फा माली] माली मामला-पु १ (जकात) किंमतवान माल, जो विकला असता पैसा उत्पन्न होईल असा माल, सर्व खर्च सोसण्याजोगा माल २ जकातीचें काम मालीव-वि (कों) कांहीं किंमतीचा, विकला असतां कांहीं किंमत येणारा (मौल्यवान जिन्नस) [माल] मालोमाल-वि किंमतीच्या योग्यतेचा, दिलेल्या पैशाइतक्या किंमतीचा (विकत घेतलेला जिन्नस) (क्रि० विकणें इ०) [माल द्वि]

मालकई मालकै-स्त्री (महानु) गोष्ट 'न पातां आपुलें वळ। मिया मालकै केली नवल।'-शिशु ७२६

मालकस-पु (संगीत) एक राग यांत षड्ज, कोमल गांधार, कोमल मध्यम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात जाति औडुव-औडुव वादी मध्यम संवादी षड्ज गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर [स मालकोश]

मालकांगु(गो)णी-स्त्री कांगोणीची एक जात, एक वनस्पती व तिचें बीज [स कुगुनी; हिं मालकागनी, गुज मालकांगणी, कों मिगवी]

मालकी-स्त्री (कों) गलबताच्या पटाणावरील तीन-चार फळयांच्या रांगा

मालकुडई-स्त्री तांदुळाची एक जात

मालखडी-स्त्री माल नांवाच्या मातीची खडूची एक जात हिनें लिहावयाच्या पाट्या इ० घासतात मालणें-मालमातीनें पाटी इ० घासणें

मालगण-पु (व) माळयाचा रहाळ 'मालगणांत जा'

मालगा-पु द्राक्षाची एक जात ह्यास सफेत विलायती असेंहि म्हणतात याचें वें अमेरिकेहून हिंदुस्थानांत आणविलें -कृषि ५१३

मालगोंडा-पु वरीची एक जात हिचें कणीस मोठें असून तांबूस असतें -कृषि २९२

मालगोवा-पु म्हैसुरकडील आंब्याची जात -कृषि ६८१

मालजा-स्त्री (माळवी) व्यवस्था दुरस्ती 'गोविंदराव हॉस्करचे हातून मालजा बरोबर होत नाहीं'-विक्षिप्त १ १३२

मालजादी-स्त्री वेश्या, रांड, कसबीण; वेश्याकन्या [फा मालझादा=रंडीपुत्र]

मालटी-स्त्री (हेट गो कु) एक प्रकारचें मातीचें लहान भांडें; परळ [माती]

मालण-न-स्त्री अतिशय सुंदर स्त्री 'मालणी केंकप्राशिनी विषाचा प्याला।'-अफला ५३ [स मालिनी]

मालणें-अक्रि मालवणें, विझविला जाणें (दिवा) [स म्लै]

मालती-स्त्री (कों) गाड्याचा (सुगडावर) ठेवण्याची मोठी मातीची पणती

मालती-स्त्री १ बाजरीच्या आकाराचा गव्हला, खिरीत घालण्यासाठीं गव्हाच्या सपीठाचा फुलामारखा केलेला एक पदार्थ 'ते घोटवे सरवळे अणि मालत्याला।'-सारुह ६ ७७. २ एक सुवासिक फुलझाड लावल्यापासून दोन-अडीच वर्षांनीं यास फुलें येतात फुलें बारीक व जरा वाकडीं असतात याचा बहर उन्हाळयांत असतो. फुलास मधुर वास येतो ३ एक वृत्त याच्या चरणांत अक्षरें १२ व न, ज, ज, र हे गण असतात [स]

मालदा शुंगट-पु रेशमाची एक जात -मुव्या १७

मालदांडी-स्त्री. जोंधळयाची एक हलकी जात याचें धाट लवचिक असून कणीस लहान असतें

मालदी-पु कुर्म्याचें लाह -पाक ५८

मालप(पु)वा, मालपु(पो)हा-वा-पु पीठ भिजवून तें चांगलें, फुगल्यावर कढईत तूप टाकून त्यावर तें ओतून दोन्ही बाजू तांबूस रंगाच्या झाल्यावर साखरेच्या पाकांत टाकून केलेले एक प्रकारचें मसालेदार व हलकें धिरडयासारखें पक्वान्न [हिं]

मालमी-स्त्री (नाविक) मराठयाच्या आरमारावरील दिशा दाखविणारें होकायंत्र मालीम-पु १ गलबतावरील मुख्य अधिकारी, नाखवा, सुकाणु धरणारा कप्तान [अर मुअल्लिम्]

मालव-पु १ (संगीत) एक राग, यास मारवा असेंहि म्हणतात मारवा पहा २ माळवा प्रांत [स] ०देश-पु माळवा प्रांत यांत इंदूर, उज्जनी इ० शहरें येतात

माल(ल्ह)वणें-अक्रि १ जाणें, विझणें (दिवा) २ (ल) संपणें, खालावणें, नाहींसें होणें (आजार, देवीच्या पुटकुळया, भरभराट इ०) [स म्लै] माल्हवण-न फुंकर, विझविणें माल(ल्ह)विणें-सक्रि १ विझविणें, फुंकणें (दिवा) २ नाहींसा करणें (वंश, कुल)

मालश्री-पु (संगीत) एक राग यांत षड्ज कोमल ऋषभ, तीव्र गांधार, तीव्र मध्यम पंचम कोमल धैवत तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति संपूर्ण-संपूर्ण वादी ऋषभ संवादी पंचम गानसमय सायंकाळ [स]

**मालश्री**—पु (संगीत) एक राग यात षड्ज, तीव्र गांधार, तीव्र मध्यम, पंचम, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति औडुव-औडुव वादी षड्ज संवादी पंचम गानसमय दिवसाचा चवथा प्रहर [ सं ]

**माला-लू**—पुस्त्री एक प्रकारची माती मालखडी पहा

**माळा**—स्त्री १ फुलांची माळ, कुसुममालिका २ मणी ओंवलेली दोरी, हार, स्मरणी ३ ओळ, पंक्ति [ सं ] ०दंड-पु पुष्पहार ' वरी ढळताति अलौकिक। माळादंड।'-ज्ञा ११ २२० [ सं माला+दंड ]

**मालिगौरा**—पु (संगीत) एक राग यात षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, तीव्र मध्यम, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति संपूर्ण-संपूर्ण वादी ऋषभ, संवादी धैवत गानसमय सायंकाल [ सं ]

**मालिनी**—स्त्री १ स्त्रियांची एक जाति, स्त्रियांच्या पद्मिनी, चित्रिणी इ० चार स्थूल वर्गांपैकी एक वर्ग चतुर्विधाजाति पहा २ एक गणवृत्त याच्या चरणात अक्षरें १५ आणि न, न, म, य, य हे गण असतात [ सं ] ०वसंत-पु एक औषधी मात्रा, रसायण यास सुवर्णमालिनी असेंहि म्हणतात [ सं ]

**मालिन्य**—न मळकेपणा, मलिनपणा, घामटपणा [ सं मलिन ]

**मालिस्त**—स्त्री ( डांगवेश ) माळ जमीन, एक वर्ष पडीत टाकून दुसऱ्या वर्षी लागवडीस आणलेली जमीन

**मालिस्त**—न १ कुटणें, ठेवणें २ तयार माल ३ चदी

**माली**—स्त्री ( कु ) पाच नावाची वनस्पति

**माली, महाला-ली-ल्या**—पु न्हावी, न्हाव्याची जात ' नखें चोखाळाया माल्या बोलाविती।'-वसा ८

**माली(ले)तुळस**—स्त्री एक वनस्पति रानतुळस व ही एकच

**मालीमर्दन**—न ( महानु ) तैलादि द्रव्यें शरीरास लावून केलेलें मर्दन, मालीश 'माली-मर्दना दीधली राया मुरारी।' -धवळेपू ६८१ [ मल्मर्दन ]

**माली(लि)श-स, मालिस्त**—स्त्री १ खरारा, घोड्याची चाकरी २ अंग रगडणें, चोळणें, चंपी

**मालुंड, मालुण**—पुन सापाची एक जात, दुतोंडें मंडुळ, माडुळ, पहा

**मालू(लु)म**—वि ज्ञात, माहीत ठाऊक मालूम करणें ' -शा १५ ३१ [ अर मअलूम ] मालू(लु)म(मा)त-माती-स्त्री १ घडलेल्या गोष्टींतील सर्व मुद्दे, कलमें, यच्चयावत् परिस्थिति (एखाद्या कृत्याची), कच्ची हकीगत २ माहिती ' माझी मालुमात हि लिहिणें '-पेद २१ ५५ माहितीचा कागद ३ पत्रांतील मजकूर -पया १८० ४ (भाषण, लेख इ० काचा) खोटपणा या पत्रात जें लिहिलें आहे हीं सर्व मालुमत आहे, हा मजकूर खरा नव्हे ' ५ मालूम केलेली, सांगितलेली सर्व हकीगत, अर्ज -वि खोटा, बनावट (दस्त ऐवज) ' बहुत कारकाईनें (खबरशी) करून मालुमातील असतील, निकामी तीं दूर करावीं '-वाडमा २ ४४ **मालूम दानद, मालूम मीदानद**-स्त्री (विशेषत सरकारी पत्रांतील) कळवितों, निवेदन करतों, माहीत करतों अशा अर्थाचा शब्दसमूह [ फा मआलूम मिदानद् ]

**मालें**—न दहाच्या फेडीकरिता, कुरणात पडलेल्या नांते वाइकाच्या सुटकेकरिता किंवा जप्त झालेली जमीन, वतन पुन मिळण्याकरिता गळ्यात नागर अडकवून दारोदार भिक्षा मागून द्रव्य मिळवणें (क्रि० मागणें) ' दाढाचा नागर गळ्यात। खाड श्मश्रु वाढलें बहुत। ब्राह्मण आला मालें मागत। करा साहित्य म्हणतसे।' ०करी-पु मालें मागत फिरणारा मनुष्य

**मालें-लू**—न १ एक प्रकारचा मऊ दगड, खडी मालखडी पहा २ (माल्याचे गोळे केलेले असतात यावरून) कणीक, लोणी, खवा इ० काचा गोळा, पुरणाची पोळी लाटावयाच्या पूर्वी आत पुरण भरण्याकरिता टवळ्याच्या आकाराचा केलेला कणकेचा गोळा; उंडा ३ गुळाची ढेप ४ राब, कावळी "अगे गुळासारिखे माल्याचे। हे बाध तरी एकाचि रसाचे।'-ज्ञा १० ३३ ५ (गो) मधीलमाशी, मधमाशी इ०कांचें घर, पोळें

**मालोणी-नी**—वि (ना व) बेचव, मचूळ (पाणी)

**माल्य**—न १ फूल २ हार, माळ, पुष्पमाला [ सं ] ०ग्रथन-न चौसष्ट कलांपैकी एक कला, हार गुंफण्याची, माला करण्याची कला चौसष्ट कला पहा [ सं माल्य+ग्रथन ]

**माल्हातणें**—क्रि १ अंगीकार, आश्रय करणें, जवळ करणें माल्हाती दार्ढ्य। आलस्याचें। -ज्ञा १४ १७९ २ आहारीं जाणें, प्रभाव पडणें ' ऐसें माल्हातिजे मोहें।'-ज्ञा १४ २५३ [ सं मल्ल्=युक्त होणें; जवळ असणें ]

**माव**—स्त्री १ कपट, कृत्रिमता, लबाडी २ गारूड, गौड बंगाल माया विश्वकर्मा येऊनि सत्वर। मावेचें रचिलें वैकुंठपुर।'३ खोटपणा, पोकळपणा, मायिकपणा बाह्यभक्ति मावचि करी।' -एभा २ ४९० ४ भ्रम ५ (गो) जखम बरी झाल्यानंतर राह णारा व्रण चिन्ह माव आसा =कुऱ्हाडीचा घाव आहे [ म माया ] म्ह० मावचें मयन धुरयाचें काजळ ०कर-री-वि मायावी, कपट करणारा ' ऐसा आतापी मावकर। कदीस दावी बहुआदर।' -रावि १३ १४५ ०खोर-वि कपटी जात स्त्रियांची माव खोर।'-गापा ८५ ०भक्ति-स्त्री खोटी भक्ति ' मावभक्ति ते नसावी किंचित।'-दावि ३२१ **मावा**-पु चित्ताकर्षकता, मोहिनी -शर [ स माया ] **माविक मायिय, मार्वा**-वि मायावी; भ्रामक, लाघवी ' परि तो मावियाचा राऊ।'-शिशु वको ६ ११

२१४ मावेचा-वि १ खोटा, कपटाचा, ल्याडीचा २ अवा स्तव, पोकळ, ढोंगीपणाचा ३ खोटें, ऐंद्रजालिक, मायावी मावेचा मृग-पु (मारीच राक्षसानें मृगाचें रूप धारण केलें होतें यावरून ल ) दिसण्यांत मोहक, मनोहर परंतु आंत पोकळ असी वस्तु मावेचें मंथन-न व्यर्थ उद्योग, फसगोष्टी फाफट पसारा, नसती उठाठेव

माव—स्त्री (गो ) फणसादि फळाचा दळदार भाग [माया]

माव-वो—पु (गो कु ) सासरा [मामा] मावडा-स्त्री (कु ) सासुरवाड [मामाचा वाडा (घर)]

मावडा—पु फिकट निळा रंग मावटी सुरली-न (विणकाम) फणीच्या एका घरांत चांचा धागा व एका घरांत मावडा असे उभार व आडवण सर्व काळे किनार फोणत्यादि प्रकारची, अशा प्रकारचें लुगडें

मावडी—स्त्री काहिलीतील उसाचा रस ढवळण्याचा लाकडी पळा

मावंडोळ—पु (गो ) आरया घणस, फोणस [माहूळ]

मावणें—अक्रि साठणें (मावयांत, अगेंत) माणें पहा 'आनंद तीचा हृदयीं न मावे।' [स मा=मोजणें]

मावंदें-धें—न काशीयात्रा करून घरीं आल्यावर गंगापूजन, देवास नैवेद्य समर्पण व ब्राह्मणभोजन इ० करावयाचा विधि समारंभ माउंदें पहा [स मा+वद]

मावरुख—पु एक वृक्ष

मावली—पु (कों ) कोळिष्टकें करणारा, रतुचें जाळें पसरणारा कोळी

माव(उ)ली—स्त्री १ आई किंवा आईप्रमाणें मानिलेल्या वृद्ध बाईस आदरानें म्हणतात गरीब, प्रेमळ धर्मशील स्त्री माउली पहा 'सुखीं प्रगट होय जी करि सुखी जना मावली। —केका ७३ २ (एडिवाळपणें) आईस म्हणतात 'धुव्रावीता माउली काय बोले। अम्ही देवासी नाहिं पुष्पिले।'—ध्रुवचरित्र ११ (नवनीत पृ ४११) ३ (-अव ) जलदेवता [स मा]

मावशी-सी—स्त्री १ आईची बहीण २ (अश्लील) ल्हान मुलींचें जननेंद्रिय ३ पूतनाराक्षसी [स मातृष्वसृका, प्रा माउसिआ, हिं मौसी काहीं भाषांत मासी] मावस-वि मावशीकडील आपल्या नात्याचीं माणसें (बहीणभाऊ इ०) यांच्या नावापूर्वी लावावयाचा शब्द ०बहीण-स्त्री मावशीची मुलगी ०भाऊ-पु मावशीचा मुलगा मावसा-पु मावशीचा नवरा

मावसाळें—न मिरवणूक (नवरदेव, मुंजा मुलगा, देव इ० यांची ) (क्रि० काढणें निघणें) [माणूस]

मावळ—न महाराष्ट्राच्या पश्चिमेकडील हद्दीचा व सह्याद्रीच्या पूर्वेकडचा प्रदेश जुन्नरापासून आरंभ होऊन हा पूर्वेकडे चाळीस पन्नास मैलापर्यंत पसरला आहे [मावळणें] चोवीस मावळें-न अव जुन्नरापासून चाकणपर्यंत घाटावरील बारा मावळें-१ शिवनेरी, २ जुन्नर, ३ भिमनेर, ४ घोडनेर ५ मिननेर, ६ भामनेर, ७ जामनेर, ८ पिंपळनेर, ९ पारनेर, १० सिन्नर, ११ संगमनेर, १२ अकोलनेर व पुण्यापासून शिरवळ पर्यंत कोंकणातील मावळें -१अंदर मावळ, २नाणे मावळ, ३ पवन मावळ ४ घोटणमावळ, ५ पौडमावळ, ६ मोस मावळ, ७ मुठे मावळ, ८ गुंजण मावळ, ९ वेळवंड मावळ, १० भोरखोरें, ११ शिवतर खोरें, १२ हिरडस मावळ इ० [स म्लै] मावळा-पु मावळ प्रदेशांतील इसम मावळी-वि मावळ प्रांतासंबंधीं, मावळांतील (वस्तु, माल)

मावळण—पु (राजा ) पश्चिमेकडील वारा

मावळंग-गा-लिंगी—स्त्री १ महाळुंगाचें झाड व त्याचें फळ महाळुंगें पहा [स मातुलुंग]

मावळण—स्त्री १ आत, आत्या, बापाची बहीण २ (कों) मामी [स मातुलानी] मावळा-पु मामा, आईचा भाऊ [स मातुल=मामा, प्रा माउओ=मावळा]

मावळणें—अक्रि १ अस्तास जाणें (सूर्य, चंद्र, आकाशस्थ तारे) २ (ल ) ओसरणें, नाहींसा होणें मरणें अदृश्य होणें (देवी, खरूज पुटकुळ्या, फोड) ३ पाकळ्या मिटणें (सायंकाळीं फुलांच्या) ४ (ल ) बुडणें, नाहींसें होणें मालवणें (कीर्ति, वैभव, धोरवी जीव) [स म्लै] मावळत-क्रिवि पश्चिमेकडे 'तू मावळत तोंड करून बैस' मावळत-ती-स्त्री मावळण्याची जागा, पश्चिम दिशा मावळती बाजू-स्त्री (माण ) पश्चिम मावळो सरणें-क्रि मावळावयास आणें मावळणें 'वा मावळो सरला दिवो।'—अमृ ७१८९

मावा—पु आटवून घट केलेलें दूध, खवा.

मावा—पु पिकावरील जंतु प्रत्यक्ष हे सध करून राहतात बहुतेक पिकावर मावा पडतो हे पानांतील रस शोषून घेतात -वि पिवळसर हिरव्या रंगाचा

माविजा—क्रिवि ऐवजीं बदली 'वकलातीचे माविजा तालुका द्यावा '—रा ५ १९५ [अर मुआवजा=बदली भरपाई]

माश—न चरित [फा]

माशि(शी)क—न मासिक पहा

माशावळण—न माशाच्या थव्याची चळवळ व क्षुब्धता मासेवळण पहा

माशी—स्त्री १ मक्षिका एक घरांत आढळणारा सपक्ष जीव कीटक २ नेम धरण्यास उपयोगी असें बंदुकीच्या तोंडावरच

माशीसारखें चिन्ह, मासरी, मखी [स मक्षिका, प्रा मक्खिआ, प मक्खी, सिं मखी, हिं गुज माखी, इं मछिमा, व माछी, फ्रेंजि मँखी] म्ह० (व) माशी पादली =माशी शिंकणें याअर्थी (वाप्र) **माशा उडवणें**-स्वस्थ बसणें **माशा खाणें-गिळणें** १ मूर्ख, गोंधळलेला, बावरा झालेला दिसणें २ गमणें, रेंगाळणें, चाचपडणें **माशा मारणें-मारीत बसणें**-निरुद्योगी बसणें **माशी लागणें**-१ दागिना इ०च्या वरील मुलामा, पातळ पत्रा झिजून आतील लाख दिसू लागणें २ एखादें काम चालू असता तें मध्येंच थांबणें, अडणें 'पण कुठें माशी लागली ?' -नाकु ३ ७७ ३ मळमळू लागून वांति होणें ०**शिंकणें**-(हानि किंवा अनर्थकारक गोष्ट घडून येण्यास क्षुल्लक कारण दाखविणाऱ्या माणसाच्या उपहासार्थ योजतात) हरकत येणें, अडथळा येणें (माशी शिंकणें ही गोष्ट अशक्य तेव्हा असेंच असंभवनीय कारण सांगून कार्य बंद ठेवणारास उद्देशून उपयोग) (**नाका-तोंडावरची**) **माशी न हालणें**-गरीब स्वभावामुळें कांहीं न बोलणें **माशीला माशी**-(नक्कल करिताना मूळच्या लेखात शाईवर माशी बसून डाग पडला असल्यास नक्कलेंतहि तसाच डाग दाखविणें यावरून ल) हुबेहुब, निच्चुक पण अर्थ न समजता नक्कल करणें **माशी हागणें**-क्रि जनावराच्या अंगातील व्रणावर कीड होण्याचीं चिन्हें दिसणें **गुळावरल्या माशा किंवा साखरवरले मुंगळे**-जोंपर्यंत गोडी (उत्कर्षाचे दिवस) आहे तोंपर्यंत मित्र म्हणविणार लोक **माशांचा वाघ**-पु माशा पकडणारा कीटक, कोळी

**माशी**—वि मासा नामक कालावधीं समासात संख्या वाचकासह योजतात जसें-एकमाशी-दुमाशी-तिमाशी चौमाशी

**माशी, माशीचें झाड**—स्त्रीन एक झुडप याच्या पानांचा पलिस्तर मारण्यात उपयोग करितात याला अतिशय लहान माशीसारखें फूल येतें

**माशू(शू)क**—स्त्री १ प्रिय प्यारी, रमणी २ रंडी, रख ी -वि प्रिय, कमनीय, रमणीय, सुंदर माशूक मज मुखचंद्र सुकुमार पुष्पाहून अरबा।'-प्रला २३० [अर मअशूक] **माशुकडा**-वि सुंदर

**माष**—पु १ उडीद २ (ज्वाहिरी धंदा) पाच आठ किंवा दहा रत्तींचें वजन [स] ०**तैल**-न एक औषधी तेल पिंपळमूळ, चित्रकमूळ पिंपळी रास्ना, वोट, सुंठ सैंधव यांचा कल्क व उडदाचा काढा यामध्यें हें तेल सिद्ध करितात हें अर्धांगवायूचा नाश करितें -योर १ ७६७ ०**पर्णी**-स्त्री मुगवणी **माषान्न**-न उडीदाचे शिजविलेले पदार्थ मासान्न. [स माष+अन्न]

**मास**—न अनेक माशांचा समुदाय -स्त्री (राजा) माशांचा थवा [माशी] **मासकी**-स्त्री (राजा वा) १ बंदुकीच्या टोंकावर नेम मारावयासाठीं असलेलें चिन्ह, रूण २ (वे) माशी **मासूक**-न (राजा) माशी, मक्षिका **मासूकमारा**-वि (राजा) माशी मरेल इतकें अतिशय जालिम. (तंबाकू, तपकीर, भांग इ०), चेटक्या किंवा अत्यंत दुष्ट व मारक दृष्टीचा (मनुष्य)

**मास**—पु मध्य, मधील भाग **मासावरील**-वि (गो) होडीच्या मध्यावरील, मधील (वल्हकरी)

**मास**—पु महिना बारा महिने पहा [स] (वाप्र) **मासपक्ष लागला-लोटला-सरला**-एक महिना किंवा सहा आठवडे लागल, लोटले इ० **मासपक्षाच्या आंत**-महिनापंधरा दिवसाच्या आत सामाशब्द-०**दान**-न दर महिन्यास द्यावयाचें दान ०**न्हाण-न्हाण-न्हाणें-चंदन**-न विवाहसंस्कारास एक महिना ज्या दिवशीं पुरा होतो त्या दिवशीं वधूवरास एकत्र स्नान घालण्याचा समारंभ, आठन्हाण पहा [स मास+स्नान] ०**पक्ष**-पु महिना-पंधरा दिवस [स मास+पक्ष] ०**वडा**-पु (कों) ग्राम दैवतसंबंधीं केलें जाणारें मासकृत्य **मासांत**-पुन महिन्याचा अंत, चांद्रमासाच त्रयोदशीपासून प्रतिपदपर्यंतचे दिवस, धुंकें दिवस [स मास+अंत] **मासिक**-न १ महिन्याचें वेतन २ प्रतिमासी निघणारें पुस्तक ३ वर्षसमाप्तीपर्यंत, दर महिन्यास मृतमनुष्याचें करावयाचें श्राद्ध -वि महिन्यासंबंधीं, महिन्याचा, दर महिन्याचें [स]

**मां(मा)स**—न शरीरांतील सप्त धातूंपैकीं एक [स मास, फ्रेंजि मस, पोर्तुजि मास] (वाप्र) ०**कसणें**-चांगलें खाणें वगैरेकरून मांस भाजणें सामशब्द-०**ओटी**-स्त्री बाहेर दिसण्यात मोठी पण दूध थोडें असी गाय, म्हैस यांची ओटी, कास ०**कंड-कण-गंड**-न (निंदार्थी) मास, विदारलेलें, छिन्नभिन्न होऊन तुकडे तिकडे पडलेलें मास, घायांतून, जखमेंतून लोंबणारें मांस किंवा आतड्याचा लोंबणारा भाग नासणारें, वाढ, सुरदाड मास [मास+कण] ०**कण**-न (कों) शिजविण्याकरिता केलेले मांसाचे तुकडे ०**कार**-पु (गो) मास विकणारा ०**कूट**-न (गो) मांसाचा तुकडा ०**कोथ**-पु मांसार्बुद, चरणारा व्रण ०**भरू**-वि दळदार, गरभर (फळ), चांगली भरलेली (करंजी, पुरणपोळी) ०**भक्ष**-वि मांसाहारी [स] ०**मच्छर**-न मास वगैरे **मा(मा)सल**-वि १ मासाळ मांसानें पूर्ण असें २ (ल) मांसभरू, पुष्ट **मासघा**-पु (व) मांसाचा किंवा झाडाच्या सालीचा अनुक्रमें मांसाच्या किंवा झाडाच्या जखमेवर वाढणारा भाग **मासव्रण**-पु मांसातील व्रण [स] **मामाळ, मासाळ-ला-वि** (प्र) मांसल, पुष्कळ मास असलेला 'एकें पीनावयव मांसाळें।' -ज्ञा ११ १३९ **मासागळा**-वि धष्टपुष्ट मांसल 'धष्ट पुष्ट मांसागळा।' -आमुदि २ ३१ **मांसार्बुद**-पु कर्कट रोग -राको

एकत्र होणें, मिलाफ, संबंध, मिश्रण, गट्टी २ संगम 'सागर सरिता जीवन एक । परी मिळणीं भजन दिसे अधिक ।' -एभा १९५ ३ संसर्ग, भेट, दृष्टी, संयोग, संबंध, मेळ 'सत्संगगुरूंचे मिळणीं निर्विकल्पकमळणी । विकासे ।' -एभा २६ ४३८ ३ एकरूपता 'कृष्णमिळणीं मिळाल्या । त्याही न फिरती ।' -तुगा १२८ ४ मीलन, एकत्र जुळणें, जमणें 'तदी तेही टाई मिळणी । समया साजवलुका रजनी ।' -ज्ञा १७ २९५ **मिळणीं मिळणें**-भेटणें, एकत्र येणें, संयोग-संगम होणें **मिळणीं मिळणींत-मिळणीस असणें-चालणें-मिळणें**-एखाद्याच्या तंत्रानें चालणें, मिळून जाणें, कह्यांत, ताबेदारीत असणें **मिळणीस मिळणें**-संगम होणें, एखाद्याशी मिळून जाणें **मिळणी होणें**-भेटणें **मिळणें**-अक्रि १ (द्रव्य, लाभ, नोकरी, पदवी इ०) प्राप्त होणें, हस्तगत होणें २ एकत्रित होणें, मिसळणें ३ एकरूप होणें, एकचित्त, एकजीव होणें, एकमत होणें ४ जुळणें, अनुरूप किंवा अनुकूल होणें, बरोबरीचें होणें, एखाद्याप्रमाणें-सारखें असणें ५ एखाद्याच्या बाजूचा होणें एखाद्या विशिष्ट पक्षाचा, मताचा, धोरणाचा होणें 'पाथासी नगुनिया मजा मिळ र ।' -माभीष्म १२ ५२ ६ भेटणें, भिडणें, टेकणें, गांठ पडणें; सम्मुख होणें; समोरासमोर येणें ७ सापडणें, आढळणें, दृष्टोत्पत्तीस येणें, दिसणें, पाहिलें जाणें ८ पकडींत येणें, धरू येणें; हातास येणें 'हा खिळा अवघड ठिकाणीं बसला, त्यास धरायला मिळत नाहीं' ९ शक्य होणें, शक्य असणें 'हें कुलूप मला उघडायला मिळणार नाहीं' १० (गा) रतिभावनेनें अंगीकार करणें ११ गुरफटलें जाणें अडकणें 'मिळना कदा कल्पनेचन मेळीं ।' -राम ५४ १२ नफा, फायदा होणें उत्पन्न होणें [सं मिल्=भेटणें] म्ह० मिळत नाहीं भीक तर वैधवी शोक **मिळून मिसळून वागणें** मिसळणाऱ्या घराण्याच्या, समतेच्या नात्यानें वागणें **मिळता**-वि जुळता, मिळणारा **मिळता काळ**-पु भरभराटीचा काळ प्राप्तीची वेळ मिळण्याचा काळ **मिळताऊ**-वि १ दुसरीच्या लोकांशीं लवकर मिसळून जाणारा दुसऱ्याशीं आपलें पटवून घेणारा २ जिंकणारा, मिळविणारा **मिळताव** पु १ प्राप्ती, मिळकत फायदा २ सामील होणें **मिळती वस्त**-स्त्री मिळविता येण्यासारखी वस्तु ज्याचा नुकसानभरपाई करता येईल असा माल 'पोर मिळवनीवस्त आहे परंतु आईबाप मिळवनावस्त नाहींत' [मिळणें+वस्तु]

**मिळमिळ(ळा)ट**—स्त्री (स्निग्ध पदार्थाच्या संयोगानें आलेला) गुळगुळीतपणा **मिळमिळां** -क्रिवि (राजा) गुळगुळ, आवाज न करता (रडणें) **मिळमिळाट** पु अतिशय गुळगुळीतपणा **मिळमिळीत** वि १ (वा) गुळगुळीत व तेलकट दिसणारें, असणारें २ बचव नीरस, मळमळीत (भाषण इ०)

**मिळवण**—न. १ भाकरी इ० तयार होण्यासाठीं तीन जात्या धान्याचें पीठ मिसळून पडते २ गुरांना खावयास घालण्याचें आंबोण ३ मिश्रण **मिळवणी**—स्त्री १ बेरीज; एकाच जातीच्या अनेक रकमा एके ठिकाणीं आणण्याची कृति २ बेरीज करावयाच्या रकमा, दुसऱ्यांत मिळविलेला पदार्थ ३ अनेक संख्या एकत्र करून आलेलें फल, बेरीज; एकूण संख्या ४ जमवणी, जुळणी, सफाईची जोडणी **मिळवणी वजाबाकी**-स्त्री बेरीज आणि वजाबाकी

**मिळाऊ**—वि १ मिळविणारा, कमाई करणारा २ मिळणारा ३ जुळणारा [मिळणें] **मिळून**-क्रिवि १ सहित, सोबतीनें, सह, एकत्र २ एकंदरीत, एकूण ३ जुळून

**मिळपाणी**—न १ मिश्रण करतांना घातलेलें पाणी २ पाणी घालून केलेलें मिश्रण [मिळणें+पाणी]

**मिळव(वि)णें**—सक्रि १ प्राप्त करून घेणें, संपादणें २ मिसळणें, एकांत दुसरें घालणें, मिश्रण करणें ३ संचय करणें एकत्र आणणें, करणें, बेरीज करणें ४ जुळण्यास, भेटण्यास, मिळण्यास लावणें, ताळा घेणें, जमवून पाहणें ५ नाहींसें, जिरून पोटीं पाडाव करणें 'स्नान करुनि पौर्जानीं मिळविले ।' -ऐपो २०९ ६ जिंकणें मन वळविणें सरशी करणें, वश करणें ७ कृतकृत्य होणें 'ही मागाहलेली ईश्वरी विद्या कागदी नावारूपाला आली की मिळविली' -गु ११ [मिळणें] **मिळवून पाहणें**-तुलना करणें, ताळा जमविणें

**मिळी**—स्त्री (कर) उंच गळ्याचा चरू

**मी**—सना बोलणारा स्वतः [सं अस्मद्] म्ह० मी हासतों लोकाला शेंबूड माझ्या नाकाला (बाप्र) **मी म्हणणें**—ओरात असणें, स्वतःचा प्रभाव दाखविणें 'त्या वेळीं मी कमचा घरा बाहेर पडतों तेव्हां पाऊस मी म्हणत होता' **मीमी म्हणणें-चालणें**-स्वतःच्या कर्तृत्वाची बढाई मारणें, ऐट मिरविणें, गर्व वाहणें, अहंपणा दाखविणें 'जितां बोल्नी सर्वही जीव मी मी ।' -राम १५ 'मिल्याशीं सामना करावयास कोणीहि पुढें जाईनात, मी मी म्हणणार सारे पहिलवान कचरू लागले' **मीचें घर खालीं असणें**-गर्वाचें मीपणाचें घर खालीं असणें **मीतूं**-अ द्वैतभाव दुजाभाव आपुलकीचा अभाव 'नाहीं तें नाहविलें जणों । मी तूं जगीं ।' -ज्ञा १५ २८० **मातू करणें-मातूवर येणें**-हमरीतुमरी करणें, भांडणावर येणें **मीपण-पणा**-नपु १ अहंता गर्व मगरूरी २ ब्रह्मापासून मी निराळा असल्याची जाणीव, अहंपणा

**मींजुम्ला**—पु समुदाय [फा]

**मीट**—स्त्री मिटलेली स्थिति, डोळ्यांतून पू आल्यामुळें, चिपडामुळें डोळ्याची चिकटून राहिलेली स्थिति, झाकलेली स्थिति [मिटणें]

**मीटफळ्यो**—स्त्रीअव (गो) आट्यापाट्याचा खेळ.

**मीटर**—पु (पाणी, वीज, गाडी इ०) मोजण्याचें यंत्र मापनयंत्र [ इं ]

**मीटिमीटि**— क्रि (महानु) टक्मक पाहणें 'मीटिमींटि स्वर्गदेवा। पाताळीं पीयूषाचा ठेवा।'–ऋ ८१ [ ध्व ]

**मींठ**—पु (ढोराचा धंदा) एक जातीचा निवडुंगावर वाढणारा वेल याने चामड्यावरील केस जातात

**मीठ**—न १ लवण, क्षार मीठ ही पांढऱ्या रंगाची खारट वस्तु असून मनुष्यमात्राम अत्यंत आवश्यक अशी आहे बरेचसें मीठ समुद्राच्या पाण्यापासून करतात मिठाच्या कांहीं खाणीहि आहेत २ (वर. आट्यापाट्या) लोण (क्रि० आणणें) [ स मिष्ट=रुचकर ] (वाप्र) ०घालणें–१ पिठांत मीठ घालणें, चव आणणें, गोडी आणणें, पुष्कळशा मोठ्या साठ्यांत थोडीशी भर घालणें, पुष्कळ असून आणखी थोडीशी अपेक्षा असेल अशा ठिकाणीं जरूर ती भर घालणें २ महत्त्व देणें, पर्वा करणें, ठेवणें, भीक घालणें 'ते दुनळ्या भटभिक्षुकांना मीठ घालतील कीं काय!'–नि १०६८ ०**मोठें खारट असणें**–कडक किंवा करडा धनी असणें, मालक मोठा कठोर असणें ०**तोडणें**–मीठ कमी करणें, खावयास कमी घालणें 'मुलास मुलगी माठी झाली तर तिचें मीठ तोडणें ०**देणें**–चामडें वठीव करण्याकरितां त्यास मीठ लावणें (**अंगास**)**मीठ मोहऱ्या लागणें**–रागावणें, क्रुद्ध होणें, संतप्त होणें सामाशब्द- ०**कणी**–स्त्री. लावून परी आल्यानंतर दृष्ट काढण्याचें मीठ, मिठानें काढलेली दृष्ट ०**बंदर**–न मीठ उतरण्याचें बंदर ०**भाकर-भात**–स्त्रीपु गरीबीचें जेवण (विशेषत यजमान आपण दिलेल्या जेवणासबंधी विनयानें असें म्हणतो) ०**मसाला**–पु मीठ व मसाल्याचे सर्व जिनस, पदार्थास चव आणणारे पदार्थ ०**मोहऱ्या**–स्त्रीअव. दृष्ट काढण्याचें साहित्य ०**मोहऱ्या ओवाळणें**–दृष्ट काढणें ०**लोणारी**–पु मीठ वगविण्याचा धंदा करणारी एक जात व त्या जातीचा मनुष्य **मीठारंग**–पु मोत्याचा पिवळट गुलाबी रंग

**मींण**—पु (गो) जार

**मीत्री**—स्त्री (प्र) मैत्री, सख्य 'पराव्यासीं करी मीत्री।'–दा २ १ १४ [ स मैत्रि ]

**मीन**—पु १ मासा, मत्स्य २ मेषादि राशींपैकीं बारावी रास या राशींत पूर्वाभाद्रपदा नक्षत्राचा एक चरण व उत्तराभाद्रपदा आणि रेवती या नक्षत्राचा समावेश होतो [ स मी=मारणें ] ०**केतन**–पु माशाचें चित्र असलेलें निशाण ज्याचें आहे असा मदन, कामदेव [ सं. ]

**मी(मि)नणें**—अक्रि एकत्र होणें 'मीनती दादिया पासीं। राउळींचे या।'–शिशु ५०५ २ प्राप्त होणें मिळणें 'का वृक्षाची साउली। वाटे जातां मीनली।'–ज्ञा १३.५९४ ३ भेटणें, गाठ पडणें 'तैसें सत माहर माझें । तुम्ही मिनलिया मी लाडैजे।'–ज्ञा १५ ५९७ [ मिळणें ]

**मीना**—पु मिना पहा १ निळा रंग २ दातावरील लुक्ण. ३ नीलमणी ४ स्वर्ग [ फा ] ०**बाजार**–पु वस्तूंचे प्रदर्शन

**मीमांसा**—स्त्री १ षड्दर्शनांपैकीं पाचवें दर्शन, याचे दोन भाग आहेत–पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा किंवा वेदांत पहिल्यामध्यें कर्मकांड व दुसऱ्यांत ज्ञानकांड विवेचिलें आहे २ चर्चापूर्वक जाणण्याची इच्छा खोल विचार; चिकित्सा [ स मान्=चौकशी करणें ] **मीमांसक**–पु कर्मकांडवादी जैमिनीचे अनुयायी. **मीमांसक मार्ग**–पु कर्मकांड 'ह्या प्राचीन कर्मकांडास पुढें मीमांसकमार्ग असें नांव मिळालें'–गीर २८८

**मीर**—पु (व) रुई, कपाशी मोजण्याचा कांटा

**मीर**—पु १ (गंजिफा) दशावतारी गंजिफांतील प्रत्येक बाजूचा, रंगाचा राजा २ उमराव, अमीर, सरदार, राजा [ फा मीर, अर अमीर ] ०**अदल**–पु न्यायाधीश [ फा मीर-इ-अदल् ] ०**ज्या**–पु (माण) सर्व मेंढक्याचा पुढारी ०**पीर**–पु थोर, अनुभविक, स्वतंत्र अधिकारी, बडा मनुष्य 'साराश फौजेंत ताळ नाहीं सारेच मीरपीर आहेत'–ख ५ २३८०. [ फा ] ०**शिकार**–शिकारीवरील अधिकारी 'मीर शिकार पाखरें धरून आणावयास पाठविले असेत'–ब्रप ११८ [ फा मीर–इ–शिकार ]

**मीर शेंग**—स्त्री. मिरची

**मीलन**—न १ मिश्रण, मिसळण, एकांत एक मिसळणें २ भेट, भेटाभेट ३ एकत्र जमणें, एकत्र येणें, मिळणी, संबद्ध होणें ४ एकत्र मिसळून जाणें, मिटून जाणें, ऐक्य, एकी. ५ उघडझाक ६ खग्रास ग्रहण [ स मील्=मिटणें, झाकणें, मिचकावणें ] **मीलनोन्मीलन**–न उघडझाप, मिटणें आणि उघडणें 'देविसी दिठी पाहतां सानी। तऱ्ही मीलनोन्मीलनीं।'–ज्ञा १७५ **मीलित** वि १ मिश्रित मिसळलेला, एकत्र केलेला २ भेटलेला ३ एकत्र जमलेला, मिळालेला ४ विशिष्ट बाजूस मिळवून घेतलेला, वळविलेला [ स ]

**मीस**—न मिष पहा

**मीळ**—स्त्री १ (अशिष्ट) प्राप्ती, नफा, फायदा, मिळकत २ मिळणी [ मिळणें ] ०**जोड**–स्त्री लाभ, तडजोड 'साराश मीळजोड स्वामींच्या आशीर्वादें होईल'–पया १०

**मुआझिन**—पु प्रार्थनेस बोलाविणारा [ फा ]

**मुकटा**—पु सोंवळ्यांत नेसावयाचें रेशमी किंवा तागी वस्त्र [ का मुट्टु=शिवणें ? ]

**मुकटी**—स्त्री (गो) बदुकीचें तोंड

मुकण-णा—नपु १ निःसत्व व हलका असलेला कडधान्याचा दाणा; असा दाण्याची रास २ (व्य) शिजविल्यानंतर किंवा भिजविल्यानतर टणक राहिलेला दाणा घाड, -वि उदास, उदासीन वृत्तीचा [मुका+दाणा] ०हत्ती-पु १ बिन सुळयाचा हत्ती, दंतहीन हत्ती २ (ल) टेंगू व ठेरपोटपा इसम मुकणी-तूर-स्त्री किडकी तूर, रोगट दाणा असल्यामुळें नासून जिची चामली काळ होत नाहीं अशी तूर

मुकणें—सक्रि गमावणें, न मिळणें, अतरणें, हानि पावणें 'तरि दर्तो शाप तुला, विजय न घडतो हिताश मुकतास।' —मोभीष्म १८९ [स मुच्=सोडणें]

मुक(कु)दर्णे—अक्रि (ना) १ गुदमरणें २ आवर्णे

मुकदम, मुकद्दम मुकादम, मोकदम—पु १ पुढारी, म्होरक्या; मजुरावर देखरेख करणारा २ गांवपाटील, गावकऱ्यांचा मुख्य, वतनदार ३ वरामुखाच्या खालच्या हुद्याचा गावकामगार [अर मुकद्दम] मुकद्दमी—स्त्री मुकादमाचे हक्क किंवा हुद्दा

मुकद(द्द)मा मोकदमा—पु १ काम, प्रकरण, बाब २ खटला (दिवाणी किंवा फौजदारी) (ना) मुकरदमा 'नबाब गुरगुटे याचा मोकदमा फैसल करून '-ख ११९४ [अर मुकद्दमा]

मुकंदम—पु (निदार्थी) मुका मनुष्य [मुका]

मुकदर—वि नियुक्त, नियोजित, कायम केलेला, नामजाद 'आवाजीकृष्ण या कामावर मुकदर असोन '—रा ५ १९७. [अर मुकद्दर्=ईश्वरनियोजित]

मुकय्यद—वि कायम, पक्का 'या कामावर मुकय्यद राहून -पया ४६६ [अर मुकय्यद्]

मुकरणें—न वाचाळता, बडबड 'जाती प्राणे प्रमाणें करिति मुकरणें पै न देतील नाणें।' —अकक २, सुदामचरित्र ७० [मुखर]

मुकरर, मुकर्र, मक्रर—वि १ निश्चित, नेमलेला ठरविलेला २ नक्की, नियोजित -क्रिवि खात्रीनें निश्चयानें, पुन्हा पुन्हा 'मुकर त्याहावें याची इजाजत नाहीं' —पया ४७६ [अर मुकर्रर्]

मुकलस्त—वि (व) मनमानेइतका, मुबलक, वाटेल तितका [स मुक्त'] मुकलस्ती—स्त्री (व) १ मुबलकता २ मोकळीक, स्वैर वर्तन

मुकशी—स्त्री (राजा) टोंक अग्र, अखेरचा भाग, तीक्ष्ण अग्रभाग [स मुख]

मुकसणी—स्त्री (गो) सपादणी

मुकसी—वि सोनेरी बुटीदार, सोनरी बुट्टया किंवा टिपके असलेलें 'चिरे मुकसी' -वाडसमा १ १९ मुकस-सी पहा

मुकसुर्चें—अक्रि (गो) लाच घेणें, खाणें [मुखशुद्धि]

मुक(कु)ळित—वि १ स्पष्ट २ संक्षिप्त 'हे सांख्यस्थिति मुकुळित। सांगीतली तुज एथ।' -माज्ञा २ २१ [स मुकुलित]

मुका—पु चुंबन (क्रि० घेणें) [प्रा मुख]

मुका—वि १ बोलतां येत नसलेला, न बोलणारा, वाचा नसलेला २ रागानें किंवा हिरवटपणानें बोलत नाहीं असा, स्तब्ध ३ दांत नसलेला ४ तोंड नसलेलें (गळू, फोड) होकें किंवा तोंड नसलेला (नारू) ५ न वाजणारा, अगदीं कोंवळा, आत गर नसून पाणी भरलेला (नारळ) ६ घाड, न भिजणारें जाणारें, मोड न येणारें (कडधान्य) ७ न उमललेली, न फुललेली (कळी) ८ आवाज न करता चालणारें (रहाटगाडगें, चरक, यत्र इ०) [स मूक, का मुक्तु मुद्दु] म्हण मुक्याच मनीं मगळवार (मगळवारीं कोणताहि वत करू नये अशी समजूत आहे त्यावरून) (वाप्र) ०मुलगा होणें-प्रथम न्हाण येणें ०रहाणें-(बागलाणी) गप्प बसणें मुकावणें-मुके होणें स्तब्ध बसणें 'मुकावल्या वदधुना। —र भा ११८ सामासशब्द— ०गोवर-पु ज्यात अगावर पुरळ पुरळ येत नहीं असा गोंवर ०दंद-पु मुका दावा पहा ०दावा-पु गुप्त द्वेष, इक. ०नारळ-पु कोंवळा असल्यामुळें न वाजणारा नारळ ०मार—मारा-पु १ वैरामुळें किंवा दुष्टपणानें जादूटोण्याच्या योगानें किंवा शापानें केलेला गुप्त नाश हानि २ पुराव्याला काहीं खुणा वगैरे राहाणार नाहीत असा दिलेला अगावर मार ०मेंद—म्हसोबा, मुकी मण्यार-पुस्त्री. (निंदार्थी) हिरवट, तिरसट मनुष्य मुकी अर्जी-स्त्री एखादाची नालस्ती करण्यासाठीं बिन सहीचा किंवा खोट्या सहीनें केलेला अर्ज मुकी कमान-स्त्री चपटी कमान मुकी वस्तु, मुकें जनावर-स्त्रीन गाय म्हैस इ० जनावरें 'मुकी वस्तु निघालें मारी।' -दा २ १.६६ मुकें गळूं-न तोंड न पडलेलें गळू ०गाळ-न एक मुलींचा खेळ ०दंद-मुका दावा पहा ०फळ-फूल-पान-न कोंवळें किंवा पक्व न झालेलें फळ, न उमललेलें, कळीच्या स्थितींत असलेलें फूल, पान ०फुल-न एक मुलींचा खेळ ०भिजाणे-पुअव भिजलेले परतु मोड न फुटलेले दाणे (हरभरा पावटा इ०चे) मुकाणा-पु मुकणा पहा

मुकाट्या मुकाट्यानें-नीं—क्रिवि गपचीप, न बोलता स्तब्धपणें, शातपणें

मुकादम-मी—मुकदम-मी पहा.

मुकाव(बि)ला मोकाबला—पु १ पडताळा मासला २ तुलना, शर्यत (क्रि०करणें) ३ गाठ लढाई, विरोध, युद्ध, तोंड देणें 'त्याचा याचा मुकाबला होऊन लढाई सुरू झाली।' -भाव ७९ [अर] मुकाबिले मुकाबील-क्रिवि समोर 'पुन्हा नबाब बहादराचे मुकाबिले उभे न रहात' -रा १९

**मुका(क्का)म**—पु १ थोडा काल राहण्याची, उतरण्याची, तळ देण्याची जागा, आश्रयस्थान, आसरा, विश्रांति घेण्याचें ठिकाण २ रहाणें, अवस्थान, तळ देणें, एखाद्या ठिकाणीं थोडा वेळ थांबणें ३ वास्तव्याचें ठिकाण, वस्ती बिऱ्हाड, राहण्याचें गाव उदा० (पत्रांतून) मु पुणें, मुंबई इ० ४ (ल) कुंठितावस्था, विश्रांति, टप्पा, पायरी, मध्यंतरींचें थांबणें [अर मुकाम्]

**मुकामात, मुक्कामात**—स्त्री वस्ती, राहणूक 'शहरच्या पूर्वेस चारा आहे तेथेंच मुकामात करावी' –रा १ १५६ [अर मुकामत्]

**मुकासा, मुकासाई**—पु मोकासा, माकाशी पहा

**मुकुट**—पु किरीट, टोप, राजाचें, देवाचें शिरोभूषण, शिर ताज [स] ०मणि–पु १ मुकुटातील रत्न २ (ल) नायक, पुढारी, नेता, अग्रगण्य, अग्रेसर, मुख्य इसम **मुकुटाभरण** न राज्याभिषेक

**मुकुर**—पु आरसा, दर्पण [स]

**मुकुल**—पुन १ मोठा कळा, कळी (उमलणारी) २ कमळ, ३ घोड्याच्या कपाळावर जाईच्या कळीप्रमाणें असलेला भोंवरा –अश्वप १ ८५ [स] ०दृष्टि–स्त्री (नृत्य) पापण्या स्फुरण पावण्यास लावणें अशा दृष्टीचा अभिनय, झोंप, स्वप्न व सुख दर्शित करतो **मुकुलित**–वि १ पूर्ण न उमललेलें (फूल), अर्धवट मिटलेले (डोळे) २ (ल) संक्षिप्त, थोडक्यात **मुकुलणें**–अकि वद ठेवणें, करणें, आवळून घेणें 'परि तो रसातिशयो मुकुळी। मग प्रमार्थदीप उजळी।' –ज्ञा ५ १४२ [स मुकुलित]

**मुकेस**—पु सोन्या–चांदीची बारीक तार, सोनेरी–रुपेरी वर्ख इ० चा तुरा **मुकेस–सी**–वि जरतारी, भर्जरी, सोनेरी तुऱ्याचें 'टिवट सुनडी समेत बतनाव तुरा मुकेसी' –वाडसमा १ ११९ [अर मुकय्यश्]

**मुक्कर**—क्रिवि खचित, खरोखर, निश्चयानें, न चुकता खास [अर मुकर्रर्]

**मुक्की**—स्त्री बुक्की, मुष्टियुद्ध [स मुष्टि]

**मुक्त**—स्त्री १ मुक्ति, मोक्ष २ मृत्यु (क्रि० पावणें) 'मुक्त पावले साहेबनाना कशा करग्या दवा तडातोडी। –ऐपो १३२ –वि १ मोकळा, सुटलेला, सोडून दिलेला २ परब्रह्मांत मिळून गेलेला, मोक्षाप्रत गेलेला प्रपंचादि बंधनापासून सुटलेला ३ फेंकलेलें, सोडलेलें (अस्त्र इ०) [स मुच्=सोडणें] ०कैवल्य–न ज्ञानाची ऐक्यस्थिति 'विवहुना ऐसेसें। मुक्तकैवल्य सुदिवसें। –ज्ञा १६ १३ ०क्रिया–स्त्री वेदाच्या आधाराशिवाय केलेली गोष्ट धर्मबाह्य वर्तन स्वैराचार 'मुक्तक्रिया प्रतिवादी। तो येक पंडितमुर्खे।' –दा २ १० ४ ०छंद–पु ताल खरीज छंदाच्या इतर नियमांनीं बद्ध नसलेला छंद ०द्वार–न १ जाण्यायेण्यास प्रतिबंध नसलेलें दार, हवें त्यानें जावें यावें असें ठिकाण २ कोणासहि जेथें जेवणास प्रतिबंध नाहीं असा भोजनसमारंभ ०मार्ग–पु वेदबाह्य मार्ग, स्वैर वागणुकीचा मार्ग ०मुद्रा–स्त्री. १ सर्वत्र चालणारें नाणें, अप्रतिहत मुद्रा २ मोत्याची आंगठी, मोत्याच्या आंगठीचा ठसा, शिक्का 'आतां गीतार्थाची मुक्तमुद्रा। लावीन जिये बांगडी।' –ज्ञा १८ २७ मुक्ता+मुद्रा] ०स्वर–पु (संगीत) सुटा स्वर पहा

**मुक्त**—न मोतीं [स मुक्ता प्रा मुत्त] ०लग–पु मोत्याचा सर –वि मोतीं लाविलेला, मोत्यांनीं गुंफलेला 'शुभ्र वस्त्र मुक्तलग कांचोळी।' –ह २३ २६ [मुक्ता+लग्न] **मुक्ता**–स्त्रीन मोतीं [स] ०गर्भ–पु मोत्यांतील मध्यवर्ती पदार्थ, ज्याच्या भोंवतीं मौक्तिक रसाचे थर बसून मोती तयार होतें तो पदार्थ ०जाल–न. १ मोत्याची जाळी, डोक्यांत घालण्याचा स्त्रियांचा एक दागिना, बिंदी २ मोत्याचा झुबका ०फळ–ल–न १ मोतीं २ मोत्यासारखें सुंदर अक्षर ३ सीताफळ ४ (ल) मुखासारखे बोललेले उद्गार, हास्यास्पद भाषण. ०फळी–स्त्री नाकांतील मोत्याचा दागिना नथ, "मुगबट नासिकीं मिरवे मुक्ताफळी।' –कथा ३ ११ ९५

**मुक्तसर**—पु हक्कदार किंवा कामदार नव्हे असा वतनदाराची पदवी मक्तसर पहा

**मुक्ता**—क्रिवि तोंडीं

**मुक्ता**—वि पुष्कळ

**मुक्ताभरण**—न एक विधि,संस्कार,(प्र.) अमुक्ताभरण पहा•

**मुक्ति**—स्त्री १ मोक्ष जीव आपल्या मूळच्या परमात्म स्वरूपास पावून त्या निवाची जन्ममरणापासून सुटका होणें मुक्ति चार प्रकारच्या आहेत –सलोकता, समीपता, सरूपता, सायुज्यता २ मुक्त स्थिति मोकळीक, स्वातंत्र्य, सुटवणूक; मोकळें सोडणें ३ (ल) मृत्यु 'मुक्तीनें वोढिलें काळाचें घर।' –ऐपो ३३१ [स मुच्=सोडणें] ०पद–न मुक्तीचें स्थान, विदेही स्थिति (क्रि० मिळणें प्राप्त होणें) ०मार्ग–पु मुक्ति मिळविण्याचा मार्ग मोक्ष मिळविण्याचें साधन

**मुक्ती, मुक्तीफल**—स्त्री (वे) ज्यामध्यें रहाटाच्या खाचण्या उभ्या बसवितात ते विहिरीजवळचे दगड प्रत्यकी [का]

**मुक्त्यार–री**—मुखत्यार मुखत्यारी इ० पहा

**मुक्बरा मुकरबा**—पु समाधिमंदिर थडगें [अर मुक्बरा]

**मुक्रर**—अ मुकर्र पहा **मुक्ररा**–पु ठराविक रकम, सारा बाकी आबाद देह मुकरा रु १८० ' –रा १५ ९३ [अर मुकर्रा]

**मुग्री**—स्त्री (गो) काजूच्या खेळांतील एक विशिष्ट संज्ञा मुकर, कायम केलेला नियम, अन्

**मुक्स, मुकस**—न (अशिष्ट) तोंड, मुख 'पुढें यांच्या मुक्सातून वाक्स काय निघनात. —विक्षिप्त १ ६३ [सं मुख] **मुकसांतून वाकसं काढणें-निघणें**-बोलणें, शब्द काढणें

**मुक्सी**—पु घोड्याचा रंग, पाढऱ्यातकाळे ठिपके असलेला रग, अशा रगाचा घोडा चागला समजतात —अश्वप १ ३१

**मुक्सुद**—न विनति, अर्ज मस्सूद पहा [अर मस्सूद]

**मुख**—न १ तोंड, ओठ, दाताचीं मुळें, दात, जीभ, टाळा गाल व गळा या सात अगाच्या समुदायास मुख म्हणतात —योर २ ४४८ २ पक्ष्याची चोंच ३ चेहरा, मुद्रा, तोंडवळा ४ (ल) द्वार, वाट, मार्ग, एखाद्या इमारतीचें द्वार ५ एखाद्या कामाची सुरवात इतर लाक्षणिक अर्थ तोंड या शब्दात पहा ६ साधन, करण, उपाय, हत्यार 'ज्ञानाग्नीचेनि मुखें। जेणें जाळिलीं कर्मे अशेखें।'—ज्ञा ४ १०५ ७ (सामासिक शब्दात) अग्रभाग, मूळचा भाग, मूळवस्तु, मुख्य मनुष्य, पुढारी, अग्रेसर ८ नदी समुद्राला मिळते तो भाग, स्थल. ९ (सोनारी धदा) पोचे काढण्या साठीं लोखडी पहारेचें टोंक वळवून त्याच्या शेवटीं मुखाकृति केलेला भाग १० गणितश्रेढीतील पहिली सख्या ११ चतुष्कोणाच्या पायाच्या विरुद्ध बाजू [स, फ्रेंनि पोतुं जि मुई] म्हु० (सं) मुखमस्तीति वक्तव्यम्। (तोंड आहे म्हणून वाटेल तें बोलावें) सामाशब्द– ०**कमल-चंद्र**–न पु (काव्य) कमलाप्रमाणें किंवा चद्राप्रमाणें सुदर असलेलें तोंड ०**चर्या, मुखावरची चर्या, मुखकळा**–स्त्री. तोंडावरील ओज, तेज ०**चालन**–न (गायन) रागोचित गमक व अलकार याचा यथोक्त प्रयोग करून गायन करणें ०**छिद्र**–न ज्वालामुखीचें तोंड, हें कटईसारखें असतें ०**जड**–वि निबोल्या, कमी बोलणारा 'बोलोंचि नेणे मुखजड। तो येक मूर्ख।'—दा २ १ ४९ ०**जवानी**–स्त्री तोंडी हकीकत ०**जबानीनें**–क्रिवि तोंडीं, तोंडानें बोलून [स मुख+फा जबान्=वाचा] ०**टी**–स्त्री मुख, तोंड 'पाहिली ब्रह्मयाची मुखटी'।—कथा ७ ११ ५५ ०**टोप**–पु (काव्य) शिरस्त्राणाचा तोंडाकडील भाग **मुखंड**–वि मुख्य, पुढारी, प्रमुख, नायक म्होरक्या **मुखडा**–पु चेहरा, तोंडवळा 'मुखडा पाह्या उभी राहते धाव लिया।'—सला ३५ [हिं] **मुखदाक्षिण्य**–न १ भाषणशैली, वक्तृत्व, वाक्पाटव, शब्दचातुर्य २ मुखसंकोच, एखाद्याच्या आदरार्थ किंवा भावनाविष्काराकरिता बोलण्यास घातलेला आळा ०**दुर्बल-ळ**–वि वेळेवर विशेष बोलतां येत नसलेला, वाग्मिताचा कमताळा असलेला, मितभाषी, बोलण्यांत भित्रा ०**दूषिका**–स्त्री अव मुरुम, तारुण्यामुळें तोंडावर उठणाऱ्या पुटकुळ्या ०**पट्टा**–पु १ घोड्याच्या तोंडावरील पांढरा पट्टा २ घोडा निघ घालून धमण्याकरतां सज्ज केला असता त्याच्या तोंडावर येणारा चामड्याचा पट्टा; म्होरकीचा भाग ०**परीक्षा**–स्त्री (वैद्यक) तोंडात उत्पन्न होणाऱ्या चवीवरून करावयाची त्रिदोषपरीक्षा. वातदोषानें तोंड गुळमट होतें, पित्तानें तिखट किंवा कडू होतें आणि कफदोषानें आबट, मधुर असें होतें —योर १ २५. ०**पाक** पु तोंड उतणें, या रोगानें तोंडात, गालफडात, जिभेवर ल्हान ल्हान फोड येतात व ते फुटून त्याच्या योगानें पिवळे अथवा पाढरे चट्टे पडतात —गृहवैद्य ४१ ०**पाठ**–वि तोंडपाठ, मुखोद्गत ०**पृष्ठ**–न पुस्तकाचें पहिलें पान, पुस्तकाचें अगदीं बाहेरील पान, (याच्यावर पुस्तकाचें नाव इ० छापलेलें असतें). (इ) कव्हर ०**प्रिय**–वि १ शरीरपोषक नसता फक्त जिभेला गोड लागणारा (पदार्थ) २ सार्थ व पोषक असें तोंडास वीट न आणणारें, चवदार लागणारें (अन्न) ०**भंजन**–न एखाद्याचा नक्षा उतरणें, लाजविणें, रग जिरविणें, खाड मोडणें, घ बरविणें [स भञ्ज्=मोडणें] ०**माधुर्य**–न ज्यामध्यें फार बडबड-ण्याची व पुष्कळ खाण्याची इच्छा उत्पन्न होते असा एक वातविकार ०**मार्जन**–न १ तोंड धुणें २ (ल) रागावलेल्या माणसाची गोड व प्रेमाच्या शब्दांनी केलेली मनधरणी ३ एखा-द्याची त्याच्या तोंडावर खरडपट्टी काढणें; शिवीगाळ ४ मुख-माधुर्य ०**र**–वि १ बोलका, बडबड्या, तोंडाळ, फटकळ २ आवाज काढणारा, सनाद, वाजणारा. ३ पुढारी, म्होरक्या 'मुखरस्तत्रहन्यते' (स) **मुखरत्व**–न बडबड, वाचाळता. ०**रंग**–पु मुखराग पहा ०**रण, मुखरीण-रणी**–वि. मुख्य, प्रमुख, पुढारी 'हरें तोयें केलें मुखरण तुला कीं रणतरी।' —वामन, विराट ७ १६१ ०**रस**–पु १ लाळ, थुकी २ (ल निदार्थी) अनिष्ट भाषण, दुर्भाषण (क्रि० पाघळणें, गळणें) ०**रा**–पु (ना) नथ सर्ज्याची ०**राग**–पु १ तोंडावरील तेज, तजेला, काति २ (नृत्य) निरनिराळ्या भावाच्या वेळीं दाखविलें जाणारें तोंडावरील तेज हे चार प्रकारचे असतें– स्वाभाविक, प्रसन्न, रक्त व श्याम ०**रोग**–पु १ तोंडास होणारा रोग २ चेहऱ्यासबधीं रोग मुखरोग एकदर ६७ आहेत म्हु० आवयाला आठ पाड कावळयाला आला मुखरोग ०**रोगी**–वि १ मुखरोगानें पछाडलेला, मुखरोग झालेला २ (ल) दुर्मुख लेला, खिन्नवदन, खाणें पिणें व मडळींत बसणें नाकारणारा, नाव ठणारा ०**वट-वटा-वटो, मुखोटा**–पु १ तोंडवळा, चेहरा, तोंड 'इच्छा इच्छुनी पाहती मुखवट।'—दावि ८ २ चांदी, सानें इ०ची देवाच्या मूर्तीवर लावण्याकरतां केलेली फक्त तोंडा चीच प्रतिमा, (४) मुखवट पौराणिक नाटकांतील गणपती, रावण नारसिंह इत्यादींचीं सोंगें बनविण्याकरिता त्याच्या चेह त्याच्या कामदाचा रगदा वगैरच्या आकृती करीत त्या ३ मुखसा, सोंग ४ छातीपासुन वरील शरीराचा भाग ५ कागदावर काढलेलें तोंडाचें चित्र ६ तोंडाची ठव, चेहरेपट्टी ०**पट्टी**–स्त्री तोंडात

मावण्याइतकें प्रमाण ०वस्त्र–न १ दवाची पूजा, नैवद्य वगैरे झाल्यावर देव यामशुद्धि करतात तेव्हां त्याच्या मूर्तीच्या तोंडावर घालतात ते वस्त्र २ तोंड पुसण्याचें वस्त्र ३ ग्रंथ किंवा पोथी बांधून ठेवण्याचें वस्त्र. ४ मलपृष्ठ ग्रंथाच्या बाहेरील पान; (इं) कव्हर. ५ कागदाच्या पुडक्यातील अगदीं वरचें पान ०वाद्य–न १तोंडानें वाजविण्याचें वाद्य २ (ल) बोंब, शंख ०वास–वासन–पु १तोंडाला सुवास देणारा पदार्थ (पान सुपारी इ०) २ चुर्कीनें मुखवासाबद्दल उपयोग करतात ०विलास–पु. एक पक्वान्न ०वैवर्ण्य–न लज्जा, भीति आश्चर्य इ० मुळें चेहऱ्याला आलेली विरूपता, चेहऱ्यातील बदल ०व्रण–पु तोंडावर उठलेला व्रण, तोंडावर झालेली जखम ०शुद्धि–स्त्री जेवणानंतर तोंडाचा ओशटपणा जाण्याकरिता खावयाचें सुपारी, विडा इ० पदार्थ, सुपारी इ० खाणें ०श्री–स्त्री मुखचर्या, तोंडावरील तेज ०संकोच–पु १ एखाद्याच्या समोर भीतीमुळें अगर आदरामुळें बोलावयास वाटणारा संकोच, दबकलेपणा २ आदरामुळें किंवा मोठेपणामुळें येणारा लाजाळूपणा ३ वचकामुळें आलेली शाली नता ०सूद, मुखशूत–द–स्त्री (वों) मुखशुद्धि पहा ०सेक–पु चूळ भरून टाकलेलें पाणी, गुळणा 'असें असेल तर तो अभिषेक नव्हे मुखसेक आहे '–भासाच्या प्रतिभा नाटकाचा मराठी अनुवाद ०स्तंभ–पु १ न बोलता स्तब्ध बसणें २ ज्यामध्यें वाचा बंद होते असा एक रोग –वि घुम्या, न बोलणारा म्ह० खावयास अगडबंब म्हणावयास मुखस्तंभ मुखिया–पु पुढारी, म्होरक्या मुखरी मुखो–स्त्री. (राजा) मडकें कापड इ०ला पडलेलें बारीक भोंक छिद्र मुखीं–क्रिवि (काव्य) तोंडपाठ, तोंडी मुखें, मुखेंकरून–क्रिवि एखाद्याच्या योगानें, रूपानें, द्वारें उदा०त्यागमुखें अन्वयमुखें, व्यतिरेकमुखें इ० मुखोद्गत–वि तोंडपाठ, तोंडी [मुख+उद्गत]

मुखई–वि १ मोखा बंदरातून आलेला (माल, जिन्नस) २ निस्तेज, दुधासारख्या पाढऱ्या रंगाचें (मोती) मोखाबंदरातून आलेले किंवा तेथें सापडलेलें (मोती) [मोखा=एक बंदर]

मुखत्यार, मुख्त्यार, मुखतार–पु १ राजाच्या हाताखालील अधिकारावरील अमलदार, सर्वाधिकारी २ वंशपरंपरेनें चालत आलेला अधिकारी, पिढीजाद अधिकारी, नियोजित मुनीम, वतनदारानीं वतनदारीचीं कामें चालविण्याकरिता नेमलेला मनुष्य –वि संपूर्ण अधिकार दिलेला, नियोजित, अधिकृत (प्रतिनिधि) स्वतंत्रपणें वागण्यास मोकळीक असलेला [अर मुख्तार] ०नामा–पत्र–पुन अधिकारपत्र, ज्या लेखानें एखादा मनुष्य स्वतःच्या ऐवजीं व स्वतःच्या तर्फे काम करण्याचा दुसऱ्याला अधिकार देतो तो लेख, वकीलपत्र [मुखत्यार+नामा, फा मुखत्यार+स पत्र] मुखत्यारी, मुखतारी–स्त्री अखत्यार, अधिकार, स्वतंत्रता, दुसऱ्यानें दिलेला अधिकार; वकीलीचा अधिकार 'याप्रमाणें मुख्त्यारीचें अहकाम आणून दिलें –चिरा २४ [फा मुख्तारी]

मुखबीर–पु हेर, गुप्तपणें बातमी काढणारा, पुरविणारा मनुष्य 'प्रसिद्ध मुखबीर दुर्गाप्रसाद हा खबर चांगली देतो म्हणजे चुगलखोरपणा उत्तम करतो '–विविध ३ ६५ [स मुखवीर हिं]

मुखलासी–स्त्री (वों) मसलाशी, सुर्मी, हातचलाखी, युक्ति '

मुखशाळा–स्त्री १ स्वयपाक घर –आडिवऱ्याची महाकाळी १० २ (कु) देवळात स्त्रियाना बसण्यासाठीं केलेली विशिष्ट जागा [मुख+शाळा]

मुखळ–न मुसळ (उखळ शब्दाच्या जोडीस वर्णसादृश्या मुळें म्हणतात)

मुखा–पु हातोड्याचें पसरट तोंड (याच्या उलट बाजूस पिना म्हणतात) मुखाची खरवाई–स्त्री चांदीचीं भांडीं घडविताना उपयोगांत आणावयाची, टोकास गोल असलेली खरवई मुस अर्थ ८ पहा

मुखालीफ–पु वैरी, शत्रु 'समुद्रातील टोपीवाले तुम्हांसीं मुखालीफ होऊन आम्हांसी स्नेह करावयास यतील '–ऐटिरे ७४ [अर मुखालिफ्] मुखलिफत–स्त्री वैर, दावा [अर मुखालफत]

मुखिक–पु (महानु) उंदीर 'ऐसा उगवल्या बुद्धिती टावो। विषय मुखिक।'–ज्ञाप्र २४३ [स मूषक]

मुखी–स्त्री (ना) नखी पहा

मुखतसर–वि संक्षिप्त, थोडक्यात [अर मुख्तसर्]

मुख्य–वि प्रमुख, श्रेष्ठ, प्रधान, अग्रेसर [स] ०अहंकार–पु ज्ञानापूर्वीचा अहंकार ०उपासना–स्त्री निर्गुणोपासना, जींत ध्येय ध्याता, ध्यान ही त्रिपुटी नाहीं अशी भक्ति, ब्रह्मोपासना ०चैतन्य–न सत्यचैतन्यातील अविनाशी चैतन्य; परब्रह्म ०देव–पु परब्रह्म ०धुर–पु सेनापति, सेनानी 'हातीं लागल्या मुख्य धुर। सहजचि सांपडला परिवार।'–ह ६ ९७ [स धुर=जोखड] ०ब्रह्म–न चौदा ब्रह्मातील अनिर्वाच्य ब्रह्म ०भक्त–पु (आर्त जिज्ञासु अर्थार्थी यापैकीं नव्हे असा) ज्ञानी भक्त ०भक्ति–स्त्री जीमध्यें ध्येय, ध्याता, ध्यान अशी त्रिपुटी नाहीं अशी निर्गुण भक्ति अद्वैतभक्ति ०वृत्त–न (ज्यो) अनेक महावृत्तें स्वरूपानें ज्याला छेदणारीं अशीं कल्पिलेलीं असतात तें महावृत्त (छेदक वृत्ताना लघुवृत्तें म्हणतात) –क्रिवि मुख्यत्वेंकरून प्राधान्यानें, प्रधानत्वें, प्राधान्यें करून ०स्वर–पु. अ पासून लृ पर्यंत दहा स्वर मुख्यात्मा–पु कूटस्थ ब्रह्म, प्रत्यगात्मा.

मुखण–स्त्री (मुबई) सुंदर स्त्री, मुख्य राणी मुखरण पहा.

मुस्लीस—वि प्रमाणिक [ फा ]

मुगट—वि पवात पुष्कळ दिवस राहिल्यामुळ मुगागारखा उघ व सयणारें (धान्य)

मुगटा—पु मुकटा पहा

मुगडा—पु (राजा) केसाचा झुबका; जुबडा, वेरसुणीचा मुडसा

मुगडी—स्त्री मुगडी, कानात घालण्याचा बायकाचा दागिना [स मुकुट मुगुट-मुगटी-मुगडी ]

मुगण—न मुगाण पहा

मुंगणा-णी—पुस्त्री (ना व) शेवगा

मुगत—न मोती 'मुगतांमाणीकाचे दाडे गोमेद पद्मराग माणिकें उधाती।'-धवळेउ ५४ [स मुक्ता]

मुगद—पु (वे) भाताची एक जात

मुगदमी, मुगदुमी मुगदुमी साखर—स्त्री. हलक्या प्रकारची पिठी साखर [मगदुमी]

मुगदल—पु (प्र) मुद्गल पहा

मुगदळ—स्त्री मूग पेरण्यास योग्य असलेली जमीन [मूग+दळें] -न १ मूग भाजून त्याचें केलेलें पीठ २ अशा पिठाचे लाडू [मूग+दळणें] मुगवण-न-न मुगाचें मूस, मुगाचा कोंडा, मुगाचें गुळी मुगवा-पु १ बायकाचें एक प्रकारचें मुगा एवढ्या चौकटी असलेलें वस्त्र लुगड्याचा एक वाण, प्रकार २ दुध्या भोपळा -वि मुगाएवढ्या चौकटी असलेलें (लुगडें)

मुगदाण—न (वे) वसण बैल रेडा इ० पशूच्या नाकात घातलेली दोरी [का मूग=नाक+दावणी=दावें स मुख+दामन्=दावें]

मुगदुरी—स्त्री (व) पोयाच्या करण्या समुच्चयानें

मुगफल्ली—स्त्री (ना) भुईमूग

मुगरचें—क्रि (गो) शिरकणें शिरणें

मुगवत—न (को) १ कौलारू छपराची, खपराची पानपट्टी २ चौपऱ्याचा पाटचरा [मुखवत्]

मुंगस, मुंगसवेल—पु मुंगूस मुंगूसवेल पहा

मुंगसें—न (व) बैलाच्या तोंडाला बांधावयाची मुसकी मुसकी पहा [मुख]

मुगळ—स्त्री भातात उगवणाऱ्या एक प्रकारच्या गवताचें बी

मुगळ—पु शाकारलेल्या छपराचें आढें

मुगळा-ळी—पुस्त्री डोंगळा, मोठी मुंगी ०लागणें-उतावीळ होणें चव येणें, अतिशय घाई करणें साखरेवरले मुगळे-पुअव मुळावरल्या माशा जोंपर्यंत उत्कर्षाचे दिवस आहेत तोंपर्यंत मित्र म्हणविणारे लोक केंद्री

मुगा—पु लुगड्यातील एक प्रकार, या मुगवा पहा ०घेवडा-पु एका जातीचा घेवडा ०भोपळा-पु दुध्या भोपळा.

मुंगा—पु १ घोड्याला होणारा एक रोग २ घोड्याचा वरचा ओंठ, नाकाचा शेंडा; घोड्याला आवरून धरण्यासाठीं त्याचा वरचा ओठ दाबून धरणें, पिरगळणें (क्रि० दाबणें, पिळणें, घालणें, धरणें) 'मागुती सरसावोनि धाविन्नला हरीनें रगडून मुंगा पिळला।'-हर १४ ६४ ३ मुंगा पिळण्याकरिता घेतलेली दोरी किंवा इतर साधन ४ गर्विष्ठपणाच्या चेष्टा, रग, उद्धट पणाची वागणूक, गर्व, खुमखुमी (क्रि० करणें, लावणें, घालवणें, जिरवणें, मोडणें) 'सहजांत जिरविती सर्व त्याचा मुंगा।' -ऐपो ४२४ ५ चेव उत्कट इच्छा, काहीं एका कामासाठीं असलेली उत्सुकता (क्रि० आणणें) ६ मुगळा, काळी किंवा तांबडी मोठी मुंगी, डोंगळा ७ (नाशिक) नागपंचमीच्या दिवशीं स्त्रिया फेर धरून गाणीं गातात तो प्रकार (क्रि० घालणें) ८ बैलगाडीच्या मागील बाजूस सामान पडू नये म्हणून दोन्ही बाजू दाना मिळून बांधलेला दोरी विणून केलेला पडदा [मुंगी]

मुंगा—पु प्रवाल, पोंवळें [ हिं ]

मुगाण—न जोंधळा किंवा बाजरी यामध्यें पेरलेले मूग किंवा अशा तऱ्हेचें दुसरें धान्य मोघड, मोघण पहा [मूग+दाणा]

मुगाणा—पु १ मुकाणा, चाड, माड न आलेला दाणा, न भिजलेला किंवा शिजलेला दाणा २ (गो) अर्धवट कोंब आलेलें भात [मुकाणा]

मुगाणा—पु (राजा) भरडलेले मूग, मुगाचा डोळ [मुग+दाणा]

मुगारा—पु मुकता फुटलेला कोंब (क्रि० येणें, निघणें, फुटणें)

मुंगारा—पु खरीपात होणारी जोंधळ्याची एक जात -कृषि २६५

मु(मुं)गारी—स्त्री (सोलापुरी) खरीपाचें पीक, पावसाळी पीक याच्या उलट हिंगारी, अगर रब्बीचें पीक [का]

मुगाळ—स्त्री १ गवताचा किंवा झाडाचा कोंवळा अंकुर, फूट (क्रि० येणें, फुटणें, निघणें, होणें) २ मुलाच्या अंगावरील लव

मुगी—स्त्री १ मुगाची एक बारीक जात २ लुगडें खण इ० वरील मुगाएवढी चौकट -वि अशा चौकटींनीं युक्त असें (लुगडें, खण, इ० [मुग]

मुंगी—स्त्री १ एक बारीक कीटक; पिपीलिका गोड पदार्थ फार आवडणारा एक लहान प्राणी 'गुरुचरणीं पायें जडे जैसी मधुसर्करासीं मुंगी।'-मोकर्ण ४३ ५०. मुंग्यांचे प्रकार -काड मुंगी, गाडमोडी घाणेरी, ढुगणमोडी, दात्या, धावरी, वळविंच(ज),

हुरण, हुलहुली, पिसोळी इ० -राक्षो ७३ २ एखादा क्षण क्षणीत पदार्थ खाल्यामुळें जिभेमध्यें होणारी खवख ३ चेतना, चेव, एखादी गोष्ट करण्याविषयीं एल्दम उत्पन्न झालेली उत्सुकता, तीव्र इच्छा ( क्रि० येणें, आणणें ) ४ पुरुषाच्या ठिकाणीं उत्पन्न होणारा कामविकाराचा प्रक्षोभ ( क्रि० येणें ) 'मग मुगी येटनी लुगी कासोटी । सोडूनि धावती तयाचे पाठीं।'-नव २५ ५८ ५ शरीरास आलेली बधिरता (क्रि० येणें) [ वे मुभगी ] म्ह० १ मुगीला मुनाचा पूर २ मुंगी होऊन साखर खावी पण हत्ती होऊन लाकडें खाऊ नयेत (वाप्र ) **मुंग्या येणें-चढणें**-वातविकारामुळें शरीरावयव जड होऊन त्यास बधिरता येणें. रुधिराभिसरण रुद्ध झाल्यामुळें येणारी बधिरता **मुंगीच्या पावलानें**-क्रिवि मुगीच्या गतीनें, अगदीं हळूहळू **मुंगीच्या पायानें येणें आणि हत्तीच्या-घोड्याच्या पायांनीं जाणें**-सावकाश येणें आणि त्वरेनें निघून जाणें ( संपत्ति, वैभव वगैरे सबधीं योजतात)

**मुगीमुग**—स्त्री स्तब्धता [ मूग=मूक ]

**मुगुट, मुगूट, मुगुटमणी**—मुकुट, मुकुटमणी इ० पहा **मुगुटी कांच**-स्त्री ही गारेच्या काचपेक्षा कठीण असून फुकून तयार करताना महालुंगाच्या किंवा मुगुटाच्या आकाराची बनते

**मुगुतें**—न मुक्ति -शर

**मुंगूस**—न सर्पाला मारणारें भुरक्या रंगाचें, लांब शेंपटीचें एक कसाळ जनावर, नकुल [ प्रा द मुगुस, मुगस, मुग्गुस, का मुगुरी ] **०कांदा**-पु एक झाड, एक कंदविशेष ह्याचे मोटा व लहान असे दोन भेद आहेत **०तोंडा-ड्या**-वि १मुगुसाच्या तोंडासारखें तोंड असलेला २ रागातिरेकामुळें ज्याचा चेहरा मुगसासारखा झाला आहे असा ३ ज्याची हनुवटी आत दबलेली असून ओंठ मोठे व पुढें आलेले आहेत अशा चेहऱ्याचा ४ लाजाळू, घाबट **०वेल**-स्त्री एक वेल

**मुग्ध**—वि १ मूर्ख मूढ, मतिमंद, भोळा, अज्ञानी 'न उपेक्षीं मीं सामान्याहि मुग्ध भक्तातें।'-मोअनु ४ ६२ २ अस्पष्ट संदिग्ध, घोटाळ्याचें अनिश्चित (भाषण काम उद्योग) ३ सुंदर, गोजिरवाणें ( मूल ) ४ लहान ( मूल ) 'ताताला जेविं बोल मुग्धाचा।'-मोअनु४ ५७ [ स मुह्=मूर्ख होणें ] **मुग्धमाम्मा**-स्त्री ( निंदार्थी ) लग्न असून मदबुद्धीच्या इसमाला-विशेषत स्त्रीला म्हणतात [ मुग्ध+का अम्मा ] **मुग्धा**-स्त्री १ सोळा वर्षांच्या आतील वयाची मुलगी तारुण्यावस्था प्राप्त न झालेली मुलगी २ तरुण व सुंदर स्त्री ३ नायिकेच्या अवस्थेचा एक भेद

**मुग्याण**—न १ मळणी करण्यासाठीं काढलेले मुगाचे वेल २ मुगाचें गुळीं, भूस [ मुग+तृण ]

**मुघोसी**—स्त्री एक प्रकारचें लढाऊ तारू [ तु ]

**मुच(चु)कुंद**—पु १ एक सूर्यवंशी राजा यानें देवास साहाय्य केलें त्यामुळें देवानीं त्यास पुष्कळ झोंप घेण्याचा वर दिला जो त्याची झोंपमोड करील तो भस्मसात् व्हावयाचा असाहि त्यास वर असल्यानें कृष्णानें कालयवनाला याच्या गुंहेत आणिलें व झोंप मोडविली आणि अशा युक्तीनें त्या कालयवनाचा नाश केला २ (ल ) नेहमी झोंपून राहणारा, झोंपाळू मनुष्य ३ एक तीर्थाचें स्थल 'ढोलपूर नजीक मुचकुंदतीर्थ म्हणून आहे '-भाव ८९ ४ एक पुष्पवृक्ष ह्याचीं पानें पळसाच्या पानासारखीं असून फूल पिवळें, सुवासीक व वीतभर लांब असतें फळें गोरखचिंचेसारखीं परंतु लहान असतात गुराना होणाऱ्या कुद नामक रोगावर याचा उपयोग करतात -वगु ५ ५

**मुंचणें**—अक्रि मुक्त होणें, मुकणें ' इतुलेन मुचसि । भव बधासि तु । '-भाए ६६४ -सक्रि १ सोडणें, टाकून देणें 'जें आइकौनि जीवें मुचती । '-दाव २७९ [ मुच्=सोडणें ]

**मुचलका, मुचक्का, मुच्लका**—पु १ गुन्हेगार इ० पासून सरकारनें 'मी अशा तऱ्हेनें वागेन ' अशा करारानें लिहून घेतलेलें वचनपत्र, हमीपत्र, जामीनपत्र, कबूलपत्र २ करारनामा, कतबा, वचनपत्र ३ पंचाइतीच्या पुढें लिहून दिलेलें करारपत्र, वादीप्रतिवादींची जबानी [ तुर्की मुचल्का ]

**मुचूंक**—क्रिवि (व ) शिवाय, वाचून 'मी तुझ्यामुचूक जाणार नाहीं ' [ स मुच्=सोडणें ]

**मुच्छी**—स्त्री (व ) मिशी [ स श्मश्रु ]

**मुंज**—स्त्री १ उपनयनसंस्कार २ एक प्रकारचें गवत, मोळ. ३ उपनयन संस्कारात बटूच्या कमरेस बाधण्याकरिता जी मोळ, कुश, लव्हाळा याची दोरी करतात ती (ही पुढें सोडमुंजींत सोडतात ) मोळाचें कटिसूत्र 'ऋषि मुज बाधीती । '-वसा ११ [ स मौंजी ] **मुंज्या-जा**-पु १ मुंजीला योग्य झालेला मुलगा २ नुकतीच मुंज झालेला मुलगा, ब्रह्मचारी, लग्न न झालेला इसम. ३ एखादा मुंज झालेला मुलगा सोडमुंजीच्या पूर्वी अपघातानें मेल्यामुळें त्याचें झालेलें भूत, एक ब्रह्मचारी देवता ' मुंज्या नृसिंह बन शक्री । '-दा ४ ५ ७ ४ (मुंज्याचें भूत पिंपळावर राहतें अशी समजूत आहे त्यावरून ) पिंपळाचें झाड **वारा पिंपळावरचा मुंज्या**-वारा शब्द पहा **मुंजी, मुंजीबंधन**-स्त्रीन (प्र ) मौंजीबंधन, मुंज, उपनयन

**मुजत**—स्त्री ( गो ) १ वायदा २ कारकीर्द ३ मुदत, मुदतीचा ताप विषमज्वर [ म मुदत, अर मुद्दत ]

**मुजनाल**—पु घोड्याचा एक रोग -अश्वप २ ३१

**मुजफ्रा**—पु संवद्द [ फा ]

**मुजमू, मुजमूदार, मुजमूदारी**—मजमू, मजमूदार इ० पहा

**मुजरत-द, मुजरत-द्**—क्रिवि १ मुद्दाम, हदयें, मुद्दाम नेमलला, खास, निश्चयपूर्वक २ तावरतोब, त्वरेनें ' वदशाळी बापू जोशी याजबरोबर मुजरत ईमम दुर्बुद्धि धरून आल्याचें सविस्तर वर्तमान लिहिलें '-वाडसमा २ १० [अर मुजर्रद्]

**मुजरा, मुजुरा**—पु १ वंदन, नमस्कार रामराम, सलाम २ धन्याची भेट झाल्याबरोबर किंवा त्याची रजा घेताना नोकरानीं म्हणावयाचें गीत ३ तमाशांतील समाप्तीचें गाणें, लावणी ४ (राजा) नेम, नेम धरणें (क्रि० धरणें) ५ मोयदला, मता ६ वजा कमी केलेली, काढून टाकलेली रक्कम ' कोणी वसूल वगैरे दिल्यास तो मुजरा धरला जाणार नाहीं ' [अर मुज्रा=म्द] म्ह० (गो) मुजऱ्याक कोण ना हुल्प्याक पचवीस=हुल्पा (विदाणी) घेण्याला पुष्कळ परंतु मुजरा करावयाला कोणी नाहीं

**मुजरादास्त**—स्त्री मजुरादास्त पहा

**मुजाईक-म मुजाहीक-म**—नपु अडथळा, आडकाठी, अटकाव ' तरी मार्गी मुजाईम न होता सुखरूप जाऊं देणें -वाडबावा २ १४५ -वि प्रतिबंध करणारा, हरकत करणारा; अडथळा आणणारा, थांबविणारा ' आपले वतनास मुजाईक होऊन '-वाडबाबा २ ६४ [अर मुज़ाइक्-म]

**मुजाका, मुजाय-खा**—पुस्त्री १ पर्वा प्रतिष्ठा, हिंमत, विशात, महत्त्व ' ह फौज आलियाची काय मुजाका आह ' -मराचिस २२ २ अडचण, हरकत ' मुजाका नाहीं, तुम्ही यावयाच करावें रा ५ २५ [अर मुजायका]

**मुजाफत**—वि १ दुसऱ्या ठिकाणचा, परस्थ २ अधिक [फा] ०खर्च-पु १ देणगी खर्च सरकारनें दणग्या, बक्षिसें या बावत केलेला खर्च २ परस्थल०व्यय दुसऱ्या मुलुखासाठीं अगर महालासाठीं केलेला खर्च इजाफत जमा अर्थ २ पहा ३ विशेष खर्च **मुजाफ्ता**-वि मुजाफत खचासंबंधीं

**मुजामा**—पु घोड्याच्या पायाचा चर्मबंद याला पायबंद अडकविलात [फा मुईजामा]

**मुजा(दा)रत-द**—स्त्री १ शिष्टाचार, मानसन्मान २ आर्जव, मनधरणी संभावना (क्रि० ठेवणें राखणें) ' गंगाविष्णूची मुदा रद करावी ' ख ४ १९८४ ३ मार्गे राखून ठेवलेली गोष्ट (क्रि० राखणें धरणें) -क्रिवि चुकीनें मुजरत या अर्थी योजितात [अर मुदारत्]

**मुजारियान**—पु शेतकरी, खेडूत [फा मुझारिआन, अर मुझारिअ]

**मुजावर**—पु मशिदींतील झाडलोट करणारा सवकरी मुसलमान पुजारी [अर मुजाविर्] **मुजावरी-वरकी**-स्त्री मुजावराची वृत्ति त्याचा उद्योग हुद्दा इ०

**मुजाहिमत**—स्त्री प्रतिबंध, अडथळा, हरकत ' टिपूसुलतान कर्नेलकरास पेदकरीचा तगादा करितील त्यास मुजाहिमत नव्हती ' -रा ७ २५ [अर मुजाहमत्]

**मुजाहीम-हीक**—वि मुजाईक-म पहा

**मुंजिफा**—पु घोड्याचा एक रंग -अश्वप २ ३१

**मुर्जी**—वि (जुनी) पोटाखालीं पांढरा पट्टा असलेली, तांबडे काळे केस मिश्र असलेली (मेंढी)

**मुजुम**—पु एक अलंकार ' कटिसुवर्णमेखळा जडित। वरि मुजुमें पन्त्रिया रत्नखचित। -स्वादि १ ३ ३८

**मुजुमदार-री, मुजूम्दार**—मजमूदार-री इ० पहा

**मुजेरी**—पु खेडूत, कुणबी, शतकरी ' समस्त मुजेरी प्रजा ' -रा १५ ११८ [अर मुझारिअ]

**मुजेवार**—पु गांवचा हक्कदार फकीर गावातील जनावरें हलाल करण्याचा याचा हक्क असतो [अर मुजावर]

**मुजोर**—वि (ना) हकेखार, तोंडास तोंड देणारा वाचाळ [फा] **मुजोरी**-स्त्री धडवड

**मुज्कर**—वि आठवण करून देणारा ' श्रीमंताकडून आठ फर्दा मुज्कर होऊन आल्या ' -रा ७ १८३ [अर मुझ्किर]

**मुज्म(ज्मि)ला**—क्रिवि सक्षेपानें, सक्षिप्त मुख्तसर ' यक वेळ मुज्मिला फर्दे आली ' -रा ७ ८२ [अर मुज्मल्न्]

**मुटकण-कर**—क्रिवि १ पटकन झटकन, चुटकीसरशी (क्रि० धरणें पकडणें, पडणें शिरणें घुसडणें, झोंप लागणें) २ अवयव आखडून, मुरगुटी मारून (क्रि० निजणें पडणें) [ध्व]

**मुटकणें**—सक्रि बुक्या मारणें अग दुखत असल्यास त्यावर हळु हळु मुठीनें मारणें [स मुट्=मर्दन करणें म मूठ] **मुट कळणें**-सक्रि १ मुटकणें हळु हळु बुक्क्या मारून रगडणें २ तिंबणें मळणें, मऊ करणें (कणीक) ३ मऊ भात किंवा भिजविलेलें पीठ मुठींत दाबून मुटकुळीं करणें ४ कापड मोजताना प्रत्येक हाता गणीक मुठीच्या आकाराइतकी जागा (कापड) अधिक व्यापून कापड अधिक घेणें [मूठ+आकलन] **मुटक(कु)ळा-ळें**-पुन मुठींत दाबून केलेला कणीक इ०चा लाडू गोळा मुठींत मावणारा पिठाचा गोळा (क्रि० घेणें) **मुटका-कें**-पु १ बुक्की चंपी करताना अग रगडताना हळु हळु मुठीनें मारणें २ ठोमा, गुद्दा (क्रि० मारणें देणें) ३ मारण्यासाठीं हात वळून उगारलेली मूठ (क्रि० उगारणें) ४ पेटका, वातविकारानें गात्र विशेष आखडणें (क्रि० वळणें) ५ नांगर इ० धरावयाची मूठ ६ हातपाय पोटाशीं धरून पाणी उंच उडेल अशी पाण्यात मार लेली उडी -न मुटकें मुटकळा-ळें [स मुष्टि म मूठ का मुटगी] **मुटकावणें**-सक्रि मुटक्यानें अग मर्दन करणें मुटकण

**मुटमुट-मुट्ट**—क्रिवि १ घाईंघाईनें पदार्थ खाताना होणाऱ्या आवाजासारखा आवाज करून, मटमटा, मचमचा (क्रि० खाणें, जेवणें) २ माटमुट, टकमका, न बोलता, स्तब्धपणें, गुप चूप, निमूटपणें (क्रि० पहाणें). ३ (ना) केविलवाण्या दृष्टीनें, आशाळभूत नजरेनें [ध्व] **मुट्ट**-क्रिवि मुकाट्यानें स्तब्ध (क्रि० होणें, बसणें, राहणें)

**मुटला**—पु (बे) साधारणत सहा शेराची गुळाची ढेप [मूठ]

**मुटा**—पु इस्लाम कायद्यातील सुनी पंथाच्या कायद्याप्रमाणें तात्पुरता लग्नसबंध, मुदतीचें लग्न याची मुदत १ दिवस, १ महिना १ वर्ष किंवा अनेक वर्षेंहि असू शकते. -घका ७३

**मुट्टा**—पु (भरतकाम) पाच चिवट्याची एक गुंडी (रुर) दहा वळ्या किंवा रहाटाचे ५२५० फेरे होतील इतका दोरा [मूठ ?]

**मुट्टा**—पु (गो) काजू

**मुट्या-ठ्या**—पु १ एक बाजू वजनदार असलेल्या लोखंडाचा घण २ (बे) काातडें वडवावयाचें किंवा त्यावर खिळे मारावयाचें लोखंडी हत्यार, हस्ती [मुठ]

**मु(मू)ठ मुठवळी, मुठी, मुट्ठ**—स्त्री बैलाचें खोगीर मूठ पहा 'चवकीदारानें वळी मुठ नेली उचलून हक्काची।'-पला ७० [मूठ]

**मुठलां-लें**—न (कु) १ कोकवतेल, रातावतेल, भिरडेलाचा गोळा, थिजल्यामुळें या तेलाचे बांधलेले गोळे २ लहान लाडू [मूठ]

**मुठेल**—न खोबऱ्याचा कीस उन्हांत वाळवून किंवा विस्तवावर परतून तो मुठीनें दाबून पिळून काढलेलें तेल -कृषि ७४९ [मूठ+तेल]

**मुठेळ-ळी**—स्त्री केळीची एक जात **मुठाळें, मुठेळें**-न गोल असून कडा किंवा कोरा नसलेलें केळें, मुठेळ केळीचें केळें,

**मुड**—न १ (विटीदांडूचा खेळ) अंतर मोजताना तीन या संख्येबद्दल संज्ञा २ या खेळांत डाव्या हाताच्या आडव्या अगर उभ्या मुठीवर इटी ठेवून जरा उडवून तिला दिलेला टोला ३ (तंजा) साडेचार हातांचें मद्रासी पद्धतीचें धोतर, अशा रीतीचें धोतर गुंडाळून नेसण्याची तऱ्हा [ते मुडु=तीन]

**मुंड**—पुन १ सारा भाडें किंवा व्याज म्हणून दिलेलें धान्य किंवा पैसा २ (व) वतनदारीच एकमेकाशीं संबध नसलेले स्वतंत्र भाग -वि व्याज द्यावें लागत नाहीं अशी, बिनव्याजी (रक्कम कर्ज) [स मुंड=हजामत केलेला] ०**वंदी**-स्त्री वास वंदी पद्धत पहा **मुंडाचें शेत**-न बिघ्यावर दर न ठरविता ठोक अगर एकदम विकलेली जमीन

**मुंड, मुंडकी-कें**—नस्त्री १ डोकें, शिर २ डोक्याला बांधायाचें तीन चार हात लांबीचें वस्त्र, मुंडासें, रुमाल ३ हजामत केलेला किंवा डोक्यावर केस नसलेला मनुष्य ४ पानें झडून गेलेलें झाड, बोडका वृक्ष ५ न्हावी ६ मुंडकोपनिषद्, अथर्ववेदाचें एक उपनिषद् ७ (व) कुल, घराणें 'रामराव गोपाळरावाच्या मुंडातील आहेत' -वि. १ केस नसलेला, बोडका २ हजामत केलेला, मुंडित ३ (व) सुस्त [स मुंड] ०**मुंडावणें**-एखाद्या कार्याला वाहून घेणें 'तुझे निरोप पोंचवायला मी काहीं मुंड मुंडावून बसलों नाहीं' ०**माळा-ळा**-स्त्री मेलेल्या माणसाच्या मुंडक्याची डोक्याच्या कवट्याची माळ, रुंडमाळा, शिराची माळ.

**मुंडण-न-न** १ हजामत, हजामपट्टी, क्षौर, चौल, उपनयन व तीर्थयात्रा इत्यादि कर्मांत करावी लागणारी हजामत २ (ल) खरडपट्टी, तासडपट्टी, शिव्या हासडणें [स] **म्ह०** तीर्थी गेल्या वाचून मुंडण होत नाहीं ०**पर्वणी**-स्त्री. १ हजामत करण्यास योग्य दिवस २ (ल) सुगीचा दिवस **मुंडणें**-क्रि १ हजामत करणें, मुंडन करणें २ मंत्रोपदेश देणें, गुरूपदेश देणें, शिष्य बनविणें ३ (अशिष्ट) फसवून लुबाडणें; टकवून द्रव्य काढणें ४ सन्यास देणें, घेणें 'नलगे हिंडणें मुंडणें तें काहीं। साधनाची नाहीं आटाआटी।' -तुगा २५८० [स मुंडन, फ्रें जि मुर] **म्ह०** वैद्याचें वाटलें आणि सन्याशाचें मुंडलें कोणास समजत नाहीं **मुंडला जाणें**-लुबाडला जाणें **मुंडंती**-स्त्री चांगली खरडपट्टी, बोडती, तासडपट्टी, खरमरीत कानउघाडणी **मुंडवण**-स्त्री १ फसवणूक, नागवणूक, मोहनी (क्रि० पडणें, घालणें) २ (ल) शिव्याचा भडिमार, खरडपट्टी **मुंड(डा)विणें**-क्रि हजामत करणें, डोकें तासणें **मुंडा(ढा)वळ-वळी, मंडावळ**-स्त्री वधूवराच्या किंवा मुंज्या मुलाच्या डोक्याला फुलें, मोतीं इ० चीं तोंडाच्या दोन्ही बाजूला पदर लोंबणारी बांधतात ती माळ २ फुलाची माळ, गजरा [मुंड+आवली] **मुंडा(ढा)सें**-न साध्या बांधणीचें लहान पागोटें, शिरोवस्त्र, हेंच ओबडधोबड बांधणीचें मोठे पागोटें असल्यास त्यास निदार्थी पुल्लिंगी मुंडासा असें रूप योजितात) [हिं मुंडासा, का मुंडास] **मुंडासबंद**-वि (व) पागोटें बांधणारा घालणारा **मुंडित**-वि हजामत केलेला, मुंडन केलेला तासलेला **मुंडी-ढी**-पु (निंदार्थी) (शेंडी न ठेवता सर्व हजामत करतात म्हणून) सन्याशी, गोसावी -स्त्री १ शिर, डोकें मुंडकें 'दुर्धर योग धराया जैसी देतात धीरतर मुंडी।' -मोभीष्म ५४३ २ (मल्लविद्या) दान खादे व कमरेचे दोन खवाट मिळून चार मुंड्या होतात त्यापैकीं प्रत्येक भाग (यावरून) **चारी मुंड्या चीत होणें**-१ वरील अवयव जमिनीला लागतील अशी जमिनीला पाठ लागणें २ (ल) पूर्ण पराभव होणें **मुंडी फिरवणें**-नापसंति नावड दाखविणें **मुंडी मुरगाळणें**-

पिळणें-पिरगळणें-(एखाद्याचा) शब्दोपरी नाश करणें, त्रास देणें, छळणें, एखाद्याच्या उपजीविकेचें साधन नाहींसें करणें मुंडी हालविणें-डोलविणें-विषय न समजतां समजला असें होकें हालवून सांगणें, वरिष्ठाच्या म्हणण्यास अनुसरणें, होस हो करणें मुंडी-मुंड मोचन-न १ (अशिष्ट) चोर वगैरेंनीं केलेला शिरच्छेद २ दुर्दशा, शिव्या शाप, द्रव्य हरण इ०नीं केलेली दुर्दशा [स ]

मुडकर—न (व) लिफाफा, पत्र बंद करण्याचें लॉपट पाकीट उघड नव्हे असा मजकूर लिहून पाठविण्याचें पत्र

मुंडशारी—स्त्री (गो) नारळीच्या बागेभोंवतालचें कुंपण, कुंपणाची भिंत

मुडकी—स्त्री (व) कानांतील पाळ्यामध्यें घालण्याचा सोन्याचा दागिना 'कुडक्या ऐवजीं पुणच्याच्या स्त्रियां मुडक्या घालतात '

मुंडकी—वि (कर) बारीक, हलकें (सागवान) 'मुडकी सागवान स्वस्त असतें '

मुडगा—पु १ धान्याची मूठ २ सराटा, झाडणी, कर मुणी यांची मूठ ३ चोळण्याचा पुढील भाग [मूठ]

मु(मुं)डगा, मु(मु)डगें भात—पु एका जातीचें भात व तांदूळ

मुडगुडी—स्त्री हातपाय, डोकें इ० सर्व अवयव आखडून घेऊन डोक्यावरून पांघरूण घेऊन निजणें किंवा कोठें अडचणींत, कोंपऱ्यांत पडून राहणें (कु) मुटकूस (क्रि० मारणें) [मुंड+ घुमणें]

मुडणकाठ—पु (वागलाणी) जरी कांठाची एक जात

मुडत—न (नाविक) पाण्याची खाली माजण्याचा किंवा पाण्याच्या तळाशीं गाळ, रेती अथवा खडक आहे हें पहाण्याचा शिशाचा किंवा लोखंडी लांबट गोळा, बुडीत

मुडतर—न दैन्य, दु:ख 'फेडिलें मुडतर। किंवा कांहीं जरजर।' -तुगा ६१२

मुडताळणें—अक्रि मुरडणें, मागें वळणें वाकणें, लवणें 'परपीडे ज्याची जिव्हा मुडताळे।' -तुगा ३६१८ [मुरडणें]

मुडद(दु)शी—स्त्री (गो) एक लहान जातीचा मासा

मुडदा, मुडद्दा मुर्दा—पु प्रेत [फा मुर्दा=मृत स मृत] ०पाडणें-ठार मारणें मुडदेफरास-पु प्रेतवाहकाची एक जात २ अस्थिविधीला लागणारें लाकूड, गोवऱ्या इ० सामान विकणारा [फा मुर्दाफरोश] मुडदेफराशी सी-स्त्री मुडद फरासाचें काम

मुडदार—वि १ मरून कुजत पडलेलें, शिळें (मांस, प्रेत) २ (ल) घाणेरडें ओंगळ खराब, तिरस्कार आणणारें, अपवित्र हलकें, (मुसलमानी धर्मशास्त्रांत या शब्दाचा अर्थ आपोआप मेलेल्या किंवा यथाशास्त्र न कापलेल्या जनावराचें अतएव अपवित्र व खाण्यास अपात्र मांस असा आहे ) ३ (मे) अप्रयो जक, हटी, मुढ [फा मुर्दार्] ०थामडें-न संवेदना, चेतना, नसलेलें, कापलें असतां न दुखणारें कातडें ०तूप-न बरचसे तापल्यानंतर शिल्लक राहिलेलें तूप ०तेल-बरेच जळल्या वर दिव्यांतील शिल्लक राहिलेलें, शिळें तेल दीपतैल ०नरा-न गूतनर; ०मांस-न १ शेतांतील किंवा जमिनींतील निर्जीव, मेलेलें मांस २ आपोआप मेलेल्या प्राण्याचें मांस ०रक्त-न नाडीवहित रक्त, गोठलेलें रक्त

मुडदार-शिंग-सिंग-सेंग—न एक औषध शिशाचें प्राशिद [फा ]

मुडदूस—पु लहान मुलांना होणारा एक रोग

मुंडप, मुडप—पुन मुंडा शिरत्राण, पागोटें डोक्याचें रक्षण करणारी कोणतीहि वस्तु मुडपें जैसीं कुंभस्थळें। शिशुपाळीं' —ज्ञाप्र ४६० २ गजरा, पुष्पमाला [स मुड+प] ०पमणी-नी-स्त्री (काव्य) पागोट्याशीं पागोटें किंवा डोक्याशीं डोकें घासण्याइतकी गर्दी, दाटी ऐकमेकांस भिडण्याइतकी गर्दी मुडपमणी पहा 'कृष्ण पहावया नरनारी। मुडपपमणी होतसे भारी।' —एरुस्व ६.१७ [स मुड+पर्षण] मुडपी-पु जगधारी

मुडपणें—अक्रि १ मुरडणें, पाय इ० वाकडातिकडा पड ल्यानें दुखणें 'तेवि मुडपोनि मुजला पायें।' —दावि १६ २२ २ दुमडणें, घडी घालणें [का मडपु] मुडपा-पी-पुस्त्री घडी, दुमड

मुंडमुंड—पु हलकट लोक —शर

मुडमुडी—मुडगुडी पहा

मुंडलाना—पु भिंतीवरील मुडेरी, वरडी [मुड]

मुंडयणें—क्रि (गो) हत्याराची धार बोथट करणें [मुडणें]

मुडशेवाजू—स्त्री (कु नाविक) उलाढीच्या विरुद्ध अस लेली होडीची बाजू

मुंडळी—स्त्री (गो) बुबूळ

मु(मुं)डळी—स्त्री काळें मळें किंवा राजाद्ध याचा दादा, गड्डा

मुडा—पु १ भात किंवा इतर धान्य आंत घालून बाहेरून पेंढा अगर गवत यांचें आवरण घालून सुंभानें अगर दोरीनें बांधून केलेलें गोलाकार किंवा अंडाकृति गाठोडें, कणगा निरनिराळ्या आकारावरून याला निरनिराळीं नांवें आहेत उदा मुडी, मुडें, कोळें, चोवा इ० २ वरील गठ्ठ्यातल्या प्रमाणाचें धान्य पच वीस मण हें एका मुड्याचें परिमाण मानितात ३ गुळाच्या ढेपीचा निघालेला तुकडा ४ कणगा, बीजाचें साठवण साठा 'तुका म्हणे बीज मुडा। जैसा चाडा पिकाच्या।' —तुगा २७४४ ५ (माण) गाठोडें ६ ठराविक वजनाइतकें ओझें

'खोबऱ्याचा मुडा ' [ मूठ, का मुडि ] ०घालून बसणें— पोटाशीं पाय घेऊन व गुडघ्यात मान घालून व त्या सभोंवतीं दोन्ही हातांचा वेढा देऊन बसणें; शरीराचें गाठोडें करून बसणें म्ह० ( गो ) मुडयानी खाल्लें तर वेढयानीं तरी पावक जाय =एखाद्याकडून पुष्कळसें घेऊन खाल्लें तर थोडें तरी त्याला पोंचविलें पाहिजे

**मुडा**—वि १ तोंड किंवा गळा फुगलेलें ( मडकें ) २ चोंबडा ( मनुष्य ).

**मुडां-डें**—न ( कु ) आखूड बाह्यांचें आंगडें आखूड हाताचा खमीस

**मुंडा-ढा**—पु हिजडयाचा सोबती, खरखर मुडा, याम०मुडा, भिक्षा मागताना हिजडयाच्या बरोबर फिरणारा व भिक्षा घेणारा मनुष्य २ (गो ) नायकिणीचा भाऊ म्ह० हिजडयाची जोड मुडयानें खावी

**मुंडा**—पु ( कों ) मातीचें भांडें, हेरा, राजण २ पखालीचें तोंड, भोंक ३ ( ना ) लाकडी खांब स्तंभ -वि पेंढा भरलेला [ मुड ]

**मुंडा, मुंडा हात**—मुढा इ० पहा

**मुडापा**—पु. (कर ) ( शेतकऱ्यांत रूढ ) कणसें काढण्याचें काम 'राम्यान काल शेतातल्या कणसाचा मुडापा केला ' [ मोडणें ]

**मुडापाक**—न फडशा, समूळ नाश

**मुडारणें**—सक्रि १ मागें वळणें-वळविणें, तोंड फिरवून चालू लागणें, पलग खाणें, परत फिरणें २ एखादा खाण्याचा पदार्थ नकोसा होणें, त्याबद्दल अरुचि उत्पन्न होणें [ मुड ]

**मुंडाल**—स्त्री ( ना ) वरडी, वरवडी, मुढेरी, मुडलावा

**मुंडाला**—पु ( ना ) तेल साठविण्याचा राजण, बुधला

**मुडी**—स्त्री. १ लहान मुडा, भात किंवा इतर धान्यें पेंढयात वेष्टून बांधलेली वाटोळी मोटळी ही मुडी पवनस सोलल्यावर दिसावें तशी कळीदार दिसते हींतील धान्य ६ ते १० कुडव असतें ह्याहून ज्यास्त धान्य मावणाऱ्यास मुडा म्हणतात मुडयाचा आकार अडाकृति व मुडीचा चेंडूसारखा गोल असतो मुडीहून लहान ( २ ते ६ कुडवाच्या ) गोलास विवळा म्हणतात विवळा अर्थ ३ पहा २ पुजी, भाडवल [ मुडा ] ०मारणें-मारून बसणें-भयानें दबकून, हातपाय आखडून बसणें, उकिडवें बसणें

**मुंडी**—स्त्री एक झाड

**मुडे**—पु (महानु ) डोक्यात घालण्याचा एक मोत्याचा अलंकार 'माणीकीं खचित मुडे-मकोर। '-धवळ उ ४२ [का मुडि]

**मुडों**—पु (राजा तेली घाणा) जागीच्या मागच्या बाजूस वजनदार दगड स्थिर राहण्याकरिता भोंवतालीं खुटे उभे करून ते बाहेर सरकू, कलू नयेत म्हणून भोंवतालीं दोरीचे वेढे दिलेले असतात तो सर्व भाग याच्या पोकळींत पाच मणाचें वजन ठेवतात [ मुडा ]

**मुडून**—न ( व ) शेताच्या एका टोंकापासुन निघून पुन्हा त्याच ठिकाणीं आऊत आणणें, यणें मुरडाण पहा [ मुरडणें ]

**मुडो**—पु ( गो ) रानटी लोकांचें पक्वान्न

**मुंढरा**—वि आतल्या बाजूस वळलेलीं शिंगें असणारा, लहान व आखूड शिंगाचा ( बैल ) [ मुढा ]

**मुंढवणें**—सक्रि बोथट करणें, धार बसविणें

**मुढा**—पु मुडा पहा

**मुंढा-डा-पु** १ खांद्याचा गोल भाग, खांदा 'आनल्या बोल्ला आज मुढग्याच्या चिंध्या होती '-ऐपो ७० २ ( तांत्रिक ) मुढा हात, पाऊण हात. ३ पखालीचें ( दोन्हीकडील ) तोंड ४ हिजडयाचा सोबती, नोकर -वि १ डोकें, माथा, टोंक शेंडा, शेंडी, शिंगें किंवा अग्र नसलेला ( प्राणी, झाड, बोट, चाकू, नारळ इ० ) २ कडा, गठा, काठ, इ० नसलेलें (भांडें) ३ निव्वळ, केवळ फक्त शमरच असा पचोतरी व सळी नसलेला (शेंकडा), याच्या उलट खरा (शेंकडा) ४ विरहित, साधा, ओका, दागिने नसलेला; मुडा. ५ शिंगें मागें वळलेला, ६ छत्र नसलेलें ( सिंहासन ), सिंहासनाला छत्र असण्याचा अधिकार नसलेला ( मांडलिक ), [स मुंड ] ०हात-पु कोपरापासुन वळलेल्या मुठीपर्यंत लांबीचा हात (लांबी मोजण्याचें एक प्रमाण ) ( गो ) मुडिहाथ, मुडोहात ०उलटा-पु ( जविया ) आपल्या हातातील जवियानें आपल्या जोडीदाराच्या डावीकडील खाद्यावर मारणें ०सीधा-पु (जविया ) आपल्या हातातील जवियानें आपल्या जोडीदाराच्या उजव्या बाजूकडील खाद्यावर मारणें **मुंढे फिरणें**— १ खांद गोलाकार होणें, खांद भरणें २ गलींत कवडी गेऊन खेळावयाच्या ववदयाच्या खेळातील एक डाव पारिभाषिक शब्द

**मुंढा**—पु केळीच्या पानातील मोठें पान, ढागा

**मुढाकान**—पु ( व ) दुमडलेला व विकृत झालेला कान

**मुढामाकोजी**—वि पोकळ अभिमानी, बढाईखोर, ठक म्ह० मुढामाकोजी आणि नक्ग टिकोजी

**मुंढारणें**—मुडारणें पहा

**मुंढारी**—मुढेरी पहा

**मुंढावळ**—स्त्री १ वमळ, पोशेरें इ० चे अंकुर किंवा बोंर हे भक्षणीय असतात (बहुधा अव उपयोग ) २ मुडावळ पहा

**मुढी**—स्त्री ( व ) मूर्ख स्त्री [ मूढ ]

**मुंढी**—स्त्री मुडी पहा ०वसात-स्त्री गावच्या पाटलाचा एक शिकारीसंबंधीं हक्क 'मुडीवसात व शिकार उभतानीं बाटून घ्यावी ' -वाडशाछ १ १४९ [मुडी]

**मुंडेरी, मुंदरी, मुंढारी**—स्त्री पावसाचें पाणी भिंतींत मुरूं नये, तें निघून जावें म्हणून भिंतीवरील उतरता केलेला भाग, परवडी, परदी, भिंत बांधून झाल्यावर दोवर्गी विटांचा निमुळता, पायऱ्यावजा बांधतात तो भाग [ मुंड ]

**मुंढोजी मुका**—पु चढेल, मिजासखोर मनुष्य ( एखाद्याची मिजास जिरविण्याकरतां म्हणतात )

**मुंढ्या**—पु मुसलमान द्विजदर्वांचा गुरु

**मुण, मुंड**—पु ( गो ) झाडाचा बुंधा

•**मुणग्या(गा)भात**—न ( पु ) भाताची एक जात

**मुतआशीव**—क्रिवि पाठोपाठ, लागोपाठ पाठलाग करीत 'सर्दार जगी सामान घेऊन मुतआशीव येत आहे.'–रा १० १९९ [ अर मुतआक़िब् ]

**मुतगा**—पु भाताची एक जात

**मुतपाक, मुत्पाक मुतबक-खा, मुतबखखाना मुत्बख मुद्‌पाकखाना**—पु स्वयपाकघर, सैपाकघर [ अर मुत्बख ]

**मुतफर्कात**—क्रिवि किरकोळ, सरकड, बाज 'शिवाजी अनंत मुतफर्कात असामी निसबत सुभे मजकूर '-खाइवाया १. ३७१ [ अर मुतफर्रिक़ात् ]

**मुतफीक**—क्रिवि सामील, शरीक [ अर मुत्तफ़िक़ ]

**मुतबन्ना**—वि दत्तक 'मुतबन्ना पुत्र घेतला '–रा २२ १०३ [ अर मुतबन्ना ]

**मुतमरीद**—वि बंडखोर [ अर मुतमरिद् ]

**मुतलक**—स्त्री ( को ) खाऱ्या जमिनीचा एक प्रकार

**मुतलक-ख, मुल्लक-ख**—क्रिवि मुळींच, सर्वथैव 'जयाजी तर मुतलख नामुराद आहे '–रा६ ६१७ [अर मुत्लक़्]

**मुतवजे-वज्जे-वजेह, मुतवजा**—वि जाणारा, गमन कर्ता, वळलेला, उद्युक्त, तयार, नियुक्त (स्वारीवर) 'होळकर मातबर सदार फौजसुद्धा मसलतीवर मुतवजे करणे पाहिजेत '–पया २२५ [ अर मुतवज्जिह ]

**मुतवली**—पु १ मशिदीची दखलदारी करणारा २ रखवालदार

**मुतवातीर**—क्रिवि पुन्हा पुन्हा, वरचेवर, एकसारखें, पैदरपै 'मुतवातीर रुदारा अमलात यताव '–पया ४७९ [ अर मुतवातिर् ]

**मुतसद्दी-सद्दी, मुत्स(त्सु)द्दी-द्दी**—पु १ कारभारी, राजकारणी, राजकार्यधुरंधर 'सर्कारचे मुतसद्दी राजदिवस नालिशी करितात '–रा २२ १०४ २ ( ल ) धोरणी, धूर्त, कारस्थानी [ अर मुतसद्दी=कार्यकारी ] •**असून शिपाई**–पु शहाणा असून वेळीं तलवारहि चालविण्यास समर्थ असा मनुष्य •**गिरी**–स्त्री १ राजकारणपटुता, राजकारणचातुर्य मुत्सद्दीपणा २ धूर्तता चातुर्य

**मुतसील**—पु ताबा, कबजा, अधिकार 'जजिरे याचे मुतसिलांत चालेल '–खाइमा १ २२३ –वि सदरचा, साम्यांतील, जोडलेला 'तर्फेन मुतसील महालाचे बन्दोबस्त बाकी इन्साफ '–खाइमा १ २२३ [ अर मुत्तसिल् ]

**मुतायत**—स्त्री अनावणी, अनुनय 'तेथून जो अहदान पोहोंचेल त्याची मुतायत असावी '–पया १८ [ अर मुताबअत ] **मुताबि(बी)क**–वि प्रमाणें, सारखा, जुळता, जुळणारा, अनुसरून असलेला [ अर मुताबिक ]

**मुतालीक**—पु उपमंत्री, आठ दरकदारांपैकी एक, नायब, कारभारी [ अर मुतअल्लिक़् ] **मुतालकी-की मुतलकी**–स्त्री मुतालिकाचें काम, मुतालिकाचा अधिकार, नायबत

**मुतीं**—स्त्री रूढी, चाल –शर

**मुतैनरया**—वि नेमलेलें व चालू 'आपल्यास इनाम कार्दिर्दी दर कार्दिर्दी मारनिमा नी माजी मुतैनरया असत ( आहे ) '–रा १५ १४५ [ अर मुतअय्यिन=निश्चित+फा रवान=चालू ]

**मुद(द्द)ई**—वि १ फिर्यादी, दावेदार 'दस्तत देखत मुद्दई . '–पद १०८ २ शत्रु ३ आरोप करणारा [ अर मुद्दई ]

**मुद्‌गल**—पु व्यायामासाठीं फिरविण्यास घेतात ती लाकडी जोडी, करेला [ स मुद्गर ]

**मुद्‌गलसिंचन**—न रेताचा व्यय

**मुदडणें**—उक्रि ( तंजा ) दुमडणें, घडी घालणें, मुडपणें [ दुमडणें अप ]

**मुदण-णी**—मुदन-नी पहा

**मुंद(ध)णें**—उक्रि भोंक बुजविणें, बंद करणें, भगदाड काटणें, गुदडी बसविणें

**मुद(द्द)त**—स्त्री वेळ, अवधि, कालमर्यादा, कालखंड, ठरविलेला अवधि [ अर मुद्दत् ] •**बंदी**–स्त्री मुदत करणें, ठरविणें **मुदतीची हुंडी**–स्त्री १ निश्चित रकम काही कालानें मिळावयाची आहे अशी हुंडी किंवा उलट दर्शनी हुंडी २ सरकारी तिजोरींतील जमाखर्चाचा मेळ बसण्यासाठीं सरकारनें काढलेलें तात्पुरतें कर्ज

**मुदन-नी**—स्त्री १ गिरमें, गुडी लावण्याकरिता किंवा अडकविण्याकरितां केलेलें भोंक काज २ सलिता किंवा गोणी याच्या कडेला असलेली भोंकाची किंवा विरडयाची रांग, मालिका, गुळ रव्याची ओळ ३ फासा, अडकविण्याचें साधन, पेटी डबी, इ० वर करावयाचा खटका ४ घोड्याच्या पायबंदाची चामड्याची गुंडी ५ खिरीसाठीं तयार केलेली वळिक गड्डे तयार करण्यासाठीं केलेली भिजविलेल्या सपीठाची वळवटी ६ असूडाच्या टोकाला असलेला फासा, वटण्याची गुंडी किंवा फांसा

७ आखाचें किंवा चाकाच्या कण्याचें गेंद (ज्यात कुणी बसवितात तें) [स मुद्रा, म मुदी] मुदत वळणें-(व) रोमेजणें

**मुदपाक-ख मुदूवक-ख, मुदबखखाना**—पु मुतपाक पहा **मुदबखा-खी-ख्या, मुदूबख्या**-पु आचारी, सैंपाकी. 'बातमी पोहोंचविण्यासारखें यांचें बातमीदारात मुदबख्याशिवाय दुसरें कोणी नव्हतें'-रा ६ ५०९

**मुदफर्क**—पु फिरकोळ खात्यात काम करणारा मनुष्य 'गंगाजी बाईकर प्यादे दिमत मुदफर्क आनंदवल्लीकर'-वाडसमा ४ ८५ [अर]

**मुदफाळ**—स्त्री (गो) भाताची मूद

**मुदबख्या**—वि (व) मुखदुर्बळ, योग्य प्रसंगीं बोलणारा, कमी बोलणारा

**मुदल, मुद्दल**—न १ भांडवल, कर्जाऊ दिल्ली रक्कम, मूळ रक्कम, आरंभींचा साठा 'जे सर्वकर्मसिद्धीलागीं। इयेंचि मुद्दलें हो जगीं।'-ज्ञा १८ २८० २ मूळचें पुण्य 'मान् नेणता पर वडी। मुद्दल तुटे।'-ज्ञा १७ ३४७ -वि मूळचा, मुख्य मुरवातीचा, मूळातील 'मुदला धुरा छपन कोडी। जेथ सख्या न हीं णायक्वडी।'-शिशु ५४३ (समासात) मुद्दल भांडण-तंटा-करार-कारण-बोलणें इ० -क्रिवि १ मुख्यत्वेंकरून, मुख्यत 'पाणी मुदल झाडा जाय।'-ज्ञा १७ २१८ २ मुळींच किमपिहि 'वरनशीर रक्कम मिळत आहे तोंपर्यंत त्याला मुळुख मागण्याचा मुद्दल अखत्यार नाहीं' [स मूल्द, का मैरु=मुख्य, त मोंदलु] **मुदलावर येणें**-मूळ स्वभावावर येणें एखाद्यानें पुन्हा आपले मूळचे दुर्गुण दाखविणें म्ह० (गा) मुदल नासुम करा तर बुडता=मुदल हातात नसता उगीच व्याज बुडाल्याबद्दल हाकाटी करणें **मुदलात मुरकुंडी**-स्त्री भांडवलात तूट येणें, नफा न होता मांडवलच खर्ची पडणें **मुद्दलामुद्दल-मुदला**-क्रिवि व्याज किंवा नफ्याशिवाय, व्याज किंवा नफा न घेता, मूळच्या भांडवलाइतकेंच, त्यात कमी जास्त न हो। [मुद्दल द्वि] **मुदलीं**-क्रिवि (मुदल याचें सप्तमीचें एकवचन) मुळींच मुळांतच, किमपिहि, किंचिनहि मोक्षप्राप्तीच्या मार्गांचें भगवद्गीतेंत मुदलीच विवेचन नाहीं'-गीर ७

**मुदर**—पु (गा) अडयातील पिवळा बलक

**मुंद(दा)विणें**—सक्रि चर करणें भरून काढणें चुनून टाकणे (भोंक मार्ग, वाळ फट इ०) मुद(ध)णें पहा

**मुदसा**—पु एक जातीचा मासा

**मुदाई मुदई मुद्दईदार**—वि १ हक्क सागणारा, दावेदार, फिर्यादी, विरुद्ध आरोप करणारा, आरोपाचे मुद्दे सागणारा द(द)ई पहा 'मुद्दई यांनी द तों धम्न गालाम यें उभे रहा' -माइ १८३५ २ साक्षीदार [अर मुद्दई] ०इलै-पु आरोपी [अर मुद्आ-इलैह] ०गिरी-स्त्री हक्कमागणी, दावेदारी

**मुदाईम**—पु खटला, वाद इ०मध्यें मुद्दे किंवा पुरावे गोळा करणारा इसम [अर मुद्दई]

**मुदाईम**—वि १ कायमचा, टिकाऊ, सतत चालणारा २ पुरातन, प्राचीन, फार दिवसापूर्वींच प्रस्थापित झालेला [अर]

**मुदाम**—क्रिवि सतत, एकसारखें 'मुदाम चौदा रोज शहरामध्यें सोदासोदी कल -इम [अर मुदाम्] ०बेगारी-पु अखेरपर्यंत ओझें वाहून नेण्यासाठीं लावलेला कामकरी, मध्यें न बदलता अखेरपर्यंत काम करणारा वेगारी [अर मुदाम=सतत, निरंतरचा] **मुदामी**-वि नेहमीचा, जुना

**मुदार(रा)त, मुजारत**—स्त्री संभावना, बर्दास्त 'केवळ सागण्यावरूनच मुदारत फलाण्याचा नातु म्हणोन करावयाची नाहीं'-ख ९४७६६ [अर. मुदारत्]

**मुदित**—वि हर्षभरित, आनंदित, आल्हादित, सुखी, प्रसन्न [स मुद्=हर्ष होणें]

**मुदी**—स्त्री १ आगठी, मुद्रिका २ कानातील किंवा नाकातील मुरकुलें, वळे ३ मुद्रा, शिक्का 'जे विश्वप्रामाण्याची मुदी। आजि तुझ्या हातीं असे सुमुद्रि।'-ज्ञा १६ ४६८ [स मुद्रा, मुद्रिका]

**मुद्र**—पु मुग धान्य

**मुद्ग**—पु आच्छादन [स]

**मुद्गर-ल**—पु मुदगल पहा

**मुद्दत**—स्त्री मुदत पहा

**मुद्दा**—पु (तजा) मऊ, गिच्च भात, खिमट

**मुद्दा, मुद्दा**—पु १ काहीं विधान, गोष्ट इ० स्थापित करण्यास आधारभूत असलेलें प्रमाण, पुरावा २ बाब, बाबत ३ मतलब, तात्पर्य हेतु, मुख्य गोष्ट ४ ज्यावर भाषण करावयाचें किंवा लिहावयाचें तो विषयविभाग ५ बोलण्याचा किंवा लिहिण्याचा रोख, दिशा ६ अट शर्त, मानस, मतव्य, हेतु 'जे काय दील्हे मुद्दा असेल त कबूल -भाद्विमर १७९१ ७ मार्गदर्शक चिन्ह रूप साधन आरोप याजकडे गुन्हाचा मुद्दा लागला' -वाडबावा २ ५० [अर मुभदा] ०पत्ता-पु पुरावा, साक्ष, आधार थाग मागमूस धागादोरा, यागपत्ता **मुद्द्यापरत्या निशीं**-क्रिवि योग्य पुराव्यानें **मुद्दामक्सूद**-पु १ हेतु २ अर्जे विनति यानीं कागद लेहून आपला मुद्दामक्सूद पाठविला ज '-रा १० ३३ **मुद्देदार**-वि मुद्दे असलेला, मुद्दई, वादी, फिर्यादी **मुद्देनजर** स्त्री लक्ष्य [फा मुद्द+नज़र्] **मुद्देमाफ (फी)र**-क्रिवि इकडेमुमार दफ्तेप्रमाणें 'सबर फौजमद वर्तमान दऊन मुलाजमत करीत त्याने मुद्देमाफीक सर्व होऊन

जाईल '-रा ८ २०७ **मुद्देवार**-क्रिवि मागणीवार 'घाटर असता रोजमुरे न घेता गैरशिस्त मुद्देवार जाब घालू लागले ' -होकै १३ **मुद्देसूद**-वि मुद्यास धरून असलेलें, प्रमाणशुद्ध, सगतवार **मुद्याचा मनुष्य**-पु (व) मुख्य मनुष्य, सूत्रधार, सूत्रचालक **मुद्याची गोष्ट**-स्त्री (कायदा) जीवरून कोणतीहि जबाबदारी, हक्क किंवा नालायकीबद्दल अनिवार्य अनुमान निघतें अशी गोष्ट (इं) फॅक्ट इन् इश्यू

**मुद्दाम**—क्रिवि बुद्ध्या, जाणून बुजून, हेतुपुरःसर, बळेंच, हटानें, खास, उघडपणें [अर अम्दन्]

**मुद्दी**—स्त्री (वे) रेशीम उकलण्याकरता लागणारी, लाकडी फळीवर बसविलेली खुंटी [का मुद्दे=गोळा]

**मुद्याळ**—वि कुरळे, कुरळ (केस) [मुदी]

**मुद्रण**—न छापण्याची क्रिया [स] ०**कला**-स्त्री दाबाच्या योगानें कागद किंवा मुद्रणयोग्य अशा इतर पृष्ठभागावर शाई किंवा इतर तेलरंग यांच्या साहाय्यानें अक्षरें अगर इतर आकृति वठविण्याची कला -ज्ञाको (म) १६५ ०**स्वातंत्र्य**-न आपल्या मतानुरूप मजकूर छापून प्रसिद्ध करण्याचा व्यक्तीचा अधिकार छाप खान्याचा हक्क, (इं) लिबर्टी ऑफ प्रेस 'परिस्थिती व प्रसिद्धी यांच्या दरम्यान मुद्रणस्वातंत्र्य आहे '-टिसु २०० **मुद्रक**-पु १ छापणारा २ छाप मारणारा [स] **मुद्रित**-न छापून झालेलें लिखाण, छापलेला कच्चा खर्डा, (इं) प्रूफ 'घाणेरडें मुद्रित शुद्ध करण्यापेक्षा फिरून सर्वच प्रत लिहून कंपोज करविलेली पुरवते '-केले १ २२६ -वि १ ज्यावर ठसा किंवा शिक्का मारलेला आहे असा. २ खूण केलेला; चिन्हांकित ३ मिटलेलें, बंद केलेलें (फूल, डोळा इ०)

**मुदस**—पु आनंदरस, आनंद, अनरस (?) 'मुदस कैचा त्याला मळल्याला भाकर मागति मुख पसरुनी।'-ऐपो ३७० [स मुद्+रस=आनंद पावणें]

**मुद्रा**—स्त्री १ ठसा किंवा शिक्का उठविण्याचें साधन २ छाप, शिक्का ठसा ३ शिक्क्याची आंगटी, ठसा उमटविण्याची आंगठी, (सामा) आंगठी 'इकूच मारुती सद्गुणस मुद्रा। वर्गी मग मुद्रा मज दावी।'-मोसीतागीत(नवनीत पृ २६०) ४ गोसावी लोकांचें लाकडाचें किंवा कासवाच्या पाठीचें कर्णभूषण, 'कान फाडुनिया मुद्रा त घालिती। नाथ म्हणविती जगामाजी।' -तुगा २८२९ ५ वैष्णव आपल्या अंगावर गोपीचंदनानें शंख चक्र, रामनाम इ० चे उठवितात त ठसे प्रत्येकी ६ नाणें, विशेषत रुपया उदा० ताम्रमुद्रा=पैसा, रौप्यमुद्रा=रुपया सुवर्ण मुद्रा '=मोहर पुतळी इ० 'औत्राटूनी श्रीकृष्णासी। अनंत मुद्रा याचकांसी। देऊनि आभार केले त्यांसी। मागों आणिकांसी विसरले।'-एरुस्व १७८ ७ चेहेऱ्याची ठेवण, चर्या; तोंडवळा ८ पूजेच्या वेळीं धेनु शंख इ० रूप करतात ती हाताच्या बोटांची रचना ९ कर्तृवाच्या दृष्टीनें रूप, आकार इ० 'ह्याची मुद्रा लहान आहे पण मोठ्या पुरुषाला जें होणार नाहीं तें काम आज ह्यानें केलें ' १० पदार्थ ओळखता यावा म्हणून त्याच्यावर केलेलें चिन्ह, खूण ११ कासली नावाच्या झाडाचें फळ, हें मुद्रेसारखें असतें १२ योगविद्येंत अथवा धार्मिक विधींत सांगितलेली कमरेच्यावरील भागाची हाताच्या बोटांची ठेवण किंवा विशिष्ट मुखचर्या या मुद्रा चार आहेत -गोचरी, अगोचरी, चाचरी, व ज्ञान कोणी कोणी खेचरी, भूचरी, चाचरी, अगोचरी, अलक्षी किंवा अलक्ष्य मुद्रा अशा मुद्रा मानितात याशिवाय ध्यानमुद्रा, शांतमुद्रा काममुद्रा, क्रोधमुद्रा इ० मुद्रांचे प्रकार आहेत [स] (वाप्र) ०**देणें**-१ दीक्षा देणें (विशेषत वैष्णव संप्रदायाची) २ वर्म सांगणें, गूढ ज्ञान सांगणें 'ते मुद्रा श्रीगोरक्षराया। दिधली मीनीं।'-ज्ञा १८ १७०४ ०**पडणें**-वळण येणें, चेहेऱ्यावर आविष्कार होणें 'बाहेर युक्तीची मुद्रा पडे। तंव आत सुख वाढे।'-ज्ञा ६ ३५ ०**लावणें**-समाप्ती सूचक शिक्का देणें, खूण करणें 'म्हणोनि नवमींचिया अभिप्राया। सहसा मुद्रा लावावया। विहाला मी वाया। गर्वं का करूं।'-ज्ञा १० ३२ सामाशब्द-**मुद्रांकित**-वि शिक्का असलेला, चिन्हयुक्त 'तुका म्हणे तैसा मी एक पतित। परि मुद्रांकित जालों तुझा।'-तुगा १३७३ **मुद्राचिरी**-स्त्री दानपत्र, बक्षीसपत्र (सही शिक्क्याचें) 'तो द्रोण द्रुपदा विनवी नम्रोत्तरी। कीं मज द्यावी मुद्राचिरी। जें बोलिला होतासि वक्त्रीं। अर्धराज्याची।' -कथा ५ ११ ६९ ०**दोष**-पु १ प्रसन्नतेचा अभाव २ लज्जा वगैर सारखा विकार 'छत्रपते, कर्तबगारीच्या आपल्या जगज्जेतृत्वापुढें धीटपणें उभे राहताना सुद्धा स्वतःच्या शून्यत्वामुळें मुद्रादोष पतकरावे लागतात '-शिवचरणी (पु पा गोखलेकृत) ०**धारी**-पु १ सरकारी कागदावर शिक्के मारणारा, सरकारी शिक्का ज्याच्या जवळ असतो तो शिक्क्यावरील अधिकारी (ह्यावरून सामा) कोणतीहि कोणताहि अधिकार, पदवी इ० चें चिन्ह धारण करणारा 'राजश्री मुद्राधारी व लेखक किल्ले चंदनगड यांसी आज्ञा '-बाहशाछ १ १०४ २ बाहू कपाळ, छाती इ०वर गोपीचंदनाच्या मुद्रा ज्यानें लावल्या आहेत असा (यावरून ल) ३ वैष्णव ४ मुद्रा इ० लावणारा किंवा करणारा आणि त्यायोगानें आपल्या धार्मिकतेचा गाजावाजा करणारा, दांभिक, भक्तीचा डेंभा मिरविणारा ५ पूजा किंवा ध्यान करण्यास योग्य अशी मुद्रा किंवा आव दाखविणारा ०**हीन**-वि १ ज्याचा चेहरा पाहून कोणाला त्याच्या विषयीं आदर किंवा दरारा वाटत नाहीं असा २ ज्याचा चेहरा टवटवीत दिसत नाहीं असा; विद्रूप चेहऱ्याचा **मुद्रिका**-स्त्री मुद्रा अर्थ १ ते ३ व ५, ६ पहा

**मुद्दुनिया**—क्रिवि (महानु) संक्षेपानें, सकळौनिया 'या कारणें बोलैन सर्वथा। मुदुनिया।'–ज्ञाप्र २०९

**मुंध, मुंधा, मुंधारा, मुंधारा**—बुध-बुधा इ० पहा

**मुधणें, मुंधविणें, मुंधाविणें**—उक्रि भोंक बुजविणें, भोंक भरणें, भरून यणें मुदणें, मुदविणें पहा

**मुधनी**—स्त्री (व) ज्यात दाडा बसवितात तें कुऱ्हाडीचें वाटोळें भोंक [मुदनी]

**मुधा**—क्रिवि व्यर्थ, फुकट, निरुपयोगी, वृथा 'सोडुनि वेडा छंद मनातिल खेद करावा मी न मुधा।'–मम ५१ [स मिथ्या, मृषा ?]

**मुधादित्य**—पु (महानु) सूर्याचें देऊळ (पैठण येथील), सूर्यदेवता 'मुधादित्या अवस्थान।'–चक्रधरचरित्र

**मुधाळ, मुध्याळ**—वि कुरळे (केंस) मुद्याळ पहा

**मुनकता**—स्त्री मिळवणी, जुळणी, मेळ 'परी उत्पन्न खर्चाची मुनक्ता। ठरावी पाहिजे तत्वता।'–पैमा १५ २६ [अर मुनक्का]

**मुनका**—पु निवाडा, फैसला 'एक महिन्याचा करार कीं जावसालाचा मुनका करून यावें'–रा २२ ६३ –क्रिवि साफ, संपूर्ण 'वहालीच्या सनदा होतील ते समयीं नजराण वगैरे जावसाल अवल मुनका करून मग सनदा यावयाच्या'–रा ७७३ [अर मुनक्का]।

**मुनमुन**—स्त्री, (पुणेरी, मडईतील) हाजीहाजी

**मुनवा**—पु केळीचा रोपा; केळवा, कवीला नवीन फुट लेला कोंब (कों) मोनवा, मोना

**मुनशी, मुन्शी**—पु १ फारशी भाषा जाणणारा चिटणीस, फार्शी पत्रव्यवहार करणारा पारसनीस २ अरबी, फारशी इ० भाषांचा शिक्षक [फा मुन्शी] **०गिरी**–स्त्री पारसनिशी, मुन्शीचें काम, हुद्दा, कौशल्य इ०

**मुनसफ मुन्सफ मुनसी(सि)फ मुनसूफ**—पु. खालच्या दिवाणी कोर्टांतील न्यायाधीश, (सामा) न्यायाधीश –वि न्यायी 'इमनी इन्स फी, त्याचे वल्ल्यारी हही मुन्सफ असतील'–ख ७ ३५७० [अर मुन्सिफ्] **मुनसफी-सिफी-वी-मुन्सफी-सिफि**–स्त्री १ न्यायनिवाडा, चौकशी 'काय गैरमाकूल वार्तेर होईल त्याची मुन्सिफी साहेबीं करावी'–रा ८ १० २ मुनसफाचा हुद्दा, काम ३ न्यायनिवाड्याचें प्रकरण

**मुना**—पु मुकाबला, नजरानजर 'ऐन ल्हाईच्या मुन्यास सर्कार कामावर नीळकंठराव दिवगत झाले'–ख ४ १७९८ [अर मुआयना]

**मुनादि-दी**—स्त्री दवंडी 'आपले शहरांत सलुख्याची मुनादी दऊन'–ख ७ ३५६९ [अर मनादी]

**मुनाफा**—पु १ नफा, फायदा, लाभ २ हित, कल्याण. ३ (व) शेत विकल्यावर कुळानें मालगुजारास यावयाचा पैसा [अर मुनाफआ, मन्फआ]

**मुनासब**—वि उचित, योग्य, रास्त, बरोबर, दुरुस्त, न्यायाचें [अर मुनासिब्]

**मुनि, मुनी**—पु १ ऋषि, यति, तपस्वी २ मनन कर णारा 'मज अवगमलिया दोनी। मीमांसा श्रवणस्थानीं। बोध मदामृत मुनी–। अली सेविती।'–ज्ञा १ १६ (महानु) मनन-शील, मौन्यशील 'भणे जगीं हुनी जन्ममरणा। मुनी रिगाले जेथा शरणा।'–ऋ १३ [म मुनि, स मन्=ज्ञान होणें; विचार करणें] **०श्राद्ध**–न १ मुनीनें केलेलें श्राद्ध यात ब्राह्मणाना दक्षिणेच्या मानानें अधिक श्रम करावे लागतात (याव रून ल) २ फार मेहनत आणि अतिशय काळजी घेऊन मुद्दा अगदीं थोडी मिळकत होणारें काम

**मुनिखिचडी**—स्त्री केशर, लवंगा, वेलदोडे, जायफळ इ० घालून केलेली श्रीमन्ती थाटाची खिचडी

**मुनीम**—पु एखादें काम, धंदा चालविण्यास नेमलेला इसम, गुमास्ता, व्यवस्थापक, व्यापाऱ्याचा प्रतिनिधि, अडत्या (इ) एजंट [अर मुनीब्] **मुनिमी**–स्त्री मुनिमाचा हुद्दा, काम

**मुनै**—न (महानु) शस्त्राचें कोचाळें, शस्त्राची अणी 'शस्त्राच्या मुनैवर घाली।'–आचार, टाचनीटीका ११

**मुन्कीर, मुनकीर**—वि नाकबूल करणारा, इन्कार करणारा [अर मुन्किर्]

**मुन्हेचे लोक**—पु अव आघाडीचे लोक, अर्थात् मातबर लोक –पेद १० ७१

**मुफत्**—क्रिवि १ फुकट, विनामूल्य २ धर्मार्थ [फा मफ्त्] **०चा**–वि विनामूल्य, वाजवी किंमत न देता घेतलेला

**मुफस्सल, मुफसल, मुफसील**—वि सविस्तर, संपूर्ण, तपशीलवार असलेला, पूर्णपणें सांगितलेला, लिहिलेला कल्मी केला मतालीव मुफशील जाहिरीस पाहोंचला'–पया ३८४ [अर मुफस्सल्]

**मुफाइजा**—पु कृपापत्र, इनायतनामा 'मुफाइजा इख्लाग केला तो उसुल जाहला'–रा १० १२७ [अर मुफावज़ा]

**मुफासला**—पु अंतर, तफावत, फरक, फेर 'आपले फौजेशीं व राजाच्या फौजेशीं साला कोसाचा मुफासला आहे'–दिमारा २ १६३ [अर]

**मुफीद**—वि हितकर, फायदशीर, फायद्याचें 'ती सल्ला दोन्ही उम्या दौलतींच्या तर्फियतेस नेक व मुफीद आहे'–रा १० २७८ [अर.]

**मुफ्ती**—पु न्याय, फत्वा देणारा; न्यायाधीश; बडा काजी; मुसलमानांतील कायदेकानू करणारा मुख्य. [अर. मुफ्ती] ०गिरी, **मुफ्तीगिरी**—स्त्री. न्यायाधिशी; उगव करणें किंवा निकाल देणें इ० कामगिरी.–वाडमा ४.१०६. **मुफ्ती पोशाख**—पु. साधा पोशाख, विशिष्ट नव्हे असा

**मुफसद**—पु फुण्ड, बखेडेखोर; बंडखोर. 'असा बंदोबस्त राखावा कीं कोणीहि मुफसद बादशाही मुलखात बंड न करूं शके.' –रा ८.१०१. [अर. मुफ्सिद्] **मुफ्सिदी**—स्त्री. बंडखोरी. –आदिलशाही फर्मानें. [फा.]

**मुंब**—पु. १ विशिष्ट घाटाचें मोठें मडकें २ विशिष्ट प्रकारचें गलबत. मुमडा पहा.

**मुंबई**—स्त्री विना. १ एक शहर. या शहराची अधिष्ठात्री देवी मुंबा ही आहे. २ (ल.) माणूस, पशु किंवा पदार्थ इ० बेपत्ता होणें ३ सत्यानाश; पूर्णविध्वंस. ४ धपके मारणें; खाडपट्टी काढणें ५ मनुष्याच्या चरबीपासून मत्म्य तयार करणें; मृतशरीराचे ईजिप्तमधील ममी प्रमाणें संरक्षण करणें. [जुन्या मुंबईतील वाटविण्याच्या व अंदाधुंदीच्या कारभारावरून हा अर्थ असावा. मिसरी 'ममी' शब्दावरूनहि कांहीं अर्थ संभवतात] [मुंबा] (पैशाची) **मुंबई करणें**, (पदार्थाची) **मुंबई होणें**–१ एखादा इसम बेपत्ता होणें. २ व्यापारादिकांत तो ठार बुडणें. (एखाद्या पदार्थाची) **मुंबई होणें–करणें**–त्याची न ताडी होणें-करणें **जिवाची मुंबई करणें**–चैन करणें, मजा मारणें (मुंबईस नवीन जाणारे लोक तेथें चैन करतात यावरून)

**मुबदला, मुबादला**—मोबदला पहा.

**मुंबर**—न (कु) तारुण्यावस्थेंत तोंडावर उठणाऱ्या पुटकुळ्या, तारुण्यपीटिका, मुरूम

**मुंबर, मुमर, मुमोर, मुमूर**—पु फुफाटा; जळजळीत तापलेली राख

**मुंबरो**—पु (गो) डांसासारखी चावणारी ल्हान माशी

**मुबल्लक-ख ग, मुब्लक, मब्लग**—नपु (हिशोबातील किंवा मिळवणीनीं) एकंदर रकम, एकूण बेरीज –वि विपुल, पुष्कळ, मनमुराद, अघळपघळ 'मब्लग मत्ता पाडाव केले' –सभासद १९ [अर मब्लघ=मोठी रकम]

**मुबा**—स्त्री मोकळीक, सदरपरवानगी, कायदेशीर माफी; वाटीहि करण्याची कोणेकाला असलेली बिनशर्त परवानगी; मुभा. २ बक्षीस, देणगी 'तरी तुमची वस्तभाव मुतलीचा तोडा आदिकरून जी स्वामींनीं दिली आहे ती मुबा केली असे' –ऐच १२५ [अर. मुबाह्=विहित]

**मुबारक**—पु सतोष, इनाम, बक्षीस –वि शुभ, मंगलदायी हाल; सुखी [अर मुबारक्] ०करणें–इनाम देणें 'शिर्के यासी गांव व महाल मुबारक करून त्याची कन्या महाराजांनीं आपले पुत्रास केली.' –चित्रगुप्त ५. ०बाद–बादी, **मुबरकबादी, मुबारकी–खी**–स्त्री. अभिनंदन; सुवार्ता; आशिर्वाद; संतोष. 'चार घटका मुबारकीच्या नजरा जाल्या.' –ख ९. ४६२५ [फा. मुबारक् बाद=मंगलदायक असो]

**मुबारत**—स्त्री. परस्परसंमत घटस्फोट,घातोडारांची वाटणी. –पेद ७५ [अर. मुबारात्]

**मुंब्रज**—मंबरेज पहा.

**मुमा**—मुवा पहा.

**मुमडा**—पु विशिष्ट तऱ्हेचें मोठें गलबत. मुंब अर्थ २ पहा.

**मुमाहिद**—वि. साह्यकारी. - आदिलशाही फर्मानें. [फा.अर. मुमिद=सहाय्यक]

**मुमीर, मुमूर, मुमर**—मुंबर पहा.

**मुमुर्ली**—पु (गो.) जाड व ल्हान भाकरी.

**मुमुर्दीलो-ल्लो**—वि. (गो.) हिरमुसलेला. [मुरमुसणें]

**मुमुक्षा**—स्त्री मोक्षप्राप्तीची इच्छा. [सं.] **मुमुक्षु-क्ष-मुमुक्षुजन**-पु मोक्षाची इच्छा करणारा, मुक्ति इच्छिणारा. 'बद्धचि होती मुमुक्ष...। भक्तिमार्गें।' –दा १.१.३४.

**मुमू**—न (कातकरी) पाणी. –बदलापूर १२८.

**मुमूर्षा**—स्त्री. १ मरण्याची इच्छा. २ मरणांतिक अवस्था. मरण्याच्या वेळची स्थिति [सं मृ=मरणें] **मुमूर्षु-र्षू, मुमूर्षित**–वि. १ मरूं इच्छिणारा. २ मरणाच्या द्वारीं पोंचलेला; ज्याचें मरण जवळ येऊन ठेपलें आहे असा; आसन्नमरण, मरणोन्मुख; मरावयास टेंकलेला

**मुम्ताझ**—वि विभूषित, प्रख्यात. –आदिलशाही फर्मानें. [अर. मुम्ताझ=निवडक, प्रख्यात, थोर]

**मुयदंड**—पु आटयापाटयाच्या खेळांतील सूरपाटी, सर्व पाटयांना मधोमध छेदणारी पाटी [सं. मूळदंड ?] **मुयदंड्या**–पु सूर धरणारा इसम, सुराच्या पाटीवरील इसम.

**मुयधोंडा**—पु गावाची हद्द दाखविण्यासाठीं पुरलेला दगड [मूळ+धोंडा]

**मुयर, मुय्यार**—वि (व.) १ निःसत्त्व, कमजोर 'मुयार कडबा' २ मुर्दाड, बेहिमती, निर्बळ, नालायक; कुचकामाचा. 'या मुयार पोरटयाच्या हातून नेटानें काम काय पार पडावयाचें आहे?' [सं मृत]

**मुयाल**—न (बे शेतींतील) १ बैल २ सारेलोटें.

**मुयेद**—न. (गो.) (२८ रु. किंमतीचें) नाणें.

**मुयीचें**—क्रि (गो) (पायांना) मुंग्या येणें, शरीराचा एखादा भाग विरविरणें

**मुरकट**—न चिलट, डास मूरकुट

**मुरकणें**—अकि १ एखाद्या गोष्टीला मनातून संमति असून तिजबद्दल लज्जेनें बाहेरून नापसंति दाखविणें, मनातून करावें यांचें असता बाधात्कारी विपरीत भासवून मुरडणें २ मुशीमध्यें सोनें इ० वज लागणें, वटाळू लागणें ३ (मावळी) वळणें, विशिष्ट बाजूस फिरणें 'मरळ जाऊन डाव्या हाताकडे मुरक म्हणजे तुला श्री महाकालेश्वराचें मंदिर सापडेल' [मुह =नाखुषी दाखविणें] **तोंड मुरकणें**-(एखाद्या स्त्रीनें) विनयशीलपणानें तोंड फिरविणें, मुरका मारणें **मुरका**-पु नखरा, अंग मुरडणें, लाजेनें किंवा विनयशीलपणानें तोंड फिरविणें (क्रि० मारणें)

**मुरका**—पु मुरकुट्यासारख्या बारीक माश्यांनीं मध साठवि ण्याकरिता झाडाच्या ढोलींत केलेलें ल्हान पोळें मुळकुटयें पहा

**मुरकी**—स्त्री गोसावी, बैरागी, वाणी, परदेशी इ० लोकांचा कानांत घालण्याचा एक अलंकार, बाळी, डूल [का मुरि=अंगठी, वळें]

**मुरकी**—स्त्री (संगीत) ततुवाद्यावर काणतादि स्वर वाजवीत असता त्याच्या मागच्या व पुढच्या स्वरास झटका देऊन त्या तीन स्वरापासून उत्पन्न केलेला मिश्र स्वर

**मुरकुंडी-ड**—स्त्री १ (उत्सुकता, फार हसणें असह्य थंडी, ताप अशक्तपणा, भीति आनंद इ० कारणामुळें होणारी) शरीराची संकुचित स्थिति, गात्रवैकल्य, शरीराचें संकोचन (क्रि० घालणें, मारणें, पडणें, वळणें) 'वाघ पाहताच त्याची मुरकुंडी वळली' २ भीड, दाटी, खेचाखेच ३ झुंड, उडयावर उड्या (विशेषत अव उपयोग) (क्रि० पडणें) 'अनेका हिंसाची सहज मुरकुंडी वरि पड।'-सारुह ६.१६२ 'अनंत फंदीच्या लावण्यावर हजारों माणसाच्या मुरकुंड्या पडत' ३ पाय मानेवर ठेवून बसण्याचें एक आसन, गुडघ्यात मान घालून व हात पायाभोंवतीं वेढून बसण्याचा प्रकार (क्रि० मारणें, घेणें वळणें) [का मुरि=वळणें] **०पाडणें**-जिंकणें 'विधि हराची मुरकुंडी। अनंग पञ्चकुसुमशरेंचि पाडी।'-जै ९ १०० **०वळणें**-१ देहभान नाहींसें होऊन पडणें २ भयानें भेदरून जाणें गर्भगळित होणें 'मुरकुंडी वसाची वळली। शस्त्रें हातींचीं गळालीं।'-ह ३ ११७ **मुरखंडी**-स्त्री मूर्च्छा, घेरी

**मुरकू(कु)ट**—न १ डास, चिलट कसरें २ (ल) (तिरस्कारार्थी) क्षुद्र मनुष्य क पदार्थ **मुरकुटी माशी**-स्त्री मध गोळा करणारी एक मुरकुट्यासारखी ल्हान माशी **मुरकुटयें**-न ह्या माशीचें मधाचें पोळें

**मुरक्का**—पु चित्राचें किंवा नकाशाचें बाधलेलें पुस्तक, बाधीव चित्रपुस्तक आलवम तसबिराचे मुरक्के दोन चार आले'-ऐटि ३ ५९ [अर मुरक्कअ]

**मुरक्रियात**—स्त्री (संगीत) एखादा मिश्र राग कोणकोणते राग मिळून तयार झाला आहे हें स्पष्ट करून सागणें

**मुरगळणें, मुरगाळणें**—उक्रि पिरगळणें, पिळवटणें, एकदम किंवा हिसका देऊन वळविणें, पिळवटून वाकडें करणें-होणें [का मुरि=वळणें] **(एखाद्याची मान-मुंडी) मुरगळणें-पिरगळणें-पिळणें**-एखाद्याचा सर्वतोपरी नाश करणें, त्यास ठार मारणें **मुरग(गा)ळा-पु** १ पीळ देऊन वाकडा केलेला भाग, पिरगळा, चोळामोळा २ वक्रता, वळण, कोपरा

**मुरगी**—स्त्री कोंबडी [फा मुर्घ्=पक्षी]

**मुरंगी**—१(पु)लाल तोंडाचा चवदार मासा २(कु)बारीकक

**मुरगुमी**—स्त्री (सोनारी) (सरी, वाकी इ० तयार करण्या करिता) पीळ घालून एकत्र केलेल्या दोन सुताची जोडी

**मुरट**—न (कों) झाडावर पडणाऱ्या रोगामुळें मुरडून वाकडें झालेलें पान, फळ इ० [मुरडणें]

**मुरटणें**—उक्रि १ (पान, फळ इ०) रोग मुळें वाकडें होणें, मुरडणें, सुरकुतणें २ एकदम वळणें, एकदम वळसा घेणें ३ पिळवटणें, एकदम पिळणें **मुरटा**—पु मुरटलेलें, खुरटलेलें, फळ (विशेषत काकडी)-वि मुरटलेलें, खुरटलेलें, वाकडें झालेलें **मुरटी**-स्त्री १ (कों) ज्याच्या योगानें पानें, फळें इ० मुरडून वाकडीं होतात असा झाडास होणारा रोग, मुरड

**मुरड**—स्त्री १ वस्त्र, कागद, भाकरी इ०चा दुमडलेला काठ २ रस्ता, नदी इ०चें वळण, वाक ३ दोरी, शरीर, गात्र इ०स दिलेला वळसा ४ पदार्थाचा घाट, आकार, ठेवण, घडण, ढब, घाटणी ५ एखाद्या कामातील कौशल्य ६ मिशाना दिलेलें आकड बाज वळण ७ जमीनीची वक्रता ८ अक्षराचें वळण ९ भाषणास दिलेलें निराळें वळण, भाषण संपविण्याकरिता, त्याचा ओघ वदलण्याकरिता दिलेलें वळण, भाषणाच्या ओघाला दिलेली निराळी गति १० वस्त्राचा काठ दुमडून घालण्याची एक प्रकारची शिवण ११ करंजी, कानवला इ०चे काठ जोडून वळवून घालतात ती घडी, दुमड, त्याच्या साऱ्यावर करतात ती नक्षी [का मुरि=वाकणें, वळणें]**०कानवला-कान्होला**-पु काठाला मुरड घातलेला कानवला (मुलगा मुलगी परगावास निघाली असता त्यांनीं लवकर परत यावें म्हणून जाताना त्याच्या ओंवगात मुरडकानवला देण्याची चाल असे त्यावरून) **०कानवला खाणें**-परगावाहून लवकर परत येणें **मुरडण-न-स्त्री** (शेती) पिकाची एक पात काढाव याची पुरी करून दुसरी काढण्यासाठीं पुन्हा परत फिरणें वावाच्या एका टोकास जाऊन औत परत फिरणें सामान्यत वळण, परती **मुरडणी**-स्त्री मुरडण्याची, दुमडण्याची क्रिया **मुरडणें**-उक्रि १ मार्गे वळणें फिरणें, माघारें उलटणें, परतणें 'मग तो मुरडला ऋषेश्वर। म्यालेपणें।'-कथा १ १५ ६२ २ मान मार्गे

बसून पहाणें 'यरा रमलें मुरडुनि तुज पहातें मुला वाहे।' –मोउद्योग १५६ ३ पिरगाळणें, वांकडें करणें, मागें वळविणें 'भरिच तैंचि मुरडितों नरडें।'–मोविराट ११०७ ४ दुमडणें, मुरगाळणें पदरा घालणें ५ मुरकुटणें, मुरडणें, आकसणें ६ (करंजी, कानवला इ०त) नक्षीदार मुरड घालणें, कांठ वळविणें ७ कागदाला घडया घालून रकानें पाडणें ८ पराभव करणें 'न क्षमनावरि भग्न मुरडेल।'–मोभीष्म ५ २० [का मुरि=वळणें, वळविणें पिरविणें] (अंग, नाक, मान, डोळे, हात, तोंड)

**मुरडणें**–अक इ० वांकडें करून नापसति दर्शविणें **मुरड (मुरूड)शेंग**–स्त्री एक औषधी शेंग(हिला मुरड किंवा पीळ असतो) असल्या शेंगचें झाड **मुरडा**–पु १ दुमड, पीळ, पिरगळा; वळ २ आमांशादि विकारानें आंतडीं पिळवटल्यासारखीं होऊन पोटात होणारी व्यथा पोटशूळ ३ पानें, फुलें इ० गुंडून टाकणारा, ऱ्हास होणारा एक रोग, मरटी **मुरडाण**-न–न १ वांकडी तिकडी, वळणाची जमीन २ नांगराची खेप (शेताच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकाला जाऊन परत पहिल्या टिकाणीं येणारी) अशा एका खेपनें नांगरला जाणारा जमिनीचा पट्टा, भाग **मुरडि(डी)व**–वि मुरडलेला, नागमोडी, पीळदार, पिरलेला, दुमडलेला; वांकडा 'मुरडीव गुण्डाळ सरळ।'–दा १२१२ **मुरडी**–स्त्री मुरडा, मुरटी, वगैरे वगैरेवर पडणारा एक रोग **मुरडु(डुं)गा**–वि (राजा) नखरबाज, मरडत चालणारा, ऐटबाज चालीचा नटूनथटून जाणारा

**मुरणें**—अकि १ (पाणी दूध तेल तूप रंग इ०) पातळ पदार्थ, वस्त्र भाकरी लाकूड जमीन इ०मध्यें शिरून त्यांत निविष्ट होऊन राहणें त्यांत जिरणें २ शापून पत्ता जाणें पाकांत घातलेल्या आंब्यात लोणच्याच्या फोडींत पाक किंवा क्षार भरला जाणें, किंवा जिरून सर्व भागांत पसरून असणें वाळणें ३ दुधाला चांगल्या त हेनें विरजण लागणें ४ पिकणें पूर्णत्वास येणें पक्क होणें, (बी) पूर्ण तयार होऊन वाळणें बीज दोन रोज ठेविलें म्हणजे मुरेल, मग परायास चांगलें ५ परिपक्वदशेस येणें; मूळचा खडबडीतपणा कच्चेपणा इ० जाऊन गुळगुळीतपणा येऊन (वस्तु)वापरण्यासारखी किंवा उपयोगी होणें, वस्तु नवीन असता तिचा कोरपणा वापरल्यानें जाऊन ती सरावाची होणें ६ गंभीर, स्थिरमनस्क, शांत होणें, नियतवृत्ति होणें विचारी होणें निवळणें ७ अभ्यासानें सवयीनें तरबेज होणें वाकबगार होणें, मुरब्बी होणें पूर्ण परिचित असणें 'हा मनुष्य ह्या कामांत मुरला आहे ह्यासव हे काम सांगावें ८ (राग, इच्छा, वासना इ०) दबणें, कमी होणें नाहींसा होणें दडणें ९ घाम आल्याशिवाय ताप कमी होणें, बारीक ताप अंगात राहणें १० (गळू फोड उठाणू इ०) फुटल्याशिवाय बसणें आंतल्याआंत दबून जाणें जिरणें ११ (चिन्नात) मग्न होणें, गढून जाणें १२ एखाद्या कामीं अवमानापेक्षां जास्त (मनुष्यें पैसा, पदार्थ) लागणें; अधिक नष्ट होणें १३ (ल) तृप्त होणें [स मूर्छ्] **मुरून बसणें**–हानवाय आंखडून आणि गुडघ्यांत तोंड घालून बसणें, मुसमुशी मारून बसणें **मुरी मारणें**–कांहीं कालपर्यंत स्वस्त स्वस्थ राहणें, दडणें; दडी मारून बसणें

**मुरता**— वि मुरला, मुरलेला, मुरगेला

**मुरद(दुं)ग**—पु पखवाज, मृदंग, नाल [स मृदंग]

**मुरद(दु)ग**—पु आटयापाटयांच्या खेळांतील सुरपाटी [स मृद्‌ंग] ०पाटी, **मुरदंड**–स्त्री आटयापाटयाच्या खेळांतील सुरपाटी, मधली मोठी उभी रेघ मुरदड पहा **मुरदं(दुं)ग्या, मुरदंड्या, मुदुंग्या**–पु सुरपाटी धरणारा गडी, सुरदुगपाटीवर फिरत राहून सुरपाटीच्या दान्ही बाजूंच्या विरुद्ध पक्षाच्या गड्यांना मारण्याचा प्रयत्न करणारा गडी

**मुरदा, मुरदाड**—पु मुडदा, मुडदार पहा

**मुरदाडणें**—सकि १ पिरगळणें मुरगळणें, ओरबाडून मोडणें, तोडणें 'त्या म्हशीनें तुवरी एका क्षण त मुरदाडल्या' २ (ल) नाश करणें, गांजणें, जुलूम करणें (या अर्थी माना या शब्दांशीं जोडून या शब्दाचा विशेष उपयोग करतात) [मुरडणें]

**मुरदाडणें**—सकि मुरदाडाप्रमाणें वागविणें, उपहास करणें; निर्भर्त्सना करणें, कमी लेखणें, हसून तिरस्कार करणें [मुरदाड]

**मुरदाडशिंग-शेंग, मुरदारशिंग मोदारशृंग**—न एक औषध शिशाचें प्राणिद [फा]

**मुरबा, मुरब्बा, मोरंबा**—पु साखरेच्या पाकात मुरविलेला आंबा इ० आम्रपाक, पाक [अर मुरब्बा]

**मुरब्बी-बी**—वि १ कैवारी, आश्रयदाता, पक्ष घेऊन बोलणारा 'तुम्ही मुरब्बी होऊन आलपहण यासीं बोल वें'–मदरु २३१ २ पोक्त, अनुभविक, माहितगार, हितेच्छु 'आपण आमचे मुरब्बी दोस्त, आमचें जेणें बरून चांगलें तें इच्छिणारे'–भाव १८३८ ३ मुख्य अधिकारी, दिग्दर्शक, संरक्षक पालक, वस्ताद 'दौलतींत मुरब्बी अमीर कोणी राहिला नाहीं'–पाव ८ [अर मुरब्बी]

**मुरमाड**—न मुरमाचा खडक मऊ झालेला खडक ठिसूळ खडक, जीर्ण कार [मुरुम] **मुरमाड-डी मुरमाडी**–स्त्री मुरुम असलेली जमीन बारीक ठिसूळ खडी असलेली जमीन (व ना) मुरमाटी, मुरमाटी

**मुरमु(मू)र**—स्त्री कुरकूर कुरबूर, कुरकूर; कुरकूर [ध्व]

**मुरमुरणें** अकि १ कुरकूर लावणें करणें पुटपुटणें कुरकुरणें २ कुसमुसणें धुसफुसणें

**मुरमुरा**—पु १ कुरमुरा २ खडलेला व भिजत घालून नंतर भाजलेला तांदूळ कुरमुऱ्यापेक्षां हा नाजूक असतो ३ भाजका

पोह्याचा दाणा ( एवढयाच अर्थी कांहीं लोक या शब्दाचा प्रयोग करतात ) [ स मुर्मुरक ] मुरमुरीत-वि चुरचुरीत

**मुरमुर्शी**—स्त्री १ ताप यण्याच्या अगोदर किंवा येऊन गेल्यानंतर वाटणारी ग्लानि ( क्रि० यणें ) २ अंगाचा संकोच करून बसणें, मुरगुशी पहा ( क्रि० मारणें ) ३ अंगाचा संकोच करून पडावेंसें वाटणें **मुरमुसणें, मुरमुसून पडणें-निजणें-बसणें-राहणें**-अक्रि १ मुरमुशी मारून बसणें, अंग आखडून बसणें २ तापामुळें ग्लानि यणें, मूर्च्छित होणें ३ मुखचर्या पालटणें, म्लान व उदासीन दिसणें, चेहरा फिकट पडलेला दिसणें

**मुरलो**—स्त्री ( कों ) नदीकाठचें एक प्रकारचें गवत

**मुरली, मुरळी**—स्त्री तोंडानें वाजविण्याचें एक वाबूचें, सुषिर वाद्य अलगुजाप्रमाणेंच याची सर्व बनावट असते हे आडवें धरून वाजवितात [ सं ]

**मुरवण**—न १ विरजण, दुधाचें घट्ट दहीं होण्याकरिता जें दुधात थोडेंसें ताक मिसळतात तें २ ( ल ) एखाद्याचा गर्व उत रण्यासारखी गोष्ट ३ पैशाची अफरातफर केलेली लपविण्यासाठीं सांगितलेली खोटी सबब, किंवा केलेलें ढोंग ४ अफरातफर, गिळकृत केलेलें द्रव्य ५ ज्यामध्यें बारीक सारीक दोष किंवा गोष्टी सहज लपविता, जिरविता येतात असें मोठया घडामोडीचें काम ६ बुड आलेली, खोट आलेली रकम ७ रोगट अपरिपक्व धान्य ८ आंब्याच्या अढींतील गवताचे थर तवाखू मुरण्याकरिता केलेली योजना, पिकविण्याकरिता, मुरण्याकरता किंवा उग्रता कमी करण्यासाठीं घातलेलें द्रव्य [ मुरणें ] **मुरवणें**-न मुरवण ( विशेषत पहिल्या तीन अर्थी ) पहा **मुरविणें**-सक्रि १ मुरत घालणें धान्य, तंबाखू इ० पदार्थ दडपून ठेवणें २ ( ल ) जिरविणें, गिळकृत करणें, मोठया खर्चाच्या बाबींत बारीक सारीक खर्च घुसडून लबाडीनें पैसा खाणें ३ फसवेगिरीनें पैसा खर्चणें खाणें

**मुरवत**—स्त्री भीड, संकोच, पर्वा, भय आदर ( क्रि० बाळगणें, धरणें राखणें )

**मुरवन**—न १ ( माण ) कणसें न आलेला कडबा २ मुरवणा मुराण पहा

**मुरवा**—पु ( कों ) १ कोंवळ्या भाजीपाल्याचा समुदाय २ मरवा

**मुरवा**—पु ( व ) गुराच्या खुराच्या मागचा नखासारखा भाग, नख्या

**मुरवा**—पु ( कु ) मासरस

**मुरसड-डी**—स्त्री मूर्च्छा,झीट ( क्रि०यणें ) [ स मूर्च्छा ]

**मुरसा-स्सा**—वि रत्नजडीत [ अर मुरस्सा ]

**मुरळी**—स्त्री खंडोबाला वाहिलेली स्त्री, भक्तीण, देवदासी [ स मैराल=मल्लारि ( खंडोबा ) मैराली ( स्त्री ) =मुरळी, का मरळी ] ०**महार**-पु खंडोबाला वाहिलेल्या महार स्त्रीपासून झालेला महार -अस्पृ ३४

**मुरा, मुरामासा**—पु गोडया पाण्यातील एका जातीचा मासा

**मुराण**—न अगदीं कोंवळेपणीं रोगानें जळलेलें शेत ( व ड म्हणजे कणसें येण्यापूर्वी चरच वाढल्यावर खुरटलेली जोंधळा, बाजरी इ०ची ताटें ); मुरवण, मुरवन पहा [ मुरणें ]

**मुराद**—स्त्री ( अशिष्ट ) इच्छा -वि विपुल, पुष्कळ, इच्छे प्रमाणें भरपूर ' हस्तनापूरचा बदोबस्त हातास आला म्हणजे मुराद सर्व गोष्टी व मनसबा हासल होईल ऐसें आहे -रा ८ २०३ [ अर मुराद् ] मनमुराद-वि यथेच्छ, भरपूर

**मुरापा**—वि ज्याचे मागील पाय कोंबडयाच्या पायाप्रमाणें नीट असतात असा ( घोडा ) असा घोडा चांगला समजतात -अश्वप ११०३

**मुराबट्टी**—स्त्री मातेरें घाण, नाश ' कारणीनें आगर ग्याची अगदीं मुराबटी केली '

**मुराबा**—पु मुरबा पहा

**मुरारि-री**—विना पु मुर नावाच्या दैत्याचा शत्रु, श्रीकृष्ण [ स मुर+अरि ]

**मुरास**—पु सह्याद्रीच्या पूर्वेकडील दऱ्याखोऱ्याचा प्रदेश मुर्हे पहा

**मुरी**—स्त्री अंगावर खवले नसलेला मासा -बदलापुर १२३

**मुरी**—स्त्री हातपाय आखडून व डोकें गुडघ्यांत घालून बसणें, मुरगुशी ( क्रि० घालणें मारणें, मारून बसणें ) [ मुरणें ]

**मुरीद**—पु शिष्य चेला मौलवीचा चेला गोविंदगीर मुरीद कमलनयन -रा १८१३४ [ अर मुरीद् ]

**मुरीन**—पु ( गो ) कोंब यण्यापूर्वीची नारळाची स्थिति मुरून पहा

**मुरुडणें, मुरूड, मुरूडशेंग**—मुरडणें, मुरड, मुरडशेंग इ० पहा

**मुरूमुरू**—क्रिवि ( व ) थोडथोडें

**मुरूवत मुरोवत मुरोत**—स्त्री मुरवत पहा

**मुरून मागाद**—पु ( गो ) आतल्या आत वाढलेला नार ळाचा कोंब नारळाच्या आतील पाणी संपल्यावर हा कोंब मधील सर्व जागा व्यापतो हा खातात

**मुरूम**—पु १ घट्ट मातीच खडे बुरख काळया पत्थराचें रूपांतर होऊन झालेली टणक माती किंवा खडे मुरमाचे प्रकार- कोंडया उडया, काळा, तांबडा दगडी, लोखंडी इ० २ तारुण्यात तोंडावर उठणाऱ्या पुटकुळया तारुण्यपीटिका यास मुरमाची पुळी, पुटकुळी किंवा मुरमाचा फोड असेंहि म्हणतात

**मुरली-ळा, मुरळी**—स्त्री (कों) विळी, भाजी इ० चिरण्याकरता लाकडी ठोकळ्यात किंवा पाटाला एक पातें उभें बसवून दी केलेली असते मोरळी पहा

**मुर्गी**—स्त्री कोंबडी मुरगी पहा 'मुर्गीस विस्मिल्ला तो कशास?।'-हाकै ११ [फा मुर्ग=पक्षी]

**मुर्चा**—पु मोर्चा, तोफांचा मारा 'राजश्री पतप्रधान व चिरंजीव पिलाजी व मोंगल भाऊ ऐसे हिंगणघाटावरी येऊन मुर्च लाविले आहेत'-१९२ [अर मूर्चा]

**मुर्तोळी, मुहुर्तवळी**—पु (कों) पाणजावई, टोकणा 'उठावणाच्या वेळीं मुर्तोळी उर्फ मुहुर्तवळी आणि वर एका पाना वर जेवतात'-ममाप ४ २५४

**मुर्दा, मुर्दाड-र, मुर्दफरास**—मुडदा, मुडदार इ० पहा

**मुर्दाडी**—स्त्री मेलेल्या जनावराचें कातडें -ज्ञाको (क) २५९

**मुर्दुंगपाटी**—स्त्री आटापाट्या मुरदुंगपाटी पहा 'हें क्रिकेट, टेनिस, हुतुतु मुर्दुंगपाट्या, विटिदांडू, खोखो वगैरे व्यायामशील खेळांमधलीं झालें'-आगर ३ १६२

**मुर्मुरी जाणें**—क्रि (वर) रागावणें

**मुर्वत**—स्त्री माणुसकी, सभ्यता, मुरवत पहा [अर मुरूवत] ०दारी-वि माणुसकीनें युक्त [फा मुरवत+शिआर]

**मुऱ्हा, मुसकी, मुंगसें**—स्त्रीन बैल शेतात काम करीत असताना त्यानीं पिकास तोंड लावू नये म्हणून त्याच्या तोंडाला घालण्याची जाळी, म्होरकी

**मुऱ्हाळी-री**—पु १ श्रीविष्णु [स मुरारी]

**मुऱ्हाळी-री**—पु नवऱ्यामुलीचा भाऊ २ नवीन लग्न झालेल्या मुलीच्या बरोबर पाठराखणें गेलेलें मनुष्य ३ माघारी, नवरीला सासरीं अगर माहेरीं नेण्याकरता आलेला इसम ४ पाचारण, बोलावणें [स मूळहारी, मूळारी] ०मान-पु वधूच्या भावाला किंवा त्याच्या जागेवरील दुसऱ्यास मान म्हणून द्यावयाचा आहेर कापडचोपड इ० **मुराळशी**-स्त्री पाटलाच्या घराण्यातील सुना, लेकी, सासरीं-माहेरीं नेण्या-आणण्याचें काम

**मुऱ्हें**—न १ धुकें २ सह्याद्रीच्या लगतचा प्रदेश हा प्रदेश म्हणजे सह्याद्रीच्या माथ्यापासून पूर्वे बाजूस पायथ्यापर्यंत व त्यापुढेंहि ४।५ मैल पर्यंतचा पट्टा हा पुढें मावळांत समाविष्ट होतो या प्रांतात पावसाळ्यात नेहमीं धुकें असतें यामुळें या प्रदेशाला हें नाव पडलें 'आता आदिमुऱ्ह्याचीं आदिदैवत।'-सप्र ५ २

**मुलकणु-फन्-कर**—क्रिवि सौम्यपणानें मंदपणें गालांतल्या गालात (हसणें) [ध्व] **मुलकणें**-अक्रि मंदस्मित करणें

**मुलकी-खी**—वि १ स्वतःच्या मुलुखातील स्थानिक परप्रांतातील नसलेलें, देशी २ गैर फौजदारी, वसुलासंबंधींचा, जमाबंदीबाबत, चिटनिशी नव्हे तें [मुलूख] ०कोर्ट-न चालू वहिवाट, खंडवसुली वगैरे बाबतींतील दावे चालविणारें मामलेदार किंवा महालकरी यांचें कोर्ट ०चाकरी-स्त्री लोकांकडून मुलखाकडून येण्याचा वसूल ०लाट-पु गव्हर्नर जनरल, व्हाईसरॉय

**मुलगा**—पु १ पुत्र, छोकरा, लेक २ साधारणतः सोळा वर्षांखालील पुरुषव्यक्ति ३ गुलामस्त्रीचा पुत्र [स मूलक]

**मुलगी**—स्त्री १ कन्या २ बाराचौदा वर्षांची, अविवाहित स्त्री ३ सून (सायूसासरा सुनेस संबोधनार्थी मुली म्हणतात) 'काळें पदार्थ दिधला होता तेणेंचि तो मुली नला।'-मोसौ ३ ६९ ०उजविणें-मुलीचें लग्न करून तिच्या ऋणातून मुक्त होणें ०गळ्याशीं-गळीं लागणें-मुलगी उपवर होणें, विवाह लाग नीवर टाकता येणें कठीण होण्याइतकी मुलगी मोठी होणें ०मागून येणें-मुलीच्या बापानें किंवा नातलगानें, आमची मुलगी स्वीकारा अशी मुलास किंवा मुलाच्या तर्फे कोणा माणसास विनंति करणें **मुलगें**-न मूल **मुलें**-नअव मुलगे आणि मुली मूल आणि मुलगा हे शब्द एकमेकांबद्दल योजतात परंतु त्यातील फरक असा-मूल=म्हणजे कोणतेंहि लहान मूल व मुलगा म्हणजे पुत्र, कोणाचा तरी लेक या अर्थी योजतात

**मुलजमत**—स्त्री (ल) सेवेसीं हजर होणें, भेट मुलाजमत पहा [फा मुलाझमत]

**मुलतानी**—स्त्री (संगीत)एक रागिणी, राग ह्या रागात षड्ज, कोमल ऋषभ, कोमल गंधार तीव्र मध्यम, पंचम, कोमल धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात आरोहात ऋषभ, धैवत वर्ज्य, जाति औडुव-संपूर्ण वादी पंचम, संवादी षड्ज गानसमय दिवसाचा चवथा प्रहर -वि मुलतान देशासंबधीं [मुलतान] ०कमान-स्त्री एक प्रकारचें धनुष्य 'मी मुलतानी कमान करून बसवटी।-सला १ ०माती-स्त्री एक प्रकारची चिकण माती

**मुल्ला, मुलाणा-ना**—पु १ मुसलमान जातीचा धर्मगुरु किंवा धर्मशास्त्रवेत्ता, मुला २ मुसलमान पंतोजी, शिक्षक ३ बारा बलुतेदारापैकीं एक हा जातीनें मुसलमान असतो, गावातील मशिदी पीर, यांची व्यवस्था हा पहातो आणि मुसलमान लोकांचीं धर्मकृत्यें व लग्नें याच्याच देखरेखीखालीं होतात -ज्ञाको (म) १७९ [अर मौलाना]

**मुलाईम मुलायम**—वि १ मृदु मऊ, नरम दबणारा २ नाजूक उत्कृष्ट, सुरेख कोमल [अर मुलायिम्]

**मुलाक(ख)त मुलाखात**—स्त्री भेट, गांठ बोलचाली विचारपूस मुलाजमत [अर मुलाकात्]

**मुलाजम(मा)त**—स्त्री १ भेट २ सरकारी नोकरी, कर्तव्य, काम तत्परता ३ सलामी ४ दिवाळें काढलेल्य

कर्जदारावर सावकाराची (त्याची काहीं मालमत्ता आहे काय किंवा त्याला मिळण्यासारखी एखादी मिळकत आहे कीं काय अशा तऱ्हेची) सारखी असलेली नजर [अर मुलाझमत्=तत्परता, सेवा]

**मुलाजा, मुलाइजा, मुलाहिजा**—पु १ पर्वा, मान, विचार, आदर, २ क्षमा, गय ३ दुर्लक्ष, उपेक्षा 'मुलाइजा न करावा म्हणजे माणूस खबरदार असतें'—मराआ १६ [अर मुलाहझा]

**मुलाणा**—पु मुल्ला पहा

**मुलाम**—वि मुलाईम पहा 'मुलाम नयणी जड मज झाली नाकाच्या छिद्रा।'—पला ९३

**मुलामा-म्मा**—पु धातुमार्जनम्, एका धातूच्या पदार्थावर दुसऱ्या धातूच्या रसाचा दिलेला पातळ थर, सोनें, रुपें इ० चें इतर धातूच्या वस्तूवर दिलेलें पाणी 'मुलाम्याचें नाणें। तुका म्हणे नव्हे सोनें। —तुगा [अर मुलम्मअ] **मुलामगिरी**—स्त्री मुलाम्याची कृति —वि मुलाम्याचा 'सेवकास मुलामगिरी हत्यारें याची आवड फार आहे'—पेदसमा ५२ **मुलामी-म्मी**—वि १ मुलामा दिलेला, सोन्याचादीचें पाणी दिलेला २ दिखाऊ, दिसण्यात मात्र चागला असा

**मुलायम मुलायीम**—वि मुलाईम पहा

**मुलारत**—वि पुढील एक पाय पाढरा असलेला (घोडा) पुढील डावा पाय पाढरा असणें वाईट परतु उजवा पाढरा असल्यास चागलें लक्षण मानतात —अश्वप १ १०३

**मुलाहिजा**—पु १ तपास, चौकशी, प्रेक्षण २ इतर अर्थांकरिता मुलाजा शब्द पहा [अर मुलाहझा] **मुलाहिजा का आदमी**-पु सभ्य मनुष्य

**मुलुमुलु**—क्रिवि (बालभाषा) (व) मोठ्या आवडीनें, गोडीनें 'तितकाच तुकडा मुलुमुलु खाश' [ध्व]

**मुलूक-ख**—पु १ प्रात, देश, राज्य २ स्वदेश, स्वतःचा प्रात [अर मुल्क्] ०उठणें-मुलूख ओसाड पडणें **मुलखात दिवा लावणें**-ओसाड प्रदेशात वस्ती करणें, निर्जन प्रदेश वसविणें **मुलखास जाणें, मुलखात जाणें**-स्वदेशास किंवा आपल्या प्रातामध्यें जाणें सामाशब्द ०गिरी स्त्री १ देशपादाक्रमण परदेश जिंकणें २ सैन्याचें कूच मोहीम स्वारी ३ सारा वसुलीसाठीं सरकारनें पाठविलेल्या तुकडीचा प्रवास ४ व्यापारी यात्रेकरू इ० चा प्रवास, देशाक्रमण, देशाटन, (सामा) प्रवास [फा मुल्+गीरी] ०दार-पु. दौलतवत, सरदार जहागिरदार ०दारी-स्त्री राज्यव्यवस्था ०परखा-वि हद्दपार केलेला ०मैदान, मलिक मैदान-विना स्त्री १ ह्या नावाची विजापूरयेथील सुप्रसिद्ध तोफ हिच्या तोंडाचा व्यास ८ फूट ८ इच आहे व पोकळीचा किंवा गर्भाचा व्यास २ फूट ४ इच आहे २ (ल) मोठमोठ्यानें बोलणारी, भाडखोर स्त्री, जहावाज स्त्री, तोंडाळ बायको [अर मलिक-इ-मैदान=देशाचा राजा, रणराज] ०मैदान-न १ प्रदीर्घ सपाट भूप्रदेश, सपाट प्रात, पटागण, २ झाडी नसलेला भूभाग, ओसाड प्रदेश 'रान तोडून मुलुख मैदान केलें' [अर मुल्क+मैदान] **मुलखाचा**-वि अतिशय, फार, पुष्कळ 'किति सागू हो गुण बाळाचे हरी मुलखाचा।'—मृ ६३ **मुलखानिराळा**-वि सर्वाहून भिन्न, चमत्कारिक, कोठेंहि न आढळणारा

**मुल्कात**—स्त्री प्रात, विलायत 'हे कदीम मुल्कात दोन्ही'—इम ६६ [अर]

**मुल्की**—मुलकी पहा

**मुल्कीर**—वि नाकबूल, मुन्कीर. 'तो मुल्कीर जाला कीं इतला नाहीं'—रा १ १९९ [फा मुर्]

**मुल्जीम**—वि लाचार, हतधैर्य, दीन 'ऐसें पश्चवादें पुसता मुल्जीम होऊन आपल्या मुखें एकार केला'—रा २० ६५ [अर. मुल्झम्]

**मुल्तवी**—वि तहकूब, पुढें ढकलला गेलेला 'हा जाबसाल मुल्तवी राहिला'—रा ७ ३५ [अर, मुल्तवी]

**मुल्ला**—पु मुलाना पहा ०गिरी-स्त्री मुलाण्याला मिळणारें वतन

**मुल्हन**—न (व) पोकळ, बारीक व निःसत्व असा तुरींतील दाणा, मुकणा

**मुवाफिक**—वि योग्य, जुळता, उचित, समर्थ, जुळण्यासारखा [फा]

**मुशक्स, मुश्कस**—वि निश्चित, ठरविलेला, मुकर 'खडणी मुशक्स करणें म्हणोन आज्ञा'—पेद ७ ३० [अर मुशख्खस्]

**मुश(स)कील, मुश्कील**—स्त्री अडचण, पचाईत, सकट अवघड गोष्ट 'लष्करात फिरावयाची मोठी मुश्कील, जागाजागा चौकीपहारे बाजपूस होते'—ऐटि ३ ५० —वि कठिण, दुर्घट, अवघड अडचणीचा [अर मुश्किल] **मुश्किलीनें मुश्केलीनें**-क्रिवि अडचणीनें, सकटानें 'पल्टणें बहुत मुश्किलीनें गाडर याजपाशीं जाऊन पोहोंचलीं'—दिमरा १ ३८ [फा मुश्किली]

**मुशजर**—न वेलबुट्टीचें काम केलेलें रेशमी कापड [फा मुशज्जर]

**मुशांड**—न (गो) ढोंग [स मृषा?]

**मुशाफर**—पु प्रवासी, वाटसरू, फिरस्ता, सफर करणारा [अर मुसाफिर्] ०खाना-पु १ धर्मशाळा, सराई वाटसरूस उतरण्याची जागा २ खाणावळ ३ डाकबगला **मुशाफरी**—स्त्री १ प्रवास देशाटन 'मुशाफरीत वय न्यावें, नित्य नवें

उदक व मर्वे दृष्ट व हेरियाची सावली अनुभवावी '-पया४१७ २ प्रवासीपण -वि प्रवासासबंधीचा, प्रवासासबंधीचा, प्रवासी [फा मुसाफिरी ]

**मुशारा मुशाहिरा**—पु १ मासिक वेतन, पगार, २ मजुरी, रोजमुरा ३ वर्षासन ' हा गांव यद्दल मुशाहिरा, एकूण दोन्ही गाव तुम्हाकडे आहेत '-वाड्सगा ८८ [अर मुशाहरा] म्ह० मुख पाहून मुशारा आणि घोडा पाहून मराग **मुशार खोर**-पु नोकर, चाकर, पगार घेऊन ठेवलेला मनुष्य **मुशारपण**-न मजुरी

**मुशी**—स्त्री खाऱ्या पाण्यातील एका जातीचा मासा हा दीड वीत लांब असतो याच्या बारा जाती आहेत त्यांतील काहींची नावें-कान, डाग डोर शोरी, तावस दरवड, मगर, वाघ, शिर वग इ० या माशाला गाव्याकडे मोरी म्हणतात

**मुशीर**—पु मंत्री, सल्लागार -आदिल्शाही फर्मानें [फा ]

**मुश्क, मुष्क**—पु कस्तूरी [फा मुश्क् स मुष्क=अंड ] ०दाना-पु एक प्रकारचें अत्तर

**मुश्फक, मुश्फीक**-वि कृपाळु मेहरबान [अर मुश्फिक्]

**मुश्रि(र्शी)फ**—पु १ दप्तरनीस २ कारभीन खर्च [अर ]

**मुषकी**—वि आयाळ दुमसहित सर्व काळ्या रंगाचा (घोडा) -अश्वप १ १० ०अयलख-क-वि, कमीजास्ती काळा-पांढरा असलेला (घोडा), असल्या रंगाचा कार्यसिद्धि करणारा असतो -अश्वप १ १० ०पंचकल्याण-वि दुम-आयाळसुद्धा काळा असून डोळे मनुष्यासारखे आणि चारी पाय पांढरे व कपाळावर पांढरा ठिपका असलेला ( घोडा ) -अश्वप १ १०

**मुषादिरदार**—पु ( जातारी विणकाम ) माल्ठ वगैरवर सुटे वगैरे उठविताना निरनिराळे चाळे वर-खाली करण्यासाठी त्यांच्यावरचे वजन कमीजास्त करणारा मुलगा ( इ ड्रॉवाय ) हल्ली सुधार केल्या मागावर हीं मुलें लागत नाहीत

**मुष्कर**—पु मोठ्या अंडाचा, लड्ठ, स्थूल ( मनुष्य ) ' भीम टोणपा मुष्कर । व्हावया जाला तरी काय । '-ययादी ११८३ [स मुष्क=अंड, अंडकोष]

**मुष्टि**—स्त्री पु १ मूठ हाताची बोटें मिटली असता होणारी रचना २ मूठभर धान्य इ० पदार्थ भरलेली मूठ ३ शस्त्र इ०चा हातात धरावयाचा भाग मूठ कबजा, परज, दांडा, धनु मुठ्या ४ बुक्की [स ] सामाशब्द- ०का-स्त्री १ मुष्टि शब्द अर्थ १ ते ३ पहा २ लहान मूठ ०घात प्रहार-पु मुठीनें मारलेला धक्का, गुद्दा, बुक्की मुठीचा तडाखा तयेंचि मर्दिला मुष्टिघातें राहु आणि केतु । इत्यादी आले धावतु ।' ०प्रयोग-पु १ मुष्टिचा घात २ मूठ मारणें, जारणमारणातील एक क्रिया अभि मंत्रित उडीद, तांदूळ मूग दाणे इ० घेऊन ते एखाद्यावर-त्याचा नाश करण्याकरिता-फेंकणें ०मैथुन-न मुठ्या मारणें. ०मोदक-पु (विनोदानें) गुद्दा, ठोसा ( ठोसे देण्यासाठी मूठ वळली म्हणजे तिचा आकार काहींसा मोदकासारखा होतो यावरून ) ( क्रि० देणें ) ०स्वस्तिक ( संयुक्त हस्त )-न ( नृत्य ) स्वस्तिकाच्या हात योडेसे आखडून व वांकडे करून मनगट टाकर टाकणें मुष्टि(हस्त)-पु ( नृत्य ) हाताचीं सर्व बोटें मिटून तळहातास चिकटवून ठेवणें व त्यावर आंगठा ठेवणें

**मुसकट-ड-ल, मुसकाड-काडी मुसकुटी मुसक्ट**—नपुंस १ जनावराचें तोंड, जनावराचा डोक्यापासून तोंडापर्यंत तचा भाग २ ( तुच्छतेनें ) मनुष्याचें तोंड किंवा गाल, गालफड [स मुख, फा मुख ] **मुसकट घेणें**-( माण ) वस्त्रानें सर्वांग तोंडासहित झाकून घेणें **मुसकटणें, मुसकाटणें मुसकुटणें**—सक्रि १ तोंडात मारणें, मुसकाड फोडणें २ -अक्रि ( वस्त्रानें ) तोंड झाकून घेणें, मुसकणें

**मुसकणें**—अक्रि वस्त्रानें तोंड झाकून घेणें, तोंड आच्छादणें -अक्रि रागानें किंवा तिरस्कारानें तोंड एकदम वळविणें, तिट कान्यानें एकदम परत फिरणें, माघारी जाणें [ मुसकट ] **मुसकाड फोडणें-फिरवणें**-तोंडात, कानशिलात मारणें ०सुजविणें-जोरानें तोंडात मारणें, गालफड सुजविणें **मुसकाडीत देणें**-तोंडात थोबाडीत मारणें, थोबाड रंगविणें **मुसकटातली वासकट बाहेर पाडणें**-( व ) ( निदार्थी) आपलें म्हणणें दुसऱ्याला कळविणें मुसकटातली वासकट पडू दे या एकदा बाहेर ' **मुसकटदाबी**-स्त्री १ एखाद्याला बोलू किंवा खाऊ न देण्यासाठीं त्याचें तोंड दाबणें २ ( ल ) विचारस्वातंत्र्य आणि लेखन स्वातंत्र्य यांना सरकारच्या कायद्यानें झालेली बंदी जुलूम, गळा धरणें **मुसकटदाबीचा कायदा**-पु अन्यायाचा किंवा दडपेगिरीचा न्याय लेखन-भाषणाचें स्वातंत्र्य हिरावून घेणारा कायदा

**मुसकंडी, मुसकाडी**—स्त्री मुसडी, मुसाडी पहा

**मुसकें मुस्कें, मुसकी**—नस्त्री १ उभें पीक असलेल्या शेतात किंवा मळणीच्या वेळीं बैलाच्या तोंडास व बांधावयाची जाळी, म्होरकी, मुंगा पहा २ तोंड ( गुराचें, माणसाचें ) [मुख ]

**मुसक्या**—स्त्रीअव कैद करताना पाठीमागें वळवून बांधलेले हात (क्रि० आवळणें बांधणें ) ( याचें मुसकी असें एकवचनी रूप सहमा योजण्यात येत नाहीं ) [ हिं ]

**मुसज्जर**—पु एक प्रकारचें वेलपत्ती असलेलें रेशमी वस्त्र ' सिरसाफ मुसज्जर मदिल वरि छीट जरी दुपटे भरतें । '-अवक २ जिकरकृत शुश्रमाषावाद २८ [अर ]

**मुसंडा**—पु १ पाण्याचा जोराचा लोंढा, जोराचा मोठा प्रवाह २ ( ल ) गर्दीतून जोरानें घुसणें ३ डोक्यानें मारलेला ठोसा ( क्रि० मारणें, देणें ) ४ प्रतिकारास टक्कर देण्याकरितां

जमलेला समुदाय **मुसंडी, मुसांडी–ड**–स्त्री १ डोकें पुढें करून व शरीर वाकवून जोरानें गर्दीत शिरणें (क्रि० मारणें, देणें, मारून घुमणें, शिरणें) २ जोरानें गर्दीत शिरण्यासाठीं डोकें पुढें घालून व शरीर किंचित वाकवून केलेली शरीराची ठेवण ३ डोक्यानें दिलेला रट्टा [फा मुसुंडी=चेहरा]

**मुसंडा**—पु (निंदार्थी) मुसलमान

**मुसंडि**—स्त्री (गों) पंचरसी छोटें घमेलें

**मुसनमान**—पु मुसलमान शब्दाचा अपभ्रंश

**मुसना–न्ना**—पु १ दुहेरी नक्कल 'एक मजकुराचे दोन कागद, त्यास मुसना म्हणतात'–पदमव १०० २ साराश, संक्षिप्त हकीकत [अर मुसना]

**मुसंबे, मोसंबे**—न नारिंगाच्या जातीचें एक फळ, साखरलिंबू, (इ) माल्टीज याचा रस पाचक आहे [मोझांबिक या देशाच्या नावावरून]

**मुसमारणें**—अक्रि तापामुळें, थडीमुळें गुडघे पोटाशीं घेऊन व अंगावरून पांघरूण घेऊन निजणें, मुरमुसणें

**मुसमुशी, मुसमुस**—स्त्री तारुण्याचा भर, तारुण्यानें, तालीमबाजीनें अंगात संचरणारी रग, शक्ति, भर, ज्वानीचें तेज **मुसमुशीत–मुसमुसलेला**–वि भर ज्वानीचें तेज असलेला

**मुसमुस**—स्त्री १ स्फुरन, मुळु मुळु रडणें २ बारीक बारीक पुटपुट, गुणगुण [ध्व] **मुसमुसणें**–अक्रि १ तारुण्याच्या भरात असणें, ऐन ज्वानीचा जोम असणें २ जोरात असणें, भरात असणें 'काम खवळे धनापाशीं। अहर्निशीं मुसमुसित।' –एभा ?३ २५० ३ रागानें संतप्त होणें, क्रोधानें जळणें ४ स्फुरणें, मुळु मुळु रडणें ५ अधस्पष्ट गुणगुणणें, पुटपुटणें

**मुसरें**—न खरकटें [का मुसरी]

**मुसल**—न मुसळ पहा

**मुसलमान, मुसल्मान**—पु इस्लामी धर्माचा अनुयायी [फा मुसुल्मान्] (**एखाद्याला मारून मुटकून किंवा दाबून) मुसलमान करणें**–एखाद्याला त्य ची इच्छा नसता एखाद्या कृत्या कड वळविणें, संमति देण्यास भाग पाडणें **मुसलमानी मुसल्मानी**–स्त्री इस्लाम धर्म, इस्लाम सत्ता 'हजरतानीं दीनचा पक्ष सोडून मऱ्हाठ्यांचा पक्ष धरिला आहे हे गोष्ट मुसल्मानीस ठीक नाहीं'–दिमरा १ २६७ –वि मुसलमानासंबधींचा [फा मुसुल्मानी] **मुसल्या, मुसंड्या**–पु (निंदेनें) मुसलमान

**मुसवर, मुसंवर, मुसव्वर**—पु चित्रकार, चितारी. 'तेथें मालिटाकडून मुसव्वर आला होता'–ख ९ ४७१८ [अर मुसव्विर] **मुसव्वरी**–स्त्री चित्रकाम [फा मुसव्विरी]

**मुसळ**—न १ तांदूळ इ० सडण्याकरिता, गोल व लांब लाकूड घेऊन त्याच्या टोकाला वसवी किंवा माहळ बसवून केलेलें साधन, कांडणी २ गदा ह्या नावाचें युद्धोपयोगी हत्यार, सोटा ३ उसाच्या चरकातील न्वरा किंवा नवरी [सं मुसल, मुस्=तोडणें, कांडणें] (वाप्र) **०नेसणें–पांघरणें–डोक्याला बांधणें–(ल)** निर्लज्जपणानें वागणें, सभ्यतेला सोडून वागणें, आपली अब्रू सोडून निर्लज्जपणाचे आचार करूं लागणें **मुसळाचें धनुष्य (धनू) करणें**–अशक्य गोष्ट शक्य करणें **मुसळानें टिऱ्या बडविणें**–हुरळणें, अतिशय हर्ष होणें, आनंद होणें 'थोडयाशा यशानें मुसळानें टिऱ्या बडवून घेऊं नका' **मुसळा(स)अंकुर फुटणें**–१ शक्य कोटींतील पण अत्यन्त असंभवनीय अशी काहीं एक गोष्ट घडून येणें २ असाध्य आजार इ० मधून बरें होऊन पूर्वीप्रमाणें व्यवहार करूं लागणें **मुसळास मुसळाशीं गांठ पडत नाहीं, मुसळा मुसळांची गांठ बांधतां येत नाहीं**–दोन सारख्या हट्ट आणि दांडग्या माणसात सलोखा किंवा एकी घडविता येत नाहीं **सगळेंच मुसळ केरांत**–अत्यंत महत्त्वाच्या गोष्टीकडे दुर्लक्ष होणें, महत्त्वाचीच गोष्ट विसरणें सामासिक शब्द– **०कंद–पु** १ एक कद विशेष, एक प्रकारचा कादा २ (ल) धटिंगण, दांडगा ३ टोंण्या, मूर्ख, बैलोबा **०कांड–स्त्री** मुसळानें तांदूळ सडण्याची क्रिया **०कांड–कांडा–ड्या, मुसळसड्या**–वि १ मुसळानें कांडलेला, सडलेला (तांदूळ) २ निमसडा, कमी सडीचा [मुसळ+कांडणें, सडणें] **०झुड्या झोंड्या**–वि मुसळानें कांडताना न मोडणारा, कण्या न होणारा (मुसळावरोवर झुंजणारा असा चागला, न मोडका) याच्या विरुद्ध पिठूळ **०देवता**–स्त्री (ल) धीट, आडदांड स्त्री **०धार–धार पाऊस**–स्त्री.पु फार जोराचा पाऊस, मुसळासारख्या मोठ्या धारा असलेला पाऊस **०वादा–पु** हगवण किंवा आमांश याची जोराची साथ **०सर–सळई**–स्त्री मुसळ करण्याला योग्य असें लाकूड **०स्नान**–न सकल्प, पुरुषसूक्त इ० मन्त्र न म्हणता केलेलें स्नान २ नुसतें आंग धुणें, आंग न चोळता अगावर पत्त पाणी ओतून केलेली आंघोळ **मुसळा**–पु (ओतकाम) रद्द बुडाचा एक–दीड फूट लांबीचा सुळकेदार दगड याच्या बुडाला एक भोंक असतें, त्यांत दांडूचा दांडा घालुन भांडें वर उपसून काढण्याकडे याचा उपयोग करतात **मुसळी**–स्त्री (लोखंडी काम) गोल नळया करण्याकरता उपयोगात येणारी पोलादी पहार २ (राजा) लहान मुसळ **मुसळेश्वर**–पु (ल) धटिंगण, दांडगा, गल्लेलठ्ठ व आडदांड मनुष्य

**मुसळणें**—अक्रि १ फळें, कलिंगड इ० नासणें, सडणें २ अतिशय श्रमानें थकणें, दमणें

**मुसळवादा**—पु गुरास होणारा एक स्पर्शजन्य रोग, हगवण

**मुसळी**—स्त्री घोड्याच्या मागील पायास होणारा एक रोग -अश्वप २ ३१६

**मुसळी**—स्त्री. धक्का, गर्दीतून पुढें जाण्याकरता दिलेला जोराचा धक्का, मुसडी ( क्रि० मारणें, देणें ) [ फा ]

**मुसळी**—स्त्री एक औषधी वनस्पति किंवा तिचा कांदा हीं झाडें लहान असून पावसाळ्यात रानांत उगवतात हिला खारकेच्या रोप्याचा पानासारखीं परंतु अधिक पातळ व रुंद अशीं पानें असतात कांदे किंवा मुळ्या योगाइतक्या जाड व पाच सहा अंगुळें लांब असतात हे कंद पौष्टिक असतात सफेत व काळी असे मुसळीचे दोन प्रकार आहेत [ स मुसली ] ०कंद-पु मुसळीचा कांदा

**मुसळें कोनफळ, मुसळ्या**—नपु कोनफळाची एक जात

**मुसळो**—पु ( गो ) एक रोग

**मुसाडटकली**—स्त्री ( गो ) १ माशीचें डोकें २ ( ल ) ( गो ) अगदीं लहान अंश, अत्यल्प भाग

**मुसाडा-डी**—मुसडा-डी पहा

**मुसाफर**—पु पांथस्थ, वाटसरू मुसाफर पहा

**मुसावणें**—अक्रि १ पूर्णपणें भरणें, भरून जाणें, भरून पुरणें, नसांतून रक्त, रस इ० पूर्णपणें भरून वाहणें 'अहो वाढि येला ऊस। तेथें मुसावला रस।' २ वाढणें, फुगणें ३ मग्न होणें, साकार होणें, एकत्र होऊन जाणें 'घृत थिजलें कीं विघुरलें। परी घृतपणा नाहीं मुकलें। तेवीं अमूर्त मूर्ती मुसावलें। परी तें सचलें परब्रह्म।' -एभा १ २४६ ४ निमग्न होणें रमणें ५ व्यापणें, आत पूर्णपणें भिनणें, भरून असणें 'कींजल माया विवरण। जेथें नित्यानंद पूर्ण। मुसावला असे।' ६ मुशीमध्यें घातला जाणें मुशींत आटून तयार होणें, मुशींत ओतून मुशीच्या आकाराची वस्तु करणें गाळोनिया मोक्षसुख। तयांचा मुसा वोनि हरिख। -एरुस्व १ ५४ [ मूस ]

**मुसावणें**—अक्रि ( महानु ) मूर्च्छित होणें 'रसभावाचेनि तुषारें। मुसाव तो।' -एभा १७४

**मुसाहि(हे)ब**—पु स्नेही, सोबती, जोडीदार 'याजद-अलीखा दिवाण निजाम अलीचा फार मुसाहब '-रा १ १६५ ( मुखतार म्हणजे अनियंत्रित सत्ताधिकारी असा चुकीचा अर्थ मराठे समजतात ) [ अर मुसाहिब् ]

**मुसूम**—स्त्रीपु १ मोसम, हंगाम, ऋतु ठराविक वेळा फळें इ०चा बहराचा समय २ -न टेंकडीचें टोंक, डोंगराचें टोंक [ अर मूसम ]

**मुसम**—वि ठराविक, निश्चित कायम पक्का केलेला [ अर मुसम ]

**मुसे येणें**—( काव्य ) रूपाला येणें 'का नादब्रह्मचि मुसे आलें।' -ज्ञा १३ २६८ [ मूस ]

**मुसेजर**—मुसज्जर पहा

**मुस्तकबील, मुस्तकबील, मुस्तकबाल**—पु भावी, पुढें मिळणारी रक्कम, भविष्यकाळीं मिळणारी रक्कम; भाव्यादाय -राको [ अर मुस्तक्बिल ] **मुस्तकबल**-पु ( गो ) मक्त्याच्या रकमेचा चतुर्थांश ( सरकारात ठेवलेला )

**मुस्तकीम-ल**—वि १ कायम, निश्चित पूर्णपणें स्थापिलेलें 'याचा नक्शा मुस्तकीम ठरून मग जावें '-रा ७ १२ २ भक्कम, मजबूत, बळकट, पक्का ( माणूस, पशु, यंत्र, घर इ० ) 'जुन्या इमारती फार मुस्तकील असतात ' [ अर. मुस्तकीम् ] **मुस्तकिमी**-स्त्री मजबुती, बळकटपणा 'वरकड दर्वाजे बंद करून आपले मुस्तकिमींत आहेत ' -मदबा १ ३९ **मुस्तमीक**-स्त्री. सुधारणा, मशागत 'जशी तुम्ही शेताची मुस्तमीक कराल तसा तुम्हाला शेताचा कौल मिळेल ' [ मुस्तकीमचा वर्णव्यत्यास ]

**मुस्तराफ**—पु कलेक्टरच्या दर्जाचा अधिकारी, सुभेदार, जिल्ह्याचा अधिकारी [ फा ]

**मुस्ता**—स्त्री नागरमोथा नावाचें सुगंधी गवत व त्याचा गड्डा [ स ]

**मुस्ता**—पु ( पिंजारी ) कापूस पिंजतांना पिंजण्याच्या हत्याराच्या तातीवर आपटण्याचें मुठीसारिखें साधन याच्या दोन्ही टोंकांना जाड गोळे असतात

**मुस्ताकी**—स्त्री ( गो ) शिदोरी वगैरे सामान

**मुस्तायकी**—स्त्री अंगात घालण्याचे कपडे

**मुस्तेद**—वि १ सिद्ध तयार सज्ज 'जीन खोगीर वखत रादि मुस्तेद करावयाचे सपूर्ण हुन्नर कवगत करून ठेवणें '-मराका १० २ भक्कम, मजबूत, पक्का 'गडाची इमारत मुस्तेद करावी ' -मराआ ३३ [ अर मुस्तइद ] **मुस्तेदी**-स्त्री १ तयारी, सिद्धता २ मजबुती, बळकटी

**मुस्राद मसुराद**—पु ( गो ) कलमी आंब्याची एक जात

**मुस्लि(स्ली)म**—पु मुसल्मान [ अर मुस्लिम् ]

**मुहजोरी**—स्त्री कडक, वगैरे बोलणें, उद्धट भाषा मुजोरी पहा

**मुहळी**—स्त्री मनगटाची पट्टी

**मुहीम**—मोहीम पहा

**मुहिम्मात**—नअव कामें -आदिलशाही फर्मानें [ फा ]

**मुहुरणें**—अक्रि माहोर देणें, प्रफुल्लित होणें 'नीतिमार्गें रमशृंगारू। दानधर्मी शांत विचारू। त्या पुण्यीं हा कल्पतरू। मुहुरलाम।' -कथा ३ १७ १२० [ माहार ]

**मुहुर्मुहु**—क्रिवि वारंवार, पुन्हां पुन्हा [ स ]

**मुहूर्त**—पु १ दोन घटकाचा काळ २ (ल) शुभ वेळा; योग्य समय, उपनयन, विवाह, गृहप्रवेश इ० कार्यास इच्छित ठरविलेली शुभ वेळ ३ कार्याचा प्रारंभ ४ समय, ठरलेला वेळ ५ (ल) क्षण, अल्प काळ ६ पुनर्विवाह, म्होतूर, पाट, न्हावेर (म्होतूर हें अपभ्रष्ट रूप रूढ आहे) [स] ०**करणें**-१ चेतविणें -हरो २ (शुभ दिवशीं) आरंभ करणें 'तरी क्षेत्रज्ञदशे। आत्मा मोटका पैसे। हें देह मी ऐसें। मुहूर्त करी।' -ज्ञा १४. १४५ ०**पूजन-पूजा**-नस्त्री (लग्नादि विधींत) पत्रिकापूजन, लग्नमुहूर्त लिहिलेल्या पत्रिकेची पूजा ०**मणि-णी**-पु वधूच्या गळयात (शुभ मुहूर्तावर) बांधतात तो सर ०**मेढ**-स्त्री लग्न कार्याकरिता मांडव घालताना किंवा घर बांधताना शुभमुहूर्तावर रोविलेला पहिला स्तंभ खांब ०**मेढ रोवणें**-एखादें काम सुरू करणें **साडेतीन मुहूर्त**-पुअव वर्षप्रतिपदा, अक्षयतृतीया व विजया दशमी हे तीन उत्कृष्ट मुहूर्त व कार्तिक शुद्ध प्रतिपदा हा अर्धा म्हणजे सापवाद मुहूर्त मिळून साडेतीन मुहूर्त कित्येक दसरा, दिवाळीचा पाडवा (कार्तिक शु० १), गुढी पाडवा हे तीन व नागपंचमी (किंवा कांहींच्यामतें अक्षयतृतीया) अर्धा मिळून ३॥ मुहूर्त मानितात

**मुहूर्त**—स्त्री मूर्त, मूर्ति, शब्दाचा अपभ्रंश [स मूर्ति]

**मुळकंड, मुळकुंडी, मुळखड-डी**—मूळ शब्द पहा

**मुळका**—पु १ घाई, तगादा (क्रि० करणें, लावणें) २ घाई (क्रि० सुटणें) ३ उत्सुकता लागणें

**मुळगेणें**—अक्रि (कु) करपणें; शिजताना खालीं चांगला जाळ न लागल्यामुळें बिघडणें

**मुळमु(मू)ळ**—स्त्री १ दुसऱ्याला समजण्यास कठिण व पाल्हाळिक भाषण, अस्पष्ट बोलणें २ झिमझिम पाऊस पिरपिर, बारीक थेंबाचा व पुष्कळ वेळ पडणारा पाऊस ३ भिक्षेकऱ्यानें लावलेली पिरपीर ४ कामाची घाई, निकड (क्रि० लावणें, लागणें) [ध्व] **मुळमुळ-मुळा**-क्रिवि १ द्व्द द्व्द स्फुंदून स्फुंदून (रडणें) २ झिमझिम पिरपिर (पाऊस पडणें) **मुळमुळणें**-अक्रि १ गुळमुळणें, पिळपिळीत बोलणें, अस्पष्टपणें किंवा तोंडातल्या तोंडात बोलणें २ (पाऊस) झिमझिम पडणें पावसाची पिरपीर सुरू असणें ३ कण्हणें कुंथणें **मुळमुळीत**-वि १ बेचव, नीरस (खाद्य, पेय) २ संदिग्ध, अनिश्चित (विधान, जबाब) ३ गुळगुळीत परिणामरहित (भाषण)

**मुळवणी**—स्त्री बोळवण [मूळ]

**मुळवशी**—स्त्री (राजा) खेडें, बाग, शेत इ० चा सर्वांत खालचा भाग, बाजू सखल प्रदेश [मूळ+वास]

**मुळया**—पु एका शेतातून दुसऱ्या शेतात जेथून पाणी जातें ती जागा, मूस -बदलापूर २९३. [मूळ]

**मुळव्याध-व्याधि-धी**—स्त्री अर्श, गुदाला होणारा एक उष्णतेचा रोग मुळव्याधीचे प्रकार -रक्ती, मोडाची, लसणी, चुंबळी इ० [स मूलव्याधि]

**मुळस**—पु (गो) मूळ, पायथा (डोंगराचा) [मूळ]

**मुळस्ता**—पु (गो) फिरकी, मळसूत्र

**मुळहारी, मुळारी**—पु मुऱ्हाळी पहा **मुळाऱ्या-पु** (शिंपी) लग्नाला वऱ्हाड आणणारा माणूस -बदलापूर १०६.

**मुळा**—पु एक प्रकारची भाजी-पाला व कांदा, मूळ मुळ्याचा आकार गाजरासारखा परंतु रंग पांढरा असतो मुळ्याच्या शेंगा चीढि (डिंग्रीचीढि) भाजी करतात २ (कों) शिंपेंत राहणारा एक जलचर प्राणी याच्या शिंपल्याचा चुना करतात [स मूलक]

**मुळिया**—पु ज्योतिषी 'पाठक ज्योतिषी दीक्षित। भट्ट अग्निहोत्री महापंडित। शुक्ल मुळिये अनंत। आले यागा।' -कथा ३ ८ २१ [मूळ]

**मुळी**—स्त्री ल्हान मूळ, पाळ जडी, मुळाचा तुकडा, मुळखडी पाळखडी [स मूल] **मुळया पाताळीं गाडल्या जाणें**-१ फार खोलवर मुळ्या जाणें २ (ल) (एखाद्या स्थळीं, समाजात, स्वभावात) पक्केपणें किंवा दृढपणें जाऊन बसणें, दृढ होणें

**मुळीं**—क्रिवि १ अगदीं, अजीबाद, बिल्कूल २ प्रथमत सुरवातीला, मुळात 'मुळीं देह त्रिगुणाचा। सत्वरजतमांचा।' -दा २ ५ १ [मूळ याची सप्तमी]

**मुळ-ळू**—वि (नदभाषा) पाच 'मुळुवदनें जया कारण। उदात्त मंत्र ददीप्यमान।' -भवि १८८९

**मुळु मुळू**—क्रिवि आतल्या आत, हलक्या आवाजात, बाहेर पडू न देता (रडणें)

**मुळे**—पुअव (कों) (मूळचे या अर्थी) मानकरी ब्राह्मण (देशस्थ, कोंकणस्थ, देवरुखे आणि कऱ्हाडे), ज्योतिषी

**मुळें**—क्रिवि कारणानें, योगानें, च्याकरिता, म्हणून

**मुळेपण**—न जोशीपणा, खेड्यातील ज्योतिषाची वृत्ति 'ग्रामजोशी मुळेपण। त्याहून विशेष सोनार जाण।' -भवि ३४९ [मूळ]

**मुळेमाट**—पु माटाच्या भाजीचा एक प्रकार

**मुळो**—पु (कु) शेणवी ब्राह्मण जातीच्या कांहीं घराण्यातील प्रतिवर्षी शूद्र पुरवाला नारळ, तेल आणि फुलें देऊन भोजन घालण्याचा एक कुलाचार

**मुळ्या**—पु १ काष्ठौषधी विकणारा मनुष्य २ ग्रामजोशी, गावजोशी, ज्योतिषी ३ (राजा) वतन, अधिकार इ०चा मूळचा मालक ४ वयोवृद्ध गृहस्थ, जुन्या पिढीचा म्हातारा ५ मूळ नक्षत्रावर जन्मलेला द्वाड, मोडकर, दुष्ट, उपद्रवी मनुष्य [मूळ]

**मुख्स**—वि मुख्य [स मुख्य, प्रा ]

**मुखशुद, मुख(ख)शुद्**—स्त्री जेवणानंतर तोंड स्वच्छ करण्यासाठीं खाण्याचे सुपारी, लवंग इ० पदार्थ, जेवणानंतर सुपारी इ० खाणें, मुखशुद्धि [स मुखशुद्धि]

**मूक**—वि मुका, वाचा नसलेला [स ] ०गायन-गान-न (ल ) अशक्य गोष्ट; अविद्यमान वस्तु, खपुष्प, शशशृंग इ० प्रमाणें ०त्व-न मुकेपणा [स मूक]

**मू(मु)ग**—न. मौन, स्तब्धता, मूकत्व 'वेद वानूनि सवचि चाग। जव न दिसे तुझें आग । मग आम्हां तया मुग।एके पाती।'—ज्ञा १४ ११ [सं मूक, प्रा मूग] ०आरोगणें-खाणें-गिळणें-गिळून बसणें-(कोणी अपमान केला असतां किंवा आपणास उत्तर द्यावयास येत नसतां, उत्तर दिल्यास अनर्थ होईल म्हणून ) न बोलतां, स्वस्थपणें, मुकाट्यानें बसणें 'आरोगुनी मुग । बैसलासे जैसा बग।'—तुगा १४६८ 'जो कोणी पुढाकार घेईल त्याला कोणी कांहीं बोललें तरी मुग गिळावे लागतात.'—पत्रोधे मूक याचें प्राकृत रूप मूग हे आहे मूग हें धान्य खाण्याचें असल्यानें मौन स्वीकारणें ह्या अर्थी मूक ह्याचें मुग हें रूप घेऊन खाणें, गिळणें इ० धातूंशीं त्याचा प्रयोग केला जातो वास्तविक मूग धान्याचा मौनाशीं संबंध नाहीं

**मूग**—पु एक द्विदल धान्य ह्याचें झाड किंवा वेल सुमारें हातभर उंच वाढतो आकृति, रंग, वाढ शेंग हीं सर्व उडदासारखीं असतात मात्र मुगाची शेंग हिरवट असते हिरवा, पिवळा व काळसर असा मुगाच्या निरनिराळ्या जाती आहेत मूग हिंदुस्थानात सर्वत्र होतो डाळ पिवळी असून ती पथ्यकर आहे हिचा उपयोग खिचडी, वरण, मुगदल इ०कडे होतो [स मुद्ग, प्रा मुग्गो]

**मूठ**—पु बैलाच्या पाठीवर टाकण्याची (दुरणमासारखी) एक गादी, बैलाचें खोगीर 'वसला वृषभ कधीहि आपण न म्हणेचि जेवि मूठ वसा।'—मोगदा १४९ [प्रा ] ०वळी-स्त्री बैलाचें खोगीर मूठ पहा

**मूठ**—स्त्री १ मुष्टि या शब्दाचे सर्व अर्थ पहा २ मुष्टिप्रयोग, मंत्रप्रयोग, मंत्रानें भारून मुठींत घतलले उडीद इ० हे दुसऱ्याच्या नाशाकरिता फेकावयाचे असतात (क्रि० मारणें, टाकणें) ३ मुठींत राहतील इतक्या भाताच्या रोपाची जुडी, भाताची लावणी करण्यापूर्वी रोपें उपटून त्याची जुडी करतात ती ४ मुठीनें पेरलेलें भात (क्रि० पेरणें, टाकणें) ५ हत्ती, घोडा वगैरे जनावराच्या रोजच्या अन्नातून त्याच्या रखवालदारास द्यावयाचा मुठीएवढ्या परिमाणाचा (पगाराहून अधिक) भाग ६ घोड्याच्या पायाच्या खुराला लागून असलेला सांधा (ह्या सांध्याशीं घोड्याचा पाय लहान घेराचा असल्यामुळें येथें बांधलेली दोरी खालीवर होत नाहीं) ७ एक मुलींचा खेळ —मखपु३३६ ८ गर्भ (हातानें पिंडाकृति एक पदार्थ घालून पाठीच्या गर्भाशयाकार मुठीसारखा लागतो असें म्हणतात यावरून) 'ही मूठ मुलाची किंवा मुलीची आहे' ९ (को) शेतांतील पीक कापण्याच्या वेळीं करावयाचें कुणबी लोकांचें देवकृत्य [सं मुष्टि, प्रा मुट्ठि, प मुट्ठ, सिं मुटि, उरि मूठि, ब मूठ, हिं गु मूठ मुठि] म्ह० झाकली मूठ सवा लाखाची हलकी मूठ फुकाची=आपण बोललों नाहीं तोंपर्यंत आपलें अज्ञान झाकून राहील, बोलल्यास तें लोकांना दिसून येईल (वाग्र) ०आखडणें-दुसऱ्यास देण्याचें थांबणें, द्रिद्रपणा करणें, कद्रू लागणें ०दाबणें-चेपणें-गार करणें-भरणें-लाच देणें;लांचाची रकम मुठींत किंवा हातात देणें 'त्यानें पन्नास रुपयांनीं फौजदाराची मूठ दाबली तेव्हां तो सुटला' ०भर मास चढणें-वाढणें-लठ्ठ होणें, गर्विष्ठ होणें, फायदा झाल्यानें अत्यानंद होणें ०मारणें-मंत्रसामर्थ्यानें दुसऱ्याचा नाश करणें प्राण घेणें **मुठींत असणें**-(एखाद्याच्या) पूर्णपणें किंवा सर्वथैव ताब्यांत, कबजांत, अधिकारात असणें 'थोरल्या राजाच्या मनोवृत्ति या वकिलाच्या जशा काय मुठींत होत्या'—नि **मुठी-मुठेळ्या-मुठ्या मारणें**-मुष्टिमैथुन करणें **मुठ्या मारीत बसणें**-(व ) माशा मारीत बसणें, निरुद्योगी राहणें, आळसानें वेळ घालविणें **एका मुठींचीं माणसें**-एकाच कायद्याखालीं किंवा हुकमतीखालीं देणारी माणसें **एका मुठीनें**-एकदम, एकाच हप्त्यानें, एकाच वेळीं (रुपये देणें, घेणें, पडशा पाडणें) **झाकल्या मुठीनें**-गुप्तपणें; खरी गोष्ट बाहेर पडू न देतां, कोणाजवळ काय आहे किंवा काण कसा आहे तें बाहेर पडू न देतां सामाशब्द- ०पसा-पु पसामूठ पहा ०मर्दाई-स्त्री १ अन्यायानें व दांडगाईनें किंवा पाशवी सामर्थ्यानें दुसऱ्याचा पैसा इ० लुबाडणें २ दांडगाई, जुलुमजबरदस्ती ३ चोर, मामटे इ०नीं एका जुटीनें हल्ला करून लुबाडणें ०माती-स्त्री (प्रेत इ०) पुरणें, पुरण्याचा अंत्य संस्कार (क्रि० देणें) **मुटवा**-पु (नाविक) मुरड्याच्या थाडें मागें दोन बाडतास दोन लाकडी जाडे छूट ठोकतात त्यांपैकीं प्रत्येक याचा उपयोग टाकणीचें शेवट अडकविण्यासाठीं घोंस नाळीस चेपणीच्या वेळीं अगर घागर बांधण्यासाठीं होतो **मुटली**-स्त्री १ मूठ २ मुठींत धरून हलविणें **मुटा**-पु १ पाणी भरण्याचें पखालीचें तोंड २ (राजा) चुलींतील विस्तव विझून जाऊं नये म्हणून तींत पुरून ठेविलेला शेणाचा गोळा (क्रि०घालणें पुरणें) ३ वातविकारानें किंवा भयानें पोटात उठणारा गोळा ४ रेशीम, सुत इ०चा गुंडा २८ **मुठाण**-न एकजूट संघ टोळी; चांडाळ चौकडी **मुठाळणें**-सक्रि हातीं धरणें मुठींत धरणें 'झाला सकोप, परजाळा मुठाळुनि भुजालागि घायटिच करें।'—भामा ४५ **मुठियो**-पु १ (गो) तांदुळाच्या पिठाचें गूळमिश्रित २ (गो) सोनाराचें एक हत्यार **मुठा**-

मी (राजा) रोखल्याची गोणी; रोखरें भरलेलें पोतें मुटीचा खेळ-पु मत्रानें भारलेलें धान्य मुठीत घेऊन तें एखाद्या पदार्था वर टाकून केलेला जादूचा खेळ मांगगारूड पहा मुट्टा-वि १ रेशीम, कलाबतू इ० पुष्कळ प्रकारचे धागे एकत्र बांधून केलेला विडा मुठ्या-पु १ एका जातीचा रोकडा २ नांगराच्या रूम च्यात बसविलेली, हातात धरावयाची मुठी, मूठ [स मुट, वा हिंदी, गुज दंडे।] मुठ्याल-न (हट) मुठेल पहा मुठ्यो-पु (कु) १ बाण्या टोकण्याचें लांकूड २ (कु) लाह्या, ढमले इ० भाजताना तें ढवळण्याकरितां काठीच्या टोकाला फडकीं गुंडा ळून केलेलें पेंडूच्या आकाराचें साधन, धाटणा मुडका-पु (व) पेंडी, मद्दा मुड्डा-पु १ मूठभर धान्य २ केसुणीची मूठ

मूढ—वि १ मूर्ख, अज्ञानी, मद्र, मतिमंद अडाणी २ मूर्च्छित पडलेला ३ गोंधळलेला, संभ्रांत झालेला ४ सूर्यप्रकाशांत असल्यामुळें बाळपणांत न दिसणारा, ज्याचा अस्त झाला आहे असा (ग्रह) [स मुह्=वेडा होणें, मूर्च्छना यणें] ०गर्भ-पु १ मेलेला गर्भ २ जन्मतांना आडवें आलेलें मूल ०मति-वि १ मद बुद्धीचा, जड, मद्र, ढ, मूर्ख २ गोंधळलेला, भ्रमलेला

मूत—न १ मूत्र, लघवी, जननेंद्रियातून शरीरांतील बाहेर येणारें खारट पाणी [स मूत्र, आर्मे जि मुस्ल युरोपियनजि मुतर] ०आणणें-१ (एखाद्यास) अत्यत त्रास देणें सतावणें २ भिवविणें, भीति घालणें ०जळप-(गो) एखाद्याला मोठी योग्यता येणें मुतमुतगावली करणें-पुष्कळ मनधरणीच्या आणि नरमाईच्या गोष्टी करणें, अत्यत लघवानें दुसऱ्याचें मन वळविणें मूत येणें-होणें-१ फार भयभीत होणें अत्यत कष्टी ग्रस्त होणें, कष्टामुळें जर्जर होणें मुतात माशा(मासोळ्या) मारणें-(ल) आळसानें वेळ घालविणें निरुद्योगीपणात काळ घालविणें मुतानें दिवा पाजळणें-लावणें-अत्यत निर्दय असणें, कठोर-पणानें वागणें, जुलमी असणें मुतखडा-पु ज्यामुळें लघवीला अडथळा होतो असा एक रोग, अश्मरी 'ज्या वेळीं वायु बस्तीमधील शुक्रमिश्रित मूत्राला आग्र, कफाला शुष्क करतो त्या वेळीं गाईचें पित्त शुष्क झाल्यामुळें जसा गोरोचनाचा खडा बनतो त्याप्रमाणेंच अनुक्रमें शुक्रजन्य पित्तजन्य आणि कफजन्य मूतखडा बनतो '-योर २ १३७ मुतट-स्त्रीन मूत्राशयाची पिशवी आधान द्रव पदार्थाचें आशय (क्रि० येणें पडणें निघणें फुटणें) -वि १ मुताची घाण येणारें मुतानें घाण झालेलें (वस्त्र, जागा इ०) २ मुता सारखी (घाण), मुतासारखा (वास) मुतणें-न मासे व साप यांचें मूत्रेंद्रिय -अक्रि लघवी करणें मूत्रत्याग करणें, मूत्रविसर्जन करणें उभ्यानें किंवा फेर घेऊन मुतणें-१ (ल) अत्यत लज्जास्पद गोष्टी करणें २ लाज सोडणें मुतरा, मुत्रा-वि १ वारवार मुतणारा, फार मुतणारा २ (ल) गळका, भोंक अस लेला मुतरी-त्री-स्त्री १ मुतण्याची जागा, मोरी. २ लहान झरा, लहान प्रवाह मुतपाणी-न १ मूत, लघवी २ (ल) उपट पाणी, कोमट द्रव पदार्थ [मूत+पाणी] मूतसळई-स्त्री मूत कोंडलें असता तें काढण्यासाठीं मूत्रेंद्रियांत घालण्याची शस्त्रवैद्याची सळई [स मूत्रशलाका] मुताची गांठोडी-स्त्री मूत्रावरोध झाला असता येणारा बस्तीच्या भागांतील फुगीरपणा आणि कठिण पणा मुताट-स्त्री तबल्यात थोडा बाधण्याच्या जागीं त्याचें मूत निघून जाण्यासाठीं ठेवलेलें भोंक,मार्ग [मूत+टाय] मुताटणें-न मूत्रद्वार, मूत्रमार्ग -अक्रि मूत्रप्रतिरोधान पीडित होणें [मूत+ ताटणें] मुतारी-स्त्री मुतरी अर्थ१ पहा मुती, मुतु-स्त्री (बाल भाषा) लघवी, मुतणें मुतीर-वि वरचेवर मुतावयास जावें लागल्यामुळें त्रस्त झालेला मुतेर-रें-न ज्याव( लहान मुलें मुतलेलीं आहत असें, मुतानें भिजलेलें, घाण झालेलें वस्त्र

मूत्र—न मूत, लघवी [स] सामाशब्द- मूत्रकाम्ल-न एक प्रकारचें अम्ल (इ) युरिक ॲसिड -ज्ञाको (अ) ३६७ मूत्रकृच्छ्र-न १ थेंबथेंब लघवी होऊन वेदना होतात असा रोग, उन्हाळी २ मुतखडा, अश्मरी ०कोंड-मूतकोंडणें, मुता-वयास न झाल्यामुळें मूत साठून राहणें, मूतखडा 'मूत्रकोंड आणी परमें। त्रपिती त्रपरमें।'-दा ३ ६ २९ ०खडा-पु मुतखडा पहा ०ग्रंथि-स्त्रीपु मुतखडा, मूत्राशयांतून मूत बाहेर पड ताना प्रतिरोध होणें ०चिकित्सा-परीक्षा-स्त्री मुताची परीक्षा ०ढाळ-पु १ लघवीचा जुलाब होणारें औषध २ मूत्ररेच, लघ वीचे जुलाब ०दाह-पु मुततांना होणारी जळजळ, मूत्रविकारानें होणारी आग ०दोष-पु मूत्ररोग, मूत्रविकार ०विरोध-पु मूत्रावरोध, अश्मरी, लघवी कोंडणें ०पथज्वर-पु मूत्रमार्गांत सळई घातल्यामुळें येणारा ज्वर ०पिंड-पु मूत्र ज्यामध्यें तयार होतें तो पिंड (इ) किडनी ०पुट-न औषधाला दिलेलें मुताचें पुट, मुतात औषध तयार करणें ०पोतडें-न मूत्राशय, मूत्र ज्यांत साठून राहतें तो भाग ०मार्ग-पु लघवीची वाट ०शलाका स्त्री मूतसळई पहा ०शुक्र-न रेतमिश्रित लघवी, दुधासारखी पाढरी लघवी ०शोधन-न १ लघवी साफ होणें २ लघवी साफ होण्यासाठीं द्यावयाचें औषध ३ (औषधाला) मुताचें पुट देणें मूत्राघात मूत्रघात-पु १ मूत्रावरोध, मूत्र स्तंभ २ मूत्रविकार मूत्राचा कोठा-पोटळा-पु मूत्राशय मूत्रावरोध मूत्रावष्टंभ मूत्रस्तंभ-पु लघवीला न होणें, लघवी कोंडणें मूत्राशय-पु मूत्राचा कोठा [मूत्र+आशय] मूत्राष्टक-न गाय शेळी, मेंढी, म्हैस घोडी, गाढव, उंट व हत्ती या आठ जनावरांच्या मूत्राला मूत्राष्टक म्हणतात -योर २ ६७३ मूत्रित-वि मुतलेला, मुतट मूत्रोत्सर्ग-पु लघवी करणें मुतणें

**मूद**—स्त्री १ ओगराळ्यांत चेपून, ठोकून पाडलेला विशिष्ट आकाराचा भाताचा गोळा २ स्त्रियांचा वेणींत घालण्याचा एक सोन्याचा अलंकार, कलशाच्या आकाराचा एक फुलकार ३ तंग किंवा पट्टा ज्यावरून आवळला जातो असा सुलीचा, खोगीराचा चामड्याचा किंवा कापडाचा तुकडा ४ खोगिराच्या मध्यावरील मुदनी किंवा फासा. ( मुदनी किंवा यासारखे आणखी इतर अर्थ या शब्दाचेहि असू शकतील ) [ का मुद् ] ०ओवाळणें-आपली अत्यंत प्रिय व्यक्ति भेटल्यावर तिजवरून भाताची मूद इ० ओंवाळून काढणें 'मग करूनिया कुरवंडी । मूद ओंवाळून साडी ।'-कथा १ ६ १९१. मुदाळें-न मूद पाडण्याचें साधन, ओगराळें

**मूम(मी)र**—पु कवत, छन्द राख

**मूय**—स्त्री. ( गो ) मुंगी

**मूय**—पु आट्यापाट्याच्या खेळांतील सुराची पाटी, मुयदंड पहा

**मूर**—न ( कु ) दैव, दुर्दैव, मुर्दे

**मूर**—स्त्री १ सूक्ष्म छिद्र, न दिसणारें भोंक, रस्ताचा चाप इ० मधून पाणी झिरपून जाण्यासारखी बारीक भोकें प्रत्येक २ सच्छिद्रता, जिरण्याची, मुरण्याची अगर शोषून घेण्याची एखाद्या पदार्थाच्या अं ची पात्रता, गुणधर्म ३ पाझरणें, गळून जाणें, गळती ४ गळतीमुळें होणारें नुकसान, मुरल्यामुळें, जिरल्यामुळें आलेली तूट ५ धंद्यांतील, व्यापारांतील बूड, नुकसान, ठोकर, तूट ( क्रि० येणें ) 'ह्या रोजगारांत मूर आली ' ६ ( वों ) तुपाची बेरी; तेलाचा तळाला राहणारा सांका, बेरी ७ अवकाश, जागा, समावेशशक्ति, धर 'ह्या कणगींत खंडीभर धान्याची मूर आहे' ८ ( दगडांतील, लांकडांतील ) तडा, भेग, नरमपणा, शुष्कता, सामान्यतः कोणताहि दोष ९ भातशेतांतील एक किडा, खार. शेतांतील पाणी आटल्यावर हा किडा पिकाच्या मुळास उपद्रव देतो १० टरफलाचा किंचित् भाग -मुन्या ३९ ११ झाडाच्या खोडास लागणारी कीड, हिनें खोड पोखरलें जातें

**मूर्ख**—वि अशिक्षित, अज्ञानी, मूढ, निर्बुद्ध, बेअक्कली [ स ] म्ह० १ मूर्खाशीं बोध करितां श्रम होय वाणी=मूर्खाला उपदेश करतां करतां तोंड दुखलं परंतु त्याचेवर कांहींहि परिणाम होणार नाहीं २ मूर्खापुढें बहाणी=निष्फळ प्रयत्न, व्यर्थ श्रम सामाशब्द-०वाद-पु मूर्खपणाचें भाषण, वादविवाद ०समज-समजूत-पु स्त्री मूर्खपणाची समजूत, कल्पना ( अज्ञानामुळें झालेली ) चुकीची समजूत, खोटी समजूत, गैरसमज ०समजा घदी-विशी-पीस, मूर्खसमजावणी-स्त्री मूर्खांला समजावून सांगणें, मूर्खांला एखादी गोष्ट पटविणें

**मूर्च्छना**—स्त्री १ घेरी, बेशुद्धि, भोंवळ, मूर्च्छा २ गायनांतील प्रत्येक दोन स्वरांमधील तीन सूक्ष्म स्वरांत एकंदर एकवीस मूर्च्छना तीन ग्रामाच्या धोरणानें होतात 'तानमान मूर्च्छना अवरोहास । प्रशंसिते ब्राह्मण ।'-स्वादि ४ ५ २१. [ स ]

**मूर्च्छा**—स्त्री. घेरी, चक्कर, बेशुद्धि [ स ] ०गत, मूर्च्छित-वि बेशुद्ध झालेला, मूर्च्छा आलेला

**मूर्त मूर्तिमान-मंत-वंत**—वि १ रूपानें किंवा आकारानें युक्त, साकार, कांहीं तरी निश्चित आकार, आकृति असलेला २ खरोखर, साक्षात्, नगद, प्रत्यक्ष 'मी तुला मूर्तिमंत शंभर रुपये दिले असता नाकबूल जातोस?' ३ देहधारी, साकार, सगुणरूपानें युक्त, प्रत्यय 'तो नांवें तरी शिशुपाळु । एन्हवीं मूर्तिवंत काळु ।'-शिशु १६४ [ स ]

**मूर्ति-मूर्त**—स्त्री १ प्रतिमा, पुतळा, निश्चित आकारयुक्त आकृति 'कीं विवेकाची सौभाग्यदेवता । मूर्ति झाली ।'-शिशु ३२ २ देह, शरीर ३ मनुष्य, माणूस, व्यक्ति 'आम्हीं चार मूर्ति आहों '[ स ] म्ह० मूर्ति ( व्यक्ति ) तितक्या प्रकृती. =जितके लोक तितक्या प्रकारचे स्वभाव ०धर-वि देहधारी. 'धर्म म्हणे मी म्हणतों मूर्तिधर बहिश्चर स्वअसु यातें ।'-मोसभा ४ ६० ०भंगी वि ( गो ) मूर्ति फोडणारा

**मूर्धा, मूर्धान**—स्त्रीन १ डोकें, शिर २ ( भूमिति ) पाया, पायाची रेषा. [ स मूर्धन् ] **मूर्धन्य**-वि मस्तकांतून किंवा टाळ्याला जीभ लावून ज्याचा उच्चार करावा लागतो किंवा होतो असा ( वर्ण ), ऋ ॠ, टवर्ग, र आणि ष हे वर्ण ०भिषिक्त-वि १ राज्याभिषेक केला गेलेला, सिंहासनाधिष्ठित, पट्टाभिषिक्त २ ( ल ) मुख्य, पुढाकार घेणारा ०भिषेक-पु राज्यावर बसतांना करावयाचा अभिषेक, राज्याभिषेक [ मूर्धा+अभिषेक ]

**मूर्धावसिक्त**—वि ब्राह्मणापासून क्षत्रिय स्त्रीच्या ठिकाणीं झालेला 'अंबष्ठ आणि मूर्धावसिक्त । प्रवृत्ति आणि सारस्वत । इत्यादि नांवें जे वर्तत । ते जाण समस्त अनुलोमज ।'-एभा २० ३३ [ स ]

**मूल**—पुस्त्रीन. १ बालक, लहान पुत्र किंवा कन्या ( वदनिपेक्ष ) २ -न. झाडाचें पाळ ३ ( ल ) उत्पत्तिस्थान, जन्म, पाय, मूल कारण अधिक अर्थासाठीं मूळ शब्द पहा [ स ] **मुलाची दाढ भाजणें**-मुलाचें लग्न करणें -मसाप ३ ३ **मुलाचे पाय पाळण्यांत दिसणें**-मोठेपणीं मुलगा कसा निघेल याचा अंदाज त्याच्या लहानपणाच्या कृत्यावरून करणें **मुलांची धाम**-स्त्री हलक्या मुलांची टोळी, झुंड धाम (-स्त्री ) अर्थ ७ पहा **मुलेंबाळें, मुलेंलेकरें**-नअव लहान-थोर सर्व मुलें **मुलेंमाणसें**-नअव कुटुंबांतील मुलांपासून थोरांपर्यंत सर्व माणसें स माशब्द- ०तत्त्व-द्रव्य-न रासायनिक द्रव्याचें अंतिम घटक प्रत्येक ( इं )एलिमेंट

०प्रकृति–स्त्री मूळमाया आदिमाया ०मंडळी–स्त्री लहान माणसें, मुलें 'तुम्ही मूलमंडळी अशी आगळीक करूं लागला म्हणजे आम्हाला वघा समाधान वाटतें '–भा ७ ०संधि–स्त्री गत्यक अवयवांचा शवग्चा, तळचा भाग मुलांकुर–पु मोड [मूल+अंकुर] मुलाधार–पु मूळ आधार, पाया, मूळ कारण [मूल+आधार] मूलाज्ञान–न मूळमाया, त्रिगुणी मूलेकुठार–ज्या सिद्धांतावर एखाद्या मुद्याची उभारणी झालेली असते तो मुद्दा खोडण्याकरता मूळ सिद्धांतच पोल ठरविणें मूलक–(कारणवाचक प्रत्यय) त्यामुळें झालेलं मुळें

**मूल्क**—पु मुळा सोमवारी मूलकाला आणि तुलसीला स्पर्श करूं नय ' [स ]

**मूलपादी**—पु एक प्राणी याला तोंड नसतें –प्राणिमो १५३

**मूलरूपप्राणी**—पु प्राण्याची एक क्षुद्र जात हे प्राणी नेहमीं पाण्यात असतात यातील सजीवतत्त्व अल्बुमनाच्या म्हणजे अंड्यातील बलकाच्या घनच असून त्यास चलनवलनाची शक्ति नसत –प्राणिमो १५२

**मूल्य**—न मोल, किंमत [स ] ०वान्–वत–वि मोठ्या किंमतीचा, महाग, किंमतवान् [ स मूल्यवान् ] मूल्यरत्न–न (रसायन शास्त्रातील) परमाणूची संयोगशक्ति (इं ) ०दल्ग्सी उज्ज हें एकमूल्यक द्रव्य असून त्याचें तें मूल्य त्र स्थिर असल्या मुळें संयोगशक्ति मोजण्याकडे त्याचा उपयोग करा जातो ' –ज्ञाको (म) १८८ ०रव त्रलना–मूल द्रव्यें विशिष्ट परिमाणा तच संयोग पावतात हा सिद्धांत (इं ) थिअरी ऑफ व्हॅलंसी मूल्यानुवर्ती–वि किंमतीवर अवलंबून असलेली किंमतीच्या प्रमाणात असलेली याच्या उलट परिमाणानुवर्ती

**मूष मूषक**—पु उंदीर [ स मूष्=चोरणें ] ०कर्णी–स्त्री मुसाकर्णी पहा; उंदिरकानी एक वनस्पती ०वाहन–वि उंदीर ज्याचें वाहन आहे असा (गणपती)

**मूस**—स्त्री १ सोनें चांदी आटविण्याचें पात्र धातूचा रस करण्याचें पात्र आटणी २ साचा ३(यंत्र शरीर काम योजना, वेत इ०चा) घडण, रूप आकार रचना घाट ठेवण घडी जम 'कामाची मूस एकदा फुटली म्हणजे जमत नाहीं ' ४ (ल ) योजना मसलत युक्ति 'तुमची मूस समजली–साधली–बिघडली ' ५ (राजा कु ) खाणणाच्या शेताच्या बांधाच्या आत साचणारें पाणी बाहेर जाण्यासाठीं बांधात केलेलें दार मोरी ६ (गो ) मादी ७–पु (राजा ) माग शोध मार्ग पत्ता (क्रि० लावणें काढणें, लागणें निघणें–मागमूस) [स मूषा] (वाप्र ) ०उतरणें–आतणें–काढणें–चनणें–(एखाद्या सुंदर व घाटदार शरीराच्या माणसाबद्दल उपयोग ) शरीराचा आकार सुंदर असणें काय हो मूस उतरली–ओतली आहे ?' ०धरणें–(व ) गाठ बसणें यणें मानला मूस धरली ' (गोष्टींची, बोलण्याची) ०फुटणें–एखादी गुप्त गोष्ट फुटणें, तिचा बभ्रा होणें, लोकात पसरणें 'ऐसा मनसबा जालाची मूस फुटली आहे '–पेद ६ १४९ ०मारून निजणें–(ताप वगैरे आला असता) मुड गुसी मारून निजणें, गुडघे पोटाशीं घेऊन व डोकें खालीं करून निजणें ०मारग–पु पत्ता खूण, अवशेष, तपास, मार्ग, माग, शोध, (क्रि० लावणें, पाडणें, काढणें, लागणें, पडणें, निघणें, उमटणें, उमगणें ) घातला परी लाग। वीं कोठें नाहीं मूसमारग।'–नव १५ ३ [मूस+मार्ग]

**मूळ**—न १ झाडाचें पाळ मूल शब्द अर्थ २ पहा २ मूळपुरुष, आदिपुरुष वंशसंस्थापक ३ आरंभ सुरवात, उगम उत्पत्ति ४ ज्यावर टीका केलेली असते तो ग्रंथ ५ मुख्य प्रधान वस्तु गोष्ट ६ एकोणिसावें नक्षत्र ७ (गणित) एखाद्या वर्ग किंवा घन संख्येची मूळ संख्या, उदा० वर्गमूळ ८ बोलावणें आमंत्रण, नवीन लग्न झालेल्या मुलीला नेण्याकरता आलेला इसम, नवऱ्याला लग्नाकरिता बोलाविण्यास गेलेला इसम, एखाद्या माणसाला घेऊन यण्याकरिता गेलेला मनुष्य, माघारी केला लग्नाचाही निश्चय नैयासि धाडिलें मूळ।'–मोकृष्ण ८३ १९ [स मूल] (वाप्र ) ०काढणें–खणणें–झाडणें–पुसणें–मोडणें–मारणें–निर्मूळ करणें–सर्वस्वीं नाश करणें, पूर्णपणें विघाड, नाश उच्छेद, विध्वंस, संहार करणें ०चा, मुळचा–वि मुळातला, प्रारंभींचा, सुरवातीचा ०जाणें–मुलीला सासऱ्याहून आणण्यासाठीं तिच्या माहेरच्या माणसानें जाणें, बोलावण्यास, आमंत्रण करावयास जाणें ०धाडणें–बोला वणें पाठविणें, घेऊन यण्याकरिता इसम पाठविणें मूळावर जन्मणें–मूळ नक्षत्रावर जन्म होणें, दुसऱ्याचा नाश होईल अशा अशुभनक्षत्रावर जन्म होणें मुळावर येणें–बसणें–एखाद्याच्या नाशाला कारण होणें असणें (विशेषत कुयोगावर जन्मल्यामुळें आईबापाच्या नाशास कारणीभूत झालेल्या मुलाबद्दल उपयोग करतात) मुळाशीं हात घालणें–तत्त्वाशीं गाठ ठेवणें, तत्त्व न सोडणें बाह्योपाधीकडे लक्ष न देता प्रत्यक्षानें मुळाशीं हात घातला पाहिजे '–टि २ ५९५ मुळाहून मुळाधरून–मुळा पासून आरंभासून सुरवातीपासून सामाशब्द– ०अहता–स्त्री मूलप्रकृति मूळमाया, ब्रह्मांडीचा महाकारण देह ०अक्षरें–नमन लिहिण्यास शिकविताना प्रथम शिकवावयाचीं अक्षरें वर्णमाला मूळाक्षराचें पुस्तक–न वर्णमाला शिकविण्याचें पुस्तक मूळ आचार–पु उदय, वाढ, प्रगति, उत्कर्ष (मूलाधार शब्दाचें हें अपभ्रष्ट रूप असावें) मूळक, मूळिक

मुळिक-वि पहिलें, मूळचें ' ना तरी दीपमूळकीं । दीपशिखा अनरीं । मीनलिया अवलोकीं । होय जैसें ।'-ज्ञा १६५५

**मूळकरी**-पु (व) मुलीस, सुनेस आणण्याकरिता पाठविलेला मनुष्य ०कर्म-न १ मूलभूत काम, सुरवातीचें कार्य, आद्यकर्तव्य २ (गणित) एखाद्या रकमेचें वर्गमूळ काढणें ०किडा-पु (व) बैलाच्या शिंगात उत्पन्न होणारा एक किडा याच्या योगानें शिंग हलू लागतें व ते गळून पडतें ०खंड-खड-न (अशिष्ट) १ मुळी, मुळाचा तुकडा २ (व) झाडाची जाड मुळी [मूल+खंड=तुकडा] ०गांव-न एखाद्या घराण्याचा अगर वंशाचा मूळपुरुष ज्या गावीं राहत असे तो गाव, वाडवडील राहत आले तो गाव ०ग्रंथ-पु १ मूळचा ग्रंथ, ज्यावर टीका लिहिली तो, आधारभूतग्रंथ २ (ल) आधार, पाया, मूळची हकीकत, सुरवातीचें कारण ' मूळग्रंथ कळल्यावाचून वज्जाचा न्याय होत नाहीं ' ०घटक-पु (रसा) पदार्थाचा मूळचा घटकावयव ०चिठी-स्त्री आमंत्रणपत्रिका, कुंकुमपत्रिका ' त्वरित मुळचिठ्या त्या मोयऱ्याला लिहिल्या।'-सारद् ३ ३३ ०डाळ-न मूळ पाळ वगैरे -तुगा ०द्रव्य-धन-न भांडवल, व्यापारात गुंतविलेला पैसा ०नक्षत्री-वि मूळ नक्षत्रावर जन्मलेला ' येतेंदेवरी हिसाळ । नित्यनैमित्तिकीं आहे फळ । परी तें त्यजिजे मूळ । नक्षत्री जैसें।'-ज्ञा १८ १२३ ०पत्र-न १ अस्सल पत्र मूळ दस्तऐवज २ परवानगीचा दाखला, परवाना ' आणि तयाचि स्थिति ऐसीं। जे वाढोनि निमती भोगक्षमीं। ते घेती नरकभूमी। मूळपत्र। -ज्ञा १४ २७४ ०पाटी-स्त्री ठाकर व विवाहप्रसंगीं मुलाचा बाप लग्नाचें सामान ज्या टोपलीतून मुलीकडे नेतो ती टोपली -वदलापूर १४७ ०पीठ-न १ मूळस्थान, देवता ज्या ठिकाणीं पहिल्यानें प्रगट झाली तें स्थान, उगमस्थान ' ओंकार मातृकारूकट । तोचि जाणावा वैकुंठ। वेदाचें जें मूळपीठ । तथून प्रकट त्रिकाडी। ' -एरुस्व १ ४२ २ एखाद्याच्या पूर्वजांचें स्थान ०पीठिका-स्त्री १ आदिकारण, प्रारंभ उगम (एखाद्या देशाची राष्ट्राची, कामा-प्रसंगाची) सुरवातीची स्थिति २ साद्यंत वृत्तांत समूळ हकीकत, (एखाद्या कामाच-कृतीचे-प्रसंगाच हकीकतीच) सर्व मुद्दे, सर्व गोष्टी ' अनुष्ठानाची मूळपीठिका ठाऊक असल्यावाचून तें ठरावयास येत नाहीं ' ०पुरुष-पु १ एखाद्या वंशाचा किंवा घराण्याचा सस्थापक आद्यपूर्वज २ कुलाध्यक्ष, टोळीचा नायक घराण्यातील मुख्य पुरुष ०प्रकाशक-पु (बीजगणित) एखाद्या घातसंख्येचें मूळ ज्या आकड्यानें दाखविलें जातें तो; मूलदर्शक अंक घाताचा मूळ प्रकाशक दाखविण्याच्या दोन रीति आहेत -घात संख्येच्या आरंभीं V असें चिन्ह काढून त्यात मूळदर्शक अंक लिहितात अथवा घातसंख्येचे वर उजवे बाजूस अपूर्णांक रीतीनें मूळ-दर्शक अंक मांडतात -छअ १५३ उदा० ३V२७, $२७^{\frac{१}{३}}$ V ४, $४^{\frac{१}{२}}$ या वरील उदाहरणात अनुक्रमें ३ आणि २ हे मूळ प्रकाशक होत घात प्रकाशक पहा ०प्रकृति-स्त्री आदिमाया प्रकृति पहा ०बंद-ध-पु पद्मासन, योगशास्त्रातील एक बंध, आसन योगाभ्यासी साधक योनिस्थान दाबून आणि गुदद्वाराला संकुचित करून अपानवायूची अधोगति मोडून ती ऊर्ध्व करितात त्यायोगें प्राण आणि अपान याचा संयोग करवितात मूलस्थानाचें बंधन होतें म्हणून यास मूलबंध म्हणतात 'त्रिगुणाची वेणी तुटे उठले पाठीं । सावरूनी घरीं घाली घाली मू वर्दी गाठीं।'-तुगा २५८ ०बांध-बंद-पु (क) शेतात पाणी अडविण्यासाठीं घातलेला बंधारा ०भूत-वि सर्वांस कारण असलेला, आदिकारण जय जय देव निष्कळ । स्फुरदमदानदवहळ । नित्य निरम्रा खिलमळ । मूळभूत। '-ज्ञा १८ ४ ०माधव-विना द्वारके जवळील एका क्षेत्राचें नाव ' वचना मानवला बळिदेवो । ऐकोनि हासिन्ला देवाधिदेवो । पाणिग्रहण मूळमाधवो । सुदीचा ठावो लग्नासी।'-एरुस्व१४ ३८ ०माया-स्त्री आदिमाया ' म्हणोन हें बोलणें होये। जाणीव मूळमाया। -दा १० १० १५ ०मुहूर्त-क्रिवि प्रथमारंभीं, सुरवातीला ०वस-वसा-पु (कों) खेडें, शत ६०चें खाल्चे टोक किंवा बाजू, प्रथम वस्तीची जागा ०वैरी-पु हाडवैरी दैत्यासुर आणि देवेंद्र। मूळवैरी झुजती।' -सुविराट ३ १४८ ०व्याध-धि-धी-स्त्री एक गुदरोग मुळव्याध पहा ०शोधन न उगम किंवा मूळ शोधणें ०साडा-पु (माण) नवऱ्यामुलीला मूळ धाडून व तिच्या सासुला साडीचोळी देऊन तिला परत घरीं नणें नवरी बसवुन नेणें ०सूत्र-न सूत्ररूपानें असलेलें मूळ एव वेदाचें मूळसूत्र। सर्वाधिवरिष्ठपवित्र।'-ज्ञा १८ १४२६ ०स्तंभ-पु १ मुहूर्तमेढ, घर बांधताना जोत्यावर प्रथम उभा केलेला खांब २ ज्यात विश्वाची रचना उभारणी वर्णिली आहे असा एक ग्रंथ ०स्तंभारोपण-न मुहूर्तमेढ घालणें-पुरणें, घर बांधावयास सुरवात करणें ०स्वभाव-पु उपजत स्वभाव, जन्मस्वभाव ' त्याचें पळतोट राहिना। मूळस्वभाव जाईना।'-तुगा ०हारी-पु मूळ आलेला मुऱ्हाळी पहा ०क्षेत्र-न घर, निवासस्थान वसतिस्थान गर्भवनगरीं क्षण एक न राहावें। तैंचि करावें मूळक्षेत्र। '-तुगा ३५३१

**मूळवणें**—न सम्मूलन, उच्चाटण 'तैसें कथेचें इय ऐकणें। एक श्रवणासि होय पारणें। आणि संसारदुःख मूळवणें। विश्टनी विणें।'-ज्ञा ४ २३२ -क्रि घालविणें, समूळ उच्चाटन करणें, करणें [मूळ]

**मूळू**—वि (कर नदमाषा) पांच सुळु पहा

**मृग**—पु १ हरिण, काळवीट २ सत्तावीस नक्षत्रांपैकीं पांचवें नक्षत्र ३ मृग नक्षत्राचा पाऊस ४ सामान्यपणें चतुष्पाद प्राणी, पशु जनावर [स मृग्=शोधणें] म्ह० मृगाचे आर्धी पेरावें बोंबचे आधीं पळावें सामासिक शब्द- ०छाल-छाला-पु मृगाजिन, हरिणाचें कातडें 'शाले शाली शाला दुशाल। स्वीकारा साइन मृगछाल।'—नव १७१३७ ०जल-ळ-न अति उष्णतेनें जमीन किंवा वाळवंट सडकून तापलें म्हणजे त्या लगतच्या हवेचे थरहि तापून हलके होतात ते वर जाऊं लागले म्हणजे हवा पाण्याच्या लाटांप्रमाणें हलूं लागते व ते थर पाण्याप्रमाणें भासतात अशा रीतीनें होणारा पाण्याचा भास ०जलस्नान-न अशक्य गोष्ट खपुष्प ०तृषा-तृष्णिका-स्त्री मृगजळ पिऊन शांत होणारी तृष्णा, अशक्य गोष्ट ०नयना-नैना-नेत्री-लोचना-स्त्री हरिणाच्या डोळ्यासारखे डोळे असलेली स्त्री, सुंदर स्त्री ०नाभि-मद-पु कस्तुरी मृगनाभी रेखिला टिळा।'—तुगा ४०६९ ०नीर-न मृगजळ ०पति-राज-वर, मृगेंद्र-पु (काव्य) पशूंचा राजा, सिंह ०बहार-वार-पु आगोटीच्या सुमारास किंवा मृगनक्षत्राचे वेळीं येणारा बार, पहिला बहर इत्तीवार, आवेवार पहा ०मद-पु मृगनाभि पहा ०लाञ्छन, मृगांक-पु १मृगाच्या आकाराचा डाग(चंद्रावरील) २(काव्य) चंद्र, मृगाची आकृति धारण करणारा 'कृपेनें अंकीं घेतला हरिण। मृगलांछन चंद्रमा।'—सुमादि ३४१२ ०शावाक्षी-स्त्री हरिणाच्या पिलाच्या डोळ्यासारखे डोळे असलेली, चंचल डोळ्याची स्त्री, सुंदर डोळ्याची स्त्री 'मृगशावाक्षी गुणनिधान। उपमा नाहीं स्वरूपातें।'—शिली १४१४९ [मृग+शाव=पिलूं+अक्षन्=डोळा] ०शि(शी)तळाई-शि(शी)तळी-स्त्री मृगाच्या पावसानें हवेंत आलेला थंडावा ०शिर-शीर्ष-न मृग नक्षत्र ०शार्षक(हस्त)-पु (नृत्य) मूठ मिटून नंतर आंगठा व करंगळी उभी करणें ०साल-न मृगनक्षत्राच्या आरंभापासून सुरू होणारें वर्ष या खरीज दुसरें पाडव्याचें साल, दिवाळीचें साल व सुरसन पहा ०सेवडी-स्त्री कृष्णाजिन, हरिणाचें कातडें 'वरी चोखट मृगसेवडी। माजी धूतवस्त्राची घडी।'—ज्ञा ६१८२ **मृगांक**-पु चंद्र, मृगलांछन पहा 'उदेला आनंद मृगांकु। मोहा भ्रधकारीं।'—भाए २ [मृग+अंक=चिन्ह] **मृगाचा किडा** पु मृगनक्षत्रांत किंवा त्या सुमारास आढळणारा एक तांबडा किडा **मृगांबु**-न मृगजळ ब्रह्मगिरीहूनि न निघे। आणि समुद्रींही कीर न रिघे। तरी मार्जी दिसे वाउगें। मृगांबु जैसें।'—ज्ञा १५२३८ [मृग+अम्बु=पाणी] **मृगाब्धि**, **मृगाभ**-न मृगजळ **मृगासन**-न १ बसावयाचें हरिणाचें कातडें २ देवडीच्या दोन बाजूस असणाऱ्या ओट्यांपैकीं प्रत्येक ओटा ३ रांगोळीची एक आकृति ही आठ आठ ठिपक्यांच्या आठ समांतर ओळी व बाजूनें दोनदोन ठिपके देऊन चौपट साधून काढतात —रंगवल्लिका १११ **मृगी**-स्त्री हरिणी **मृगेंद्र**, **मृगेश**-पु (काव्य) सिंह [मृग+इंद्र, ईश] **मृगया**-स्त्री शिकार, पारध [स मृग्=शोधणें]

**मृड**—पु शिव, शंकर [स] **मृडानी**-स्त्री पार्वती

**मृणाल**—नपु कमळाचा देठ [स मृण्=इजा देणें] ०सुत-कमलतंतु 'मृणाल सुताचा पासवडा घातला।'—शिशु १७७

**मृणी**—(हेट) वसण्याचा पाट

**मृण्मय**—वि मातीचें बनविलेलें [स मृत्+मय]

**मृत**—वि १ मेलेला, प्राण गेलेला, जीवनशक्ति नाहींशी झालेला (प्राणी, वनस्पति) २(ल) निष्फळ ३(वैद्यक) भस्म केलेला (धातु) 'मृतें लोहें होती। ते रसरूपें जिती। जळोनि इंधनें येती। वन्हिदशा।'—अमृ ३५ [स मृ=मरणें] ०गोदान-न मृत्युगोदान पहा ०तिथी-दिन-दिवस-स्त्रीपु पुण्यतिथि, श्राद्धदिन ०पत्र-न मृत्युपत्र पहा ०प्राय-वि मेल्यासारखा, मृतवत् ०भाषा स्त्री चालू नसलेली भाषा ०लेख-पु १मेलेल्या माणसाच्या हातचा लेख, लिखाण २ मृत्युपत्र ०वत्सा-स्त्री १ जिचें वासरू तान्हें असतानाच मेलें अशी गाय, म्हैस २ जिचीं वासरें मरतात अशी गाय, म्हैस ३ जिचीं मुलें लहानपणींच अगर जन्मताच मरतात अशी स्त्री ०वंध्या-स्त्री मरतवांझ जिचीं सर्व मुलें मरतात अशी स्त्री ०शय्या-स्त्री मेलेल्या माणसाच्या नांवानें ब्राह्मणास दान दिलेली शय्या ०संजीवनी-स्त्री मेलेल्यास पुन्हा जिवंत करणारा मंत्र. ०स्नान-न प्रेतयात्रेला जाऊन आल्यानंतर करावयाचें स्नान ०स्नान-वि ज्यानें मृतस्नान केलें आहे असा **मृताशौच**-न सुतक **मृतासन**-न (योगशास्त्र) सर्व आसनविधि किंवा व्यायाम आटपल्यानंतर शरीराला विश्रांति देण्याकरतां करावयाचें (अंग लुळें करून मृतवत् पडणें असता होणारें) आसन, गात्रशिथिलीकरण **मृताह**-पु मृत्युदिन, पुण्यतिथि [स मृत+अहन्] **मृति**-स्त्री मरण मृत्यु 'न मृति मज म्हणे हा चेतनाचेत नाहीं।'—वामन, नृसिंहदर्पण १९ **मृतक**-न १ मृताशौच, सुतक २ अंत्यविधि, मृताची क्रिया ३ प्रेत 'मृतक तें टकलानि घरातळीं।'—वामन, नृसिंहदर्पण १७७ **मृत्यंग**-न शरीराच्या ज्या भागावर आघात केला असतां तत्काळ मरण येतें तो भाग, 'मर्म सांग तुझें मृत्यंग कोण। मीही सांगेन आपुलें मरण।'—राधि २१७४ [मृति+अंग]

**मृत्तिका**—स्त्री १ माती २ एखाद्या विवक्षित जागेची माती, कांहीं अनुष्ठानांत किंवा शांतिकर्मांत सात प्रकारच्या मृत्तिका सांगितल्या आहेत त्या —अश्व, गज, रथ, चतुष्पथ, गोष्ठ वल्मीक, न्हद अगर संगममृत्तिका. कांहीं लोक गोष्ठ, वेदिका बिल्वस्थान,

इत्यादि. स्मशानमृत्तिका या सत्तमृत्तिका मानतात. रसायनशास्त्रात नऊ प्रकारच्या मृत्तिका सांगितल्या आहेत [सं.] ०होणें-माती होणें; नाश होणें; धुळीस मिळणें. ०बुद्धि-स्त्री मातीप्रमाणें मानणें. दुर्मिळ मृत्तिका-स्त्री (रसा.) धातूंच्या पदार्थांत सापडणारे अधिक. या प्र गिरमध्ये सेरियम टर्बियम व इर्बियम हे तीन धातु असतात. मृत्पिंड-पु मातीचा गोळा [सं.] मृदावरणशास्त्र-न भूगर्भशास्त्र; मृत्स्तरशास्त्र [सं. मृद्+आवरण+शास्त्र] मृद्घटवत्-क्रिवि मातीच्या भांड्याप्रमाणें मडक्याप्रमाणें 'धरणीवरि आपटिला। चूर्ण झाला मृत्पात्रवत। [सं मृद्=माती+घट+वत्] मृन्मय मृण्मय-वि मातीचा बनविलेला.

मृत्यु-त्य-पु (काव्य) १ मरण; अंत. 'लोकांचें मानातही नित्य मरहकून पावला मृत्यु।'-ऐपो ४१९. २ यम; अंतक [सं मृत्यु मृ=मरण] (वाप्र) पावणें-मरणें. मृत्यूचा पाश पडणें मरणोन्मुख होणें; मरण. 'भ्रमत सुविधरण परि पडले कंठांत मृत्यूचे पाश।' -मोआदि ४८०. सामाशब्द- ०कळा-स्त्री मरणाच्या वेळीं तोंडावर दिसणारी कळा. मरणकळा. प्रेत-कळा. मरणाच्या वेळचा तोंडावरील निस्तेजपणा. निस्तेजपणा. ०गडांत-नपु जीवावरचें संकट. मृत्युप्राय संकट जीवावरचा प्रसंग. गडांत शब्द पहा. ०गोदान-न १ (प्र.) मृतगोदान. मेलेल्या गाईचें दान. एखादा चिक्कू गृहस्थानें मेलेल्या गाईला मळून टाकण्याचा खर्च वाचावा म्हणून तिचें मरणप्राय स्थितींत एका ब्राह्मणाला दान केलें यावरून वरील संप्रदाय प्रचारांत आला. २ (ल) मरतुकडा प्राणी; अत्यंत कृश व अशक्त असलेला मनुष्य किंवा पशु. ३ (ल) निर्वीर्य मनुष्य पुचाट मनुष्य पुळचट इसम; मेमलेल्या. ०चिन्ह न मरणाचें चिन्ह. मृत्युकाल समीप आल्याची खूण. मरणाचें लक्षण. महत्संकटाची सूचना. (क्रि० उमटणें दिसणें होणें). ०पंचक न (ज्योतिष) एक अशुभ योग. या योगावर जन्म झाल्यास मरणाची भीति असते. पंचक पहा. 'अग्ग! हा दुर्मिया दुर्बुद्धि। म पाहेचि लग्नसिद्धी। मृत्युपंचकाच सुधी। लग्नसिद्धी मानिली।' -एरुस्व १२.८. ०पत्र न आपल्या मरणानंतर मिळकतीची व्यवस्था कशी व्हावी यासंबंधीं लिहिलेला लेख दस्तऐवज. ०पत्र चालविणारा-पु मृत्युपत्राप्रमाणें जिंदगीचा सर्व विल्हेवाट लावणारा. ०पथ-मार्ग पु मरणाची वाट. मानवी जीवित मर्त्यलोक. 'मनुष्य याचा जन्म हा मृत्युपथच आहे आणि हें भूमंडळ हे मृत्युपथ नव्हे तर काय?' ०मुखीं-क्रिवि (मूळ शब्द मृत्युमुख) मृत्यूच्या तोंडांत; काळाच्या जबड्यांत. ०योग-पु (ज्योतिष) एक कुयोग. रविवारीं अनुराधा सोमवारीं उत्तराषाढा मंगळवारीं शततारका, बुधवारीं अश्विनी गुरुवारीं मृगशीर्ष शुक्रवारीं आश्लेषा व शनिवारीं हस्त याप्रमाणें त्या त्या वारीं तीं नक्षत्रें आलीं असतां त्या दिवशीं मृत्युयोग असतो. ०लोक-पु पृथ्वी; भूलोक. ०वेळ-वेळा-स्त्री विनाशील एक कुसुम. काळ; काळवेळ. वेळ शब्द पहा [म वेळा] ०षडाष्टक-न (ज्योतिष) मेष-कन्या तूळ-मीन मिथुन-वृश्चिक सिंह-मकर कर्क-कुंभ वृषभ-धन या दोन दोन राशींतील अंतर सहा व आठ आहे म्हणून यास षडष्टक म्हणतात. या दोन राशींपैकीं एक वधूची व एक वराची असल्यास विवाहकार्यांत हें वर्ज्य मानलें जातें. मृत्युंजय-पु १ शंकर; शिव. 'तात तुझा तेजस्वी मृत्युंजयसचिव होय अजित रणीं।' -माभीष्म ३. ९. २ (वैद्य०) एक मात्रा औषध. बचनाग गंधक मिरीं टांकणखार पिंपळी हीं औषधें एकेक भाग व हिंगूळ दोन भाग घेऊन आल्याच्या रसांत खल्न त्याच्या गोळ्या करतात. हें औषध सर्व ज्वराचा नाश करितें [सं मृत्यु+जि=जिंकणें]

मृद—वि (अ.) मृदु; मऊ. 'गर्भांतून मृद पूर्ण।' ब्रह्म जाणावें। -दा ७.४.२९ [सं. मृदु]

मृदंग—पु १ पखवाज; एक वाद्य. मुरजु पहा. २ (संगीत) एक यति. गायनारंभीं द्रुत मध्यें मध्य अंतीं द्रुत किंवा प्रारंभीं द्रुत मध्यें विलंबित व अंतीं मध्य अशा लयींची रचना असणें [सं.] म्ह० मृदंग मार दाहीं कडून. मृदंगी-ग्या-पु १ मृदंग वाजविणारा; पखवाजी. २ आग्यापाट्याच्या खेळांतील मुख्य; सूत्रधार धरणारा.

मृदु मृदुल—वि १ मऊ; नरम; खरखरीत नसलेला. २ कोमल; नाजुक त्वचीक नमता शिथिलावयव. ३ (ल) सौम्य मायें साधे शांत न लागणारें गोड नम्र कठोर नसलेलें (भाषण इ०) [सं.] ०काय-पु अपृष्ठवंश प्राणिसंघांतील मृदुकाय हा एक संघ आहे. गोगलगाय शिंपल्या कवडी कालवें शिंप वगैरे प्राणी या संघांत मोडतात -ज्ञाको (म) १९०. ०वर्ण पु वर्णांचा एक वर्ग, कठोर नव्हे असा वर्ण. ग द ज वगैरे मृदुत्री मृदोल्ही स्त्री मऊ गिरदी. 'विचित्र पातलीं आसनें। सुकुमार मृदुपणें। गाद्यापडगाद्या टेंकणें। वोठंगण मृदोळिया।' -एरुस्व १५.४०

मृदूच्च—न (ज्योतिष) ग्रहाच्या कक्षेतील सूर्यापासून अति दूरचा बिंदु. मंदोच्च पहा.

मृदुवल्या—स्त्री-अव एक कोंकणी पक्वान्न; साधणाचा एक प्रकार -पाक ६०.

मृषा—वि खोटें; मिथ्या; नकली. 'मृषा नार निर्मूं त्या राघवाचें। सितें दाविता हारप रूप त्याचें।' -सुरामायणयुद्ध५० क्रिवि १ खोटपणानें; लुच्चगिरीनें; फसवून. २ निष्फळ; व्यर्थ पण पुरुष [सं.]

मे—पु इंग्रजी वर्षाचा पांचवा महिना [इं.]

में, मे—सना (चि राजा) मी

मेकड—नपु मेकूड पहा

मेकडा—पु रोगट हवेनें झाडास किंवा जनावराना होणारा रोग मेकाड पहा

में(मे)कण—न (राजा) कानातील मळ, कर्णमल

मेकलणें—सक्रि घट्ट बाधणे मेखलणें पहा 'निद्रालस्या न मेक्ली।'-माज्ञा १८ १०२७ (पाठ) [मेख]

मेकाड-डा—नपु भाजीपाला, पिकें यावरील रोगरूप क्षुद्र जतु; विशाखा नक्षत्राच्या पावसानें पिकावर पडणारा रोग हा अनुराधा नक्षत्राच्या पावसानें धुवून जातो असें म्हणतात

मेकी—स्त्री एक वेल [का. मेके] मेकें-न मेकीचें फळ

मेटू(कु)ड—नपु नाकास चिकटलेला वाळलेला शेंबूड, नाकातील मळाच्या खपुड्या

मेख—स्त्री १ खुटा, खुटी २ खोंच, रहस्य, गूढ गोष्ट 'तुकारामबोवाची मेख' ३ लोखड इ० धातचा खिळा ४ अल काराथें दातात बसविलेली सोन्याची चूक ५ (ल) धष्टपुष्ट व बळकट मनुष्य, पशु [फा मेख्] म्ह० १ सोन्याची मेख आणि तमाशा देख २ तुम्ही आम्ही एक बटाळीत मेख' (वाप्र) ०ठेवणें-एखादा करार कबुलायत करताना त्यात विशिष्ट खोंच, अट घालणें, ठेवणें ०बसणें-अडवणूक, अटकाव होणें, मेखलें जाणें ०मारणें-१ जोरानें, पुरतेपणीं थाबविणें, बद करणें, अडवून ठेवणें (चालू व्यापार, धदा काम, इ०) २ प्रतिपक्ष्याचें काहीं न चालल अशी तजवीज करून ठेवणें, विघ्न आणणें ०सोसणें-घेणें (हातावर)-(वाईट कृत्यें करण्यात किंवा त्याजबद्दल दु ख भोगण्यात) अतिशय धैर्य, राकटपणा, सोशीकपणा असणें मेखलणें-उक्रि १ (घोडा, बैल इ०) मेखेस, खुंट्यास बाधणें, गुतविणें २ (ल) चाललें काम थाबविणें, बद पाडणें [मेख] मेखा उचटणें-उचलणें-उपटणें-खाद्यावर घालणें-देणें तावडतोब विदाई करणें, काढून देणें घालवणें, उचाटणें, निखळणें मेखा घेणें-१ (आपल्या तुवरिता गावच्या सुताराकडून) फुकट व जुलूम करून, मेखा घणें याकरून २ (ल) बळजबरी करणें, जुलमानें घणें, लुट घणें, जुलमानें आपली हानि भरून काढणें मेखेवर बसविणें-सरळ, नम्रपणें न वागता वाकडी गोष्ट सागणें मेख(क)चू-मू-पु मेख ठोकण्याची मोगरी, तबूच्या मेखा ठोकण्याचा ठोकळा -वाइसमा १ २३३ [हिं मेखचू] मेखस्, मेखस-न १ ओबडधोबड अशी मेख मोटी मेख २ माठा व लांब लाकडाचा खिळा [मेख] मेखला-स्त्री बैलगाडीच्या जोखडाच्या खुंट्या ... मेखाटणीस-मेखा टीस बसणें-दृढ धरणें, धरून बसणें पुरता पिच्छा पुरवणें, पाटीस लागणें (तगादेदार सरकारी अधिकारी, खमक्या मालक इ०नीं) मेखाटणें-सक्रि १ मेख, खुटी मारून बाधणें, खिळून टाकणें २ (ल) ठोकणें, चोपणें, तासडणें, सतावून त्रास देणें [मेख, मेखाटी] मेखाटी-स्त्री मेख, खुंटी (बहुधा मेखाट्या असा अनेकवचनीं उपयोग करतात. [मेख] (वाप्र) ०खाद्यास देणें-एकदम काढून देणें, घालविणें, बाटेला लावणें ०घेणें-१ वेठीस धरून काम करून घेणें २ ठोकणें, तासडणें, भर्त्सणें, अतिशय गाजणें मेख्या-वि खमक्या, शारीरिक किंवा मानसिक प्रचड शक्तीनें प्रतिपक्षीयास दाबून टाकणारा, प्रतिपक्षी यावर दरारा बसविणारा, वस्ताद, पुरून उरणारा, खवीर [मेख]

मेखला-ळा—स्त्री १ उपनयन सस्कारात त्रैवर्णिकानीं कमरेला बाधावयाचें तिहेरी कटिसूत्र, दोरी हें कटिसूत्र वर्णपरत्वें निरनिराळ्या प्रकारचें असतें 'तचि मेखळा मिरवती।'-ज्ञा १९ २ स्त्रियाचा कमरपट्टा, कटिबध, साख्यावर, फाशावर सिंहाचें मुख वगैरे चित्र असलेला कमरपट्टा 'नितंव अतिदीर्घ हा नचि पुरे यया मेखला।'-कम १ ५४ 'जेवि का मेखळेचा सिंह विराजमान।'-स्वादि ११ १.४५ [स] ३ तरवारीच्या मुठीस बाधलेली दोरी, साखळी ४ कमरेस गुडाळावयाचें वस्त्रविशेष. 'समर्थे कंथा मेखळा देऊन स्थळासी आणिलें।'-सप्र २१ ५५ ०बंधन-न मेखला बाधण्याचा विधि उपनयनविधि [सं मेखला+बधन] ०मुख-वि नेवराच्या (तगडीच्या) पुढच्या भागाच्या उजव्या बाजूस वळलेला भोवरा असलेला (घोडा) हें अशुभ चिन्ह आहे -मसाप २ ५६. अशुभचिन्हें पहा

मेंग—स्त्री सापाची कात, कवच (क्रि० टाकणें) [स मृताग] मेंगचोट, मेंगा-ग्या-वि १ दुळा, षढ, निर्वीर्य, नेभळट 'तुका म्हणे मेंग्या गाटवाचें जिणें।'-तुगा २९५५ २ (ल) दुबळा, गयाळ, मूर्ख, गायतोंड्या, अनिश्चयी ३ पराक्रमशून्य, निष्क्रिय 'रामजी मेंगा माणुस आहे' [मेंग] मेंगटा-वि (कु) अजागळ, निर्बल 'रेडा मारील म्हणून गवई नका मेंगटा आहे तो' [मेंगा] मेंगावणें, मेंगणें, मेंगेस येणें-अक्रि (राजा) १ (सापानें) आपली कात टाकणें २ (ल) भिऊन माघार घेणें, कचरणें, कचणें, कचकणें [मेंग] मेंगें-न गयाळ, मूर्ख, नामर्द, मेंग्या मनुष्य मेंग्यामारवाडी-पु बाहेरून दिसण्यात भोळवट पण आतून कावेबाज असलेला मनुष्य मेंग्या साप-पु (ल) खुनशी, आढ गाठ्या मनुष्य

मेंगळ-मेंगें मीठ—न खारट व करकचरा यापासुन तयार केलेलें मीठ क्षारमृत्तिका

मेघ—पु १ घन, जलद २ हिम ३ दाट धुकें पडलें असताना हवेपासुन उत्पन्न होणारा व नतर विरघळून तयार केलेला एक विशिष्ट खाण्याजोगा पदार्थ [स मेघ, प्रा मेह, गुज हिं मेह, सिं मेहु] (वाप्र) ०ओळणें-ढग येणें, आकाश

अभ्राच्छादित होणें 'असमान्य मेघ ओळला। एकाएवीं चहूकडे।' –ह १२ ४५ सामासिक शब्द– ०गंभीर–वि १ मोठा नाद करणारा, मेघगर्जनेप्रमाणें घन व पूर्ण [ स मेघ+गंभीर ] ०गर्भ–पु ( अनेक वचनी उपयोग ) गारा, करका [स ] ०डंबर, मेघाडंबर–नपु १ मेघाचें अवडंबर, आभाळ भरून येणें, ढगाचें छत २ (ल ) पोकळ धमकावणी, व्यर्थ वल्गना भयंकर पण निष्फळ देखावा ०डंबर–री–स्त्री १ छत, मडपी, उच्च छत्री 'भवित वैराग्य ज्ञान। हेंचि माहीमार्तंब सूर्यपान। मेघडंबर पताका।' –स्वादि ७५ ५२ २ घुमट हत्तीवरील अंबारी 'यापरी ढवळे मेघडंबरी।' –नव १३ ७५ –वि मडपी, छत असणारा (ढव्हारा, ढोला इ०) [ स ] ०तडित्–स्त्री ( शाप ) ढगातील वीज, ( इ ) लाइट निंग [स ] ०तडिद्वाहक–पु (पदाव) ढगात उत्पन्न होणाऱ्या विजेपासून सरक्षण होण्याकरिता इमारतीच्या उच्च भागावर धातूच्या मध्या बसवून त्या जमीनीत पुरलेल्या असतात त्या प्रत्यक [ स मेघ+तडित्+वाहक ] ०पटल–न ढगाचें आवरण, छत ढगांनीं आकाश आच्छादित होणें ( क्रि० येणें, पडणें ) ०मंडल–न १ मेघाचा समुदाय २ मेघाचा प्रदेश, वातावरण, आकाश [ स मेघ+मंडल ] ०मल्हार–पु ( संगीत ) एक राग ह्या रागात षड्ज तीव्र ऋषभ कोमल मध्यम, पचम, तीव्र धैवत, कोमल निषाद तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति षाडव–षाडव वादी षड्ज संवादी पचम गानसमय मध्यरात्र वर्षाऋतूत सार्वकालिक [ स ] ०मास–न मेघ अर्थ २ पहा [ स ] ०माळ–स्त्री कागद कातरून केलेली माळ, नक्षत्रमाळ, रत्नमाळ पहा ०माळा–स्त्री १ ढग मेघपंक्ति २ मेघावर केलेला एक भविष्यसूचक ग्रंथ ३ रहाटगाडग्यावरील गाडग्याची माळ ०रंजनी–पु ( संगीत ) एक राग ह्या रागात षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार कोमल मध्यम, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति औडुव–औडुव वादी मध्यम संवादी षड्ज गानसमय रात्रीचा चौथा प्रहर क्वचित् ह्या रागात तीव्र मध्यम घण्यात यतो ०वितान–न मेघडंबरी, मंडपाचा चादवा, विस्तार [ स ] ०श्याम–वि ढगासारखा काळासावळा घनश्याम मेघाडंबर न मेघडंबर पहा मेघुडा–पु प्रलयकालचा मेघ 'मग मेघुडे विराले।' –विउ ५ ४९ मेघो(घौ)डा मेघौडें–पुन मेघ, ढगांचा समुदाय जैसे वर्षाकाळींच मेघौडें। –ज्ञा ११ १९४ [ प्रा ] मेघौनि–क्रिवि मेघापासून दख मेघौनि सुटती धारा।' –ज्ञा ६ ८७ [ मेघ+हून–ऊन ]

मेच–पु ( कों ) एक प्रकारचा मासा

मेच–पु ( कों ) एक प्रकारचा वांबू

मेचक–न एक उपरत्न हें दृष्टि निर्मल करणारें सौभाग्य दायक व वशीकरण करणारें असतें पण हें हल्ली आढळत नाहीं –वि काळा –मोमभा १० ३१४ –श्यर [ सं ]

मेचका–मोजका पहा

मेचकू–पु ( प्र ) मेखचू पहा

मेचकें–न ( प्रा ) साप्याच्या आतील वळण, ध्याकण वेचक–स्त्री पहा

मे( मॅं )चट–वि ( प्र ) मेणचट पहा

मेचणें–उक्रि १ मोजणें, मानणें, ऐकणें, जमेत घेणें जुमानणें, ( निषेधार्थी प्रयोग ), मानणें, खिजगणतीस धरणें 'बुद्धि मेचदना थोडीं।' –ज्ञा १४ २४६ 'हा त्याला मेचायाचा नाहीं' २ कचरणें, कचणें, भिऊन माघार घेणें 'मरण जवळि आलें काळ कोणास मेचे।' –सारुह ४ ९० ३ आगापणें ४ इच्छिणें –मनको [ मे( मो )जणें ] मेचून असणें–भिऊन, नमून असणें 'मी कोणाला मेचून असणार नाहीं'

मेचला–वि मेम तोंडया बोलण्यास लाजणारा भिणारा

मेचाड–वि ( व ) कृश दुर्बळ 'मेचाड माणूस काय करील?' [ मेचट ]

मेचु–चू–स्त्री आवड भक्ति, प्रीति 'तें मधुरीं रसीं वाढे। मेचु तया।' –ज्ञा १७ १२० [ का मेच्चु=आनंद समाधान ]

मेछनी–पु ( कों ) एक प्रकारचा मासा

मेज–न लिहिण्यासाठीं केलेलें लाकडी घडवचीसारखें साधन, ( इ ) टेबल [ फा मेज़ ] ०मंडळी–स्त्री ( गो ) कार्यकारी मडळ ०माडप–( गो ) सोडावाटर इ० विकण्याचें दुकान घालणें [ मेज+माडणें ]

मेज, मेजणी, मेजदात–द–रत–( प्र ) मोज, मोजणी इ० पहा

मेजणें–सक्रि अक किंवा प्रमाण सख्येनें मोजणें 'कथा कदि असो पहा स्वचरितें तुम्ही मेजुनी।' –केका ३९ २ (ल ) गणणें (गो ) मेजप [मोजणें] मेजला, मेजीव–( प्र )मोजला, मोजीव पहा

मेजवा(मा–वा)न–वि १ मेजवानीस, भोजनास बोलावलेला ( मनुष्य, पाहुणा ) २ कुटुंबातील आवडती व निरुद्योगी इसम ३ ( व ) मेजवानी देणारा (यजमान) ४ ( मेसमन या इंग्रजी शब्दाशीं साम्य जोडून चुकीनें)खानावळवाला, खानसामा [ फा मेहबान्–मान् ] मेजवा(मा–वा)नकी–गी–स्त्री १ मेजवानी देणें जेऊ घालणें आदरातिथ्य, सत्कार करणें २ आदरातिथ्य पाहुणचार ३ स्वागतखर्च ४ नजराणा 'पांच हजार रुपये सरकारांतून मेजवानगी पाठविली' –ख ९ ४७४३ [ फा मेजवानी ] मेजवा(मा–वा)नी–स्त्री १ सोयरेधायरे सपत्तिमान लोक यांस आदरानें मिष्टान्नभोजन घालणें २ थाटाचें जेवण, आतिथ्य, मेहमानी ३ नजराणा कदवानीबाबदीत बरील

मेजवानी व वस्त्रें घेऊन आले आहेत।' –ख ६ ३०९६. [ फा मेह्‌वानी ]

**मेज(झ)र**—न ( छाप ) जुळलेल्या मजकुराचें एक पृष्ठ वगैरेचें लांबीचें प्रमाण [ इं ]

**मेजोटी**—स्त्री ( गोफ, कड्या, मणी इ० ) दागिन्याचें माप घेण्याचें सोनाराचें हत्यार [ मेजणें ]

**मेट**—अ आधिक्य, प्रकर्ष दाखविण्याकरितां काळोख शब्दा बरोबर योजितात उदा० काळोख मेट=अंधार गुडुप [ ? तुल का मेटी=उच्चता ]

**मेट, मेटें**—न १ जानुसंधि, गुडघ्याचा सांधा घोडा चाल इ०नीं थकला असतां त्याच्या ढोपरासंधीं योजतात (सामान्यत अनेकवचनी प्रयोग ( क्रि० मोडणें, घेणें, धरणें, दुखणें, थकणें ) 'घोड्याचीं मेटें मोड' २ चौकी, पहारा, गस्त पाहऱ्याची जागा, ठाणें ( डोंगरी किल्ल्याच्या वाटेंतील वळणावरचें, तटबंदी गावाच्या वेशीच्या बाहेरील बाजूस किंवा प्रांताच्या सरहद्दीपाशीं असलेलें बहुधा महाराच्या वस्तीचें ) 'अहंकाराचें मेट होतें।' –एभा ५ ५६१ ३ ( कु ) दार धरणें, त्यांतील एक सोहळा (वरात आल्यावर गृहप्रवेशाच्या वेळीं वराची बहीण दार अडवून धरते व या वधुवरास जी मुलगी होईल ती आपल्या मुलास देण्याविषयीं त्यास वचन मागते ) ४ अवसान, हिंमत ( क्रि० बसणें ) [ मिटणें ] ( वाप्र ) ०**पडणें**–हातपाय गाळणें, गळणें 'धाप कापे पडे मेट।' –एभा १२.५७४ ०**मारणें मारून पडणें**–( बैल इ०च्या ) शरीराचा लोळागोळा होऊन पडणें ०**मारणें–मारून बसणें**–पाय दुमडून गुडघ्यावर हनुवटीस टेकून बसणें **मेटा असणें**–( माण ) मुद्दा असणें **मेटेंखुंटीस, मेटाखुटी, मेटाकुटीस येणें**–१ मांडी घातलेली काढून गुडघ्यावर उभें राहणें ( एखाद्यास मारण्याकरितां वादांत वरचष्मा होण्याकरितां ) २ नेटानें खेंचण्याकरितां, ओढण्याकरितां गुडघे टेकून उभें राहणें ( मनुष्य, पशु यांनीं ) ३ ढोपरखुटीस येणें, म्हातारपणामुळें गुडघे खचणें ४ह्रास पेटणें 'हमामा घालिती कडोकडी। मेटाखुटी येऊनिया।' –ह १० ९५ ४ शिकस्त करून कंटाळणें, अगदीं दमणें, त्रासणें **मेटेंखुंटीस बसणें**–गुडघे टेकणें **मेटें घालणें**–१ रडकुंडीस येणें २ गुडघ्यांत डोकें खुपसणें ३ गुडघे जमिनी वर टेकणें 'मेटें घालून साबरी।' –वेसीस्व ४९९ ०**घेणें**–(मल्लविद्या) गुरसुडी घेऊन तिरका दमणें ०**टेकणें**–१ गुडघे टेकणें २ वार्धक्यामुळें, अशक्ततेमुळें गुडघे मोडणें, खचणें ३ ( ल ) खचणें, डगणें ०**धरणें**–संधिवातानें गुडघे आखडणें, दुखणें ०**बसणें**– १ वार्धक्यामुळें व अशक्ततेमुळें अवसान खचणें २ ( ल ) कचरणें, कचणें; धीर खचणें ०**बदणें**–गुडघे हनुवटीला टेकून गुडघ्याभोंवती दोन्ही हातांचा विळखा घालून बसणें. सामा शब्द– **मेट( टे )करी**–पु मेट्यावरील, नाक्यावरील चौकीदार 'मेटेकरी अष्टौदिक्‌पाल।' –रंयोवा ६ ८७. **मेटका**–स्त्री १ स्नायुमय भागांत उत्पन्न होणारा वायूचा गोळा, पेटका पहा २ मेडका, मेंडकी पहा **मेटा( टें )कुटी-खुटी-खुंटी**–स्त्री १ ढोंपर टेंकून बसण्याची रीत, ढोंपरखुटी २ महत्प्रयास, निकर

**मेटचें**—अक्रि ( गो ) जुळणें

**मेटण**—न ( गो ) शिवणें, शिवण

**मेटाणणें**—अक्रि ( ना ) तेलकट घाण येणें [मेणचट+घाण]

**मेटी**—स्त्री. ( बे ) मळणीनंतर रास खळ्यांत ओतल्यावर त्यामध्यें पुरलेला खांब [ स मेथि–ठि, का मेटि ]

**मेटी रयत**—पु गांवचा मुख्य शेतकरी

**मेटीव**—वि ओबडधोबड, कसा तरी घडविलेला ( दगड ) [ मेटणें ( हें क्रियापद रूढ नाहीं ) ]

**मेठ**—स्त्री ( व ) संघ, समुदाय, जूट ०**कर**–पु ( व ) मजुराच्या मेठाचा मुख्य

**मेड**—स्त्री १ ( प्र ) मेढ पहा २ आधारस्तंभ ३ मेख **मेडका**–पु मेढ, खुट ( विशेषत दुबेळकें असलेला )

**मेंड**—पु १ शेताची उंच कड, काठ, बांध, सीमा, मर्यादा. २ ( सामा ) उंच, कड, कणा, दांडा [ हिं मेन्ड ]

**मेंड**—स्त्री १ तरंग, लहर २ ( तनुवाद्य ) एका स्वरावरून दुसऱ्या स्वरावर घसंगानें जाणें नाजूक रीतीनें उत्पन्न केलेली स्वराची वक्रता [ हिं ]

**मेंड**—पु ( व ) मध्य

**मेंडका-की**—पुस्त्री १ शरीर कमावल्यामुळें भरदार व फुगीर झालेले हातापायांचे स्नायू शिरा ( क्रि० जमणें, निघणें, फुगणें ) व्यायामानें स्नायु फुगणें २ प्रहारानें, चिमटा घेतल्यानें हाताच्या स्नायूंत दिसणारा उंचवटा, बेडकी, मासल गंड (क्रि० येणें, उठणें, निघणें, काढणें) ३ पेटका, वळ ( हातापायांतील ) ( क्रि० चढणें, उतरणें बांधणें, ओढणें ) [ स. मंडूक ] **मेंडकी**–स्त्री ( व ) बेडूक, बेडकी [ स मंडूक ] **मेंडकु( को )ळी**–स्त्री ( ना ) बेडकी, बेंडकुळी

**मेंडका-क्या मेंडपाळ**—वि मेंढका–क्या, मेंढरें राखणारा, धनगर

**मेंडगू( गु )ळ**—न १ ( आंबा इ० झाडावरील ) बांडगूळ, झाडावर फुटलेलें दुसरें झाड २ परोपजीवी वनस्पति किंवा प्राणी

**मेंडग्या**—पु आकाशांतील नक्षत्राकडे पाहून भविष्य सांगणारा

**मेंडजोगी**—पु १ शूद्र जातीचा भडाणी व रानटी जोगी, दांभिक, रानवट भिकारी २ भणपट्या, ढोंगी, ढोंगीपोट्या इसम

**मंडणें**—न ( राजा ) निरनिराळ्या दोऱ्या एकत्र वळून एक मोठा दोर करण्याची क्रिया

**मेडभूक**—स्त्री. ( कु ) मरताना लागणारी जोराची भूक, मरणकाळीं लागणारी अति उत्कट भूक

**मेंडल**—स्त्री ( गा सुतारकाम ) दरवाजाच्या बाहेरील बाजूस लगरी खिळे मारून बसविलेल्या आडव्या लाकडी पट्या प्रत्येकी वेणी पहा

**मेंडा**—पु मेंढा पहा **मेंडी**—स्त्री ( गा ) बायबलचा उप वश करणारी ख्रिस्ती बाई ( बहुधा शेपडेस याला प्रतिशब्द )

**मेंडा**—स्त्री हद्द, मर्यादा मेंद पहा

**मेंडा**—पु पीळ दऊन मुरडलेलीं, नरम वेतेलीं कडव्याचीं तारें याचा पेंढ्या बांधण्यास उपयोग करतात (नि० मुरगाळणें )

**मेंढ्रकमुख**—वि बडकासारखें तोंड असलेला ( घोडा ) हें एक घोड्याचें अशुभ चिन्ह आहे [ स मड्रक+मुख ]

**मेंढ**—स्त्री. सीमा मेंड पहा ' आम्ही सरोन आपल्या मुडसाच्या मेंढ्यावरी जाऊन ' –पेद ७१९६

**मे(मे)ढ-ढी**—स्त्री १ (को ) वरच्या टोकास दुबेळकें असलेलें छपरासाठीं, माडवासाठीं जमिनींत पुरून जें उंच उभें करितात असें लाकूड २ आरुडखांब ३ ( वों ) दोरें बांधण्याचा खुंट ४ ध्रुवतारा ५ आधारस्तंभ ६ दोरीचा पीळ [ स मेठि-थि-धि प्रा मेढि ] म्ह० हातीं लागली चेड आणि घर माडवाची मेढ **मे(मे)ढकी**-कें-स्त्रीन लहान मेढ

**मेढंगमत मेढजोशी, मेढदाई, मेढमत**—मेंढेमत मेंढेजोशी, मेंढेदाई इ० पहा **मेढंगमती, मेंढगी-ग्या**—मेढेजोशी इ० पहा

**मेंढ**—पु भाताचें रोप तयार करण्याकरितां माळावर केलेला राब –बदलापूर २८३

**मेंढका ग्या**—वि मेंढ्या राखणारा, धनगर [ मेंढा ]

**मेंढपा-पाळ, मेंढरपाळ**—प १ धनगर २ ( ल ) निरक्षर मनुष्य ठोंब्या

**मेंढरी**—स्त्री मेंघला पहा

**मेंढरू**—न मेंढें, मेंढीचें पिलूं [ मेंढा ] म्ह० मेलें मेंढरू आगीला भिईल काय? **मेंढराची दावण देयास देणें**—दवारा मेंढराची माळका एकदम बळी देणें **मेंढमाळ**—स्त्री मेंढयाची रांग **मेंढरू चेंढरू**—न मेंढरू व त्यासारखें दुसरें क्षुद्र जनावर [ मेंढरू द्वि ] **मेंढवाडा**—पु १ रात्रीच्या वळीं जेथें मेंढ्या कोंडून ठेवतात तें घर जागा २ ( ल ) मेंढराचा कळप जमाव **मेंढशिंगी**—स्त्री मेंढ्याच्या शिंगाच्या आकाराचीं फळें असलेली दुधाळ व कटिरी वनस्पति काकडशिंगी हिचा नत्रौष धात उपयोग करतात [ स मेषशृंगी मेंढा+शिंग ]

**मेंढसर**—पु सोन्याच्या तारेचें कंकण

**मेढा**—पु १ दुबळकें असलेला खुंट खांब डाग ' दाटून वैराग्याचा मेढा। ' –ज्ञा १७५ २ खुंटाची दाट कुमारणी कुपण, लाकडी कोट, कठडा ३उभ्या लाकडांचा कोट ' भृकुटीचे मेढे चढवील। ' –अक्क ? उद्धवचिद्घनकृत सुकरभामवाद ११ ४पाटीरासा, पाठिंबा दणारा ५ दो-यांतील तेढ, अढी ६ त्रिशूळ ७ धनुष्य, धनुष्याची कांबीट ' मेढा निगुती वाहिला। ' –एस्व १० २५ ' बळें मेढा वोढिला। ' –एरुस्व ९ १८. ८ दाट –शर [ मेढ ] ( बाप्र ) **०वाहणें**–प्रतिज्ञा करणें ' वाऊनि मेढा घालिला। ' –एभा १२ १५१ ' भार्गवरामाचा तो वाहियला मेढा। ' –मध्व ७३ **मेढाचि(च)र्णे**–उक्ति एखाद्या जागेच्या भोंवती मेढी पुरून कुपण करणें, आवार घालणें [ मेढा ]

**मेंढा**—पु १ एडका, मेष २ सरळ नसलेलें, वांकलेलें टोंक ( काठी, शिंग इ० चें ) –वि वाकलेली, टोंक असलली ( काठी, शिंग ) [ स मेढ्र प्रा मेढ हिं मेंढा ] **०येणें**–मस्ती येणें **०बैल**–पु ज्याचीं शिंग मागल्या बाजूस वळलेलीं आहेत असा बैल **मेंढी**–स्त्री मेंढरांतील स्त्री-जात [ मेंढा ] **०गरद्दार-गद्दार**–स्त्री प्रसूतीनंतर विटाळशी न होता गर्भिणी होणारी स्त्री मिर्धी पहा **मेंढें**–न मेंढरू ( नर किंवा मादी ) [ मेंढा ]

**मेढिंगमत मेढिंगमती, मेढिंग्या**—मेढेमत मेढेजोशी इ० पहा

**मेढी-ढें**—स्त्रीन मेढ, मेढा पहा १ लहान मेढ २ आडव्या फळीस तुळईस धीर देण्यासाठीं खांबासारखा उभा केलेला दुबेळका किंवा विन दुबळका लहान खुंट ३ खळ्यात मधोमध पुरलेला खांब, तिवडा ' जवि खळांत श्रमाचा घेरा सर्वेन मेढिला होतें। ' –मोगाश्रम ५८८ [ मेढ ] **मेढीचें केळ ळ** न ( वों ) १ मेढीच्या वरच्या बाजूस लांकूड ठेवण्यासाठीं राखलेले सुमारें हात भर लांबीचे दोन फाटे दुबेळकें २ मेढीचा शेंडा **मेढेकरी**–पु आधारस्तंभ, आधार अवष्टंभ मेढ्या पहा **मेढेकोट**–पु मेढा, लकडकोट, लाकडाचें केलेलें दाट, मजबूत कुपण [ मेढा ] **मेढेजोशी**–पु १ जमीनींत खुंटे पुरून तिथि इ० ची गणना करणारा जोशी २ भविष्यकथन, शकुन पाहणें, शुभाशुभ काल सांगणें पचांग करणें इ० धंदे करणाऱ्याचा एक वर्ग किंवा त्यांतील एक व्यक्ति हे शूद्र असून मेढेमताचे अनुयायी असतात मेढेमत पहा ३ ( उप ) गावचा पिढीजाद वतनदार जोशी ४ महाराचा धर्मगुरु दाकोता पहा **मेढेदाई मेढेदाईक**–वि शेजाऱ्याच्या आवारापासून आपलें आवार भिन्न करण्यासाठीं आपल्या हद्दीवर कुपण घालणारा शेत इ० चा मालक [ मेढा+दाय ] **मेढेवदी**–स्त्री मेढेकोट **मेढेमत**–न उत्तरध्रुवाच्या ताऱ्याव रून बसविलेलें एक ज्योतिषमत शूद्रांत हें मत प्रचलित आहे यावरून मेढेजोशी किंवा ढोरीजोशी यांचा वर्ग निघाला [ मेढ=ध्रुवतारा+मत ] **मेढ्या**–वि (कुटुंब, सैन्य मंडळी इ०कांचा ) आधारस्तंभ असलेला मेढेकरी पुढारी मुख्य २ स्वाशीच्या,

उच्चेगिरीच्या कामात तरबेज असलेला ३ मेढेजोशी पहा [मेढ]

**मेढ्र**—पु १ मेंढा २ शिश्न 'गुदमेढा आतौतीं।'–ज्ञा ६ १९५. [स]

**मेण**—न म्यान, कोप, तरवारीचें घर 'मेण शिक्ल केली –ऐपो ४३० [फा मियान्] (बाप्र) ०**करणें**–१ म्यानात तरवार घालणें, कोपिन करणें २ (ल) झाकणें, वस्त्रादिकांनीं आच्छादित करणें 'मेण कर आरसा सख्यानो, गुलाल भागीं नका भरू।'–प्रला १३६ **एका मेणांत दोन सुऱ्या (सामावणें–राहणें)**–१ कोणतेहि दोन मोठे राजे, विद्वान्, प्रतिष्ठित पुरुष, परस्पर विरोधी स्वभाव व बुद्धि असलेलीं माणसें प्रतिस्पर्धी हीं भाडण न करता शांततेनें एकत्र राहू शकत नाहींत अशा अर्थी वापरतात 'तुक्याची प्रतिष्ठा वाढता तेथें। त्याचे मनीं द्वेष उप जत। म्हणे एका मेणात दोन सुऱ्या निश्चित। समावती कैशा परी।' २ एक काम दोघाकडे असल्यानें त्या कामाची होणारी दुर्दशा, अव्यवस्था या अर्थी

**मेण**—न १ मधाच्या पोळ्यातून निघणारा चिकट, घट्ट, चरबीसारखा पदार्थ, मधूच्छिष्ट २ जनावराच्या शरीरातून किंवा वनस्पतीपासून काढण्यात येणारा वरील सारखा पदार्थ, तेलाची बेरी ३ (कु) मासे मारण्याकरिता केलेलें विषारी औषध –वि (ल) मऊ व चागला शिजलेला पदार्थ (तादूळ डाळ, इ०) [फा मोम्] (बाप्र) ०**काढणें**–(ल) खूप चोपणें, झोडणें मारणें ०**घालणें**–(कु) मासे धरण्यासाठीं त्रिफळ, गेळफळ, निवळकाडें इ० कुटून पाण्यात घालणें ०**स्वस्त होणें**–(मनुष्य) लठ्ठ व गुलगुलीत होणें ०**होणें**–१ नरमाधून सौम्य शात होणें २ शिजून मेणाप्रमाणें होणें (भात, डाळ इ०) **मेणाची चोटली फडयता**–ओढून चंद्रबळ आणणें **मेण(णा)वणें–विणें**–१ मेण, तेलाच्या तळची बेरी, तगात भिजविलेली चिंध्याची राख इ० नीं सुप टोपली इ० मढविणें, त्यास लेप देणें २(ल) गोंडस, लठ्ठ बनणें सामाशब्द ०**कट**–न १ (समई तलतुपाचें भाडें याम चिक टून असणारी) तेलाची घाण, मळ, चिकटा, बेरी –वि १ घाण तलानें, तुपानें माखलेला, मेणचट, तलकट, ओशट (वास). [मेण+कट] **मेणक(कु)टणें** अक्रि मेणकट लागणें, घाण तेल तुपानें माखलें जाणें (भाडें) ०**कापड**–न मेण लावलेलें एक प्रकारचें कापड ०**गट मेण–गुटला**–वि अतिशय शिजविल्यानें मऊ व मेणासारखा झालेला (भात) [मेण] ०**गट**, ०**गुटलें**–न जास्त शिजविल्यानें विघडलेला भात ०**गटी**–स्त्री जास्त शिजवि लेल्या भाताचा मऊपणा व मेणचटपणा [मेणगट] ०**गुट होणें**–अक्रि एकजीव होणें, मिसळणें ०**गोळी**–स्त्री १ मेणाची गोळी २ (ल) मऊ नरम, सौम्य मनुष्य ०**घुणा–ण्या**–वि सौम्य, शात, गभीर मुद्रेचा पण मनाचा कुढा, लबाड मनुष्य, न बोल णारा, आतल्या गाठीचा इसम ०**चट**–वि १ मेणगट, कण्या न पडलेलें (तूप) २ मऊ व मेणासारखा शिजलेला (भात) ३ गिच्च व पचपचीत (शिजविण्यात विघडलेलें अन्न) ४ मद, ढील, गयाळ, सुस्त, निर्जीव, उत्साह, धैर्य, पाणी नसणारा ५ कृपण, कजूष (मेणचाटणारा) ०**चोट–चोट्या**–वि १ नपुसक, निर्बल, नामर्द २ जड, रेंगाळणारा, मेंग्या मारवाडी ३ भोळ सट, भोळानाथ ०**तेल**–न (गो) तेलात शिजविलेलें मेण, (स्त्रिया कुंकु लावताना हें मेणतेल कपाळास लावून त्यावर पिंजर लावतात) ०**बत्ती**–स्त्री मेणानें मढविलेली वात, मेणाचा दिवा [फा मोम, मूम+बत्ती] ०**बाजार**–पु दररोज दुकानासाठीं पालें द्यावयाचीं व तीं रात्रीं काढावयाचीं अशीं दुकानें असलेला बाजार, जुना बाजार हा मुख्य रस्त्यात नेहमीच्या दुकानांशीं समातर ओळींत भरवितात आयते तयार केलेले कपडे व जुनेपाने जिनस यात विक्रीस माडतात ०**बाजारी**–पु १ मेणबाजारातील दुकानदार, माल विकणारा २ (ल) पत नसलेला, बेअब्रूचा माणूस ०**बावली**–स्त्री १ (ल) ल्हान, सुबक, नेटकी व चपल स्त्री २ गरीब, दुसऱ्याच्या तंत्रानें चालणारी नवरी, बायको ०**बला**–वि (प्र) मेणोला, मेणा पहा ०**वात**–स्त्री मेणबत्ती पहा **मेणा–ण्या**–वि मेण, तेलाचा–तुपाचा गाळ, जाळलेल्या चिंध्या, शेण्याची राख इ०च्या मिश्रणानें लेपलेला (हारा, टोपलें, सुप, पाटी, इ०) [मेण] **मेणाचा**–वि १ मऊ, अशक्त, कम- कुवत २ नरम, निर्जीव ३ अयोग्य, अक्षम ४ धिक्कार, तिरस्कार दाखविण्याकरिता नेहमीं योजतात उदा० तू कोण मेणाचा मला सागायला? **मेणाळ**–स्त्री (जरतारी धदा) मेण असलेली, मेणयुक्त तार **मणी**–स्त्री १ तेलकट काजळ, मस, धाण. २ केसाच्या वळलेल्या जटा ३ (ठाणें) काकडीची एक जात –कृषि४८२. **मेणी मोडशी**–स्त्री जुनाट, फार दिवसाची मोडशी [मेण्या+मोडशी] **मेणें**–न १ (को) जिच्या चिकानें मासे आधळे होऊन सहज सापडतात अशी नदी इ०च्या प्रवाहात टाकतात ती एक वनस्पति, काडधाहुरा २ माशाना मारण्याकरिता, गुगी आणण्याकरिता नदींत टाकलेला चिकचिकीत द्रव्याचा पदार्थ **मेणे डोळे**–पुअव डोळे आले असता त्यातून अतिशय पू वाहणारे, फार धरवरणारे डोळे, बरबरीत, पुवाचे डोळे, शेणे डोळे, याच्या उलट काटे डोळे **मेणें वावर**–न (रब्बीच्या परणीकरिता) नागरून, खत घालून, राखून ठेवलेलें वावर **मेणोला, मेणोल**–वि मेणा पहा **मेण्या**–वि १ मऊ, दुबळा, नामर्द, गरीब २ मद, धारिष्ट नसलेला, निर्जीव [मेण] **मेण्यामारवाडी**–पु दिसण्यात भोळा पण कावेबाज इसम, सौम्य मुद्रेचा पण दाठ मनुष्य **मेण्या साप**–पु १ सापाची एक जात २ (ल) गुप्तपणें आक्रम घरून नाश करणारा मनुष्य

मेणा—पु सावलेली पालखी; डोलीसारखें परंतु चारहि बाजूनीं बंद, पडदेवजा सांगावर वाहून न्यावयाजोगें वाहन पालखी पहा [फा मियाना] मेणेकरी–पु मेणा वाहणारा हमाल, भोई

मेत(थ)कूट—न १ तांदूळ, निरनिराळ्या डाळी, गोडया, मेथ्या इ० पदार्थ दळून केलेलें पीठ व त्यात दहीं घालून तयार केलेलें एक व्यंजन तोंडीलावणें २ (ल) मेळ, एकी, दाट मैत्री 'शिव, वाळावा व भाऊ यांचें मेतकूट झालें होतें '-अस्तभा १६. [स मिश्र कूट, मिश्र-प्रा मिस+कूट, मेथी+कूट?] (ग्राम्य) ०जमणें-मिळणें-स्नेह जुळणें, मन मिळणें, सख्य होणें 'दिलीपति कबरशी बाजी रावसाहेबी रद्दते करून त्यांच्या मुलीशी लग्न लाविलें हाणे मेतकूट जमविलें '-निच

मेथा—स्त्री (गो) मदी

मेथी—स्त्री १ एक पालेभाजी जिच्या जून झाडावर शेंगा येतात, त्यात मेथ्या असतात २ या भाजीचें बीज, एक उपधान्य [स मेथिका, हिं व गुज मेथी] मेथा-पु मेथीची एक जात मेथ पाणी–न मेथीच्या काढ्या घालून केलेली आमटी, ही भाकरीशीं खातात [मेथी+पाणी] मेथोडा-पु (वायतीण इ०करिता केलेला) मेथ्याचा लाडू [मेथी+वडा]

मेद—स्त्री भाल्यासारखें एक मूळ हें आठ मुख्य औषधी द्रव्यांपैकीं एक आहे [स मेदा]

मेद—पु १ चरबी, शरीरांतील सप्त धातूंपैकी एक 'मेदाचे पर्वत फोडी। ' ज्ञा ६-१८ २ स्थौल्य, पुष्टता, लठ्ठपणा [स] ०घात-पु मेदावर तरंग मद्‌गी–स्त्री स्थूलता, गुरगुटीतपणा (क्रि० येणें चढणें धरणें) [मेदु] मेदस्वी-वि लठ्ठ, पुष्ट, स्थूल, पोपसा [स] मेदोग्रंथि–पु शरीरावर होणारी चरबीची गाठ वाळूक [स मेदस्+ग्रंथि] मेदोधरा–स्त्री चरबी राहण्याचें उदरांतील स्थान [मेदस्+धरा] मेदारोग, मेदोव्याधि–पु स्थौल्य, पुष्टता, मदोवृद्धीमुळें जडलेला व्याधि [स] मेदोवह–न मेद वाढणारी शीर मेदोवाहिनी [स] मेदोवात–पु एक रोग, मेदांतील शिरा स्नायुतंतु पसरणाऱ्या स्निग्ध विसर्जनांतील वात [स] मेदोवृद्धि–स्त्री अंगांत चरबी होणारी वाढ, पोपसेपणा, लठ्ठपणा [स]

मे(मॆ)दगी—स्त्री १ नवा गिलावा केलेल्या भिंती सारविण्याकरिता वकऱ्या-मेंढयाच्या लेंड्यामध्यें माती-मसाला घालून, पाण्यानें भिजवून व दगडावर चांगलें मळून तयार केलेलें मिश्रण २ अशा मिश्रणानें भिंत इ० सारविण्याची क्रिया (क्रि० करणें)

मेंदगिरी—स्त्री वरच्या याच्या शाणानें भिंत इ० सारविण्याची क्रिया

मेंदगा—स्त्री चरवा भागवगा, शीण (क्रि० येणें) [फा मांदगी]

मेंरट—वि पळपळीत, गुळगुळीत, कण्या मोडलेले (दूध, मध) मेणचट पहा

मेद(दा)ट—पु (प मा) घुसट मुस्ट जात [का]

मेदिनी—स्त्री भूमि, पृथ्वी [मि] ०वसन–न समुद्र, सागर

मेंदी—स्त्री, एक झाड स्त्रिया याच्या पाल्यांत कात, चुना घालून तो वाटून त्यानें हातापायांचीं बोटें व नखें रंगवितात या झाडावरील फळांच्या घोंसास इसबद म्हणतात मुलांची दृष्ट काढ ण्यास हा घेतात मेंदीच्या फुलांचें अत्तर काढतात त्यास हीना म्हणतात [स मेंधी] मेंदा-पु मेंदीतील नर जाति

मेदु—पु गोड? -शार

मेदुर—वि १ घट्ट व चिकट २ गच्च, जड 'भ्रमुर बेमुर! मेदुर अधर।।'-दिव १७० [स मिद्-मेद]

मेंदू—पु १ (अस्थि, मांस यातील) सारभूत अंश, मज्जा, अंग टेंचलें असतां त्यांतून मांसासारखा निघणारा अंश २ मगज, ज्ञानतंतुजाल ३ (ल) बुद्धि, अक्कल ४ (ल) नासल्यामुळें मऊ व सडणाऱ्या स्थितीप्रत पोंचलेलें फळ, मास इ०, बागुरडा, विंचू, लेकडा इ० प्राणी चिरडल्यानें त्याचा होणारा लगदा ५ रक्त व पू यांचें मिश्रण (फोड, गळू इ० तून स्रवणारें) [स मेद] ०निघणें-घासणें-बाहेर पडणें-(श्रमामुळें) टेकीस येणें

मेध—पु १ यज्ञ (समासांत) अश्वमेध, नरमेध इ० २ आहुति, बळी, यज्ञिय पशु [स मेध्=मारणें] मेध्य-वि १ बळी देण्यास योजलेला, योग्य २ (हवनीय) पवित्र, शुद्ध 'तयाचि परी खाद्याखाद्य। न म्हणे निद्यानिद्य। तोंडा आवडे तें मेध्य। '-ज्ञा १८ ५६० [स]

मेंधला—पु (वास्तुशास्त्र) दरवाजास मागें-पुढें दोन चौकटी असल्यास त्या एकमेकीस जोडणाऱ्या वरील बाजूच्या दोन भुजा प्रत्येकीं, मेंढरी, घोडा खालच्या भुजांना छिली म्हणतात छिली पहा

मेधा—स्त्री १ बुद्धीची तीक्ष्णता कुशाग्र मति, तीव्र बुद्धि, धारणायुक्त बुद्धि 'पैं स्वहिता अनुजायिनी। मेधा ते गामी इये जनीं।'-ज्ञा १० २७९ २ (श्रद्धा या अर्थी क्वचितच उपयोग) आवड, चाह, प्रीति 'तया बहुत करूनि मेधा। स्वर्गी आथी।'-ज्ञा १७ ७६ 'त्या मुलावर त्याची मेधा आहे तितकी याज वर नाहीं' [स] मेधावी-विनी-वि बुद्धिमान्, कुशाग्र मतीचा-ची-चें 'तो मक्तु मेधावी तपिया।'-ज्ञा१८ १५०५ [स मेधा]

मेधी—स्त्री एक वनस्पति [स]

मेंधी अवळी—स्त्री एक वनस्पति

मेना—पु मेणा पहा [फा म्यान]

**मेपर्टे**—न (क) (फार किंवा फटक उडविण्याची वेळुची) फुंकणी, उडवणी

**मे वायदगी-के**—उद्गा झालें पाहिजे कीं 'मे वायद के गोविन्दगीर मशार्निल्हेसी कालवा पाणी कैसे अलाहिदा चालत होते त्याप्रमाणें चालविजे'–रा १५ १४६ [फा मी+वायद कि–क]

**मेम-साहेब**—स्त्री मडम, बाईसाहेब [इं० मॅडम]

**मेमटमान्या मेमणचोटया**—वि (निंदार्थी अश्लील) मेणचोटया, मेण्यामारवाडी पहा

**मेमटा-टया, मेम(मु)टमान्या, मेमटा-टया**—वि गभीर पण आक्सखोर, दिसण्यात साळसूद पण आतून दुष्ट, धूर्त व कावेबाज म्ह० मेमटा घेतो चिमटा भडभडयाचा वोभाटा

**मेमण**—पु मुसल्मान कोष्टी, विणकर जात [मोमीन]

**मेम(मा)णें**—अक्रि मेंमें करीत ओरडणें 'दोनी एडके चोर नेती। मध्यरातीं मेमात।'–एभा २६ ६८ [ध्व]

**मेमुलगाढा, मेमलतोंडा-डया**—वि गयाळ, मेंगा, गायतोंडया मूर्ख (मनुष्य) [मेमे+गाढा]

**मेमे**—स्त्री (गो बालभाषा) मासळी

**मेया-यां**—सना (महानु) म्या 'तव मेया भणितलें।'–शिशु ११७ [मी]

**मेर**—स्त्री १ (शेतवाडी, टेकडी इ० ची) कड, काठ २ (कों गो) शेताचा बांध, हद्द ३ (ह्र.) जमीन उंच-सखल असल्यामुळें शेतीचें खत व पाणी राहण्याकरिता ल्हान तुकडे पाडून मध्यें टाकलेला मातीचा वरबा, बांधोळी ३ (व) पेरा, लागण 'उसाची मेर यदा लावली' ४ समय, वळ 'तेंचि मरणाचिये मेरे।'–ज्ञा ८ ७४ [देश्य मेरा=मर्यादा, का मेर=टकडी] म्ह० धनी नाहीं मेरें आणि शेत भरलें बेरें ०घेणें, मेरी करणें–(ठाणें) शेताच्या बेणणीनंतर भात निसवायच्या अगोदर बांधावरील गवत कापून काढून, टाकणें –बदलापूर २८८ बांधा वरचें, नजीकचें गवत बेणणें व जागा स्वच्छ करणें ०घार–स्त्री (कु) (अव मेरोघारो) शेताचे कुणगे (वाफे) करण्यासाठीं मिठागराप्रमाणें रचलेली चिखलाची ल्हान भिंत, मेर **मेरली-ल्या**–स्त्री मेरेवर शेताच्या कडेला पेरतात तें पावट्यासारखें एक द्विदल धान्य (गो) मेरली [मेर]

**मेरशिंगी**—स्त्री एक ल्हान झाड

**मेरु**—पु १ हिमालयाच्या उत्तरकडील तार्तरीचा डोंगरी प्रदेश म्हणून समजलेला सप्तखंडाच्या मध्यभागीं असलेला श्रेष्ठ मानलेला असा पर्वत, स्वर्ग मृत्यु, पाताळ यास आधारभूत असा सोन्याचा पर्वत 'तो मध्यस्थु गा गिरिवरा। मेरु जैसा।'–ज्ञा ५ ५०२ २ (ल) जपाच्या माळेंतील मध्यवर्ती असलेला मोठा मणी यात माळेचीं दोन्ही शवटें ओवितात 'स्मरणीलागीं मेरु जैसा'–अमृत १६ ३ जिच्यावर चिलीम बसविलेली असते ती गुडगुडीची नळी ४ साबर, हरिण याची एक जात [म] सामा शब्द–०दंड–पु पाठीचा कणा 'तेणें मेरुदंड अवक्र शुद्ध।'–एभा १४ ४१० [स] ०स्थान–न माळेच्या मधील मोठा मणि

**मेल**—स्त्री १ डाक, टपाल २ डाक, टपाल नेणारी आग गाडी, डाकगाडी 'नोकराना मेल गाडीनें न पाठविता' –(बडोदें) स्वारीनियम पृ ५२ [इं मेल]

**मेल**—पु (संगीत) थाट शब्द पहा [स]

**मेलं**—उद्गा (बायकी) नावड तिरस्कार इ० चा वाचक शब्द मला पहा 'मेलं अस हा काय करता चिमाबाई!'–मोर १४

**मेलकार**—पु शस्त्रविद्येचा शिक्षक–शार [फा]

**मेलन**—न १ मीलन, एकीकरण 'लोकसत्ताक पद्धति व सार्वभौम सरकारचे अधिकार या दोहींचें योग्य मेलन करिता आलें पाहिजे'–पालें ७२ २ मिश्रण [स]

**मेला**—स्त्रीपु १ मेळा, यात्रा मेळा पहा [स मिल्, हिं मिला] मेलि(ली-लि)कार–पु (महानु) १ वमति, छावणी 'पातले पवनवेगें जेथ मेलिकारू वला श्रीकृष्णरायें।'–धवळ पू २६ २ समुदाय, जमाव 'मेलीकारें नाचती सुभद्रेचे गानीं।'–धवळे उ २४. मेलेकरी–पु मेळयातील मनुष्य

**मेला**—वि १ मृत मेलेला (मनुष्य) स्त्रिया आपली खोडी काढणाऱ्या, आपणास दुखविणाऱ्या पुरुषासबधीं तिरस्कारार्थी हा शब्द नेहमीं वापरतात २ मुरदाड, निरस वेचव, शिळा, निर्जीव नीरस इ० अर्थी अनेक नामाशीं योजतात जसें–मेला चुना=मळणींत वापरलेला, बांधकामात याजलेला विरी गेलेला चुना मेली भाकर=चाकरी किंवा मेहनत न करिता मिळालेलें अन्न मेलें अन्न पहा मेली माती=बांधकामात एकदा उपयोगिलेली, रुक्ष निःस्नेह चिकटपणा न धरणारी माती, कुजलेली माती, क्षारयुक्ताची माती मेलें अन्न=श्रम न करिता अगातुकी करून किंवा शास्त्रविहित नसता भिक्षा मागण्याच्या निंद्य मार्गानें मिळविलेलें अन्न (क्रि० खाणें) मेलें कातडें=निर्जीव कातडें मेलें काम=एखादें निरुत्साही काम मनाला उत्तेजन किंवा व्यायाम न देणारें, कुसत्या मजुरीचें काम मेलें तूप=योग्य तो खर्च करून किंवा उपयोग केल्यानतर अवशेष राहिलेलें तूप मेलें तेल=खर्च न होता राहणारें तेल (दिव्याचें दिपुळेल) तळण्यातील राहिलेलें शिळें तेल मेलें नख=मृत रुक्ष अळव्यासारखें नख मेलें पाणी=ऊढविल्यानें किंवा तापविल्यानें त्यातील वायु निघून गला आहे असें पाणी, बेचव निर्जीव पाणी एकदा उपयोग केलेलें पाणी मेलें मास=मृत मास, जखमेंतील अळव्यासारखी वृद्धि मेलें रक्त=१ मृत,

नाडिवहिर्भूत रक्त २ पडलेलें रक्त, गोठलेलें रक्त ३ अर्धवट चलन पावणारें, मृत रक्त (जसें, म्हताऱ्या माणसाचें) मेलें राज्य=नष्ट राज्य, सत्ता मेलें लिहिणें=मनाला आल्हाद न वाटणारें लिहिण्याचें काम; तुमतें नकल करण्याचें काम मेलें हत्यार(तें)=निकामी धार नसलेलें, गंजलेलें, वापरांत नसलेलें हत्यार, तितीहि चांगली व्यवस्था असली तरी गोळी उडण्यास चुकणारी बंदूक, तोडयाची बंदूक, तोफ इ० याच्या उलट जिवंत हत्यार; चालू हत्यार. [ सं मृत, प्रा. मडल] (वाप्र) **मेला मुर्दा उकरणें**–उखाळ्यापाखाळ्या काढणें, विसरलेलें भांडण, वैर उकरून काढणें **मेल्याचा पाड चढणें–आणें**–मेलेल्याच्या किंमतीचें होणें, सर्व किंमत गमावणें **मेल्या आईनें दूध प्यालेला असणें**–निर्बल, निर्जीव, नेभळा असणें **मेल्याच्या मागें कोणी मरत नाहीं**–दुसरा मेला म्हणून कोणी स्वता मरत नाहीं, तोटा, नुकसान झालें असता कोणी आपला जीव देत नाहीं **मेल्याचें तळपट हो**–(बायकी शिवी) दुष्टाचा सर्व नाश होवो 'कृष्णा हि म्हणे मेल्या अक्षरांचें समूळ तळपट हो।'–मोविराट ६ ७८ (वाप्र) **मेल्या तुझी रांड हो**–तुझी बायको रांड(विधवा)होवो. म्हणजे तूं लवकर मृत्यु पावोस 'मेल्या! रांड तुझी हो ऐसें शापीं इच्छ कु स्त्रीनें।'–मोवन १२ ५८ **मेल्यापेक्षां मेला होणें**–अतिशय खजिल होणें **मेलल्या सारीर घडे भाजून खाणारा**–(गो) चितेवर भाकरी भाजून खाणारा, उलट्या काळजाचा मनुष्य सामासिक शब्द–**मेलतोंड्या**–वि मेमल्तोंडया, गायतोंडया, लाजाळू मुखदुर्बळ [मेला+तोंड] **मेलेला**–वि १ मृत, निर्जीव २ बुडालेलें बुडवलेलें (कर्ज) याच्या उलट जिवंत किंवा जिता [मरणें] **मेलेली सोंगटी वसविणें–सोंगटी लागणें**–(तिफ शी सोंगट्याचा खेळ) डावांत प्रतिपक्ष्यानें मारलेली सोंगटी पुन डावांत खेळण्यास घेणें अशी सोंगटी लागण्यास किंवा बसविण्यास मऊन्या पुढील दान पडावें लागतें मेलेली सोंगटी बसे पर्यंत दुसरें दान वेता येत नाहीं **मेलेलें अन्न**–न मेलें अन्न. 'कोणा-ना पायपोस कोणाच्या पायांत नाहीं, मेलेलें अन्न खाण्याची हौस ह प्रकार चाहोंकडे माजलेले आहेत'–के

**मेलिकार**—पु जमाव मेल्यकार पहा [ स मिल् ]

**मेलो**—पु (गु) शिरावरील एक रोग –कृषि ३५५ [गु मेल]

**मेल्ह(ल)वन**—न (महानु) १ मालवणें 'तरि सभावीं हाईल मेल्हवनें। या लवरासी'–भाए ८० २ नाहींसें होणें, अस्त जाणता दिवल मेल्वणें। या ससारासि।'–भाए २४८ [स म्लै] **मेल्हवनी**–स्त्री (महानु) रात्र 'तरि सभावी फिटेल मल्हवनी। अज्ञानतमाची।'–भाए १६६ [स म्लै, प्रा मिलाणि]

**मेल्हरें, मेल्हेरें**—न. मेळा, भेट 'तया दोहीं परस्परें होय ना अव मेळेरें।'–अमृ ७ ५२. [ गं मिल्, म. मेळ ]

**मेवणा**–णी, **मेवुणचार, मेवूण**—(प्र) मेहुणा–णी इ० पहा

**मेवा**—पु १ द्राक्ष, अंजीर इ० मिष्ट फळें, फळफळावळ. 'जगीं नव नित येती मेवे खाणत।'–प्रला २२१ २ मिठाई, मुरांबा इ० मिष्ट पदार्थ 'मज मिळाला तो दर्शनाख्य मेवा।'–र ३६. [ फा मेवा ] म्ह० बाजारचा मेवा पापन्यांनीं खावा सामासिकशब्द– **मेवा(मेवे)फरोश**–वि फळफळावळ विकणारा 'एकया महिन्याचे मुदतीनें मेवा न पोंहचे, मार्गांतच सडून जाईल म्हणून विलायतचे मेवे फरोशाहीं सांगितलें'–ऐटि २ ९५ [ फा मेवा+फरोश् ] ०**मिठाई**–स्त्री. फळफळावळ, पेयें वगैरे इ० मिठाई **मेवेजात**–पु मेवा फळफळावळ 'त्याचे समागमें मेवेजातच्या पक्या वगैरे सरंजामही रवाना करावयास तयार झाला आहे'–रा ५ ४८ [ फा मेवजात मेवानें अव ]

**मेवाडी**—वि मेवाड देशांतील (मनुष्य, वस्तु इ०)

**मेवाती**—वि १ मेवात प्रांतांत राहणारा (एका जातीचा मनुष्य) हे लुटारू असतात २ लुटारू, बंडखोर ३ पुरगाण्या [ हि मेवाती ]

**मेव्हणचार, मेव्हणा–णी, मेव्हूण**—(प्र) मेहुणचार, मेहुणा इ० पहा.

**मेश(षी)पात्र**—न भितरा, मुखदुर्बल मनुष्य मेमल्तोंडया, गायतोंडया, भलु मनुष्य, मूर्ख, भोळानाथ दुधखुळा [ मेष+पात्र ] **मेशा–शी**–वि गायतोंडया, मेमल्तोंड्या, भलु, दुर्बल व भित्रा, मेषपात्र [मेष] **मेशी**–वि (गो कु) आळशी 'उद्योगांत सोडाच पण जवणांत सुद्धा तो मेशीच'

**मेष**—पु १ मेंढा २ बारा राशींतील पहिली रास अश्विनी, भरणी व कृत्तिका नक्षत्राचा पहिला चरण याचा या राशींत समावेश होतो [ स मिष्=शिंपडणें, टक्कर देणें, स्पर्धा करणें, झें मएष, फा मेष ] सामासिकशब्द– ०**पात्र**–वि मेशपात्र पहा 'अंगात कर्तृत्वशक्ति पाहिजे नुसतें मेषपात्र माणसें काय कामाचीं?' [ स ] ०**संपात**–पु मेष राशींत सूर्याचा प्रवेश, ता २१ अगर २२ मार्च या दिवशीं सूर्य विषुववृत्तावर येऊन दिवस व रात्र यांचें मान सारखें होतें, तो काळ [ स ] **मेषी**–स्त्री मेंढी [ स ] **मेषी–शी–षी**–वि मेंढराच्या कातडयाचा केलेला

**मेषोन्मेष**—पु मिटणें व उघडणें, उघडझाप (डोळ्यांची, फुलाची) [ स मेष+उन्मेष ]

**मेस**—पु मेच, एक जातीचा बांबू याच्या पेऱ्याजवळ वाक असतो

**मेसको**—स्त्री जलदेवता क्षुद्र देवता 'जळींच्या मेसको मायेराणी।'–दा ३२२७ [स महिषी]

**मेसाई, मेसादेवी, मेसायाई**—स्त्री एक क्षुद्र देवता 'ब्राह्मण म्हणविती मद्यमांस सेविती। मेसाई पुजिती वश्यकर्मी।' –ए ५३० 'नव्हे जाखाई जोखाई। मायराणी मेसाबाई।' –तुगा ७९१ [स महिषी]

**मेसा**—स्त्री (चांभारी धंदा) मेंढराचें किंवा हरणाचें कातडें [मेष]

**मेसीरी**—स्त्री राख, मस, मशरी, मशीरी (चूर्ण, राल) 'जैसें वाळूवउनु मेसीरी बीजे'–वैयक बाह ४६ [स मृश्-मृष्टि]

**मेस्त**—पु (गो) सुतार [पोर्तु मेस्तर]

**मेस्तक**—न १ अंकगणिताचें पुस्तक, उदाहरणें सोडवि ण्याचीं कोष्टकें हिशेबाचीं कोष्टकें लिहिलेली वही, नियमाचें व वेरजाचें पुस्तक २ मायने वगैरे लिहिण्यासबंधी व नमुन्याचें पुस्तक, लेखनपद्धति ३ कामाच्या नियमाचें व हुकुमाचें पुस्तक, व्यवहारचोपडी

**मेस्तर**—न गिलावा घोटण्याचें गवंड्याचें एक हत्यार

**मेस्तरी मेस्त्री मेस्त**—पु १ मुख्य लोहार सुतार, गवंडी किंवा शिकलगार, इतर कामगारावर देखरेख करणारा कामगार २ कामकऱ्यावर देखरेख करणारा मनुष्य ३ बेकरीमधील पोर्तुगीज जातीचा रोटीवाला ४ (आदरार्थी) पोर्तुगीज जातीचा चाकर, विशेषत स्वयंपाक्या [पोर्तु मेस्तर, इ मास्टर]

**मेह**—पु १ मूत्रासबंधी रोग हा एकवीस प्रकारचा आहे प्रमेह पहा 'मेह, पिनस विख्यात।'–गीता १३ २४९६ २ मूत्रोत्सर्ग, मुतणें ३ मेंढा [स मिह्=शिंपडणें]

**मेहतर, मेहतरकी मेहतराणी**—प्र म्हेतर इ० पहा

**मेहतर म्हेतर**—पु १ श्रेष्ठ नाशीक प्रांतात भिल्लाच्या जातीच्या पाटलाला पुण्याकडील सुताराला मेहतर म्हणतात जातीचा मुख्य, म्होरक्या, पुढारी –गाणा २९ २ भंगी ३ घडा राजण [फा मिह्तर] सामाशब्द–**मेहेत्रेपण-पणा**–नपु जातीचा पुढारीपणा, एक हक्क हक्काची बाब 'नेवासें परगण्या तील म्हाऱ्यामधील मेहतरपणाचा कब्जा म्हाऱ्यानीं पाटीलकुळ-कर्णीनिशीं हुजुरास यऊन तोडून घेतला'–पशवेकालीन महाराष्ट्र पृ ४८३

**मेहंदळ**—वि पुष्कळ, विपुल मायदळ पहा

**मेहंदी**—स्त्री एक झाड, मेंदी पहा [म मेंधी]

**मेहन**—न १ मूत्रोत्सर्ग करणें २ शिश्न पशाचें अति लघ मेहन जसें लिंबे दहा अंगुळें।'–निमा ३ ७५ 'घोडा पांढरा किंवा श्यामवर्णे असून मेहन आरक्तवर्ण असल्यास तो घोडा उत्तम होय'–अश्वप १२६ [स]

**मेहनत-ती**—स्त्री १ कष्ट, श्रम, आयास 'अन्तोजीनें मेहनती केली'–ब्रच १०५ २ मजुरी, कामधंदा ३ मजुरीचें मोल, वेतन [अर मिह्नत] सामाशब्द–०**मजुरी**–स्त्री भाडयानें किंवा पैसा घेऊन शारीरिक श्रम करणें ०**मशागत**–स्त्री १ (व्यापक) कष्ट, श्रम, निगा, प्रयत्न २ शेत वगैरेची नांगरणी, वेणणी, खुरपणी इ० कामें [अर मिह्नत+मशक्कत]

**मेहनताना**–पु श्रमाचा मोबदला, मजुरी, पगार [अर]

**मेहनती-त्या, मेहनती खपती**–वि मेहनत करण्याचा स्वभाव असलेला, श्रमी, उद्योगी, कष्टाळू, खटपटी.

**मेह्म(मा)न**—पु १ अतिथि, सत्कार करण्याकरिता बोला वलेला किंवा अवचित आलेला मनुष्य २ ज्याची वंशपरंपरागत जमीन घरदार हक्कसंबंध इ०काहीं नाहीं असा उपरी गावकरी ३ (कु) केलेल्या चाकरीकरिता किंवा कृपापात्र म्हणून सरकारनें पोसलेला अलूदार मनुष्य, सरकारी पेनशनर [फा मेह्मान] **मेह्म(मा)नकी**–स्त्री मेहमानचा गुण किंवा त्याची स्थिति **मेह्मानगी**–स्त्री मेहमानी; आदरसत्कार, मैत्री, सलख 'अलीयदल शहानें चारी पादशाहासी मेहमानगी केली'–इम १३ **मेह्मानी**–स्त्री. आतिथ्य पाहुणचार, मेजवानी, नजराणा 'खड फारीक झाल्या वर थोडीबहुत त्याची मेहमानी करून बहुमानें त्यास त्याच स्थळास पाठवून द्यावें'–मराआ ४२ [फा मिह्मानी]

**मेह(हे)र**—स्त्री १ कृपा, दया दयादृष्टि 'इलाहीचे हुकुमें व बदेखान याचे मेहर आमचे जागा होती'–ब्राप ३०८ २ कींव –चित्रगुप्त ३४ –पु भर्तृदत्त विधवावेतन, घटस्फोट कर ताना पतीनें पत्नीसें द्यावयाची करार केलेली रक्कम [फा मिह्र] सामाशब्द– ०**नजर**–स्त्री कृपादृष्टि दयादृष्टि ०**बा(वा)न**–वि १ कृपाळु उपकारी, अनुग्रही, बहाल २ अर्जोत अधि काऱ्याच्या नावामागें जोडावयाचें उपपद [फा मेहरबान्] ०**बा(वा)नी–बा(वा)नगी**–स्त्री कृपा दया अनुग्रह, उपकार; बहाली [फा मेहेरबानगी]

**मेहर**—पु सूर्य. -शर [स मित्र; अवेस्ता मिथ्र, फा मिहिर]

**मेहरणें**—अक्रि बधिर होणें **मेहरी**–स्त्री बधिरता, जडपणा, (अंगातील, अवयवांतील) माझ्या पायास महरी–आली'

**मेहरा(र)ब-प**—स्त्री १(भिंतींत केलेला) लहानसा कानाडा कोनाडा भिंत मखर इ० कस शोभेकरिता केलेली कमान २ मशीदींत पश्चिम दिशेस असणारी पवित्र देवळी हिच्या शेजारी मिंबर (व्यासपीठ) असतें [अर मिह्राब]

**मेहल्नी**—स्त्री (महानु) अंधारी रात्र 'कटाक्षाची मेहल्नी पडे अंत करणीं।'–भाए ३४४ मेल्हवनी पहा

मेहु-हू-हो—पु १ पर्जन्य २ मेघ 'उभय गिर सरोवें लागला वाणमेहो ।'-मुरामायण, युद्ध ३७२ [स मेघ] मेहुडा-ला-ला-पु (काव्य) मेघ 'अकाळीं दिसती मेहुडे । चहवातें क्षणार्धें मोडे।'

मेहु(हु)ण—न भोजनादिकास बोलविलेलें, लग्न झालेलें जोडपें, दांपत्य, नवराबायको [स मिथुन; प्रा मिहुण] मेहुणा-पु १ बायकोचा भाऊ २ बहिणीचा नवरा ३ (व) आतेचा किंवा मामाचा मुलगा [देश्य मेहुणिआ=साला, मामाचा मुलगा] मेहुणचार-पु (पाहुणा शब्दापासून पाहुणचाराप्रमाणें मेहुणा शब्दापासून साधित) १ मेहुण्याचें आदरातिथ्य २ (ना) घरचें नातें [मेहुणा] मेहुणिआ-स्त्री मेहुणी. [द] मेहुणी-स्त्री १ मामाची मुलगी २ आतेची मुलगी ३ (कों) बायकोची बहीण म्ह० राजाची राणी पाटलाची मेहुणी

मेहेतर, मेहेतरकी, मेहेतराणी—म्हेतर इ० पहा

मेहेता—पु गुजराथी लिहिणारा कारकून [स महत्, गुज] मेहेताजी-पु शिक्षक [गुज]

मेहेदा, मेहेनत मेहेराव, मेहेमान, मेहेर, मेहेरणें, मेहेरी, मेहेराप—मेहदी इ० पहा

मेहेरबान, मेहेर्बान, मेहरबान—वि सुप्रसन्न, कृपावन्त, दयाळु मेहरबान पहा [फा मिहरबान्] मेहेर(र)बा(बा)नगी-स्त्री दया, लोभ कृपा मेहरबानगी पहा 'आपणहीं हुजुरीहून मेहरबानगीचा खिजन पाठवावा'-दिमरा १९९ [फा] मेहे(ह)रबानी-स्त्री कृपा 'मेहेरबानी -राज १५१४ [फा. मिहरबानी]

मेळ—पु १ मिलाफ जम संगति, संयोग 'तैसें हेतुकारणमेळें।'-ज्ञा १८३७० २ पर्णें 'भलतेणेंसि मेळु।'-ज्ञा १३.३५८ ३ जमणें, मिळणें, समतोल करणें (हिशेब इ०) ४ समूह; समुदाय, मेळा 'तयेंहि तापसांचा मेळ।'-मुआदि २७ ४५ 'कामिक मेळ ओंवे ओंवता। -मुविराट ३६ ५ ताफा (गाणाराचा, वाजन्याचा) ६ संगत, योग, संबंध 'घडली जयाचेनि मेळें। अमृ २२३ घडे तैसाचि पात्रमेळु।'-ज्ञा १७२८४ ७ घसट ८ गाण्यातील एक चाल 'पद्दा स्वार होउनिया दिल्ली शहरची वागी। तुम्ही झेल तबेले गडी देखणे भारी। मेळ।'-प्रला १९१ ९ मैथुनासक्त सापाचें जोडपें १० कळक, मळ इ०कास जें बीज येतें तें [स मिल्=भेटणें]

मेळप—कि० (गो) व्यभिचारानें अंगीकार करणें

मेळवण—न १ समूह 'जें महामोहाचें मेळवण।'-एभा १४३६७ २ (ना) जनावरास खाऊ घालावयाचें मिश्रण (व) गाई-म्हशीस चारावयाचा दाणा, आंबवण मिळवण पहा. ३ (सामा०) मिश्रण [स मीलन] मेळवणी-स्त्री १ मिश्रण, मिळवणी. २ अतिशयोक्ति [गुज] मेळविणें-सक्रि १ एकत्र जुळणी करणें 'मेळविला भोयानीं। पालखींत घालून चालविला।'-ऐपो २० २ मिळवणें; मिसळणें 'युक्ती मेळविता द्रव्यांतर।'-एभा २५८० मेळा-पु १ मनुष्यांचा समुदाय, जमाव, जमात (विशेषतः धार्मिक किंवा व्यापारी उद्देशानें विशिष्ट काळीं जमलेला), जत्रा इ० (क्रि० भरणें, जमणें) २ संगम (नदीचा) 'पाहु पचगगचा मेळा। स्नान वरू गंगेचें।'-गंगेची भूपाळी ३ गणपतीच्या उत्सवात पदें म्हणणाऱ्या, टिपऱ्या खेळणाऱ्या मुला-मुलींचा संघ, समुदाय ४ पंच, संघ 'आमचा मेळा निवडा' [स मिल्=भेटणें] मेळ्यास मिळणें-पैकीं एक म्हणून जाऊन मिळणें मेळाप-पु समुदाय 'तैसा सज्जनाचा मेळापीं।'-ज्ञा १८१५२१

मेळपडु, मेळापाक—पु १ मिलाफ मिश्रण 'माजि तया मेळापडु। सिंहनादाचा।'-गीता १७७८ २ संगम एक जुळणी ३ जमवाजमव, जुळणी, समुदाय ४ वियोगिताची पुन भेट [सं मिल्]

मेळावा—पु (कवि.) १ जमाव, समुदाय 'नाना रत्नांचा मेळावा। अलौकिक गुंफिले।' २ मेळ, संयोग, मिलाफ 'तैसा मेळावा अर्जुनीं। झाला दिसे समस्तीं।'-मुआदि ८१३ ३ समारंभ ४ सैन्यविभाग; सैनिकसमूह, तुकडी 'तो मेळावा रण काळ डंका। विठुराचा।'-शिशु १०३२ [स मिल्] मेळि(ळी)कार-पु भेट 'कृष्णें केला मेळिकार।'-एरुस्व ६२७ मेळु-ळू-पु भेट, मेळ; संयोग 'वैसा मेळु आला गोविंदे।' -अमृ १११. मेळे करणें-क्रि (कु) एकत्र जमून गप्पा मारणें मेळेकरी-पु एखाद्या गावचा पिढीजाद गांवकामगार. मेळेदार-पु पंचायतीपैकीं एक ईसम, पंच

मेळावो—पु (गो) द्वेषभाव

मेक्षण—न यज्ञकर्मातील एक पात्र हें लाकडाचें असून डल शन्यासारखें असतें [स]

मै—क्रिवि सह, बरोबर [अर मह्] मैजमीयत-क्रिवि. जमातीसह -पया ४९३ मै-फौज-क्रिवि फौजेसह -पयाव ४९४

मैडोळें—न (गो) गोव्यांतील मैंडें नावाऱ्या गावीं होणारें उंची, रुचकर, महाग असें केळें -सह्याद्री ३०८

मैत—वि मेलेला, मयत, मैत या शब्दाशी समास होऊन झालेले शब्द मैयत शब्दांत पहा

मैत्र—पु मित्र, स्नेही, दोस्त 'मैत्राचे बोलें वर्णें।' -दा २१५५ -न अनुराधा नक्षत्राचें नांव -वि स्नेहीपणाचा, मैत्रीचा [स मित्र] मैत्रकी-स्त्री दोस्ती, स्नेह मैत्री 'पत्रिका

यदुवीरें लिहिली गे। मैत्रिकी स्मरनि ते पाहिली गे।' –मध्व १९९ **मैत्रणी, मैत्रिणी, मैत्रीण**–स्त्री स्त्रीमित्र, दोस्तीण **मैत्रिकी, मैत्री**–स्त्री दोस्ती, स्नेह 'लाभाविणें मैत्री तोडू नये' [मित्र]

**मैत्रायणी**—स्त्री कृष्णयजुर्वेदाची एक शाखा **मैत्राणी, मैत्रायणी**–पु ब्राह्मणाची एक जात किंवा तींतील व्यक्ती [मैत्रायणी]

**मैथिल**—पु एक ब्राह्मणाची जात किंवा तींतील व्यक्ति –वि मिथिला देशाचें किंवा नगरासबधाचें [स]

**मैथुन**—न १ सयोग, अगसग, स्त्रीपुरुषसमागम, सभोग २ एकी, समेट, सयोग, सघ [स] **०वैराग्य**–न बहुमार सभोग केल्यामुळे दु खप्रद औदासिन्य व विषाद उत्पन्न होऊन स्त्रीविरक्ति उत्पन्न होणें किंवा कामवासनेचें सयमन करण्याची इच्छा होणें [स]

**मैंद**—पु ढेकळें फोडावयाचा मुळव, पेरलेल्या शतातील सरी बुजविण्यासाठीं त्यावरून फिरवावयाचें एक औत

**मैंद**—पु एका विवक्षित जातींतील व्यक्ति हे लोक प्रवासी लोकाना वाटेंत अडवून त्याचा खून करतात –वि १ बुद्धिमद जड, सुस्त २ घातकी, ढोंगी, दांभिक 'मेंद सोइरी काढिती। फासे घालोनी प्राण घेती।' –दा ३ २ 'मैंदाचे स्वीकारिल क्वण विचक्षण अमूल्य निष्क–पट।' –मोउद्योग ६ ४९ [स मद, मद्रिद] **०कर्म**–न खून, दरवडा 'गर्वे सत्यभामेचा निर्दाळून समुळिहुन करी एक चोर ज्यार चाहाड एक मैंदकर्म आचरी।' –होला २७ **मैंदाची नगरी**–स्त्री सादे किंवा लबाड लोकाचा कप **मैंदावें**–न १ मैंद नावाच्या लोकाचा दरवडा, अत्याचार २ मैंदपणा, घातकीपणा ३ भुलावणी, मोह 'येकलें जाववेना ससार मैंदावें।' –दावि २३५

**मैदाविणें–मैंदावणें**—क्रि मैंदपणा करणें, मैंदासारखी कृति करणें

**मैदा**—पु ओलविलेले गहू वाळवून त्याचें दळलेलें पीठ सपीट, [फा मैदा]

**मैदान**—न १ उघडी, सपाट व विस्तीर्ण अशी जागा २ अग किंवा मधला भाग (वस्त्राचा) [अर् मैदान्] **०बसणें**–क्रि सृष्टिशोभेचें सुख घेण्यासाठीं मैदानात बसणें **घोडेमैदान**–न मर्दुमकीची जागा, रणक्षेत्र

**मैदालकडी**—स्त्री (हि) एक औषधी झाड उदबत्त्या करण्याकरिता याचें लाकूड वापरतात

**मैंदी**—स्त्री (व) मेंदी पहा

**मैना**—स्त्री १ पोपटाची, राघूची मादी २ साळुकी एक गाणारा पक्षी या पक्ष्याच्या अनेक जाती आहेत शाको ६ १८

**मै-फर्जन्दान**—क्रिवि लेकरासह, वशपरपरा 'इनाम मै-फर्जन्दान मुकर असे' –वाडसनदा ८७ [फा]

**मैफल**—स्त्री (व) मजलस, मइफली, सभा 'मैफल जमली.' [अर महफ्ल]

**मैयत**—वि १ मेलेला, मार्जी, इहलोक सोडून गेलेला २ निर्बीज झालेलें, विनाशित (घराणें, कुल) ३ करपलेलें (पीक) [अर मयत] **०अर्जी**–स्त्री मयत इसमासबधींचा अर्ज **०कयास**–पु सशयित मृत मनुष्याच्या मरणाच्या कारणाचा तपास किंवा त्यासबधीं बनविलेले मत, विचार **०चौकशी–तपासणी**–स्त्री मृत इसमाच्या सबंधानें केलेली विचारपूस **०जिंदगी**–स्त्री १ मृत इसमाची राहिलेली, त्यानें ठेवलेली मालमत्ता २ बेवारशी, योग्य वारसदार हक्कदार, नाहीं अशी मालमत्ता **०पंचनामा**–पु मृत इसमाच्या चौकशीचा केलेला पचनामा **०पाहणी**–स्त्री जळून गेलेल्या किंवा रोग पडून नष्ट झालेल्या पिकाची पाहणी **०माल**–पु मयत जिंदगी पहा **०मोकद्दमा**–पु मृत इसमासबधीं चौकशीचा, मोकद्दम **०याद**–स्त्री १ मयत झालेल्या लोकाची केलेली यादी, फेरिस्त २ मृत इसमाच्या चौकशीचे निकालाचे ठेवलेले कागदपत्र **०वारीस**–पु बेवारशी वतन, मालमत्ता

**मैया**—वि शमर ही सख्या [अर् मिआ] **मैयातैन**–वि दोनशें (फक्त मुसलमानी वर्षासबधानें उपयोग) [अर मिअतीन]

**मैराप**—स्त्री महिरप पहा 'मैरापीची सजा केल्या जशी दुसरी द्वारका' –पला [अर मिह्राब]

**मैराळभाऊ**—पु ह्या नावाच्या इसमावरून काटक व बलवान इसमाबद्दल योजावयाचा शब्द

**मैल**—पु एक रस्त्याची, मार्गाची लाबी मोजण्याचें प्रमाण, अर्धा कोस [इ माइल]

**मैल**—पु घाण, खळमळ मल 'जळती चित्त मैल सर्वैया।' –विपू १ ६९ [स मल, स मल्=धारण करणें] **०खोर**–वि मळकट रगाचा, घाण दडवणारा मळखाऊ (रग) **मैला**–पु नरक, घाण [स मल्=धारण करणें] **मैलो**–पु (कु) मळ [म मैला]

**मैलागर**—पु १ एक प्रकारचें चदनाचें लाकूड उत्कृष्ट चदन २ मलयगिरी पर्वताचें नाव [स मैलागिरी, मलयगिरी, द्रा मलै=पर्वत]

**मैल्यकार**—पु (महानु) सघ जमाव चतुरग सैन्यासह मुक्काम पातले पवनवेगें जेथे मैल्यकारू केला श्रीकृष्णराजें' [स मिल्=एकत्रित होणें]

**मैस, मैंस**—स्त्री काजळ, मस शाई 'सकळ पर्वताची मस करूनि। समुद्राचिया पात्रामाजीं भरूनि। कल्पतरूची सुंदर करूनि लेखणी। लेहू बैसे आदिमाया।' –स्वादि ७ ४४८ [स मषी]

**मैळ**—पु मळ **मैळ**-वि मलिन **मैळणें**-स्त्री मलिन होणें, मळणें 'तरि तें पधरेपण न मैळे।'-ज्ञा ८ ३१ [स मलिन-मइल-मैल-मैळ]

**मैळें**—न (महानु) वस्त्र 'तया अनुरागाचेया चोळे। रापे इंद्रियाचे मैळें।'-माए ७९६ [स मऌ=धारण करणें]

**मोआ**—स्त्री (कों) माशाची एक जात या जातीच्या माशास आक्टोबर नोव्हेंबर मध्यें पकडतात

**मोआजीन**—पु मशिदीची बांग पुकारणारा मनुष्य मवाजीन पहा 'इमामलोक व मोआजीन लोक याची चौकशी करणें'-पाड सनदा ७९ [अर् मुअझ्झिन्]

**मोईनसवी**—वि मुकरर वस्ती करणारे 'मोईतसवी याची चौकशी करून'-समा ३ २०५ [फा]

**मोई(इ)न**—स्त्री वर्षाची नेमणूक, ठराव, नियम, पगार, तैनात, कायम नेमणूक 'हतक्रियावर मोईन प्रमाणें चौकीपहारा न राखेच तर परिच्छिन्न दूर करावा'-मराआ १४ [अर मुअय्यन्] **०जाबता**-पु १ नेमणूक होताना किंवा पगार निश्चित करताना लिहून घेतलेला लेख, पगारपत्रक, नोकर लोकाचें पत्रक २ करारांचें पत्रक, वाटणीपत्रक **०दार**-पु संस्थानातून नेमणूक किंवा वेतन घेणारा इसम मोईन पहा **०माप**-न १ ठराविक किंवा निश्चित मोजमाप २-क्रिवि खचित, करारानें, कायमपणें, ठराविकपणें, खरोखर

**मोईर**—पु (गो) मुसलमान [मूर²]

**मोऊळ**—पु (कु) गवताची केलेली लहान केरसुणी [मोळ]

**मोक, मोख**—पु अकुर, मोड, कोंब, गर्भ 'केळीचा मोक हरभऱ्यायेवढा घेऊन त्यात हें औषध सध्याकाळीं घालावें'-अश्वप २ १८० [स मुख]

**मोकट**—वि मोकळा बेवद, स्वच्छद मोकाट पहा

**मोकडी**—स्त्री एक झाड

**मोकदम**—पु मुख्य अधिकारी मुकदम पहा 'मोकदम (मुख्य आदमी) हा किताब पाटलाला असे'-गागा ४५ **मोकदमा**-पु मुकदमा पहा **मोकद्दम-मोकद्दमी**-(प्र) मुकद्दम, मुकद्दमी पहा

**मोकरर**—वि स्थिर, निश्चित मुकरर पहा [अर]

**मोकल**—वि स्वाधीन 'आपली कुलकर्णाची गोही चाल तरी सदहू पैकीयाची सोडी मोकल करीन'-रा १८ ६६ -पु सरक्षक, वदरका 'आम्हास पन्नास तापची मोकल देऊन गडावरी नेऊन'-रा १८ ६४ [अर मुवक्कल्]

**मोकलणें**—क्रि १ पाठविणें धाडणें, प्रेषणें 'ब्रह्मा शिष्याची भीड धरुनि साधु शिष्य मोकलिले'-मोआदि ९ ३४ 'स्वसाक्षी करिता खाण्डव वन दहन। इन्द्र मोकलील मेघजीवन'-मुआदि ४९ ९९ २ मोकळा सोडणें, दाब किंवा बधन न ठेवणें 'द्वारे मोकळुनि। जनक दृखला तोडूनी'-पाळणेसग्रह १० ३ गमावणें ४ ओक्सबोसी, मोठ्यानें (हल काढून, ओरडून, कठसकोच न करिता) रडणें [स मुक्त, देश्य मोक्क, गु मोकलवु] **मोकलूं न देणें**-यावावयास लावणें, जाऊ न देणें, अटकाव करणें

**मोकळ**—स्त्री १ विस्कटलेली, निर्बंध, अस्ताव्यस्त स्थिति २ फेड (कर्जाची) ३ सुटे किंवा विस्कळीत स्थितींतील भार, गट्ठे, इ० ४ मोकळीक, स्वतत्रता; सोडणूक, सुटका, मुक्तता -क्रिवि १ मोकळेपणें, स्वैरपणें, स्वतन्त्रतेनें, दाब किंवा प्रतिबंध नसता (क्रि० सोडणें, सुटणें, फिरणें, हिंडणें, चरणें) २ (खुल्या किंवा उघड्या स्थितींत-) पत्र, हिशोब, दस्तऐवज, (कायम मुकर किंवा निश्चित न केलेल्या स्थितींतील)-हिशोब, स्मरणार्थ टिपण [स मुक्त] **०चरणी**-वि मनास येईल त्याप्रमाणें चालण्यास स्वतत्र २ भटक्या; उनाडक्या करणारा, ३ अस्थिर किंवा खात्रीचा, निश्चित नसलेला (पगार, उत्पन्न इ०) **०चरणें**-क्रिवि मोकळेपणें, अनिरुद्ध, स्वतत्रपणें **मोकळचिठ्ठी**-स्त्री मोकळीक देण्यासबधींचें पत्र, मोकळीक चिठ्ठी पहा **०लेख**-पु खुल्या कागदावर किंवा उघड्या कागदावर लिहिणें याच्या उलट बदिस्त लेख **०वट**-क्रिवि १ खुलेपणें (पेंड्या जुडे किंवा भारे अगर गड्डे न बांधता) २ बद न करता, उघडें ठेवून ३ ऐसपैस, अघळपघळ, प्रशस्तपणें (मैदान किंवा विस्तीर्ण पटांगण) ४ स्वैरपणें, स्वतत्रपणानें (भटकणें इ०) [मोकळा+वत्] **०वाडी-वादी**-स्त्री १ (ग्रा) मोकळीक २ स्थलत्याग ३ निराश स्थिति 'सृष्टि गेली रे गेली। देवा मोकळवादी जाहली। ऐशी एक टाळी पिटिली। सत्यलोकीं।'-शा १ १५७

**मोकळा**—वि १ स्वतत्र, बधमुक्त अनियत्रित २ खुलें, उघडें, बद नसलेलें (दार किंवा दरवाजा अथवा पेटी) ३ वेगवेगळे, एकत्र न झालेलें एकत्र न गुरफटलेलें ४ न व्यापलेलें, रिकामें ५ (भयकर रोगापासून दु खातून) सुटका झालेला, मोकळा झालेला मुक्त [स मुक्त प्रा मोक्को; गु मोकळु सिं मोकल, उरि मुकुळा] **०चाकळा**-वि स्वतत्र स्वैर, अप्रतिबद्ध, खुला, उघडा, बद नसलेला इ० [मोकळा द्वि] **०ढाकळा**-वि १ उघडा, न झाकलेला, बद नसलेला, सार्वजनिक उपयोगा करिता खुला असलेला (तलाव, नदी, जमीन) २ ऐसपैस अघळपघळ, लाबरुद (जागा, घर इ०) [मोकळा द्वि] **मोकळी**-स्त्री १ स्वच्छदीपणा स्वातत्र्य **मोकळीक**-स्त्री १ सुटणूक, मुक्तता, स्वतत्र किंवा मोकळें होणें 'तुवा दिधली मज मोकळीक वा जे'-र १३ २ सुटका, रजा इ० [मोकळा]

०चिठ्ठी-स्त्री. १ सोडवणुकीची, सुटकेची अगर मुक्त केल्याची चिठी अगर लेखी कागद २ जप्त केलेला माल सोडलेल्याचा लेख **मोकळीभाजी**-स्त्री शिजवून कोरडी केलेली, आत पाणी नसलेली भाजी ह्याच्या उलट असट भाजी किंवा गोळा भाजी **मोकळें**-न मोकळेपणा ०मैदान-रान-न १ ऐसपैस जागा २ ( ल ) पूर्ण स्वातन्त्र्य, सदर परवानगी

**मोका**—पु १ संधि, प्रसग 'अलीकडे मोका आल्यास कैलासवासी महाराज साहब, ह्याची चागली पूजाही करीत असत –विक्षिप्त २ १६८ २ नाकें, प्रमुख ठिकाण 'मोक्यावरची जागा ' [ अर मौक्अ ]

**मोकाट—टु–टू**—वि १ ( माण ) उद्धट, द्वाड, दाडगा, स्वच्छदी २ ( व ) मोकळा, अनर्गल 'धीट सैराट मोकाट। चाट चावट वाजट।'–दा २ २ [ स मुक्त ]

**मोकाडकी**—स्त्री एक प्रकारचें दावें [ मोकाड=मुख+अडकी=अडकणें ]

**मोकादम, मोकादमी**—पु मुकद्दम व मुकद्दमी. मुकादम पहा

**मोकाबला**—पु मुकाबला पहा

**मोकाम**—पु मुक्काम पहा 'ती दिसाचे मोकाम'–ऐपो ८०

**मोकार**—पु एन खर्च

**मोकार**—क्रिवि १ मोकळेपणानें, निर्बंध नसता २ स्वतन्त्रपणें, फाजीलपणें

**मोकारा**—पु ( महानु ) मोगरसूल 'केला परसुखाचा मोकारा । जीवपशुवा।'–ऋ ५१

**मोकादी-सी, मोकासदार**—पु मोकासपणाचा हक्क ज्यास आहे असा इसम, सरस्थानचा अगर अशा इसमाच्या मार्फ तीचा वसूल जमा करणारा शेतकरी, गाव इत्यादि ज्यास इनाम आहेत किंवा चाकरीबद्दल दिले आहेत असा इसम [ मोकासा ]

**मोकास**—पु गाव, जमीन, इनाम देतात ती सरकार चाकरीबद्दल मिळणारा गाव

**मोकासा**—पु १ लष्करातील नोकरीची अट घालून त्या सबधानें किंवा इनाम म्हणून दिलेलीं गावें, जमिनी वगैरे २ गावच्या वसुलामध्यें व अमलामध्यें हिस्सा ३ चौथाईपैकीं राजबाबती वजा करून राहिलेला भाग, चौथाईपैकीं तृतीयांश अथवा तीन आण्याचा भाग –इनाम ३० ४ गावखोती वगैरेसहि हा शब्द लावतात ५ मुसाफराची मालमत्ता सुरक्षित राखण्याच्या अटीवर दिलेलें इनाम [ अर मुकासा ] **मोकास**-स्त्री वसुलापैकीं कांहीं हिस्सा मिळण्याचा हक्क 'मौजे वहूल तालुके पावळ यथील मोकास बाबेचा अमल ' [ अर मुकासा+बाब ]

**मोकाळ**—वि मोकळा, भटक्या, स्वतंत्र, मन मानेल तिकडे हिंडणारा; उनाड क्रिवि मोकळेपणानें, स्वतन्त्रतेनें

**मोकील**—पु ( व ) ( मोंगलाई ) अशील [ अर मुअक्कील ]

**मोकूफ-ब**—वि.क्रिवि स्थगित, थांबलेलें, रहित, बद 'वतन चालविण मोकूफ राहिलें होतें ' –थोमारो १ ६५ 'दोन दिवस मोकूब जाले आहत ' –पेद ६ २०३ [ अर मव्कूफ ]

**मोख, मोंख**—पु १ धान्यादिकाच्या आत जो बीजभूत अंश असतो तो २ सुपारीच्या मध्यभागाचा मऊ पदार्थ, नारळातील अंकूर, मोड किंवा बीजाचा खाण्यामध्यें येणारा भाग **मोखर, मोखार**-वि १ मऊ, कठिण नसलेला, सहज मोडणारा किंवा फुटणारा, ठिसूळ ( दगड इ० ) २ भरभराटीचें, जोमानें वाढणारें, वयाच्या मानानें बाळसेदार व सुरेख असलेलें ( मूल ) [ मुख ]

**मोखंडी**—वि ( व ) उत्तम 'मोखडी जमीन '=गव्हाची उत्तम जमीन

**मोखणें**—क्रि ( गो ) १ बिनचूक तीर मारणें. २ ( गो ) झोंकून देणें

**मोखा**—पु १ दाडा, खुंट २ लवचीक किंवा हिरवा कोंवळा फोक (झाडाचा), कांहीं भागात डांग शब्दाबद्दल उपयोग करतात

**मोखतसर**—पु मुख्तसर पहा वजनदार लोक 'हेजीबा सागात मोख्तसर दाहाजण आले होते '–इम १० [ अर मुख्त सर, संक्षिप्त, निवडलेलें ] **मोखलीसान**-पु स्नेही [ फा मुख्लिसान ]

**मोग**—पु ( कों ) मोड, अकुर, कोंब मोख पहा

**मोग**—पु ( गो ) लोभ, मोह

**मोगड, मोगण**—न ( सामा मोघड, मोघण असा शब्द रूढ ) पेरणी करताना पाभरीच्या दर चौथ्या तासात मुख्य धान्या शिवाय जें दुसरें धान्य पेरतात तें **मोगडा, मोगणा, मोगणी**–एकाच वेळीं दोन धान्यें पेरण्यासाठीं पाभरीला जोडलेला स्वतन्त्र नळा मोघडा, मोघणा पहा ( क्रि० धरणें, चालवणें ) 'आज गव्हाचा मोगडा धरावयाचा आहे '

**मोगर-रा**—पु १ टापरणें, ठोकणी, ठोकणें, मेखपु २ ल्हान गाठ ( ओंवलेला मोती सोन्याच्या तारेंतून पडू नये म्हणून तारेच्या टोंकाला मारलेली, बसविलेली ) ३ फरसबदी करणाराची ठोकणी, ठासणी, परटाचे कपडे बडविण्याचें साधन, लाकडी हातोडा ४ ( ल ) पायदळ 'चालती पायाचे मोगर। पातले कौंडिण्यपुर नगर। आणीक वऱ्हाडी महावीर। चैद्यभार तेही आले।'–एरुस्व ५ २६ [ स मुद्गर, प्रा मोग्गरो, सिं मुद्गिरो ]

**मोगर**—वि मुख्य 'चालती मोगर मातुरगी।'–मातृकी–स्वयवर ९९ [ स मुखर ]

**मोगरसूल, मोंगरसुल**—न धान्य, धन, इतर पदार्थाचा समूह दानधर्म म्हणून जनतेकडून लुटविण्याची क्रिया, लूट,

संकातील स्त्रिया उसाची वगैरे लूट करतात ती, वोवसादान ' हरि मुक्तीचे मोगरमुठ देवें। का न कीजे।'–भाए ६१९

**मोगरा**—पु एक फुलवेल, तिचें फूल, मुरकेदार फुलास मद मोगरा म्हणतात **मोगरें**–न मोगऱ्याचें फूल **मोगरेल**–न मोग ऱ्याचें तेल **मोगरी**–स्त्री (कों) मोगऱ्याचें झाड

**मोगरी**—स्त्री कणसें बडविण्याचें लाकडी अवजार, लाकडी मोठा हातोडा; शेतातील ढेकळे फोडणारें लाकडी औत मुळ्याची विलायती शेंग, ही रंगानें तांबूस असते [स मुद्गर] **॰मार**–पु १ (कपडे धुताना) मोगरीचा मार देणें, चोप देणें २ (ल) चांगला, खरपूस चोप, मार देणें 'मोगरीमार धुपल्मार।'–दा ३ ७,६५.

**मोगल मोंगल**—पु मध्य आशियांतून किंवा तार्तरीहून हिंदुस्थानात आलेली मुसलमानांची एक जात, मोंगल जातीचा मुसल्मान इसम [फा मुघोल्] **मोगलाई**–स्त्री १ मोंगल लोकांचें राज्य, अमल, सत्ता २ कोणत्याहि मुसलमान राजाची सत्ता, त्याचें राज्य ३ (ल) बेबंदशाही ४ करविशेष (मोंगलांनीं बसविलेली मोंगलाचें हिस्स्याची रकम) –थोमारो २ ७० ९ [मोगल] **॰मसलत**–स्त्री कपटडाव 'परंतु मोंगलाई मसलत यास समजली नाहीं'–भाव ४८ **मोगलाण**–न १ मोगलांचा देश, मोगलांच्या सत्तेखालील देश २ मोगल लोकांच्यामधील, मोगल लोकांनीं सरकारविरुद्ध केलेलें बंड, दगा, उठावणी [मोगल] **मोगली**–वि १ मोगल लोकांसंबंधीचें २ कपटी 'ऐदियासें मोगली मनसबा, इनाम देऊन आपला मतलब साधितील'–इम २०१ [मोगल] **॰एरंड**–पु एक प्रकारचें एरंडाचें झाड, बईचा एरंड **॰बाजार**–पु जोराची दंगल, आरडाओरड (क्रि॰ माडणें माजणें मातणें करणें) **॰बेदाणा**–पु बेदाणा, एक औषधोपयोगी पदार्थ [फा] **॰मिरची**–स्त्री वाग्यासारखी मोठी मिरची, भाजीची, मोपळी मिरची

**मोगल**—पु काजूगर

**मोगळ**—पु (कर) चौपाखीपैकीं बाजूचीं छपरें मोळ पहा 'छपराला मोमळ ठेवले तर खर्च फा येणार नाहीं'

**मोगा**—वि (गो) सखा, निवलग (मित्र) –चित्रा, दिवाळी अंक १९३६

**मोगा-घा**—पु (हेट) १ रहाटगाडग्याचें मडकें मातीचा लोटा २ नारळाचा सुधरा, पोगी, (क्वचित) नारळांत उद्भवणाऱ्या कोंबासहि म्हणतात **मोगारा**–पु कोंब, धोम, अंकुर (क्रि॰ येणें, फुटणें)

**मोघ**—वि व्यर्थ, निष्फळ, विनाकारण, निरुपयोगी, बकिफायतशीर 'ज्यावर सत्वचीचीं वचनें मोघ होत नाहींत ..' –नि ८९५ [स]

**मोघड, मोंघण**—स्त्रीपु (व) १ मुख्य धान्यामध्यें पेरलेलें दुसरें धान्य, उतवडा २ असें धान्य पेरण्याचा नळा मोगण पहा

**मोघड्या**–स्त्री (खा) दोन फणी पाभर, खानदेशात गहूं, हरभरा या पाभरीतून पेरतात **मोघणा**–पु मुख्य धान्यात मोगण म्हणून दुसरें धान्य पेरण्याचा नळा मोघड किंवा मोघण या अर्थी उपयोग २ या नळयानें किंवा मोघण्यानें पेरलेलें तास **मोघणी, मोंघणी**–स्त्री १ जोंधळा, बाजरी वगैरे मध्यें तूर, हरभरा १० ची केलेली पेरणी २ असें पेरणीचें काम ज्या नळयानें केलें जातें तो नळा मोघणा पहा. **मोघणें**–क्रि मोघणाच्या साधनानें शेतांत तास पाडून त्यात बीं पेरणें [मोघण]

**मोघम, मोहगम**—वि. सर्वसाधारण, अनिश्चित, अस्पष्ट रूप रेषेचें, खुलासेवार नव्हे असें (भाषण, काम, व्यवहार, खर्च), संदिग्ध 'ऐसे मोहगम हजरत म्हणतात यात काय समजावें?'–रा ५ १४५ [अर मुब्हम्] **॰धाध, धावती**–स्त्री कोणताहि खुलासा न केलेला असा कर, वर्गणी किंवा पट्टी, कोणत्या बाबीकडे खर्च करणेची हें न ठरवता वसूल केलेली रकम.

**मोघल**—न तंबूचें, डेऱ्याचें मागील दार [अर]

**मोघळ**—पु (कर) गटार, पाट 'गाय मोघळा मोघळान गेली'

**मोघा**—मोगा पहा

**मोघारणें**—न नक्षसगाराचें हत्यार

**मोघें**—न जोंधळा, बाजरी किंवा गहू ह्यांच्यामध्यें मोघ ण्यानें पेरलेलें धान्य; मोगण पहा (व) असें धान्य पेरण्याचा नळा

**मोच**—स्त्री खाण्यास योग्य अशी एक भाजी

**मोच**—पु मऊ कापूस ज्यास येतो असें झाड, सावरी, शेवरी **मोचरस**–पु मोच नावाच्या झाडाचा, सावरीचा चीक, डिंक, एक औषधी पदार्थ, सुपारीचें फुल –मुन्या १७१

**मोचक**—वि मोकळा करणारा, सोडविणारा, मुक्त करणारा, सुटका करणारा, (समासात) भवमोचक, पापमोचक, ऋणमोचक [स] **मोचणें**-(काव्य) मोकळा करणें, सोडणें, मुक्त करणें, सुटका करणें [स मोचन, मुच्] **मोचन**–न मोकळें होणें, मुक्त होणें, स्वतंत्र होणें, सुटणूक, स्वतंत्रता, मोकळीक, (सामा) जाळ देणें [स मुच्=सोडणें]

**मोचड**—पु जोडा [प्रा] **मोचडी**–स्त्री नाजुक जोडा

**मोचा**—पु १ मोजा २ जोडा, एक प्रकारचा बूट हा शब्द मदनगराकडे वापरतात 'होईन मोचे वाहणा। पायीं सकळां संत जना।'–तुगा ११४१ [हिं] **मोचे खाणें-बसणें**–पायपोसाचा मार खाणें, बसणें **॰मोची**–स्त्री एकमेकांमधील खेटराखेटरी किंवा जोडाजोडी **मोचे फेडणें**–क्रि जोडे फेकणें, तुच्छ मानणें

' गजवाजीनृयानप्राप्तता । तेणें गर्वे इंद्रमाया मोचे फेडी ।'–एभा ५ १५२ [ मोचा द्वि ]

**मोची, मोचेकरी**—पु १ एक जात, चाभार 'जीनगर सल्तानगर चर्मक। दोहर माट बुरुड रजक। दागट मोचेकरी खाटिक। लोणारी आणि कैकाडी।' -स्वादि ६ ५ ३८ २ माग जातीतील एक पोटजात, खानदेश व सोलापूर जिल्ह्यांत ही पोट जात प्रामुख्यानें आढळते -अस्पृ ४७-४८ [ ब मुचि, हिं मोची, मोचा ]

**मोच्छाव, मोच्छाह**—पु महोत्सव, कोणताहि मोठा उत्सव [ स महोत्सव, महोत्साह ]

**मोज**—न १ मापन, परिमाण किंवा संख्या निश्चित करणें २ मापणें, मोजणें, मापानें मोजून निश्चित करणें ३ मापानें मोजून निश्चित केलेली संख्या ४ (लांबी, वजन किंवा क्षेत्र यांचें) मापन किंवा माप ५ मोजण्यासाठीं घेतलेलें कोणतेंहि परिमाण [ स मा=मोजणें ] ०दात-दाद-दास्त-स्त्री संख्या मोजणें, गणना, मापन; मोजणी [ अर ] ०प-न संख्या मोजणें, मापणें, मोजमाप करणें, संख्या ०पट्टी-स्त्री मोजण्याची पट्टी, फूटरूल **मोजका**-वि मोजलेला, मर्यादित किंवा इयत्ता ठरविलेला २ माफक, साधारण [ मोजणें ] **मोजजा**-पु मोजणी 'अवि आहाले असतील त्याचा नजर मोजजा आनमासें करून'-वाड बाबा १ २१२ **मोजणी**-स्त्री मोजण्याची क्रिया, संख्या ठर विणें, मोजणें, मोज किंवा मोजमाप करणें २ जमीनीचें मापन किंवा क्षेत्र मोजणें [ मोजणें ] ०दार-पु जमीनीचें क्षेत्रफळ काढ णारा, मोजणी करणारा **मोजणें**-क्रि १ मेजणें, मापणें, गणित करणें २ ( ल ) भिणें, पर्वा करणें, जुमानणें, अभिमान धरणें, मानणें, गणणें 'याच्या गुणापुढें न त्रिदशावा आपणासि नग मोजी।'-मोविराट ६ ३८

**मोजला**—वि मोजलेला; मोजमाप केलेला, गणलेला, विवक्षित रकम किंवा परिमाण ठरविलेला, मर्यादित केलेला, मोजका 'मोजल्या रुपयांनीं ससार होत नाहीं' **मोजी करणें**-क्रि काट कसर करणें **मोजीव मापीव**-वि मोजलेलें व मापलेलें, निश्चित केलेलें, एकत्र जमा केलेला किंवा विस्कळीत नव्हे असा मोजमाप किती आहे हें माहीत असलेला [ मोजणें व मापणें ] **मोजोटी मोजपटी**-स्त्री (सोनारी) मोजपट्टी, एक प्रकारचा शिक्का **मोज्या**-पु मापारी

**मोजबा, मोजबेदार**—पु (प्र) मोसबा व मोसबेदार पहा

**मोजा**—पु थंडी वगैरेपासून हातपायांचें रक्षण व्हावें म्हणून त्यांस घालण्याची विविक्षित आकाराची पिशवी [ फा मूजा ]

**मोजिब, मोजीब**—क्रिवि प्रमाणें [ अर मूजिब्, मुजिब ]

**मोझ्या**—पु खल,चर्चा, साराश, प्रतीसाक्ष्यम् -राव्य ८ ८१ 'हा कागद साहेबीं जतण करून ठेविला पाहिजे याचा मोझ्या होईल'-रा १६ ४६ [ अर मुवाझअ ]

**मोट**—स्त्री ( व ) १ मोठी पिशवी, पोतें, मोठें ओझें, गाठोडें (धान्य, शेण इ०चें गाठोडें किंवा एकत्र जखडून बांधलेल्या पुष्कळ वस्तूंचा समूह ढीग, रास) 'ना तो सूर्य मोट। बांधिता निकें।' -अमृ ७ २७४ २ बैलाकडून किंवा रेड्याकडून विहीर वगैरेंतील पाणी वर काढण्याचें साधन ३ पाणमोट, पोटातील पाण्याची पिशवी (क्रि० येणें, पडणें, फुटणें, निघणें) ४ ( ल ) पशूला खालीं जमीनीवर पाडून त्याच्या पायाचे चारी खुर एकत्र बांध लेली त्याची स्थिति, भूत-पिशाच्च बाधा झाली असता माणसाची गठडी वळवून त्यास बांधलें जाणें किंवा त्याचे हातपाय जखडले जाणें ५ शिदोरी, उपहाराच्या साहित्याचें गाठोडें 'मग आपुलालिआ मोटा घेऊनि। सकळें एतें जालें।'-दाव २०१ ६ दहा हजार ही संख्या ( क्रिया फुलांची, दुर्वांची लाखोली वाहतात त्यावेळीं लक्षाचा दहावा अंश याअर्थी योजतात ) म्ह० शिनळ धरावा खाटेस चोर धरावा मोटेस ०बांधणें-इच्छेविरुद्ध जखडून बांधणें; एखाद्यास त्याच्या इच्छेविरुद्ध एखाद्या कार्यास प्रवृत्त करणें, इच्छा नसता धरणें **(धान्याची)** ०बांधणें-असंभाव्य गोष्ट करू पाहणें. ०धरणें-क्रि मोट जुपणें, सुरू करणें, हाकणें सामाशब्द– ०करी-पु मोट हाकणारा, मोटेवर काम करणारा ०क(कु)ळें-न गाठोडें, कमें तरी बांधलेलें किंवा नीट न बांधलेलें गाठोडें मोटळा पहा ०कुळी-स्त्री गाठोडी ०उडी-स्त्री (पाण्यात) उडी टाकताना हवेंत असताच स्वतःचे हातपाय पोटाशीं धरून व शरीराचें गाठोडें करून जी उडी मारतात ती याच्या उलट सुर कटी उडी **मोटला-ळा-मोटली-ळी, मोटलें-ळें**-पुस्त्रीन मोटकुळें पुरचुंडी, गाठोडें 'पृथुक मोटली सापडता प्रभु बहु हर्षाला लाहे।'-मो सुदामचरित्र (नवनीत पृ ३७०) **मोट घण**-न १ मोटेंतील पाणी जयें ओतलें जातें ती जागा २ (कर.) मोटेचें बडप, मोटेकरिता उभारलेली जागा **मोटस्थळ, मोटस्थळ जमीन**-स्त्री मोटेच्या पाण्यानें भिजणारी जमीन, विहिरीच्या पाण्याखालीं, बुडकीच्या पाण्यासालीं भिजणारी जाणारी जमीन याच्या उलट पाटस्थळ **मोटाळा-ळी-ळें**-न (महानु) १ गाठोडें, बंधन 'महातारी तमाचा मोटाळा गा।'–चरित्र २ (महानु) (ल) सामान, संग्रह (रोजचें व्यवहारोपयोगी भांडीं कुंडीं, खायवस्तु इ०) मोटाळा बांधागा।'-सूत्रपाठ **मोट्या**-वि मोटा वाहण्याचें कमव करून उपजीवन करणारा ओझीं किंवा गढे वाहून नेणारा, हमाल [ मोट ]

**मोट**—स्त्री मट, एक धान्यविशेष, मटक्या

**मोटका**—वि निपुण, निष्णात, नेटका, प्रत्यक्ष, चांगला 'मोटका देओ वागारो हातु घाली । सवेंचि वैसे मागिलीं पासाळी ।' –शिशु १०११ 'मोटका काळासीं सीतसारी ।'–भाए ४५८

**मोटका**—पु फडकरी –कृषि ४७३

**मोटका-को**—वि ( गो कु ) खुजा, ठेंगू क्षुद्र 'मोटके दोषचि भालेकार ।'–उषा १४२१

**मोटकी**—पु गायनशास्त्रांतील एक राग ह्या रागात षड्ज, कोमल ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात जाति संपूर्ण-संपूर्ण वादी मध्यम संवादी षड्ज गानसमय-दिवसाचा दुसरा प्रहर

**मोटकें**—वि १ थोडें २ सूक्ष्म

**मोटगार**—पु हमाल

**मोटन**—न वोढण पद्धा [ स ]

**मोटर्वी**—स्त्री एक प्रकारची मिरची, ही आखुड व जाड असते

**मोटवें**—न ( कों ) लहान

**मोटसुती**—वि जाड धाग्याचें किंवा जाडेभरडे कापड [ मोट+सूत ]

**मोटा-ठा**—वि १ थोर, जाडा २ ( शब्दश ल ) अतिशय, जास्त फार, अधिक ( चांगल्या किंवा वाईट अर्थी ) 'दिसतोस तू बरा मोटा ।'–मोआदि २.२९ 'हा मोटा आळशी – भडाणी – शहाणा – चतुर – विद्वान – मूर्ख – लबाड इ०' –क्रिवि थोर परम इ० शब्दाप्रमाणें उपयोग ) फार अतिशय [ स महत्तर ] **मोटाई**–स्त्री १ मोठेपणा, थोरपणा, जाडपणा २ ( ल ) श्रेष्ठत्व ( क्रि० करणें धरणें लावणें, मिरवणें, दाखविणें, भोगणें वाढणें वाढवणें, मागणें ) [ मोटा ] **मोटाड**–वि अतिशय अत्यंत मोठा, थोर जाडा जाड [ मोटा ] **मोटा धाटा**–वि १ मोटा व जोरदार जाड आणि धिप्पाड ( मनुष्य, जनावर ) २ बळकट जाडया अंगाचा जाडेभरडे, बारीक, सुंदर, नाजूक नव्हे असें ( कापड धागा वस्तु ) [ मोठा द्वि ]

**मोटार**—स्त्री तेलानें(पेट्रोलनें) चालणारी गाडी [इ] **मोटार सायकल**–स्त्री फटफटी मोटार पेट्रोलच्या साह्यानें चालणारें सायकलसारखें दोनचाकी वाहन **मोटारहाक्या**–वि मोटार हाकणारा इसम 'दोन मोटारहाक याना पकडून नेलें '–क १७ ६ ३० [ इ शॉफर ड्रायव्हर ]

**मोटाळणें**—क्रि मोडणें [ स मोटन ] **मोठा**–मोटा पहा

**मोठाई**—स्त्री ( कों ) मोठेपणा मोटाई पहा 'दासीची लाज जाईल मग काय राहील मोठाई ।'–पला २९

**मोठाब्बा**—पु साप [ मोठा+बाबा ]

**मोठाबापा**—पु ( खा ) वडील चुलता [ मोठा+बाप ]

**मोठी**—वि थोरली **०घोळ**–स्त्री रस्त्याची वाकण **०माय**–स्त्री ( व ) आजी 'मोटी माय मेली **०होणें**–क्रि ( कु ) नहाण येणें **मोठें**–वि थोरलें, लहान नाहीं तें, स्थूल (शरीर), ( ज्ञानानें, वयानें, धनानें ) अधिक **०पोट**–न ( ल ) अंत करणाचें औदार्य, दया, क्षमा करणें ( क्रि० असणें ) **०शहाणे**–(निदार्थी) अतिमूर्ख 'आपण मोठे शहाणे अहात ' **मोठ्ठा जाल**–वि (व) फार मोटा, खूप मोठा –रणगर्जना १७ ९ २८

**मोड**—पु १ पराजय, मोडलेली, फाटाफूट झालेली किंवा विस्कळित झालेली स्थिति ( सैन्याची ), बसेडा २ पाणीच पाणी करणारा पाऊस, मोठा पूर –स्त्री १ जुनीपुराणी, फुटकीतुटकी हरकामी न यणारी अशी ( विकून टाकण्यासारखी धातूची भांडीं किंवा दागिने वगैरे ) २ भाषेची मांडणी 'मराठी शब्दाची लिंगावचनानें रूपें कशीं कशीं होतात ह्याची एकदा मोड समजली म्हणजे चाललें ' ३ दूण, दुमड, सळ, केसामध्यें काटलेला भाग, उभ्या पिकाऱ्या शेतामधून पडलेली रेघ, ओळ, अशाच तऱ्हेची पडलेली सामान्य रेषा ओळ ४ ( नदीचें, रस्त्याचें ) वळण किंवा वाकण ५ दिशा, रोख, वळण, मोडणी, सर्वसाधारण गति किंवा मार्ग 'जशी केसाची मोड असेल त्याप्रमाणें वस्त्रा फिरविला म्हणजे लागत नाहीं ' ६ पद्धत, रीत, वळण, प्रघात,सरणी, रोख ( भाषणाचा, निबंधाचा कृतीचा ) 'गणूची अक्षराची मोड फार चांगली आहे ' 'घोषाच्या कुडीं । नाद चित्राची रूपडीं । प्रणवाचिया मोडी । रेखिली ऐसीं । '–ज्ञा ६ २७६ ७ हिशेब, गुणाकार, मेळवणी, पोहणें, झोंपणें इ० ची जी रीति ती ८ खुरदा किंवा लहान नाण्याचें नाणें ( पैसे वगैरे ) 'एक रुपयाची मोड आण ' ९ –स्त्रीपु जड होणें किंवा दु ख होणें ( कामाचा भार पडल्यामुळें किंवा वाकून अगर दवून राहिल्यामुळें अवयवामधील किंवा इंद्रियामधील ) आळस, मंदपणा 'हाताला–मानला–कमरेला–मोड येती–येतो [ स मुट्–मुड् = मोडणें ] **मोड पाडणें**–क्रि ( चाभारी धंदा ) घडी पाडणें **मोडतोड**–स्त्री १ मोडलेलें, तुटलेलें सामान, त्याची दुरुस्ती २ एखादा व्यवहार, वस्तू वगैरे बदलून घेणें, विक्री करणें ( जुने दागिने, धातूची भांडीं इ०ची ) ३ मिरवणें, तडजोड करणें, एकी घडवून आणणें ( भांडण, कर्ज इ०संबंधीं ) ४ भाग किंवा अवयव निरनिराळे, वेगवेगळे करणें व ते पुन्हा जोडणें, दुरुस्त करणें, नीट करणें [ मोडणें+तोडणें ] **मोडभाग**–पु भाग आणि जोरगत ह्याच्या दरम्यानची समुद्राची स्थिति भरती आणि ओहोटी ह्याच्यामधली अवस्था ( वास्तविक मोडभाग व मोडजोहार हे दोन्ही शब्द एकच व दोन्ही शब्द एकमेकाच्या ऐवजी उपयोगी पडतात) **मोडमाड**–स्त्री मोडतोड विध्वंस, सत्यानाश **मोडसुरा मोडसुरी**–पु स्त्री ज्याचें पातें मिटवितां यतें असा सुरा किंवा सुरी, मिटणारा चाकू

[मोडणें+सुरा] मोडामोड-स्त्री (वॉ) मोडतोड **मोडक्या दळाचा सारथी**-पु (ल) अनाथाचा वाली, असाह्य स्थितीं तल्या इसमाला मदत करणारा, दीनदुबळ्याचा साह्यकारी

**मोड**—पु बीजादिकापासून मूलभूत असा जो उत्पन्न होतो तो, अंकुर, कोंम, मुगारा (क्रि० येणें, फुटणें) मूळव्याध झाली असता गुदद्वारीं होणारी मासवृद्धि, एक प्रकारचा रोग

**मोंड**—वि (कर) धाष्ट

**मोडक**—पु १ एक जातीचा डोंगळा, मुंगळा किंवा माकोडा २ एक उपनाव

**मोडकळ-ळी**—स्त्री दमून जाणें, थकवा, दमणूक, ग्लानि (म्हातारपणामुळें किंवा जास्त परिश्रम केल्यामुळें आलेला)-वि १ मोडलेला, ऱ्हास पावलेला, नाश पावलेला, नादुरुस्त झालेला (उद्योग, इमारत, व्यापार इ०), नाश झालेली (स्थिति) (क्रि० येणें, होणें, घालणें, आणणें) २ अव्यवस्थित, अस्ताव्यस्त, नादुरुस्त (सरजाम, सैन्य इ०) ३ तुकडे पडणारा, ढिसूळ, मोडणारा, पि.ळ, फुसका, चुरा होणारा (तांदूळ इ०) **मोडकळणें, मोडकळीस येणें**-क्रि थकणें, दमणें (म्हातारपणामुळें इ०), नाश होणें, ऱ्हास पावणें, नादुरुस्त होणें-असणें, विघडून जाणें -साधन १२ १५९ **मोडका**-वि मोडलेला, दुखविल्यानें अगर भंगल्यामुळें मोडल्यामुळें निरुपयोगी किंवा अधु झाला आहे असा (पदार्थ) [मोडणें] ०**तोडका**-वि मोडावयास झालेला, मोडकळीस आलेला ०**वाणी**-पु लहान प्रमाणात व्यापार करणारा व्यापारी, जुन्या पुराण्या मालाचा, तुटपुंज्या भांडवलावर धंदा करणारा वाणी, घेवारी, डाळपिठ्या, हिंगमिऱ्या वाणी **मोडकी**-स्त्री १ (सामा) मोडलेली स्थिति, मोड, पराभव, मोडल्या बद्दलचें अपयश २ अडथळा, प्रतिबंध, हरकत अडचणीचें कारण (क्रि० आणणें, ठेवणें, घालणें, येणें) ३ बिघाड (कामाचा, उद्योगाचा, मताचा) 'चार मनुष्यें काम चालविणारीं परंतु कामाची मोडकी मुख्याच्या डोक्यावर येते' ४ खंडन, मोड, वितंडा, खोटें करून दाखविणें, निरुत्तर कुंठित करणें (क्रि० येणें, आणणें) [मोडणें] ०**कांटी-काठी**-स्त्री १ मोडून पडलेलें कांटेरी झाड, काठी २ (ल) ज्या मनुष्याची सत्ता, अधिकार इ० नाहिशीं झाली आहे अशा मनुष्याबद्दल उपयोग म्ह० मोडकी काठी भलताच राठी

**मोडकु(कू)ल-ळ**—न (गो) भात मळल्यावर, तुडविल्या वर भात्याण खालीवर करण्याकरिता व निराळें काढण्याकरिता तयार केलेली टोंकास ८-१० छोटें वाकडी असलेली काठी

**मोड जोहार**—स्त्री जोर नसलेली किंवा कमजोर भरती भाग, ऐन भर निघून गेल्यानंतरची पक्षमध्यातील भरती [मोडणें+ जोहार (जोर शब्दापासून)]

**मोडणी**—स्त्री १ शेतातील कापणी केलेल्या धाटाची किंवा पिकाची कणसें मोडण्याची, खुडण्याची क्रिया (मळणी करण्या साठीं), कापणी; मोडण्याची क्रिया. 'होता स्थूळ पिकाची मोडणी। होय सूक्ष्म बीजाची पुढझाडणी।'-स्वादि १३ ५४६ २ मार्ग, पद्धत, वागण्याची रीत, ओळ, मोड (-स्त्री) पहा ३ मांडणी ४ देवाला कौल लावले म्हणजे अमकी गोष्ट करावयाची तर उजवी कळी दे, नको करूं असें म्हणावयाचें असेल तर डावी कळी (प्रसाद) दे, अशा प्रकारें कौल लावण्याची क्रिया

**मोडणें**—सक्रि १ तोडून खाली टाकणें, पाडणें, नाश करणें, बिघाड करणें, (इमारत इ०), विस्कळित करणें, भग्न करणें, नाहींसें करणें (मोडणें आणि तोडणें ह्या दोन्हीहि क्रियापदाचा हा सर्वसामान्य अर्थ आहे तरी पण दोहोंच्या अर्थांत बराच भेद आहे (तोडणें पहा) तोडणें याचा अर्थ कांहीं तरी मोठें, भचा नक, भयंकर कृत्य करून तीक्ष्णधारी जोरकस हत्याराचा उपयोग करून किंवा जोरानें किंवा एकदम दिसकून एखाद्या वस्तूचा नाश करणें आणि मोडणें म्हणजे पदार्थाच्या आकारात, स्थितींत बदल करणें उदा० रान तोडणें आणि रान मोडणें हे दोन वाक्प्रचार घेतले तर पहिल्यातील तोडणें याचा अर्थ रानातील झाडें तोडून, छाटून, खाडून नाहींशीं करणें व मोडणें याचा अर्थ रानातील झाडझुडप काढून साफसफाई करणें असा अर्थ ध्वनित होतो) जसें -देशपद्धति मोडणें 'त्याचें व्रत त्यानें मोडलें' २ तुकडे करणें, भाग किंवा अवयव वेगवेगळे करणें (यंत्राचे इ०) ३ वाक वून तुकडा करणें (काठी, वेत, लाकूड इ०चे) खुडणें (धान्याचीं कणसें, भुट्टे इ०) 'जादुगारानें काठी मोडलेली आम्हीं पाहिली' ४ तोडणें, नाहींसा करणें (मैत्री, संगत, दुकानदारी, व्यवहार इ०) ५ विस्कळित होणें, विस्कटणें, पांगापांग होणें (बाजार, मंडळी, सभा कौन्सिल इ०ची) 'म्हैस उधळल्यामुळें सभा मोडली' ६ खुरदा किंवा नाणें करून आणणें (मोहरा, रुपया याचें) 'एक रुपाया मोडून नाणें, खुर्दा घेतला पैसे करणें, (दागि न्याचे, धातूच्या भांड्याचें) विक्री करून पैसे घेणें (जनावराचे, वस्तूचे) ७ भग करणें, अडथळा करणें, बिघाड करणें (झोपेचा, शांततेचा, चालू कामाचा उद्योगाचा इ०) ८ विपडविणें, नाखूश करणें, अवमानणें (मन, मर्जी, इच्छा, हेतु) 'पितृसत्यपाल्ना प्रभु कैकेयीचें न चित मोडून।'-मोरामायणें १ ४८४ ९ बिघाड करणें, रचना, जुळणी नाहींशी करणें, विस्कटणें (पागोटें निऱ्या इ०) १० नाहींशी करणें, ओसाड पाडणें, (वस्ती, गाव वसाहत) ११ खंडण करणें; पाडाव करणें (पक्ष, मत, वाद इ०चा) १२ खर्च करणें, नाश करणें; गमावणें, घालविणें, बुडविणें (वेळ, काळ, दिवस) १३ जोर हटविणें, नाहींसा करणें, शमविणें, दाबून टाकणें,

घालविणें (तहान,भूक, काळजी,संशय, भय) १४ जिरविणें, कमी करणें, घालविणें (खोड, व्यसन, गर्व, इ०) १५ स्थिरस्थावर करणें, सांत्वन करणें, नाहींसें करणें ( भांडण, झगडा, दगा ) १६ भग करणें, अतिक्रमण करणें, उल्लंघन करणें ( कायदा, हुकूम, आज्ञा, वचन,करार इ०), १७ रद्द करणें, बंद करणें, काढून टाकणें(कायदा, नियम, विधी, सत्कार, समारंभ) १८ दिवाळें काढणें;नाश करणें; मोडतोड करणें १९ पुसून टाकणें; नाहींशी करणें, खरडून टाकणें, मागमूस दिसू न देणें 'गाडीची वाट फेसाटीनें मोडावी ' मोडणें हें तोडणें या क्रियापदाहून भिन्न आहेच परंतु याच अर्था सारखें भासणारें फोडणें या क्रियापदाहूनहि भिन्न आहे फोडणें पहा मोडून टाकणें-काढणें-१म्हणणें किंवा बोलणें खुंटविणें, गोंधळविणें, कुंठित करणें; निरुत्तर करणें २ पराजित करणें, फजित करणें 'त्याचा हा परिपाक आजि दिसता या पढिता मोडिलें।' -साहह ६ ६४

**मोडणें**—सक्रि उकरणें. 'जैसा न मोडिलिया विहिरा। मग आपशिया उगमीं झरा। भरोनि ठाके।'-ज्ञा १५ २६९ [ स, मुट् मुड्=मोडणें स मोटन, प्रा मोडण, हिं मोडन ] मोडणें शब्द उत्तरपदीं येणारे कांहीं वाक्प्रचार (एखाद्याचें) मन मोडणें= त्याच्या इच्छेविरुद्ध जाणें, न ऐकणें, त्याची आज्ञा निष्फळ करणें; मर्जीच्या उलट जाणें घर मोडणें=कुटुंबातील माणसांची पांगापांग करणें प्रॉमिसरी नोट मोडणें=ती बाजारभावानें विकून मोबदल्याचे पैसे घेणें दिवस मोडणें=दिवस खर्च करणें भय मोडणें=भय घालविणें, भीति नाहींशी करणें चाल्रीत मोडणें=चाल्रीत सोडणें, ती न पाळणें मातीचें चित्र मोडणें=तें छिन्नभिन्न करणें

**मोडणें**—अक्रि १ भग्न होणें, छिन्नविच्छिन्न होणें, विस्कळित होणें २ ऱ्हास पावणें, अपकर्ष पावणें; कमी होणें ३ (एकादशी) निष्फळ होणें ४ मोडून जाणें; माराखालीं, दाबाखालीं नमणें ५ प्रकृति खालावणें, ऱ्हास होणें ६ ओसाड होणें, निर्जन होणें, लोकांची वस्ती नाहींशी होणें ७ दिवाळें वाजणें, मोडतोड होणें ८ बंद पडणें; चालू नसणें ( उद्योग कारखाना, धंदा ) ९ नावा खालीं येणें, मध्यें अंतर्भाव होणें जाणीव होणें, पोटांत, सदरांत येणें, अंतर्भूत होणें 'पुणें शहरांत भांबुर्डा मोडतो' 'हिंदुस्थानांत लंका मोडते ' १० स्मृतींतून नष्ट होणें, विस्मरण पडणें (आचार, रूढी, पद्धत यांचें ) ११ ( अशक्तपणामुळें, अधिक श्रमामुळें ) ढिले पडणें, हतबल होणें, त्राण नाहींसा होणें, कसकसणें १२ तुटणें ( अंग ) मोडून येणें-कसकस येणें तापाची कसर येणें, हातपाय मोडून येतात मोडतें घेणें-नाकबूल करणें, इनकार करणें, नाकारणें माघार घेणें, मागें हटणें, पाऊल माग घेणें मोडता काळ-पु अपकर्षाचा, मंदाईचा काळ 'मोडत्या काळीं जो धर्म करील तो धर्मात्मा [ स मुट्=चूर्ण करणें ठार करणें ]

**मोडती**—स्त्री १ कांहीं एक कार्य होऊं न देण्याविषयीं केलेला भापणादि व्यापार, बंदी, मनाई, अडचण, अडथळा, अटकाव (क्रि० घालणें) 'मी जाणार होतों परंतु त्यांनीं मोडती घातली म्हणून राहिलों ' २ मनाईची, अटकाव केल्याची, हरकत घेतलेली स्थिति [ मोडणें ] ०घेणें-यांबणें, मागें घेणें, ओढून घेणें; खेचणें

**मोडयणें**—क्रि (प्र ) मोडावणें पहा.

**मोडधाक**—स्त्री हातांत घालण्याचा हिराचा सोन्याचा, रुप्याचा एक दागिना [ मोडणें+वाक ]

**मोडपिळी**—स्त्री भाजी इ० चिरण्याचें एक साधन, जिचें पातें उघडतां व मिटतां येतें, मोडून खालीं पाडतां येतें अशी विळी विळी, इळी पहा

**मोडशी मोडघशी**—स्त्री रेच, बंदी होऊन लागलेली हग वण, अजीर्ण, अपचन [ मोडणें ] ०उतरणें-( ल ) नक्षा उत रणें 'शिंदे यांचे फौजेस हासत होत त्यांची मोडशी उतरली ' -भाब८१ (एखाद्याची) ०जिरविणें-एखाद्याची खोडकी जिर वणें, त्याला खूप चोप देणें, त्याचें पारिपत्य करणें 'हल्लीच्या काळीं एखादा फडक्यासारखा वेडा पीर जर कांहीं गडबड करण्यास आरंभ करील तर सरकार त्याची मोडशी एका क्षणांत जिरवील.' -निबंधचंद्रिका

**मोंडळ**—न बेडकाप्रमाणें ओरडणारी, निर्विष, दुतोंडी, आखूड, जाड, रंग भाडा-तांबूस अशी सर्पाची जात -बदलापूर ३४८ माडूळ पहा

**मोडा**—पु १ हरकत, विघ्न, अडथळा, नको म्हणणें, नकार देणें, मनाई करणें, कांहीं एक कार्य होऊं न देण्याविषयीं केलेला प्रतिबंधक व्यापार २ अशा व्यापारानें कार्याची झालेली कुंठिता वस्था, खोळंबा, हरकत केलेली, मोडता घातलेली स्थिति ' पर्जं न्यानें चार दिवस आवजेचा मोडा केला ' ३ पाठ नसलेली खुर्ची, घोडी ४ गुराचा न शेतकामाचा सुटीचा दिवस ५ ( मल्ल- विद्या ) आपल्या मानेवर जोडीदारानें हात ठेविला असतां आपल्या बाहेरच्या हातानें मानेवर ठेविलेल्या जोडीदाराच्या हाताचा पंजा धरून तो मुरगळून जोडीदारास चीत करणें ६ घडवंची [मोडणें] मोडा-मोडता घालणें-क्रि अडथळा करणें, विघ्न आणणें, हरकत घेणें 'भोपाळावर स्वारी करण्याच्या राघोजीच्या बेताला इंग्लिशांनीं मोडता घातला '-विवि ८७१३९ ०कुद-पु एक प्रकारचा रोग आळस ०खा-पु (कु ) जेथून दोन रस्ते फुटतात तें स्थळ ०घणी-स्त्री गळाठून जाणें, हतबल होणें, कमजोर होणें अंग मोडून येणें, कसकसणें [ मोडावणें ] मोडावणें-अक्रि थकणें, दमणें, मोडकळीस येणें, कोसळणें, श्रम, दुखणें यांमुळें ग्लानि येणें 'मोडावला जाणो निर्भुम। उठावला वज्रनाभ। मग पाठीसि घातला साव। मदन वीरें।' -कथा १

१३.६३. २ देहस्मृति नाहींशी होणें. 'राया हें बोलता विस्मित होये। तेणेंचि मोडावला ठाये।'-ज्ञा १८.१६१३. ३ वाढ खुंटणें किंवा थांबणें [ मोडणें ]

मोडावणें—अक्रि (धान्यादिकाला) मोड येणें; अंकुर फुटणें.

मोडावळ—स्त्री. (कु) १ मोडतोड; दुरुस्ती २ डोंगर फोडून केलेली शेतजमीन, जमीनींत हागडुजी करून ती झाडें लावण्यासाठीं व्यवस्थित करणें; पडीक जमीन उपयोगात आणणें. [ मोडणें ]

मोडिक—वि. कुत्सित. -शर.

मोडी—स्त्री. नटणें, सजणें; शृंगार. -शर

मोडी—स्त्री. १ जलदीनें मराठी भाषा लिहिण्यासाठीं वर्ण मोडून लिहिण्याची प्रचारात आलेली पद्धति २ प्रकार, सरणी, पद्धत. 'त्या रजाची स्वरूपमोडी। ऐके निरवडी सांगेन।'-एभा २५ २१९. ३ सुरमाची पुटकुळी. [ मोडणें ] ०लिपी-स्त्री. जलद लिहिण्याची लिपी; मोडी लिपी ही हेमाड पंडितानें उपयोगात आणली. मोडीच्या साम्प्रतच्या स्वरूपावरून ती देवनागरी( बाल बोधी )चीच परंतु लिहिण्यास सोयीच्या अशा मोडणीची बनलेली असावी असें दिसतें 'मराठी साम्राज्याच्या उदयापूर्वी तीनशें वर्षांपासुन मोडी लिपी प्रचारात होती '-ज्ञाको (म) २१८

मोडी—स्त्री. (वे.) ऐंद्रजालविद्या

मोडीव—वि १ घडी करता येण्याजोगा, आटोपसर आकारात ठेवता येण्याजोगा; ज्याचे अवयव सुटे करतां येतात आणि पुन्हां जोडतां येतात असा (पलंग, टेबल इ० वस्तु किंवा यंत्र). २ मोडतोड झाल्याकारणानें विकून टाकलें पाहिजे असें; विक्री करून मोडण्याजोगें, विक्री करून किंवा बदलून घेण्याजोगें, मोडीला घालण्याजोगें (सामान, दागिने, भांडी इ०) ३ फुटकीं तुटकीं भांडीं, दागिने, इ० आटवून किंवा पुन्हा सांधून नवीन केलेलीं (भांडीं, दागिने इ०), मोडलेल्या दागिन्यांचें किंवा धातूच्या भांड्यांचें केलेलें ४ नादुरुस्त, फुटका; मोडका (कोणताहि पदार्थ), तुकडे तुकडे झालेले [ मोडणें ] ०अडकित्ता-पु ज्याचें पातें आतील बाजूनें व बाहेरील बाजूनें मोडता किंवा वळविता येतें असा सुपारी कातरण्याचा अडकित्ता ०घडी-स्त्री. घडया मोडलेली कापडाची गाठ किंवा गड्डा मोडून घेणें-क्रि पाडाव करणें काबीज करणें 'तयाचा वेहदुर्ग हा थारा। मोडूनि घेतला तो वीरा।'-ज्ञा १८.१०५२. मोडून-मोडोनि येणें-क्रि झाड लवण्याइतकें, मोडण्याइतकें बहारीचें झाडास पीक फळ येणें 'निंब निंबोळिया मोडोनि आला। तरी तो काउळियासीचि सुकाळु जाहला।'-ज्ञा ९ ४३८.

मोडें—न (कु) ताप, अंगमोडून येणारा ताप. [ मोडणें ]

मोडया—वि १ मोडतोड, नाश, विध्वंस किंवा नासाडी करणारा-करण्याच्या स्वभावाचा किंवा करण्याच्या प्रवृत्तीचा; अडचणी किंवा भय दाखवून, अनियमितपणा [illegible] योजना, प्रयत्न हाणून पाडणारा [illegible]डथळा, हरकत, विघ्न आणणारा. २ कांहीं अवयव, भाग [illegible] गात्रें मोडलीं आहेत [illegible] असा; (समासात हात, पाय, [illegible] शब्दांशीं जोडून, [illegible]) हात मोडया=ज्याचा हात, मोडलेला आहे असा (माणूस, [illegible] इ०)

मोढ—पु अंकुर, मुगारे, मोड पहा.

मोढा—पु १ नदींत घुसलेला आणि पाण्यानें बहुतेक वेष्टिलेला असा जमीनीचा पट्टा. २ खोल ओढा, ओघळ किंवा ओहळ (पाणी असलेला किंवा नसलेला)

मोंढा—वि. (व) डोक्यावर मुकुट नसलेला उघड्या डोक्याचा (रुपया) 'मोंढा रुपाया कोणी घेईना'

मोत, मौत—स्त्री (व) १ मरण, मृत्यु २ मोठें संकट. (क्रि० येणें). ३ स्मशानयात्रा [ सं मृत्यु, प्रा. मच्चु हि. पं. मौत, गुज मोत, अर मौत् ] कुत्र्याच्या मोतीनें मरणें-हाल होऊन अथवा समाजानें अवमानिलेल्या स्थितींत मरणें.

मोनड, मोथड—न खटाटोप. 'गाढव गाढवीसि धुंयड। न करी अलंकार मोथड।'-एभा १३.२२१

मोतदार, मोताद्दार—पु घोड्याला खरारा करणारा, त्याला दाणापाणी देऊन त्याची निगा राखणारा नोकर; सईस; खासदार. [ अर मुत अहिद्द्=काळजी घेणारा ]

मोतरिंगणी—स्त्री रिंगणीची एक जात [ मोती+रिंगणी ]

मोतसबी—स्त्री. फडणिशी, हिशेबनिशी. -थोमारो ९. १०६. मोहतसबी पहा

मोताद्—स्त्री १ ठराविक किंवा परिमित प्रमाण किंवा परिमाण (अन्न, औषध, पैसा इ० चें), ठराविक भत्ता किंवा मिळकत. २ प्रमाण, इयत्ता, मर्यादित रकम [ अर. मुअताद्=ठराविक, अर मुह्ताज्=दरिद्र ] मोतादि दी, मोहोताजी-स्त्री ठराविकपणा, मर्यादितपणा, परिमितपणा

मोताद—स्त्री. १ अगदीं तुटपुंजा पदार्थ २ दुर्भिक्ष्य, अभाव. 'पादशाही वन्दे तुम्ही सनिध असता पादशाहीची ऐ दशा होऊन कवडीस मोहोताजी व्हावी हें अपूर्व आहे'-दिमरा २ १२५. ३ मध्यमपणा -मदबा २ ३०. -वि नादार; दरिद्री प्राप्तीचा अभाव दर्शविताना समासात नामास जोडून योजतात उदा० अन्नाला-वस्त्राला-खर्चाला-मोताद=अन्न, वस्त्र इ० ज्यास मिळत नाहीं असा [ अर मुह्ताजी=कंगाली, गरिबी ]

मोताना—पु १ लढाईंत मरण पावलेल्याच्या मुलाबाळास दिलेली देणगी -होके १२३ २ बालपरवेष [ अर मौत् ]

मोताळा—पु गुजराथी ब्राह्मणाची एक जात किंवा त्या जातींतील एक व्यक्ति.

' शको. ६. १९

**मोतिया**—पु १ मोगऱ्यातील एक भेद २ मोत्याचा रंग **मोतीया रंग**-पु एक प्रकारचा मोत्यासारखा रंग

**मोतिलग**—वि मोत्यें लाविलेला, मोत्याचा हार मोत्याचे सर 'तिये पदीं जे सुलीन । तेंचि जडित पदक जाण । मुक्त मोतिलग संपूर्ण । गुणेंविण लेइलासे ।' –एहस्व १ ३९ **मोती-मोत-दाणा**-पु ( तंजा ) हिरे व मोत्यें यांनीं जडित अशी नथ

**मोतीं**—न १ समुद्रात शिंपीच्या पोटीं जें रत्न उत्पन्न होतें तें, मौक्तिक, मुक्ताफळ, मुक्ता, मुक्तिका मोतीं वजन करण्यासाठीं पुढील वजनाचा उपयोग करतात – १३॥ टांक किंवा १६ तंदुल=१ रति, २४ रति=१ टाक १६ बदाम=१ दोकडा ६। दोकडे=१ टका, १ टाक=६२ ट्रायग्रेन –छञ ७१ १६ बदाम=१ दोकडा १०० दोकडे=१ टका, चव १३॥। टके=१ रती, २४ रती=१टाक २६ आणे=१ रती २४ रती=१ टाक –मुव्या १२०. २ वरील पदार्थासारखा कृत्रिम पदार्थ करतात तो, नकली मोतीं ३ सोन्याच्या तारेंत मोतीं ओंवून त्याचा नाकात घालण्यासाठीं जो दागिना करतात तो, नथ ४ डोळ्यातील एक विकार, विकृति मोतीबिंदु मोतिबिंब, पटल ( क्रि० उतरणें, पडणें ) [ स मौक्तिक, का मुत्तु, प्रा० मोत्ता ] (वाप्र) **नाकापेक्षा मोती जड**—मोतीं हें नाकाला शोभा आणण्यासाठीं असतें मोती जड झालें तर नाक तुटण्याचा संभव असतो यावरून एखादा गौण वस्तूला मुख्य वस्तूपेक्षा अधिक महत्त्व प्राप्त होणें याअर्थी योजतात **मोतीदाणा**-वि मोत्याच्या दाण्यासारखा सुंदर ( मनुष्य अक्षर ) 'धन्य भगवाना नलास मोतीदाणा'–ऐपो १३८ **मोत्याचा भांग**-पु केसांच्या भांगांत घालावयाचा मोत्याचा दागिना एक तऱ्हेचा मोत्यांनीं गुंफिलेला दागिना –तुळसीदास शाहीर याचे पोवाडे **मोत्याची ओळ**-स्त्री सुंदर वळणदार अक्षराबद्दल योजतात **मोतशिंप-पी**—स्त्री जींत मोतीं तयार होतो ती शिंप **मोतिबिंदु, मोतिबिंब मोत्याबिंदु-बिंब**-पु एक नेत्ररोग ( क्रि० उतरणें पडणें होणें )

**मोतीचूर**—पु १ बारीक कळ्यांची बुंदी, लाडूचा एक प्रकार २ धोतर लुगडें इ० यास असलेला जरीचा किंवा शोभिवत काठ किनार

**मोतींण**—स्त्री एक पांढऱ्या फुलाची वेल

**मोतीयाळें**—न ( गो ) लहान माशाची एक जात –मसाप ३ ३

**मोतूर**—पु पाठ मोहतर-तूर पहा 'आपल्या भावाचा खून करून व हॅमलेटच्या आईशीं मोतूर लावून'–गीर २९

**मोत्या**—पु १ कुत्रा २ ( ल ) लहान मुलाची मुष्टी ३ ( ल ) पिकदाणी

**मोत्याळ**—स्त्री एक प्रकारचा तांदूळ

**मोन्ना**—पु घोड्याचा एक रोग –अश्वप २ १४०

**मोत्साव, मोत्साह**—पु महोत्सव, मोठा उत्सव, मंगल प्रसंग [ स महोत्सव, महोत्साह ]

**मोथ, मोथा**—स्त्री पु नागरमोथा, एक सुवासिक गवत व कंद [ स मुस्ता, प्रा मोत्था, हिं प मोथा ]

**मोथळा**—पु मोदळा पहा

**मोद**—पु आनंद, आल्हाद, उल्हास [ स मुद्=संतोष पावणें ]

**मोदक**—पु एक पक्वान्नविशेष 'तडस भरोनि येती तिडका । मोदक बहु चारिले देखा । जेविता आमुचा आवांका । गलित झाला तधवां'–ह १२ १९२ २ ( ल ) मुष्टि मोदक खरपूस मार –वि सुखदायक आनंददायक [ स मुद्=एकत्र करणें ] ०**विडा**—पु एका विशिष्ट आकाराचा नागवेलीच्या पानाचा विडा, विवक्षित पद्धतीनें केलेला विडा **मोदणें**—अकि आनंदित होणें, आनंद मानणें उल्हासित होणें [ स मुद् ] **मोदराशि**-पु आनंदानें भरलेला किंवा व्याप्त असा 'सदानंद जो मोदराशि । तया भेटवीं आजि दामोदराशी ।' [ स ] **मोदित**-वि आनंदित, प्रमुदित, उल्हसित [ स ]

**मोदळा, मोघळा**—पु चिटाचें सूत उकळण्यासाठीं तें ज्या रहाटावर घालतात त्या रहाटावर खावण्या ज्या मातीच्या गोळ्यामध्यें उभ्या करतात बसवितात त्या गोळ्यापैकीं प्रत्येक २ ( सामा मोघळा ) सैल बांधलेला गवत काटक्या इ०चा भारा, गुरांनीं खाऊन उरलेल्या कडब्याचा भारा ३ ( ल ) अगडबंब, जड, किंवा ज्याला आपलें शरीर पेलता येत नाहीं असा माणूस, पशु किंवा वस्तु ४ मातीचा गोळा चिखला चिखलाचा गोळा 'कैंचा लेंकीवीण कावळा । मातियेवीण मोदळा ।'–ज्ञा १८ ८१४ ५ गाठोडें, ओझें 'देह नश्वरत्वें देखिला । विष्ठामूत्रांचा मोदळा ।'–एभा १० १८९ ६ मोहाळें धार काढण्याच्या वेळे शिवाय इतर वेळीं दूध पिऊ नये म्हणून वासराच्या तोंडावर काटे असलेलें तरट बांधतात तें ७ मुद्गल –अप्र ६ ४९ ८ शिरहित देह 'निरंजन तो जना वेगळा । आधार पाहतां न दिसे डोळा । अवयवहीन केवळ मोदळा । याहूनि भिन्न ।'–स्वादि ६ १ ३८ [ स मृत्+गोलक ]

**मोदाड**—न धोबाड

**मोदी**—पु १ मोठ्या किंवा थोर इसमाच्या पदरचा दिवाणजी किंवा कारभारी, सरकारी खाणेंपिणें इ० चा सर्व सरंजाम ज्याच्या स्वाधीन असतो तो २ धान्याचा दुकानदार सर्वसमक्ष जवळ बाळगितो असा जो वाणी त्यास म्हणतात धान्याच्या खरेदी-विक्रीचा धंदा करणारा [ हिं मोदी, अर मुदाई=निधिधारक [ट्रस्टी ]

**मोदीखाना**—पु लष्कर, सैन्य इ० ची धान्यादि सामुग्री ठेवण्याची जागा किंवा ह्या सबधाचें खातें, सैन्याच्या पुरवठ्याच्या वस्तू ज्यात भरून ठेवल्या आहेत अशी इमारत 'पदार्थ भरपूर मोदीखाना।'–ऐपो २१५

**मोधळा**—मोदळा पहा

**मोधा**—वि मुग्ध, स्तब्ध 'ज्ञान पावोनि नव्हे मोधा। स्वरूपींहुदा प्रबोधी।'–एभा ११ १०१६ [स मुग्ध] ॰**गोळा**–पु १ गात्राच्या क्षीणतेमुळें जो थाकला आहे आणि जो सदा मुडी करून बसतो असा परस्वाधीन झालेला रोगी किंवा म्हातारा माणूस, लगडा, थोटा किंवा बोजड अगाचा, मोठा, अवजड इसम, जडगोळा [मुग्ध–मुडा+गोळा]

**मोधाड**—वि जुनाट झालेला, कुजलेला, जुनाट झाल्यामुळें कमजोर झालेला

**मोधाड**—न (व) तोंड, मुसकट मुडकें 'मोधाडावर मारलें'

**मोधाडणें**—अक्रि मारणें 'ऐसा मोधाडीन की याद राख'

**मोधी, मोधीखाना**—मोदी, मोदीखाना पहा

**मोनई, मोनवत**—स्त्री केळीच्या पानाचा शेंड्याकडचा भाग, पानाचे जे तीन भाग करतात त्यापैकीं शेवटचा, तिसरा भाग आगोतली [स मौन मोना=मुका]

**मोनजात**—स्त्री मुकें जनावर पशु मुका प्राणी [स मौन+म जात]

**मोनवत**—(प्र) मौनव्रत पहा

**मोनवा मोना**—पु (कों) १ केळीच्या खुंटाच्या किंवा ताड माड इ० च्या मध्यातून जें नवीन (सुरळीसारखें) पान निघतें तें, सुयरा, कोंब ह्याच अर्थी मुनवा असेंहि रूप आहे २ केळीच्या खुंटाच्या मुळाशी जो नवीन कोंब फुटतो तो किंवा असा कोंब तेथून काढून दुसरीकडे लाविलेला असतो तो 'केळीचा मोना जोरात आहे'–वि १ मुका, न बोलणारा २ असतोष इ० कारणामुळें मुद्दाम बोलत नाहीं असा, नि शब्द ३ (कु) बागुल बोवा [स मौन] **मोनेपण**–(कों) मुकेपणा **मोनामक्ष्य**–न (कु) अडें

**मोनें**—वि थोर

**मोप**—न (व) १ चिखलाची, मातीची वीट, कच्ची वीट मेंडा. २ (महानु) पेटी, भडार 'उघडिलें माणिकाचें मोप।'–दाव १३७ ३ ठसा 'सृष्टीचिये टाकसाळे। शरीराचें मोप पडिले'–भाए २४७ [माप] **मोपाळें** न विटा घालण्याचा साचा, विटाळें **मोर्पे**–न मोठी कच्ची वीट

**मोप, मोपाड, मोपर, मोपार**—न (पर्वताचें, टेकडीचें पर्वताच्या रागेचें) पुढें आलेलें टोंक किंवा शिखर; जमीनीचा चिंचोळा भाग किंवा भूशिर, तुळईचें पुढें आलेलें टोंक किंवा इमारती लाकडाचा तुकडा

**मोप**—वि (व) पुष्कळ, बहुत, विपुल, अमूप, ह्या शब्दाचीं अन्य रूपें– उमोप, उमाप, म्वाप अशींहि आहेत 'गाभेवभाचें करौनि माप। मविजे परिमळाचें मोप।'–शिशु २५२ [अमूप स मा=मोजणें] **मोपणें**–क्रि मोजणें 'आयुर्दिना मृगदृशा पठियसि मोपी।'–अक्क २, विठ्ठल रसमजरी

**मोपला, मापिला**—पु मलबारच्या मुसलमानातील एक जात

**मोफत**—वि फुकट, विनामूल्य [अर माफी]

**मोब**—पु (बे) घास 'उसाचा मोब घाला' [का]

**मोबत, मोबद, मोहब्बत**—स्त्री १ कृपा, प्रेम, दयाळूपणा, मेहेरबानगी [अर महब्बत्=मैत्री]

**मोबदला, मोबादला, मुबादला**—पु १ एक वस्तु देऊन तीबद्दल दुसरी वस्तु घ्यावी अशा तऱ्हेचा जो व्यापार तो, अदलाबदल 'त्या आकाराबर्हुकूम दरोबस्त अम्मल–मोबदला घ्यावा'–मराचिथोशा ५३ २ हिशोबातील एका सदरातून किंवा खात्यातून दुसऱ्या सदरात किंवा खात्यात घालणें ३ वसूल –क्रिवि एखाद्याच्या ऐवजीं किंवा बद्दल [अर मुबादला]

**मोबलक–ख–ग**—वि पुष्कळ, विपुल मुबलक पहा 'त्या खालीं दोघे पादशाहाचें लस्कर मोबलग झगडीयात पडीलें'–इम १२

**मोबा–मोंबा**—पु मुगावर पडणारा रोग, मुगास शेंग धरण्याच्या वेळीं पाऊस जास्त पडला तर हा होतो –कृषि १६९

**मोबार–मोबारी**—न (कों) नदी व समुद्र याच्या सग माजवळचें स्थान, मोठें बदर, खाडी ओलाडण्याची जागा, खाडीचें तोंड 'कदाचित वखारीस जागा देणें झाली तर खाडीच मोबारी समुद्रतीरीं न द्यावी'–मराआ २१ [अर मअबर्]

**मोम्, मोम**—पु मेण [फा मोम] ॰**जामा**–पु मेणकापड 'खर्च किरकोळ खाद्या व मोमजामा यास, व हुण्डणावळ अधिक लागली'–मदबा १ २१ ॰**दील**–वि हळुवार, मणहृदयी 'प्राणत्यागच केला तर नाहक दुर्निमित्य होईल वास्तव मोम्दी लढी जाली'–मदबा १ ११५ ॰**बत्ति**–स्त्री मेणबत्ती 'झाडें मोम्बत्त्याचीं लावणें तीं पुसुन लावावीं'–पया २८६ **मोमद्या पीर**–वि (व) फुकटखाऊ व मिजासी

**मोमा**—पु (महानु) मुका, चुबन 'नमस्करीति मोमे देति।'–पूजावसर [ध्व]

**मोमी इलै–इले, मोमिलै**—वि मशारनिल्हे 'नरसिंगराव मोमीइले' [अर मूमा–इलैह्]

मोमीन—पु मुसलमान कोष्टी, मुसलमानांतील एक जात [अर मूमीन=सनातनी] मोमनाऊ मोमनी, मोमिनी–वि मोमीन जातीच्या विणकरी लोकांनीं तयार केलेलें, वनविलेलें

मोमुर—पु गरम राख, फुफाटा मुमर पहा 'भट्टणीसाठीं बांगीं उकडण्याऐवजीं आपल्या चालीप्रमाणें मामुरांत भाजून काढलीं असतां तीं विशेष रुचिकर लागतील'–पाकिमात्य पाकशास्त्र ५७९

मोमो—पु (गो) स्तन

मोयीन मोयीनजायता, मोयीनदार—मोईन ३० पहा

मोर—पुन मयूर एक अत्यंत सुंदर पिसाऱ्याचा पक्षी मोराच्या स्त्रीस लांडोर म्हणतात २ (ल) मोरणी, मयुराकृति नथ नथेचा एक प्रकार 'नाकीं निचे अति मनोहर मारसाज'–साहंद ८ १२५ ३ एक मुलींचा खेळ –मगेपु ३०४ [स मयूर, प्रा मोरो] ०नाचतो म्हणून लांडोरहि नाचते–मूर्खपणानें अनुकरण मोरकुंचा–पु मोरचेल मोरचल–चेल–पुन (काव्य) मोराच्या पिसाचा केलेला जुडगा हा देवाच्या मूर्तीवरून किंवा राजेलोकांवरून फिरवितात, वारितात [हिं मोरछल] मोरचेला–वि तोंडावर देवीचे वण असलेला; देवीचे वण उमटलेल्या तोंडाचा फोडेल तोंडाचा [मोरचेल] मोरपत्र, मोरपीस–न मोराचें पीस 'शिरीं बांधितीं मोरपत्रें विचित्रें।'–वामन, वनसुधा ११७ मोरविडा–पु नागवेली पानाचा विडा यांतील वरील पानाचा आकार मोरासारखा असतो मोरवीस घीसा–विसें–न (महानु) मयूरपिच्छ मोराचें पीस, मोरपिसें, मोराच्या पिसाचा मुकुट, मोरमुकुट 'माथा मोरवीसा वेठी।'–दाव ७८ [स मयूर+पिच्छ] मोरशिखा–पु एक फूलझाड आणि त्याचें फूल [मयूरशिखा] मोरशिंग–न एक प्रकारची पितळेची तुतारी मोरशेंडा–पु एक फूल मोरा–वि सर्व शरीर काळें किंवा तांबडें असून त्यावर पांढरे ठिपके असलेला (बैल, घोडा); तोंडावर चित्रविचित्र रंग असलेला 'आपुला मन नष्ट बरा। माझा बैल सुटला मोरा।'–तुगा ४४४० [मोर] मोरांगी घार–स्त्री घारीची एक जात तांबूस अंग आणि वर ठिपके असलेली घार 'किरयावरी मोराग्याचा उपद्रव फार –पेद १८१३ मोराची शेंडी, मोरशेंडी–स्त्री मोराच्या डोक्यावरील तुरा मोराची समई–स्त्री चाड्यावर झाकण असून त्यावर मोराचें चित्र असलेली समई मोरा म्हातारा–वि वयोवृद्ध आणि शरीरावर सर्वत्र पांढरे ठिपके असलेला (इसम) मोऱ्याची टिकली–स्त्री (तांबड्या रंगाच्या खोंडाच्या कपाळावर पांढऱ्या रंगाची टिकली असते त्यावरून (ल) विद्वान अथवा शहाण्या बापाचा मुलगा मंद किंवा अडाणी असला म्हणजे त्यास म्हणतात

मोरई—स्त्री समुद्रांतील एक मोठा मासा त्याची पाठ काळी असून पोट पांढरें असतें

मोरकी, म्होरकी—स्त्री मोहरकी पहा

मोरघार—स्त्री एका पक्ष्याचें नाव, भारद्वाज पक्षी काव ळ्याच्या आकाराचा, काळ्या रंगाचा व पिंगट, तांबूस असा पिसारा व लाल गुंजेसारखे डोळे, बारीक चोंच असलेला पक्षी

मोरचंग—पु एक, मुखवाद्य, हें वाद्य दातांत धरून उजव्या हाताच्या बोटांनीं त्या तारेच्या टोंकाशी योगाचा आघात करून वाजवितात 'टाळ विणे मोरचंग। वाजतात वीन मृदंग।'–प्रला २

मोरचा, मोरचसा—पु समुद्रांतील एका माशाचें नाव

मोरचा, मोर्चा, मोरचा(र्चा)ल—पु १ तोफ ठेवण्यासाठीं केलेली मातीची, लांकडाची उंच रचना, धमधमा, टप्पा २ अशा प्रकारें अनेक तोफांची केलेली मांडणी ३ तोफांचा मारा, ४ चौकी, पहारा ५ कोंडबंदी, तटबंदी ६ तरवार इ०वर चढतो तो जंग कल्क ७ आरशाचा पारा मधून मधून निघून गेल्यामुळें उघडा पडलेला आरशाचा भाग [फा मूर्चा मुर्चाल] मोरचेमोर्चेबंदी–स्त्री तटबंदी, कोटबंदीची उभारणी, रचना त्याची ओळ, माळका 'किल्यास मोर्चेबंदी करून शहर घ्यावें'–समारो ११६ मोर्चे लावणें–तोफा डागणें 'रघुनाथदादा यांस विधाद घेऊन कुंभेरीस मोर्चे लाविले'–भाव ३

मोरचूत–द—पु तांबें आणि गंधक ह्यांचें पृथ्वीच्या पोटांत मिश्रण होऊन होणारा पदार्थ, एक विषारी औषधी जिन्नस [हिं मोरथुथिया] मोरचुती डाख–पु सोनें आणि मोरचूद यांचा बनविलेला डाख

मोरछठ—पु तळी लोकांतील बारशाचें गाठोडें नदींत टाकण्याचा समारंभ –बदलापूर २७५

मोरट्ट—वि (राजा) धसमुसळ्या, दणकट, दांडगाई करणारा [ता मोरट्टु=खरखरीत, मोरट्टु=दांडखोर]

मोरणी—स्त्री स्त्रियांच्या नाकांत घालावयाचा सोन्याच्या तारेचा केलेला एक दागिना, स्त्रियांचें नाकांतील मोती म्हणून एक अलंकार 'सोह मोरणी, मोरणी गे साजणी। गुरुनें दिली होती गाठणी।'–भज ८९

मोरणी—स्त्री (कों) विळी [मार]

मोरणें—क्रि ऐकणें

मोरंघा, मोरांबा—पु साखरेच्या पाकांत आंब्याच्या फोडी शिजवून तयार केलेला पदार्थ मुरंबा पहा [अर मुरब्बा]

मोरली–ळी—स्त्री (कों) विळी

मोरव—पु वाटण –शर [मुरणें]

मोरवई—स्त्री एक पसरणारा वेल

मोरवडी, मारवड—स्त्री (व) चुनखडीची (जमीन) –कृषि १६

**मोरवणें**—सकि सांत्वन करणें 'सावध होऊनी ते मुली बैसली । गाईस मोरविली कुर्वाळोनीं ।' –य २८

**मोरवा**—पु १ पाणरहाटाच्या माळेचा मातीचा मोघा २ (सामा) मातीचा, धातूचा लोटा ३ घराच्या आढयाला अथवा तिरास आधारभूत असा तुळईवर असलेला आखुड खाब, खावणी, कैची ४ खावाखालीं दिलेला तळखडा, खाबाच्या डोक्यावर दिलेला आडवा लाकडाचा ठोकळा

**मोरवें**—न (व) (शिजलेले पातळ पदार्थ) वाढण्याचें मडकें 'कुंभाराकडून चार मोरवीं आण'

**मोरवेल**—पुस्त्री १ एक वल हिला येणारें फळ खाण्याच्या उपयोगी असतें त्यास गोमटी म्हणतात २ एक प्रकारचा फुलाचा वेल

**मोरवो**—पु (कु) वीत दीड वीत खोल पाय जाईल इतका ज्या भातशेतात चिखल करावा लागतो अशा शेतात बी पेर त्यावर पाणी सुकवून परत पाणी देण्यास त्या जागेत ल्हान ल्हान पाटाचें जाळें करतात त्यापैकीं एक पाट (-अव मोरवे) [मूर]

**मोरस**—न हें क्षुद्रपल्हान असुन जमीनीवर पसरलेलें असतें यास बारीक भातगोटया एवढीं पानें असुन त्याचा रग हिरवा, तांबूस व अस्मानी असा अनेकरगी असतो या भाजीच्या देठावरील बारीक पानें काढून घेऊन त्याची भाजी करतात व देठ टाकतात ही भाजी समुद्राच्या आसपास वाढ्त होत म्हणून किंचित खारट लागते

**मोरस साखर**—स्त्री साखरेची जात, मॉरिशस बेटात तयार झालेली साखर [मॉरिशस]

**मोरांडणें**—क्रि भरून येणें, भारावणें, गळणें 'माझे पाय मोराडले आहेत'

**मोरांडें**—न (महानु) मुरलेलें हाड दैत्याचीं मोराडीं कसडुसी' [मुरणें+हाड]

**मोरावा, मोरावो**—पु (कु) इमारतकामातील आढे तोलण्यासाठीं लावलेला उभा खाब, कैची, खाबोटी, खावणी, ल्हानसा खाब किंवा टेंपसा, आढयाचा धीरा

**मोरी**—स्त्री (कु) १ एका माशाचें नाव मुबईंत या प्रकारच्या माशास मुशी असें म्हणतात –प्राणिमो २ पाकोळीची एक जात

**मोरी**—स्त्री १ न्हाणी, स्नानगृह साडपाण्याकरिता बाधलेली जागा, नाली वगैरे २ पाण्याचीं भाडीं ठेवण्यासाठीं केलेली जागा [का मोरवु=तळयातील वाहून जाणारें अधिक पाणी, फा मूरी] **मोरीवर जाणें**-(बायकी) लघवी करणें

**मोरुषी, मौरुषी**—वि (व) कायमच्या हक्काची, वश परपरा 'मौरुषी हक्काची जमीन' [अर मौरुसी=वंशपरपरा]

**मोरू**—न शेताच्या साडव्याच्या ठिकाणीं असलेलें झापड, फाटक, किंवा दरवाजा [का मोरवु]

**मोर्ची**—स्त्री (कु) मोरकी पहा

**मोर्त मारप**—क्रि (बाप्र) (गो) ठार करणें

**मोर्तब, मोरतब**—न १ सस्थानचा, सरकारचा शिक्का, राजचिन्ह २ पत्रावर उठविलेला अनुमतिदर्शक शिक्क्याचा ठसा, छाप, चिन्ह 'त्यानें अनेकाचे रजन करून आपल्या प्रशसेचे मोर्तब काळास दाखविलें'–नि ३१ 'महालाचे बदोबस्तास मोर्तब महालाचे चालीचे करून द्यावें'–समा१७७ [अर मुरत्तब= तयार] ०**बर्दार-बारदार**-पु राजमुद्राधर, शिक्केमोर्तब सभाळणारा ०**सूद**-मोर्तबात मोर्तबसुद अशीं अक्षरें कोरलेली असतात याचा अर्थ 'मुद्रा केली'

**मोऱ्हांटा**—पु जनावराच्या पाठीच्या कण्याचें मानेकडचें टोंक, काटा, दाडा [मोहरा+काटा]

**मोल**—न १ किंमत, दर, मूल्य, द्रव्य, 'असमय मौनें तुमच्या सुग्रणाच्या न हानि मोलाहो'–मोसभा ५४६ २ बिदागी, कोणी केलेल्या कामाबद्दल त्याला दिलेली मजुरी, मजुरीचे पैसे 'मोलें घातलें रडाया।'–तुगा –ज्ञा १८१६७ [स मूल्य=मोल] **मोल देणें**-विकणें **मोलास तुटणें**-किंमतींत कमी होणें 'सोन्याचें कडें घडविलें। तरी काय सोनें मोलास तुटलें'–ह २१ २६१ ०**करी, मोलारी**-पु मजूर, कामकरी, पैसे घेऊन लोकाचीं कामें करणारा माणूस ०**करीण**-स्त्री कुणबीण, पैसे घेऊन लोकाचीं कामें करणारी स्त्री –गागा १०९ ०**कारू**-पु (महानु) मोल करणारा, गिऱ्हाईक 'कुडा होय मोलकारू'–भाए ३८१ ०**तोल**-न किंमत, मजुरी, खर्च (मोल द्वि) ०**मजुरी-मजूरी**-स्त्री मजुरी घेऊन केलेलीं लोकाचीं कामें समुच्चयानें किंवा अशीं कामें करून मिळविलेलें द्रव्य नोकरी, काबाडकष्ट ०**वान्**-वि १ उपयुक्त, किंमतीचें, महत्त्वाचें इतिहासजिज्ञास तें पुस्तक फार मोलवान् होईल'–टिलि ४४१ २ गुणग्राही, किंमत करणारा **मोला आगळा**-वि (काव्य) योग्य किंमतीच्या बाहेर किंवा जास्त मौल्यवान्, बहुमोल, भारी किंमतीचें द्रौपदीस दिधले अलंकार। मोला आगळे अपार' [मोल+आगळा] **मोला महागाचा**-वि अतिशय महाग, फार किंमतीचा [मोल+महाग] **मोलारी**-पु सामान्यपणें मोलकरी पुरुष मजूर **मोलारीण**-स्त्री स्त्री मजूर मोलकरीण मोल मजुरीनें काम करणारी स्त्री किंवा बाई **मोलावणें मोलाविणें**-क्रि १ किंमतींत वाढ होणें, किंमत काढणें २ नुसती किंमत विचारणें, मोल-किंमत, दर लावणें ठरविणें, करणें 'खरेदी करण्याकरिता किंवा नुसते मोलावून अजमावण्याकरिता चाललेल्या जनसमर्द'–हिंदु ११२३०

**मोलांडणें**—क्रि (व) एका स्थितींत फार वेळ राहिल्यानें शरीरास रग लागणें 'लिहिण्यानें पाय मोलांडून भाले'

**मोलीन्**—स्त्री (कु) मुसाराचें एक हत्यार

**मोव**—वि मृदु, मऊ 'भुइन उदक मोव असे।'-दावि ६० [स मृदु] **मोव असा ये खणता**-(गो) मऊ असेल तेथें खणणें **मोवाण, मोवण**-न आणी, मार्दव आणणारा पदार्थ 'पडारेवाल्यास बरेच मोवण लावलें तेव्हांच श्रीमताचे पाय दिसले' **मोवारी**-स्त्री मवारी पहा **मोवारीचें वंगण घालणें**-(ल) ममतेनें वागविणें 'मोवारीचें वगण घालणारा माहीसा भाला'-दुर्दैवी मोहरे **मोवाळ, मोवाळी**-वि मवाळ, मृदु **मोवाळी**-स्त्री लोणी -मसाप २ ४ १८५१ **मोवाळणें**-क्रि मृदु होणें, वठणीस येणें

**मोवई**—स्त्री केळ, माड इ० च्या पोटांतुन निघणारा सुयरा, कोंव, मोना

**मोवट, मोवई**—स्त्री सर्पणाच्या उपयोगी एक वृक्ष

**मोवणें**—क्रि मापणें -शर [स मा]

**मोवरें**—न (कु) खाण्यायोग्य मच्छी, मासळी, हल्वान म्हावरें

**मोवला**—पु (मालवणी) काजुगर मोगल पहा

**मोवळा**—नअव (गो) कानांवरील केसाचीं झुलपें **मोवळी**-(वों) पानाची मोळी, शुंडाळी

**मोवा**—पु (व) शेतांतील पीक, भाजीपाल्याची नासाडी करणारा एक कीटकविशेष; वेलावर किंवा भाजीपाला व पीकावर सालींत एक प्रकारची बारीक कीड पडते ती ही कीड फार बारीक असुन ती सर्व झाड व्यापते

**मावागी, मोवागीत, मोवारी**-स्त्री मवागी व 'मवागीत' पहा मद मद असा जाळ **मोवा ज्वर**-पु तापाची एक जात, प्रकार, यास प्राय जीर्णज्वर म्हणतात 'मोवाज्वर आणि सताप। या नाव आध्यात्मिक।'-दा ३ ६ ३४

**मोवार**—पु (गो) गोंव्यात नदीच्या ल्गत राहणारा शुभ्र पाढऱ्या रंगाचा एक पक्षी सह्याद्रीच्या पायथ्याशीं २०६

**मोवाळें**—न वासराला धारेच्या वेळेशिवाय इतर वेळीं पिता येऊ नये म्हणून त्याच्या तोंडाला घालतात तें जाळें, मुसकें [मुख]

**मोस, मोसु**—पु १ (महानु) मार्ग, पत्ता, मूस, शोध, सुगावा माग (क्रि० लागणें, काढणें, लागणें) 'तो मोसु श्रीचरण पङ्कजां अवळि दीसे।'-ऋ ६ ५५१ 'जीविताचा मोसु घेऊनि बैसनि जाता।'-भाए १२० २ कुपणाला लावण्यासाठीं झाडाच्या तोडलेल्या ल्हान ल्हान फांद्या

**मोसबा**—पु १ हिशोब, हिशोबपत्रक, सर्वांच्या हिशोबाचें टिपण २ मुक्ततेची किंवा मुक्त झालेली स्थिति, सुटणूक, मोकळीक ३ पराम्रम (निदार्थी) [अर मुहासबा] **मोसबा फारक-ख-ग**-वि हिशोब पुरा झालेला, ज्याचे हिशोब झाले आहेत असा **मोसबेकरी**-पु हिशोब तपासणारा 'त्यास माल मजुरी बीस पचवीस कारकून चाग्ले लिहिणार मोसबकरी'-समा २ ११६ **मोसबेदार**-पु फडणीस, हिशवनीस

**मोसंबी**—स्त्री नारिंगाच्या जातीचें एक फळ मोझाबिक मधून प्रथम आलें यावरून [मोझाबिक] **मोसमी धाडप**-(शाम्र) (गो) काळ्या पाण्यावर पाठविणें, (गोंव्यांतील कैदी मोझांबिकला पाठवितात यावरून मोझाबिक-मोसमी)

**मोसम**—पुन काहीं गोष्टींचा योग्य, अनुरूप काळ, समय, ऋतु, सुगी, हगाम -कृषि ६८६ [अर मौसिम] **मोसमी**-वि काहीं काळपर्यंत टिकणारा, हगामी

**मोसपो**—पु (कु) शेत, जमीन जाळल्याननरची राख

**मोस्तार**—न (कु) महिना

**मोह**—पुस्त्री चेहरा, हजामत -बदलापूर ३७ १०४ [मुख]

**मोह-हो**—पु एक वृक्ष, याच्या फुलापासुन दारू काढतात [स मधु मधुक, प्रा महु, हिं व महु] **मोहनेल-टेल**-न मोहटीपासुन, मोहाच्या बियांपासुन काढलेलें तेल, मोहाळ [मोहटी-तेल]

**मोह**—पु १ मुर्च्छा, बेशुद्धि, चित्तभ्रम, भुरळ, भारणी, मोहन, भुलावण, भूल २ प्रेम, माया, दया, कींव, सहानुभूति इ० ना चेतविणाऱ्या विषयाचा क्षुब्ध लोभ मोहन 'द्रोणाला दुःशासन कथितां वे भीष्म हानि मोहातें।'-मोभीष्म ११ १३२ ३ सदसद् विवेकबुद्धीचा, जाणिवेचा लोप, विस्मरण, घोटाळा, मतिभ्रम, भुलवण 'निजदोषें व्यसनातें पावुनि मोहीं निमग्न नससी कीं।'-मोकर्ण १ ६ ४ अज्ञान, मुर्खपणा, आत्मज्ञानाचा अभाव असल्यामुळें जगातील सर्व विषय, सर्व दृश्य जगत खरें आहे असा भास होऊन त्याचा उपभोग न वैषयिक सुख घेण्याकडे प्रवृत्ति होणें ५ आवड, शोक, प्रीति, प्रेमाचें वेड, प्रेमाचा अतिरेक 'परिमूप पुत्र मोहें केला पहिल्या परीस ही अध।'-मोरोपत ६ चूक [स मुह्] **मोहक**-वि १ भुरळ पाडणारें, भ्रम उत्पन्न करणारें गुतविणारें, गुगविणारे २ आकर्षक, रमविणारें, चित्त हरण करणारें [स] ०**पाश**-पु मोहरूप जो पाश तो, ससाराचें जाळें, भ्रामक विषयाचें बधन मोहजाल पहा ०**यंत्र**-न नळा (शोभेच्या दारूचा), फुलबाजी 'मोहयत्री सुमनमाला। भग्निपुष्पें भासती डोळा। फुलें म्हणती अबळा। पाहता डोळा ते राखा।'-एरुस्व १५ ११८ **मोहा, मोहाचा**-वि मोहक किंवा उत्कृष्ट गुणाचा-(एक प्रका-

रच्या नारळाबद्दल किंवा सुपारीबद्दल उपयोग) **मोहाचा नारळ नारळी-माड-सुपारी**-पुस्त्री ज्याची गोडी इतर नारळ, सुपारीपेक्षा अधिक असते तो नारळ, सुपारी इ० या नारळाचें खोबरें गोड असून तें खाल्ल्यावर चोथा रहात नाहीं, सुपारीहि गोड असते -कृषि ७०३ **मोहाविणें** क्रि (काव्य) मोहनी पाडणें, भुरळ किंवा भुलवण पडणें, भुलून जाणें; मोहीत होणें 'अवश्य म्हणोनि तीर्थश्री मोहाविली अनुवादें।' **मोहाळणें**-क्रि मोह पावणें **मोहित**-वि मोह पावलेला, भुललेला, भुरळ पडलेला; मोहानें व्याप्त असा, लुब्ध **मोहरात्रि**-स्त्री श्रावण वद्य अष्टमी. (या रात्रीं कृष्णानें वसुदेवास मोह पाडला यावरून) **मोहजाल-जाळ**-न मायेच्या योगानें संसारांत उत्पन्न होणारा मोहाचा पाश, संसाराच, जगांतील पसाऱ्याचें जाळें, कुटुंब, इष्ट मित्र, मालमत्ता व इतर भ्रामक विषय यांची भूल, भुरळ 'ता घेतलें य मज मोहजाळीं।' -साह्द ११९ **मोहणें**-उक्रि भुरळणें, भुलावणें, वश करून घेणें; वश होणें, मोह पडेल असें करणें, भारणें, व्यामोह उत्पन्न होणें, क..., भुलविणें, भुलणें, चित्त भ्रमणें, भ्रम विणें 'मन मोहिलें नदाच्या नदनें।' **मोहन**-वि १ मोहविणारें आकर्षक २ भुलविणारें, भूल पाडणारें भ्रामक एक म्हणे कुब्जेनें लाविला चदन। त्यात काहीं घातलें मोहन। तरीच भुलला जगज्जीवन। कौटिल्य पूर्ण केलें तिनें।' -ह २१ १७७ -न १ (वैद्यक) गुंगी आणणें, भूल देणें, बेहोष पाडणें -ज्ञा १३ ९९५ २ भुरळ मूर्छा भ्रम गुंगी, निद्रा आणणारें औषध **मोहनभूत**-न एक प्रकारचें भूत पिशाच **मोहनमाळ-माला**-स्त्री सोन्याच्या मण्याची गळ्यांत घालावयाची एक विशिष्ट माळ **मोहनास्त्र** न एखाद्या इसमावर मोहनी टाकण्याचें अस्त्र, जें शत्रूवर सोडलें असता त्याला मूर्च्छा येते असें एक अस्त्र **मोह(हि)नी**-स्त्री १ भूल भुलावण, मोहन २ मोह घालण्याचीं कृत्यें, वश करण्याचीं किंवा भूल घालण्याचीं भुलविण्याचीं कृत्यें (क्रि० घालणें) एखाद्यास भुलविण्याकरिता उपयोगांत आणण्याचे मंत्र ३ विष्णूनें अमृतमथनाच्या वेळीं घेतलेलें सुदर स्त्रीचें रूप [स मुह् = बेशुद्ध होणें] **मोहिनी**-स्त्री १ मोहन, प्रलोभन, भुलवण, भुरळणें चित्तभ्रम, बुद्धिभ्रम, मोह करणारी २ समुद्र मथनप्रसंगीं भगवंतानीं जें मोहिनीचें रूप घेतलें होतें तें भुरळ पाडणारी 'कथा भुवन मोहिनी अशि न मोहिनी होय ती।' -केका १०३ [स मुह्] **मोहिरें**-न (महानु) मोहक वस्तु, मोहविणारें 'तो दाउनि माया वेषाचें मोहिरें। जेथ चरित्रें करी' -ऋ ४२

**मोहकम**—वि भक्कम दृढ बळकट मजबूत 'हा करार राजे याजकडूनच बहाल व मोहकम जहाला' -पया ४०३ [अर मुहकम]

**मोहकूब-कुब**—क्रिवि (व) तहकूब, बद 'दिलेला पर व ना मोहकूब करणें' -बडोदेअ ४ १६४ [अर मवकुफ, मौकुफ]

**मोहगम**—वि मोघम पहा

**मोहचळ**—वि १ गरम, कोंबट (पाणी, इतर द्रव पदार्थ) २ मचूळ **मोहचूळ, मोहचळें**-वि घोटभर, चूळभर, थोडेसे 'तुज अभिषेक होणें जेणें जळें। ऐसें हें मोहचळें तरी देईं।' -मध्व ५८३

**मोहछाव**—पु महोत्सव 'भक्तवत्सल भेटला। मोहछाव वाटला।' -मध्व ३०६

**मोहजबा मोहजबेदार**—पु (प्र) मोसबा व मोसबेदार पहा

**मोहटळ**—न गुराना चरण्याचें कुरण, सार्वजनिक गुराढोरांचें चराऊ रान; गायरान

**मोहटी**—स्त्री मोहाच्या झाडाचें फळ

**मोहटी**—स्त्री १ छपराचें अग्र २ कठडा नसलेला घराचा गॅलरी वजा ल्हानसा भाग, ओसरीचें छप्पर 'हाटक मडप मोहटया रत्न दीप।' -दावि ४७४ 'खाब उथाळी मोहटया सोनें।' -अमृत ३६ **मोहटीचें पान**-न वाश्याचीं टोकें दिसु नयेत म्हणून छपराच्या अखेरीस मारलेली नक्षीदार फळी वगैरे, पानपटी

**मोहडा**—पु मोहोरा मुख्य, म्होरक्या 'हातींचिआ मोहडा। सिंहो करी रगडा।' -शिशु ४८६ **मोहडा वाटीचा**-पु घोडयाच्या तोंडावरील भूषण [मुख-मुह-मोह-मोहड]

**मोहतर मोहतूर, मोहतीर**—पु १ मुहूर्त अठ्ठेचाळीस मिनिटांचा काल वेळ २ (ल) योग्य काल, शुभकाल, ऋतु, क्षण ३ शूद्र स्त्रीचें पुरुषाचें दुसरें लग्न विधवाविवाह, पाट पहा (क्रि० लावणें, लागणें) [मुहूर्त]

**मोहतरफा-तर्फा**—पु खेडयातील दुकानदार व कारागीर याच्यावरील कर, गवडी, सुतार इ०कास त्याच्या वसवासवर्धी सरकारास जो कर द्यावा लागतो तो पाटरी हक्काना मोहतरफा म्हणतात' -गांगा 'ढवळया निसवत मोहतरफा' -समा४ ८३[फा मुहतरिफा] **मोहतरफी**-वि मोहतर्फा ज्या कुळास द्यावा लागतो तीं कुळें, तो इसम

**मोहतसदी-मोहतसबी**—स्त्री वजनमापाची तपासनिशी -योमारो ३३६ **मोहतसीब**-पु निषिद्ध कर्माची चौकशी आणि निवाडा करणारा, धर्मशास्त्री, पंडितराव याचीं कामें - वज्जे तोडणें व मामलेफैसला करणें ज्या बायकोस आईबाप वगैरे कोणी नसेल तिचा मोहतूर लावणें व मेलेल्या मनुष्याच्या मालाची धर्माप्रमाणें वाटणी करणें व चकूबन्दी व शराचे कागद टवीत जाणें' -वाडसनदा ७७ ७९ [अर मुहतसिब्]

**मोहतोपदार**—पु मशालजी 'एकाजी गुजाल मोहतोपदार' -वाडबाबा ११६ [फा महताबदार्]

**मोहदाद**—वि माफक

**मोहन**—वि मोवन पहा कणीक किंवा कोणतेंहि पीठ मळताना त्यास मऊपणा आणण्यासाठीं त्यात घातलेलें तूप, तेल

**मोहन**—न (व) (प्र) मौन स्तब्धता, स्थिरता, शांतता; गुपचुपपणा, नि शब्दता 'काय सेवू नव शीत उष्ण तहान। साहो वीं मोहन धरूनी वैसों।'—तुगा १११८ [मौन]

**मोहन**—न गूळ, खोबरें आणि वेलची वगैरे एकत्र करून ज्या करंज्या, मोदक इ० करतात त्यात घालतात तें पुरण, पुरीनें तेल मोवन, तूप [मोवन]

**मोहन जावता**—न सरकारी सर्व धर्मदायाचा नामनिशीवार तक्ता किंवा यादी

**मोहनभोग**—पु १ (व) तांदुळाची एक जात २ आंब्याचा रस आटवून करतात तें एक खाद्यविशेष ३ गव्हाचा शिरा

**मोहबत-द**—स्त्री प्रेम, कृपा, मेहेरबानी, भीड, मुरवत 'धर्माची प्रीत नव्हे पाक मोहबत सत्ता सारखी।'—सला ३५ [अर महब्बत]

**मोहमदी-मुदी**—स्त्री कापसाचें वस्त्र किंवा कापड, सुती कापड, उंची सुती वस्त्र [अर महामुदी]

**मोहर, मोहोर**—स्त्री १ एक सोन्याचें नाणें २ शिक्का ३ आपल्या नावाचा अक्षरांकित ठसा ४ रुपया, पैसा, नाणें इ० वर जें चिन्ह किंवा खूण असते ती आकृति ५ काहीं पदार्थावर खुणेकरिता केलेलें चिन्ह [फा मुहर] **मोहरकन्द**-पु मोहरेवर ठसा मारणारा, मोहरेचा शिक्का ठसा खोदणारा [फा खोदणें] °बन्द-वि मोहर किंवा शिक्का मारून बंद केलेलें पक्कें बंद, वर मोहोर केलेलें बन्द करून रखोटा केले गलेलें **मोहरी**-वि १ सही-शिक्कादार मोहरी दस्तऐवज'—रा ७ ३५ २ मोहोर केलेलें सही शिक्यानिशीं **मोहरेदार मोहोरेदार**-वि तुळतुळीत, घोटीव गुळगुळीत चकचकित व उजळ, उजळपाजळ, तुळतुळीत, नितळ [फा मुहरा+दार]

**मोहर मोहोर**—पु आंब्यास येणाऱ्या फुलाचा गुच्छ, झुपका, आम्रवृक्षमंजरी [स मुख] **मोहरणें**-अक्रि १ वेसरणें, कळ्यांचें तुरे येणें, मोहर येणें (आंब्याला व अशाच त ऱ्हेच्या इतर झाडाला २ (शेत धान्य इ०) परिपक्व दशेस येणें, पूर्णपणें पक्व होणें ३ (लोणी, उसाचा रस, तूप, याची) कढविण्याची क्रिया पूर्ण होणें ४ (गुरें, ढोरें, मेंढरें इ० नीं) कळपाच्या पुढें चालत असणें ५ पुढें असणें किंवा जाणें, पुढारणें, पुढे होणें, मार्गांत प्रगति करून घेणें ६ (चंद्र) उगवण्याच्या बेतात असणें, वर येणें, उगवणें, उदय पावणें, उदयास येणें, क्षितिजावर येणें चंद्रोदय जवळ येऊन ठेपलेला असणें **मोहुरणें**-क्रि फुलणें, वेसरणें-(आंबा आणि अशाच सारखीं इतर झाडें) **मोहोरवणें**-क्रि प्रफुल्लित करणें, आनंदित करणें 'वाचिता हरिस मोहरवी हा।'—क्रिवि ७ **मोहुर**-मोहरलेली स्थिति, फुललेली किंवा वेसरलेली अवस्था-(आंब्याची व इतर झाडाची), [मोहर]

**मोहर**—स्त्री १ अग्रभाग, पुढचा भाग, पुढची जागा २ पुढील फौजेचें तोंड, पुढें असलेले किंवा गेलेले लोक, बिनी, अघाडीची फौज, पुढील तुकडी 'मागें दुरावला श्रीधर। पुढें गेली गाईची मोहर।'—इ १४२६ ३ अग्रभागीची निपाणी, खूण, चिन्ह, ध्वज 'तव बाणाचे वदनासमोर। तो चालिला गरुडमोहर। गरुडें करूनि अजेर। पडिला तो।'—कथा १ ७ ४ घोलणें चालणें, काहीं काम करणें इ० ची परिपाठी ५ गमनाची दिशा, गंतव्यस्थान (क्रि० धरणें) मार्ग,रस्ता ज्ञा३ १७१ ६ बाजू 'ईश्वराची मोहर धरी'—महानु ९० ७ प्रकार 'आणि एकसरें आहारा। कैसेनि तिनि मोहरा। जालिया तेहावीरा। रोकडे दाळ'—ज्ञा १७१२० [स मुख, प्रा मुह] **मोहर धरणें**-अघाडीस जाणें, पुढारीपण घेणें, पुढें निघणें, अघाडीला जाणें 'ऐसें म्हणोनी तस्कर। गावाकडे धरिली मोहर।' **मोहरकाडा**-पु अग्रेसर **मोहरक्या, म्होरक्या, मोहरकडा-डी, मोहरपी-प्या**-वि पुढाकार घेणारा, पुढें होणारा, (कोणत्याहि मंडळाचा, सभेचा-संघाचा) मुख्य इसम किंवा पुढारी, समारंभाचा चालक, मालक **मोहरकी-मोहोरकी**-स्त्री (व) (बैलाच्या किंवा घोड्याच्या वगैरे तोंडाभोवताहून मानेवरून दुहरी किंवा तिहेरी विळखे घेऊन बांधलेले) कातड्याचें किंवा दोरीचें बंधन, घोड्याचें तोंडास बांधलेली पट्टी, बैलाच्या तोंडास बांधलेली जाळी **मोहरकी गांठ**-स्त्री मोहरकी तयार करण्याची शेतकरी लोकांना अवगत असलेली गाठ **मोहरचा-ला**-वि १ पुढचा-ला; अघाडीचा, पुढें जाणारा (कालामध्यें, किंवा जागेवर) २ भविष्य काळाचा [मोहर] **मोहरणें**-क्रि मिरव॑; मोर्चा वळविणें 'नाना पुनिवेचे अघारें। दिहा भेणें राती मोहरें'—अमृ ७४० **मोहरणें**-अक्रि पुढें होणें, वळणें, फिरणें १ -सक्रि वाजविणें (पोवा, मोहरी) २ गोंजारणें —तुगा २१३० ३ मन आकर्षणें, मोहून टाकणें 'गोपी स्त्रियांचें मन मोहरी हा'—नदा ५२ **मोहरप**-पुढला,वडील 'रामचंद्र पाटील निमे मोकदम मोहरप' **मोहरा**-पु बुद्धिबळाच्या खेळांत राजा व प्यादा खेरीज बाकीचीं बुद्धिबळें प्रत्येक (यावरून) २ नेता, मुख्य, पुढारी ३ मृदंग वाजविण्याचा एक प्रकार ४ चेहरा मुद्रा; तोंडावळा, मुख, तोंड, चेहरेपट्टी; मुखाची रूपरेषा ५ देखणा, पराक्रमी किंवा साधनसंपन्न असा इसम ज्याचा चेहरा दिसण्यांत सुंदर आणि इभ्रतदार आहे असा मनुष्य ६ कोणीहि कोणत्याहि गुणानें उत्कृष्ट असा मनुष्य ७ कागद, दागिना, सोनें, चांदी, इ० चें पात्र गुळगुळीत व चकचकीत करण्यासाठीं घोटवयाचा

मणि किंवा दगड, अशा घोट्यानें आलेली चकाकी, तजेला, गुळगुळीतपणा ८ सपाच्या डोक्यातील कल्पित मणि हा विषाला मारक आहे असें म्हणतात -केका ८४ ९ आघाडी, अग्रभाग, पुढील भाग, पुढची किंवा अघाडीची जागा, बिनी, फौजेचा पुढचा भाग १० कोऱ्या कागदामधील शिक्का किंवा आर्हती [ मुखर ] मोहोरा इरेस पडणें-क्रि अभिमानी गुर्तणें, अक्ल-खातर कोणतें एक कृत्य नेटानें करणें 'असें संकट प्राप्त झालें मोहरा इरेस पडला आतुन कोणी सन्यास यईनात' -भाव ३ मोहोरा माघारी फिरविणें-आघाडी मागे फिरविणें, तोंड फिरविणें मोहरा-क्रिवि सामोरा, आघाडी, बाजूला, पुढें, समोर, नीट 'मग निकट दक्षिणेच्या मोहरा। आले कऱ्हाड सोलापुरा। मार्गी भेटले महावीरा । परशुरामासी।' -कथा २ २ ८६ मोहरी-वि पुढचा, अग्रभागचा, पुढील अघाडीचा मोहरून-क्रिवि (वा) समोरून, पुढून, पुढील समोरील, समोरच्या जागेपासून मोहरें-न. १ तोंड, चेहरा २ राजा खेरीज करून मुख्य आठ बुद्धिबळापैकीं कोणतेंहि एक बुद्धिबळ, बुद्धिबळातील प्यादीं व राजा याशिवायचीं बुद्धाबळें ३ तोंडानें वाजवावयाचें एक वाद्य. 'शृंगें काहळया रणमोहरीं।'-मुआदि २१ ११९ -क्रिवि १ पुढें, च्या समोर, पुढें, अघाडीस २ ठराविक वेळेच्या पुढील काळात किंवा दिवसात [फा मुहरा, स मुख, प्रा मुह हिं मुह, सिं मुहु, गु मोहो] रणमोहरें-रणवाद्य मोहरें घालणें-गोंजारणें -शर मोहिरा-पु अग्रभाग मोहिरें-न सन्मुखता 'परतले अविंधचें मोहिरें'-अनु २ १४ मोहाडे पहा

मोहरम—पु १ आरबी वर्षाचा पहिला महिना २ ताबुताचा सण [अर मुहर्रम्]

मोहरम—पु पराभव, धुव्वा पराभूत, नामोहरम [अर महरूम्]

मोहरी—स्त्री. फोडणींत घालतात ती वाटोळ्या आकाराची करड्या रगाची राई, मोहरीचें झाड हातभर उच वाढतें मोह रीच्या महत्वाच्या-दोन जाती (१) शिरसु-याच्यापासून कडवें तल काढतात (२) राई हो शरीर विलेपनाकरिता उपयोगात आण तात मोहरी इतका जीव-(दुखण्यामुळें) जीव मोहोरीच्या आकाराप्रमाणें किंवा राईप्रमाणें अगदी लहान होणें मोहरवणी-न तोंडी लावण्यासाठीं आंब्याच्या कैऱ्याच्या फोडी हिंग मोहोऱ्या, मीठ इ० चें मिश्रण केलेलें असतें तें, लोणचें वगैरे प्रमाणें याचा उपयोग करतात [मोहरी+पाणी] मोहरीफेस-(व) मोहऱ्याचें बारीक भुरका पाणी टाकून फेणवून लाल काढून अंब्याच्या बारीक फोडी त्यात घालून केलेलें एक प्रकारचें लोणचें

मोहरी—स्त्री तोंडानें वाजवावयाचें एक वाद्य पुंगी 'टाळ मृदग मोहरिया। पावे शृंगें घुमरिया।' -ह १० १४० 'जैसें मोहरी वाजता एकूनि कानीं' -भवि १६ [मुख] शको १ २०

मोहरी—स्त्री पाणी वाहून नेण्याकरिता केलेला ल्हान पाट स्नान वगैरे कामासाठीं केलेली चुनेगच्ची मोरी तोंफेचा मणी किंवा डोळा बुंधाच्या भोवतीं भोंक. [मोरी]

मोहरीर-ल—पु लेखक, देशपांड्याचा गुमास्ता, सार्वजनिक अधिकारी, देशपांड्याचा मदतनीस [अर मुहर्रिर] मोहरिरी—स्त्री मोहरीराचा उद्योग पगार किंवा वतन, मोहरीराचें कर्तव्य, अधिकार किंवा पगार

मोहर्के—स्त्री (व) मोहरकी पहा -वशाप ५२

मोहल्ला—पु १ व्यूह, चढाई, मोर्चा 'फौजेचा मोहला करून मागल्याचे गोटावर चालले' -खरे २०९६ २ शहराचा भाग, गल्ली [अर महल्ला]

मोहसबा, मोहसबेदार—पु मोसबा, मोसबेदार पहा 'मोहसबा इहलोक व परलोक विषयीं घेत जावा' -सानेपयाव ४३७

मोहसल्ली—पु महसूल करणारा शिपाई, महसुलाबद्दल तगादा करणारा शिपाई -गागा ५८ [अर मुहस्सिल]

मोहळ-ळें, मोहाळा, मोहळा—नपु वासराला मातेचें दूध पिता येऊ नये म्हणून त्याच्या तोंडाला बांधलेलें मुसकें किंवा मुखबंधन [मुख] मोहळी—स्त्री घोड्याचा लगाम मोहोरकी, मोहरकी 'घोडिया बांधली मोहाळी। कणगेप रागावळी। पाखरा झळकती तेजाळी। आरसे तळीं लाविले।' मोहाळें-न. चेहऱ्यासाठीं (डोळ्याचा भाग उघडा ठेवून) तरटाचें शोभीवन्त बन-विलेलें झापड किंवा झाकण, सवारादीचें आच्छादन 'झडपीती वारूवाचे मोहाळे -कथा १७२३ [मुख+आलि=मुहाळ]

मोहळ, मोहाळ, मोहोळ, मोहोळें—न मधमाशीचें पोळें किंवा टाळें (पाळी व मध्याचा वाडा मिळून सर्व भाग), मधाचें पोळें ०वर बसणें-चरकणें, घाबरणें

मोहल—न मोहाळे पहा

मोहळें मोहाळ—न मधमाशाचें पोळें, मधाचें पोळें

मोहाडा—न चेहरा, तोंड 'दिग्गजा चिआ मोहाडा। जरि आनंदाचिआ होंति दांनि सोंडा -शिशु ४०० [मुख]

मोहाळ—वि व्यर्थ, निरुपयोगी 'नातरी वांझ स्त्री मोहाळ। वाढ नीजे तिचा उदरगाळ। कीं अगत्यावीण किडाळ। न फिटे तयांचें। -कथा ७ १ १२

मोहिम मोहीम स्त्री १ महत्वाचें कार्य, अंगीकृतकार्य मोहिमेचे (कामाचे) दिवस होत, याजकरिता नगावाकडून जाब'स चार दिवस लागले -रा ७ -खरप ११०५ २ कांहीं देश जिंकण्यासाठीं राजेलोक वगैरे जी स्वारी करतात ती, सैन्याची चाल मुलुखगिरी, (सैन्याची) सफर 'मुख्य हाहर दक्षिणेवरती मोहीम झाली -ऐपा २३० मराठींत फक्त लढाईच्या

कामी मोहीम शब्द वापरतात ३ (ल) गोसावी लोकाची सफर, पर्यटन, फेरफटका •शीर-वि १ वारवार स्वाऱ्या कर णारा २ मोहीमेंत गर्क, मोहीमेवर, स्वारीवर असलेला 'हरीपंत-तात्या व होळकर वगैर सरदार मोहीमशीर आहेत' -ख ८ ३११९ मोहिमी-मोहिमेमधीं, मोहिमेचा 'धोंडोपंत गोखले यास मोहिमी वर्षे देऊन ' -मदरु २४ [हिं]

मोहिरें—न साहित्य, सामग्री

मोहीब—पु स्नेही, आपण, पत्रांत तुम्ही या अर्थी योजावयाचा शब्द 'यथील खैर-सला जाणून मोहिब्बी आपली खैर सला हवेक्त कल्मी मर्कूम' -रा१५ २५३ -ब्रप२३४ [अर मौहिब=देणगी] माहीयान-पन्हा-पु स्नेह्याचा आश्रयदाता -रा२ ७१

मोहो—पुन मोह अपभ्रंश, मोह पहा मधुमक्षिका मधु संचयार्थ जें पोळें करीत असतात तें •माशी-स्त्री एक प्रकारची मधमाशी ही मोहो तयार करते

मोहोटी, मोहोटेल, मोहोणें, मोहातरफा, मोहातूर, मोहोती, मोहोयद, मोहार, मोहोरकी, मोहोरणें, मोहोळ, मोहोळें—मोहटी, मोहटेल इ० पहा

मोहार्डे—न (व) मोहटी पहा

मोहोर्डे—न बैलाच्या तोंडावरील दागिना मोहाडे पहा

मोहातीर—पु (व) गंधर्व मोहतर पहा -मसाप५२ १

मोहोत्साव—पु महोत्सव पहा 'तिथी पर्वे मोहोत्साव। तेथें ज्यांचा अंतर्भाव।' -दा २ ७ ३१

मोहोबत—स्त्री प्रेम मोहबत पहा 'मट करी बटकिशीं मोहबत।' -अफला ६९

मोहोर—क्रिवि पुढें 'तोंडें काढूनी येरी माहार।' -उषा १६९९

मोहोळ—स्त्री अस्तनीचें मनगटाकडील तोंड अथवा विजारीचा घोट्याकडील भाग नेफा मोहोळ प्रथम तयार करा' -शिकशि २ २९ मोहोळी-स्त्री तोंड 'पाटयर दगडास मोहोळी असत' [मुख]

मोहोळ—न (कु) पर्वताचें खोरें [स मौलि किंवा मल्य]

मोळ—पु १ छपराची तिकोनी बाजू किंवा उतार २ वळचणीच्या बाजूचा छपराचा पुढें आलेला भाग ३ डोकें 'कर्पूर कर्दळी असती सुफळ। भारे त्वोनि स्पर्शती मूतळ। जैसा लवे सज्ञानाचा मोळ। गुणधन वैभवें करूनी।' -जै ३ ७१ -न ल्हान मुलाच्या पोटरीवर होतो तो एक रोग [स मौलि=शिर]

मोळ—न १ एक प्रकारच्या गवताचें नाव एक प्रकारचें निर्गंध गवत ज्याच्या वेरसुण्या कुंच करतात तें गवत २ -पुन पोट वगैर गोळा करण्याचा एक प्रकारच्या राठ गवताचा कुंचा ३ कानातील मळ [स मृदुल=मऊ]

मोळका—पु (वे) कोंब [स मौलि]

मोळसूद—न (गो) मळसूद; मळसूत्र पहा

मोळा—पु १ वळण, रीत, पद्धत, परिपाटी, वर्तनाची सरणी, चालरीत, वागणुकीची रूपरेषा 'ल्हानपणीं मुलास जसा मोळा लाविला तसा लागतो' 'त्या मुलाला मोळा नाहीं' मराठमोळा २ रूढ झालेली पद्धत, रूढी, प्रघात, सवय, चालरीत, पद्धति 'जळो जळो वोंगळ हा। हा तुमचा मोळा।' -मध्व१२७ 'ऐसा विपरीत आहे मोळा। जाणा येथींचा जी गोपाळा।' -शिशु २४५ [स मूल-मौलिक ?]

मोळा—पु १ टमा मुक्तिचा मोळा उमटे।' -भाए१७० २ खिळा, खुंटी, मोसडी किंवा लाकडी मोटी चूक, ल्हान मेख [स मौलि]

मोळा—न मोहाळें पहा वासराच्या तोंडाला घालतात तें आळें, वासरास मातेचें दूध पितां यऊ नये म्हणून बांधलेलें मुखबंधन •घालणें-वासरू अथवा रेडकू त्याच्या मातेबरोबर रानात चरावयास सोडतेवेळीं त्याला पितां यऊं नये म्हणून काटे लावलेली म्हारकी घालणें मोळांडणें-(व) रग लावणें पायास मुंग्या येणें किंवा पाय दुखणें या अर्थीसुद्धा हा शब्द वापरतात 'इतका वेळ लिहिण्यासाठीं मांडी घालून बसल्यानें पाय मोळांडले.'

मोळी—स्त्री १ जळणाच्या लाकडाचा भारा, ओझें किंवा गड्डा, लाकडांचा भारा, लांकडें, ऊस, गवत इ०चा जो मोठा भारा तो 'मा। रमि माथारी त्या अमीत स्वमूर्ति टाकिली तें।' -मोसभा १ ८ २ शरीरावद्दल तुच्छतेनें हा शब्द योजतात मोळी उचलणें-१ (मनुष्याला) उभें करणें, उंच करणें, उत्थापन देणें, (मनुष्याची) तळी उचलणें २ (होळीच्या खेळामध्यें) मनुष्याची गठडी करून त्याला वर उचलणें मोळी बुचकळणें-स्नान करणें (थोडया पाण्यात) मोळी करणें-मनुष्याच्या देहाची गठडी करणें (हातपाय व अंग दुमडून) मोळी टाकणें-(वैतागात) दमलेलें शरीर जमीनीवर टाकून पडणें, (विश्रांतीसाठीं, निजण्यासाठीं) मोळीची बाहेरील टांग-स्त्री (मल्लविद्या) हातपाय मोळीसारखे बांधून पायानें पाय अडकवून मारण्याचा डाव मोळाकार-पु मोळी विकणारा, मोळीविक्या माळिकारा धाडाळिला रानें। जवि मोळिए ओडिलें वावनें।' -ऋ १० •विक्या मोळक्या, मोळविक्या-वि लाकडाची मोळी विकून उदरनिर्वाह करणारा [मोल]

मोळें—न वासराचें मुखबंध मोळा पहा

मोक्ष—पु १ मुक्ति, शरीरातून आत्मा निघून जन्ममरणाच्या फेऱ्यात न सापडतां कायमचा ब्रह्मामध्यें विलिन होणें, चार पुरुषार्थांपैकीं अखेरचा पुरुषार्थ हा प्राप्त झाला असता संसारातून कायमचा सुटका होते दुःखाची अत्यंत निवृत्ति व परमानंदाची प्राप्ति,

ब्रह्मस्वरूपता २ सोडविणें, (जन्ममरणापासून) सुटका ३ मृत्यु 'रात्रीं ज्याचा मोक्ष झाला त्याची पोटीं उघडण्याकरिता सर्व मंडळी एकत्र झाली '–विवि १० ५ ते ७ १२४ ४ कर्ज फेडणें ५ मुक्त अवस्था, आध्यात्मिक पूर्णावस्था 'यालाच वेदांतात मोक्ष असें म्हणतात '–गीर ४८६ [स मुच्-सोडणें] ०काम–वि मोक्षाची इच्छा असलेला 'ऐसे मोक्षकाम सकळ।'–ज्ञा ४ १४८ ०गुरू–पु आत्म्याला मोक्ष, मुक्ति मिळविण्याची दिशा दाखवून देणारा गुरु (समासांत) मोक्ष-मार्ग-धर्म-प्राप्ति **मोक्षण**–न मोकळे होणें, स्वतंत्र होणें, सुटका ०धर्म–पु पारलौकिक धर्मास मोक्ष, किंवा मोक्षधर्म म्हणतात –गीर ६५ ०पट–पु एक खेळ, मुलाचा खेळ –मखेपु २०७ ०पद–न मोक्षाचें स्थान, स्थिति श्रेष्ठपद, ब्रह्मत्व (क्रि० देणें, मिळणें) ०श्री–स्त्री मोक्षलक्ष्मी ०पुरी–स्त्री काशी 'मोक्षपुरी मारुती पुढें पाषाणी।'–दावि ७७८ ०साधन–न मोक्ष साध्य होणें, मिळणें [स]

**मौ**—वि १ मऊ, नम्र २ मृदु, लवचीक, नमनशील ३ (ल) मऊ, सौम्य, नरम [स मृदु=मऊ] **मौआळ, मौवाळ**–वि मऊ, कोमल, मवाळ

**मौकूफ**—वि तहकूब, मुल्तवी [अर मव्कूफ]

**मौक्तिक**—न मोतीं, समुद्रात शिंपीच्या पोटीं सापडतें तें [स ह्य मुत्] ०रस–पु मोत्यांचें काल्व पाण्यातील चुना घेऊन तो आत्मसात् करून आपल्या शरीरात त्याचा एक रस तयार करतें हा चुना व प्राणिज द्रव्य या दोघाचा बनलेला असतो तें काल्व शिंपल्याच्या अतर्भागावर या रसाचे थर देतें आपल्या शरीरात घुसलेल्या पदार्थावर अगर कृमीवर या रसाचे फेरे फिरवून मोती बनवितें या रसास मौक्तिकरस म्हणतात

**मौज**—स्त्री १ मजा, गम्मत, चैन, क्रीडा, खेळ, करमणूक, आनंद देणारीं कृत्यें किंवा देखावे २ सुख, आनद, मनोरजन ३ एकदम उद्भवणारी लहर, तब्येत, विनोद आश्चर्य, नवल [अर मौ०] **मौजा, मौजा**–वि नाना प्रकारच्या मौजा करण्याचा ज्याचा स्वभाव तो; रंगेलपणात काळ घालविणारा **मौजाळा**–वि गमती, खेळकर, मजा करणारा, खट्याळ, करमणूक करण्याचा शोक अगर आवड असलेला **मौजी, मौज्या**–वि मौजाळा पहा

**मौज, मोजा**—स्त्री पु लहर, लाट तरंग; हलकावा, हेलावा, वीची ऊर्मि [अर मौज=तरंग]

**मौंज**—वि मोळ नावाच्या गवताचें, मुंज तृणाचें [स] **मौंजी**–स्त्री मुंज नावाचें कटिसूत्र (मुंज गवताची केलेली असते म्हणून) ब्राह्मणाचें कटिसूत्र, परतु मुंजविधि किंवा व्रतबंध याजबद्दल सामान्यत उपयोग, मुंज **मौंजीबंधन**–न उपनयन, मुंज, यज्ञोपवीत धारण करण्याचा विधि, ब्राह्मणाच्या मुलाचा व्रतबंध विधि [सं]

**मौजा**—पु खेडेगाव (वसूल किंवा सारा ह्यासंबधानें कसबा, महाल अशाच दुसऱ्या शब्दाशीं मुख्यत्वें उपयोग करितात), गाव, खेडें, महाल, कसबा इ० सज्ञा ज्यास नाहीं असा गाव [अर मौज़ा] **मौजे**–न गाव, खेडें –क्रिवि ज्या खेडेगावांतीं किंवा–ला, खेडेगावाच्या नावाच्या पाठीमागें हा शब्द योजून पत्रातून लिहितात उदा० 'मौजे गिम्हवणें, मौजे कारजगाव इ०'

**मौजूद**—वि विद्यमान, हजर, तयार 'टिपू सरंजामसुद्धा पाऊसकाळ न म्हणता लढाईस मौजूद '–पया २५९ [अर मव्जूद]

**मौढ्य**—न १ अज्ञान २ मूर्खपणा, मठ्ठपणा, वेडसरपणा, बुद्धिमांद्य –एभा १० २०५ [स. मूढ मौढ्य]

**मौत**—स्त्री मृत्यु, सकट, मरण 'आता राजे याचे अगोदर आपणास मौत येईल तर बरें '–मदरु १ ७७ मोठें अरिष्ट, सकट किंवा आपदा याजबद्दल देखील उपयोग करितात जसें– **विकत मौत**–मुद्दाम ओढून घेतलेलें संकट, मूर्खपणानें, हेकटपणानें अंगावर ओढून घेतलेलें सकट [अर मौत्, स मृत्यु]

**मौन**—न गप्प किंवा स्तब्ध बसणें, न बोलणें, गुपचुप बसणें, मुकेपणा, निःशब्दता, विवक्षित कालपर्यंत भाषण न करिता राहण्याचा जो व्यापार तो 'नकळे हृदयींचें महिमान। जेथें उपनिषदा पडलें मौन। तेथेंही मचरले सज्जन। देहाभिमान सांडोनी।'–एरुस्व१ ३७ २ अबोलपणा, स्तब्धता, अनालापिता, अनालापवृत्ति –वि मुका, न बोलणारा, स्तब्ध किंवा गपचुप बसणारा [स] ०मुद्रा–स्त्री शांतपणाची, न बोलण्याची किंवा अबोलपणाची मुद्रा, अबोलपणानें राहण्याची प्रवृत्ति दर्शविणारी चेहऱ्याची ठेवण [स] ०व्रत–न कांहीं मुदतीपर्यंत न बोलण्याचा नियम, नेम, कांहीं कालपर्यंत मौन वृत्तीनें राहण्याचें धरलेलें व्रत (क्रि० धरणें) [स] **मौनावणें**–कि स्तब्ध राहणें, अबोलपणानें असणें; एखाद्यानें स्वत ची शांतवृत्ति राखणें, चुप बसणें, होणें 'प्रेमें विकासलीं कमळें शुद्ध। गुंजारवती कृष्ण षट्पद। ऐकोनि गंधर्व जाहले स्तब्ध। सामवेद मौनावले।'–एरुस्व ३ ६ 'स्वयें शेष मौनावला स्थीर पाहे।'–राम १५८ **मौनी**–वि १ स्तब्ध, मौनव्रत घेतलेला, निःशब्द, अबोल, अल्पभाषी, अनालापी, भाषणविरक्त २ जगापासून पराङ्मुख होऊन ज्यानें आपले सर्व विकार (कामक्रोध इ०) जिंकले आहेत असा, वनवासी, अरण्यवासी, वानप्रस्थ, ऋषि (धार्मिक) **मौन्य** न १ स्तब्धता, मौन, शांतता २ मुकेपणा, अबोलपणा, अनालापिता, अनालापवृत्ति [स मौन] **मौन्य(न)पणें**–क्रिवि स्तब्ध,

गुडदपाने 'मन तु मौनरी अथवा उगा।' –वामनचरित्र १४ (नवनीत पृ ११०)

**मौर्ख्य**—न मूर्खत्व, मूढपणा, मौढ्य, मूर्खपणा, बुद्धिमांद्य अज्ञानीपणा २ अज्ञान, निरक्षरता, अशिक्षितपणा [ मूर्ख ]

**मौर्वी**—स्त्री धनुष्याची दोरी 'बाण चोला धनदाट। दक्षिणया गुणविया आली बाट। ज्या लोटुनियां घडघडाट। मौर्व्या कट बांधिला' –एरुक्म १२ १३५ [ स ]

**मौल**—स्त्री मौळी, मस्तक [ स ] **मौळ**-न १ शिर, डोकें 'चमत्कारोनि महाक्षाळ वारंवार डोल्वी मौळ।' –मुआदि ८ २१ 'कृपेनें मौळ स्पर्शिलें हातें।' –मुगणा १ ६३ मौली पहा २ –पु कागद इत्यादि फटावरील वाटे ते. ३ शिखर –ज्ञा ११ ५६७ **मौलि**, **मौली**-स्त्री १ डोई डोई शिर २ वाक्यावरील वर्मांचा झुबका किंवा झुबका ३ –पु मस्तक [ स ] **मौळी**, **मौळि**-मुगुट, मुगुट

**मौल**—न काय, इत्रल **मौलाचा बाजार**-मौल-बाजार व लिलावबाजार भरविण्याची पूर्वी चाल होती या बाजारांत मालाची विक्री करण्यास बहुधा वेश्या किंवा स्त्रिया असत. त्या मालाची मागील तितकीच किंमत द्यावी लागे आणि एखादा रकम किंवा माल मागितल्यावर तो द्यावाच लागे असा नियम असे हा बाजार रात्रीस भरे त्यावाच दुसरा प्रकार लोकांना रकमा (वस्तु) किंवा रकमेचें रूपांतर करून बहुत किंमतीची रकम थोड्या किंमतीस घावयाची यासच मौलाचा बाजार म्हणतात 'तेव्हां छावी जयपूरवाल्यानीं शहरांत मौलाचाचा बाजार भरविला।' –मल्हारराव चरित्र ६८

**मौलवी**—पु इस्लामधर्मशास्त्री, मुसलमानी धर्माधिकारी, मुल्ला, न्यायकोर्टांत मुसलमानी कायद्यांचा अर्थ सांगणारा, मुलाना, मुसलमानी धर्म सांगणारा [ अर मव्लवी ] **मौला**-पु प्रभु ईश्वर, मालक, धनी [ अर मव्ला ] **मौलाना**-पु मुसलमान धर्मशास्त्रवेत्ता शिक्षक, मौलवी मुसलमानांचा उपाध्याय [ अर मौलाना=आमचे साहेब ]

**मौल्य**—न मूल्य, मोल, किंमत [ सं मूल्य ]

**मौवाळ**—वि (महानु ) मऊ, मोवाळ, मृदु 'रत्नकुटांची केवाळु मौवाळ वदकाजवळी।' –दाव १७७ **मौवाळे**-स्त्री मृदुपणा [ स मृदुल ]

**मौसर**—स्त्री ऐपत, सामर्थ्य

**मौसुफ मौसूफ**—वि मजारनिल्हे, उपर्युक्त, मजकूर 'नय व मौसूफ' –रा १० १६५ [ अर मवसूफ ]

**मौळला**—वि मृदुल मऊ मी मदनु मौळला साप।' –उषा १२६ [स मृदुल]

**मौढा**—पु मोठा पहा डांग, पठावरील डांग 'दनहा किंवा पठा। आकुमात्र बाहेरी मौढा। ऐसा गवाळ दुवळा। कुविन्दें जो।' –ह १८.६५८

**म्यां**—मग (क र्तृ) मी, मी श्री तृतीया 'अजोनि बहु काय म्यां सुचन आहिं दुबे।' –केका ५० 'एकें यधिष्ठिर पांडुपुत्रः म्यां।' –मोकर्ण ७ २४ [ म मया ]

**म्याऊ**—उद्गा मांजरीचा शब्द [ ध्व ]

**म्यान**—न तरवार इ० चें मेण, तरवारीचें घर कोष, असि कोष-शी चापाची खाच [ फा मियाना ] ०करणें-१ तरवार म्यानांत घालणें २ (म ) तोंड बंद करणें, जीभ आटोक्यांत ठेवणें, जीभ गेल न सोडणें, स्तब्ध राहणें, थांबणें [ फा मियान् ] ०घालणें-झिपळे, गडकडे, निवडुंग इ० बुडून त्या नदीच्या पात्राच्या रुंदाईत टाकतात यामुळें पाणी स्थिरावतें व मासे मरतात मग ते धरतात पहा एका म्यानांत दोन तरवारी-सुऱ्या-राहत नाहीत–एकाच घरांत दोन सवती सुखानें नांदत नाहीत किंवा एकाच पक्षाचीं दोन माणसें परस्परांचा मत्सर केल्या-शिवाय राहत नाहीत, दोन तेजस्वी माणसें शेजारी राहू शकत नाहीत, त्यांच्यांत तेढ येण्याचा संभव असतो **म्याना**-पु १ मेणा, पेटीवजा पालखी, पालखीसारखें वाहन पालखी पहा. २ एक औषध हें इराणाहून येतें त्यास तुरजबीन अथवा शिरखिस्त म्हणतात हा पदार्थ एका प्रकारच्या झाडाच्या बुंधास चोंचे मार ल्यानें निघतो हें साधारण सारक आहे

**म्यानेजर**—पु (इं ) एखाद्या संस्थेची, उद्योग-धंद्याची, कारखान्याची, नाटकमंडळी इ०ची किंवा कांहीं कामाची व्यवस्था पाहणारा करणारा, व्यवस्थापक [ इं ] **म्यानेजिंग कमिटी**-स्त्री व्यवस्थापकमंडळ 'इकडे आमच्या सधन गृहस्थावर मड ळीत 'पगडी' करण्याची पाळी येईल म्हणून म्यानेजिंग कमेटीचे अध्यक्ष बोटें चोखीत असतात'

**म्यार**—स्त्री (कु ) गावचा सभोंवतीचा बधारा, मेर, शेताची सीमा दाखविणारा बधारा [ म मेर ]

**म्यालेट**—पु हातोडा, मोगरी, घण, फर्मा ठोकण्यास लाग णारें साधन हा लाकडी ठोकळा असतो –मुद्रण १०६

**म्युनिसिप( पॅ )लिटी**—स्त्री शहरसुधारणाई इ० कामें करण्यासाठीं ( कांहीं कायद्यान्वयें ) स्थापन करण्यात आलेली काहीं मंडळींची संस्था, नगरपालिका [ इं ]

**म्यौं**—उद्गा १ मांजराबद्दलचा उद्गारवाचक शब्द २ मांज रांचें ओरडणें –स्त्री ( म्हणून ) मांजर ( याअर्थी ) –क्रिवि मांजराच्या ओरडण्याच्या आवाजासारखें

**म्लान**—वि १ थकलेला, गळलेला, अवसन्न अवसादित, क्लांत, मलूल २ कोमजलेला, फिक्कट, निस्तेज, सुस्त, जड, गलित

कोमेजलेलें-(पुष्प, मनुष्य किंवा एखादा पदार्थ) ३ खिन्न, विषण्ण दिसणारा [स म्लै=कोमेजणें] ०दृष्टि-स्त्री डोळयाची चमक नष्ट करणें, दृष्टीस मंदता दाखविणें, बुबुळें खालच्या पापणीचे आत दडविणें, हा अभिनय व्याधि, ग्लानि दर्शवितो

**म्लेच्छ, म्लेंच्छ, म्लेछ, म्लेंछ**—पु परकीय किंवा यवन लोकांबद्दल सामान्यपणें योजावयाचा शब्द, यवन, हिंदुव्यतिरिक्त अन्यधर्मीय, मुसलमान व युरोपियन, अनार्य [स म्लेच्छ्=अशुद्ध बोलणें]

**म्वाल**—स्त्री (कु) किंमत मोल [म मूल्य, ग मोल]

**म्वार**—स्त्री मोहर (अप) 'दक्षिणप्रांतीं कुतुबशाही ही पराक्रमी महान् सकलार्थ समृद्धि मत सस्थानें तसेंच मोगल एक एक सुभा लक्षलक्ष म्वाराचा' -मराभ ३ [मोहर अप]

**म्हइस, म्हईस**—स्त्री म्हैस पहा

**म्हटलें**—(पादपूर्णार्थक-मराठी बायकी) १ लक्षात असु या २ सिद्ध गोष्ट (आर्जव शक्तीनें व अदबीनें व केव्हा केव्हा किंचित् थट्टेच्या सुरात उपयोगात आणलेला शब्द) ०तेंव्हां-अ केव्हाहि

**म्हण**—स्त्री १ लोकपरंपरेनें आलेलें नीतिबोधक किंवा दृष्टांतायुपयोगी लोकमान्य झालेलें सुरसुटित आणि चमत्कार असें दृष्टांतभूत वाक्य रूढवचन, म्हणणी, लोकोक्ति 'काणाचें वाईट करूं नये अशी वडिलांची म्हण' २ बोलण्याची रीत, वाक्प्रचार 'एका स्थानास दान सुन्या अशी म्हण आहे' ३ बातमी, खबर, वार्ता [म्हणणें]

**म्हण**—उभ म्हणून. 'कातेला श्रमहो झणी म्हण तव पुण्यें स्वहस्तें हरी।' -अक्र २ विठ्ठल, रसमंजरी १ [म्हणणें, स भण्=बोलणें] ०गत-स्त्री न म्हणणें, बोलणें, भाषण 'आम्हीं तुमची ह्मणियागतें। जें सांगतसा तें मानूनि हितें। काया वाचा मनसा तुमतें। अनन्य भावें शरण जी।' -स्वादि १२ ४ ७९ **म्हणजे**-उभ १ त्याचा अर्थ कीं, अन्यशब्दांनीं तेंच सांगावयाचें तर, किंवा, अथवा 'अश्व म्हणजे घोडा' २ त्याच्या योगानें, तेणें करून त्याचा परिणाम असा होतो कीं अशी स्थिति असल्यामुळें, पूर्वोत्तर क्रियांचा कार्यकारणभाव असता कारण क्रियावाचकापुढें या अव्ययाचा योग होतो 'पाऊस पडला म्हणजे पीक चांगलें होईल', 'तुम्हीं चालला म्हणजे मार्ग कार्य होईल' [म्हणणें, स म्हणिने=म्हटलें जातें] **म्हणणें**-क्रि १ बोलणें, उच्चारणें, वदणें २ पठण करणें पाठ म्हणणें म्हणेल तो सुचेल ३ वाचणें, अभ्यास करणें पत्रणें सर्व म्हणून टाकणें, मुखोद्गत करणें (वद शास्त्र १०) ४ नाव घेणें नाव उच्चारणें आव्हान करणें बोलणें नामोच्चार क० [स भण्] **म्हणणी**-स्त्री १ म्हणणें, पाठ म्हणणें २ म्ह० ण्याची किंवा पठण करण्याची रीत अथवा मार्ग म्हणण्याची तऱ्हा, धाटणी ३ एक किंवा एकदा म्हणावयाचा पाठ (वेद वगैरेचा) ४ म्हण आहणा, लोकोक्ति म्हण पहा 'दुसऱ्याचें जो वाईट इच्छितो त्याचें बरें होत नाहीं अशी लोकांची म्हणणी आहे' **म्हणण्यासारखा**-क्रिवि विशेष सांगण्यासारखा, उल्लेख करण्याजोगा 'ता लाख टाया असून शर्यतीत म्हणण्यासारखा उल्लेख करण्याजोगा पुढें आला नाहीं -वि फार चांगला विशेष 'हरदासाची कथा काहीं म्हणण्यासारखी नसते' **म्हणतखेवो-खेवीं**-क्रिवि म्हणता क्षणींच, म्हटल्या बरोबर 'कान्हा म्हणतखेवो' -पच १ ३९ **म्हणता**-वि म्हणणारा -एभा ७ ४४३ **म्हणतां म्हणतां**-क्रिवि फार थोड्या अवधींत, बोलताबोलता अगदीं अल्प काळात 'वारा अनुकूल असल्यामुळें म्हणता म्हणता आमची होडी एक मैल गेली' **म्हणपणें**-क्रि म्हटलें जाणें [प्रा] **म्हण(वि)विणें**-क्रि १ एखाद्यास बोलावयास किंवा म्हणावयास लावणें, बोलविणें, वदविणें, उच्चारविणें, पठण करविणें किंवा करावयास लावणें अथवा भाग पाडणें २ संज्ञा देण्यास, अभिधान करावयास लावण्यास, नामोच्चारण करावयास लावणें भाग पाडणें, म्हणवून घेणें, 'शिवाजीनें आपणास इ स १६७४ मध्यें राजा म्हणविलें' ३ काहीं गुणाची प्रौढी मिरवणें 'तू आपणास धीट म्हणवितोस मग साप पाहताच कां पळून गेलास?' [म० 'म्हणणें' चें प्रयोजक] **म्हणासार**-क्रिवि (गो) म्हणेपर्यंत **म्हणितली-लें**-क्रि म्हटली-लें बोलली-लें 'कर्ता भोक्ता म्हणितली' -विपु ३ ८४ 'ते वेळीं म्हणितलें रुक्मिणीसीं।' -उपा ६४ ३० म्हणविणें पहा. **म्हणिया**-वि आज्ञाधारक 'म्हणिये तुम्हांते मागनील महाकृपि।' -ज्ञा ३ ९९ **म्हणियागत**-वि आज्ञाधारक चाकर, आज्ञेप्रमाणें वागणारा -ज्ञा ९ १८८ **म्हणियारा-रें**-वि १ म्हटलेलें करणारा 'हातील सकळ। ऋद्धिसिद्धि म्हणियारी' -तुगा ३२४ २ -पु दास चाकर दूत 'नाहीं वरी जैवा सारा। ज हाती नाहीं म्हणियारा' -तुगा ३६० 'अवचितें साद्याचें म्हणियारें। मारीत मन्ती एकसरें' -दा ३ ९ ३९ **म्हणियें** न १ आज्ञा सेवकाचें कर्तव्य सांगितलेलें काम 'आणी कांवो तू दिसमी दुश्चिनी। म्हणिय काम नलगे तुझ्या चित्तीं।' -तुगा११ २ हाम -माज्ञा १३ ४३९ [प्रा] **म्हणिपणें**-म्हटलें जाणें -एभा ६ १८० **म्हणीजेलें** म्हणे 'द्विजी निषध पासाव म्हणी जे।' -र ४ **म्हणु** म्हणावा म्हणतो जणु काय चतुष्पद वन्दिन हा म्हणु तौ -मृ ७ **म्हणे**-म्हणतो 'द्वीगुण काठीं तुमचपणी म्हणे वज्रमुग' -वैद्यकचाद ७९ [म मन्य, भण्] **म्हणेरा**-तगादा -शर

**म्हणयार**—स्त्री (कु) मण्यार एक जातीचे सरपटणारें विषारी जनावर [मण्यार]

म्हणम्हणीं, म्हणम्हणीं—अ म्हणून म्हण म्हणोनि-म्हणून -ज्ञा १४४१ म्हणिपें-ये-अ म्हणजे नावाचा-ची-चें 'भक्ति तेचि पैं आर्ति। आणि जिज्ञासु म्हणिपे ज्ञानस्फूर्ति' –सिम ४८८

म्हणी—स्त्री (कु) पाट (बसावयाचा)

म्हणीजे—अ म्हणजे 'चिन्नागु म्हणीजे येकु'–उषा १९७

म्हणून, म्हणोन म्हणयून-ऊन—क्रिवि १ (काव्य) त्यामुळें, त्या कारणास्तव, त्यासाठीं, यावरून, तस्मात्, सबब, त्या अर्थी 'त्यानें मला शिवी दिली म्हणून म्या तोंडी मारलें' पूर्वोत्तर क्रियाचा कार्य–कारणभाव असता कारण क्रियावाचकापुढें याचा प्रयोग होतो जसें–'नदीस पूर आला म्हणून मी अलीकडे अडकलों' २ असें, इत्यादि, याप्रकारचें, अर्थाचें 'मी तुझे घरीं येईन म्हणून म्हणाला 'राजानें माझें घर लुटलें आणि माझी चौघामध्यें अगदीं अप्रतिष्ठा केली म्हणून (असें) हा बोलतो' ३ –वि म्हटलें जातें तें, या नावाचें 'साप म्हणून एक भयंकर प्राणी आहे ४ अर्थशून्य पादपूरक, जोर देताना हा शब्द योजतात उदा० कोठें म्हणून कोठे? [म्हणणें] ०का–म्हणा किंवा काय हा शब्दानें जोर व्यक्त होतो जसें –गहू म्हणून का (म्हणा, काय) जोंधळा म्हणून का (म्हणा, काय) जो जिनस पाहिजे तो आहे कधींकधीं अधिक जोर किंवा अधिक स्पष्टता दर्शविण्यासाठीं कांहीं सर्वनामें व क्रियाविशेषणें यास 'म्हणून' हा शब्द पुढें जोडून उपयोग करितात कोण म्हणून? काय म्हणून? कोठें म्हणून? ०शानि–म्हणून ०साठीं क्रिवि एवढ्यासाठीं, यास्तव, म्हणून, सबब तस्मात् अर्थात् इ० हणोनि–क्रिवि याकरिता ध्रुव स्तवनि आवडी धरि म्हणोनि अत्यादरें। –केका ६२ 'आधार हा मज म्हणानि गणोनि डोले। –र ७५ म्हणौनि–अ म्हणून 'म्हणौनी त्रिभुवनी विख्यातु।'–उषा ७६३ [स भणु=म्हणणें] म्हणौनु–म्हणून 'म्हणौनु धातुसोधन –वैद्यकवाड ७८

म्हसक—स्त्री काखेत धरून नेण्याची कातडी पाण्याची पिशवी पखाल धान्य पेरतवेळीं धान्य ठेवण्याची मोठी हरण च्या अगर मेंढराच्या कातड्याची पिशवी [मसक]

म्हसण म्हसणाबाई म्हसणखुंट, म्हसणवटी—स्मशान मसण पहा [प्रा]

म्हसा—स्त्री (व) चामखीळ [मसा]

म्हाफूळ—पुन समुद्रफ समुद्रफेन-फेंस, सिंधुकफ, सुफेन

म्हाग म्हागिरी म्हागेरी म्हाळुंग, म्हाळू—महाग, महागिरी इ० पहा

म्हाजूर असणें—माहिती असणें

म्हात—पु हत्ती हाकणारा महात पहा [महात]

म्हातन—न (कों) कुणबी लोकाचें देवकृत्य

म्हातापी—स्त्री (कु) आतषबाजी, शोभेच्या दारूकामातील एक प्रकार महताब पहा

म्हातारा—वि १ वृद्ध, वयोवृद्ध वयस्क 'म्हाताऱ्यानें केलें नाव' २ पुनर्वसु नक्षत्राबद्दल शेतकरी लोक म्हणतात तसेंच पुष्य नक्षत्राला तरणा अशी संज्ञा देतात ३ एक प्रकारचें गवत –बदलापूर १६१ [स महत्तर] म्हाताऱ्यास पिपांत ठेविलें पाहिजे किंवा पेटींत अगर कंठाळींत घालून नेलें पाहिजे–आपणाला सल्ला देण्यासाठीं आपणाबरोबर नेहमीं वयोवृद्ध माणसें असावयास पाहिजेत म्हातारपणीं ढोंचळा मणी–(व) म्हातारपणीं कशाला शृंगार हवा म्हाताऱ्यावाचून काणी जायना–(गो) म्हातारा मनुष्य असल्याशिवाय कहाणीसारख्या ठराविक गोष्टी पार पडत नाहींत म्हाताऱ्याच्या घायकोस ताजटाचरा रोटया–म्हातारीला धड खाण्यास अन्न व नेस ण्यास वस्त्र मिळत नाहीं. तिला उरलेंसुरलेंच खावें लागतें म्हाताऱ्या माणसाचें लोणचें घालून ठेवावें–सदुपदेश पाहिजे असेल तर म्हाताऱ्या माणसाचा सल्ला घ्यावा म्हातारखेंड–न म्हातारा शब्दाचें तुच्छतेचें रूप, निंदेनें म्हाताऱ्यास म्हणतात म्हातार चळ–पु म्हातारपणीं बुद्धीस होणारी विकृति म्हातारपणीं होणारा बुद्धिभ्रंश, साठी बुद्धि नाठी, पिसें, चाळे, तार, म्हातारपणीं बुद्धि बावचळणें म्हातारडा, म्हातारडुक–वि थेरडा, मूर्ख म्हातारा अशा अर्थी, तुच्छतादर्शक म्हातारा या अर्थी (स्त्री, पुरुष या दोहों बद्दल उपयोग), म्हातारखड म्हाताराकोतारा–वि म्हातारा (द्विरुक्तीनें), वृद्ध आणि वयस्क, म्हातारा आणि अशाचसारखा म्हातारी–स्त्री १ वृद्ध स्त्री, वृद्ध आई जरठ स्त्री २ वोडकी, केस भादरलेली विधवा स्त्री (तरुण किंवा म्हातारी कशीहि असो इजबद्दल उपहासार्थी योजावयाचा शब्द) ३ कापसाचा हलका पुंजा किंवा हलकें पीस (हवेंत उडणारें) याजबद्दल योजावयाचा शब्द रुईच्या फळांतील ततुसमुदाय (बाप्र) 'मुलें खेळताना म्हाताऱ्या उडवितात'–मराठी ६ वें पुस्तक पु २४३ म्हातारी मेलीसें हाणें–(ल) अतिशय दु ख होणें म्हातारीनें कोंबडें झाकून ठेवलें म्हणून उजेडावयाचें रहात नाहीं–कोंबडा उजेड ण्याचे अगोदर आरवतो यावरून कोंबड्याच्या आरवण्याचा आणि उजेडण्याचा कांहीं कार्यकारणभाव आहे असें मात्र नाहीं उजाडू नये म्हणून म्हातारीनें कोंबडें झाकून ठेविलें तरी उजाडावयाचें तें उजाडतेंच सृष्टिक्रमाप्रमाणें गोष्टी होऊ नयेत म्हणून कितीहि प्रयत्न केला तरी त्या गोष्टी थांबावयाच्या नाहींत

म्हान म्हाद—न (गो) कणगरासारखा एक कद याचे तुकडे तुपात तळून साखरेंत घोळून खातात हे कद औषधी असतात व ते मलीच्या मुलाला देतात विषावर उतारा म्हणून हा कद खावयास देतात

म्हापुरस—पु (कु) महापुरुष, उगीच एखाद्यास मोठेपणा देण्यासाठी वापरण्याचा शब्द [स महापुरुष]

म्हामूर—वि पुष्कळ, महामूर पहा

म्हार—वि महार म्हारवड-म्हारोडा-पु महारवाडा म्हारागण-(कों) महाराकरिता आगण म्हारवत-(कों) महारानी तयार केलेल्या टोपल्या इ० जिनस म्हारपोर-वि महारपोर म्हारटोपी-स्त्री (कु) महाराच्या पाठीस गळ टोचून वीसपचवीस फूट उचीच्या खाबावर लटकावून गरगर फिरविण्याचा विधी बगाड, आकडे घेणे (आता ही चाल बद झाली आहे)

म्हारकाचळा, म्हारकी म्हारकी-महार शब्दाखाली पहा

म्हारकाव—स्त्री गेरूचा एक प्रकार, एक प्रकारची काव, तावडी माती गेरू पहा

म्हारकाडो—पु नेता, म्होरकाड्या

म्हारग—वि (गो) महाग म्हारगाय-(गो) महागरा

म्हारगा—महार

म्हारडे—न पावसाळ्यात उत्पन्न होऊन पावसाळा अखेर मरणारा खेकडा

म्हारू—न (गो) टारपोला नावाच्या वनस्पतीचा टुपडदी फुलाचा क्वचीवजा भाग

म्हाल—वि (कु) माडाच्या पेंडीपैकी पूर्वीच्या पेंडीचे नारळ [महत्] ०गडा-पु (कों) मुख्य विद्यार्थी ०तंगडी-नायक, म्होरक्या ०म्हातारी-स्त्री म्हातारी स्त्री

म्हाला-म्हाली-म्हालो—पु (व) न्हावी, हजाम मशाली किंवा मशाल्जी, मशाल (टेंभा) धरणारा -विवि ५९ ३४ 'हजामतीला आठ दिवस झाले तरी म्हालो आला नाहीं'

म्हाव, म्हाँ—न (कु) मोह पहा मधाचे पोळें, मध माशानीं बाधलेले (मधयुक्त) पोळें

म्हावडोळ, मावडोळ—न (गो) एक सर्पजात

म्हाँवग—न मासळी, म्हावरें पहा

म्हावदे—न (कु) मावदें म्हामना-(कु) यात्रेहून आल्यावर करावयाची सागता (सतर्पण)

म्हावरें—न (गो) १ पवाड २ मासा मच्छी मासळी (सामुदायिकपणें किंवा सवयनें) पकडून आणून विक्रीकरिता उघड ठेविलले मासे ०मिळप-(गो) पवाड मिळणें

म्हावेलो—पु (कों) (फळातील) गर

म्हासड, म्हासाड म्हासाळ—पु एक प्रकारचे ताडूळ पण्णी 'म्हासाड (पण्णी) धुर असा विकतात'-मेया

म्हासरा—पु वडा महासरा महसरा पहा 'अहमदखा पठाण बगम प्रदागाम म्हासरा करून होता'-पदा ११९

म्हाळ, म्हाळवस, म्हाळवसा, म्हाळुंग, म्हाळुंगी, म्हाळ—पु (कों) महालय, श्राद्ध, पक्ष महा शब्दामध्यें पहा [महालय]

म्हाळसा—स्त्री १ खडोबाची स्त्री २ कुकवाचा मोठा टिळा लावणारी, धष्टपुष्ट आणि अव्यवस्थित राहणारी भाडकुदळ स्त्री ३ पूज्य दवता (खडोबाची बायको म्हणून) 'म्हाळसाईनें केलें धावणें, -दावि १०१ ०कात-पु खडोबा म्हाळसेचा कात ०देवी-स्त्री खडोबाच्या बायकोचें नाव म्हाळोबा-पु खडोबाचें किंवा खडेरावाचें नाव [महाल्साकात, म्हाल्साकात]

म्हाळुंग—न महाळुंग पहा

म्हाळुड चावप—क्रि (कों) अळणी पदार्थ करणें (माळुड चावलेल्या माणसाला मीठ खारट लागत नाहीं यावरून)

म्हाळ्—पु महाळ् म्हाळी, न्हावी

म्हूण—अ (कु) म्हण, म्हणून 'ज्याला वाढविलें म्हूण। मज सुख तुज सीण।'-तुगा १५०७ [स म्हणून, म्हण]

म्हूनशान-म्हणून

म्हेतर—पु १ भगी, झाडूवाला २ खेडेगावच्या वशपरपरागत वतनदार मेंधराच्या बद्दल योजावयाचा शब्द ह्यावरून सर्वसाधारणपणे चाभार व महार याच्याबद्दल योजावयाचा शब्द तसेंच अशा त-हेच्या शब्दाना प्रत्ययवजा जोडून उपयोग जसे -हिर म्हेतर, चाभम्हेतर ३ गवडी, सुतार, लोहार, साळी, कोष्टी, तेली तावोळी माळी, चाभार याच्यातील नायकाबद्दल किंवा मुख्याबद्दल मोठपणानें योजावयाचा शब्द ४ पाटील, कुळकर्णी, चौगुला इ० वतनदार लोकाच्याबद्दल प्रतिष्ठितपणे योजावयाचा शब्द [स महत्तर] ०की-स्त्री म्हेतराचा उद्योग किंवा कर्तव्य ग्रामादिसबधीं एक वतनदारी म्हेतराणी, म्हेत्राणी-स्त्री १ भगीण किंवा झाडूवाली बाई २ म्हेतराची स्त्री (वतनदार महार किंवा चाभार याची) चामार जातीची स्त्री म्हेतऱ्या-पु वतनदार महाराबद्दल श्रेष्ठत्वाचा शब्द काहीं कारागीर लोकातील नायकाबद्दल योजावयाचा शब्द तसेंच जातींतील मुख्य इसमाबद्दल योजावयाचा शब्द म्हेतर अर्थ २, ३ पहा [म्हेतर]

म्हेर मेहेर—स्त्री मातीचा बाध मेर पहा

म्हेळ—स्त्री उसाचा रस कढवितांना वर यणारी मळी (याबापून उत्तम पिण्याची दारू काढता येत) मळई मळी] ०चें-(कों) गळ

म्हैस—स्त्री १ महिषी, रेड्याची मादी, म्हसरू, म्हैस २ एक प्रकारचा सदा पायांचा माशीपक्षा मोठ्या आकाराचा व वरचा पृष्ठभाग कठीण असलेला किडा ३ कळफुलावरील निबर, काळसर रगाची पारी पाढऱ्या रगाच्या पारीस गाय म्हणतात म्ह० मेल्या म्हशीला दहाशेर दूध किंवा बहु दूध [स महिष प्रा महिस] पाण्यांत म्हैस न बाहेर मोल-म्हैस डबक्यांत

बुडून राहिली असता तिची किंमत ठरविणें. **म्हशीवर पाऊस पडणें**–बेफिकायतीचे प्रयत्नाबद्दल किंवा निरर्थक झालेल्या हितकारक गोष्टीबद्दल योजावयाचा शब्द. **म्हशीचा प्राणनाथ**–पु रेडा. –वि. (ल.) सुस्त; मस्त. 'तो काय नुसता म्हशीचा प्राणनाथ आहे.' **म्हशीनें पाय दिलेलें नाक**–न. नकटें किंवा बसकें नाक **म्हैस आटणें**–दूध द्यावयाचें बंद होणें; दूध न निघणें. 'गेल्या महिन्यापासून म्हैस आटली आहे.' **म्हैस पावल्या**–वि. (व.) म्हशीसारखा जड प्रकृतीचा. **म्हैस पाहणें**–(व) म्हशीचें दूध काढणें. **म्हैस पिळणें**–धार काढणें 'मी म्हैस पिळून येतों' **म्हैस हात पारखते**–(व) म्हैस धार काढणाऱ्याचा हात ओळखते. **म्हशीचीं शिंगें म्हशीला जड होत नाहींत**–मुलें अधिक असली तरी तीं आईबापाला जड नसतात. **म्हशा**–पु. १ (व) रेडा; हल्या, जड, दांडग्या व कुरूप रेड्याबद्दल किंवा इतर पशूबद्दल तुच्छतेनें योजावयाचा शब्द २–वि (ल) रेड्यासारखा धष्ट पुष्ट मतिमंद; म्हशीसारखा जड प्रकृतीचा ३ सुस्त; दांडगा आणि घाणेरडा अशा इसमाबद्दल योजावयाचा तुच्छतादर्शक शब्द, मूर्ख अचरट मनुष्य. 'कीं म्हशाचें गण्या श्राम।'–नव १८ १७२ [म्हैस] **म्हशागुग्गुळ–गुगुळ**–पु १ एक प्रकारचा गुग्गुल २ (म्हशा किंवा म्हैस) धिप्पाड गलेलठ्ठ व टोंण्या इसमाबद्दल निर्भर्त्सनापूर्वक योजावयाचा शब्द. [म्हशा, म्हैस, मशी आणि गुग्गुल] **म्हशाबोळ**–पु एक प्रकारचा बोळ, एक औषधी वनस्पती, एका झाडाच्या चिकापासून हा होतो. याचा रंग काळा असतो हें औषध गुराचे पोटदुखीवर चालतें **म्हशासुर**–पु देवीनें मारलेला एक दैत्य; म्हसोबा. [स महिषासुर] **म्हशी केळें, म्हशेळी, म्हशाळें, म्हसकेळें**–न. एक जातीचीं मोठीं व जाड केळीं. **म्हशीचा सटारा म्हशीचें घोडें–म्हशीचें डोबडें**–पुन म्हशीबद्दल उपहासानें म्हणतात **म्हशीचें मेळवण**–न. (विनोदानें) अव्यवस्थित जेवण, पात्रावर खाद्यपदार्थांची अव्यवस्थित रेलचेल. **म्हस**–स्त्री. (व) म्हैस, महिषी; म्हसरू, म्हसरूड; म्हसर ह्या शब्दाकरितां म्हैसरूं इ० शब्द पहा [म्हैस] **म्हसकी–म्हसक्या**–वि म्हैस राखणारा, चारणारा **म्हसडी, म्हसडें**–वि म्हशीचें वासरूं, महिषवत्स [म्हैस–म्हस–म्हसडी] **म्हसर**–ढोर, लाव व सापद (म्हशीच्या पाटी प्रमाणें) ह्या अर्थी नामाशीं सामासिक शब्दांत म्हैस किंवा म्हस शब्दाचें तुच्छतादर्शक रूप; कंटाळवाणें व न संपणारे लांबलचक जसें–म्हसरमाळ, म्हसर मैदान, म्हसररान कधीं कधीं म्हसरभुई व म्हसरजमीन. म्हसरशेत, म्हसरवाट, म्हसररस्ता, म्हसर मजल, म्हसरकोस, म्हसरपत्र इ. [एकवचन म्हसरू] **म्हसर**–म्हैस, टोणगे **म्हसड्या**–वि. (व.) म्हशीसारखा जड प्रकृतीचा. **म्हसागर, म्हसोबा**–पु एका असुराचें किंवा दैत्याचें नाव, ज्यास देवीनें मारलें कांहीं हलक्या जातीचे लोक ह्याची पूजा करितात; एक पिशाच्च. [महिष] **म्हसोबाला नाहीं बायको व सटवाईला नाहीं दादला.** **म्हसोबा कोपविणें, पेचविणें**–कृष्णानदी तटाकास अक्कलकोप गावीं म्हसोबा आहे त्याला आपल्या शत्रूचा सूड घेण्याकरितां नारळ फोडणें; देव घालणें **म्हैशा**–पु. अंगानें मोठा व कुरूप अशा रेड्याबद्दल किंवा इतर नर जातीच्या पशूबद्दल रागानें किंवा उपहासपूर्वक योजावयाचा शब्द. –वि ज्याचें शरीर पुष्ट असून जो आळशी आहे त्यास निंदेनें म्हणावयाचा शब्द. [म्हैस] **म्हैसभादऱ्या**–वि. आपल्या कामांत निपुण नसलेल्या न्हाव्याबद्दल उपहासानें योजावयाचा शब्द; वाईटपणें खाडाखोड करून लिहिणाऱ्या लेखकाबद्दल योजतात. **म्हैसमंगळ**–वि. मंद. **म्हैसमाळ**–पु प्रवासामध्यें लवकर न संपणारा मोठा माळ किंवा ओसाड व नापीक जमीन म्हसर पहा. **म्हैसरट, म्हैसरूड, म्हैसर**–न म्हैस किंवा म्हैसा याजबद्दल तुच्छतादर्शक बनलेलीं रूपें. **म्हैसरूं**–न म्हैस शब्दाचे नर किंवा मादी वगैरे भेद लक्षात न घेता लाडिकपणानें योजावयाचा शब्द **म्हैसवा**–पु (महानु) एक प्रकारचा पाषाण 'कीं भान्दारी म्हैसवा थर। नव्हता दृष्टी गोचर।'–ऋ ४८ **म्हैसवेल**–स्त्री. एक झुडूप **म्हैसा**–पु टोणगा, रेडा (हा शब्द मराठींत विशेष रुळलेला नाहीं.) राड–भांड म्हैसा विघडे तो होय कैसा! (हिंदी म्हण) 'नको देऊं म्हैसा।'–प्रला. **म्हैसासुर**–पु. एक पिशाच्च, क्षुद्रदेवता 'म्हैसासुर मल्लिकार्जुन।' –दावि ६३. [महिषासुर] **म्हैसिक**–वि. म्हशीचा. **म्हैसोबा**–म्हसोबा. 'मुंज्या झोटिंग करणी। म्हैसोबाची'

**म्होतरफा, म्होतरफी, म्होतीर, म्होतुर**—मोहतरफा, मोहतरफी इ० पहा

**म्होप(उमाप)**—वि (कों) पुष्कळ.

**म्होर**—न बाशिंग, ताडाच्या व शिंदीच्या पाती, केळीचीं सोपें वगैरे जिनसांचें केलेलें हें बाशिंग असतें. भिंगाचे व काचेचे मोठे बसविले म्हणजे हें बाशिंग मुकुटासारखें दिसतें असल्या बाशिंगाला रुपये २५ ते ४० पर्यंत किंमत पडते **म्होर**–क्रिवि. पुढें. 'म्होर हो.' 'म्होरं होऊन मग कोण आलं तें. म्होरकाढ्या, म्होरकी, म्होरक्या, म्होरचा, म्होरणें, म्होरपी, म्होरला, म्होरून, म्होरे, म्होरकाडी, म्होरको, म्होरकी, म्होरक्या, म्होरळा म्होरे**–मोहर काड्या इ० शब्द पहा (माणदेशी) पुढचा. –अ. (कु कों.) पुढें **म्होरो**–पु विष उतरण्याकरितां लाविलेला दगड. मोहरा पहा

**म्होव, म्होवँ**—पु (गो.) १ मोहाचें झाड २ मध, मधमाशीचें मोहोळ किंवा मोहाळ 'म्होव रोंप'.' ३ मगज सारी

कायमची जागा हुडकणाऱ्या किंवा शोधणाऱ्या मधमाशांना थवा, घोळका ४ गोडा म्होडवामुस-(गो) मधमाशी

**म्होवरी**—स्त्री (हेट) मोहरी

**म्होवलो**—पु (गो) भाजलेली काजूची बी

**म्होयाळ**—न (गो) मधुर, फळ, मध, रस निघणारें फळ म्हावाळर, म्होवालचें-(वों) मधुर होणें

**म्होवा, म्होवी नाल**—पु (गो) गोडा नारळ

**म्हो-महू**—पु न मोहोळ मधमाशांनी तयार केलेलें गार्चे पोळ 'चिंचेच्या झाडाला महु लागला आहे '

**म्हानत**—स्त्री (कु) मेहनत [म मेहनत]

---

# य

य—व्यंजनमालेंतील सव्विसावें अक्षर अक्षरविकास-या वर्णाची पहिली व दुसरी अवस्था अशोकाच्या गिरनार लेखात आढळते दुसऱ्या अवस्थेंतील य लेखणी न उचलता काढले तर तिसऱ्या अवस्थेंतील 'य निघतो ही अवस्था कुशानवंशी राज ज्या वेळच्या (इ स १ लें आणि दुसरें शतक) मथुरा येथील लेखात 'र्य किंवा 'स्य या जोडाक्षरातून दिसून येते शेवटची अवस्था इ स ५८८ मधील महानामाच्या बुद्धगया येथील लेखात पहावी आपण आज लिहितों तसा य ११ व्या शतकातील उज्जनीच्या लेखात लिहिलेला आहे -ज्ञाको (य) १ हा वर्ण गावढळ लोकांच्या बोलींत वर्तमानकाळाच्या प्रथम व तृतीय पुरुषाच्या एकवचनाच्या रूपाना जोडलेला आढळतो उदा० मी जातोय हा जातोय मी देतोय (देतों देत आहे) त्याचप्रमाणें एच्या ठिकाणींही य असा उच्चार आलेला त्यांच्या बोलींत आढळतो उदा० यक्का, येक यचा हि सुद्धा अशा अर्थी शिष्ट भाषेंत उपयोग केलेला आढळतो उदा०-'तेंव्हाय मीच होतों आताय मीच आहे ' अधिक महिनाय आला आहे ' -सागोप्र ३ १

**यआ**—याचें सामान्यरूप (महानु) या यआशी कुळ ना ज्ञाती। रूपु ना सपत्ती। -शिशु २१०

**यऊल**—पु (कु) तरस

**यक**—वि एक -आदिलशाहि फर्मानें [फा यक्] **यक्मु खनीपणा**-पु एकवचनीपणा 'यक्मुखनीपणाची नक्की व खुबी सर्व टोपीकरास जाहिरीस यई तें करणें वाजीब व लाजीम आहे -रा १०२८० [फा यक्मुखुन्]

**य कश्चन, य कश्चित**—वि सामान्य, क्षुद्र वरच्या दर्ज्याचा नसलेला कोणीहि कोणीएक [स य+क+चन, चित्]

**य(ये)कीन**—पु खात्री, सत्य निष्ठा निश्चय विश्वास -क्रिवि खचित निश्चित पूर्णपणें, खात्रीनें आम्ही हरामखोर असें खचित यकीन जालें असल्यास आम्हास परिछिन्न गोश्माली करावी ' -ऐस्फुले ४९ [अर यकीन्]

**यकृत्**—पुन १ पित्ताशय, (इ) लिव्हर २ उजव्या कुशींत असणारें पित्ताशय, यकृत् वाढलें किंवा सुजलें असता होणारा रोग जरडी [स] ०**पक्वपिंड**-पु पृष्ठवंशीय प्राण्याचा यकृत् आणि पक्वपिंड मिळून होणारा सयुक्त पिंड -ज्ञाको (क) १६४

**यकृष**—पु घोड्याच्या तोंडावरील भोंवरा हा जबड्यावर असेल तर चागला, खालीं असेल तर वाईट -अश्वप १ १०२

**यखतियार्, यखितयार्, यख्त्यारी**—अख्त्यार इ०पहा

**यगानगत**—स्त्री ऐक्य सख्य, मैत्री, विश्वास 'बाळाजी राव यांनीं आम्हास यगानगतीचे मार्गे जें सागून पाठविलें ती दोस्ती त्याच पाठीमार्गें आम्हीं अदा केली ' -रा ५ ८६ [फा यगानगत्]

**यच्चयावत, यच्चावत**—अ सर्व झाडून सगळें, असणारें सर्व, एकहि न वगळतां [स यत्+च+यावत्]

**यजन**—न १ यज्ञ होमहवन (स्वत करिता व स्वत केलेलें,'याजन याच्या विरुद्ध अर्थ) २ एखाद्या हविर्द्रव्याचें हवन [स यज्=यज्ञ करणें] **यजणें** सक्रि होमहवन करणें, यज्ञ करणें, पूजणें 'जे इष्टयज्ञ यजावे। तें हविर्मंत्रादि आघवें।' -ज्ञा ४ १२० **यजिजणें**-सक्रि पुजिलें जाणें 'जे जैसें देव यांतीं यजि जती। तैसीं तैसीं त्या फळें देव देती।' -एभा २ ६५ **यजित सातें**-पुअव यज्ञ करीत होत्साते यज्ञ करणारे 'परी तें असो येंग उचितें। ज्ञानयज्ञें यजितसते। उपासिती मातें। ते सांगितलें।' -ज्ञा ९ २६२ **यजिता यज्ता**-वि यज्ञ करणारा, यजनकर्ता जय यजितयाचा काम पुरे। यज्ञीचें विधान सरे। मागुतें जयूनि वोसरे। क्रियाजात।' -ज्ञा ४ १५०

**यजमान**—पु १ यज्ञकर्म करणारा स्वर्गादि फल प्राप्त व्हावें म्हणून याग करणारा यज्ञाचा खर्च इ० चालविणारा मुख्य मनुष्य २ (ल) धनी, मालक कुटुबाचा मुख्य एखाद्या उपाध्यायाचा आश्रयदाता ३ (बायकी भाषेंत) नवरा, पति ४ वेश्येचा धनि उपपति ५ (गो) गोमतकातील देवस्थानचा (गोवा हद्दीच्या बाहेरील) कुळावी [स यज्=यज्ञ करणें देवपूजा करणें] म्ह० यजमानाचा होतो पाहुणचार पण पाहुणा होतो यडगार ०**कृत्य**—न १ जोशी किंवा उपाध्यायानें यजमानाच्या घरीं करावयाचें धर्मकृत्य २ धर्मकृत्याबद्दल जोशाला यजमानाकडून मिळणारा पैसा **यजमानी**-पु (कु) लग्नादि समारभातील मुख्य मनुष्य **यजमानीण**-न **यजमानिनी यजमानपत्नी**-स्त्री यजमानाची स्त्री; मालकीण; धनीण

**यजित**—वि महाग 'असें असता मी अभाच्छादनास यजित।'

हाको ६ २१

**यजित, यजितजाणें, यजितपत्र, यजीत**—अजित पहा [ 'अजित' चेंभ्रष्ट रूप ] ग्रहण **यजितखत**-न अजितपत्र, इरल्याबद्दलचा लेख

**यजीत(द्)खत**-न सोडचिठ्ठी [ फा आझाद्-मुक्त ]

**यजुर्वेद, यजु**—पु चार वेदांपैकीं दुसरा वेद यांत यज्ञ करण्याबद्दल विशेष माहिती आहे [ सं ] **यजुर्वेदी**-पु यजुर्वेद शाखेचा ब्राह्मण, यजुर्वेदाचें अध्ययन करणारा ब्राह्मण **यजुशाखी**-पु यजुर्वेदी, यजुर्वेदशाखीय [ यजु +शाखा] **यजू**-पु यजुर्वेदी, माध्यंदिन, यजुर्वेदशाखीय [ स यजु ]

**यटक**—न. ( कों ) बैलगाडीचें जू बांधण्या चा दोर, जोख गाला बांधलेला नाडा

**यटक**—स्त्रीन खुबी, मर्म, युक्ति

**यडकतणें**—सक्रि (माण )त्रास होणें, अडचणींत येणें [यटक]

**यडताक**—न घोटाळा, अडचण.

**यडताकणें**—क्रि हेलपाटे घालणें [ का ]

**यडु**—न मस्ती, खोडसाळपणा [ का ]

**यंता**—वि नियमन करणारा, दाब ठेवणारा, सूत्रधार [ स यन्तृ ]

**यति**—पु १ पद्याच्या चरणातील थांबण्याची जागा, अक्षरावें अवसान, विसावा; दम 'मालिनी वृत्तात आठव्या अक्षरावर यति येतो ' २ (संगीत ) लयीचा गतिनियम हे पाच आहेत समा स्रोतोगता, मृदंगा, पिपीलिका व गोपुच्छा [ स ] **०भंग**-पु वृत्तांत जो यति यावयाचा तो पदार्ती न येतां पदार्धावरच आल्यास होणारा दोष उदा० 'पुढें माझा नारायण तरुण तो पुत्र तिसरा।' या ओळींत नारा या अर्धपदावरच यति येतो या ठिकाणीं एखादें पूर्ण पद असावयास पाहिजे होतें म्हणून ह्या यतिभंग दोष जाणावा [ स यम् ]

**यति-ती**—पु १ संन्यासी, मनोविकारास ताब्यात ठेवणारा २ भिक्षु (जैन भिक्षु) [ स यति यम्=नियमन करणें ]

**यती**—पु १ प्रयत्न करणारा, मोक्षाकरितां प्रयत्न करणारा संन्यासी २ यज्ञ करणारा —ह्वको [ स यतिन्, यत्=प्रयत्नकरणें ]

**यत्किंचित्**—क्रिवि थोडा सुद्धां, थोड्या प्रमाणांत थोडेसें [ स यत्+किम्+चित् ] **०(यत्किंचित न ठेवता) सगळा-सारा-सर्व-समस्त-अवघा-अख्खा**-सर्व, मुळींच शिल्लक न ठेवतां

**यत्न**—पु प्रयत्न, उद्योग खटपट परिश्रम [ स यत्=मेहनत करणें ] **०त** -क्रिवि प्रयत्नानें, खटाटोपानें, उद्योगानें **०वाद**-पु प्रयत्नावर सुखदुःख, उत्कर्षापकर्ष इ० गोष्टी अवलंबून आहेत, दैवावर नाहींत असें मानण्याचा सिद्धांत प्रयत्नवाद याच्या उलट सिद्धांत दैववाद अथवा प्रारब्धवाद **०वादी**-पु यत्नवादाचें समर्थन करणारा; प्रयत्नवाद मानणारा **०वान्**, **यत्नी**-वि खटपटी, उद्योगशील, प्रयत्न करणारा, उद्योगी **०सिद्ध**-वि यत्नानें साधलेला, प्रयत्नानें प्राप्त झालेला सिद्ध पहा

**यत्र**—अ जेथें. [ स ] **०कुत्रचित्-कुत्रापि**-क्रिवि कोठें तरी, कोणच्या तरी एखाद्या ठिकाणीं **यत्रयत्र**-क्रिवि जेथें जेथें, ज्याज्या ठिकाणीं

**यंत्र**—न १ साधन, हत्यार, कोणतेंहि एखादें काम सुलभतेनें, जलदीनें किंवा कमी प्रयासानें होण्यासाठीं तयार केलेलें युक्ता युक्तीचें उपकरण कळ, युक्ति २ बंदूक, तोफ, कोणतेंहि अशा रीतीचें संहारसाधन 'नातरी संहारत्रिपुरारीचीं यंत्रें।'-ज्ञा ११ ३४३ ३ रहाट रहाटगाडगें 'वाया यंत्रारूढ जीवसृष्टी। भ्रमतुसे।' —ऋ १३० ४ देवतेच्या पूजेला लागणारी एक गूढ रेखात्मक आकृति इच्छा पूर्ण होण्यासाठीं कागदावर वात्स्यायन कामसूत्र कर्त्या ऋषीनें सांगितल्याप्रमाणें काढावयाची आकृति, एखादी गूढ आकृति ही कागदावर काढून व ती ताइतांत घालून गळ्यांत बांधतात किंवा तिची पूजा करतात असें केल्यानें इच्छित फल मिळतें किंवा अनिष्ट टळतें अशी समजूत आहे उदा० स्वस्तिक कमल वगैरे यानीं पिशाच्चबाधा होत नाहीं 'मंत्रयंत्र कांहीं करिसी कुंचुटी। तेणें भूतसृष्टी पावशील।'—तुगा ५ आदृ ६ प्राणायाम ७ कळाशी ८ वाद्य [ स यन्त्=बांधणें, नियमांत आणणें ] **एखाद्या भोंवतीं-वरोबर-शीं यंत्र किंवा यंत्रमंत्र लावणें-मांडणें-चालविणें-करणें**-एकाद्याच्या विरुद्ध व्यूह रचणें; एखाद्याच्या विरुद्ध कट रचणें, जतरमतर करणें **०गोळ**-पु तोफेचा गोळा 'उल्हाट यंत्राचे मार। दुर्गावरूनि होती अपार। परसैन्याचे यंत्रगोळ समग्र। दुर्गपरिघामाजी पडती।'—ह २२ ८९ **०धारी**-पु हत्यारबंद शिपाई 'काय तुझें नाव पुसती यंत्रधारी। तो म्हणे वेगारी विठा वीं जी।'—तुगा ४४३६ **०शास्त्र**-न यंत्रासंबधीं ज्यांत विवेचन केलेलें असतें असें शास्त्र, पदार्थाच्या स्थिरावस्थेचें व गमनावस्थेचें विवेचन करणारें शास्त्र याचे दोन विभाग आहेत—१ स्थितिशास्त्र २ गतिशास्त्र ( इं ) एंजिनिअरिंग **यंत्रित**-वि नियंत्रण केलेला, नियमित बांधलेला ताब्यांत ठेवलेला **यंत्री**-वि यंत्र चालविणारा 'देह हें ईश्वर निर्मित यंत्र आहे यंत्री चालवील तसें तें चालेल।'—वि यंत्रा च्या सहाय्यानें बनविलेलें **यांत्रिक**-वि १ यंत्रासबंधीं २ केवळ यंत्रयोगें झालेलें

**यत्शब्द**—पु संस्कृत व्याकरणांतील एक सर्व संबंध वाचक शब्द [ स यत्+शब्द ]

**यथा**— अ १ जसा-शी-सें; ज्या प्रमाणें 'यथा राजा तथा प्रजा' २ या शब्दाचा पुष्कळ संस्कृत शब्दांशीं समास होतो तेथें याचा अर्थ त्या त्या प्रमाणें, त्याचें उल्लंघन न करितां

असा प्राय होतो व तो शब्द क्रियाविशेषण होतो अशा तऱ्हेचे काहीं सामासिक शब्द पुढीलप्रमाणें [ स ] ०कथंचित्–अ १ कसा तरी, काहीं झालें तरी, चांगल्यावाईट किंवा योग्य अयोग्य मार्गानें 'त्यानें दिवसभर खपून लिहिलें तर यथाकथंचित् दोनशें ग्रंथ लिहील' २ यथाकदाचित् यदाकदाचित्, कदाचित् कदाचित्, जर शक्य झालेंच तर, शेंकडा एक शक्यतेनें, जगदीं पराकाष्ठेनें 'एखादा उद्योग उभा राहणें दुर्घटच, पण यथाकथंचित् तो राहिलाच तरी त्यास साहाय्य मिळण्यासारखें नाहीं'–नि १११ ०कथा–क्रिवि १ योग्य रीतीनें, जसें पाहिजे त्याप्रमाणें, म्हटल्या–सांगितल्या बरहुकूम २ ( विरू ) फार झालें तर, कदाचित्, चुकून ०काम–क्रिवि इच्छेप्रमाणें, मनाजोगें ०कामी–कामिनी–पुस्त्री वि आपल्या इच्छेनुरूप वागणारा–री, स्वेच्छाचारी, आपल्या मनाप्रमाणें करणारा–री ०काल–लीं–ळीं–क्रिवि योग्यवेळीं, नियमित काळीं, हंगाम साधून 'पेरणी यथाकालीं झाली म्हणजे पीक चांगलें येतें' ०क्रम–क्रमें–क्रमानें–क्रिवि १ क्रमानुसार, क्रमवार, क्रमानुरूप, अनुक्रमानें, ठरलेला क्रम न सोडता, ओळीनें २ शिस्तींत, नियमानें, नियम किंवा रीत यांना न सोडता ०गम–क्रिवि शास्त्रानुसार, यथाशास्त्र, शास्त्रोक्त शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें 'ऐसें कर्म भेदें मुदलें। फळसुखही निधा आलें। तें हें यथागमें केलें। गोचर तुज।'–ज्ञा १८.८१० [ यथा+आगम ] ०जात–वि १ जन्म त्याप्रमाणें, जसा जन्मला तसा २ मूर्ख, खुळा, बेडपट इ० सूचित अर्थी ३ स्वभावत, निसर्गसिद्ध स्वाभाविक ०तथा–अ कसा तरी, कष्टानें, जेमतेम 'संसार यथातथा चालला' ०तथ्य–क्रिवि जसें असल तसें, खरें खरपणानें ०तृप्त–तृप्ति–क्रिवि भरपूर, मनसोक्त, पाहिजे तितकें यथाशक्ति क्त्या यथानुशक्ति–क्त्या–क्रिवि शक्तीप्रमाणें, सामर्थ्यानुरूप, एखाद्याच्या कर्तृत्वाप्रमाणें [ यथा+अनु+शक्ति ] ०निगुती–क्रिवि यथार्थत्वानें; यथार्थपणें, योग्य रीतीप्रमाणें, यथायोग्य स्पष्ट 'ऐक बापा परीक्षिती। तू तव सुखाची सुखमूर्ती। भीमकी पाणिग्रहणस्थिती। यथानिगुती सांगेन।'–एरुस्व १९ यथानुक्रम–में यथानुक्रमानें–क्रिवि यथाक्रम पहा ०न्याय–क्रिवि न्यायास नीतीस धरून न्याय्य रीतीनें योग्यपणें ०पद्धति–त–क्रिवि रीतसर, पद्धतीप्रमाणें वहिवाटीला अनुसरून [ स ] ०पूर्व–क्रिवि पूर्वीप्रमाणें, पहिल्यासारखें पूर्ववत् 'कुपथ्य होताच दुखणें पुन्हा यथापूर्व झालें' [ स ] ०प्रति–त–क्रिवि मूळ प्रतीप्रमाणें [ स ] ०बुद्धि–मति–क्रिवि आपल्या बुद्धीप्रमाणें आपल्या बुद्धीच्या कुवतीप्रमाणें आपल्या ज्ञानाप्रमाणें यथाभिमत–क्रिवि इच्छेप्रमाणें, कल्पनेप्रमाणें आपल्या योजनेस अनुसरून [ यथा+अभिमत ] ०मार्ग–क्रिवि योग्य मार्गानें, नीतिनियमास धरून, खऱ्या मार्गानें, योग्य प्रकारें ०यथा–क्रिवि १ जसजसा, जसा जसा तथातथा शब्दाबरोबर प्रयोग 'यथायथा चंद्रादिक ग्रह यतात तथातथा जप करावा' २ कसेंतरी, सरासरी, जितक्यास तितकें, बेताबाताचें, अल्प 'त्याचें गणित ज्ञान म्हणजे यथायथाच आहे' ०युक्त, ०योग्य–क्रिवि जसें असावें तसें, योग्य तऱ्हेनें, बरोबर रीतीनें, रास्त ०रीति–रीत–क्रिवि रीतीप्रमाणें, रूढीनुसार, प्रचाराप्रमाणें, वहिवाटीस अनुसरून [ स यथा+रीति ] ०रुचि–क्रिवि आवडीप्रमाणें, इच्छेप्रमाणें, मनाप्रमाणें 'दिधलें भोजन यथारुचि।'–एरुस्व ३ २५ यथार्थ–क्रिवि १ बरोबर, खरें, जसें घडलें त्याप्रमाणें, वास्तविक योग्य रीतीनें 'किंबहुना प्रियपणें। कोणानेंही झकवूं नेणें। यथार्थ तरी खुपणें। नाहीं कवणा।'–ज्ञा १६ १२० २ अन्वर्थ; नावाप्रमाणें शब्दाप्रमाणें उदा० भूपाल, जलधि, आतपत्र हे शब्द यथार्थ होत, कारण प्रत्येक शब्दावरून आपणास त्या शब्दवाचक वस्तूचें वर्णन किंवा माहिती कळते [ यथा+अर्थ ] यथार्थबुद्धि–स्त्री नि पक्षपाती बुद्धि, मनाची समता –नि ५८२ यथार्ह–क्रिवि योग्यतेप्रमाणें, शोभेसें [ यथा+अर्ह ] ०लाभ–क्रिवि मिळकतीप्रमाणें, फायद्याप्रमाणें, उत्पन्नाप्रमाणें यथावकाश, यथावकाशें–क्रिवि सवडीप्रमाणें, फुरसतीनें [ यथा+अवकाश ] यथावत–क्रिवि यथायोग्य, जसें आहे तसें 'तसें समस्तही श्रुतिजात। ठाके लाजलें ऐसें निवांत। तें मीचि वरी यथावत। प्रकटोनियां।'–ज्ञा १५ ४३५ [ स यथावत् ] यथावसर–क्रिवि प्रसंगानुसार, वेळ सांपडेल त्याप्रमाणें [ यथा+अवसर ] ०विधि–क्रिवि नियमानुसार, शास्त्रांतील विधींत सांगितल्याप्रमाणें, विधीचें उल्लंघन न करिता ०विभव–क्रिवि ऐपतीप्रमाणें; सामर्थ्यानुरूप, मिळकतीला धरून ०विभाग–क्रिवि विभागाप्रमाणें वांटणीप्रमाणें, हिश्शाप्रमाणें ०वृत्त–क्रिवि घडल्याप्रमाणें, जसें झालें तसें खरपणानें ०शक्ति–क्रिवि आपल्या शक्तीप्रमाणें, ऐपतीनुसार, कर्तृत्वानुसार यथांशत –क्रिवि वांटणीप्रमाणें, योग्य प्रमाणानें निरनिराळ्या हिश्शाप्रमानें, हिशोबानें [ यथा+अंशत ] ०शास्त्र–क्रिवि शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें, शास्त्रमर्यादा न उल्लंघिता ०श्रुत–क्रिवि १ ऐकल्याप्रमाणें, ऐकलेल्या गोष्टीवरहुकूम २ जसें शिकला त्याप्रमाणें, आपली बुद्धि न चालविता फक्त गुरूनें पढविल्याप्रमाणें ३ काव्याचा अर्थ लावताना फक्त पदाचा अर्थ दिसतो त्याप्रमाणें, यौगिक अर्थानें, व्यंगार्थ लक्षांत न घेता'–ममावो ०संख्य–क्रिवि संख्येप्रमाणें, यथानुक्रम, क्रमानें [ यथा+संख्या ] ०संप्रदाय–क्रिवि संप्रदायानुरूप, सामान्य रीतीप्रमाणें पद्धतीप्रमाणें ०संभव–क्रिवि १ शक्यतेप्रमाणें, अदाजाप्रमाणें २ ऐपतीप्रमाणें साधनानुकूलतेप्रमाणें ०साग–क्रिवि पूर्णपणें, काहीं न्यून न ठेवतां, कोणतीहि गोष्ट

कर्मी न करतां, अंगोपांगासहित शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें. ' येथा सांग रे कर्म तेंही घडेना । घडे धर्म तें पुण्य गांठीं पडेना । ' -राम १०० [ यथा+स+अंग ] ०सामर्थ्य-क्रिवि शक्तीप्रमाणें, यथा शक्ति, वर्तवणारीला साजेसें, ऐपतीप्रमाणें ०सुख-क्रिवि समा धानानें, शांततेनें ०सूत्र-क्रिवि सूत्राप्रमाणें, ततोतत त्याप्रमाणें, अगदीं बरोबर तसें ०स्थानीं-क्रिवि योग्य स्थळीं, योग्य ठिकाणीं, उचित जागेवर [ यथा+स्थान ] ०स्थित-क्रिवि १ कालानुरूप, परिस्थितीप्रमाणें २ भरपूर, यथेच्छ, रगड, पुरेपूर, पूर्णपणें, जितकें पाहिजे असेल तितकें ' आज भोजन यथास्थित मिळालें ' ३ जसें होतें तसें, यथायोग्य ' पोथी नीट यथास्थित बांधून ठेव, नाहींतर भिजेल ' ४ पूर्वकुशलावस्था न पालटतां, पूर्वीप्रमाणें ' आजपर्यंत इकडील वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें ' ०ज्ञान ज्ञानि-क्रिवि. यथामति, ज्ञानाप्रमाणें, एखाद्याच्या समजुतीप्रमाणें [ स यथा+ज्ञान ]

यथेच्छ, यथेच्छा, यथेष्ट-क्रिवि १ भरपूर विपुल, इच्छेला येईल तसें, तितकें, इच्छेप्रमाणें ' यथेष्ट पुरतें जरी प्रथम दाम का साधिनी । ' -केका ८७ २ स्वैर मन मानेल तसें, अनिर्बंधपणें, अनिर्बंध [ यथा+इच्छा, यथा+इष्ट ] यथेष्टाचार-पु मनसोक्त वर्तन, स्वैराचार, अनिर्बंधता, बेछुट वागणूक [ यथा+इष्ट+आचार ] यथेष्टाचारी-वि स्वैराचारी, मन मानेल तिकडे भटकणारा, वाटेल तसें वागणारा यथेप्सित-क्रिवि १ इच्छेप्रमाणें, इच्छिल्या प्रमाणें २ स्वैरपणें, स्वतंत्रपणें, आपल्या कल्पनेप्रमाणें, वाटेल तसें [ यथा+ईप्सित ] यथोक्त, यथोदित-क्रिवि म्हटल्याप्रमाणें, बोलल्याप्रमाणें, वर्णन केल्याप्रमाणें, दाखवून दिल्याप्रमाणें, आज्ञा केल्याप्रमाणें [ यथा+उक्त, उदित ] यथोचित-क्रिवि योग्य दिसेल तसें, लायकीप्रमाणें, अनुरूप [ यथा+उचित ] यथोपपन्न-क्रिवि शक्तीप्रमाणें एपतीप्रमाणें, प्राप्तीप्रमाणें ' यथोपपन्न खर्च-दान-भोग-वर्तन-वैभव-खाणें-पिणें ' इ० [ यथा+उपपन्न ]

यद्-सना जो, जी, जें, हें संस्कृतमध्यें संबंधीसर्वनाम आहे परंतु मराठींत याचा उपयोग फक्त समासांतच आढळतो उदा० यत्कथा=जी गोष्ट, त्याची गोष्ट यदंश=ज्याचा अंश यत्कृत= ज्यानें केलेलें यच्चित्त, यन्नाम इ० [ स ] यदर्थ-क्रिवि ज्या कारणाकरितां, ज्या हेतूनें [ यद्+अर्थ ] यदर्थी-क्रिवि हा शब्द यदर्थ याचें अनागर रूप असून एतदर्थ ऐवजीं चुकीनें वापरला जातो, या कारणास्तव, या कारणाकरितां यदीय-वि ज्याचा, ज्यासंबंधी

यदगुदी-स्त्री (कर) गडबड, धांदल (विशेषत बाय काच्या मार्गेत रूढ)

यंदाच, येदोच-वि (गो) एवढाच ' येदोच दिता '

यंदा यंदाच्या वर्षीं-क्रिवि यावर्षी, चालू सालीं [फा आयदा]

यदाकदाचित, यदि-शअ जर करता, जर कदाचित [स यदा+कदा+चित्]

यदूळ-क्रिवि हावळपर्यंत, इतक्यावेळ, व हूळ [ स इयत्+ वेला एवढा+वेळ ]

यदृच्छा-स्त्री १ योगायोग, आपोआप समत्र, सहज गति, परमेश्वराची इच्छा, ईश्वरेच्छा ' दु ख जर्में प्रयत्न न करता यदृच्छे करूनच होतें तसें सुखहि यदृच्छेकरूनच होईल ' २ स्वच्छंदी पणा, स्वैरपणा [ स ] ०लाभ-पु अनायासें किंवा आकस्मिक रीतीनें घडलेला लाभ प्रयत्नाशिवाय झालेला फायदा ०लाभ संतुष्ट-वि आपोआप मिळेल त्यावर जगणारा यदृच्छया-क्रिवि सहज, प्रयत्नाशिवाय ' याचेविण यथाकाळें । यदृच्छया जें जें मिळे । तें तें सेवी सकळ मंगळ । गुरुवाक्यमळें स्वानंदें । ' -एभा ३ ५०० [ यदृच्छा शब्दाचें तृतीयेचें एव रूप ]

यंदो-पु (गो) चूल कोरलेला दगड

यद्यपि, यद्यपिचेत्-उभ जरी [ स यदि+अपि ] म्ह० ' यद्यपि शुद्ध लोकविरुद्ध नाचरणीय नाचरणीय. ' एखादी गोष्ट जरी योग्य असली तरी ती लोकरूढीच्या उलट असल्यास करूं नये व आदरूं नये

यद्वा-क्रिवि अथवा, अगर, किंवा [ स यद्+वा ]

यद्वा-क्रिवि (कु) एव्हां, ह्या सुमारास [ स अथवा ]

यनमेनसरती-(बाप्र) एक मुलींचा खेळ -मराठीखेळ पृ १९२

य.पलाय-(बाप्र) पळून जाणें, धूम ठोकणें, पाय काढणें (क्रि० करणें, म्हणणें) [ य पलायति स जीवति । या संस्कृत म्हणी वरून ]

यबड-वि मठ्ठ, मंद, गबाळ्या [ का ]

यबाव-पु हावभाव, अजागळपणा, चाळा (शेतकऱ्यांत रूढ) [ स हावभाव ]

यब्धा-पु स्त्रीसंग करणारा [ स ] म्ह० अज्ञाणीं यब्धा योनीचा नाश

यम-पु १ प्राण्याला त्याच्या मरणानंतर पापपुण्याचा निवाडा करून त्याप्रमाणें नरकाला किंवा स्वर्गाला पाठविणारी देवता (ही सामान्यत पाप्यांना शिक्षा करणारी देवता असेंच मानण्यांत येतें), कृतांत, काळ, यमधर्म २ (ल) कर्दन काळ, निर्घृण मनुष्य भयंकर दिसणारा मनुष्य [ स ] (बाप्र) यमाच्या दाढेंत असणें-पडणें-सांपडणें-जाणें-१ मृत्यु मुखांत असणें-पडणें-सांपडणें २ (ल) मोठ्या संकटांत असणें, पडणें, सांपडणें, अतिशय हाल करणाराच्या तावडींत सांपडणें यमाच्या दाढेंत घालणें-टाकणें-मृत्युमुखांत टाकणें, मोठ्या संकटांत घालणें, अति क्रूर मनुष्याच्या आहारीं टाकलें जाणें.

सामाशब्द– •कुंड–कांड–पु (गो) १ नरककुड, पाप्याना शासन करण्याकरिता त्याना कोंडून ठेवण्याचें यमाचें कुड. २ (ल) तुरुग, कैदखाना [स यमकुड] •गंड–पु मृत्युकाळ, मरणकाळ, गडातर, मृत्युयोग त्याच दिनीं यमगड समजुनी। निमग्न झाला पार्थिव पूजनीं।'–कीर्तन १६० •जाच–जाचणी–पुस्त्री यमानें दिलेली शिक्षा, यमानें भोगावयास लावलेलें दुःख •झाडी–स्त्री सकट 'सापडलासी यमझाडी।'–नामना १९ •तर्पण–न यमाच्या नावानें करावयाचें तर्पण हें यमद्वितीयेला करितात •तुल्य–वि. १ यमासारखा, क्रूर; भयानक, अतिशय भयकर. २ विरूप, तिरस्कृत, किळसवाणा •दड–पु पाप्याना यमाकडून करण्यात येणारी शिक्षा •दंष्ट्रा, दाढ–स्त्री १ यमाचें मुख, काळमुख, मृत्युमुख २ आश्विन महिन्याचे शेवटचे आठ व कार्तिक महिन्याचे सर्व दिवस या अर्थी अनेकवचनीं उपयोग या काळात रोगराई आजार बराच असतो यावरून रूढ [स यमदंष्ट्रा] •दिशा–स्त्री दक्षिण दिशा, यमाचें वसतिस्थान ज्या दिशेकडे आहे ती दिशा •दूत–पु १ माणसाचे प्राण हरण करून नेणारा यमाचा नोकर २ (ल) निष्ठुर अत करणाचा नोकर, क्रूर शिपाई •द्वितीया–स्त्री कार्तिक शुद्ध द्वितीया, भाऊबीज •धर्म–पु यम •नंदन–पु यमाचा मुलगा, धर्मराजा, युधिष्ठिर [स नदन=पुत्र, मुलगा] •पाश–पु मनुष्याचे प्राण काढून नेण्या साठीं यम टाकतो तो पाश, मृत्यूचा फास मृत्यूची छाया 'यमपाश गळ्याशीं ज्यास लागला त्यास'–शारदा •पुरी–स्त्री १ यमाची राजधानी, पापी लोकाना शासन करण्याची जागा, यातनाचें आगर २ तुरुग ३ यमपुरींतील यातना दाखवि णारा कळसूत्री बाहुल्याचा खेळ [स यम+पुरी] यमपुरीं–स जाणें–क्रि मरणें 'धर्मात्मजार्थ सेनाबिंदु कुरुश्रेष्ठ यमपुरा गला।' –मोकर्ण ४ २१ यमपुरीस पाठविणें–१ अतिशय मारणें, बेदम चोप देणें २ ठार मारणें यमपुरीची यातना, यम पुरीचा दंड, यमपुरीचें दुःख–मोठ्या आजाराचें दुःख, घोर शिक्षा, बेदम मार इ० •बाधा–स्त्री यमानें दिलेली शिक्षा, यम दड, यमयातना 'न भुले वाट न पडे छदीं। त्यास नव्हे कधीं यमबाधा।' •भट–पु (विनोदानें) यमाचे दूत •यातना–स्त्री १ यमाकडून पापीजनास करण्यात येणार क्लेश 'विषयाचें सुख येथें बहु लागे गोड। पुढें आहे अवघड यमयातना।'–नागा २ विपरीत परिस्थितींतील भयकर हाल; अतिदुःख, क्लेश [स यम+यातना] •रूप रूपी–स्वरूप–पी–वि काळरूपी, यमा सारखा भयकर, उग्र, मृत्युसारखा •लोक–पु यमाचें वसती स्थान ज्या ठिकाणीं मरणोत्तर प्राण्याना शिक्षा केली जाते तें स्थान •लोकची वाट धरणें–१ मरणोन्मुख होणें २ मरणें •शिक्षा–स्त्री यमदड, यमजाचणी •सदन–न यमाचें घर, यमलोक, मरणोत्तर शिक्षा भोगण्याचें ठिकाण [स यम+सदन] यमसदनाला पाठविणें–ठार मारणें यमाचा पाहुणा–पु (मरणानतर खात्रीनें यमाच्या घरीं पाहुणा म्हणून जाणारा इसम, नरकात जाणारा) महापापी मनुष्य यमाजीपंत, यमाजीभा स्कर, यमाजीबाबाजी–पु यम, मृत्यु यमाजीपंताचें–यमाचें बो(बु)लावणें–न १ मृत्यु, मरण २ (ल) अतिदुष्ट मनु ष्याचें बोलावणें, अतिकडक मनुष्याकडून किंवा कर्दनकाळाकडून आलेलें बोलावणें, अति नावडणारें परतु विरोध करता न येणारें–न चुकवता येणारें बोलावणें, काम

यम—पु १ नियमन, ताब्यात ठेवणें, इंद्रियदमन, राग, विकार, इंद्रियें याचें दमन, आत्मसयमन २ अष्टाग योगातील पहिलें अंग तीं आठ अगें येणेंप्रमाणें –यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि यम या अगातील पाच प्रकार, भाग याबद्दल सामान्यत योजतात ते पाच प्रकार याप्रमाणें–अहिंसा, सत्य, अस्तेय ब्रह्मचर्य व अपरिग्रह [स दे प्रा जम, स यम्=ताब्यात ठेवणें] •नियम–पुअव १ आत्मसयमनासाठीं करावयाचीं कृत्यें, नियोजित व ऐच्छिक व्रतें, अष्टाग योगातील पहिलीं दोन अगें नियमाचे पाच अवयव याप्रमाणें –शौच, सतोष, तप, स्वाध्याय, ईश्वरप्रणिधान 'यम नियम दोघे द्वारपाळ। अखडित सावध अविकळ। अतर्बाह्य वृत्ति करूनि निश्चळ। दोघे दोहीं बाहीं। उभे।'–स्वादि १० २ ७८ २ आत्मसयमनाचे नियम यमाचे नियम •नियमसाधनी–वि इंद्रियें, राग, विकार इ० ताब्यात ठेवणारा, आत्मसयमी व व्रत वैकल्यें यथायोग्य करणारा, योगी यमणें–सक्रि (काव्य) नियमन करणें 'यमु म्हणे काय यमावें। दमु म्हणे कवणातें दमावें।' –ज्ञा ९ १९९ यमन–न दमन, ताब्यात ठेवणें, निग्रह, सयमन [स] यमी–वि १ यमनियम किंवा यम साध णारा, सयमी, इंद्रियनिग्रही, योगी २ ताब्यात ठेवणारा, नियमन करणारा, आवरून धरणारा

यम, यमल—न जुळेभाऊ; जोड 'वल्लीं करिति रजादीं रिपोनि स्वस्वरूपहानि यम।'–मोसभा ३ –वि जुळा; जावळा, जोडींपैकीं एक [स]

यमक—न एक शब्दालकार कवितेच्या एका चरणात किंवा चरणार्धात जीं अक्षरें ज्या क्रमानें सनिध असतील त्याच क्रमानें दुसऱ्या चरणात किंवा चरणार्धात त्याची आवृत्ति झाली म्हणजे हा अलकार साधतो याचे अनेक भेद आहेत उदा० वर्ण–पद–लिंग–प्रकृति–प्रत्यय–भाषा–पदावयव यमक या अल कारातील प्रत्येक ओळींतील अक्षराचा अर्थ प्राय निराळा असतो उदा० जो धैर्यें धरसा सहस्र करसा, तेजें तमा दूरसा। जो रत्नाकरसा गभीर सुरसा भूपा यशोहारसा।'–र [स]

'हरिकीर्तनासीं नर हो तुम्ही जागा ' अशा चार ओळी यमकाला यमक-१ जशास तसें, सोडीस तोड (क्रि० मिळवणें, साधणें, लावणें, बसवणें, मिळणें, लागणें, बसणें ) २ होस हो, प्रत्येक गोष्टीला होकार देणें, अनुमति देणें, हांयबा करणें

**यमघंट**—पु (ज्योतिष) एक योग रविवारीं मघा, सोमवारीं विशाखा, मंगळवारीं आर्द्रा, बुधवारीं मूळ, गुरुवारीं कृत्तिका, शुक्रवारीं अनुराधा, शनिवारीं हस्त याप्रमाणें त्यात्या वारीं तीं तीं नक्षत्रें आलीं असता यमघण्योग समजावा —ज्योतिषसार पृ २२

**यमन**—न नियमन, निग्रह, ताब्यात ठेवणें [ स ]

**यमन**—पु (संगीत) एक राग हा कल्याण रागाचा एक प्रकार आहे म्हणून त्याला यमनकल्याण असेंहि म्हणतात ह्या रागात षड्ज, तीव्र मध्यम, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद, हे स्वर लागतात जाति-संपूर्ण संपूर्ण, वादी गांधार, संवादी निषाद, गानसमय रात्रीचा पहिला प्रहर **यमन( नी )विलावल-र**-पु (संगीत) विलावल रागाचा एक प्रकार ह्यात षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, तीव्र मध्यम, पंचम तीव्र धैवत तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति संपूर्ण-संपूर्ण वादी षड्ज, संवादी पंचम गानसमय दिवसाचा पहिला प्रहर

**यमपुष्प**—न सुरवंट, सुसरूड, घुला, केसाळ किडा [ स ]

**यमुना**—स्त्री १ गंगेला मिळणाऱ्या एका मोठ्या नदीचें नांव २ यमाची बहीण [स ] **यमुनेचा खडा, यमुनी**-पुस्त्री यमुना नदींत सांपडणारा एक प्रकारचा काळा खडा हा अंगठींत बसवून त्यावर सोनेरी अक्षरें कोरतात

**यया**—सना (काव्य) यास, ह्याला ( या किंवा हा याचें चतुर्थीचें रूप) 'मैं ऐसें पाता यया एकु ही गुणु। आर्थीविना।' –शिशु ८६२

**यरकाल**—न ( व ) बैल गाडीची साटी व जू याना जोड णारा दांडा [ का यर-उचलणें,+काल-पाय ]

**यरंधर**—पु (कु) घरें धरून बसणारा

**यर्हि**—क्रिवि यदा, ज्यावेळीं तर्हि या शब्दाशीं संबंध राखून या शब्दाचा प्रयोग होतो अशाच अर्थाची दुसरी जोडी यदा तदा हे शब्द विशेषत शास्त्री, पंडित इ० ह्या वापरात दिसून येतात अशाच तऱ्हेचा दुसरा शब्द कर्हि-केव्हां, कदा [स ]

**यल्म**—स्त्री (गो ) सोडत, लॉटरी [ अर इल्म=विद्या ]

**यलम्मा**—स्त्री १ रेणुका, परशुरामाची आई २ यलम्मा देवीची जोगतीण [ का यल्लम्मा ]

**यव**—पु १ एक धान्य; सातू जव २ हाताच्या बोटावरचें यवाच्या आकाराचें चिन्ह ३ यवाच्या दाण्याची लांबी हें एक लांबीचें परिमाण सहा मोहऱ्याच्या दाण्याच्या लांबीबरोबर हें असतें [स ] ०क्षार-खार-पु (विक्र ) सातूच्या गवताच्या राखेपासून तयार केलेला क्षार, (३) नायट्रेट ऑफ पोटॅश [स यवक्षार] **यवोदक**-न (श्राद्धाच्या वेळीं लागणारें) सातूमिश्रित पाणी

**यवजणें**—सक्रि (कु ) आठवण करणें, योजणें [ स युज् ]

**यवन**—पु म्लेच्छ, आयोनिया देशातील मनुष्य, आर्य वंशीय नसलेला मनुष्य, हल्लीं सामान्यत मुसलमानास हा शब्द योजतात [स ] **यवनाचार्य**-पु १ मुसलमान शास्त्री, मुसल मानातील विद्वान् किंवा पंडित २ रमल शास्त्र हिंदूत फैलाविण्या करिता मुसलमान झालेला कोणी एक ब्राह्मण [ यवन+आचार्य ] **यवनानी**-स्त्री अरबी अगर फारशी अक्षरलिपि [सं ] **यवनी**-स्त्री यवन स्त्री, मुसलमान स्त्री —वि यवनासंबंधीं, यवनाचा

**यवनास**—पु अव १ श्रम, त्रास, दगदग, कष्टाळवाणें व मेहनतीचें काम २ त्रस्त अवस्था, अतिशय त्रासिक स्थिति [ वनवास वर्णव्यत्यास ]

**यवस**—न गवत, तृण, चारा 'यवस क्षत्रिय-कुलशत यत्परशुदवानळा, तयाराम ।'–मोवाल्मन्त्र रामायण १ ३५ [स ]

**यश**—न १ दैवाची अनुकूलता, चांगलें नशीब, सुदैव 'हा वीर आहे पण याला यश नाहीं म्हणून हा पराभूत होतो' २ जय, विजय, सुपरिणाम, सुफल 'याला बहुत वैद्यानीं औषधें दिलीं परंतु गोसाव्याचे हातास यश आलें' ३ आपल्या सत्कृत्याबद्दल इतराकडून मिळणारी वाहवा, उपकाराच्या जाणिवेचें अस्तित्व पाहून मिळणारा आनंद 'तुम्ही यांचें किती बरें करा, परंतु हा तुम्हास यश देणार नाहीं भांडून जाईल' ४ कीर्ति, प्रसिद्धी, [स यशस् ] ०**बुडविणें**-नाव, कीर्ति बुडविणें 'तों भीष्मयश इयानीं स्वैरग होऊनियां बुडविलें हो।'–मोभीष्म ९ ४ ०**लाभास येणें**-श्रमाचें सार्थक होऊं लागणें, चांगला मोबदला मिळू लागणें, मिळणें, आशा फलद्रुप होणें ( वाढविलेला मनुष्य किंवा प्राणी, चालविलेला उद्योग अगर अभ्यास याच्या विषयीं उपयोग ) **यशाचा केश**-कीर्तीचा-मानाचा अल्पांश, अत्यल्प मान, थोडेंसें यश (क्रि० मिळणें, सांपडणें) ०**अपयश**, **यशापयश**-न कीर्ति किंवा अपकीर्ति मानापमान स्तुति किंवा निंदा ०**वत**-वि विजयी, कीर्तिमान्, दैववान् **यशस्कर**-वि १ यश देणारें, कीर्तिकर, प्रसिद्धि करणारें २ स्तुत्य, माननीय, आदरणीय [स यशस्+कृ-करणें] **यशस्मान्**, **यशस्वान्**, **यशस्वी**-वि १ कीर्तिमान प्रसिद्ध, नावलौकिक मिळविलेला विजयी २ सुदैवी, नशिबवान्, भाग्यवत भगवान सुखी, भरभराटींत असलेला ३ यश देणारा, ज्याच्या अस्ति त्वानें किंवा सान्निध्यानें यश मिळतें अशी (वस्तु) शुभगुणी लाभदायक **यशोधन**-न यश हेंच धन, कीर्तिरूपी संपत्ति –वि कीर्ति हेंच ज्याचें धन आहे असा (मनुष्य)

**यष्टि, यष्टिका**—स्त्री काठी [स] **यष्टिमधु**-पु ज्येष्ठमध

**यसवार, यस्वार**—पु (कु) वेस्वार, मसाला (मिर्ची घातलेला) –मसाप ४ २८०

**यसा**—पुभव (निजाम स) कोळिष्टकें.

**यहतियात**—स्त्री काळजी, बदोबस्त 'तुम्ही आपले बचावाची यहतियात करीत जावी' –रा ५९१ [अर इहतियात्]

**यहसान**—न १ उपकार, कृपा २ सत्य ३ निष्ठा, विश्वास, एहसान [अर इह्सान्] ०**मंद**-कृतज्ञ [फा इहसान् मद]

**यहु(हु)दी**—पु पॅलेस्टाइन प्रातातील एका जातीचें नाव इस्रायल –पु या जातीचा मनुष्य, इस्रायल

**यळकोट**—न १ सातविष्ठ तट असलेली जागा २ खडो बाला ओंवाळताना उच्चारण्याचा शब्द, खडोबाचा जयजयकार येळकोट पहा [का येळकाटि=सात किल्ले]

**यळणें, यळवणें**—सकि पदार्थ शिजल्यानतर त्यातील पाणी काढन टाकणें, पेज काढून टाकणें, भात शिजल्यावर त्यातील पेज काढून तो मोकळा व फडफडीत करणें, वेळणें, वळवणें पहा **यळवणी**-स्त्री (मराठवाड रूढ) कटाची आवटी किंवा सावारें

**यळिल**—वि निष्फल –शर

**यक्ष**—पु एक देवयोनि, उपदेवता, कुबेराचा सेवक (हे यक्ष कुबेराच्या खजिन्यावर किंवा बागेवर नेमलेले असतात) [स यक्ष्=पूजा करणें] ०**कर्दम**-नपु सुगधी उटी, सुवासिक उटणें, कुकुम, अगरु कस्तूरी, कर्पूर आणि चदन अशा पचद्रव्याचें हें उटणें असतें 'यक्षकर्दम डवरिले सरिसे।' –भाए ४४३ ०**घन**-न पुरून ठेवलेलें द्रव्य, ठेवा, साठा, ज्याचा उपयोग न करता ज्याचें फक्त रक्षण करावयाचें असें धन 'तैसेंचि कृपणाचें यक्षधन। नाहीं दान धर्मरक्षण। त्यातें तस्कर नेती मारून।' –एभा ८ १४९ ०**धूप**-पु राळ सर्जरस ०**प**-पु कुबेर [यक्ष+प, पा=रक्षण करणें,] ०**वित्त**-न यक्षधन पहा उप भोग न घेता फक्त रक्षण केलेलें द्रव्य **यक्षिणी**-स्त्री यक्षाची स्त्री, यक्षस्त्री या मनतत्राच्या सहायानें मनुष्यास वश होऊन अलौकिक सामर्थ्य देतात **यक्षिणीची कांडी**-स्त्री यक्षिणीची मत्र सामर्थ्ययुक्त काठी, जादू, मत्रविद्या **यक्षिणीची कांडी फिरणें**-अकल्पित रीतीनें स्थिति पालटणें

**यक्ष्मा**—पु क्षयरोग [स]

**यज्ञ**—पु १ याग होम २ बलिदान एखादी वस्तु देव तेस अर्पण करण्याची क्रिया; त्याग ३ धर्मकृत्य, ईश्वरविषयक कर्म [स यज्=पूजा करणें] ०**कंकण**-न यज्ञाच्या वेळीं यजमानानें हातात बाधावयाचें कंकण 'तें यज्ञकंकण करा मुंजि रायरातें।' –स्वकुशाख्यान ०**कुंड**-न यज्ञाच्या वेळीं होमात आहुति टाकण्यासाठीं केलेली जागा, होमकुड, वेदी ०**दीक्षा**-स्त्री यज्ञ करण्याचें व्रत, हें व्रत घेताना काहीं तरी खूण व्रत घेतल्याचा दाखला म्हणून ध्यावयाची असते यावरून यज्ञदीक्षा म्हणजे ती खूण असाहि अर्थ होतो उदा० यज्ञकंकण ०**नारायण**-पु अग्निदेवता ०**पशु**-पु यज्ञात बळी देण्यास योग्य अगर बळी देण्याचा पशु ०**पुरुष**-पु. विष्णु, यज्ञदेवता 'तू यज्ञपुरुष नारायण।' –एरुस्व ३ ३१ ०**मुख**-पु अग्नि 'यज्ञमुखें काढीतसे खोडी। तो भिल्लिणीची दखोनी आवडी।' ०**याग**-पु यज्ञ, होम इ०. यज्ञ वगैरे [एकाच अर्थाचे दोन्ही शब्द] ०**वृक्ष**-पु यज्ञाला ज्याचें लाकूड उपयोगी पडतें असे वृक्ष हे–पिंपळ, पळस, औदुबर, रुई, शमी, खैर व आघाडा निघटुमध्यें वेहेकळ व नदीवड किंवा खुजावड यानाहि यज्ञवृक्ष म्हटलें आहे ०**शाला**-स्त्री यज्ञाची जागा, होमशाळा [स] ०**सूकर**-पु वराहावतार **यज्ञांग**-न १ यज्ञाचा भाग २ –पु ज्याचे सर्व अवयव यज्ञरूप आहेत असा श्रीकृष्ण, यज्ञमूर्ति कृष्ण 'तया नाव त्यागु। म्हणे तो यज्ञागु। हें मानूनि सुभगु। पार्थु पुसे।' –ज्ञा १६ १३५ [यज्ञ+अग] **यज्ञिय**-वि यज्ञासबधीं, बळी देण्यास योग्य [स] **यज्ञेश**-पु यज्ञातील मुख्य देवता, यज्ञपुरुष, यज्ञफलदाता (विष्णु) [यज्ञ+ईश] **यज्ञोपवीत**-न जानवें (हल्लीं हें सुताचें नऊ पदरी तीन फेरे असलेलें झालें प्राचीन काळीं तें उपवीत म्हणजे विणलेलें वस्त्र होतें) [स वे=विणणें]

**या**—उभअ १ अगर, अथवा, किंवा 'बातमी खरी या खोटी' –ख ९ ४७९५ २ व, आणि 'पत या तेज बुडली' –ख १ १५० –उद्गा हे, अरे 'देवाचें नाव या खुदा असें घेऊन' –मदरु १ ८३ [फा]

**या आ**—एक प्रत्यय हा प्रत्यय सकर्मक क्रियापदाना लागला म्हणजे कर्तृत्ववाचक विशेषण तयार होतें उदा० गोड बोलणें–गोडबोल्या, वाटमारणें–वाटमाऱ्या, प्राण घेणें–प्राणघेण्या

**याकुती**—स्त्री साखर, मसाला इ० घालून केलेलें भांगेचे मिश्रण, घोटा [फा]

**याकूत**—न माणिक, तांबड्या रगाचें एक रत्न उत्तम याकूत हिंदुस्थान सैबेरिया, सिलोन, इराण व ब्राझील या देशात सापडतात –ज्ञाको (य) २३ [अर]

**याग**—पु १ यज्ञ हवन होम २ पूजा [स यज्=पूजा करणें] **यागी**-वि यज्ञ करणारा, यजमान

**यागी**—वि सतप्त दु खी, रुष्ट, 'उमाबाई दाभाडी पुत्र वारले म्हणोन बहुत यागी जाहली –मराचिथोशा ५१ [हिं]

**याचक**—पु १ भिकारी, भीक मागणारा, २ मागण्यास आलेला मनुष्य [स. याच्–मागणें] ०वृत्ति–स्त्री भिक्षुकी, भिक्षा मागण्याचा धंदा, भिक्षा मागून पोट भरणें [स वृत्= राहणें] **याचकी, याचकाई**–स्त्री भिक्षुकी, भिकारीपणा **याचणें** सक्रि १ मागणें, विनंति करणें, प्रार्थना करणें २ भिक्षा मागणें; एखाद्यापाशीं भीक मागणें, एखादी वस्तु मागणें [स याच्=भीक मागणें] **याचन-ना**–नस्त्री भिक्षा, भीक, विनंति, अर्ज, प्रार्थनापूर्वक मागणें **याचनीय**–वि भीक मागण्यासारखी, भिक्षा मागण्यास किंवा घालण्यास योग्य, लायक. [स] **यांचा, याञ्चा**–स्त्री याचना [सं याच्ञा] **याचित**–वि मागितलेलें; ज्याच्या जवळ याचना केली तो (मनुष्य) [सं] **याचिता**–वि भिक्षा मागणारा, भिकारी, याचक **याची**–पु याचक 'असें असता द्विज पावसात याची।'–र ३.

**याजक, याजी**—पु यज्ञकर्ता, यज्ञकर्म चालविणारा उपाध्याय, ऋत्विज इ० [स] **याजन**–न दुसऱ्याकडे यज्ञक्रिया वगैरे चालविणें, दुसऱ्याकरिता यज्ञासंबंधीं सर्व व्यवस्था पाहून तो तडीस नेणें, उपाध्याय, ऋत्विज इ० चें होमासंबंधींचें काम [स] **याजी**–वि यजनशील, यज्ञकर्ता 'याजी होउनिया द्विजास म्हणतो या जी धनें ध्यावया।'–र२ **याज्य**–न यज्ञाचा विषय, ज्याकरिता यज्ञ केला जातो असा मुख्य विषय–हेतु 'जें भजतियासी भज्य। याज्ञिकाचें याज्य।' –ज्ञा ६ ४७७.–वि यज्ञिय

**याजुष**—वि १ यजुर्वेदासंबंधीं, यजुर्वेदांतील २ यजुर्वेदी, यजु शाखी, यजुर्वेदांत सांगितल्या प्रमाणें विधि व कर्में करणारा [स यजुस्]

**यात-ती**—स्त्री ब्राह्मण इ० जात, वर्ग, भेद, वर्ण 'कोण याती कोण वर्ण।' [स ज्ञाति, जाति] **याति-ती**–स्त्री १ जात प्रकार 'नाना याती कुसममाळा।'–दा १ २ १९ २ ज्ञाति जात, वर्णभेद [स जाति]

**यात**—वि १ गेलेला, गत २ मिळालेला, संपादित [सं या=जाणें]

**यात**—स्त्री मोटवण [फा याता]

**यातना**—स्त्री १ हाल, अपेश, तीव्र दु ख, वेदना, त्रास कष्ट २ यमयातना, नरकवास [स]

**यातायात**—स्त्री १ येरझार जायें,खेप, हेलपाटा २ त्रास, श्रम, कष्ट, भानगड जाण्यायेण्याचा त्रास–श्रम–कष्ट ३ जन्म मृत्यु जननमरण, पुन्हापुन्हा जन्मणें आणि मरणें 'ते कर्मी तरी वर्तती। परी कर्मफळा नातळती। आणि यातायाती लोपती। अर्जुना तयां।' –ज्ञा २ २७८. [यात+आयात]

**यातायाती**—स्त्री जातिभेद, जातीजातींतील फरक 'साधु किंवा ब्रह्मनिष्ठ यातायाती मनांत आणीत नाहींत' [स जाति, ज्ञाति–ज्ञाति]

**यातु, यातुधान**—पु राक्षस, 'उभाउभारे यातुधाना। करीत उठला हेचि गर्जना।'–कीर्तन १.५१ [स–स्त्रीपु यातु= जादु, यातुधान=जादुगार]

**यात्रा**—स्त्री १ देवतादर्शन, तीर्थस्नान इ० करता निर निराळ्या पुण्यक्षेत्रीं जाऊन तेथें तीर्थस्नान, देवदर्शन क्षौर, ब्राह्मणभोजन इ० विधि करून येणें, क्षेत्रसंचार. २ यात्रेकरूंचा समुदाय–समूह ३ जत्रा, उत्सव 'आज त्या देवाची यात्रा आहे म्हणून सर्व दुकानें तिकडे गेलीं' ४ (ल) फुकट पडलेला हेलपाटा, निष्कारण प्रवास 'ज्या कामाच्या उद्देशानें मुद्दाम गेलों तें झालें नाहीं, उगीच यात्रा घडली' ५ देशांतरास गमन, संचार, पर्यटण ६ (ल.) मरण, मृत्यु व्युत्सुता 'यात्रासमय असें दुर्गति ऐसा घर्ष नको त्रास।'–मोभीष्म ११ १२९ [स या–जाणें] **यात्रेकरू, यात्रस्थ, यात्रेकरी रू, यात्रिक**–वि यात्रा करणारा, तीर्थक्षेत्रास जाणारा, वारकरी [यात्रा+ करणें, स यात्रिक] ०डबरी–स्त्री यात्रेच्या ठिकाणीं किंवा देवळांतून यात्रेकरूंनीं दिलेले पैसे इ० टेवण्याची पटी, अशा पेटींतील पैसे इ०

**याथातथ्य**—न खरेपणा, सत्य, वास्तविकता (याच्या उलट अर्थी भास) [सं]

**याथार्थ्य**—न. सत्यता, उचितपणा, औचित्य, खरेपणाला धरून असणें –क्रिवि उचितपणानें, योग्यपणानें, सत्यतेला धरून, बरोबर [स यथा+अर्थ] **याथार्थिक**–वि खरें असेल तसें, योग्य बरोबर, रास्त, न्याय्य, सत्यता आणि खरेपणाला धरून, औचित्याला अनुसरून.

**याद**—स्त्री १ स्मरण, आठवण, एखादी गोष्ट लक्षांत ठेवणें –आणणें 'कुटवर वाट पाहु सखे मज सांग कांहीं। घडोघडी याद होते गृहीं पतिराज नाहीं।'–प्रला १४२ २ यादी, फेरिस्त, सूची, स्मरणार्थ टिप्पण, यादी लिहिलेला कागद ३ अर्ज, विज्ञपनापत्र (याद ही एखाद्या विशेष दर्जाच्या मनुष्याकडून येते आणि अर्ज हा सामान्य किंवा गरीब मनुष्याकडचा असतो) [फा याद्] ०गारी-गिरी–स्त्री १ आठवण, स्मृति, स्मरण २ आठवण राहण्याकरिता खूण, स्मारक [फा याद्+गार] ०दास्त–स्त्री सूची, रोखा, सूचीबद्ध कागद –मराचिथोरा ७१ २ गायकाना यणाऱ्या ध्रुपद, ख्याल इ० चा थोडाबहुत भरणा [फा याद्+दास्त] ०वस्त-हस्त–स्त्री सूची, लेख 'कितेक जिन्नस सुरतेंत गेला त्याची यादवस्त'–रा१ ३६ [फा याद्+ हस्त्] ०बुद्–स्त्री १ निश्चित यादी, ठराव, दस्तऐवज, लेख 'आणखीपत यादीबुदी व्हावयाच्या आहेत होतील'–ख ६ ३०९२ २ स्मरणार्थ खूण–लेख [फा याद्+बुद्] **यादपान**–न जन्मकालीन तिथिवारादि ज्या कागदावर लिहिलेले असतें तो

कागद; जन्मलग्नपत्रिका, टिपण यादी-स्त्री १ स्मरणार्थ टिपण, याद, फेरिस्त. २ संस्थानिकानीं हुजुरास केलेला अर्ज [ याद ] ०दास्त-वि यादी देणारा 'यादीदास्त करारदाद बुभर बलराम संस्थान '-वाडबाबा ३ ६० याद पहा यादीचा-वि घट आठवणीचा, चांगली स्मरणशक्ति असलेला

**याद्**—न जलचर, मत्स्य, मासा 'सोडीना सुव्रतें तो जसि जलधिजलें तापें याद शीतें ।'-माभवरीपाख्यान ७ (नवनीत पृ ३६०) [स यादस्]

**यादव**—पु यदूचा वंशज; एक राष्ट्र कृष्णाचें कुल **यादवी**-स्त्री आपसातील कलह, भाऊबंदकीचीं भांडणें, गृहकलह (कृष्णा वतारीं यादव दारूनें धुंद होऊन आपसांत लढले व त्यामुळें त्यांचा नाश झाला यावरून) **यादवेंद्र**-पु कृष्ण [ यादव+इंद्र ]

**यादृश**—वि जसा, ज्याप्रमाणें, ज्यासारखा [स यादृश -शी-शम्]

**यान**—न १ ज्यांत किंवा ज्यावर बसून जातात तें साधन, वाहन, उदा० गाडी, पालखी, जहाज घोडा इ० २ जाणें, गमन, प्रवास [ स या=जाणें ]

**यानी-ने**—अ त्याचा अर्थ असा कीं, म्हणजे, पुढें [ अर यअनी ]

**यापत**—क्रि प्राप्त झाला-ली-लें -आदिलशाही फरमानें [ फा ]

**याबू**—पु लहान घोड्याची एक जात [ फा ]

**याम**—पु १ प्रहर, दिवसाचा आठवा भाग 'एक याम उरली यामिनी । तों तृषाक्रांत जाहली जननी ।'-पाप्र ११ ५ २ तीन तासांचा पहारा ३ सहनशीलता ४ थांबणें, विश्रांति, मुक्काम [स ] ०त्रय-न दिवसाचे किंवा रात्रीचे तीन प्रहर ०द्वय-न १ दिवसाचे किंवा रात्रीचे दोन प्रहर २ विशेषत सूर्योदयानतरचे दोन प्रहर **यामार्ध**-न वारपरत्वें प्रत्येक दिवशीं अर्धा प्रहरपर्यंत असणारा वाईट मुहूर्त कुमुहूर्त [ याम+ अर्ध ] **यामिनी**-स्त्री रात्र [स ] **यामिनाचर**-पु राक्षस, निशाचर [ यामिनी+चर्, स चर-फिरणें ]

**याम्य**—वि दक्षिणेकडचा, दक्षिण दिशेचा [स ] ०गोल-पु दक्षिण गोलार्ध **याम्योत्तर**-वि दक्षिणोत्तर [ याम्य+उत्तर ] **याम्योत्तर रेषावृत्त**-न एका ध्रुवापासून दुसऱ्या ध्रुवापर्यंत मध्यरेषेस स्वरूपानें छेदून जाणारी रेषा, मध्यान्हरेषा, रेखावृत्त **याम्योत्तरवृत्तपात**-पु याम्योत्तर वृत्ताचा विषुववृत्ताशीं होणारा छेद -सूर्य १२ **याम्योत्तरा**-स्त्री एका मोठ्या वर्तुलाला लंब असलेलें दुसरें मोठें लंब वृत्त मध्यान्ह रेषा

**यायी**— पु अवचित येणारा प्रसंग, अकस्मात् घडून येणारी गोष्ट, अडचणीची वेळ [ स ] -वि जाणारा, गमन करणारा, प्रवासी, उतारू

**यार**—पु १ मित्र, स्नेही, दोस्त, मदतनीस २ जार, धगड, प्रेमी ३ इत्तीबरोबर चालणारा भालाईत [ फा यार, स. जार द्वितीयार्थी ] **यारी**-स्त्री १ मैत्री, अत्यंत सख्यभाव, दोस्ती, निकट स्नेह 'अधमाची यारी । रग पतंगाचे परी ।' -तुगा ११७७ २ मदत, साह्य (क्रि० देणें ) [ फा ] ०देणें-संकटकाळीं मदत करणें (जरूरीचे वेळीं ) उपयोगी पडणें ०न देणें-(जरूरीचे वेळीं ) निराश करणें, मदत न करणें, हेळसांड करणें **यारेदी, यारदी**-पु १ वंशपाड्याचा मदतनीस वतनाची देखरेख करणारा, गुमास्ता २ -स्त्री त्या गुमास्त्याची वंशपरंपरेनें चालत आलेली मालमत्ता-हुद्दा-जागा इ० [ फा यारी-दिह्]

**यारदा-दी**—वि १ टेंगणा व लहान, ओझ्याघोड्याच्या कामीं उपयोगी पडणारें, हलक्या व टेंगण्या जातीचें (घोडें) २ हलक्या कामाला उपयोगी पडणारा, सर्वसामान्य, हलका, कमी योग्यतेचा (मनुष्य, पशु इ० ) ३ लहान परंतु बळकट अशा बट जातीचीं (तटें, घोडीं )

**यारी**—स्त्री (नाविक) ओझें उचलण्याचें यंत्र यांत मुख्यत कप्या असतात (इं ) क्रेन

**यार्ड**—पु तीन फूट; तीन फुटांचें माप, वार, गज [ इं ]

**यावत्**—अ १ जेथपर्यंत, जोंपर्यंत २ -वि जितका, जेवढा (तावत् या शब्दाच्या बरोबर उपयोग) ३ यच्चयावत, सर्व, एकहि न वगळता, शिल्लक न ठेवता 'आज गांवांतील यावत् मनुष्य कथेला गेलें आहे ' [ स ] म्ह० यावत्तैल तावद्व्याख्यानम् = जोंपर्यंत दिव्यांत तेल आहे तोंपर्यंतच गोष्टी चालावयाच्या,मनुष्याजवळ द्रव्य वगैरे असतें तोंपर्यंत त्याची चैन चालते. **यावच्चंद्र-दिवाकरौ**-क्रिवि चद्रसूर्य आहेत तोंपर्यंत सदासर्वकाळ, अनंत कालपर्यंत, चिरकाल [ स यावत्+चंद्र+दिवाकर=सूर्य ] **याव ज्जीव**-क्रिवि जिवंत असेपर्यंत ०तावत-न (बीजगणित) अव्यक्त संख्या आणि अंक यामधील संबंध, अव्यक्तसंख्यादर्शक अक्षर -क्रिवि बेताचें, विशेष सामर्थ्यासारखें नसलेलें, अधिक नव्हे व तुटपुंजेहि नव्हे असें 'आमच्या घरीं सदा दूधदुभतें यावत्तावत् आहे.'

**यावनाल**—पु जोंधळा, जोंधळ्याचा दाणा 'यावनालकण देखील नाहीं =जोंधळ्याचा एक दाणा सुद्धा नाहीं, मुळीच नाहीं [स ]

**यावनी**—वि यवनाची; यवनासंबंधीं

**यावा**—पु १ उदय, प्राप्ति आगमन 'मग म्हणे जी श्री गुरुदेवा । जो तुम्हीं दाविला निज रूपाचा यावा ।'-स्वारि

१२ २ १०३ २ प्रभाव, धैर्य, सामर्थ्य, बल 'समई यावा पुरो नये।'–दा २ २ ३१ ३ ओघ, प्रवाह 'तैवरी नदानदींची नावें। तवंचि पूर्वपश्चिमेचे यावे। जव न येती आघवे। समुद्रामाजी।' –ज्ञा ९ ४६२ ४ आवेग, आवेश, फेरा, संचार, प्रवेश, टप्पा, कचका 'कृष्णासी म्हणे राहे साहे। माझा यावा आला पाहें।' –एरुस्व १२ ८९. ५ स्वारी 'आला कर्नाटकी यावा।'–राम दासी २ १८७ ६ महत्त्व, सामर्थ्य, श्रेष्ठता 'मनुष्य इहासम व्यास यावा।'–वामन विराट ८ २९ [ येणें ] **यावाका**–पु (महानु ) धैर्य, पुरुषार्थ 'ऋषीगुरु तपाचा यावाका।'–भाए ४६०

**याहा( ही )स**—सना. ( चतुर्थी विभक्ति ) ( व ) याना, ह्यास [ हे ]

**याज्ञसेनी**—विना द्रौपदी, यज्ञामध्यें उत्पन्न झालेली स्त्री

**याज्ञिक**–न १ यज्ञयाग, सामान्यत यज्ञसमारंभ २ लग्न, मुंज यातील उपाधिक –पु १ यज्ञ करणारा, अग्निहोत्री, यज्ञ करणारा पूर्वमीमांसक 'पैरिजे नुसधी हिंसा। तेय उगवैल काय अहिंसा। परीनवल बापा धिवसा। या याज्ञिकाचा।'–ज्ञा १३ २२३ २ लग्न, मुंज इ० धर्मकृत्यें चालविण्याचें अनुष्ठान जाणणारा ब्राह्मण [ यज्ञ ] **याज्ञिकी**–स्त्री याज्ञिकाचें काम, लग्न, मुंज इ० धर्मकृत्यें चालविण्याचें काम व तत्संबंधी मंत्रतंत्र वगैरे –वि याज्ञिकासंबंधी, याज्ञिकाचा [ स ]

**यिव यीव**—स्त्री बकऱ्याच्या मानेचें मांस; मानेंतील मांसाचा तुकडा [ यिव=मान स ग्रीवा ? ] ०**कुकडी**–स्त्री मानेंतील आणि ढुंगणातील मांसाचे तुकडे (एखादा बकरा अगर मेंढा कापला असतां महाराचा या दोन भागांतील मांसावर हक्क असे ) [ यिव=मान+कुकडी=ढुंगण, मागचा भाग, अवशिष्ट भाग ]

**यींदा**—पु (माण ) नांगरास हाळीस बसण्याकरिता पाडलेलें भोंक, कुऱ्हाड कुदळ, इ० ना दांडा बसविण्याकरिता असलेलें भोंक, नेढें

**यींस्तारी**—स्त्री पत्रावळ इस्तारी पहा [ स वि+स्तृ ]

**युक्त**—वि १ जोडलेला मिळवलेला, मिसळलेला, जुळविलेला २ सहित संपन्न ( समासांत ) चितायुक्त, शोकयुक्त, संशययुक्त, खेदयुक्त, हर्षयुक्त, कामयुक्त, जलयुक्त, शर्करायुक्त इ० ३ तत्पर, तयार, ( अभ्यासांत अगर कामधंद्यांत ) गुंतलेला, गढून गेलेला, सदोदित लक्ष देत असलेला 'पार्थहितीं मुरारि युक्त सदा।' –मोकर्ण २३ २५ ४ योगांत निमग्न झालेला, योगाभ्यासी ५ योग्य; रास्त, बरोबर, उचित, शोभेसा जुळणारा [ स युन्= जोडणें ] **युक्तास्थिला**–वि अस्तित्वाची भावना असलेला –ह्वो [ युक्त+आस्थिला ] **युक्तायुक्त**–वि योग्य आणि अयोग्य बरें आणि वाईट, साजेसा व न शोभणारा [ स युक्त+अयुक्त ] **युक्ता हार**–पु बेताचें अगर पचेल तेवढें खाणें, मिताहार, योग्य रीतीचें पथ्यकर आणि मित भोजन [ युक्त+आहार ] **युक्ताहारी**–वि बेताचें खाणारा, योग्य अन्न योग्य प्रमाणांत घेणारा

**युक्ति, युक्त**—स्त्री १ शक्कल, खुबीदार कल्पना, शोधकबुद्धि २ कमत, सुबी, कल्पना; कौशल्य ( शक्तीच्या विरुद्ध ) ३ ( एखाद्या यत्नातील ) कळ, मख्खी, किल्ली, मखगाठी ४ उचितपणा, योग्यपणा, औचित्य, विवेक, प्रमाण, निश्चितपणा 'तरि तत्तत्तेविषयीं उपमन्यो बोलती असे युक्ति।'–मोअनु ३ ३१. ५ ऐक्य, मिलाफ; मिळणी, एकत्रीकरण, एकी ६ निष्काम कर्में करण्याची हातोटी 'जो युक्तिपथें पार्था। चढे मोक्षपर्वता। तो महा सुखाचा निमथा। वहिला पावे।'–ज्ञा ५ ३२ [ स युक्ति ] ( वाप्र ) **युक्तीच्या गोष्टी**–क्रिवि युक्तानें, मुत्सद्देगिरीनें, कौशल्यानें **युक्तीस येणें**–मनास पसत पडणें, योग्य, युक्त वाटणें दिसणें 'बहु बोलणें तयानें धर्माच्या वेदनाचि युक्तिम तें।'–मोशाति ३ ८४ **युक्तीयुक्तीनें करणें-घेणें**–त्वा अथवा दांडगाई न करता साहेनें करणें सामाशब्द– ०**औदार्य**–न उपाययोजनेंतील कौशल्य, तोड काढण्यातील प्रावीण्य ०**घोष**–पु बधरूपी मंत्रघोष 'तेय सयमाग्नीचीं कुडें। इंद्रियद्रव्याचेनि पवाडें। यजिती उदडें। युक्तिघोषें।'–ज्ञा ८५० ०**त्रय**–न ( योगशास्त्र ) वज्रासन, जालंदर आणि उड्डियान असे तीन बंध –ज्ञा ४.१२७ ०**प्रयुक्ति**–स्त्री नानाप्रकारच्या युक्त्या, बऱ्यावाईट उपाय [ स ] **युक्तिप्रयुक्तीनें**–क्रिवि बऱ्यावाईट उपायांनीं, कोणत्याहि मार्गानें, कांहींहि करून, या नाहीं त्या उपायानें ०**बाज-मान-वंत-वान**–वि युक्त्या जाणणारा, युक्त्या लढविणारा, हुषार, सुपीक डोक्याचा, शोधक, निरनिराळे उपाय योजणारा ०**वत्ता**–क्रिवि कौशल्यानें, युक्तीनें, खुबीनें, हुषारीनें, लबाडीनें [ युक्ति+वत् वाट ] ०**वाद**–पु युक्तीनें केलेला वाद ( तर्कशास्त्रास अनुसरून नव्हे पण सामान्य व्यवहारास पटेल असा ) ०**सार**–वि बरोबर योग्य, रास्त, पटण्यासारखें, औचित्याला धरून असलेलें **युक्त्या**–वि कसबी, हुशार, युक्तिबाज, सुपीक डोक्याचा, चलाख, निरनिराळे बेत, मसलती, उपाय योजणारा –क्रिवि युक्तीनें, कौशल्यानें, लबाडीनें, हुशारीनें

**युग**—न १ कृत, त्रेता, द्वापार आणि कलि असे जे विश्वाचे कालमापक चार मोठाले विभाग त्यांपैकीं प्रत्येक २ मोठा कालविभाग, वरील चारी कालविभाग मिळून होणारा काल चारी युगांचा काल ३ जोडी; दोन वस्तू युग्म, द्वय उदा० कर्णयुग, वस्त्रयुग इ० ४ जोखड, जू धुरा –वि चार संख्या (युगें चार मानिलीं त्यावरून ) 'नाराच सहस्र युग।'–मोकर्ण ४३ ७७ ०**धर्म**–पु १ कालमाहात्म्य, त्या कालातील लोकांची प्रवृत्ति कालानुरूप योग्य वर्तन ०**पत्**–क्रिवि एकत्र, एकदम, एकाच वेळीं 'घट

आणि प्रागभाव हे एका अधिकरणीं युगपत् संभवत नाहींत ' ०माहात्म्य-न युगाचा मोठेपणा, युगाचें महत्त्व, युगाचें वैशिष्ट्य, काळाचा गुण, प्रभाव **युगांत-पु** १ युगाचा शेवट २ प्रलयकाळ, चारी युगानंतर येणारा प्रलयकाल 'जैसा सिंहाचिया हाका। युगांतु होय मदमुखा।' -ज्ञा २ २१५ [युग+अंत] **युगादि-पु** युगाचा प्रारंभ, सुरुवात [युग+आदि] **युगानुयुग-**क्रिवि कित्येक युगेपर्यंत [युग+अनुयुग] **युगुल, युगल, युगूळ-न** (काव्य) जोडी, द्वय, दोन वस्तू [स युगुल]

**युगूत, युगत**—स्त्री युक्ति, युवी [युक्ति अप]

**युग्म**—न १ द्वय, जोडी २ जोडपें, मिथुन, मेहूण ३ वाक्यरचनेनें व अर्थानें एकत्र आडल्यामुळें दोन्ही मिळून अर्थ पूर्ण होणारें श्लोकद्वय ४ (गणित) प्रमाणात असलेल्या दोन संख्या (यांतील पहिलीस अग्रसर व दुसरीस उपाग्रसर म्हणतात) -छअ१०४ [स युज्=संयोग करणें, जोडणें] ०भोजन-न दंपतीतृप्त्यर्थ मेहुणाना, जोडप्याना घातलेलें जेवण

**युत**—वि जोडलेला, संबद्ध, युक्त, एकत्र झालेला, असलेला, [स यु=जोडणें] **युति-स्त्री** १ (ज्योतिष) चलग्रहाचें एका दक्षिणोत्तर रेषेंत जवळ जवळ येणें २ मिलाफ, जोड, एकत्र येणें ३ (गणित) बेरीज [स यु=जोडणें]

**युधिष्ठिर**—पुविना १ पांडवांतील सर्वांत मोठा, धर्म २ (यौगिक) सामान्यत निधड्या छातीचा, युद्धांत स्थिर असणारा मनुष्य

**युद्ध, युद्धय**—न १ लढाई, रणकंदन २ भांडण, मारामारी, झुंज, दोन व्यक्तींचा पक्षांचा झगडा, लढा सामना समासांत कुक्कुटयुद्ध (कोंबड्यांची झुंज), मेषयुद्ध (मेंढ्याची साटमारी) गजयुद्ध, मल्लयुद्ध (मल्लांची झोंबी कुस्ती), तलातल्युद्ध (हातानीं केलेली मारामारी) गदायुद्ध मुष्टियुद्ध इ० [स युद्ध युध्=लढणें] (वाप्र) **युद्धास तोंड लागणें**-युद्ध सुरू होणें कलहास, मारामारीस, वादास वगैरे आरंभ होणें सामाशब्द- ०कंडू-स्त्री लढाईची खाज, लढण्याची भांडण्याची तीव्र, उत्कट इच्छा, मारामारीची खुमखुमी [स] ०कंदन-न लढाईंतील कत्तल, प्राणांतिक लढाई 'युद्धकंदन मग करूं। -राविं १५ ७५ [युद्ध+कंदन] ०करी-पु योद्धा लढणारा **युद्धकर्ज**-न युद्धाच्या खर्चासाठीं काढलेलें कर्ज ०फळी-स्त्री (काव्य) सैन्याची रांग, लढाईस उभें असलेलें सैन्य सैन्याची मांडणी रचना ०मद-पु लढण्याचा आवेश स्फुरण [स] ०वीर-पु शूर पुरुष, योद्धा [स] **युध्दांगण**-न १ रणमैदान, रणभूमि २ फड, हौदा कुस्तीची किंवा भुजेची जागा [युद्ध+अंगण]

**युनानी**—वि मुसलमानी वैद्यकासंबंधीं, यवनी [फा]

**युनिव्हर्सिटी**—स्त्री विश्वविद्यालय [इं]

**युयु यू यूयू**—उंदरा कुत्र्याला बोलाविताना उच्चारण्याचा शब्द याच्या उलट म्हणजे त्याला एखाद्याच्या मागें लावण्यासाठीं किंवा भुंकण्यासाठीं छू छू शब्द उच्चारतात

**युरेजन-शिअन-शियन**—वि हिंदी स्त्री व युरोपियन पुरुष यांच्या संबंधापासून झालेला (मनुष्य) [इं]

**युवक**—पु तरुण **युवकसंघ-पु** तरुणांचा संघ, तरुणांची संस्था (इं) यूथलीग

**युवति ती**—स्त्री तरुण स्त्री, सोळा ते तीस वर्षांपर्यंत वयाची स्त्री [स]

**युवन**—न १ यौवन, तारुण्य 'जो कैवल्यकुसुमाचा आमोदु। नातरि ब्रह्मविद्येचा युवनमदु।' -भा१ ३७ २ स्तन 'सदैव युवन पाजिती। दुद मरिय।' -ख्रिपु २ २ १५४ [स यौवन, हि जोबन]

**युवराज-जा**—पु १ गादीचा वारस ज्येष्ठ राजपुत्र २ राजानें राज्यकारभार चालविण्यास मदतीस घेतलेला व त्याच्या नंतर गादीवर बसणारा राजपुत्र किंवा दुसरा एखादा इसम [सं युवराजा] **युवराज्य**-न गादीवर बसण्याला नियुक्त मनुष्याचें कर्तव्य किंवा जागा, हुद्दा, पदवी, युवराज हें पद [स यौवराज्य]

**युवा**—पु १ तरुण पुरुष, तारुण्यावस्थेंत प्रवेश करणारा मनुष्य (सोळा ते चाळीस वर्षांपर्यंतच्या पुरुषालाहि युवा म्हणतात) २ साठ संवत्सरांतील नववा संवत्सर [स]

**युष्मत्**—सना तू, तुम्ही (समासांत) युष्मद्गृह, युष्मद्देश, युष्मत्पुत्र इ० [स] **युष्मादिक्**-सना तुम्हीं, आपण (उपरोधिकपणानें किंवा विनोदानें उपयोग) क्रियापदाचें रूप तृतीयपुरुषाचें असतें 'आता शौर्याच्या गोष्टी सांगता पण त्या दिवशीं चोर आले तेव्हा युष्मादिकच पळाले' [स युष्मत्+आदि+क]

**युक्षदंड**—पु (अप) इक्षुदंड, ऊस [स इक्षुदंड]

**यूका**—स्त्री ऊ [स]

**यूथ**—पु कळप, तांडा, समूह, समुदाय (विशेषत पशु किंवा पक्षी यांचा) [स]

**यूनान**—विना यवनदेश ग्रीस देश अयोनिया [इ]

**यूनिट**—पु १ एक एकाक, एकम् २ व्यक्ति, व्यष्टि एक बीज ३ मूलमान मूलपरिमाण, मापनपरिमाण [इ]

**यूप**—पु खांब, स्तंभ यज्ञस्तंभ [स]

**यू(यु)रोपियन**—वि यूरोप खंडांतील, यूरोप खंडासंबंधी, [इ]

**ये**—सना या, ह्या 'ऐसीं शरीरें नेणों किती। म्या निर्माण केलीं ये क्षितीं।' -एभा ७ २४५

ये—उद्गा सर्गाचें संबोधन [स ए]

**येइतलग**—क्रिवि येईपर्यंत 'लेकीन माहितास येइत लग त्यास करावें' –पेद ३ ५

**येउ(ऊ)तें**—वि १ येणारें 'ऐसें अर्जुना येउतें सर्वेश्वरें। पाहोनि बोलिलें आदरें।' –ज्ञा १० ५३ २ येवढेंसें 'तिया शाखा येउतें जया पाहती। तें फलवृक्ष।' –ज्ञा ९ ३७१ –क्रिवि येथें [स यावत्]

**येऊनजाऊन**—क्रिवि १ क्रमशः; कायमचें नाहीं; मधून मधून यावें जावें अशा प्रकारें 'मी येथें नेहमीं राहणार नाहीं येऊन जाऊन असेन.' २ सरतेशेवटीं, यावी, शेवटचें कृत्य, उपाय साधन म्हणून 'वरकड सारी दौलत गमली आता येऊनजाऊन वतन राहिलें' ३ फार तर 'तू येऊनजाऊन मारशील आणखी काय करणार आहेस?' ४ नेहमीं, सतत 'येऊनजाऊन हाच धंदा [येणें+जाणें]

**येऊल**—पु (कों गा) १ सुरयांची एक जात २ खरग

**येक**—वि १ एक, सामासिक व साधित शब्द एक शब्दामध्यें पहा (समासांत) येकंदर, येकलकोंडा, येकलखोर, येकल कोंडा, येकवट, येकवटणें, येकवत, येकवळा येकसुरा, येकाड, येकाड्या, येकान्ना येकाक्षा आड, येकाएक, येकामी, येकार्णे, येकगात येकूण येकोपा, येकावा, येकोशीस येकोणी येकोस ६० २ कित्येक 'साधुनि मारिती। येकाचीं सर्वस्वें हरिती। येकालागीं उभारिती।' [स एक] सामासिक- ०इसा-वि (कों) वीस **येककार**-पु प्रकार 'अवघा येककार करिती।' –दा ११ १ ३२ ०जय-पु एकत्रित जमाव 'तीन हजार येकजय आहे' –पद २०,१७६ ०जरा-जद्दा-अ बिल कुल थोडें सुद्धा [अर] ०जहती-स्त्री स्नेह मैत्री 'हमेशा मकातीव पाठवून दोस्ती येकजहती दोन–व–दोन जादा होय' –रा १० ३१२ [फा] ०जिनसी-वि एकाच प्रकारचें अमिश्र 'येकजिनसी स्वतंत्र।' –दा २० २ ३ **येकटका**-वि एकटा 'गेला हरि येकटका यास्तव घरूनि आपणहि ये वटका।' –मोकृष्ण ५२ १५ ०टोक-वि सव एकासारखें एक 'राजमित्रादि येक टोक।' –दावि ३९० ०तार-वि एकरूप 'येकतार रामेसी।' –दावि ७१ ०तुके-वि सारखें समान 'ऐसें येकतुके पाच भौतिक।' –ज्ञा ७ २५ **येकदरें**-वि एकाकार, एकाग्र –शर [प्रा] ०दाणें-न एकदाणी 'तें येक दाणें मिरवे गळाचें।' –सारुह ६ ३४ ०दुमाल-क्रिवि एकामागें एक उभे राहून 'घाहेम्वारानीं येकदुमाल होउन।' –मम ९ ०देसा-वि १ एकपक्षी सर्वत्र लागू न होणारं 'परि तों आह येकदेसी। दृष्टत न घडे वस्तुसी।' –दा २० १० ६ २ एकमार्गी, अल्पज्ञ 'विरक्तें येकदेसी नसावें।' –दा २ ९ २९ [स एक+देश] ०धर्मी-वि एक प्रकारचें 'परि तें एकधर्मी थोडें।' –ज्ञा ११ ४०४ [एक+धर्म] ०नेग-अ एकदम, तावडतोब [फा] ०मुख-अम समोर 'क्यामासि केलें येकमुख।' –एभा १ १५१ (पाठभद) [प्रा] ०मोहरें-क्रिवि १ एकत्र २ एका बाजूस तोंड असलेले, सामोरें [प्रा] **येकल**-वि एकटा 'तरी आम्ही भेटविला दमयंती नळ। तथें हमचि होता येकल।' –कथा १ ८ १० **येकलहरा**-वि जो चावला असता एकाच लहरीनें मृत्यु येतो असा (सर्प) 'चलावा गारोडी भुजग इसवा येकलहरा।' –मध्व ५८१ ०वंकी-स्त्री तादात्म्य –हको [प्रा एक+अंक] ०वगी-अ एका प्रकारानें [स] ०वट-पु एका ठिकाणीं जमणें, एकत्रता 'सकळांचा जाहला येकवट।' –कथा१ ५ ८ ०वटणें-सक्रि गोळा करणें 'रत्नें साधाया कारणें। मृतिका लागे येक वटणें।' –दा ७ ३ २ ०वळा-क्रिवि एकत्र एकाग्र 'श्रुती करणें येकवळा।' –ज्ञा १८ ६३७ [एक+भाव] ०सर-वि एकजात, ब्रह्म [प्रा] ०सरणें-सक्रि एक मार्गी होणें; अनुसरणें –हको [प्रा] ०सरा-रां-अ एकदम 'तुज सशयाचें मूळ। येकसरां।' –दा ११ २८ ०सरें-क्रिवि तावडतोब, एकदम ०सार-न एकच तत्त्व –हको ०सुदी-स्त्री सुधपणा, सरळपणास 'सदरहू कलमाचा लिहिल्याप्रमाणें फडशा न केल्यास तुमचें येकसुदीस चागलें नाहीं म्हणोन –बाडबुवा ५ १६६ **येका खडी**-स्त्री बाराखडी ओ ना मा नतर शिकावयाची अ आ इ ई ६० स्वरादि अक्षरें 'ऐसा महाक्लेशेसि त्यास शिकवी। ओनामा आणि येकाखडी।' –स्वादि ४ ४ ४५ **येकाग्र**-वि एकाग्र 'श्रोती करावें श्रवण। येकाग्र होऊनि।' –दा ३ ६ १ **येकाग्र्यता**-स्त्री १ एकदेशीपणा 'तें गातयाचेनि मार्गें। येकाग्र्यता नाहे।' –ज्ञा १८ १७३६ २ अपर्णता –शर **येकांत**-पु एकातांत भाषण वगैरे करणें 'परागनसीं येकांत।' –दा २ १ २९ **येकांतर**-वि एका दिवसाआड [प्रा] **येकाधा**-वि एखादा 'सुकोनि येकाधा जाये।' –गीता २ २३३१ **येकायतनु**-न एकायतन; एक अधिष्ठान, ब्रह्म [स] **येकायेकी**-वि एकटा, नि सग –क्रिवि अकस्मात् [प्रा] **येकावळी**-स्त्री एक पदरी मोत्याचा हार, एकेरी हार 'चतुर्भुज माळा हळ येकावळी।' –तुगा ८ **येकाहारी**-वि एकपत्नीव्रत 'आहानि जे ब्रह्माच्या येकाहारी।' –ना १७ ३३४ **येकु**-वि एक 'मजाया जनीं पाहता राम येकु।' –राम १३१ **येकुणा**-वि दीड दुमता –शर **येकेताळीस**-वि एकेचाळीस 'वर्त्या येकेताळीस कमाना।' –दावि ५०४ **येकोदर**-वि सख्खा, एकोदर 'त्याच बधु येकोदर दत्तात्रेय।' –रामदासी २ १६९ **येकोपजाया**-वि एकच आश्रय असलेला 'तेथ दैवा गुणा येकोपजीवी।' –ज्ञा १६ ६७ [स एकोपजीवी]

**येकसुई**—स्त्री स्नेह 'तर्फैन येख्लास व येक्सुईची तरक्की रोज-ब-रोज ज्यादा होत असावी '-रा १९ १०५ [फा यक्सु]

**येखंड, येंग येंगटणें, येंगाडणें, येंघणें, येच, येचणें, येज, येंट-ठ, येंटाळणें, येंटाळा-ळी-ळें**—वसइ, वेंग इ० पहा

**येखलास, येखलासनामा, येखलासी**—इखलास इ० पहा

**येखलास, येख्लास**—पु मनाची शुद्धता, अत शुद्धि, स्नेह 'मुख्य येख्लास वाढावा '-ख ८७५ [अर इख्लास]

**येखादा**—वि एखादा, क्वचित 'येखादा राहिला स्वरबिंदु।' -कथा १ १ ७२ [एक+अर्धा]

**येंग**—पु (व) चढ, चढाव [यगग=चढाव]

**येगानगत**—स्त्री यगानगत पहा ऐक्य, मैत्री 'दोन्ही कडून दोस्ती व येगानगत रोज-ब-रोज वृद्धींत असावी '-दिमरा १४५ [फा]

**येंचू**—पु (कु) विंचू

**येजमान**—पु आश्रयदाता, मालक यजमान पहा [स यजमान अप]

**येजा**—स्त्री १ जाण्याचें व येण्याचें येणें आणि जाणें, येरझार २ पुन पुन येणें व जाणें (क्रि० करणें, लावणें, मांडणें) [येणें+जाणें]

**येजित येजित जाणें, येजित पत्र**—(अशिष्ट) अजित, अजित जाणें इ० पहा **येजित खत**—न अजित पत्र 'त्याचे साक्षीनें यजित खत लिहून दिल्हें '-वाडबावा २ ९

**येटकें**—न जोत जुपण्याचें सामान, पट वासर, वाला इ० यत्क पहा

**येटाण ये(ए)टाळ येठ**—न (कों) वेटाळ वेट, वेठण इ० पहा >

**येड, येडका येढवळ येढाळ, येढोळा**—एड, एडका इ० पहा

**ये(वे)ड**—स्त्री घोड्यास इशारा करणें तुजला मारिन मी कानि येड।'-ऐपो १२६ **येड करणें**—घोड्यास इशारा करणें प्रेरणा करणें **०देणें**-(व) लगामाच्या इशाऱ्यानें घोड्यास मागें परतविणें

**येंड**—न (कों हेट) मासे धरण्याचें एक प्रकारचें जाळें

**येडगा**—पु (कों) धनगराचा उपाध्याय

**येडताक**—पु विसवाद

**येडपट**—वि वेडपट [का यडपट]

**येंडा**—स्त्री (कु) तडीस दोघानीं पागण्याचें जाळें येंड पहा

**येंडी**—स्त्री (व) एरडी **येंडीचें तेल**-न (व) एरंडेल

**येडीकुंटी**—स्त्री आळन

**येडुळ वेडूळ**—वि (व) ओबडधोबड

**येडें**—न लिंगाइत नीं आपल्या जगमास (गुरूस) पाठवि लेलें भ्रनाचें ताट

**येणगर**—न जोंधळ्याची एक जात

**येणी**—स्त्री गंजिफाच्या खेळातील राजाचा वजीर असणा त्याकडून पान येण्याचा हक्क [येणें]

**येणें**—न एखाद्याकडून यावयाचा असलेला पैसा, यावयाची रक्कम, उगवावयाचें कर्ज

**येणें**—अक्रि १ आगमन करणें, आलेला असणें, दाखल असणें २ विद्यमान झालेला असणें, प्राप्त होणें ३ एखाद्याजवळ, कडे ओढवणें, समीप जाणें ४ एखाद्याला माहीत असणें, एखाद्याकडून करण्याजोगें असणें, अवगत होणें, जाणणें 'याला लिहिणें यतें पण पढणें येत नाहीं ' ५ उद्भवणें, उत्पन्न होणें (राग, लोभ, विषयवासना, दया इ० ) ६ बितणें, प्राप्त होणें ७ उत्पन्न होणें, उद्भवणें (फुलें, फळें, पानें इ०) ८ भरणें, मिळून होणें, बराबर असणें 'ही अंगठी तोळाभर वजन येईल ' 'ता गाव एथून चार कोस येईल ' ९ उतरणें, योग्य आकारात, स्थितींत दिसणें 'हें पागोटें चागलें आलें नाहीं आणखी बाघ ' १० होणें, एखाद्या स्थितीला, अवस्थेला प्राप्त झालेला किंवा पोंचलेला असणें घर अगदीं मोडकळीस आलें आहे ' ११ सभाव्य, जरूर उपयोगी, योग्य, उचित होणें 'त धनी पडले त्यासीं उत्तर करता यत नाहीं प्रसग पाहून बोलावयास येईल ' १२ अवलंबणें (मार्ग इ०) 'वडील वर्तत आले त्याप्रमाणें आम्ही करीत आलों ' १३ पासून निघणें उत्पन्न होणें, तयार होणें (दुधापासून लोणी इ०) १४ प्रवासादिसमयीं जाण्याकरिता निरोप घेताना जाणें, ह्या अर्थी येणें ह्या शब्दाचा उपयोग करितात कारण ह्या प्रसगीं जाणें शब्दाचा उपयोग अशुभ मानतात 'आता आम्हीं येतों कृपा असो द्यावी।' 'यतों बमा प्रसन प्रभु तुम्हा हो '-मोवन १३ २ [म यान=गमन करणें] म्ह० (दुखणें) येतें हत्तीच्या पायानें जातें मुंगीच्या पायानें (वाप्र) **येणें जाणें**-न १ येणें व जाणें म्हणजे मैत्रीला जाणें किंवा येणें राबता दळण वळण श्रीमताकडे त्याचें येणेंजाणें आहे २ येणें व देणें असलेला पैसा, उकळण्याचें कर्ज व फेडा वयाचें कर्ज देण्याघेण्याचा व्यवहार तुम्ही जा म्हणून सागता पण लोकाकडे आमचें येणेंजाणें आहे त्याची काय वाट?' **येता**-वि येणारा 'येती यासी पुसे '-नामना २ **येताजाता**-पु उतारू, मार्गस्थ, प्रवासी 'मार्गावरचा आवा हा यत्या जात्याचा ' **येताजाता**-क्रिवि नेहमीं, एकसारखें सतत 'सदा

येता जाता बसत उठता कार्य करता।' तो येता जाता बाय कोस शिव्या यतो ' [येणें+जाणें] येता पाय-पु प्राप्तीचा किंवा अनुकूल काळ येतापाया-पु चलती भरभराट [येणें+पाया] येतेकरी-पु १ येणारा २ शास्त्र, कला इ० स्वरित सपादन करणारा मनुष्य येतें द्वार-न येण्याचा रस्ता 'येतें द्वार बुझवावें।'-एहम्व १८४७ आलया-(वर्षास-महिन्यास-दिवसास-वारास)-वरी, महिना इ० येतें तमें म्हणजे सतत, नियमितपणें

येणेंकडून, येणेंकरून—क्रिवि यामुळें, याकारणानें

येणें नावें—क्रिवि यामुळें

येणेंप्रमाणें—क्रिवि ह्या प्रमाणें, एणेंप्रमाणें

येतपर्यंत, येतपावेतों—एतपर्यंत इ० पहा.

येतुरुी का—वि इतका 'चमू समुद्राची येतुर्वी।' –मुआदि ४४ ६२

येतुला—वि इतका, एवढा 'तरी तिहीं येतुला अवसरीं।' –ज्ञा १ ८७ –क्रिवि येथें [प्रा] येतुला(ले)वरी-क्रिवि इतकें, येथपर्यंत 'देवा हें येतुलेवरी। बोलावें नलगे अवधारीं।' –ज्ञा २ ३० [प्रा]

येत्न—पु यत्न, प्रयत्न 'देहे रक्षणाकारणें येत्न केला।' –राम २६

येथ—क्रिवि येथें 'श्रोते पुसती कोण अथ। काय बोलिलें जी येथ।'–दा १ १ १ [स अत्र] येथचा येथपर्यंत येथपावेतों येथवर येथील येथून येथें, येथोन येघवां, येघष्ट एयचा एथपर्यंत इ० पहा

येथा—स्त्री (व) (अप) व्यथा, रोग 'त्याला पोटाची येथा असल्याम मी दवाई देतों' [स व्यथा]

येथें—क्रिवि या ठिकाणीं [स अत्र, प्रा एत्थ] (वाप्र) येथेंच घोडें पेंड खातें-मुख्य अडचण ती येथेंच आहे, मर्मस्थान तें हेंच छिद्र कमीपणा लबाडी जी आहे ती येथेंच आहे

येदलोक—क्रिवि (व) इतका वेळ [स यावत्काल]

येद(ध)वा—क्रिवि एव्हा, या वेळीं [स यावत्वा]

येदाना येथाळ—क्रिवि एवढावळ अपक्षेपेक्षां जास्ती वेळ येदूळ-क्रिवि (कु) बऱ्याच वेळापासून [स इयत् वेला, वाढूळ]

येदो—वि (कु) एवढा [स यावत्]

येधाळा—क्रिवि (ना) या वेळीं [स यावत् वेला]

येधोळ—क्रिवि (व) आतापर्यंत [स यावत् वेला]

येन—स्त्री (व) वीण जननाचा मोसम, विण्याचा काळ [वीण]

येविन—पु पौत्र नातू 'आपाजी विन भगवतराव येविन कृष्णाजी कदम पाटील'–समा २ ३१७ [फा]

येम—पु (अप) यम 'जया नावडे नाम त्या येम जाची।' –राम १०१ [स यम]

यमाई देवी—स्त्री एक क्षुद्र देवता 'यमाई देवी म्हणे जी गुरुछत्र छाई।'–सप्र ५ १४ [यमाई]

येयां—सना याला 'किती मोडा करा येया देता। माझेनि लोभें।'–शिशु २१७ येयाचिआं-सना याच्या 'तेंइ वळी त नायका। भगें येयाचिआ क्वतिका।'–शिशु २२४

येर-रू येरी-रें—सना (व ०न) दुसरा, तो एक उल्लेख केलेला मनुष्य, अन्य, इतर 'सीता ह्मणे लक्ष्मणा धाव। येरू म्हणे राक्षसी माव।' २ हा जवळचा पूर्ववाक्यात ज्याचा नामनिर्देश केला असतो त्याचा पुन उल्लेख कर्तव्य असता ह्या सर्वनामाचा प्रयोग करितात, तो, हा तमाचि देखे येरें। निनादें अति गहिरें।'–ज्ञा १ १४६ [स अपर, अवर स अन्यतर-अण्णयर-यर=येरू] सामाशब्द- ०घर-न ब्रह्मस्वरूप ०जाजाई-पु जावयाच्या भावास तुच्छतेनें म्हणतात ०येर-वि परस्पर, एकमेक काय जिंजत असे यरयेरीं।'–ज्ञा १ ८७ ०येरा-क्रिवि १ एकमेकाशीं त्याच्यामध्यें, परस्पर येरयेरा भेटी युद्धाच्या प्रमगीं।' २ सतत नेहमीं ०धार्डा-ळो-क्रिवि (व) लौकर, वाजवीपेक्षा अगोदर [येर+वेळ] ०वाळीं-क्रिवि योग्यकाळीं, सुवेळीं लवकर जें काम रात्रीं करण्य स त्रास पडता तें दिवसा उरकून घेण्याबद्दल सांगावयाचें असल्यास उपयोग 'येरवाळी गाईस चारा घाल' येरीकडे-क्रिवि दुसरीकडे, इकडे 'राम उभे लमासी। येरीकडे जानकी।'–वसीस्व १० ७४ 'येरीकडे नृपति धाडुनि राजहसा।'–र ३० येरीमोहरा-वि उलटें, शेंडा खालीं व बुडखा वर असें भलतीकडे तोंड असलेलें 'उपडिले क्वतिकें। झाड येरी मोहरा टाके।'–ज्ञा १५ ४१ [येर=दुसरा+मोहरा=तोंड]

येरजा(झा)र, येरधार—स्त्री कपाळकाणी व निष्फळ जाये खेप हल्पाटा 'त्याची सारली येरजार। झाला सफळ व्यापार।' [येरे+जार] येरजाऱ्या-स्त्रीअव खेपा कर्में करिताना फलाशादि सोडलेली असल्यामुळें स्वर्गाच्या येरजाऱ्या न घडतां'–गी २९२

येरंड येरंडमूळ येरडी-ड येरडेल येरंड्यासाप येरमीड येरवा येरवीं, येरशेर यन्दवीं येलकी, येलची येलदोडा, येलाची येवढा, येवढाव(वे)ळ येवींन येवींतवीं येव्हा येव्हायेव्हा येव्हाशीं येळकोट येळा—एरंड एरंडमूळ इ० पहा

येरदेर—पु (गा) वारस

येरली—स्त्री १ (कु) एका माशाचे नांव २ धान्याची वगैरे

**येरवण**—स्त्री (इट) बांबूची विणलेली मोठी दुरडी

**येरवां**—क्रिवि परवा, तेरवा

**येरघान**—न (कु) लग्नात वधूवराकडून परस्परास येणारा शिधा

**येर(न्ह-वी)व्हीं**—अ विचाराअंतीं नाहीं तर 'तरीच खहेल चिंतारोग। येन्हवीं अनर्थ रोकडा।' –मुवन १८२

**येरास**—पु (गो) नातेवाईक मनुष्याची इस्टेट मिळणें, इतराश, वारसा [येर+अश]

**येरिका**—स्त्री लहडाळा, लव्हाळयाची एक जात 'समुद्र लाटांचे कपाळ। तेणें लाहचूर्ण सकळ। प्रभासे लागुनि प्रबळ। उठिले तत्काळ येरिकारूपें।' –एभा १३८२

**येरी-न्हो**—अ (ना) एरवींच उगाच

**येरव्या**—स्त्रीअव (व) चारा एवढीं एक प्रकारचीं आवट गोड फळें

**येरें, येर**—न (गो) सुकाणू **येरें भर**-न येरें धरून वमण्याचें होडीचें टोंक **येरें घुंवडावप** क्रि (गो) मार्गास लावणें, दिशा दाखविणें, किंवा फिरविणें **येन्हि**-क्रिवि येन्हवीं 'यन्हि नाकळसी कोण्हासी।' –सप्र ६ ३५

**येन्ही, येन्हवीं**—क्रिवि (व) सहज

**येल**—वल पहा

**येल(ल्)गार**—पु एलगार पहा मोहीम दौड, नगावें कूच चढाई, निकराचा हल्ला [तु इल्गार]

**येल(ल्)ची**—पु वकील प्रतिनिधि, तह ठरविणारा वकील –पया ४५४ [तु ईल्ची]

**येल्णें**—अक्रि (ना व) खोडया चेष्टा करणें, त्रास देण्याच्या हेतूनें वात्रटपणा करणें वेडेविद्रे चाळे करणें, गमजा करणें 'काहून येल्त गा! पायज (पाहिज) काय काहीं?' [वेल्हाळ²]

**येलशेल**—क्रिवि १ (व) एका टोंकापासून दुसऱ्या टोंका पर्यंत २ शताच्या धुऱ्यापासून दुसऱ्या धुऱ्यापर्यंत [शल=टोंक]

**येला**—पु एक झाड वरदोडा वेलची 'येला कंकोळ पूगीफल खदिर शशी जायपत्री लवंगा।' –सारुह ३ ४८ [म एला]

**येली**—स्त्री (व) लाकडाच्या लांब ठोकळयास चार पांच उभ्या खुंट्या बसवून कपाशी पेरण्याकरिता केलेले आऊत

**येलें**—न कच्च्या चामडयाची दोरी असलेलें नांगराच्या उपयोगाचें आऊत हें मांग लोक करितात

**येल्या**—स्त्रीअव (खा) वेला वेळा स्त्रियांचा दडामध्यें घालण्याचा चांदीचा दागिना स्त्रियांचे बाहुभूषण [वल]

**येल्हे**—पु (व) त्रास, कष्ट, हाल, येल्णें पहा 'काय येल्हे माहले त्याचे'

**येल्हावणें**—अक्रि (व) फाजीलपणा करणें, इतराजण –वशाप ५१ ४७९

**येवंच**—क्रिवि एवच, एकूण, एकदरीत, साराश [स एवम्+च]

**येवजणें**—सक्रि (गो) आटवण करणें मनात आणणें, योजणें (अप) [योजणें]

**येवतणें**—सक्रि (प्र) वेवतणें पाठीस लागणें चिडविणें, खनपटीस बसणें, त्रास देणें

**येवा**—पु १ येणें आगम आगमन, ह्या अर्थी जावा शब्दा शींच प्रयोग होतो २ दुसऱ्याकडून येणें असलेला पैसा 'पाचशें रुपये लोकाकडे येवा आहे' ३ (ल) लाभ प्राप्ति, मिळालेला नफा ४ शोभा, लावण्य, रूप, देखणेपणा 'दन ताळे सोन्यानें कसा येवा आला' योग्यता, शोभिवतपणा, प्रशस्तपणा (वस्त्रें, भूषणें यावा) 'काळचा मनुष्याला मोत्याचा येवा असतो' [येणें] म्ह० उदड खाश मेवा तर येईना अर्धभाकरीचा येवा सामाशब्द- ०जावा-पु येणेंजाणें, घरोबा, रावता, भेटीस जाणेंयेणें दळणवळण [येणें+जाणें] ०देवी-स्त्री जमा व खर्च, घेणी व देणी व्यापार ०व्यवहार [येणें+देणें]

**यें(हें)वाळें**—न (कों) पाणसर्पाची एक जात ही पाण्यात राहते

**येविं**—क्रिवि जव जों 'एथ का पा हा उगला। म्हणौनि कृष्णें यवि पाहिला।' –माज्ञा ११ १५३

**येश येशस्वी येशवान्, येशवंत, यशापेश**—यश, यशस्वी, यशवत इ० पहा

**येशेल**—न (व) गोडें तेल, खावयाचें तेल अळशीचें तल

**येस, येसकट येसण येळ येळणें येळू**—वेस, वेसकट इ० पहा

**येस**—स्त्री (खा अहिराणी) शेवाडें गाडी जाण्या इतक्या रुद जागम लावावयाचा (काठ्याचा काबटयानीं बाध लेला) दरवाजा झाप झापा फाटक [वेस]

**येसकर**—पु (व) वेसकर पहा

**येसकी**—स्त्री (पुर्वे शेतकी) मोठी शिवळ

**येसणा**—वि इतका असा 'माम' येसणा विस्तारु।' –गीता २ २२७७ [स ईदश] **येसणे** वि येवढें असें 'येसणें पतन कुळक्षयीं।' –ज्ञा १ २६१ [स ईदश]

**येसपार**—पु ठावठिकाण पत्ता

**येसर**—न १ (व घाटी) आमटींत घालावयाचें भाजलेल्या डाळ, तांदूळ इ० कांचें मिश्रण २ तिखट मसाला वेसवार पहा

**येसवा**—स्त्री १ वेश्या वेसवा पहा २ (ग्रामीण) भांड खोर, तेंडणागी, नोंबाळ बाई 'बाई येसवाच आहे' [स वेश्या]

**येसवार**—स्त्री (व) मसाल्याची आमटी [स वेसवार]

**यसान, येहसान**—न प्रसाद, कृपा, उपकार 'या गृहस्थावरी तुम्ही येहसान करून निरोप दिल्हा यामुळें तो उपकारी आहे'—ख ११६ [अर एहसान्] **येहसान्मन्दी**—स्त्री कृतज्ञता —पदमव ९९

**येसाय**—स्त्री (गो) तालीम (नाटक इ०कांची) [व्यवसाय?]

**येसूर**—न काळें तिखट, तिखट मसाला वेसवार पहा

**येळ, येळा**—न (चंद्रपुरी) वेल, सोन्याचें अगर चांदीचें कडें येल्या पहा [वेळणें]

**येळकोट-टी**—स्त्री खंडोबाचा जयजयकार; एळकोट 'लाक येळकोटि म्हणती लक्ष कोटीरे।'—आप १९ —पुष्टी नाश 'सगळ्यांच्या मदतीनें मानाचा येळकोट करण्याचें सोपें आहे'—अस्तभा ९६ [यळकोट]

**येळणी**—स्त्री वेळणी, पसरट भांडें, (चंद्रपुरी) पसरट वाटी, (व) खापराचें परळ

**येळवाळीं**—अ वेळेवारीं, योग्य वेळेला [वेळ+वार]

**येळा**—पु वेलदोडा एला 'चतुर्विध परिमळा। येळा वाळा उदादि।'—एरुस्व १४ १३६ [स एला]

**येळा**—स्त्री खाव

**येळाइतु**—पु वेळाईत पहा कैवारी साह्यकर्ता

**येळील**—वि १ अळणी येळील केलें सर्वस्व।'—दावि ४० २ लज्जित 'लोक येळील केले।'—दावि ४०

**येळिलवाणें**—वि ओशाळें 'येळिल्वाणें करू नये। आपणासी।'—दा १४ १ ५४

**यैन**—क्रिवि १ ऐन, भर मुद्दल 'साठ लाखाची बेरीज यैन व इजाफा मिळोन सिद्ध केली'—रा ७ ५३ २ तत्त्वत, मुख्यत [अर ऐन्]

**यो**—क्रि येवो (ये चें तृतीयपुरुषी आज्ञार्थी एकवचन) 'सुरर्षि म्हणतो तुझें यशचि धन्य यो गायना।'—केका ११४

**योक**—पु गिरदा, खादपट्टी 'योक प्रमाणेंच कापडाच्या लावींतून कॉलर काढावयाची असते'—शिकशि १६० [इं]

**योग**—पु १ जुळणी जोड, मिलाफ संग संयोग, संलग्नता, लग्न 'योग पुढें भृगुसवें तिचा घडतां'—मोआदि ३ ६ २ परस्पर संबंध, ऋणानुबंध संगत 'तिला महाण याचें आणि तिचा दादला मरावा असा योग होता' (समासांत) कालयोग, दैवयोग, प्रारब्धयोग इ० ३ आध्यात्मिक अथवा भाविक भक्ति अगर ध्यान, चिंतन करून होणारें ब्रह्मैक्य, ध्यानपूजा, मानसपूजा, समाधि व त्यासंबंधीं नियम व आसनें, प्राणायामादिक साधनांनीं चित्त वृत्तीचा किंवा इंद्रियांचा निरोध करणें ४ मार्ग, साधन; आत्म साधन या अर्थी भक्तियोग, कर्मयोग, ज्ञानयोग इ० 'संक्षेपानें तुमना योग अगर कर्मनिष्ठा असें म्हणतात ५ खगोलाचे २७ भाग, ज्यावरून चंद्र सूर्यांचे अक्षांश रेखांश मोजतात ते ते योग असे— विष्कंभ, प्रीति, आयुष्मान्, सौभाग्य, शोभन, अतिगंड, सुकर्मा, धृति, शूल, गंड, वृद्धि ध्रुव व्याघात हर्षण वज्र सिद्धि, व्यतीपात, वरीयान् परीघ शिव सिद्धि साध्य शुभ, शुक्ल, ब्रह्म, ऐंद्र व वैधृति असे २७ योग आहेत ज्योतिषी २८ योग मानतात ६ संबंध, जवळ येणें 'ग्रहाच कालांश (वस्तुत भोग) सूर्याच्या इतक झाले म्हणजे त्याचा सूर्याशीं योग झाला किंवा युति झाली असें म्हणतात'—सूर्य २३ ७ उपाय योजना; वस्तूचा उपयोग विनियोग; कार्यार्थ साधना, प्रयत्न ८ दक्षता, योग्यता; समत्व ९ (गणित) रकम, रास, बेरीज १० साधन; युक्ति 'एकच योग (साधन अगर युक्ति) आहे'—गीर ५६ ११ मिठी १२ कवटा १३ कार्यकुशलता १४ संधि 'योग परवा हा पुन्हां घडेना।'—दावि २४२ १५ (वैद्यक) इलाज, उपाय, औषध 'आमवायूवर एरंडेलाचा योग प्रशस्त आहे' १६ मोठा लाभ 'मग योग योग ऐसा सहसा उठला वळी महा शब्द।'—मोकर्ण ७ ३५ १७ जारणमारण, जादूटोणा १८ ईश्वरी संकल्प १९ समाधिशास्त्र २० तत्वज्ञान २१ व्युत्पत्ति, व्युत्पत्तिमूलक अर्थ २२ सूत्र नियम कायदा २३ (ज्यो) विशिष्ट तिथि वार, नक्षत्र यांचें सहचर्य योगें उदा० रविवारीं हस्त आलें असतां त्यास अमृतसिद्धि योग म्हणतात [स युज्=जोडणें] सामाशब्द— **०च्युत**-पु योगभ्रष्ट ज्ञा ६ ४४८ **०धर्म**-पु कर्तव्य, सद्गुण, अथवा योग्याचें विशेष कर्म, त्यावेळीं दहा विशेष आहेत— अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह (हे पाच यम व) शौच, संतोष, तप, स्वाध्याय, ईश्वर प्रणिधान (हे पाच नियम होत) दुसरी गणना अशी आहे— अहिंसा, सत्य अक्रोध, त्याग शांति अपैशुन, दया, अलोभ, मार्दव, लज्जा काहीं दम, क्षम अचापल्य, तेज तितिक्षा, हे यातच गणतात **०निद्रा**—स्त्री विश्वप्रलयानंतरची व विश्वोत्पत्तीपूर्वीची ब्रह्मदेवाची झोंप ईश्वराची निद्रावस्था, योगमाया सहजस्वरूप स्थिति —ज्ञा ५ ७८ **०निष्ठा**-स्त्री योगपरायणता —ज्ञा २ ३१५ **०पट्ट**-पु १ श्रेष्ठ भोग २ सन्यासदीक्षेचा एक प्रकार सन्यासानें धारण करावयाची विशिष्ट वस्त्रें ३ (ल) संन्यास घेतल्यावर त्यासंबंधीं पाळावयाचे नियम वगैरे 'त योगपटाची मवणी। जीवीं अनियम चिंतवणी।'—ज्ञा १६ ३३२ **०भूमिका** स्त्री

योग्याची विशिष्ट अवस्था, स्थिति 'द्वारदत्यांचिया प्रांगीं । मध्यें उदेला विकासी । योगभूमिका ऐसी । अंगीं बाजे ।'-अमृ७ १८५ ०भ्रष्ट-वि योगसाधनांत कांहीं प्रत्यवाय घडल्यामुळें पुनर्जन्म पाव लेला ०माया-स्त्री ईश्वराची जी मायारूप शक्ति ती, भ्रम, माया, माया व भ्रम पहा ०मुद्रा-स्त्री खेचरी, भूचरी, चाचरी, अगोचरी, आलेख इ० पांच योगमुद्रा, यांची स्थानें अनुक्रमें नादबिंदु नासिका, नेत्र, कर्ण, व आकाश हीं होत 'खेचरी भुचरी चाचरी । अगोचरी आलेख यापरी । माजी समरसली खेचरी । नादबिंदूसी ।' -कथा ७.४ ७३ ०राज गुग्गुल-ळ-पु एक प्रकारचें रसायन, मात्रा ०रूढ-वि व्युत्पत्तीनें ज्यांचा प्राप्त अर्थ व रूढ अर्थ हे जुळतात असा (शब्द) असे- अंगरखा, जलधर, पङ्कज, भूधर कांहीं शब्द यौगिक, कांहीं रूढ आणि कांहीं योगरूढ असतात ०शास्त्र-न चित्ताची एकाग्रता करण्याच्या साधनासंबंधींचें शास्त्र ज्यामध्यें प्राणायामादिद्वारां अंत:करणाच्या एकाग्रतेचा उपाय सांगितला आहे असें सहा शास्त्रांतील एक शास्त्र ०सार-पु विचार ०क्षेम-पुन निर्वाह, चरितार्थ, उदरपोषण 'याचे योग क्षेमाबद्दल मौजे बहु तर्फे पावल पैकीं इनाम' -शाछ १ २६ योगक्षेम चालविणें-एखाद्या मनुष्यास पाहिजे असेल तें मिळवून देणें, समाराची एकंदर व्यवस्था पाहणें, उदरनिर्वाहाची तज वीज करणें 'जे मला अनन्यभावें शरण येतात त्यांचा योगक्षेम मी चालवितों' योगानंद-पु योगाभ्यासानें होणारा आनंद, पांच आनंदांपैकीं शेवटचा योगाभ्यास-पु हठयोगादिकांचा अभ्यास, शिक्षण, योगशास्त्राचा अभ्यास, चित्तवृत्तींचा निरोध करून ध्यानादिकांचा केलेला अभ्यास योगायोग-पु १ दैव गति, अनपेक्षित अशी घडलेली कांहीं गोष्ट, बनाव २ अनुकूल काळ आणि प्रतिकूल काळ 'योगायोग पाहून वागावें' योगारूढ-वि. योगी, योगनिष्णात 'तोच पुरुष योगारूढ म्हणजे पूर्ण योगी झाला' -गीता ६४ योगासन-न योगाभ्यास करणा या योग्याची विशेष प्रकारच्या पद्धतीनें बसण्याची रीत योगिनी-स्त्री १ दुर्गादेवीची परिचारिका या ६४ आहेत २ योगाभ्यासी स्त्री, जोगीण [स] योगी-पु १ योगसाधन करणारा, योगमार्गास लागलेला मनुष्य -ज्ञा ६ ३९ २ योगसाधनाचा उपयोग जादुगिरीच्या रूपानें करून लोकांस चमत्कार दाखविणारा मनुष्य 'भारतीय वाङ्मयांत योगी याचा अर्थ बडा जादूगार असा होतो' -ज्ञाको (य) ६५ ३ (सामा) सन्याशी अथवा भक्त योगेश्वर-पु १ श्रेष्ठ योगी, सर्वांत श्रेष्ठ प्राणी, नावाजलेला योगी, भक्त, सन्यासी, साधु २ कृष्ण

योगें—शभ मुळें

योग्य—वि १ शोभेलसें, स्थानानुकूल 'पालखी जी आहे ही भीमतास योग्य' २ मान्य, समत रास्त बरोबर ३ अनुरूप, उचित 'या स्त्रीस हा नवरा योग्य आहे' ४ उत्कृष्ट, श्रेष्ठ 'अवघ्या मंडळींत बापुजी याचें अक्षर योग्य आहे' योग्यता-स्त्री मातबरपणा, पात्रता

योजक—वि १ कल्पना काढणारा, युक्तिवान २ व्यवस्था पक, योजना करणारा ३ जोडणारा, लावणारा वियोजक, संयोजक ४ (गणित) मिळवावयाचा, बेरीज करावयाचा (आकडा रकम) ५ (पुरीनें) शोधून काढलेलें, योजलेलें [स युज्=संयोग करणें] योजकस्तत्र दुर्लभ.-एखाद्या वस्तूचा योग्य स्थळीं व योग्य प्रसंगीं उपयोग करणारा माणूस दुर्मिळ असतो उपयोगाच्या वस्तू जगांत पुष्कळ आहेत त्यांची योजना करणारा मनुष्य मात्र मिळणें कठिण आहे' योजणूक-स्त्री योजना पहा [योजणें] योजणें-कि १ लावणें, नेमणें, कोणेकाळीं कोणेक कामीं नेमणें, किंवा स्थापिणें 'त्याजकडे पगारदार जर चांगला कणखर योजला तर पैस्याचा उगवा होईल' २ व्यवस्था लावणें, ठरवणें, रचणें ३ विचार करून ठरविणें, शोध लावणें, डोक्यांतून काढणें, युक्ति काढणें, साधन मिळविणें, कोणेक गोष्ट अशी अशी, या प्रकारें करावी इ० रूपें संकल्पिणें ४ निश्चय करणें, निश्चित करणें, नेमणें, नेमस्त करणें, ठरविणें 'तुम्ही वर योजला होता त्याचे राशकूट मिळत नाहीं' ५ देणें, ठेवणें 'यदुच्या देहीं जरति योजीन।' -मोआदि ११ ६४ ६ आश्रय करणें 'जें बुद्धियोगा योजिलें । तेचि पारगत चाइलें।' -ज्ञा २ २२७ [स युज्=योजना करणें] योजना-स्त्री १ व्यवस्था, रचना, ठराव २ बेत, धोरण, अदाज, कल्पना सकल्प, युक्ति ३ नेमणूक, लावणें, जोडणें, रुजू करणें योजित-वि १ रचलेलें, ठरविलेलें उपयोगांत आणलेलें २ हुडकून काढिलेलें, शोधिलेलें, मनानें ठरविलेलें, संकल्पित ३ जोडलेला, लाविलेला, नेमलेला, निश्चित, नेमस्त केलेला, जुळलेला जुळविलेला [स] योज्य-वि १ योजण्यास योग्य २ (गणित) जींत कांहीं रकम संख्या मिळवावयाची आहे अशी (संख्या) [स]

योजन—न १ रस्त्याची लांबी अगर अंतर मोजण्याचें माप चार कोस, नऊ मैल, कित्येकांचे मतें ५ मैल 'शक्रसभा सार्धशतक योजन दीर्घा तशीच विस्तीर्णा।' -मोसभा १ २३ २ योजना, बेत इ० [स]

योध—पु योद्धा, वीर 'हरनि यशो-धन गो-धन योध अगणित क्षयासि नेऊन।' -मोविराट ६ ५२ योधसंराव-पु युद्धतयारीची सुरवातीस सूचना देण्याचा आवाज, शख फुकणें, लढाईंत स्फुरण येण्यासाठीं ओरडण्याचा शब्द (हरहर महादेव इ०) [स] योद्धा-पु शूर पुरुष, वीर लढाऊ शिपाई, लढवय्या [स]

रणक्वंश रणगाढे ।'–एरुस्व ८१९ ०कावो–पु युद्धातील डाव, पेच 'वीरीं घेतला रणकावो । वखोनि धाविन्नला झालो ।' –एरुस्व १०६२ [रण+कावा] ०खुदळ–वि १ भाडखोर २ लड्ड व वातुळ व्यक्तीस म्हणतात ०खंदळ–खुदळ–खुंदळ–ळा, ०खुदल–स्त्रीनपु निकराची लढाई, घनचक्की, रणभूमीवरील बिनशिस्त लढाई, रणकंदन, जंगी युद्ध, दाणादाण, नाश, कत्तल 'त्यानीं फौजेंत रणखुदल वरून मारामारी केली '–भाव ६७ [स रण+खतन] ०खंद(दा)ळी–स्त्री युद्धपराक्रम, रणकंदन, मारामारी, गर्दी 'यादव उठावले महाबळी । रणखदळी करितील ।'–एरुस्व ८५६ ०खांब–पु रणस्तंभ, एकमेकावर हल्ला करून जाणाऱ्या दोन सैन्यामध्यें पुरलेला खाब, लढाईस उत्सुक झालेल्या दोन सैन्यामधील खुणेचा खाब या खावाचा सैनिकास एकत्र जमण्यास खुणेसारखा उपयोग होत असे. 'रणखाब रोविला मुकाम घोडेगाव।'–ऐपो ११८ [स रणस्तंभ] ०गंभीर–वि युद्धाच्या वेळीं न डगमगणारा, धीराचा [स] ०गारी–स्त्री मारमार –के १५३६ ०गाडा–पु १ लढाईत तोफा किंवा दारूगोळा वाहून नेणारा गाडा, बैल, घोडे यांनीं ओढावयाचा तोफेचा गाडा २ ओझें वाहावयाचे उपयोगी मोठा गाडा ०गाढा–वि कसून लढणारा 'आम्ही प्रचड धर्नुवाडे । रणक्वंश रणगाढे ।'–एरुस्व ८१९ ०घर–न रण, रणमैदान, रणभूमी 'आम्ही जातों रणघराला।'–ऐपो ११६ ०घाई–स्त्री १ युद्धातील पराकाष्ठेची गडबड, हातघाई २ जोराचा, नेटाचा प्रयत्न. ३ घाईघाईचें काम (क्रि० करणें, चालणें) ०घाड्या–वि ऐन लढाईच्या दिवशीं विश्वासघात निराशा करणारा, दगा देणारा, हातपाय गाळणारा (घोडा, मनुष्य); ऐन वेळीं अवसान सोडणारा, अवसानघातकी ०चत्वर–चत्वार–न रणांगण [स] ०छतरी–स्त्री सैन्याच्या भोंवतीं पहारा करणाऱ्या सत्र्यास उभें राहण्याकरिता केलेली तात्पुरती लाकडी खोली ०जोडवें–न पायाच्या अंगठ्यातलें चादीचें वळें ०झुंझार–पु पराक्रमी, शूर, लढवय्या किती झाले तरी स्वराज्याचे ते एक अनुभवी, कसलेले वयोवृद्ध रणझुंझार वीर आहेत '–स्वप ९६. ०झेंडा–पु ध्वज सैन्याचें निशाण, युद्धाच्या क्षेत्रावरील निशाण, खूण ०टाल–पु युद्धातील एक वाद्य ०ठाण–पु पवित्रा, युद्धाकरिता उभें राहण्याची पद्धति 'तुझे गर्वंवच छेदन करण्याकरिता रण ठाण माडून बसलों आहे '–पारिभौ ५३ ०ढोल–पु युद्धातील नौबत, मोठें ढोलगें, मृदंग; दोन्ही बाजूनीं वाजविता येणारें ढोलगें ०तुंबळ–न तुमुल, घनघोर युद्ध, जोराची लढाई, घुमश्चक्री –वि अतिशयित जोराचें (भाडण, मारामारी, कज्जा इ०) [रण+तुमुल] ०तुरा–पु युद्धात विजयी झाल्याचें चिन्ह म्हणून पागोट्यात, शिरोवेष्टणात खोचण्याचा तुरा, दागिना इ० ०तुरा–तूर्य–पुन रणात वाजवावयाचें वाद्य 'रणतुराचेनि बंबाळें । भीडींनिर्ली दोनि दळ ।'–शिशु ८७६ ०तुरा लावणें–क्रि पराक्रमी वीराप्रमाणें डौलात चालणें, जाणें, मिरविणें ०धीट–वि युद्धात ज्यास भय वाटत नाहीं असा ०धीर–वि. रणगंभीर पहा [स] ०धुमाळी–स्त्री धुमश्चक्री, हातघाई निकराची लढाई, युद्धातली गडबड ०धेंडा–पु लग्नात पधुवराम खाद्यावर घेऊन नाचतात त्या प्रमाणें रणात नाचणें 'ऐसेंनि लग्न लागलिया पुढा । रणीं नाचेल रणधेंडा । मोवाळणी बाणें प्रचडा । परस्परें पडतील ।'–एरुस्व ४४० ०नवरा–वि १ मर्द, शूर, उत्साही (वीर) २ स्वारीवर असता अथवा हिंडताना ज्याला आपल्यापुढें वाद्यें वाजतगाजत ठेवण्याचा अधिकार अथवा मान आहे असा (योद्धा) ३ स्फुरण येऊन लढणारा, सेनापति, पुढारी, लढवय्या 'अखड रणनवरा।' –दावि १७६ ४ बेफाम, बेहोष ०पंडित–पु लढवय्या, युद्ध कलेंत निष्णात, सफाईनें शस्त्र चालविणारा [स.] ०पिसा–न युद्धाचें वेड लागलेला 'एक ते रणपिसेचि जाले । कवर सोडूनि मोकळे ।'–गीता १४८८ ०प्रसंग–न युद्ध, लढाई 'एकदोन वेळा रणप्रसग पाहिल्यावाचून कोणी धीट होत नाहीं ' [स] ०फंदी–पु रणशूर, लढवय्या, युद्धाची आवड असलेला 'जिवबा दादा ते रणफंदी।'–ऐपो २६७ ०बहिरी–स्त्री रणभेरी, एक मोठें कर्ण्यासारखें वाद्य 'कर्णे किती एक रणबहिरी वकेती।' –ऐपो ११९ –वि रणशूर, लढाईत धीट असलेला [रणभेरी=रणवाद्य] ०बावरा–वि १ लढाईसाठीं अथवा युद्धासाठीं बेफाम २ (ल) भयकर उतावळा, अत्यंत उत्सुक ०बोका–वि १ गलेलठ्ठ, गब्बू व अधाशी आणि विषयी (प्राणी) २ फार मोठा (खाव, तुळई, ओझें इ०) ०भीत–वि युद्धाला भिणारा, रणभीरु [स] ०भूमी–स्त्री युद्धस्थळ, युद्धाची जागा, रणांगण. [स] ०भेरी–स्त्री रणबहिरी (–स्त्री) पहा 'सोनजी भापकर मानाजी पायगुडे रणात राहिल्या रणभेरी।'–ऐपो १३५ [स] ०मंडल–ळ–न १ एक प्रकारचा व्यूह, योद्ध्याची वर्तुळाकार उभारणी २ रणभूमी; रणमैदान, रणांगण 'रणमडळीं रघुवीर । ऐका कैसा शोभला ।' ०मोहरी–मोहूर–स्त्रीन रणवाद्य 'राजे गिडगिडिलीं रणमोहरी ।'–शिशु ५१६ ०यज्ञ–पु युद्धरूपी यज्ञ–होम 'गाठी आराधाया रणयज्ञें करुनि सिद्ध कटकातें।' –मोभीष्म ५१ ०यूप–पु दोन्ही सैन्याच्या मधोमध खुणे करितां उभारलेला खाब, रणस्तंभ [स] ०रंग–पु लढाईची हातघाई, घनचक्कर; युद्धाचें भीषण स्वरूप, युद्धाचा भयंकर देखावा, युद्धाच्या वेळची गडबड, गोंधळ ०रंगधीर–वि रणामध्यें धीट, वीर, रणवीर, युद्धात पराक्रम करणारा ०वट–पु रणांगणातील स्थान 'कीं हा (मुकुट) माथां असता रणवट । न भंगे तुझा ।' –कथा २४१२८ ०वाद्य–न लढाईतील वाद्य, ढाल, दुंदुभि

इ० [ सं ] ०विद्दान-न युध्दकौशल्य 'गदें घातली आपुली आण। रणविंदान पाहे माझें।' -एरुस्व १० ३८ ०शिंग-न. रणाच्या वेळीं योद्धयांना बोलावण्यासाठीं, उत्साह देण्यासाठीं वाजवितात तें शिंग [स. रणशृंग] ०शूर-१पु योद्धयाच्या शुभलक्षणापैकीं गणलेला, मानिलेला एक गुण -वि २ युध्दांत धीट, पराक्रमी, माघार न घेणारा, वीर [स] ०शौंड-वि युध्दकलानिपुण, विक्रमशाली [सं] ०संकुल-न हातघाईची लढाई [स] ०सज्जा-स्त्री युध्दकाळचा पोषाख, समरशोभा [स] ०सांडी-स्त्री पराभव 'होईल आता रणसांडी।' -उषा १७४३ ०सौरा-वि रणशूर 'आनंदें नाचत रणसौरे।' -निगा ६१ ०स्तंभ-पु १ रणयूप पहा २ स्मारकासाठीं उभारलेला खांब, स्मृतिस्तंभ [सं] ०हलकी-गी-स्त्री एक प्रकारचें रणवाद्य. ०क्षेत्र, रणांगण-न रणभूमि [स] रणालगी-स्त्री (वे) टिमकी [रण+हलगी] रणोत्साह-पु युध्दाची आवड, गोडी

रणांग, रणाग, रणाग-स्त्री फोड येतात आणि आग होते असा एक रोग, खवडे इ०

रणदिस होणें-( माण ) बेजार होणें, थकणें, रडीस येणें

रणरण-स्त्री भयंकर उन्हाचा ताप, कडक ऊन [ ध्व ] ०करणें-अक्रि. मध्यान्हसमय, ऊन, निखार, ज्वरविशिष्ट शरीर इ०कानीं स्पर्शन-दर्शनादि करण्यास अशक्य पडायाजोगी अतिसतप्तता पावणें, भयंकर तापणें, जळणें ( सूर्य, तापातील शरीर, अग्नि, यानीं ) रणरणणें-अक्रि १ जळजळणें, अत्यंत तप्त होणें ( झळीनें ), अतिशय उष्णता वाटणें, उकडणें २ ऊन निखारे, सूर्य, अग्नी इ०कानीं अतिशय सतप्त होणें रणरणीत-वि अतिशय जळजळीत, कडक, प्रखर ( सूर्य, ऊन्ह, अग्नि, दुपार इ० ) रणरणीत उन्हाळा-पु उन्हाळ्यातील कडकडीत ऊन्ह, उष्ण झळा, ( सामा ) द्वेषांतील प्रखरता रणरणीत दुपार-स्त्री उन्हाळ्यातील ऐनदुपार, मध्यान्हसमय

रत-न १ संग, संयोग, सुरतभोग, मैथुन २ करमणूक -वि. रमलेला, रममाण झालेला, निमग्न, गुगून गेलेला तल्लिन, अनुरक्त 'ज्याचें कृष्णीं तन मन जालें रत।' -तुगा १२ ( समासांत ) कामरत, कर्मरत विषयरत, स्त्रीरत, दान-धर्म भक्ति-रत [स रम्=खेळणें क्रीडा करणें] रतणें-अक्रि १ आनंदित होणें २ आसक्त होऊन खेळणें रममाण होणें सहजासहजीं गुंग होणें 'चित्तवृत्ति रतली हरिपायीं।' ३ भटकणें वागडणें करमणूक करून घेणें ४ मैथुनात आसक्त होणें, विषयसुखात निमग्न होणें, संभोगणें [स रम्, रत]

रतन-न रत्न मौल्यवान पदार्थ [स रत्न] ०आवली-स्त्री ( गो ) एक फुलझाड, त्याचें फुल ०कूप-कुड-न उत्तम पोसलेला, पिकलेला आणि तेजस्वी आंबा, पेरू इ० फळ ०गुंज-स्त्री गुंजेचा एक प्रकार, ढोरगुंज रत्नगुंज पहा ०जोत-स्त्री १ डोळ्यास थंडावा आणणारें एक औषध २ वैदूची काडी ३ ( ल ) घणघणीत, हुषार मुलगा, वगैरे 'तट्ट माझा रतन जोत' -ज्ञाटिका [ रत्न+ज्योति ] ०जोध-न कमळबीज -मुव्या १३२ ०पारखी-पु रत्नाची परीक्षा करणारा, हिरे, मोतीं, माणिक इ०ची पारख असलेला ०बाग-स्त्री ( राजा ) पाटाचें पाणी आत घेऊन बाग शिंपण्यासाठीं केलेला खळगा, विहीर, खाच

रतनाळ-ळूं-ळें-न ( ना. व ) राताळें [ रतन+आळु ]

रतन्या-पु ( व ) शिरा घोटण्यास केलेला मोठा लाकडी सराटा

रतल, रत्तल-पु १ सुमारें १५ औंसाचें म्हणजे ३६ सुरती रुपयाइतकें वजन, कांहींच्या मतें १६$\frac{2}{3}$ औंस, तर कांहींच्या मतें १२ औंस, सध्या ४० रुपये भाराचें वजन प्रमाण मानतात २ ( सामा ) अर्धा शेर, पौंड [ अर रत्ल ]

रताजळी-स्त्री रक्तचंदन -मुव्या १६३

रताळूं, रताळें-न एक कंद, गोडा बटाटा, पांढरें व तांबडें अशा याच्या दोन जाती आहेत [स रक्तालु] रताळी-स्त्री रताळ्याचें झाड, वेल

रति-ती-स्त्री सद्दी, नशीब ( क्रि० फिरणें, अनुकूळ होणें ) 'पहिल्यानें जुगारात मला रती अनुकूळ होती' -बाळ २ २ 'रति फिरली, सारांश मिळाले लोक अपूज्याला -ऐपो ३६६ [दैवाची रति याचा संक्षेप, स रति] ०वंत-वि दैववान, भाग्यशाली 'रतिवंत महाराज पेशवे माधव विष्णु अवतार' -ऐपो ४३९

रति-स्त्री १ कांहीं विषयाच्या ठायीं प्रीतिपूर्वक आसक्ति, इच्छा 'कुकर्मीं रति घडे।' ज्ञा ३ ८९ २ मैथुन, संभोग, स्त्रीसंग 'रतीचिया बेटा। आदळती कामाचिया लाटा।' -ज्ञा ७ ७४ ३ मदनाची, कामदेवाची स्त्री ४ विषय, कामवासना, कामेच्छा, शृंगाररसाचा स्थायीभाव ५ आनंद, सुख ६ क्रीडा, विलास [ स ] ०चळ-पु काम, विषयलालसा 'नाहीं तीळ रतीचळ। तुझी कळा अचळ।' -पला १४ ०नाथ-पु मदन [स] ०राय-पु ( महानु ) मदन ते रतिरायाचें माराक कासी। तरि कवण विषयविरु हातवसी।' -भाए ४४५ ०युध्द-न संभोग, सुरतक्रीडा -नि ८७५ ०रोदन-न प्रथम रति प्रसंगींचें रुदन [ स ] ०सुख-न संभोगजन्य सुख, कामशांति [ स ]

रति-ती-स्त्री १ हिरे, मोतीं इ० वजन करण्याची एक गुंज २ ( ल ) वजन करण्याचें अगदीं लहान ( काल्पनिक )

प्रमाण सुमारें १॥ गुंज किंवा २। ग्रेन ४ गहूं किंवा १६ तदुल= १ रती, २४ रती=१ टाक, ६० किंवा ६४ रती=१ तोळा [स रक्तिका=गुंज] ०रति-क्रिवि अगदीं बारीक बारीक 'रति रति मासतुकडे करोनी। जळचरांतें घोपीतसे।'-नव २१ १४०

रतीव—पु १ उक्ता, रोजीं नियमित खावयाचें अन्न वगैरेचें प्रमाण, ठराविक वर्णे, खाणें, इ० (क्रि० लावणें) २ रोज नियमित खर्चास घेण्याचा पदार्थ ३ खुराक, पौष्टिक अन्न [अर रातिब, रातिबा]

रत्न—न १ हिरा, माणिक, पाच इ० मूल्यवान खनिज पदार्थ, (हिरा, पाचु माणिक पुष्कराज, नीळ, गोमेद, लसण्या प्रवाळ इ०) २ (ल) कोणेक जातींतील, समुदायातील किंवा वर्गातील रत्नाप्रमाणें उत्कृष्ट व्यक्ति उदा० पुत्ररत्न, कन्यारत्न, अश्वरत्न, 'सखाराम बापू म्हणजे एक रत्न आहत'-इप ७१ ३ (ल) शोभा देणारा, सौंदर्य वाढविणारा, ससार, सभा इ०स ज्याच्या योगानें शोभा येते असा पदार्थ 'ससारात मूल हें रत्न आहे' ४ समुद्रमथनापासून उत्पन्न झालेले चद्र, अमृत, लक्ष्मी इ० चतुर्दश पदार्थ ५ (उप) मूर्ख मनुष्य 'दूर प्रजेचें दुर्दैव म्हणून हे रत्न या गादीला लाभलें'-विक्षिप्त १ १७ ०खचित-जडित-वि हिरे, माणकें इ० रत्नें बसविलेले, जडा वाचें, रत्नें बसविलेला (सोन्याचा दागिना, सिंहासन इ०) [सं] ०गुंज-एक झाड याला लाल शेंगा येतात एकएका शेंगेंत ८।१० गुंजा असतात सुवर्णकार सोनें, रुपें तोलावयास याचा उपयोग होतो, वाल ०त्रय-त्रितय-न जैन धर्मातील सम्यक् दृष्टि सम्यग्ज्ञान व सम्यक् चारित्र्य हीं तीन अमोलिक तत्त्वें [स] ०दीप-पु दिव्य सारखा लखलखीत प्रकाश देणारें रत्न, स्वयप्रकाशी रत्न अशा प्रकारचीं रत्नें पातालात असल्या बद्दलच्या कथा आहेत ०पारखी-वि रत्नाची परीक्षा करणारा ज्यास रत्नाची पारख आहे असा ०घाटी-स्त्री हिरे इ० रत्नें बसविलेलें वाटीच्या आकाराचें भाडें [स] ०सानु-पु मेरु पर्वत [सं] रत्नाकर-पु १ रत्नाची खाण २ (ल) समुद्र (तळाशीं रत्नें असतात म्हणून) ३ रामेश्वरापासून अलीकडील पश्चिमेच्या आगचा जो समुद्र तो [रत्न+आकर] रत्नाकर-आळविणें-पु (समुद्र शात करणें) काम न करतां (रडत खोकत) परत येणें, अपयश घेऊन येणें 'हा रडतोंड्या खरा जर्थे कामास पाठवावा तथून रत्नाकर आळवीत येतो' [स] रत्नाचल-पु मेरु पर्वत -ज्ञा १८ ३५ [रत्न+अचल] रत्ना-भरण-न जडावाचें भूषण [स रत्न+आभरण]

रत्नी—स्त्री १ नाचणी धान्याची एक जात २ माकडाच्या खेळात माकडीला दिलेलें नांव [सं रत्न]

रत्य—पु ठराव, करार 'मुरादखानानें वाजीद अलीला नावीं फार रत्य केला आहे'-रा १ १९४ [अर रत्म्]

रथ—पु १ राजा, देवाची मूर्ति इ०ची मिरवणूक ज्या गाडींत निघते ती गाडी २ घोड्यानीं ओढीत न्यावयाचें राजादिकाचें वाहन, राजेशाही गाडी ३ लढाईंतील वाहन, आत बसून लढण्याची गाडी ४ रथी, रथावरील योद्धा 'मजवासी दूत मदथा वाहो।' -मोशल्य ३ ६ ५ पृथ्वी 'चविंत रथ रथाचा नाथ सतुष्ट मोदें।'-मुरा, बाल १०२ [स] ०कार-कारक-पु १ रथ घडविणारा सुतार, गाड्या तयार करणारा २ एक जात, हिचा उद्भव माहिष्य जातीचा पुरुष व करण अगर उग्रक जातीची स्त्री असा दाखल्याप्रमाणें आहे ०भार-पु जीत रथासारखीं वाहनें आहेत अशी युद्धसामुग्री [स] ०यात्रा-स्त्री जगन्नाथादि देवाच्या मूर्तीची रथांतून मिरवणूक काढण्याचा समारभ ०सप्तमी-स्त्री माघ शुद्ध सप्तमी या दिवशीं सूर्य रथावर आरोहण करतो अशी कथा आहे, या वेळपासून दिवस वाढत जातो [स] रथांग-न १ रथाचा भाग, चाक, जू वगैरे रथ गाडा मेळावा। जेवीं रथु म्हणिजे पाडवा। का अधोर्ध्व अवेवा। नाव देहीं।'-ज्ञा १३ १५१ २ चक्र, विष्णूचें सुदर्शन [स रथ+अग] रथी-पु १ रथात बसणारा, रथाचा मालक मुख्यस्थानीं रथावर बसणारा योद्धा २ रथात बसून एकटा लढणारा वीर रथोद्धता-स्त्री एक समवृत्त, ह्याच्या प्रत्येक चरणात ११ अक्षरें आणि र न र ल, ग हे गण असतात उदा० 'मोकळा करुनि कठ तेधवा।'-वामन भरतभाव १६ [रथ+उद्धता] रथोत्सव-रथोत्साह-पु देवाची मूर्ती रथात बसवून मिरवणूक काढण्याचा समारभ रथयात्रा पहा. [स रथ+उत्सव] रथ्य-पु गाडीचा घोडा [स]

रथ्या—स्त्री राजमार्ग, हमरस्ता [स] रथ्योदक-न रस्त्यावर वहाणारें पाणी 'तव जैसी रथ्योदकें सकळें। घऊनि गंगा समुद्रीं मिळे।'-ज्ञा ५ ११४ [स रथ्या+उदक]

रद, रदन—पु दात, दत [स] रदी-पु हत्ती

रद, रद्द—वि १ काढून टाकलेलें वातल २ फेंकलेला, बाजूस सारलेलें ३ खोडलेलें, नामंजूर ४ निरुपयोगी झालेलें टाकाऊ (क्रि० होणें, पडणें, असणें) 'ही चागली पोथी मिळाल्यापासून ती पहिली रद्द पडली'-स्त्री परतवेणें फेड [अर रद्, रद्द] ०कर्ज-न १ (हि) कर्जमुक्त झाल्याची स्थिति, ऋणमुक्तता २ कर्जफेड 'बाकी राहील ऐवज रदकर्जास लावून देतो'-ख ८ ४३२२ ०कर्जा-स्त्री कर्जाची फेड ०जबाब पु (कायदा) प्रत्युत्तर [फा] ०यातल वि (कायदा) कायद्यानें अमलात आणताच येणार नाहीं असा करार -घका ९२ रद्दी-स्त्री निरुपयोगी झालेल्या कागद इ०चा समुदाय रद्द पहा -वि त्याज्य कवडीमोल

**रदबदल-ली**—स्त्री १ मध्यस्थी, तहाची वाटाघाट, तह चर्चा 'सोंवेकरी याची रदबदल लागली असे '-पया ६९ २ वकिली; शिष्टाई, तरफदारी 'केली गोष्ट सुधरावी म्हणजे त्याची रदबदल न चालेल असा विचार काय आहे ? '-ख ५ २३५७ ३ एखाद्याला भीड घालणें, मनवळवणी [फा रद्द-उ-बदल]

**रंद-ध**—पु गळू, फोड, इ०मधून निघतो तो रक्तमिश्रित पू, ल्स 'त्याच्या कानात रद फार झाला आहे '[स रद्?]

**रदळ**—वि (मुंबई) पाणेरडा, गदळ [रद्द]

**रदा, रंदागोल**—पु (प्र) रधा, रधागोल पहा

**रदाळ्या-ल्या**—वि रटाळया पहा

**रद्दा**—पु १ माती, शेण इ०चा तुडवून तयार केलेला गारा, चिखल (इमारतीसाठीं) २ (व) पेंड, दडपण ३ लगदा, गरगट. [स रद्=फोडणें ?] चुन्याचा रद्दा-चुन्यात वाळू आणि पाणी प्रमाणात घालून तें मिश्रण घाणींत घालून तयार केलेला चुना

**रंधन**—न १ शिजविणें, राधणें, पाकक्रिया २ शिजलेले पदार्थ, स्वयपाक 'कि धाला चैसे पाठीं । रधनाच्या ।'-अमृ ५ ६४ **रधप**-न (को) १ शिजवून केलेला स्वयपाक २ शिजविलेले पदार्थ राधप पहा **रधपी**-पु आचारी, स्वयपाकी राधपी पहा

**रधवणें, रधविणें**—कि १ (सामा) रुधविणें रुधे असा करणें, रुधणें पहा २ (व) सतावणें, रडकुंडीस आणणें, त्रास दिणें [स रुध्]

**रंधा**—पु १ सुताराचें लाकूड साफ सपाट करावयाचें एक हत्यार याचे प्रकार-वजी, गोल्या, खोल्या एकधडया वाकडा २ त्या हत्यारानें लाकूड साफ करण्याचा केलेला सस्कार (क्रि० करणें) [फा रन्दा] ०गोल-पु लाकडाची कड गोल व साफ करण्याचें हत्यार ०गोलची-स्त्री काठ कड रध्यानें गोल करणें, रध्यानें केलेली गोलाकार वस्तूची साफसुफी (क्रि० करणें) ०पट्टी-स्त्री गिलावा साफ करण्याची पट्टी **रधणें**-कि लाकूड रध्यानें साफ करणें रधा फिरविणें [रधा]

**रध्र**—न १ छिद्र भोंक, वेज २ भगदाड, डोंगरातील गुहा ३ (ल) व्यग, उणीव दोष न्यून, विंग ४ (ल) नाजूक भाग, मर्म, वर्म [स] ०शलाका-स्त्री छिद्र पाडण्याचें हत्यार **रध्रान्वेषण**-न १ भोंक, छिद्र शोधून काढणें २ न्यून पाहणें, उणीव विंग, मर्म शोधणें हुडकून काढणें [स] **रध्रान्वेषी**-वि छिद्रान्वेषी, दोष काढणारा [स] **रध्रिका**-स्त्री एक वाद्य 'ढोल दमामे मृदग चग । शख रध्रीका स्वरशृग। -स्वादि ८ ५ ९५

**रनाळा**—पु (कों कुलाबा) उन्हाळा [रण] **रनाळी**-स्त्री उन्हाळी

शको १ २५

**रन्नावणें**—अक्रि (व) १ आळसावणें, सुस्त बसणें २ शेफारणें, माजणें 'फार रन्नावलास तू, तुला वाटवर आणिलें पाहिजे '

**रप, रपका**—पु १ धपाटा, गपका, गुद्दा, चापट २ मऊ, ओलसर पदार्थ हापटल्याचा होणारा आवाज ३ मऊ व कठिण पदार्थांच्या सयोगानें निघणारा आवाज [ध्व रप]

**रप-कन-क्न-कर-दिशीं**—क्रिवि धपाटा मारल्यानें, ओलसर, मऊ कठिण पदार्थांशीं घासून गेल्यानें, चिखल वगैरे पदार्थांत पाय गेल्यानें पडल्यानें इ० प्रसगीं होणाऱ्या झपाट्याचें व तीक्ष्ण आवाजाचें अनुकरण करून [ध्व]

**रपाटा**—पु चपराकचा जो मोठा प्रहारतो रपदिशी आवाज होऊन मारलेला, गपका; गुद्दा 'कुरुपतिस दिला भीमें उग्र गदेचा असा रपाटा कीं । '-मोगदा ३ २२ २ एखाद्या वस्तूचा आकार सामान्य आकारापेक्षा एकदम मोठा दिसल्यास योज तात 'कवडी चोरली रपाटा भाकर हो ! ' ३ वेग, चलाखी, भयकर जोर जींत आहे अशी क्रिया ४ झपाटा पहा **रपाटणें रप टणें**-कि १ दपटणें, रगडणें २ एखादी गोष्ट, एखादें काम तडकाफडकी घाईघाईनें र्मा । आचरटपणानें करणें त्वरेनें करून टाकणें उदा० हाकत रहाणें ढकलणें, हात उगारणें, बलात्कार करणें इ० रगडणें पहा [रप] **रपाटखान**-वि सामान्य प्रमाणा पेक्षा, नेहमींच्या अगर योग्य आकारापक्षा भयकर वाढ झाली असता योजावयाचा शब्द; गब्दुलखान [रप, रपाटा] **रपा-टून** क्रिवि सपाटून रगडून पहा [रपाटणें] **रपाट्या**-वि रगडया पहा [रपाटणें]

**रपापा रपा(प)रप रपरप**—क्रिवि भराभरा एकसारखे केलेल्या आघाताच्या आवाजाचें अनुकरण करून (क्रि० मारणें, धोपटणें)

**रपटा**—पु गूळ, चिंच, चिखल वगैरेचा केलेला लिबलिबीत, पातळ लगदा

**रपाळें**—वि (कुलाबा कों) अवाढव्य, अगडबब

**रपेट**—स्त्री १ (हिं) घोडदौड, दौड २ व्यायाम, सहल ३ घसरती जागा [हिं]

**रपोट**—पु अहवाल, वृत्तात -पैमा [इ रिपोर्ट]

**रफडा**—पु (व) धामधूम **रफरफ**-स्त्री १ अत्यत अव्यवस्था, सावळागोंधळ २ नाश चुथडा, विधडणा; पूर्ण विध्वस; नासाडी (काम, धदा ससार इ०ची) [ध्व]

**रफल**—स्त्री (काश्मिरी) हलकी लोंकर

**रफा**—पु १ विचका, बिघाड, चिवडा २ डिवचाडिवच, कालवणें व टाकून देणें; मारतेंरें, नाश, मचका 'काय भाताचा रफा करून टाकलास हा ' ३ निराकरण 'थोडेच दिवसात सलहा

रफादी होईल '–रा ५ १५७ [अर रफअ] ०तफा–रफारफा पहा ०दफा–स्त्री १ चिवडाचिवड, खिचडी, काला २ अव्यवस्था, गोंधळ ३ नासाडी [अर रफ़अ–द्वि] **रफादफा, रफेदफे**–स्त्री १ निवाडा, उरक, निकाल 'असें जाहल्यास मागील रफेदफे करून त्यासही भेटीस बोलवावें '–रा १ २८९ २ (कर्जाची) फेड, निवारण 'देणेदाराची कोचवण किती आहे याची रफेदफे धनी अथवा आपण करून मला मोकळें करावें '–होकै २० –वि. निकालात काढलेलें, उरकलेलें, पार पाडलेलें [अर रफ्अ द्वि] **रफे–खल(लि)श–पु** वैराचें निराकरण 'आमची त्याची रफे–खलिश व्हावा ऐसें वेतात आणिलें आहे '–ऐकिप्र ४१ [फा रफ–इ–खलिश्] **रफे–शर**–पु वैराचें निराकरण 'रफे–शर केला व तस्फियाचा नक्शा ठरविला '–बाडकैफियती १०० [अर शर्र=वाईटपणा, रफ–इ–शर्र]

**रफाकत, रफीक्त**—स्त्री स्नेह, सख्य, मैत्री 'तुम्ही इंग्रेजाची रफाकत करणें ठीक नाहीं '–दिमारा १ १२३ 'म्हणजे आम्ही रफीक्तींत राहू '–दिमरा १ २०७ [अर रिफाकत्]

**रफाड**—न (व ना) मोकळें मैदान, खुली जागा 'गावाच्या बाहेर रफाड आहे तेथें शाळा बांधावयाला जागा ठीक आहे '

**रफायत, रफाहीयत**—स्त्री भरभराट 'विफायत सरकार व रफायत राया (र आया=प्रजा) अमलात आणोन '–रा १५ ११३ 'आपले रयासतीची वदोवस्ती व खल्कखुलाचे रफाहीयतीवर असावें '–वाडसमा १ ३२८ [अर रफाहत्, रफाहीयत्]

**रफीअल्कदर**—वि उच्च दर्जाचा, अत्युच्च, एक पदवी –इम ६५ [अर रफी उल्कद्र]

**रफिक, रफीक**—पु स्नेही, मित्र, रक्षणकर्ता, सामील, दोस्त 'हल्लीं रफीक होऊन सेवा करून दाखवू '–इम २६० [अर रफीक]

**रफू**—पु स्त्री १ कापडाचें छिद्र विणून बुजविणें, तुणणें, वस्त्राचें छिद्रादि बुजविण्याकरिता युक्तीनें सुतें भरून सधान करण्याचा एक प्रकार २ या क्रियेनें युक्त असा वस्त्रभाग ३ जुन्या छपरावर नवीन गवत व पानें पसरणें (क्रि० करणें) [अर रफ्व, फा रफू] ०करी, ०गार–पु रफू करणारा, रफूचें वसब करून उपजीविका करितो तो, तुणणारा [फा रफूगर]

**रफूचक्कर होणें**—वि (व) पळून जाणें

**रफूक**—पु मेहेरबानी स्नेह 'एक ठिकाणी रफुकाचें कल्म असावें –पया २११ [अर रफ्क]

**रफ्त**—पु १ चाल, रीत 'राव पन्त प्रधान यांजकडील सर्दारांसीही रफ्त आदनाईचा आहे '–रा ५ १०१ २ व्यासग, परिपाठ 'अलीकडे घाड्यावर बसण्याचा माझा रफ्त मोडला ' ३ जाण्यायेण्याची वहिवाट [फा रफ्त]

**रब**—स्त्री (व) चाल, रीत [स रव किंवा फा रफ्त]

**रबक**—न एक तंतुवाद्य, सारंगी [अर रबाब, फ्रेंइ रेबेक]

**रब–कण–कन–कर–दिशी**—रपकन इ० पहा **रबका**–पु १ रपाटा, धपाटा (आवाज होईलसा) (क्रि० मारणें, देणें) २ कोणताहि अवाढव्य, अगडबंब पदार्थ

**रबगा**—पु (व) दरारा

**रबडगा**—पु १ अनेक कामाचा दबदगा रगाडा, रगडा २ कामाची गर्दी, गडबड, घाई इ०

**रबडणें**—अक्रि रखडणें, फार काम, कष्ट करणें किंवा सोसणें.

**रबडा**—पु चिखल, रदा, गारा [ध्व रब!] **रबडा काढणें–लावणें**–(माण) एखाद्या झाडाचें मूळ अथवा साल उगाळून गध काढणें

**रबडी**—स्त्री (उ हिं) राबडी, दुधावरची मलई, कढईच्या बाजूला लागून वाळल्यावर कढईत राहिलेल्या दुधात ती मिसळून व साखर घालून बासुदीसारखी तयार करितात ती (सामा) बासुदी, आटीव दूध [राब, हिं]

**रबर**—न १ एक प्रकारच्या झाडाच्या चिकापासून होणारा पदार्थ, रबराच्या अगच्या चिवटपणामुळें त्याचा पुष्कळ उपयोग होतो शाई–पेन्सिलीनें लिहिलेलें यानें पुसतात

**रबर**—न जाड, हलक्या प्रतीचें भरड, नि सत्त्व अन्न [भरड]

**रबरब–रबा**—क्रिवि चिखलातून चालताना, चिखलात पाय रुतताना होणा–या आवाजाचें अनुकरण [ध्व रब!] **रबरबीत**–वि गोळा करू गेलें असता होऊ नये इतका पातळ झालेला (चिखल, पीठ इ०) [रब]

**रब(ब्ब)ल**—न (व) भिंत रचण्याचे किंवा सडकवर घालावयाचे अनघड दगड, ओबडधोबड दगड, डबर 'सडकेवर रबल पसरण्याचें काम चालू आहे [इ]

**रंबाट**—न (बे) कामाची गर्दी

**रबाब**—न एक तंतुवाद्य लाकूड कोरून हें तयार करतात व गजानें वाजवितात [फा]

**रबाब**—पु १ (प्र) रुबाब, धाक, दरारा 'रबाब पूर्ववत् जमून हुजुरास आले '–होकै २९ २ डौल, ऐट [फा रू=चेहरा+आब=तेज] **रबाब–रुबाब बसणें**–(व) धाक, दपटशा दाखविणें

**रबिना**—पु राबता पहा

**रबिलाखर**—पु अरबी वर्षाचा चौथा महिना [अर रबी–उल्–आखिर्]

**रविलावल, रविलोवल**—पु अरबी वर्षाचा तिसरा महिना [ अर रबी-उल्-अव्वल ]

**रबी, रब्बी, रबीधान्य**—स्त्री पर्जन्यकाळच्या अखेरीस पेरून वसंतऋतूंत कापावयाचें धान्याचें पीक, वैशाखी पीक 'वैशाख फलम्' -राव्य ९ १२ याच्या उलट खरीफ 'गारा फाल्गुन मासीं पडल्या, रब्बी बुडाली '-रा ३ १६४ [ अर रबीई=वासंतिक ]

**रबीसोस**—पु ज्येष्ठमधाचा शिरा -मुव्या ११३

**रबुका**—पु रबका पहा

**रबूक**—वि विशाल, प्रचंड, फारच अवाढव्य ( वाडा, पशु मनुष्य, वस्तु इ० ) २ अत्यंत विपुल, समृद्ध, भरपूर ( माल, पाणी पीक, आवे इ० )

**रबेत-द रबेता-दा**—पु १ जोराचा रट्टा किंवा तडाखा, ठोसा ( आवाज होईल इतक्या जोराचा ) ( क्रि० मारणें देणें ) २ रावता, वहिवाट, प्रघात, चाल ३ व्यासंग, सवय [ अर रबूत, रफ्त ]

**रबेत-द**—वि अवाढव्य, मोठा, राक्षसी, प्रचंड

**रब्बा**—पु अफूच्या बोंडावरील रस काढून तो मडक्यांत भरून त्याची अफू वरताना तो पातळ कापडाच्या थैल्यांत घालतात या रसाचा जो भाग थैल्याच्या बाहेरच्या अंगास यऊन चिकटतो ता -कृपि ५०७ [ अर रुब्ब्=रस ]

**रंभा**—स्त्री १ कदलीवृक्ष, केळ 'जाणिजे योगपीठीचा भेखु। काय हा आरंभ रंभेचा गोंखु।'-ज्ञा ६ ४६२ 'जैसी रंभा ताडिली। शुंडादंडें वारणें '-ह २ १३४ २ स्वर्गातील सुंदर स्त्री, एक अप्सरा, देवांगना 'नाना रंभेचनिही रूपें। शुक्रीं नुठिजेचि कंदर्पे।'-ज्ञा १६ १२७ ३ वेश्या ४ ( उप ) स्थूल कुरूप व अव्यवस्थित वस्त्राची, पिंजारलेल्या केसांची बाई, विशेषत मुलगी [ स ] ०तृतीया-स्त्री १ मार्गशीर्ष शुद्ध तृतीया २ या तिथीचें व्रतविशेष ०नंदन-पुत्र-पु कापूर 'अग्नीस विझवावया रंभानंदन। आवर्दोवरून लोटला।'-रावि १४ १७६

**रंभा**—पु ( चांभारी ) कातडें कापण्याचें एक हत्यार हें रापीहून वेगळें असतें -स्त्री गवत काढण्याचें खुरें ०पुतळा-स्त्री खुरपें

**रमजान**—पु अरबी वर्षाचा ९ वा महिना या महिन्यांत मुसल्मान लोक दिवसा उपवास (रोजा) करतात [ अर रमझान् ]

०गाई **रमजानिगाई**-स्त्री रमजान महिन्यात उपवास न करण्याबद्दलचा दंड, एक कर 'मुलकाचे दस्तावर रमजानिगाई कदीम तहनाम्याप्रमाणें न घ्यावी '-वाडमा १ २२३

**रमढोल**—न प्रचंड, अवाढव्य वस्तु -वि विशाळ, प्रचंड, अवाढव्य

**रमण**—पु १ उपभोक्ता, रममाण होणारा पुरुष, आवड असणारा २ नवरा उदा० जानकीरमण, सीतारमण ३ जार ४ मन्मथ -न १ मैथुन २ कांहीं एक विषयाच्या ठायीं चित्ताचा रमण्याचा व्यापार, क्रीडा, विहार '-वि १ सुखविणारा, प्रिय २ मोहक, सुंदर [ स रम् ]

**रमणा**—पु १ बाग, क्रीडास्थान, रम्य स्थल २ चोहोंबाजूनीं आवृत स्थान, दक्षिणा वाटण्याची जागा, कोंडी 'पेशव्याचा रमणा पर्वतीच्या पायथ्यास होता, तेथें आज रान माजलें आहे' ३ (ल) ब्राह्मणांना दक्षिणा वाटणें किंवा तदर्थ खर्चलेली रक्कम ४ अनेक मडळींनीं केलेला गोंधळ किंवा गोंगाट ( क्रि० माजविणें ), गर्दी 'रमणा बहुत तिथें मातला।'-ऐपो १४१ ५ ( इमारत काम ) जिन्याच्या आरंभीं किंवा शेवटीं जिन्याच्या दारापुढें असलेली चौकोनी जागा 'रमणा घट्ट बसवा ' [ स रम्=रमणें ]

**रमणी**—स्त्री १ तरुण, सुंदर स्त्री २ पत्नी, बायको ३ (सामा ) स्त्री [ स ]

**रमणीक**—वि रम्य, आनंददायक, रमणीय ( स्थल इ० ) 'रमणीक याचेसरी। पहाण आन असेना।'-मुआदि ४६ २० [ स रमण ] **रमणीकपणा**-न रमणीयता, रसज्ञता 'रमणीकपणें पाहता मन। कदा काळीं नुठावें।'-मुआदि ३५ ६१ **रमणीय**-वि रम्य, मनोहर, सुखावह, शोभिवंत ( जागा, मूर्ति, काव्यार्थ इ० ) **रमणीयता**-स्त्री. मनोहरत्व, सौंदर्य [ स ] **रमणूक**-स्त्री १ चैनीखातर फिरणें, विहार २ मनोरंजन, करमणूक [रमणें]

**रमणें**-अक्रि १ कांहींएक विषयाची गोडी लागल्यामुळें तेथें चित्तवृत्ति आसक्त होउन रहाणें 'पुष्पाचे सुगंधावर भ्रमर रमतो' २ बागबगीचा, चांदणें इ० उपभोग्य जे विषय तदुपभोगद्वारा विनोद करीत काळ घालविणें ३ रंगाळणें, गमणें सभापणात किंवा खेळण्यात वेळ घालविणें 'लवकर जा वाटेस रमू नको' ४ विलास करणें, मैथुनार्थ संगत होणें, भुलणें [ स रमण ] **रमतरमत-गमत, रमते रमते**-क्रिवि १ स्वस्थपणें, सुखानें, सहज विनत्रासानें, घाई न करिता, विशेष तसदी न घेता (काम करणें इ०), २ बागबगीचा चांदणें, वायु इ०कापासून करमणूक करीत करीत (क्रि० जाणें यणें,चालणें इ० ) ( रमत रमत हें हिंदी रूप आहे)

**रमताराम**-पु भटक्या, फिरस्ता, प्रवासी माणूस, विशेषत तीर्थे हिंडणारा गोसावी [ रमणें राम ] **रममाण-न**-वि रमणारा, आसक्त गुग, तल्लीन, रंजित **रमविणें**-क्रि रंजन करणें, रंजविणें, करमणूक करणें, सुखविणें [ रमणें ]

**रमराट**—पु प्रचंड रास, ढिगारा ( खरकटी भांडीं, वह्यी पानें इ० चा ) रामरगाडा पहा [ स राम+राष्ट्र ]

**रमल**—न रेतीवर किंवा कागदावर काढलेल्या रेषांवरून अथवा फाशावरून शकुन पाहण्याची विद्या मूळ देवदूत जिब्राईलने

प्रेषित दगिल यास वाळूवर रेषा काढून त्यावरून भविष्य वर्तविण्याची ही कला शिकविली यावना फलज्योतिषशास्त्र [ अर रम्ल् ] **रमली**-वि रमल जाणणारा, रमलशास्त्राप्रमाणें भविष्य सांगणारा [ रमल ]

**रमा**—स्त्री १ लक्ष्मी २ शोभा [ स ] **॰कांत-नाथ-नायक-पति-रमण-वर-१** विष्णु 'रमारमणीं एकांती। मीनल्या काम नुपजे चित्तीं।' -एरुस्व ७५८ २ ( उप साकेतिक ) रडणें, आरडणें ( दोन्ही शब्दांत आरंभी र आहे ) [ स. ] **॰कांत आळविणें**-( विष्णूचें ध्यान, पूजा, आराधना करणें ) १ ( उप ) रडणें, भेकणें २ पोराप्रमाणें असहाय्यतेनें ओरडणें ३ रमणें गमणें, रेंगाळणें **॰बंधु**-पु चंद्र [ स ] **रमिक**-वि ( ना ) रमणीय

**रमात करणें**—क्रि थट्टेवारी घालविणें

**रमारम, रमारमी**—स्त्री १ बेतासबेत, जमा आणि खर्च याची बरोबरी, तोंडमिळवणी, नफा-तोटा सारखाच असणें, होणें 'यदाचे व्यवहारात तोटा नाहीं, नफा नाहीं, रमारमी झाली ' २ समता, सारखेपणा=( गरीब-श्रीमंत, नफा-तोटा, बरें-वाईट इ० चा ) ( क्रियाविशेषणा सारखाहि उपयोग होतो )

**रमुजी, रमोजी**—वि १ विनोदी, गमती, विचित्र, चित्ताकर्षक, हसविणारा ( वक्ता, त्याचें भाषण ) [ अर रमूज ] **रमूज**-स्त्री १ खेळ करमणूक, गमत, मौज 'कोण दिसेना प्राणप्रियकरें, चल रंगमहालीं रमूज करूं।' -सला १४ २ स्वत ची करमणूक करून घेणें, खेळणें, विहरणें ३ झालेलें मनोरंजन, करमणूक ४ ( समासात ) मनोरंजक पदार्थ, वस्तु जसे— रमूज-बाग-रान-शत-बाडा-गायन-नाच-तमाशा-वाणी-भाषण इ० [ अर रमूझ ]

**रम्य**—वि रमणीय, मनोहर, आनंददायक, सुंदर [ स ]

**रम्या**—स्त्री ( संगीत ) विसाव्या श्रुतीचें नाव [ स. ]

**रय**—पु वेग [ स ]

**रयत-रय्यत**—स्त्री १ प्रजा ( राजाची ) लोक, जनता 'कौल देऊन आज्ञा केली तर रयत उमेद धरून विर्दी करतील.' -रा ६ १४८ 'रानात कोठें पिकें आहेत तेथें उपद्रव बहुत होतो रयत दिलगीर ' -ख ११ ६१३ २ कूळ ( दातमालकाचें ), शेतकरी, जमीन कसणार लोक [ अर रईयत् ] **॰भाग**-पु रयतेचा, कुळाचा वाटा, मेहेनताना **॰रजावन्ती**-स्त्री रयतची खुशी 'पाऊस कमी, पिकें तमाम वाळतात, त्यामध्यें रयत रजावतीनें वसूल घेतच आहों ' -ख ५ २४०९ **॰वार**-क्रिवि कूळ अगर प्रजा यांशीं प्रत्यक्ष रीतीनें, प्रत्येक कुळाशीं स्वतंत्र **॰वारी-वारी**, **॰पद्धत**-स्त्री रयतेनें जमीनीचा वहिवाटपणें उपभोग घ्यावा अशी व्यवस्था, प्रत्येक कुळाशीं सरकारनें सान्याचा स्वतंत्र ठराव करण्याची पद्धति याच्या उलट जमीनदारी [ फा रईयत्वारी ] **रयतानी**-स्त्री रयत, कुळें, शेतकरी, (समुच्चयानें) [रयत] **रयतावा**-पु १ रयतानी पहा 'त्या राज्यातील रयतावा सुखी आहे ' २ रयत, कूळ यांची स्थिति, कामें, कर्तव्यें वगैरे. ३ जमीनीचा सारा-चावडी ( कुळावर बसविलेली ) [ रयत ]

**रयनी**—स्त्री रात्र, रजनी -माज्ञा १६ ३६९ [ स. रजनी, प्रा रयणी ] **रयन-दिवस**-क्रिवि रात्रंदिवस 'मन रयनदिवस इच्छित परधन परनारी।' -स्तोत्रमाला ३२५

**रया**—स्त्री १ किंमत, मोल, गुण, योग्यता ( मनुष्य, पदार्थ घदा इ० ची ) ( क्रि० जाणें ) २ वजन, मान, पत, दर्जा 'गवताला जी रया तीहि तुला नाहीं ' ३ कांति, शोभा, तेज 'तेजें गुणें उत्तर ते रया रे।' -दावि ३७९

**रया, रयात, रयायत**—स्त्री १ कींव, कृपा, क्षमा, माफी 'सबब तुम्हावर रयात करून ' -थोमारो १ ४५ -पेद २१ १४७ २ अदब 'परंतु तुम्ही आतां खाशाची आज्ञा उलट करून आपले मगरूरीनें रया सोडून दळन त्या सतीस मारिता ' -ऐटि २ ३४ ३ भीड ४ दान, देणगी ( क्रि० देणें, करणें ) [ अर रिआयत् ]

**रया, रयाया, राया**—स्त्री प्रजा, शेतकरीवर्ग 'किफायत सरकार व रफायत राया ' -रा १५ ११३ [ अर रआया रईयत चें अनेकवचन ]

**रयान-नी**—पु रयत, प्रजा 'मौजे मजकूरचे रयान व कुळकर्णी ' -समारो ३ ६७

**रयाळ**—पु एक चांदीचें नाणें, स्पेन देशातील एक नाणें किंमत अजमासें सहा आणे [ स्पॅनिश, इं रियल ]

**र र**—स्त्री रडगाणें, चिरचिर, कुरकुर ( क्रि० करणें ) [ रडणें चें आद्याक्षर ]

**रव**—पु ( कु ) रोह, पालेभाजी, भात वगैरेचा अति लहान अंकुर रोप [ स रुह्=रुजणें ]

**रव**—पु १ ध्वनि, शब्द 'परवामरोचनेच्या ऐकों न शकेंचि या विलाप-रवा।' मोसभा ५ ३४ २ नाव, कीर्ति, स्तुति, गुणानुवाद 'कीर्तिचा हरि जगीं रव ह्याचा।' [ स रु=आवाज करणें ] **रवळा**-पु ( व ) गडबड, कोलाहल

**रव**—पुस्त्री १ रस्ता 'मगळवेढ्याची पांचसात खेडीं रवस लागतात ' -ख ११९३ २ परिपाट, शिरस्ता, चाल, रूढी 'येथें एक वेळ रूढ पडलें म्हणजे मनुष्यास पुन्हा जवळ उभें राहू देत नाहींत येथील रव या प्रकारचा ' -रा ८ २२० ३ रांग ओळ ४ वंश, परंपरा ५ रवण पहा **॰पडणें-बाट होणें**, रहदारी चालणें 'रव पडली पहा उठ रटें किती सौदागर देशावरले। हांका आरोळ्या देति भयंकर मार्गे सुजन कोंगरीं शिरले।' -प्रला १२५

'आज मोंगलाची रव पडल्यावर पैल, थोरें कांहीं तरी आली' -पेद १ १९

रयका—पु एखाद्या रवाळ पदार्थाचा जमलेला, तोडून काढलेला लहानसा ढोळा, तुकडा, (गूळ, मध, तूप इ०चा) 'कणिदार थांगलें असलें म्हणजे त्याचे रवके तोडून खावयास येतें' [रवा]

रयदंदळ-स्त्रीन नाश, दाणादाण

रयखळ-टला-टाळा-रवखळणें-खाळणें, रयटळ-टळा, रयटळणें-टाळणें—रवदळ, रवदळणें पहा

रवखांव—पु मजल्याची उंची वाढविण्यासाठीं किंवा छप्पर उंच करण्यासाठीं भिंतीवर जे खांब बसवितात त प्रत्येक घराच्या रवीस ज्या खाचण्या देतात त्या प्रत्येक [रवी+खांब]

रयण—स्त्री १ राग, ओळ रव पहा २ (महानु) वावरण्यास प्रशस्त स्थळ 'पृथ्वीएवढें रवण असे' ३ वेळ, प्रहर 'रात्रीच्या रवणीं फिरत जाऊं नकोस' ४ गस्त रवणवाला-पु गस्तवाला, गस्त घालण रा पोलीस शिपाई

रवणदिवली, रवणदिवा, रवणदिवी—पुस्त्री (प्र) रोवणदिवी इ० पहा.

रवणें—क्रि (कु) राहणें

र(र)र्णें—रावणें पहा

रवंथ—पुन आपणें खाद्य प्रथम अर्धवट गिळून नतर तें सोईच्या वेळीं पुन्हा तोंडात आणून पूर्णपणें चघळीत बसणें (गाई, म्हशी इ०ची क्रिया), चर्वण [स रोमंथ] रवंथणें-क्रि १ रवथ करणें २ एखादा पदार्थ चघळीत चघळीत पुष्कळ वेळ खात बसणें रंवथें-न अनेक प्रकारचें उष्टेमाष्टें अन्न एकत्र कालवलेलें, जें गाई-म्हशी इ०कास खावयासाठीं टेवलेलें असतें त २ आवोणाचें भाडें [स रोमंथ]

रवथो—पु (गो) कोरडया खारजतील बीड ०दवरप-(गो) रवथा शिल्लक ठेवणें, रोगाचें मूळ शिल्लक ठेवणें

रवंदणें—क्रि तुडविणें, नाश करणें 'रवंदी सुहृद राजा गुरु। सौंडे ववळी स्वर्ग शिखरू।' -ज्ञाभा ३ ५१८ (जुनीप्रत)

रवदळ, रवंदळ—स्त्री रहदारी 'शहराची रवदळ वाढली'

रवंदळ रवंदळी, रवदळ-ळी—स्त्री तुडविलें जाणें, चुराडा, नाश, दाणादाण, (पाणी चिखल गवत इ०) तुडविणें, डिवचणें, कुसकरणें किंवा या क्रियेनें झालेली पदार्थाची अवस्था, नासाडी किंवा दुर्दशा (क्रि० घालणें करणें पडणें, होणें) 'सरोवरामाजीं कमळीं। गज करी रवदळी।' -एरुस्व १२ ६ [रव+दलन] रवंदळा-दाळा-पु दुर्दशा नाश तुडवातुडव

रवदळारवदळ-स्त्री तुडवातुडव 'शत्रस रान मोकळें सुटून मोर्चेंकराची तुसती रवंदळारवदळ झाली' -वसईची मोहीम

रवंदळणें, रवंदाळणें-सक्रि १ तुडविणें, पादाक्रांत करणें २ डिवचणें; कुसकरणें ३ ढवळणें (नासाडी होईल अशा प्रकारें), घुसळणें; हलवणें; रेंदाळणें (पाणी, चिखल) रवरवीत-वि ओलीच्या ओली असलेलें, पस्तीच्यापरतीसह 'अंगीं रोमांच रवरवीत। स्वेदबिंदू डळमळीत।' -ज्ञाभा १४ ३१७ [रव द्वि]

रवंदा—पु वाळलेला पाचोळा, गुरंढरंनीकडून टसाचा पाचोळा [रव]

रवरव—पु १ किडयांनीं भरलेला नरक, एकवीस महा नरकांतील एक नरक 'रवरव कुंभपाक भोगिती यातना। नये नारायणा करुणा त्याची।' -तुगा २४११ २ बुजबुजाट (माशा, उवा, डास इ०चा) -क्रिवि वळवळ करणाऱ्या किडयांनीं बुजबुजल्या प्रमाणें, बुजबुजाट होऊन (क्रि० करिणे पडणें) [स रौरव] ०नरकवास-पु १ रवरव नरकांत वास २ (ल) अतिशय वाईट, दु खकारक स्थळ, प्रसंग

रवरव, रवरवी—स्त्री १ बधिरता (अवयवांची), मुंग्या येणें २ कणकण, कचकच (ज्वराची), शहारे, आग मोडून येणें ३ पोटांत विष गेल्यानें होणारा दाह ४ विंचू चावल्याच्या वेदना ५ मुंग्या चावल्यानें होणारी आग, हुळहुळ ६ कडकडीत, तिखट इ०खाल्ल्यानें जिभेची होणारी चुरचुर,झणझण -क्रिवि गर्दी करून, पुष्कळ [ध्व] रवरवणें-क्रि शरीर किंवा शरीरावयव रवरवीनें युक्त होणें, रवरव होणें रवरवी-स्त्री १ एक प्रकारचें औषधी झाड व त्याचें फूल हें जिभेवर टेविलें असता रवरव सुटते २ रवरव पहा

रवला—पु (सोनारी) चार गुंजांच्यावर वजन असलेल्या सोन्याचा आटवून तयार झालेला गोळा, रवका पहा

रवस—पु (वे) जोर [रव किंवा स रय]

रवसड—स्त्री (व) विपुलता 'आंब्याची गेल्या सालीं रवसड झाली तेव्हा तुम्ही आला नाहीं'

रवसडणें—क्रि आवेशानें चालून जाणें, रवसडून, जोरानें अंगावर चालून जाणें

रवळणें—न सोनाराचा एक ठसा, रवाळणें, रवालें पहा

रवळनाथ—पु गोमंतकांतील एक देवता रवळनाथाचें फूल-न १ (राजा) ज्याचे घरीं धान्यादिकाची आठचार दिवसाची देखील बेगमी नाहीं असा दरिद्री, कंगाल माणूस २ (गो) बावळट मनुष्य [रवळनाथ+फूल] रवळिया-स्त्री एक क्षुद्र दैवत [प्रा]

रवळा-ळी—रोवळा, रोवळी पहा

रवा—पु १ कण (बंदुकीची दारू, साखर वाळू इ० चा) 'दिठी वियाचा रवा। नागरु इया ठेवा।' -अमृ ९.५ २ मध किंवा कढविलेलें तूप इ० न डिवचता ठेवून दिलें असता त्यात

जे कण उत्पन्न होतात ते ३ भरडलेलें गव्हाचें पीठ, शाजा, कणीक, तांदळाचें पीठ, इ० कातील जाडा कणाश राहतो तो ४ खडा, ढेप, (गुळाचा, साखरेचा) 'जे गोडी मायदरासी। तेचि वेगळी रवेयासी।' –एभा ४ २६१ ५ सोन्याचांदीचा रज, सोनें आटवून बारीक असा गोल आकाराचा केलेला ल्हान गोळा ६ दिव्यामध्यें तापलेल्या तेलांतून बाहेर काढावयाचा सोन्याचा किंवा धातूचा तुकडा 'त्या सनीनें रवा काढिला' –वाडबाचा २ ६१. ७ जो उगाळतात, ज्याचें गंध सुक, वगैरे करतात तो तावडा द्रव्यकुडाचा तुकडा; विशिष्ट क्षारांचीं पुटें देऊन तावडे केलेलें द्रव्यकुड ८ रहाटाच्या कणेकडास बसविलेलें आडीस जोडणारें लभें लाकूड ९ दागिन्यावरील कडर, पराच्या आयटीची मुद्रा, टसा, सोनाराच्या पेराची आवटी नावाच्या टशातील खाच (ज्यात सोनें, चांदी, इ० चा पातळ पत्रा ठोकला असता त्यात फुगा उत्पन्न होतो) ०काढणें–सोनें चांदी इ० चा रज किंवा तुकडा तापलेल्या तेलांतून हातानें बाहेर काढणें, एक दिव्याचा प्रकार रवा अर्थ ६ पहा **रवाळ**–वि १ जाडया कणाच्या रूपात असलेलें, दाणेदार कणदार (तूप, मध, साखर इ०) २ सरी पेक्षा जाडा व पत्रीपेक्षा ल्हान (कोल्सा)–ळीन सोनाराचें एक हत्यार रवाळणें पहा

**रवा**—क्रिवि चालू विद्यमान 'आपणास इनाम कारकिर्दी–दर कारकिर्दी मोकासियानीं माजी मुतेन रवा असत' –रा १५ १४५ [फा रवान्] ०दार–पु अनुमोदक 'तुम्हीं सरकार नुकसानीचे रवादार काहीं नाहीं'–रा ७ ५६ [फा रवा+दार्] ०रास्त–वि वहिवाटींतील, शिरस्त्याचें, परपराप्त व योग्य [फा]

**रवानगी-गी**—स्त्री १ विदागी, जातेवळची रुणगी 'रवानगीचीं वस्त्रें'–रा १२ १९२ २ पाठवणूक, पाठविणें, ३ प्रत्योत्तर, उत्तराकरिता पत्र पाठविणें 'श्रीमत वसईचे मुक्कामीं असतां बहुत पत्र आपलीं आलीं व त्याच्या रवानग्याही बहुत जाल्या' –रा ६ ५८२ ४ मालाची निर्गत, विक्रीस जिन्नस पर गावीं, दूरदेशीं पाठविणें ५ काहीं एक कार्याच्या उद्देशानें दशातरी फौज पाठविणें, दारूगोळा गल्वतें इ० पाठविणें ६ पाठवणीच्या वेळीं द्यावयाची आगाऊ खर्ची 'लोकास रवानगी नाहीं' –पया ३२४ [फा] **रवानगी चिठ्ठी**–स्त्री परवानगी, परवाना अनुज्ञापत्रक, पासपोर्ट **रवाना**–पु परवाना, पास –वि पाठविलेला, धाडलेला प्रेषित मार्गस्थ केलेला (कागद, माणूस, इ०) (क्रि० करणें, होणें) **रवानाचद्र-मिती**–स्त्री ज्या दिवशीं कागद–पत्र–रवाना होतें त्या दिवशींचा चद्र मिती [फा]

**रवासुदगी**—स्त्री १ सरकारी कागद (दस्त ऐवज, हुकुम आज्ञा इ० ची नोंद ज्यावर करतात ता), दस्त ऐवज रोखे, सनदा, पावत्या इ० चा कागद २ पावती 'बाकी रसद हुजूर रु। ८००पैकीं रवासुदगी सेटी खातक हुजूर–बाजार लष्कर रु। १००' –रा १५ १०१ ३ नक्तीचा जमाखर्च –इनाम ४९ [फा रवानशुदा=पावता झालेला]

**रवाळणें, रवाळें**—न सोनाराचें एक हत्यार, गोटींच्या दरामध्यें सोन्याच्या मण्याचीं दोन शकलें तयार करताना सोन्याच्या तुकड्यावर उभी करून वर टाकले असतां, वरचा टोका सासणारी (खीलारची) काडी, नथी उठविण्याचा शिळा [रवा]

**रवि**—स्त्री (कों) गलबतावरील चारी बाजूस वावरता यण्याजोगा माळा

**रवि**—पु १ सूर्य २ अर्क, रुईचें झाड ३ उजवी श्वास नलिका, इडानाडी [स] ०कांत–पु सूर्यकांत, स्फटिक ०ग्रावा–पु सूर्यकात, ज्यांत सूर्याचे किरण एका बिंदूत केंद्रीभूत होऊन विस्तव पडतो असा एक दगड [सं ग्रावन्=धोंडा] ०छिद्र–न झरोका, ल्हान प्रकाशद्वार 'ऐसा सुग्रीव विलपत। मी गुतानि पडलों विवरांत। भ्रमण करितां अकस्मात। देखिलें तेथें रविछिद्र।' –भारायुद ४ १०३ ०तप्त–वि उन्हानें तापलेला, करपलेला, पोळलेला. 'जरि बहु रवि तप्ता सावली गोड वाटे। तरि वनि पल्लिडें मानिता कोड वाटे।' [स] ०तनया–स्त्री यमुना [सं] ०मडल–ळ–न सूर्यबिंब [स] ०वार–वासर–पु आदितवार ०संक्रमण–न १ सूर्याचें एका राशींतून दुसऱ्या राशींत जाणें २ विशेषत मकरराशींत जाणें मकरसक्रमण, सक्रांत ०संक्रमणाचे तीळ–पु (अव) सक्रांतीच्या दिवशीं वाटावयाचा तीळगूळ, हलवा ०सुत–पु १ (सूर्याचा मुलगा) यम, कर्ण 'पय पुरिचा रविसुत पुर आता। आड करावा भव सिंधु ऐसा नव्हता।' –तुगा ४१११ २ (साकेतिक) कर्ण(कान) 'अलि कुलवदनाचें वहन आणीत होतें। रवि सुत मदिरमें फार दु खातें झाला।' –कूटश्लोक [स]

**रवी**—स्त्री १ दहीं घुसळण्याकरिता जें लाकडाचें यत्र करतात तें, घुसळणें २ घराचा मजला किंवा छप्पर उच करावयाचें असता भिंतीवर जे ल्हान खाव ठेवतात ते प्रत्येक, घराच्या तुळया वरच ढकलट दिले असता माळा ण ठेंगणी होते म्हणून त्या तुळ्यावर असें दीड–दोन हात उचीच खाव देऊन माळ्याची उची वाढवितात ३ पखालींत भरून पाणी भरताता तोंड (मुढा) उघडें रहावें म्हणून त्यात ज्या बाबूच्या काडया घालतात त्या प्रत्यक (रव्या असा अव प्रयोग) [रवा] ०दोर–पु घुसळण्याची दोरी

**रवी**—स्त्री गुऱ्हाळावरील अकरा माणसाचा समूह (१ गुळव्या, १ जाळव्या, १ परव्या=तुकडे करणारा, २ पालक=बैल हाकणार, २ ऊस चरकांत लावणारे, ४ फडकरी=ऊस कापणें,

आणणें, पाचुदा गोळा करणें, गुऱ्हाळपरांत आणणें इ० काम करणारे ), (सामा) गुऱ्हाळावील कामकरी मंडळी

**रंधे**—पुअव (वों) रहाटाच्या वणेकडाचे आरे रवा पहा ०**कड**—न १ रहाटाच्या आगाभोंवतीचा आरा २ चाकाचे आरे काढण्यास योग्य असा लाकडाचा तुकडा रवा पहा [रवी+काठ]

**रवेश-स**—स्त्री चाल, रीत, पद्धत, वहिवाट रिवाज रव पहा 'इन्साफाची रवेश दर्शविनारा ठेऊन खुद-गर्जीवर नजर देऊन साठी सरकारात दण्यविषयीं ताकीद न केली '–ख ७ ३५७० –रा १५ २१९ [फा रविश] **रवेश्वार**–पु चालीप्रमाणें, योग्य

**रवैया**—पु रखारीचें तोंड भरताना उघडें रहावें म्हणून काठ्याची रचना करतात ती रवी अर्थ ३ पहा [रवी]

**रशना**—स्त्री १ दोरी २ लगाम ३ कवरपट्टा [स]

**रशेला**—वि रसभरीत 'छूट गयु दैवतीचे रशले रिसाळ। निवडक अक्षर अर्थी बहुत सजाळ।'–प्रला १५३ [रसाळ, हिं रसीला]

**रश्मि**—पु प्रकाशकिरण 'का रश्मी हन मृगजळा-। पासूनि अर्कमंडळा।'–ज्ञा १५ ५२० २ दोरी, रज्जु ३ लगाम [स] ०**कर**–पु किरण 'तेथूनि फाकती रश्मिकर।'–ज्ञा १५ ४०४ [रश्मि+कर] ०**राज**–पु सूर्य 'का उदितें रश्मिराजें। लोपिलीं चद्रादि तेजें।'–ज्ञा १४४६

**रश्शी**—स्त्री दोरी, दोर [स रश्मि, हिं रस्सि] ०**खेंच**–स्त्रीपु एक विलायती खेळ, दोरी खेंचण्याचा खेळ, दोरखेंच (इ) टग ऑफ वॉर

**रस**—पु १ चव रुची, स्वाद, जिव्हेनें खारट तुरट, गोड इ० जो पदार्थाचा धर्म समजतो तो 'सुरभिदुग्धपान रस मजला समजे।'–मोभ ३ ७ २ चीक, द्रव, पान, फूल, फळ इ०तील पातळ अंश ३ उग्र, आंबा यातून निघणारा द्रवपदार्थ ४ अर्क ५ अन्नाचें रक्त व्हावयापूर्वीचें रूपांतर शरीरांतील ज्या अन्नापासून रक्त व घाम बनतो ती अन्नाची अवस्था ६ धातूचें द्रवरूप, कोणत्याहि धातूचा वितळून केलेला द्रवपदार्थ, सोनें, चांदी इ०ची अग्निसंयोगानें झालेली द्रवरूप स्थिति ७ (साहित्य) अंतःकरणाच्या वृत्तींचें काहीं कारणानें उद्दीपन होतें आणि त्या उद्दीपित झालेल्या वृत्तीच्या अनुभवानें किंवा अवलोकनानें अनुरूप विचार प्रकट करण्याची प्रेरणा होते तिला रस म्हणतात रस नऊ आहेत–शृंगार, वीर करुण, अद्भुत हास्य भयानक बीभत्स रौद्र व शांत 'तें नवरससुधाब्धीचा। थावो लाभे।'–ज्ञा १० ७ ८ (ल) गोडी, आवड, राम, मनोरमता, मोहकता (प्रसंग, साहित्य, भाषण, व्यापार इ० तील) 'वचनात काहीं, रस नाहि पाही।' –लीलावती ९ प्रीति प्रेम अनुराग. १० कस, योग्यता 'ऐसि याचा कोण मानितो विश्वास। निवडे तो रस घाई डाई'–तुगा ३३६२ ११ खाणींतील मीठ, खनिजक्षार (गधक, मोरचूत इ०) १२ पारा १३ पुरुषाचें वीर्य किंवा रेत १४ विष १५ उत्तेजक द्रव्य (तेल, मसाला, साखर, मीठ इ०) (संस्कृतमध्यें असे अनेक प्रतिशब्द या शब्दाला आहेत) १६ पाणी 'तरी तुरोनि वेगळेंपण। रसीं भजिन्नें लवण।'–ज्ञा १७ १८ १७ दूध 'कथा सुरभिचा रस स्वहित पुष्कळ स्वादुहि।'–कका १८ रसायन, औषध 'पैं कळत्तर गांठीं बांधिजे। मग पुढिलाचें काज कीजे। पूजा घेऊनि रसु दीजे। पीडितासी'–ज्ञा १७ २८७ १९ नारळाच्या रसात गूळ मिळवून तयार केलेलें पातळ पेय [स] सामाशब्द–०**कस**–पु १ रसज्ञता –शर २ रसाचा कस, रग, बहार, गोडी (क्रि० जाणें, घेणें) 'भोग आता रसकस घे वरी ही सधी साप डली।'–प्रला १९९ [रस+कसणें] ०**केळी**–स्त्री (महानु) रसकेलि, नवरसाची क्रीडा 'जेही रसकेळि खेळति मनें। कळा विदाची'–भाए २७२ [स रस+केलि=क्रीडा] ०**गुल्ला-गोल्ला**–पु (व) एक बंगाली गोड खाद्य पदार्थ, एक प्रकारची मिठाई ०**द**–पु मेघ [स] ०**पूजा**–स्त्री औषधावद्दलची किंमत, वैद्याची फी 'रसपूजा धरोनि पोटीं। वैद्य औषधाच्या सोडी गांठी।'–एभा ११ १०४४ ०**बाळ-बाळी-वेळी-वेळ**–स्त्री केळ्याची एक जात (सोनकेळ्याप्रमाणें) [रस+का बाळे=केळ, का रसबाळे] ०**भंग**–पु १ गोडी जाणें, काव्यमय गानादिसवधीं वाचकश्रोत्याचा विरस २ बरग, सौंदर्यनाश ३ उत्साह उमेद, यावर विरजण पडणें [स] ०**भरित**–वि १ रसानें युक्त अगर भरलेलें, रसपूर्ण, (फळ इ०) २ (ल) चमत्कदार, गोड, मनोरंजक, सुंदर (भाषण, वर्णन, इ०) [स] ०**भरू**–वि रसानें भरलेला (फलादि पदार्थ), रसपूर्ण, रसाळ [रस+भरणें] ०**भावना**–स्त्री पुटें देण्याची रीत, विमयेची रीत 'परी मात्रेचनि मापें। दिव्यौषध जैसें घेपे। का कपिलाचें बीजे रूपें। रसभावनी।' –ज्ञा १८ ७७४ ०**भोजन**–न ज्या जेवणात आंबरस हें मुख्य पक्वान्न आहे असें जेवण ०**मय**–वि (रसपूर्ण) जलमय 'अद्वयानंदस्पर्शें। दिठी रसमय जाली असे। त अश्रु नव्हती जैसें। द्रवत्वचि'–ज्ञा १८ १६०४ ०**रग**–पु मकरसंक्रांतीचे दिवशीं कुंकु आणि गूळ हीं दोन पात्रांत भरून ब्राह्मणास सुवासिनीस देतात तो, सक्रांतीचें हळदीकुंकु [रस आणि रग] ०**राय**–पु (महानु) शृंगाररस निर्यास गलें। रसरायाचें।'–भाए ९९ ०**वडी**–स्त्री तोंडीलावण्याकरिता मसाल्याच्या रसानें युक्त हरभऱ्याच्या पिठाच्या वड्या करतात त्या, पाटवडी ०**वंती**–स्त्री १ (प्र) रसवती, वाणी, वाचा (रसाचें अधिष्ठान मानली जाणारी), वक्तृत्व २ गोड भाषण ३ जीभ ४ एक वनस्पति ०**वांगें**–न मसालेदार रसानें युक्त असें शिजवून तयार केलेलें सगळें वांगें,

भरलेलें वांगें (भाजी) ०वान्-वि १ रसभरित-युक्त-पूर्ण २ चवदार, स्वादिष्ट, मिष्ट [स] ०विक्रय-पु (तेल, मीठ लोणी, साखर, दूध, तूप, इ०) रसाळ, पोषक पदार्थांची विक्री शास्त्रात हा दोष मानला आहे [स] ०वृत्ति-स्त्री शृंगारादिक रसभाव (क्रि० प्रकट करणें) 'येथ विभूती प्रतिविभूती। प्रस्तुत अर्जुना सांगिजेती। त विदग्धा रसवृत्ती। म्हणिपैल कथा।'-ज्ञा १० ४१ ०सोय-स्त्री स्वयपाक, पक्वान्न 'जैसी राधवणी रससोय निवी। करूनिया मोले विवी।'-ज्ञा २ २५४,-अमृ ५ ४२ ०स्वादन-न स्त्रियांच्या शृंगारचेष्टांचें वगैरे वर्णन ऐकण्यामध्यें असलेली श्रद्धा, गोडी 'हावभाव कटाक्षगुण। सुरतकाम निरूपण। तेथ ज्याचें श्रद्धा श्रवण। रसस्वाद त्या नाव'-एभा ११ ७०७ ०ज्ञ-वि १ रस जाणणारा, रसिक, मर्मज्ञ 'पुष्पाच्या मकरंदाचा रसज्ञ भ्रमरा सारखा दुसरा कोणी नाहीं' २ योग्यता जाणणारा, महत्त्व ओळखणारा ३ रस, भावना, वृत्ति ओळखणारा [स] ०ज्ञता-स्त्री रस जाणण्याचा गुण, पात्रता ०ज्ञतावात-ज्ञानवात-स्त्रीपु रस जाणण्याखेरीज बाकी सर्व इंद्रियांची ज्ञानशक्ति याचा नाश करणारा वात रसरसणें-अक्रि १ रसानें पूर्ण भरून असणें २ (अग्नि) प्रज्वलित असणें, धगधगणें, प्रखरणें ३ तापणें, जळजळीत असणें, जळजळणें (तापात अंग, डोळे उष्णतेनें पाणी, तवा इ० ४ ऐन तारुण्यात, भर ज्वानींत असणें ५ भर-भरात असणें (देवी, गोवर, ज्या त्या हंगामात उत्पन्न होणारे पदार्थ) किंवा संतापानें 'सजयो विस्मयें मानसीं। आह्रा करूनी रसरसी। म्हणे कैसे पा देवेसी। द्वंद्व यया'-ज्ञा १४ ४११ [रस ध्व] रसरसीत-शीत-वि १ रसाळ, रसपूर्ण २ भर ज्वानीनें युक्त तारुण्यानें मुसमुसलेली ३ प्रखर प्रज्वलित, तापून लाल झालेलें ४ पिवळा शब्दामध्यें पहा रसा-रस्सा-पु १ पुष्कळ रस असलेली भाजी, मसाला इ० घालून केलेलें पातळ तोंडीलावणें (बटाटा इ०चें) २ मांसाचें कालवण [स] रसाधिपति-पु वरुण [स] रसाभास-पु १ कृत्रिम, खोटी भावना, अनुचितपणें प्रयुक्त केलेला रस उदा० पशुपक्ष्यादिकांचा शृंगार वर्णन करणें हा शृंगार रसाभास झाला २ अशा तऱ्हेचें काव्य अगर नाटक ३ स्थायी भाव नावाखालीं येणाऱ्या अष्टरसांपैकीं एकाचें केलेलें खोटें आविष्करण अशा रसाचें (काव्य, नाट्य रूपानें) केलेलें दिग्दर्शन ४ कांहीं खोट्या बतावणीनें खरी भावना दडवून ठेवणें [स] रसाल-ळ-वि १ रसभरित, ज्यामध्यें रस पुष्कळ आहे असा (फलादि पदार्थ) २ रसयुक्त, मधुर, गोड 'केळीचें दळवाडें। दद पोकळ आवडे। परि फळोनिया गाढें। रसाळ जैसें।'-ज्ञा १३ २१२ ३ चटकदार, मनोरंजक, आल्हादकारक (भाषण) 'आतां ढाकून बहुत शब्दजाळ। बोल रामकथा रसाळ।' ४ मरका फणस यास दुसरें नांव ४ गमतीचें, विनोदी, हास्यजनक (भाषण) ५ खमंग, चांगलें, मुरलेलें, चमचमीत (पाक, लोणचें, ओला पदार्थ) ७ रसिक, रसज्ञ 'तू साग तो वर तुला रुचला रसाळे।'-नल ११ रसाळी स्त्री १ (व) आमरसाचें जेवण 'अबादासपंत खाडयाच्या येथ दरवर्षी एक रसाळी होते' २ (को) उसाच्या चरकाचें खालचें लाकूड, काटवट रसिक-वि १ मर्मज्ञ, गान, काव्य इ० रसावर विशेष प्रीति असून त्यातील मर्म जाणतो तो, सहृदय २ थट्टा-मस्करी, भाषण इ० द्वारा दुसऱ्याच्या आणि आपल्या अंत करणप्रवृत्तीस विनोद उत्पन्न करील असा ३ गमत्या, विनोदी ४ भावनाप्रधान ५ चवदार, स्वादिष्ट, मधुर ६ (ल.) (काव्य) आल्हाददायक, सुखोत्पादक [स] रसिकत्व-न १ माधुर्य २ रसिकता -ज्ञा १८ ३४७ रसिक रसीला-वि रसाचा खरा खरा भोक्ता, इष्कबाज [रसिक+हिं रसीला=रसदार] रसोत्पत्ति-स्त्री १ रसाची उत्पत्ति निर्मिति २ विनोद हास्य, करमणूक [स]

रस—पु पारा, पारद धातु ०कापूर-पु पारायुक्त पांढरा कापूर अगर कापराचा गधक पारा, मीठ इ० शीं केलेला संयोग, मिश्रण, एक औषधीपदार्थ [स रसकर्पूर] ०पुष्प-न पाऱ्याचा एक संयुक्त पदार्थ -पदाव १०२ [स] ०राज-पु एक औषध, मौक्तिक, प्रवाळ पारा, सोनें चांदी अभ्रक, कांतलोह, वग या सर्वांचीं भस्में समभाग घेऊन त्यास गुळवेलीच्या रसाच्या आणि शतावरीच्या रसाच्या सात सात भावना दिलेलें रसायन हें उर क्षतनाशक व कामोद्दीपक आहे [स] ०रीति-स्त्री रासायनिक पद्धत 'जैसा रसरीति मरता। राखिला विषें।'-ज्ञा १८ १६१. ०रूप-न रसायन रूप 'भृतें लोहें होती। स रसरूपें जिती। जळोनीं इधनें येती। वन्हिदशा।'-अमृ ३ ५ [रस+रूप] ०शुद्धि-स्त्री पारा शुद्ध करणें, मारणें ०सिंदूर-पु एक रासायनिक औषध, मात्रा (पारा गधक व नवसागर यापासून केलेली) [स] ०सिध्दी-स्त्री १ रसायन शास्त्राचें ज्ञान २ किमया, रासायनिक गुणाची निर्मिती करण्याची कला अवगत असणें रसांजन-न डोळ्यात घालण्याचें एक औषध, पितळभस्म, दारुहळद बकरीचें दूध व भाग याचें मिश्रण आटवून केलेलें अजन 'नेत्रीं रसांजनाचें अजन।' [स रस+अजन] रसायण-न-न १ पारद गधक इ०काचा राधा करून केलेल्या मात्रा भस्में व इतर औषधें 'पै रसायनें तें गोड। जें आरोग्य देईं।'-ज्ञा १० १५० २ रसज्ञ सिद्धपुरुषानें तयार केलेलें अमृत ३ रससिद्धि, धातुपरिवर्तन विद्या, किमया ४ (रसायनक्रिया करताना फार चपळाई लागते यावरून ल) अत्यत निकड, नेट (क्रि० लावण, लागणें) ५ (कु) रस शिकरण 'केळ्याचें रसायन' [स रसायन] ०क्रिया-कार्य-स्त्रीन निरनिराळ्या पदार्थांचा परस्परांवर व्यापार ०शास्त्र-न पृथ्वीवरील पदार्थांच्या घटनेंत होणाऱ्या

फरकाविषयीं ज्या शास्त्रात सांगितलें आहे तें शास्त्र, यात धातु व अधातु याच्या सयोग-वियोगाचें विवेचन केलेलें असतें (इ) केमिस्ट्री **रसायनाकर्षण, रसायनप्रीति**-नस्त्री १ विजातीय परमाणु ज्या शक्तीनें एकत्रित होतात ती शक्ति (इ) केमिकल अट्रॅक्शन-ॲफिनिटी २ दोन किंवा अधिक तत्त्वास एकत्र करून नवीन पदार्थ उत्पन्न करणारी आणि त्या नव्या पदार्थातल्या तत्त्वास पुन्हा निराळें होऊ न देणारी शक्ति **रसायनी औषध**-न. खनिज औषध **रसीं उतरणें**-कि हात, पाय इ० अवयव सुजणें, फुगणें (घोड्याचे) **रसौषध**-न रासायनिक औषध 'जैसें रसौषध खरें। आपुलें काज करूनि पुरें।' -ज्ञा १८ १०७९

**रसकर्णे**—अकि. मजेंत असणें, सुखाच्या, आनदाच्या अगर मनाजोग्या कामात गुग होणें, रमणें 'त्या मुलाला काहीं खळणें देऊन अमळसा रसकीव व तू जेवून ये ' [ रस ]

**रसकस-घस**—स्त्री १ भाडण बोलाचाली, वाद, धुमधूस (क्रि० करणें, लावणें, माडणें) २ कचकच, ताप चढण्यापूर्वी होणारी अवस्था ३ रोमाच, शहार (क्रि० येणें, वाटणें) ४ (कु) अप्रीति 'लोकाच्या रसकशीमुळें केलेल्या कामात यश नाहीं' ५ घासाघीस, जिकीर **रसकसणें**-कि १ कसकसणें, अगावर काटा अगर शहारे येणें, ताप येईलसें वाटणें २ भाडणें-तडणें, बोलाचाली होणें, करणें, हुज्जत घालणें [रसकस] **रसकी**-स्त्री (वे) जसमेंतून गळणारें नासकें पाडरें पाणी, रस

**रसखुंटणा**—पु धातूचे गज, सळया तोडण्याची छिनी

**रसडी**—स्त्री दोरी [अर रसन्=दोरी तुल० स रशना, रश्मि]

**रसद**—स्त्री १ सैन्यासाठीं साठविलेला, पाठविलेला दाणा गोटा, धान्य २ कमाविसदारानें केलेला आपल्याकडील मुलुखाच्या वसुलाचा भरणा, मामलेदारानें एखाद्या परगण्याचा इजारा घेतला म्हणजे जो रकम त्यास सरकारात आगाऊ भरावी लागते ती, गावच्या वसुलाचा सरकारात भरणा 'रसद सालमजकुरी सरकारात देऊ नये' -थोमारो १ ८ ३ स्वारीवरील सैन्याच्या खर्चास दिलेला पैसा ४ पेढी-हुंडीवाल्यानें आपल्या गुमास्त्यास पाठविलेला पैसा ५ सैन्यामागून जाणारा दाणावैरणीच्या जनावराचा ताडा ६ (व्यापक) सैन्यामागून जाणारीं माणसें व गुरेंढोरें ७ (सामा) दाणावैरण, दारूगोळा, सैन्य पैसा इ० युद्धसामुग्री 'रणमस्तखान यांशीं युद्ध देऊन रसदबदी करून सभाजीचरित्र १५ [फा रसद्] ०भरणा-पु १ मामलतीसबधीं रसदेचा जो भरणा तो फौजेचे बरदास्तीकरता गावागावातून पाठवितात जें धान्य, दारूगोळा इ० सामान तें **रसदी**-वि अदाजी वसुला इतक्या खजिन्यात भरलेल्या रकमेच्या तारणावर घेतलेला (गाव, प्रात), सरकारात रसद देऊन घेतलेला [रसद]

**रसना**—स्त्री १ चव, आवड २ जीभ, जिव्हा [स रस्= रुचि घेणें] **रसनेंद्रिय**-न (चव घेण्याचें इंद्रिय) जीभ, [स]

**रसपें**—न गाडवावर नेता येण्याइतकें ओझें (धान्य इ०चें)

**रसम, रस्म**—स्त्री चाल, रीत 'आलम दुनियास हेच रहाव रस्म' -पया ४६७ [फा रस्म=नियम, चाल] ०रव-स्त्री चालरीत 'आ साहेबही त्याचें रसमरव यास खूब वाकीफ' -पया ४७६ ०रिसायत-स्त्री वहिवाटीचें अवलबन 'वर्खें वगैर रसम रिसायत केली' -जोरा ५६ **रसमीयात**-स्त्री वहिवाट 'वर्खें शादीचे रस्मीयातीचीं।' -रा ७ -खरप १ २ [अर रस्मीयात]

**रसमस**—स्त्री गडबड, रसरस पहा 'रसमस अति गावी थोर सतोष लोका' -माधवकृत रामायण अयोध्या ८

**रसमालगी**—न (कु) मार

**रसरस**—स्त्री (मुबई) कटकट, त्रास, रसरस पहा [ध्व]

**रसा**—स्त्री पृथ्वी 'प्रसन्न न यासि राधा प्रबल सुधा करासि काय रसा।' -मोकर्ण नवनीत ३३३ **रसातल-ळ**-न सप्तपाताळांपैकीं एक खालचा पाताळ [स] **रसातळास-तळीं जाणें-बुडणें**-(ल) पूर्णपणें नाश होणं (कामाचा) **रसातळास नेणें**-पूर्णपणें नाश करणें, सफा बुडविणें (धदा, उद्योग यात) **(पोट) रसातळास जाणें**-पोट पाठीस लागणें, क्षुधापीडित होणें

**रसाणें**—न निखारे, रसरशीत निखाऱ्याचा समुदाय [ध्व रस्]

**रसानगी**—स्त्री दुसऱ्याच्या मार्फत अगर चिठ्ठीनें दिलेली परवानगी -वि दुसऱ्याच्या मार्फत पाठविलेलें [अर]

**रसासणें**—कि रसरसणें पहा

**रसीद**—स्त्री पावती, पोंच (रसद भरल्याची) माल पोंचल्याचा दाखला 'वकील मज्कूर यांणीं हुजूर अर्जदास्त रसीद करून' -रा १५ २९९ [फा रसीद्, तुल० इ रिसीट] **रसीदगी**-पैवस्तगी **रसीदन**-पावणें पोहोंचणें 'आता रसीदन मिसेली देखताची -रा १५ १५६ [फा रसीदन]

**रसुला**—स्त्री घोड्याचा खुरासबधी एक रोग यात गुडघ्यापासून पायास खुरापर्यंत गळवें होतात -अश्वप २ २७०

**रसूम**—पु १ जिल्ह्याधिकाऱ्याचा पगार हक्क वेतन इ० २ कर, फी, कमीशन [अर रसूम्, रस्मचें अव]

**रसूल**—पु प्रेषित पैगम्बर खुदा व रसूलखुदाची शपथ आहे' -दिमरा १ ४५ [अर रसूल्]

**रसोई**—स्त्री स्वयपाक [म रससोई, हिं रसोई]

शको १ २६

**रस्त**—स्त्री रसद पहा 'दोहरायाहेरून रस्त येत नाहीं' -पेद ३१४२

**रस्ता**—पु १ मार्ग, वाट २ चाल, वहिवाट, नियम [फा रस्ता, तुल० स रथ्या, प्रा रच्छा] (वाप्र आणि सामाशब्द-वाट शब्दात) **रस्तेबंदी**-स्त्री १ सडक तयार करण्याचें काम. २ रस्ता बांधणी, रस्ता-दुरुस्ती [फा] **रस्तोरस्तीं**-क्रिवि प्रत्येक रस्त्यावर, सर्व रस्त्यातून

**रस्सा**—पु भाजी, कालवण इ० चा आटून राहिलेला रस, रसदार भाजी, कालवण

**रस्सा**—पु मोठी जाड दोरी, दोर, कासरा, दोरखड [हिं] **रस्सी**-स्त्री दोरी; काढणी [अर रसन्, तुल० स रश्मि]

**रहकारू**—पु राहणें 'जया नाहीं रहकारू।' —गीता १२.७९८

**रहगुज(द)री**—वि १ वाटसरू, फिरस्ता २ गैर-वतनदार 'दोन चार दुकानदार रहगुदरी ठेऊन '-वाडबावा २ २१६ [फा र ह्=रस्ता+गुजर]

**रहदारी**—स्त्री १ माणसाचें जाणें येणें, मालाची ने आण, वर्दळ, जाय, रावता 'त्याजवरी यंदा नापीक, तशांत लष्कराची रहदारी' -ख ८५०. २ जकात पट्टी ३ जकातमाफीचा परवाना, पासपोर्ट 'इमजास यैसी पावताच रहदारीचें दस्तक रवाना केलें -ख ७ ३७८६ [फा राह-दारी] ०जकात-स्त्री रस्ता बांधण्याबद्दलची पट्टी, कर

**रहवर**—पु वेगवान घोडा 'मित्ररथीचा जैसा रहवर। वलाढ्य सुंदर तैसेचि। -ह २२ ३६ [फा रहवार] **रहवाळ**-न घोडदळ 'त्याउन मार्गे रहवाळ आलें।'-साहद ७ ५४

**रहंवर**—पु पहिल्या प्रतीचा, दर्जाचा रथ श्रेष्ठ रथ 'कीं परवाचा सरु जैसा। रहवरु मिरवितसे तैसा।'-ज्ञा ११३९ २ (सामा) रथ [स रथवर प्रा रहवर]

**रहवाई**—वि राहणारा 'इभ्रामखान गाडदी निजाम अली पाशील रहवाई' -भाव १२० [राहण]

**रहवास**—पु १ सहवास, दळणवळण, परिचय २ रहिवास, राहणें वस्ती [स रहिवास]

**रहसाळी**—स्त्री रहस्य, दृढ मैत्री, एकमेकांशीं वागण्यातील गोडीगुलाबी आणि प्रेमळपणा [रहस्य]

**रह स्थान**—न गुप्त जागा एकांत जागा, खासगी जागा [स]

**रहस्य**—न १ गौप्य, गुप्त गोष्ट, खासगी गोष्ट 'बदले असेंचि नारद केशव मजसी रहस्य हें मार्गे।'-मोभीष्म १२ ३९ २ मैत्री, स्नेह, प्रेम परस्पराचा सख्यभाव 'रहस्य राहून रंग मारला।'-ऐपो २५३ ३ विनोद खेळ, गम्मत चेष्टा थट्टा-मस्करी, वागणें-बोलणें ४ मुख्य उद्देश, तात्पर्य, महत्त्वाचा मुद्दा, खोंच 'तुम्ही बोलता यांतील रहस्य माझे ध्यानात आलें नाहीं' ५ राम, गोडी, फायदा, चांगलेपणा 'सराफीचे व्यवहारांत आता कांहीं रहस्य राहिलें नाहीं' **रहस्यात येणें**-खुलणें, रंगात येणें **रहस्यभेद**-पु गुप्त गोष्ट फोडणें, तिची वाच्यता करणें

**रहा**—स्त्री १ मार्ग, वाट, 'रघुनाथराव यास सुरतेहून मुरुडीचे रहानें मुंबईस रवाना केलें'-ख ७ ३५७० २ रीत, पद्धत 'चवथाची रहा जशी असेल तीप्रमाणें तुम्ही चाला' ३ वागणूक, वर्तन 'साटी घेतल्यावर (मुंबई करांनीं) लिहून पाठविलें कीं पुतेकेश घेणार म्हणून आम्ही घतली! ह रहा कोण?'-ख ७ ३५६८ [अर राह्] ०दार-पु १ वाटसरू, वाटचाल करणारा 'वाणी उदमी वगैरे रहादार यास लुटून वाटा मारितात'-वाडसमा २ १५५ २ मार्ग-रक्षक. 'माग, रामोसी व रहादार'-भाअ १८३४ [फा राहादर्] ०दारी-रहदारी पहा ०रास्त-वि योग्य, न्याय्य; सरळ, प्रामाणिक, बिनचूक (भाषण, वागणूक) [फा राह्+रस्त] ०रीत-स्त्री चालरीत 'सांप्रत त्याची रहा-रीत मराठे लोकांप्रमाणेंच आहे'-भाजुऐगो २७ [राह्+रीत]

**रहाकळ**—स्त्री न कावरेंबावरें होणें, राहकळ पहा

**रहाट**—पु १ पाणी ओढण्यासाठीं दोन चाकाचें एक साधन २ यंत्राचें चाक (पाणी काढण्याच्या, ऊसास पीळ देण्याच्या, दोऱ्या वळण्याच्या) (सामा) एखाद्या यंत्राचें चाक ३ यंत्र ४ वाडग्यावर सूत भरण्याचें साधन ५ सूत कातण्याचा चरखा [स अरघट्ट, प्रा अरहट्ट-रहट] ०गाडगें-न १ वर गाडग्याची अगर पोहऱ्याची माळ असलेलें रहाटाचें मोठें चक्र २ (ल) नशीबाचे नेहमीं होणारे फेरफार चांगली किंवा वाईट परिस्थिति ऐहिक व्यापार, खालींवर होणें, (प्रपंच, व्यवहार इ० ची) ३ एकसारखी देवघेव, व्यवहार ०घटिका-स्त्री रहाटगाडगें 'न चुके संसार स्थिति। रहाटघटिका जैसी फिरतचि राहिली।'-तुगा २४८३ ०पाळणा-पु यात्रेंत चार पाळणे बांधलेलें फिरतें चक्र उभारतात तें जत्रेंतील खालींवर फिरणारा पाळणा ०घड-स्त्री (कों) रहाट तयार करण्यास लागणारीं साधनें (कणा, रवे, खापकड, लोट तुन इ०) ०वणी-न (को) रहाटाचें पाणी, रहाटगाडग्यानें काढिलेलें पाणी, याच्या उलट ओढ्या-विहिरींचें पाणी 'या एवढे मोठें आगरास रहाटवणी किती म्हणून शिंपाल' [रहाट+वणी=पाणी] **रहाटागर**-पु न रहाटानें पाणी देऊन तयार केलेलें पीक, मळा, शेत [रहाट+आगर] **रहाट्या**-वि १ रहाट चालविण्यास नेमलेला अगर नेमण्यास लायक मनुष्य, पशु २ दोन्ही बाजूंच्या वनीनें खळणारा खेळाडू ३ एकदा एक तर

एकदा दुसरी बाजू घेणारा, दुटप्पी, वेळ यईल तसें वागणारा ४ (ल) व्यवस्थापक, प्रमुख ५ (लग्न इ० समारभांत) वतन न घेता काम करणारा ६ ओझें वाहून शिवाय वाट दाखविणारा वाटाड्या, हमाल व वाटाड्या [रहाट]

**रहाटणें**--क्रि १ एखाद्या कामात अभ्यस्त होणें, रुळणें; काम-धदा अगवळणीं पडणें २ (काव्य) वागणें, वर्तणें [रहा]

**रहाटी**--स्त्री १ आब इ०ची निबिड राई, आब, वाभळी, सुरमाड इ० वाची जी निबिड राई असल्ये ती, जाळी, दाट झाडी 'या दाट रहाटीमध्यें' २ किल्ल्याच्या पायथ्याची झाडी (जीमध्यें थोडिशी वस्ती असते अशी)

**रहाटी**--स्त्री १ पायरहाट पायानें चालविण्याचें रहाटगाडगें २ सूत उकलण्याकरिता ज्यावर प्रथमत सुत ताणतात ती

**रहाटी**--स्त्री १ पद्धत रीत शिरस्ता, पूर्वीपासून चालत आलेला प्रघात २ (काव्य) वागणूक, वर्तणूक [राह]

**रहाड-डी**--स्त्री १ राड, चिखल 'कोण तें रहाडीचें सुख। वरतें पाय आरतें मुख।'-तुगा २७९९ २ शिमग्यात धुळवडी साठीं केलेली चिखलाची खळी ३ धुळवडींत खेळणें, धुळवड ४ चिकचिक, राड (जमीन, रस्ता यावरील) ५ चिकचिक, रेवडी, शणसडा (नासकें वलिंगड, पापळलेला गूळ इ० चा) राड पहा

**रहाडण**--स्त्री (व) खापराचा तवा, परळ 'कुंभाराकडून रहाडण आण'

**रहाडा-डी**--पु १ रगाडा, गर्दी, गडबड (लग्न, मेजवानी इ०ची) २ (सामा) गलका, गोंधळ, धामधूम इ० (क्रि०घालणें, पडणें, असणें) [रहाड]

**रहाडी**--स्त्री एक बारीक जातीचा कळक चिवाटी

**रहाण रहाणें**--न १ (कों) अगात दैवत आणवून बोल विणें, एखाद्याच्या अगीं पिशाच्चाचा सचार व्हावा म्हणून देवभगत जो वाद्याचा गजर करतात तें (क्रि० घालणें माजवणें) 'कले समधाचे सायास। राहाणें घातलें बहुवस। -दा ३ ३ ४४ २(ल) एखादा मनुष्य मरू घातला किंवा मेला असता होणारी रडारड

**रहाण**--न (ना) कामाचा ढींग, तुबलेलें काम

**रहाणें**--क्रि राहणें पहा [स रह्=थावणें]

**रहाणी, रहणी**--स्त्री वागणूक, वर्तणूक वहिवाट, चाल, पद्धत 'कथनी पठणी करूनि काय। वाचुनि रहणी वाया जाय।' -तुगा ३६३१ रहणीस लागणें-लावणें असा प्रयोग येतो [फा राह, म रहा]

**रहार**--स्त्री तुरीची एक जात -के ४ १२ ३६ [हिं अरहर]

**रहासाळी**--स्त्री (कों) रहसाळी पहा

**रहाळ**--स्त्री १ (समासात उपयोग) प्रात देश, परगणा, जिल्हा उदा० 'पुणें रहाळ, नाशिक रहाळ, सोलापूर रहाळ इ० २ विवक्षित भाग, हद्द (प्रांताची) 'या रहाळांत अशी चाल नाहीं' ३ वेटाळें, गांवांतील वस्तीचा विशिष्ट भाग, वाडी

**रहाळ-ळी**--स्त्री पु १ दाट परिचय, सहवास (माणूस, व्यवहार यांशीं) २ घरोबा, निकट स्नेहसबध ३ (घ) यणारा-जाणाराची गर्दी, दाटी, वर्दळ **रहाळणें**-क्रि १ चागला परिचित होणें, दाट घरोबा असणें २ अगवळणीं पडणें, सवय होणें [रहाळ] **रहाळसहाळ, रहाळसाळ**-वि १ खुल्या दिलाचा, मोकळा; मनमिळाऊ २ (व्यापक) मनमोकळी, दिलजमाईची, प्रेमळ (भाषा) [रहाळणें+शील] **रहाळी**-स्त्री रहाटी पहा **रहाळीस लागणें**-योग्य मार्गास, वाटेस लागणें.

**रहित**--वि शिवाय, खरीज, वर्जित (समासात उपयोग) उदा० जलरहित धनरहित, क्रोधरहित 'विचाररहित पुरुष शोभत नाहीं' [स रह्=सोडणें] **र(हि)हीत**-वि १ (हिशबी) बाकी, अवशिष्ट, मागच्या खर्चांत न आलेलें उदा० रहीत-आढावा-जमाखर्च-खरीज-रक्कम-तारीख-मिति-व्याज-शिल्लक इ० २ राहिलेलें, शिल्लक, अद्याप करावयाचें असलेलें ३ रद्दबातल; रद्द असलेलें [राहणें]

**रहिवाल**--वि वेगवान (घोडा), रहवर पहा

**रहिवास**--पु १ राहणें, वस्ती, मुक्काम, निवास, वास्तव्य 'जिय उदरीं तुझा वास। तेथेंचि माझा रहिवास'-मुआदि १७ १३८ २ घर, निवास, राहण्याचें ठिकाण। 'मीचि घ्राण मीचि वास। मीचि जाण सुवास। मजवेगळा रहिवास। परिमळास असेना।'-एभा १३ ३४६ **रहिवासणें**-क्रि १ वस्ती करणें, मुक्काम करणें, राहणें २ स्थिर होणें, चिकटणें, रमणें 'रहिवासले मन पाहूनि स्वरूप।' **रहिवासा**-वि वसति करून राहणारा, स्थायिक याच्या उलट उपरी [रहिवास] **रहिवास चाल**-स्त्री घोड्याची एक चाल, बसणाराचें अग हलू न देता घोड्यानें जाणें

**रही**--स्त्री १ राग, ओळ, रव पहा २ पायाची धूळ वदिल्या हृषिकेशाच्या रही।'-अफला ५९

**रहू**--पु (कों) पेरण्यासाठीं भिजवून मोड आणिलेलें धान्य (प्र) रोह पहा [स रुह्] **रहुपणी**-स्त्री (राजा) दिवाळयात भातास मोड आणून तें भात पेरणें, रोपण

**रहेपट**--स्त्री (ना) थापटी, थापड

**रहोपहो**--पु रोहापोहो पहा

**रळ**--स्त्री (सामा) रडी, रही, खेळात चिडून वाटेल तसें खळ लागणें (क्रि० खाणें घणें खेळणें, आणें) [रडणें]

**रळपळ रळफळ**--स्त्री १ गोंधळ गैरव्यवस्था बेशिस्त पणा, घालमेल (परिस्थिति, काम, वस्तु इ०ची) 'ऐसें का जालें मनही न कळे। कीर्तनाच रळपळे जगीं।'-तुगा १२८९ २ बेचैन, दु ख, अस्वस्थता ३ जळफळ, भाडण ५ यहा, रळी पहा

**रळी**—१ विनोद, थट्टा, मस्करी, कौतुक 'तूं या विश्वाची अनादि आदी। बैससी जिये सभासदीं। तेथें सोयरीकीचिया सवर्धी। रळी घोलो'–ज्ञा ११ ५८४ २ हट्टिवाळपणें धरलेला आग्रह, हट्ट (क्रि० घेणें, चालणें, पुरविणें, चालविणें) 'आईबाप पोराची रळी चालवितात' ३ ठगा, भाइण 'झालकी हे भली रळी।'–गीता १ २१८४ ४ व्यंगोक्ति–वक्रोक्त्यादिकें करून केलेली थट्टा ५ विम्बना, खोडी 'विन्मुख जो प्रारब्ध पाहती पाडव द्रौपदीची रळी।'–होला ११०

**रक्षक**—वि १ रक्षणकर्ता, सरक्षण करणारा २ (स) कृपण, चिक्कू ३ पहारेकरी, शिपाई ०गण–पु १ रक्षण करणारे हत्यारबंद शिपाई (इ) घोडीगार्ड–ऐरापुविवि १८४ २ पहारेकरी, रखवाल्या, राखण्या 'तुम्ही बाहेर जाऊं लागाल तेव्हा घरास कोणी रक्षकगण ठेवा, मग जा' [स] **रक्षणाईत**–पु रखवाल्दार 'तव त्या रक्षणाईतीं हटकिलें। तुम्ही कोणाचे गोण वहिले।'–जै ७६ १७ **रक्षणीय**–वि रक्षावयास योग्य, जरूर, आवश्यक, पात्र [स] **रक्षणें**–क्रि साभाळ करणें, राखणें, जपणें **रक्षपाळ**–पु रक्षक 'तेथ राभे रक्षपाळ सैन्यपती। शैल्यू असे।'–शिशु १०३७ **रक्ष रक्ष होणें**–अगदीं अगतिक दशा प्राप्त होणें, त्राहि त्राहि भगवान् अशी अवस्था येणें **रक्षा**–स्त्री १ राखण, जोपासना २ सुरक्षितपणा ३ अभिमंत्रित ताईत, गंडा, (कशाची बाधा होऊं नये म्हणून) मनगटावर बाधतात ती ४ श्रावणी पौर्णिमेला हातात बाधावयाची राखी ५ लाख ६ प्रसूत स्त्री आणि तिचें मूल याच्या गळ्यात इडापीडा टाळण्यासाठीं सहाव्या दिवशीं सठीची पूजा करून तिला वाहून बाधतात तो दोरा ८ राख रखेली, ठेवलेली स्त्री –वि रक्षण केलेली, रक्षित 'प्रभुजी रक्षा तुमची दासाची मी ल्हानशी बटिक।' [स रक्ष] **रक्षापुत्र**–पु लेकवळा, दासीपुत्र **रक्षाबंधन**–न श्रावणी पौर्णिमेस हातात राखी बाधण्याचा विधी [स] **रक्षावा**–पु रक्षण 'जेणें जेणें मार्गे रिघावा। करील तैसा तैसा रक्षावा।'–गीता १ ६९४ **रक्षित**–वि राखलेलें साभाळ केलेलें, सरक्षित सुरक्षित **रक्षोविधि**–पु राक्षस विवाह 'रक्षोविधी करूनि ने परिणूनि मातें।'–अकक २ कृष्णकौतुक २७ **रक्षोहण**–न रक्षणाच्या मंत्राचें पठण, स्तोत्रगान 'द्वारीं करावया रक्षण। केलें रक्षोहण मंत्रीचें।–जै ९२ ५४ **रक्ष्य**–वि रक्षणीय [स]

**रक्षस**—पु राक्षस [स]

**रक्षा**—स्त्री राख भस्म 'गिरी टाकिती चड महीत वृक्षा। रथाची शतें त्यातळीं होत रक्षा।'–मुरा युद्ध ११९ [स]

**राई**—स्त्री १ मोहरी 'राई राईएण वीर्जी।'–ज्ञा १४ २५६ २ बारीक कण –वि क्षुद्र निरुपयोगी, क्षुल्लक 'स्वप्रकाशा प्रकाश काई। दृष्टान्त विचार अवघे राई।'–ज्ञाप्र १०४ 'मायबापाची आण याला राई।'–राला ४२ [स राजिका] (वाप्र) **राईचा पर्वत करणें**–एखादी हकीकत, बातमी, फुगवून सागणें, अतिशयोक्ति करणें, पराचा कावळा करणें सामाशब्द– **०काई**–वि बारीक कण, तुकडे तुकडे झालेलें **०भर**–क्रिवि अगदीं थोडें **०भोग**–पु एक प्रकारचे तांदूळ (प्र) रायभोग पहा

**राई**—स्त्री १ बन, दाट झाडी 'एक वृक्षाची राई होती सीत उतरलें'–विवि ८ ८ १५१ २ रांग [स राजि, प्रा राइ]

**राई**—स्त्री राही, राधा 'रखुमाईवल्लभा राईच्या वल्लभा पावे जिवलगा।'–विठ्ठलाची आरती [स राधिका–राही–राई, वें राय=राजा]

**राई**—स्त्री (सोनारी) तांबें [सं रक्त, म रातें]

**राउटी**—स्त्री रावटी, तंबूचा एक प्रकार राहुटी पहा

**राउ(ऊ)त**—पु १ घोडेस्वार 'भ्रमले धनुच्या परिसोनि राउत खास।'–मोविराट ६.२८ २ घोड्याचा खासदार '. पसत घोडा मोगलाई सामानासह बख्तशीर कामगिरीचे ज्कार्णी पोंचेल अशा बेतानें राउताबरोबर कारखान्यातून रवाना करावा'–ऐरापुप्र ४ २५८ ३ रजपूत ४ मागास ही सज्ञा लावतात ५ (ढोरकाम) यादी [स राजपुत्र] **०वाड**–पु राजापेक्षा कनिष्ठ दर्जाचा पुरुष 'रायापासौनि राऊतवाडु। हें ब्रीद सत्य केलें।'–शिशु ५१८ [राजवत्] **राउताळी**–स्त्री (महानु) शिपाई, दळ, सैन्य 'राउताळी अफाटे।'–गस्तो ४४ **राउताळें**–न (महानु) सैन्य 'ते देखौनि राउताळें।'–शिशु ९६१ **राउतैं**–न १ (महानु) राउतपणा, स्वारी 'जेयावरी परब्रह्म आमोले–पणें। राउतैं करी।'–शिशु ५०७ २ घोडदौड 'निघाला राउतैं करीतु। असिवारापुढें।'–शिशु १००२

**राउत**—पु अपानवायु 'येक राउत साडिती।'–दा १८ ९ १७

**राउती**—स्त्री चादीचा डाख देताना उपयोगात आणावयाचें मिश्रण –जनि (पारिभाषिक शब्दयादी) १२ [राई ४ पहा]

**राउस**—पु एक मासा –प्राणिमो ८१

**राउ(ऊ)ळ**—पु १ (महानु) राजा 'राउळें नेली सर्व संपत्ती'।–भाए ७२६ २ (महानु) श्रीकृष्ण परमात्मा, देव 'भवमोचकें चरित्रें। राउळाचीं।'–ज्ञाप्र९५२ ३ (महानु) गोसावी, देव चक्रधर 'ऐसीं परीवरें पवित्रें। राउळाचीं लिळाचरित्रें।'–ऋ २५ ४ छोटे रजपूत जातीचे जहागीरदार ५ श्रीगुरुमहाराज, श्रेष्ठ पुरुष 'तरी याचिलागीं तुमतें। म्या राउळासि विनविलें होतें।'–ज्ञा ५ ५ ६ एक जात किंवा तिच्यापैकीं एक व्यक्ति हे भैरवाचे भक्त असून कोष्टी कामाकरितां लागणारे कुचले, फण्या

इ० तयार करितात (नाशिक) वई तयार करणारी जात -ज्ञान प्रकाश ९ ९ ३१ ७ बदरीनारायणाचा नम्बुद्री ब्राह्मण जातीचा पुजारी 'बदरीनारायणाची पूजा अद्याप आचार्यांचे लवेरी म्हणून ब्राह्मण आहेत त्याजकडेस आहे. त्यास राऊळ म्हणतात -तीप्र ५३ ८ पद्मटेस हातात मोठा त्रिशूळ घेऊन दोहरा म्हणत भीक मागणारा भिकारी -न १ घर; राजवाडा 'आला वसुदेवाचिया राउळा।' -एभा २ ३९ २ देऊळ, मंदिर 'काकडआरतीस ते वेळीं। पुजारी आले राउळात।' -भवि २ २९ [स राजकुल] सामासशब्द- ०गण-न (महानु) राजमंदिर 'काइवो बोलणें राउळगणात।'-घवळे पू ७ २ राउळार-न राऊळ, राजवाडा

राऊ—पु १ राजा २ (सांकेतिक) थोरले बाजीरावसाहेब पेशवे किंवा गादीवर बसलेले बहुतेक सर्व पेशवे. -पया २९१. राऊसाहेब-पु थोरले बाजीराव साहेब पेशवे, राऊ पहा

राओ—पु (महानु) राजा 'जेथ सर्वज्ञ राओ निरूपिता।' -माए ३८

रांक—वि फार गरीब, रंक पहा 'नातरि दुर्भेक्षीं पक्वान्नें। रांकु लाहे।' -ज्ञ ११ [रंक]

रांक—स्त्री (तजा) दिमाख, अभिमान, मगरूरी

रांकट—वि १ शरीरानें बळकट असून नाजुकपणा किंवा बारीक युक्ति इ० गुण अंगीं नसलेला, गलेलठ्ठ, गावढळ, कणखर व टणक २ घातपाताविषयीं विचार न करिता अगधटाईनें एखाद्या कामात पडणारा (मनुष्य, त्याचें शरीर), साहसबुद्धि, बज्रवेढी [रानट] रांकटाई-स्त्री रांकटपणा, कणखरपण, टणकपणा, मनाचें धाडस, धिंगई [रांकट]

राकडला—वि (व) अधाशी 'राकडल्यासारखें त्यानें मोठ्या दगडीभर सातूचें पीठ खाल्लें'

राकडु—वि नीरस, शुष्क, वीट आणणारा 'आनंदु होओ गोडु। फुन तोही नावेकु राकडु।' -शिशु १३४ [रांकट]

राकणा—पु (हेट) गुराखी [राखणा]

रांकधनी—स्त्री पूर्णिमेची समाधानी, पूर्णिमेच्या परमानंद कारक प्रकाशाची विपुलता, रेलचेल 'दारूण संसारु दु काळीं। जेणें परमानंदाची राकधनी केली।' -शिशु ५ [राका+धणी ?]

राकस—पु राक्षस, भूतपिशाच 'राकस पिठा काढती' -मसाप १२ [स राक्षस] ०भुक्स-वि (व) रानवट, अव्यवस्थित राहणीचा 'बाया कशातरी राकस भुक्स राहतात'

राका—स्त्री पूर्णिमा 'राकाशशी मदनदर्पण भाविला हे।' -नल २७ [स.]

राकून—पु अस्वलाकृति, कुत्र्याएवढा मोठा एक मांसाहारी प्राणी हा उत्तरअमेरिका व उष्ण कटिबंध यात आढळतो. -प्राणिमो ३०

राकेल—न घासलेट, मटीचें तेल हा खनिज पदार्थ पृथ्वीच्या पोटातील आहे काहीं ठिकाणीं याचे झरे आहेत [इं रॉक्=खडक+ऑईल=तेल]

राख—स्त्री भस्म, जळल्यानंतर राहिलेला अवशेष, रक्षा 'तिसरा खिजमतगार, राख मग चौघाची एकच मौत।' -ऐपो ३२४ [स रक्षा] (वाप्र) राख सावडणें-टाकणें-प्रेत जाळल्यानंतर ती राख भरून टाकणें सामासशब्द- राख मंडळ-न (को) राखमडळ, राख पसरलेली जागा रखमडळ पहा ०मीठ-न (सोनारी धंदा) मणी वगैरेस चुकून राहिलेल्या छिद्रातून, भरलेली लाख बाहेर येऊं नये म्हणून राख व मीठ याचें मिश्रण वाटून लावतात तें ०रांगोळी-स्त्री पूर्ण निर्दळण, नाश, विध्वंस, जाळून पोळून केलेला सत्यानाश (देश, गाव, शेत, कुटुंब, काम याचा) (क्रि० करणें, होणें) [राख+रांगोळी] ०रांगोळी करणें-पूर्ण विध्वंस, नाश करणें ०वड, राखाडा-डी-स्त्री १ राखेची रास, ढीग २ राख विखुरलेली जागा ३ (कों) नुसती राख [राख] ०वडा-पु राखुडी राखाड-डी-स्त्री राख राखाडी-स्त्री १ पसरलेली किंवा एकत्र ढीग केलेली सावलेली राख २ (कों) (सामा) राख, रखा. राख मंडळ-न राखमडळ पहा राखुंडा-पु राखेचा ढीग, राखेची खळी -वि ओठ तुटलेला (मनुष्य) राखोंडें पहा राखुंडी-स्त्री १ गोवरीच्या राखेचा ढेपसा २ (ल) करपून काळा झालेला भात, भाकरी इ० [राखुडा] राखोटी-स्त्री राख राखोंडा-पु राखुडा राखों(खो)डा-वि राखेप्रमाणें रक्ष, निरस, भरभरीत (जमीन, चुरूम, पीठ, विशिष्ट चूर्ण) [राख] राखोंडी-स्त्री १ राखुडी अर्थ १ पहा २ (ल) नाश 'झाली रत्नाची राखोंडी।' -एभा ११ ५५४ राखोंडें-वि ग्र रावखडें, जन्मत च ओठ तुटकें (मूल) 'मुकें बधीर राखोंडें।' -दा ३ ६ ४१

राख—स्त्री रखेली, ठेवलेली स्त्री, उपस्त्री [स रक्ष्=राखणें]

राखडी—स्त्री १ स्त्रियाचा एक वेणींत घालावयाचा अलंकार, केशभूषण 'मुद, राखडी लेणें वेणीचें। करी शृंगार।' -देवदास भामावर्णन ९९

राखण—स्त्रीन (कों) १ राखणें, ठेवणें, रक्षण करणें २ रक्षक म्हणून ठेवलेला मनुष्य, रखवाली 'राखण वायसें राहवेना।' -एभा १३ ४७४ ३ रक्षकाचें, रखवालदाराचें वेतन ४ पिशाचादि उपद्रवापासुन आपलें रक्षण व्हावें म्हणून ग्रामदेवतेस प्रतिमासीं किंवा प्रतिवर्षी अर्पण केलेला नारळ, बळी ५ भुतें, उंदीर, टोळ इ०काच्या उपद्रवापासुन मनुष्यें, प्राणी, शेतें इ०काना मंत्र, तंत्र, मानता इ० उपायानीं मुक्त करून सुरक्षित ठेवण्याची क्रिया, भूतादिकाचा बंदोबस्त करणें (क्रि० लावणें, करणें, लागणें) ६ (क) पूर्ण अभाव होऊं नये म्हणून घरात राखून ठेवलेलें अल्प

स्वल्प धान्यादि खाद्य पदार्थाचें परिमाण, घर म्हणून ठेवलेला पदार्थ 'सगळे दाणे खर्चू नका, घरांत राखण म्हणून दोन पायली तरी राखून ठेवा ' ७ (माळवाप्रांत) अतिशय क्षुद्रपतिमुळें व अकाळविकाळपणामुळें घराचें व त्यातील स्त्रियांचें चेटकापासून रक्षण करण्यास समर्थ म्हणून मानलेली स्त्री -न ब्राह्मणांत प्रसूती नंतर तिसऱ्या दिवशीं, सुईण बाळंतिणीच्या खोलींतील एक कोनाडा सारवून, रांगोळी काढून, त्यांत वर गव्हाचीं वाटें ओढलेलें व आत पैसा, सुपारी टाकलेलें जें मडकें ठेवते तें, किंवा बाळंतिणीच्या दहा दिवसांत तिच्या जेवणाच्या वेळीं तिच्या खोलींत, निखारा व त्यावर थोडा भात टाकून ठेवलेलें मडकें याच मडक्यांत प्रत्येक जेवणाच्या वेळीं असा निखारा व भात टाकतात. [स रक्षण] (वाप्र) ०लागणें-उपद्रव न होईल असा बंदोबस्त करणें 'या खिस्तीचे एकदा रुपये भरले म्हणजे चार महिन्याची राखण लागली ' सामाशब्द- ०करी-दार, राखणा, राखणाई(इ)त, राखणार-पु १ रखवालदार, पहारेकरी २ गुराखी 'जरी राखणाइत सहपरीवारी ।'-विउ ९ ७६ 'माळी काचा मी तो राखणार।'-दावि ४५९ म्हण० राखण्यानें गुरें टाकलीं म्हणून धनी टाकील काय? राखणावळ-स्त्री १ गुराख्याची मजुरी, वेतन २ राखणें, रक्षण करणें, काळजी घेणें [राखणें] राखणी-स्त्री राखणें, संभाळणें, ठेवणें, बाळगणें इ० [राखण] राखणें-सक्रि १ रक्षणें, रक्षण करणें, रखवाली करणें, खबरदारी घेणें, अपकारापासून वाचविण्याकरितां आपल्या ताब्यात घेणें 'काढूनि राखे प्राणु।'-ज्ञा १६ १४३ २ ठेवणें, उरविणें, पुढच्या काळाकरितां किंवा कांहीं उद्देशानें ठेवून देणें 'त्या रानांतील गवत यंदा राखलें आहे ' ३ खर्चल्याशिवाय ठेवणें (सामर्थ्य, जोर) 'जोर-हात राखला ' 'टोला-घाव-मार-राखला ' ४ चोरून ठेवणें, पोटांत किंवा मनांत ठेवणें 'तुझ्या मनांत असेल तें सारें बोल कांहीं राखू नको ' ५ एखाद्या पदार्थावर ओघानें एखादी क्रिया करणें प्राप्त झालें असतां ती न करितां, तो पदार्थ तसाच ठेवणें, आहे त्या स्थितींत राहू देणें 'कोनाड्याची जागा तेवढी राख आणि अवघी भिंत सारीव ' ६ करणें, ठेवणें, एखादा पदार्थ स्थित्यंतर न पावू देतां ठेवणें, धनविणें व कायम करणें 'ही भिंत फार रुंद राखली म्हणून जागा अडली ' 'हा अंगरखा त्वां आखूड राखलास म्हणून शोभत नाहीं ' ७ स्त्रीनें पुरुषास किंवा पुरुषानें स्त्रीस उपभोगार्थ बाळगणें, ठेवणें ८ ठेवणें, धरणें, पाळणें, हेळसांड, अवज्ञा न करणें, एका बाजूस पडू न देणें ९ व्यवस्थित योग्य स्थितींत ठेवणें १० पालन करणें, न ढळणें (वचन, आज्ञा, प्रतिज्ञा) [स रक्षण, रक्ष् प्रा रक्ख, प रक्खण, सिं रखणु हि रखना, राखना, गुज राखवुं, बं राखिवा, मेजि रख, पोर्तुजि भरखना=रक्षक] म्हण० राखील त्याचें घर, खणेल त्याचें शेत राखणेकरी-पु राखणदार, राखणकरी पहा राखण्या-पु. (राजा) गुरें राखणारा, गुराखी राखले-स्त्री हुंडी विकत घेणाराची स्थिति, पेशा, अधिकार, पत दर्शक योजावयाचा शब्द 'त्या हुंडीमध्यें माझी राखले घातली होती ' [ राखेंण (गुजराथींतून आलेला शब्द)] राखवळ-स्त्री (प्र) राखणावळ, राखण्याबद्दल मजुरी, वेतन

राखणा—पु पानें खाणारा एक लहान किडा

राखाडुली—स्त्री (बायकी) दुहेरी दोरा पिवळा करून घेऊन, त्यांत दोन सोन्याचे मणी आणि हळकुंड व वखंड यांचे तुकडे बांधून मुलाचें नांव ठेवण्याच्या वेळीं बाळंतिणीच्या गळ्यांत बांधतात तो दोरा राखांडुळी-स्त्री (कों) बाळंतीण झाल्यापासून तिसऱ्या किंवा पांचव्या दिवशीं भूतादि बाधा निरसनार्थ बाळंतिणीच्या खोलीच्या दाराशीं राखेनें भरून ठेवलेलें भांडें राखावळ-स्त्री राखणावळ, राखणाऱ्या मनुष्याची मजुरी राखी-स्त्री पिशाचापासून रक्षण व्हावें म्हणून श्रावण शुद्ध पौर्णिमेस हातांत रेशमाचा, कलाबतूचा अथवा कापसाचा दोरा बांधतात तो, रक्षासूत्र [राखण] राखीपाडवा, राखीप्रतिपदा-पुस्त्री राखी पुनवेच्या पुढील दिवस ब्राह्मणाच्या तीन मोठ्या भिक्षा मागण्याच्या दिवसांपैकीं हा एक आहे बाकीचे दोन गुढी पाडवा व दिपवाळीचा पाडवा हे होत राखीपुनव-पू(पौ)र्णिमा-स्त्री श्रावण शुद्ध पौर्णिमा, या दिवशीं राखी बांधतात राखील-स्त्री (कों) १ गुरें, शेत इ० राखण्याचें काम (क्रि० घालणें) २ गुराख्यास गुरें राखण्याबद्दल द्यावयाचें वेतन -वि राखलेला, बाळगलेला (रखेली, माकड, कुत्रा, रांघू, लढणारा एडका) राखीव-वि. राखलेला, राखून ठेवलेला [राखणें] राखीव खातें-न मध्यवर्ती सरकारानें प्रांतिक सरकाराकडे न सोंपविता आपल्याकडेच ठेविलेलें खातें, (इं) रिझ०र्व्हड डिपार्टमेंट 'तिसरें राखीव खातें म्हणजे परराष्ट्रीय राजकारण होय '-वस्व ६६ राखूळ-स्त्री १ गुरें राखणें, वळणें (क्रि०घालणें) २ गुरें राखण्याची मजुरी राखोळ-ळी-स्त्री १ राखूळ पहा २ राखणावळ राखोळा-वि पाटराखणा पहा [राखणें] राखोळी-स्त्री गुरचराई, गुरें राखण्याची मजूरी 'राखोळी द्यावया नाहीं।'-दावि ७६७ [राखण] राख्या-वि स्त्रीनें ठेविलेला (यार) [राखणें]

राखीसमुख—स्त्रीन (अशिष्ट) राक्षसाची दिशा, दक्षिण दिशा -क्रिवि दक्षिणाभिमुख, दक्षिणेकडे, गगमोहरा पहा [स राक्षसमुख] राखेसमोहरा-री-क्रिवि दक्षिण दिशाकडे, गगमोहरा पहा

राखोळा—पु ओठ तुटका

राग—पु १ रंग, वर्ण, छटा २ रंगविणें, रंग देणें, रंजन ३ लाली, आरक्तपणा 'फुल्ल पलाशवनीची होय सखी शोणिताई

तनु रागें ।'-मोकर्ण १५.६. ४ प्रीति; आवड. ' मग राग द्वेष स्वभावें ।नाशतील।'-ज्ञा २.३३१. [ सं. राग; रंज् ]

**राग**—पु. १ क्रोध; संताप, कोप. २ संस्कृतांत हा शब्द क्रोध किंवा दु ख, आनंद, क्रोध, इच्छा, द्वेषा इ० मनोविकार सामान्यत दर्शवितो. [ सं. ] म्ह० राग खाई आपणास संतोष खाई दुसन्यास. **(एखाद्याचा) राग करणें**-ज्यावर आपला राग आहे तो दृष्टीस पडला किंवा त्याची गोष्ट निघाली कीं रागावणें; त्याचा कंटाळा करणें. **(एखाद्याला) ०आणणें**-एखाद्यास कोपयुक्त करणें, खिजविणें. **०आणणें-धरणें-करणें-येणें**-एखाद्याविषयीं पोटात राग धरणें. **०गिळणें**-अतिशय राग आला असता तो प्रयत्नानें आवरून धरणें. **०नाकावर असणें**-लवकर रागास चढणें, लवकर चिडणें. **०मानणें**-एखाद्याबद्दल अढी बाळगणें; नासपंती दर्शविणें, नाखूष होणें. **०येणें, रागें भरणें**-रागावणें. **रागाच्या हातीं जाणें**-कोपवश होणें. **रागाच्या हातीं देणें**-रागाच्या हवाली करणें, रागाच्या लहरींत सोडून देणें (काम, स्वामित्व, उद्देश) **रागानें लाल होणें**-रागानें संतापणें; अतिशय रागावणें **रागानें हिरवापिवळा होणें**-क्रोधामुळें अंगाची कांति बदलणें, भयंकर रागावणें. **रागास येणें-भरणें-पेटणें-चढणें**-खवळून रागावणें, चेतणें; तापणें. **रागें भरून घेणें**-स्वत वर दुसऱ्याचा राग ओढवून घेणें. **(एखाद्याला) रागें भरणें**-एखाद्यावर आपला राग काढणें **रागणें**-सक्रि. रागावणें **रागावणें**-अक्रि कोपयुक्त, रुष्ट होणें. [ राग ] **रागिष्ट, रागीट**-वि कोपिष्ट, संतापी, तामसी. [राग] म्ह० रागिटाची चाकरी तरवारीची धार. **रागी**-वि. १ राग, मनोविकार असणारा (तीव्र, आवेशी, आस्थेवाईक, अनुरत, शीघ्रमनोविकारी, सहृदय, रसिक इ०) २विषयी; आसक्त ३ शोक असलेला. ' तेथ रागी प्रतिमल्लाचा । '-ज्ञा १८४९० [ सं. राग ] **रागीसांड-डी**-स्त्री विषयत्याग **रागीसांडी**-वि विषयासक्त **रांगेजणें. रागेणें**-अक्रि. (काव्य राजा) १ रागावणें. ' रागेजणें सुदुर्मिळ तेंहि जिचें ज्वालसें गगनिं जावें।'-मोसभा ४ ७५ २ रंगयुक्त होणें. रंगणें.' रागेजली अरुण-कांति विराजवी ते।' -नल ९८. [ राग ] **रागेला**-वि. रागावलेला ' रागेला परी सेवक चित्ता । धुसधुसी मिरवतमे । '-नव १४१८२ [ राग ]

**राग**—पु (संगीत) पाच स्वरापेक्षा कमी नाहीं असा वादी-संवादी स्वर व आरोह-अवरोह यानीं शोभा आल्यानें जो जन मनरंजनास योग्य होतो असा स्वरसमुदाय षड्जादि स्वराची परस्पर जुळणी केल्यानें गायनास योग्य होणारा त्याचा रचनाविशेष हल्ली प्रचारात सुमारें दीडशें राग मानितात त्यांचीं नावें — अडाणा, अभिरी, अल्हैया, अहीरभैरव, आसावरी, कानडा, काफी, कामोद, कालिंगडा, कुकुभबिलावल, केदार, कौशी, खट, खमाज, खंबायती, गारा, गुजरी तोडी, गुणकली, गौडमल्हार, गौडसारंग, १ गौरी, २ गौरी, चंद्रकांत, चादणीकेदार, छायानट, जयजयवंती, जयंत, जयतकल्याण, जलधरकेदार, जैताश्री, जैमिनीकानडा, जोगिया, जौनपुरी, झिंझूटी, झीलफ, टंकी, तिलककामोद, तिलंग, तोडी, त्रिवणी, दरबारीकानडा, दीपक, दुर्गा (१), दुर्गा(२), देवगांधार, देवगिरीबिलावल, देवसाख, देशकार, देस, देसगौड, देसी, धनाश्री, धानी, नट, नटबिलावल, नटमल्हार, नायकी कानडा, नारायणी, नीलांबरी, पंचडा, पटदीप, पटदीपिका, पटमंजरी (१), पटमंजरी (२), परज, पहाडी, पीलू, पूरिया; पूर्या धनाश्री, पूर्वी, प्रतापवराळी, प्रभात, बंगालभैरव, बडहंस, बरवा, बहादुरीतोडी, बहार, बागेसरी, बिंद्रावनी सारंग, बिभास (१), बिभास (२), बिलावल, बिलासखानी तोडी, बिहाग, बिहागरा, भंखार, भटियार, भीमपलासी, भूपाळी, भैरव, भैरवी, मधुमादसारंग, मलुहाकेदार, माड, मारवा, मालकौंस, मालवी, मालश्री, मालीगौरा, मियामल्हार, मियांसारंग, मुलतानी, मिरामल्हार, मेघमल्हार, मेघरंजनी, मोटकी, यमनकल्याण, यमनीबिलावल, रागेश्री रामकली, रामदासीमल्हार, रेवा, लंकादहनसारंग, लच्छासाग, ललित, ललित पंचम, लाचारीतोडी, वराटी, वसंत, वसंतमुखारी, शंकरा, शहाणा, शिवभैरव, शुक्लबिलावल, शुद्ध कल्याण, शुद्ध मल्हार, शुद्ध सामंत, शुद्ध सारंग, श्याम, श्री, श्रीरंजनी, सर्पर्दा बिलावल, साजगिरी, सामंत सारंग, सावनी कल्याण, सावेरी, सिंधभैरवी, सिंधुरा, सुघराई, सुहा, सुरदासीमल्हार, सोरठ, सोहनी, सौराष्ट्रभैरव, हमीर, हंसकंकणी, हंसध्वनि, हिजेज, हिंदोल, हुसेनी कानडा, हेम. 'श्री, रागोऽथ वसंतश्चभैरव पंचमस्तथा । मेघरागो बृहन्नाटो षडेते पुरुषा: स्मृता । ' या संगीतरत्नाकर ग्रंथातील श्लोकाप्रमाणें श्री, वसंत भैरव, पंचम, मेघ किंवा मेघमल्हार, बृहन्नाट किंवा नटनारायण असे सहा पुरुष राग आहेत ( मोल्सवर्थ कोशात वरील श्लोक संगीतरत्नाकरात असल्याबद्दल उल्लेख आहे परंतु उपलब्ध संगीतरत्नाकर ग्रंथात हा श्लोक आढळत नाहीं) काव्यात व पुराणात यावर चेतनधर्माचा आरोप केला असून प्रत्येकाला रागिणीनामक सहा (कांहींच्या मतें पाच) स्त्रीरूपें मानिलीं आहेत सामाशब्द- **०माला-ळा, मालि(ळि)का**-स्त्री १ गीताचा एक प्रकार, स्वराची किंवा अनेक रागभेदाची मालिका, निरनिराळ्या रागात म्हणता येण्या सारखें गीत. २ किल्ली दिली असता अनेक रागाचे सुर ज्यामधून निघतात असें यंत्र, पियानोफोर्टे नामक वाद्यासहि म्हणतात [ सं. राग+माला ] **०मालेची चित्रें**-नअव राग गाइले जात असता त्याचा प्रभाव काय दिसतो हें ज्या चित्रावरून दिसतें तीं चित्रें उदा० मेघमल्हार हा राग घेतला तर मोर हर्षभरित होऊन आपला रमणीय पिसारा उभारतो इ० -पेशवेकालीन महाराष्ट्र १६१. **०रंग**-पु १ गाणें व खेळणें, खेळ, मौज व ख्यालीखुशाली.

२ लक्षणें व चिन्हें; साधारण स्वरूप, सुमार (कामाचा, गोष्टीचा) ३ संभव, पूर्वसूचना, बरेवाईट स्वरूप. 'पावसाचा रागरंग पहा, तसें निघा.' [राग+रंग] ०घावक तान–स्त्री (संगीत) ज्या रागामध्यें तान घ्यावयाची असेल त्या रागाच्या जीवभूत स्वराची तान ०संकर–पु गातांना एका रागांत दुसऱ्या रागांतील स्वर मिश्रित करून गाणें [स] ०ज्ञान–न रागांचें, स्वरांचें किंवा गीतांचें ज्ञान [स] रागांग राग–पु (राग) शुद्ध शास्त्रीय राग ह्याच्या लक्षणांत सांगितल्याप्रमाणेंच हा गाइला पाहिजे असा कडक नियम आहे [स] रागालप्ति–स्त्री (प्रबंध) वर्ण, अलंकार, गमक, स्थाय, ह्यांच्या साहाय्यानें रागाचें पूर्ण स्वरूप दृष्टीस पाडणें व त्यांत रागाचे आविर्भाव व तिरोभाव दाखविणें [स] रागालाप–पु (प्रबंध) ग्रह, अंश, न्यास, मन्द्र, तार, अपन्यास, अल्पत्व, बहुत्व, षाडवत्व, औडुवत्व, ह्या रागाच्या विशेषांचें प्रकाशन ज्यांत होतें अशी स्वररचना [स] रागिणी–स्त्री १ मिश्र किंवा पोट राग, मंजुल स्वर असलेला गायनांतील राग प्रत्येक रागास रागिणी सहा अथवा पाच मानिलेल्या आहेत पुराणांत रागिणी ही रागाची स्त्री असें मानिलें आहे राग पहा कांहीं ग्रंथकार रागांचें वर्गीकरण पुरुषराग, भार्याराग पुत्रराग, स्नुषाराग असें करितात त्यावेळीं कांहीं रागांस भार्याराग म्हणतात तेव्हा त्यास रागिणी म्हणून संबोधितात वस्तुतः राग, रागिणी ह्यांमधील भेद कोणत्याहि ग्रंथकारानें स्पष्ट सांगितला नाहीं २ विलासिनी, अनुरक्त स्त्री [स राग] रागेश्वरी–स्त्री एक राग यांत षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात आरोहांत ऋषभ व पंचम वर्ज्य अवरोहांत पंचम वर्ज्य जाति औडुव–षाडव वादी मध्यम, संवादी षड्ज गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर

**राग**—स्त्री १ पंक्ति ओळ, हार, आवली, श्रेणी २ बरोबरी, समान दर्जा लोकपाळ रांगेंच। राउत जिये पदवीचे।' ज्ञा ९ ३२६ ३ (व) मजी, ढींग –वशाप ८ ५१ २४५ ४ दोन्ही बाजूस असलेली उतरती कडा किंवा ओळ उदाहरणार्थ, दोन्ही बाजूस उतार असून मध्यें सचवटा असलेल्या बांधावरून जाणारा मार्ग, एका बाजूस डोंगर व दुसऱ्या बाजूस खोल कडा तुटलेला अशी डोंगरांतील अरुंद वाट, घड्याच्या लावीचा पृष्ठभाग [स राजि, ह रँक?]

**रांगडा**—पु १ गुजराथ व मेवाड यांमधील एका देशाचें नांव व त्या देशांतील व्यक्ति –वि १ अडाणी, रीतभात ठाऊक नसलेला २ रांगडा देशांतील (मनुष्य, भाषा इ०) इसम) [हिं रान्गडा]

**रांगण**—न कुंभाराच्या भट्टींतली राख

**रांगणा**—पु एक मासा –प्राणिमो ८१

**रांगणी**—स्त्री (को) मोठी, रुंद, रक्ताक्ति व किंचित् गोल अशी शिंप हातावर गंधाचा लेप करून त्यावर रेषा उमटविण्याकरितां हिचा पुष्कळ उपयोग करितात

**रांगणें**—अक्रि हात व गुडघे टेंकून पुढें जाणें, सरपटणें [सं रिंगण=सरकणें]

**रागबा(वा)गा**—स्त्री घोड्यास चाल शिकविण्यासाठीं त्यास बांधलेली दोरी 'पुढें राखे नेहटूनि रागवागा।'–एभा २० २१६

**रांगसारांगुस**—स्त्री (राजा) एखादें ठिकाण नासुपीनें सोडून जातांना त्या जागेभोंवतीं रेंगाळणें, घोटाळणें [रांगणें]

**रांगा**—पु स्थिर किंवा शांत समुद्राची पट्टी

**रागा(घा)वळी-ली**—स्त्री घोड्याच्या पाठीवर घालावयाची जाळीदार झूल 'घोडिया वाणली मोहाळी। ०गण टोप रागावळी।'–एरुस्व ८ १५

**रागी**—स्त्री एक धान्य, नाचणा, नाचणी [स]

**रागोळ**—न (माण) खळयांतील कणसें गोळा करण्याचें लाकडी हत्यार

**रांगोळी, रांगवळी**—स्त्री १ देवापुढें, मेजवानीस इ० प्रसंगीं चित्रें, निरनिराळ्या आकृती काढण्याकरितां तयार केलेली शिरगोळ्याची, तांदुळाची किंवा दुसऱ्या वस्तूची भुकटी पूड 'तिया रागवळी सूर्तीं राणियां। चक्रवर्तीचिआ।'–शिशु ५९१ २ वरील भुकटीनें काढलेली रेष, आकृति, चित्र वेल इ० [स रंज्+रंग देणें, रंगवळी, रंग+ओळ] (वाप्र) ०करणें–(ल) सत्यनाश करणें, विध्वंस करणें, टार मारणें 'टेंचून करी रागोळी।' –सप्राम ११ ०होणें–समूळ नाश होणें 'ऐसें साहस करितां होईल तनुची पळांत रांगोळी।'–मो विराट ४ ३३ रांगोळें–न बारीक भोकें पाडलेली, तांबें इ० धातूची नळी हींत रांगोळी भरून ही जमिनीवर ओढली असतां चित्रविचित्र आकृति उमटतात (ना) रांगोळणें

**राघ**—न मोठें पाप महापातक [स]

**राघव**—पु १ रघूच्या वंशांत जन्मलेला विशेषतः श्रीरामचंद्र २ एक अवाढव्य व काल्पनिक मासा (राघव आणि तिमिंगल हे दोघे भूगोलाभोंवतीं एकमेकाचा पाठलाग करीत असून जेव्हां त्यांची गांठ पडेल तेव्हां पृथ्वीची वरील बाजू खालीं व खालची वर अशी ती फिरली जाऊन प्रस्त होईल अशी समजूत आहे) [स] ०दास लाडू–पु रवा, साखर व खवा यांचा केलेला लाडू यास चुरमा अथवा राधाविलास असेंहि म्हणतात ०मासा–पु देवमासा 'जळीं राघवमाशास अडविलें असंख्य झिंगांनीं।'–ऐपो ४०३

**रांघळणें**—सक्रि फरपटत नेणें रघळणें अर्थ १ पहा

**राघावळ**—स्त्री. १ निळीची एक जात २ तांबड्या रंगाच्या लुगड्याची एक जात **राघावळी**-वि राघावळ नावाच्या निळीसंबंधीं, तिनें रंगविलेलें (वस्त्र)

**राघू**—पु (विणकाम) गातडीच्या मध्यभागीं असलेली एक जाड लाकडी खुटी हिच्यातून दोर इकडून तिकडे फिरतात

**राघू-घो**—पु १ शुक, पोपट २ (ल) हृदयाच्या पुला तील हिरवे तंतु ३ (लावणी इ० मध्यें ल) प्रियकर, दोस्त (वाप्र) ०**पढविणें**-पोपटास बोलावयास शिकविणें

**राघोडा**—पु कर्जाऊ घेतलेल्या रकमेवर व्याज म्हणून हंगामावर देऊ केलेलें धान्य इ० किंवा पैसा, अशा रीतीनें पैसा देण्याघेण्याची चाल, काढा 'सावकाराचे दाहा रुपये म्या बाजरी राघोडा कबूल करून घेतले आहेत '

**रांच**—स्त्री (गो) सैन्यातील सर्व शिपायांनीं एकत्र जेवण करण्याची पद्धत -सह्याद्रीच्या पायथ्याशीं १६२ [पोर्तु]

**राज**—पु (व ना) गवंडी, बेलदार, चुन्याचें काम करणारा

**राज, राज्य**—न (ना) (खेळात) एखाद्या खेळाडूवर अथवा एखाद्या पक्षावर आलेला डाव [स राज्य] ०**देणें**-डाव देणें ०**येणें**-खेळात डाव येणें, हार येणें

**राज**—स्त्री (कु) १ झऱ्यांनीं बनलेला पाण्याचा डोह २ (कु) समुद्रास मिळणारा ओढ्याचा भाग

**राजगिरा**—पु एकप्रकारचें तृणधान्य व त्याचें झाड हें झाड तांबड्या माठासारखें असतें पान लांबट, पण रंग फार तांबडा नसतो हें कर्नाटकांत वाढतें, ह्याला तांबड्या मखमलीसारखीं फुलें येतात. ह्याच्या बियास राजगिरा म्हणतात ह्याचा रंग पांढरा, क्वचित् काळा हि असतो पाल्याची भाजी होते व बीं उपोषणास खातात [स राजगिरि]

**रा(रा)जण-णी**—स्त्री बकुळीच्या जातींतील एक झाड फळ बकुळासारखेंच पण पिवळ्या रंगाचें असून गोड असतें हीं झाडें गुजराथेंत फार आढळतात [स राजादन]

**रांज(झ)ण**—पु मातीचें, धातूचें-पाणी साठविण्याचें मोठें भांडें, डेरा 'पाहुणा देखता आगणीं। म्हणे उदक नाहीं रांजणीं।' -कथा ५ २ [दे] **रांज(झ)णी**-स्त्री. १ लहान रांजण २ (कों) रांजच्या खर्चाकरिता रोज काढलेले तांदूळ ठेवावयाचें भांडें [रांजण]

**रांज(झ)णवा(व)डी**—स्त्री डोळ्याच्या पापणीला होणारा फोड, अंजिणी, आंजरली नर्त्री होती रांजणवाडिया।'-दा ३ ६ ४९

**राजणी**—स्त्री (ना) विहीर खोदल्यावर ज्या जागेपासुन ती वर पाणी आणतात तो भाग, विहिरीचा बांधकामाचा तळ, पाया

**राजणें**—अक्रि (काव्य) शोभणें, प्रकाशणें 'राजवस्त्र राजलीं।'-वेसीस्व ७ ४० [स राज्]

**राजन्य**—पु क्षत्रिय [स]

**राजपीण**—स्त्री (कु) स्वयंपाकीण [राधपीण]

**राजस**—वि १ रजोगुणप्रधान, रजोगुणसंबंधीं 'हें नेणेचि राजसें। सुखें जो गा।'-ज्ञा १३ ७४२ २ रागीट, विषयी,लोभी इ०. रजोगुण व गुण पहा [स रजस्] **राजसी**-वि रजोगुण युक्त, रागीट, राजस पहा [स. राजस]

**राजस सा**—वि १ (काव्य) सुकुमार व देखणा, सुरेख, सुंदर 'हे राजस बाळे। किती करशील चाळे।' 'परमसुकुमार राजसी।' २ शृंगारिक नायक [राजा+सा] **राजसवाणा**-वि राजस, सुंदर, सुकुमार आणि देखणा. ०**राजसी**-वि राजकीय याचें, बादशाही, उमदा, भव्य खासा, नामी (मनुष्य, कृत्य, वस्तु) [राजस, राजा+सा] **राजसी उपचार**-पु रोग घाल विण्याचा राजस (मृदु, सौम्य, सुखावह) उपचार

**राजा**—पु १ नृप, नृपति, भूपाल, नरेंद्र, छत्रपति, लहान राज्यें व थोडक्या प्रजा असलेले संस्थानिक व सरदार यांसहि हा शब्द लागतो २ (मंडळीचा, टोळीचा) नायक, मुख्य ३ सजातीय पदार्थसमुच्चयात श्रेष्ठ मानलेला तो ४ अन्न, वस्त्र इ० पदार्थ यथास्थित असल्यामुळें ते मिळविण्याचे कष्ट किंवा काळजी ज्यास करावी लागत नाहीं असा मनुष्य ५ गंजिफाच्या बाजूतील मुख्य पत्त्यातील एक चित्राचें पान ६ बुद्धिबळाच्या खेळात डावातील मुख्य मोहरा ७ वर्षाचा शास्ता म्हणून मानलेला ग्रह, वर्षेशग्रह ८ (ल) वेडा, मूर्ख, स्वैच्छ वर्तन करणारा मनुष्य ९ वसरीच्या राणीस म्हणतात (समासात) राजपत्नी, राजपुत्र, राजकन्या, राजगुरु, राजपुरोहित, राजोपाध्याय, राजसभा इ० ह्याचे मराठी शब्दांशींहि समास झाले आहेत जसें- राजपसत, राजदरबार इ० राजपद उत्तरपदीं यणारे नायक या अर्थाचे काहीं सामासिक शब्द- मृगराज=मृगश्रेष्ठ तीर्थराज=तीर्थांपैकीं मुख्य, सागर किंवा प्रयाग, तसेंच गजराज, सर्पराज, अश्वराज, द्विजराज, देवराज, कविराज वैद्यराज पक्षिराज, स्वामिराज, गणराज, भूतराज यक्षराज, वनराज (श्वापदा किंवा शमी) वृक्षराज राज पद पूर्वपदीं असलेले काहीं सामासिकशब्द- राजकांति, राजशोभा, राजकृपा, राजचित्त, राजमित्र, राजप्रिय, राजाश्रय, राजाश्रित, राजबुद्धि राजसत्ता, राजरंग, राजमहाल, राजमार्ग इ० [स राज्= प्रकाशणें] (वाप्र) **राजापासून रंकापर्यंत**-श्रीमंतापासून तों गरीबापर्यंत सर्व दर्जाच्या लोकांस 'ज्ञ प्रगल्भ राजापासुन रंकापर्यंत मान मिळत असे 'राजा याचें राज असें रूप होऊन झालेले काहीं सामासिक शब्द- ०**गंभीर**-पु १ (शृंगारिक काव्य) गंभीर स्वभावाचा,

सम्यें नायक -वि बादशाही; भव्य, नामी, उत्कृष्ट (मनुष्य, देश, पोषाख, चोलण्याची ढब, कोणतीहि गोष्ट) [स राजा+अर अमीर] ०आवळी-स्त्री आवळीचा एक प्रकार या झाडास फळें लहान यतात हीसच हरपरेवडी, रानआवळी असेंहि म्हणतात. ०कडी-स्त्री विशिष्ट प्रकारची कानातील कडी, एक कर्णभूषण ०कवि-पु दरबारी कवि [स] ०काज-कारभार-नपु राज्यकारभार, राज्यासबधीं सर्व प्रकारचें काम ०कारण-१ राज्यासबधीं मसलत, खोल व गूढ मसलत कल्पना 'राज कारण बहुत करावें।'-दा ११५१९ २ गुप्त निमित्त, गूढ (एखाद्या गोष्टीचें) 'मिनीस किती सारखें, लिहिलें तरी चोर पडत याचें राजकारण काहीं समजत नाहीं' ३ शासनसस्थे सबधीं गोष्टी, राजनीति, (इ) पॉलिटिक्स 'विशारदबाई तरुण मुलानीं राजकारणात पडू नये असें सागतात'-केळे १९९ ०कारणी-वि खोल मसलत करणारा, मुत्सद्दी ०कारभार-पु राज्यव्यवस्था ०कारस्थान-न राजकीय मसलत, कल्पना बेत, चतुराई, राज्याची मसलत ०कार्य-न १ राजकीय कर्तव्यें, काम, राज्याचीं कामें २ राजाचें काम ३ राजाचें शासन, कायदा, कृत्य [स] ०किंकर-पु राजाचा चाकर सरकारी नोकर, शिपाई, जासूद इ० [स] ०किशोर-पु राजाचा मुलगा [स] राजकी-पु राजाचा नोकर 'राजकी म्हणती आमुचें घर। -दा ११०४६ -वि राजापासून उत्पन्न होणारी, राजाच्या सबधाची (सत्ता, जुलुम, कृत्यें) याच्या उलट देवकी 'दुसऱ्या राज्यात गेल्यानें राजकी उपद्रव टाळायास येईल पण देवकी उपद्रवापुढें उपाय चालत नाहीं' [राजीक] राजकीय-वि राजासबधीं, राजाचा, राजविषयक (व्यवहार, कारभार, मनुष्य इ०) [स] ०कीय कैदी-पु राजद्रोहामुळें तुरुगात कद केलेला राजकारणी पुरुष, सरकारविरुद्ध अराजकता माजविणारा म्हणून कैद केलेला मनुष्य ०कीय बंदी-पु सरकारी कैदेंत अडकलेला कैदी, राजद्रोही बदिवान ०कीय व्यवहार-पु १ राज्याचें काम २ राजनीति [स] ०कीय सभा-स्त्री राजकारणासबधीं सभा, (इ) पोलिटिकल मीटिंग 'क्वचित एखादा सरकारी नोकर आपल्या मुलाना राजकीय सभाना जाण्यास प्रति बध करतो'-केळे १२३३ [स] ०कुमर-कुंवर-री-कुमारी-स्त्री राजाची कन्या [प्रा] ०कुमार-कुवर-पु १ राजाचा मुलगा, राजपुत्र २ पुनर्वसु नक्षत्र [स] ०कुल-न राजघराणें राजवश [स] ०केळ-ळी-ळें-स्त्रीन कळीची एक जात व तिचें फळ ०क्रांत-क्रांती-स्त्रीन १ राज्याची उलथापालथ, राज्यव्यवस्थेंत मोठी उलाढाल खळबळ बदल २ युद्ध शत्रूचें आक्रमण इत्यादीमुळें माजलेली गडबड, गोंधळ, वगैरे नासधूस ३ राजाचा जुलूम, अन्याय [स] ०गादी-स्त्री राजाची गादी, सिंहासन ०गुह्य-न राजाचें किंवा राज्यासबधीं गुपित, गूढ; गुप्त गोष्ट ०गोंड-स्त्री (शहराचा, गांवचा) मोठा रस्ता ०गोंड-पु गोंडातील एक श्रेष्ठ जात ०गोंडा-पु पालखीच्या दाडीला मध्यभागीं लोंबता बाधलेला, हातात धरावयाचा गोंडा ०घोस-स्त्री एक वेल हिच्या पानाच्या काढ्याचा देवी इ० आजारांत उपयोग करितात. ०घोळ-स्त्री घोळ नामक भाजीची एक जात ०चिन्ह-न १ राजेपणाचें चिन्ह, राजाचें छत्र, चामर इ० वैभव २ (सामुद्रिक) नशीबीं सिंहासनावर बसण्याचा योग आहे असें दाखविणारी खूण, लक्षणविशेष किंवा विशेष गोष्ट (आजानुबाहुत्व इ०) ३ राजाची मोहोर, शिक्का, किंवा सही (नाणें, पत्र इ०कावरील) ४ (राजाच्या सह्या अस्पष्ट, वाचण्यास कठिण असतात यावरून ल) फरपट्यानें, विरघुडी, वाईट लपेटीचें, दुर्बोध अक्षर [स] ०टिटवी-स्त्री पिवळसर रगाची टिटवी ०तिलक-पु १ राजामध्यें श्रेष्ठ सार्वभौम राजा २ राजटिळा ३ राज्याभिषेक [स राजा+तिलक] ०तुरा-पु एक पुष्पझाड व त्याचें फूल ०तेज-न राजाचें तेज, वैभव, ऐश्वर्य [स] ०तख्त-न १ राजाचें सिंहासन २ राजधानी 'किल्ला रायगड राजतख्त'-चित्रगुप्त १६७ ०त्व-न राजेपणा, राजाधिकार, राजपद [स] ०दंड-पु १ राजानें केलेली शिक्षा २ राजानें बसविलेला दड. ३ जातिबहिष्कृत केलेल्या मनुष्यास जातींत परत घेताना त्यानें राजास द्यावयाचा दड ४ राजाच्या हातातील अधिकारदर्शक काठी ०दंत-पु चौकडीचे दात, पदार्थ तोडावयाचे दांत, पुढील दात [स] ०दरबार-१ राजाची कचेरी, न्यायसभा २ प्रजेचीं गाऱ्हाणीं ऐकण्याकरिता बसावयाची राजाची जागा ०दरबारी-वि राज्यासबधीं ०दर्शन-न राजाचें दर्शन, राजाची भेट. 'राजदर्शन म्हणजे मोटा लाभ' [स] ०दुहिता-स्त्री राजाची मुलगी 'वर शिशुपाळ ऐकतां। दचकली ते राजदुहिता।'-एरुस्व २४१ [स] ०दूत-पु राजाचा नोकर हुजऱ्या, सेवक, जासूद [स] ०द्रोह-पु १ सरकाराबद्दल अप्रीति राजाविरुद्ध कट, बंड, फितुरी २ राज्य व राजसत्ता याविरुद्ध गुन्हा ३ (कायदा) बादशाहाविरुद्ध किंवा ब्रिटिश अमलाविरुद्ध द्वेष, तिरस्कार किंवा बदिली बोललेल्या किंवा लिहिलेल्या शब्दानीं किंवा खुणानीं किंवा इतर रीतीनीं उत्पन्न करणें, (इ) सिडिशन् ०द्वार-न १ न्यायाच्या कचेरीचा राजवाडा राजदरबार २ राजवाड्याचा दरवाजा [स] ०धन-न राजाचा महसूल, उत्पन्न [स] ०धर्म-पु १ राज्यकारभार चालविण्याकरिता मार्गदर्शक असा शास्त्रात सांगितलेला कायदा, अनुशासन २ राजास योग्य किंवा शोभणारा गुण राजगुण कार्योपदक्षकौशल्य, प्रागल्भ्य इ०) 'जे राजधर्म सुरतरु सख मखसे सुखद उत्सवद नावीं।'-मोसभा ११५ ३ राजाचें कर्तव्य

विशेष काम [स] ०धातु-पु कित्येक कवींनीं लोखंडास हें नाव दिलें आहे ०धानी-नगरी-स्त्री राजाचें राहण्याचें मुख्य शहर [स] ०धान्य-न एक धान्य, सावा [सं] ०धारी-पु एक प्रकारचा तमाशा -कलावतखातें (बडोदें) १३८ ०निष्ठ-स्त्री. राजाविषयीं, सरकाराविषयीं आदर दाखविणारा ०निष्ठा-स्त्री राजासंबंधीं, सरकारसंबधीं आदर, पूज्यबुद्धि 'राज्यपद्धतींतील दोष अधिकाऱ्याच्या नजरेस आणणें हीच खरी राजनिष्ठा' -टिसु २१५ [स] ०नीति-स्त्री १ राजव्यवहारशास्त्र आन्वीक्षिकी किंवा तर्कविद्या, त्रयी किंवा धर्म विद्या, वार्ता किंवा अर्थ विद्या व दडनीति असे चार राजनीतीचे भेद आहेत २ नीति, नीतिशास्त्र [स] ०नील-नीळ-न नीलमणी [सं] ०पंचक-न ज्यात राजापासुन जुलम किंवा नासधूस होते असा ज्योतिषीय गणितानें येणारा काल अग्निपचक, चौरपचक मृत्युपचक, हानिपचक इ० पहा [स] ०पट्ट-पु राजाचा शिरताज, राजाचें ललाटपट्ट [स] ०पत्नी-स्त्री राजाची स्त्री, राणी [स] ०पत्र-न राजाचें पत्र, देणगीपत्र सनद 'ब्राह्मण स्थापिले वृत्ति क्षेत्रीं। ते ते अक्षयीं राजपत्रीं।' -मुसभा ६ ५६ [स] ०पद-न राजाचा अधिकार, दर्जा, राजत्व ०पद्धति-स-स्त्री राजास योग्य अशी रीति, चाल, वहिवाट [स] ०पसंत-द-वि. राजे व अमीर उमराव यास मान्य असणारा, सर्वोत्कृष्ट, उंची, खासा, नामी [सं राजा+ फा पसन्द] ०पिंडा-पु देखणा व छबीदार मनुष्य, राजबिंडा [स राजा+पिंड] ०पीठ-न १ राजाचं आसन, राजाचें सिंहासन २ राजधानीचें शहर [स] ०पीढी-पु (महानु) राजपुरुष 'खमदें पातले राजपीढी।' -गस्तो ४३ [राजा+पिढी] ०पुत्र-पु १ राजाचा मुलगा २ क्षत्रिय [स] ०पुरी-स्त्री बादशाही शहर, राजधानी [स] ०पुरुष-पु १ सरकारी अधिकारी, नोकर २ राजाच्या चाकरींतील कोणीहि लहान मोठा मनुष्य [स] ०बंदी-पु राजकैदी, राजकीय गुन्हेगार, बंदिवान ०बनसी-वि राजवशाचा हा हिंदुस्थानी शब्द मराठी लावण्यांतून नेहमीं येतो [राजवशी, हिं राजबनसी] ०बावती-स्त्री राजास द्यावयाचा वसुलाचा चौथा भाग चौथ पहा ०बिंडा-वि अतिशय सुंदर व नाजुक पुरुषास म्हणतात राजासारखा अथवा अत्यंत देखणा सुंदर आणि तेजस्वी (मनुष्य) [राजा+पिंड] ०बिदी-स्त्री राजमार्ग 'इंद्रियग्रामींचा राजबिदीं।' -ज्ञा ७ १०६ ०बीज-वि १ राजाच्या बीजाचा वंशाचा २ (ल) सुस्वभावी व सुंदर मुलास म्हणतात ०बोध-स्त्री (शहराचा) मुख्य मोठा रस्ता, राजबिदी ०वेत-(त्रे) राजदड [राज वेत्र] ०भाग-पु राजाचा भाग, सरकारास द्यावयाचा कोणत्याहि उत्पन्नाचा भाग [स] ०भार्या-भाजा-स्त्री राजाची पत्नी, पट्टाभिषिक्त राणी 'येरु बोले पाहीन पिता माझा। नको जाऊं मारील राजभाजा।' -ध्रुवाख्यान ४ (नवनीत पृ ४११) [स] ०भोग-पु सरकारचा हक्क [स] ०भ्रष्ट-वि. राज्यावरून निघालेला ०मंडल-ळ-न १ राजाचा समुदाय २ राजकीय मंडल, राजभृत्य, राजपुरुष, बादशाहा भोंवताल्चे अमीरउमराव इ० [स] ०मंत्र-पु राजाचा बेत, उद्देश [सं] ०मद-पु राज्याचा गर्व, दर्प [स] ०मंदिर-न १ सौध, राजवाडा २ (लावणी, शृंगारविषयक काव्य इ० यात) विलासमदिर, रगमहाल, अतपुर इ० [स] ०महाल-पु राजवाडा ०मान्य-वि १ राजानें मान देण्यास योग्य, पूज्य, श्रेष्ठ, वरिष्ठ, २ ज्याला पत्र पाठवावयाचें असतें किंवा ज्याचा उल्लेख करावयाचा असतो त्याला सन्मानार्थ कागदोपत्रीं हें विशेषण लावतात ३ सर्वांस पसत पडेल असें 'हा एक राजमान्य उपाय आहे' [स] ०मार्ग-पु १ राजाचा हमरस्ता, सार्वजनिक रस्ता २ (ल) सर्व लोकांनीं मान्य च पसत केलेली चाल, वहिवाट, रहाटी [स] ०माष-पु एक कडधान्य [स] ०मुद्रा-स्त्री १ राजाची मोहोर, तिचा शिक्का, ठसा २ राजाच्या छापाचें नाणें [स] ०मोहरा-मोहोरा-वि १ शहाणा, शूर किंवा विद्वान् (मनुष्य), विद्या, शौर्य इ० गुणांनीं प्रसिद्ध असलेला, तेजस्वी (पुरुष) 'या राज्यात नानाफडनवीस एक राजमोहरा होता' २ देखणा व छबीदार (मनुष्य), राजबिंडा ०यश-न राजाचें, राज्याचें यश, कीर्ति 'राजयश वर्णिता वर्णिता भाट शिणले।' [स] ०यक्ष्मा-पु क्षयरोगाचा एक भेद, कफक्षय [स] ०योग-पु १ हठयोगाहून भिन्न असा योगाचा साधा व सोपा प्रकार, प्राणनिरोध इ० न करिता अंतःकरण एकाग्र करून भगवत्स्वरूपीं लावण्याचा उपाय 'राजयोगतुरंगीं। आरूढला।' -ज्ञा १८ १०४७ २ राज्य मिळवून देणारा पत्रिकेंतला ग्रहयोग ३ श्रेष्ठ, सर्वोत्कृष्ट योग, प्रापचिक वैभव व सपत्ति हीं उपभोगीत असताहि त्याहून आत्म्याची भिन्नता ओळखून आत्मचिंतनाचा अभ्यास चालू ठेवणें [स] ०योगी-पु राजयोग करणारा मनुष्य, हठयोगीच्या उलट [स] ०रा-स्त्री (नेहमीं अनेकवचनी उपयोग) कुलाचाराच्या प्रसगीं तबकात ठेविलेल्या देवीच्या सात मूर्ती [स राजेश्वरी=एक देवी] ०राज-पु राजाधिराज, राजाचा राजा, बादशहा [स] ०राजेश्वर-पु सम्राट, बादशहा, सार्वभौमराजा [स] ०राणी-स्त्री राजाची मुख्य पत्नी, पट्टराणी [स] ०रीति-स्त्री १ राजास योग्य अशी रीति, पद्धति, सरणी, मार्ग २ सर्वमान्य पद्धति [स] ०रु(रा)शी-स्त्री सार्वजनिक आणि स्वतत्र परवानगी, उघड व पूर्ण स्वतत्रता, मुभा 'पोरास सुटीच्या दिवशीं खेळायास राजरुशी असनी' [स राजा+फा. रुखसत] ०रु(रो)स-हा-स-क्रिवि उघडपणें, प्रसिद्धपणें, स्वतत्रपणें, अनियत्रितपणें, बेधडक 'ता राजरोस इराणीच्या दुकानात जाऊन चहा पितो'

१ दिवाणखान्यांत [स राजा+फा हस्तन, रोशन्, रोश-इ-रौशन] राजर्षि-पु तपश्चर्येनें ज्यानें ऋषि ही उच्च पदवी मिळविली आहे असा क्षत्रिय, तपस्वी क्षत्रिय, राजामधील ऋषि 'राजर्षि महर्षि सकळ यथें न्यूनाधि भूमिपाळ सभा।'-मोसभा १ १० [स राजा+ऋषि] ०लहान न १ पक्षिविशेष याचे मोठा व लहान असे दोन भेद आहेत ०लक्षण-न १ राजत्वाचें सूचक एखादें स्वाभाविक चिन्ह २ (छत्र, चामर इ०) राजचिन्हांपैकी कोणतेहि चिन्ह [स] ०लेख-पु राजाचें पत्र, सनद [स] ०वट-वटा-टी-पुस्त्री १ एखाद्या राजाचा, राज्याचा, अम लाचा, कारकीर्दीचा काल कारकीर्द 'विक्रमाचे राजवटयात सर्व लोक सुखी होत २ अमलाचा, वजनाचा काल (सामा) चलतीचा काल. ३ सामान्य चाल रीत संप्रदाय, वहिवाट 'आमचा सकाळीं जेवण्याचा राजवटा नाहीं'-किवि राज्यांत, अमलांत, कारकीर्दीत 'वडिलाच राजवटा ही गोष्ट घडली नाहीं' [राज्य+वर्ति] ०वटा-पु हमरस्ता, राजमार्ग. [राजा+वाट] राजवर्खी बांगडी-स्त्री एक प्रकारची बांगडी ०वंश-पु राजाचें कुल [स] ०वंश्य-वि राजाच्या कुळांतील, वंशांतील [स] ०वनसा-वि राजघराण्यांतील [स राजवंशी] ०वळ राजावळा-स्त्री राजाची अक्षरें (सही), राजाचा शिक्का, राजमुद्रा 'त ही राजावळीचीं अक्षरें।'-ज्ञा १७ ३२२ ०वाटा-पु १ मुख्य वाटा, मोठा हिस्सा 'तो सुमहु त्याचा राजवाटा। -ज्ञा ८ १८४ २ राजाचा भाग ०वाडा-पु राजाचा वाडा, राजमंदिर प्रासाद ०विद्या-स्त्री सर्व विद्यांमध्यें श्रेष्ठ विद्या या दोन्ही कारणामुळें राजविद्या शब्दानें भक्तिमार्गच या ठिकाणीं विवक्षित आहे असें सिद्ध होतें '-गीर ४१५ [स] ०विलास-पु राजाचीं सुखें व करमणुकी, उच्च प्रकारचीं सुखें व क्रीडा [स] ०विलासी-वि राजासारखीं सुखें भोगणारा, राजविलास करणारा राजविलासाचा शोकी [स] ०वेत्र-न राजदंड [स] ०वैद्य-पु १ वैद्यशास्त्रपारंगत असा उत्तम वैद्य २ राजाचा वैद्य [स] ०व्रत बांगडी-स्त्री बांगडीची एक जात ०शक-पु ज्येष्ठ शुद्ध १३ आनंदनाम संवत्सर शके १५९६ या वर्षी शिवाजी महाराजांनीं आपल्या राज्यारोहणानिमित्त सुरू केलेला शक कोल्हापूर व इतर काहीं संस्थानांत हा चालतो [स] ०शय्या-स्त्री सिंहासन, राजाची शेज [स] ०शासन न १ राजाची आज्ञा २ राजा अपराध्यांना जें शासन करतो तें [स] ०शोभा-स्त्री राजाची शोभा राजाचें तेज कांति इ० [स] ०श्रियाविराजित-वि १ राजाच्या तेजानें व शोभेनें विभूषित, लक्ष्मीनें राजासारखा सुशोभित असा २ वरोबरीच्या गृहस्थास पत्र लिहावयाचें असतां त्याच्या सन्मानार्थ हा शब्द त्याच्या नावापूर्वी विशेषणाप्रमाणें योजतात, पत्राचा मायना [स] ०श्री-पु १ राजाची पदवी, राजाचें वैभव, राजासंबंधीं योग्यतेचा सन्मानार्थ योजावयाचा शब्द 'एव्हां राजश्रीची स्वारी कचेरीस आहे' २ सामान्य माणसास पत्र लिहितांना त्याच्या नावापूर्वी हा शब्द आदरार्थ योजतात ३ (विनोदार्थी) विचित्र, तऱ्हेवाईक माणूस ४ (सामा) गृहस्थ 'आता हे राजश्री माझ्या भोंवास पाजि लागून।'-मोश्री २ २९ ०सत्ता-स्त्री १ राजाची सत्ता, कायदे शीर अधिकार २ राजाची धास्ती, दरारा, मारदस्ती [स] ०सदन-न राजवाडा [स] ०सभा-स्त्री राजाची सभा, कचेरी, राजाचा दिवाणखाना, दरबार [स] ०स्थान-न राजाचें राहण्याची जागा ०सूय-पुन सार्वभौम राजानें करावयाचा यज्ञ (हा यज्ञ सार्वभौमत्वाच्या द्योतनार्थ राज्याभिषेक समयीं मांडलिक राजांसह करावयाचा असतो) अथवा राजा (सोम लता) याचें सवन, (कंडन) ज्यांत करतात तो यज्ञ 'देवर्षि म्हणे नृप तो सम्राट् प्रभु राजसूयमखकर्ता।'-मोसभा १ ४६ [स] ०हत्या-स्त्री राजाची हत्या, खून [स] ०हत्यारा-वि राज हत्या करणारा ०हमीर-पु राजअमीर पट्टा ०हंस-पु १चोंच आणि पाय तांबडे व वर्ण पांढरा असा पक्षी दूध व पाणी एकत्र केलीं असतां त्यांतून दूध तेवढें वेगळें करण्याची शक्ति याला आहे असें मानितात 'राजहंसाचा कळप पोहतसे।'-र १ २ (लावण्य, शृंगारिक काव्य) प्रियकर, नायक ३ एक झाड हीं झाडें लहान झुडुपवजा असतात, पानें बारीक व जोडलेलीं यास तांबूस रंगाचीं बारीक फुलें व बारीक शेंगा येतात [स] राजांगण-गणे-न १ राजाच्या श्रीमंत लोकांच्या वाड्यापुढें रिकामी राखलेली मोकळी जागा २ राजवाड्याच्या समोरचा चौक ३ चौसोपी घरास मध्यें असलेलें चतुष्कोणी अंगण 'पैस नाहीं राजांगणीं।-दावि ५०४. [स] राजागर-न १ राजाचा बाग 'सुरुली तरी राजागरीं मरें।'-एभा ११ ५५८ २ रायभोग तांदुळांचें शेत 'तणें पिकती केवळ राजागर।'-एभा २७ २०२ ०धिकार-पु राजाचा अधिकार [स] राजाधिपति राजाधीश-पु राजाधिराज [स] राजाधिराज पु राजाचा राजा सार्वभौम अनेक मांडलिकांवरचा मुख्य राजा [स] राजानुकंपा-स्त्री राजाची कृपा दया [स] राजानुग्रह-पु राजाची प्रसन्नता [स] ०पुरी-वि राजापूर गांवासंबंधीं (गूळ हळद भाषा इ०) राजाप्रधान सोडणें-(बायकी) चातुर्मासांत भात व वरण हे मुख्य पदार्थ वर्ज्य करणें राजाभिषेक-पु राज्यारोहणप्रसंगीं महानद्या समुद्र इ०कांचें पाणी आणून त्यानें अमात्य पुरोहि तादिकांनीं मिळून राजावर विधिपूर्वक अभिषेक करावयाचा राजाला गादीवर बसविण्याचा समारंभ [स] राजाम्लक-की-पुस्त्री रायआवळा-ळी पहा [स] राजावर्त राजवर्द-पु हलका कमी प्रतीचा हिरा (इं) लापिसलॅझूली याचा मुख्य रंग निळा,

लेहून घेऊन '-रा १५४७ २ गलाघाची आज्ञा मान्य अस ल्याचें लेखी कबूलीपत्र, कबुलायत 'वेपारी मजकुराचें कापड साडियानसी देऊन त्याचा राजीनामा पाठवून देणें '-रा ६ ६०६ ३ नोकरी सोडण्याविषयींचें पत्र ४ (बुद्धिबळांचा खेळ) प्रतिपक्ष्याची मात कबूल करणें [फा राजीनामा] ०विराजी-स्त्री सुरळ्ळ सुख, सवट 'राजीविराजीचे दिवस, सर्व वस्तवानीसह कुटुंब एक हिंत, तेव्हां स्थळाची मजबुदी पाहिजे '-स ५ २२१२ ०मतें-क्रिवि स्वसतोषें 'श्रीसत्यदेवाची स्थापना कोंडसकर खोत व भिडे यानी मिळून राजीमतें केली '-आडिवऱ्याची महाकाली ४२ ०रजावती(दी)नें-क्रिवि १ मान्यतेनें, कबुलीनें, राजीखुशीनें, परवानगीनें 'उदमी याच राजीरजावदीनें कराग प्रमाणें वरछपाई पर्णे '-बाडसमारो ३ २३४ २ (खतपत्रात, विशेषत अक्कलहुषारीनें ह्या शब्दासह योजना) स्वतंत्र खुशीनें आणि पूर्ण स्वातंत्र्यानें, बळजबरी न करिता दिलेल्या कबुलीनें **राजीरजावंतीचा**-वि स्वतंत्र खुशीचा व पूर्ण कबुलीचा (याचा प्रथमाविभक्तींत प्रयोग क्वचितच आढळतो) [अर राझी+फा रझामन्दी] राजू वि (ना) कबूल

**राजीव**—पु (काव्य) पति, प्रियकर

**राजीव**—न कमळ, सूर्यविकासी कमळ 'आता सूर्यासि जीवें । अनुसरलिया राजीवें ।'-ज्ञा १६ १६३ [सं] सामाशब्द- ०नयन-नेत्र-लोचन **राजीवाक्ष-क्षि**-वि (काव्य) देवास उद्देशून लाक्षणिक अर्थानें कवितेंत येणारे शब्द कमळासारखे सुंदर डोळे असलेला [सं] ०नयना-स्त्री (काव्य) सुंदर स्त्री [सं राजीव+नयन]

**राजू**—स्त्री दोर, विशेषत जाड व मोठा दोर [सं रज्जु]

**राझण राझणवाडी राझणें**—राजण, राजणवाडी इ० पहा

**राट**—पु १ (राजा) रहाट पाणी ओढण्याचें चाक २ (खा अहिराणी) सूत कातण्याचा लहान चरखा [रहाट]

**राटावळ**—स्त्री (कों) खटपट श्रम [रहाटणें]

**राटावली**—स्त्री वाट? 'मार्ग पाहे घरिंची राटावळी।'-ख्रिपु २ ३६ १६

**राटवा**—पु (हेट नाविक) शिडाची दोरी टांगून ठेव ण्याची जागा

**रा(रा)ठ**—वि १ आडदांड अडाणी रानटी (मनुष्य) २ कणखर चिवट खडखडीत व कठिण (माती पीठ इ०) ३ चरचरीत भरभरीत (केस कापड इ०) ४ खरबरीत (रुक्ष पदार्थामुळें होणारी जीभ) ५ कर्कश वसूर (आवाज) ६ कठीण व ओबडधोबड कसातरी केलेला (जिन्नस) रठ पहा ०गवत-न रानगवत

**राड**—स्त्री लूट, पाडाव करून आणलेले लोक 'दहा हजार राड लष्करांत आली आहे '-पेद २०९३

**राड**—स्त्री १ शिमग्यात मळण्याकरिता आत पाणी घालून ज्यांत चिखल केलेला असतो तो मोठा खळगा, होळीची राख २ नाचणें, क्रीडा ३ रेबड, रेंदाड, घाण, चिखल ४ रस्त्यावर मागावर पाणी पडून, पाऊस पडून झालेली ओल ५ कचरा, पाचोळा पाला, गुऱ्हाळाच्या चुलाण्याखालीं जाळण्याकरिता घातलेला पालापाचोळा ६ धगधगीत निखाऱ्यांनीं युक्त जी भूमि, खळी इ० ती -वि घाण, गढूळ, रेंदाड (पाणी इ०) [का राडि] **राडी**-स्त्री १ चिखल, 'तेंही बाळाचे हातवरी। चिवडिलें जैसी राडी करी।'-ज्ञा १७ १६० २ धगधगीत निखाऱ्यांची खाई 'आता लेंकुराचें मुख दखन । तरी आनंदें राडी घालेन।'-दा ३ ३ ४१

**राड**—स्त्री १ (निंदार्थी) विधवा २ दासी, कलावंतीण, वेश्या ३ (तिरस्कार राग किंवा अनाथ स्थिति दाखवावयाची असता) स्त्रीजात, बायको 'तुम्ही राड रडकी झाली '-नामना ९२ ४ (निरुद्योगीपणा नवरा मेलेल्या स्त्रीच्या स्थिती प्रमाणें) बिघडलेली, अतिशय खलावलेली स्थिति, दुर्दशा 'यंदा शर्ते चांगली आली होती पण आत पाणी शिरून अवघी राड झाली' ५ (निंदेनें) भित्रा नीच, नामर्द मनुष्य युद्धांतून पळून जाणारा सैनिक 'म्या न वधावें पळता चाला मारूनि काय राडा या।'-मोकर्ण २५ ६० [स रंडा] म्ह० राडच्या लग्नाला छत्तीस विघ्नें (ग्राम्य) **राडेचा**-वि १ बेकायदेशीर संबंधापासून झालेला २ (ग्राम्य) पादपूरणार्थक किंवा उद्गारवाचक शब्द ३ एक ग्राम्य शिवी **राडेचा राडचा मारलेला**-वि स्त्रीवश, स्त्रैण **राडे(डि)चपानो**-उद्गा० (बायकी) रखेली पासून झालेल्या मुलाला उद्देशून बोललेल्या शब्दावरून पुष्कळदा आश्चर्य व्यक्त करण्याकरिता पण क्वचित् निरर्थकपणें निघणारा उद्गार **राडेवाचून पाणी पीत नाहीं**-आपल्या बायकोला एखादा कठोर शब्द बोलल्यावाचून तो पाण्याचा थेंब सुद्धा पीत नाहीं (सतत शिव्या देणाऱ्या नवऱ्यासबंधीं म्हणतात) **राडेहून राड**-वि फुला अतिशय बायकचा(मनुष्य) सामाशब्द- ०अंमल पु १ स्त्रीराज्य २ नेभळा अव्यवस्थित कारभार ०काम-न १ बायकोचें काम गृहकृत्य २ विधवेचें काम बाहेरील आडकाम किंवा रानातील गवत कापणें व सर्पण गोळा करणें इ० काम ०कार भार-पु १ बायकी कारभार २ स्त्रियांचा कारभार स्त्रियांचीं कृत्यें ३ (निंदेनें) भिकार मूर्खपणाचीं कृत्यें टुक्कार कृत्यें ०खली-वि (गो) विधवा झालेली ०राड-स्त्री स्त्रियास लावावयाचा राड, भांडारखाली वटीक इ० अर्थाचा अभद्र शब्द, शिवी 'मी त्याची कांहीं गोष्ट बोलिलें नसता उगीच मेला मला

रांडसांड म्हणतो.' [रांड द्वि] ०गठा-पु १ टिपेचा सूर, तृतीय सप्तक २ बायकी आवाज [रांड] ०गांठ-स्त्री विशिष्ट आकाराची गांठ; हिली गांठ बाईलगांठ पहा याच्या उलट पुरुषगांठ. ०गाणें-गान्हाणें-न पिरपिर, बायकी कुरकुर, बायकी विनंति, रडगाणें (क्रि० गाणें, सांगणें) रांडगो-पु (गो) वेश्येचा मुलगा, किंवा विधवेस अनीतीच्या मार्गानें झालेला मुलगा ०चाल-स्त्री भित्रेपणा; नामर्दपणा, बायकीपणा ०छंद-पु रंडीबाजीचा नाद, रांडेचें व्यसन ०छंदी-वि रंडीबाजीची सवय लागलेला, रांडगा ०तगादा-पु (कुण) (सावकाराच्या किंवा कर्जाच्या) पैशाची (पिटया दिपायाने नव्हे) कुळाकडे सौम्य रीतीनें केलेली मागणी हा मागणीकडे दुर्लक्ष करण्यास आपणास मुभत्यारी आहे असें कुणबी मानतो सवकाराच्या विनंतीशिवाय दुसऱ्या कोणत्याहि विनंतीस दाद न देण्याबद्दल हा वर्ग कित्येक ठिकाणी प्रसिद्ध आहे कुणबी पहा ०पण-न १ (कों) वैधव्य २ नाश, नादानपणा 'कां घेता रांडपण टळन जाऊ नाना।' -ऐपो ११६ ०पाटा-पु वैधव्य (क्रि० भोगणें; येणें, मिळणें, प्राप्त होणें, कपाळीं येणें) [रांड+पट] ०पिसा-वि रांडवेडा, अतिशय रांडछंदी, रंडीबाज, बाईलवेडा, स्त्रैण ०पिसें-न रांड वेड; रांडेचा नाद ०पोर-न १ (व्यापक) बायकामुलासह एखाद्या ठिकाणचे सर्व रहिवासी, गावांतल्या बायकापोरासुद्धा सर्व लोक 'आज कपेला झाडून रांडपोर आलें होतें' २ एखाद्याच्या पदरीं असलेलें बायको, मुलें इ० कुटुंब, खटलें ३ रंडकीचें मूल. ४ दासीपुत्र, वेश्यासुत [रांड+पोर] रांडपोर की राजपोर-रंडकीचा मुलगा किंवा राजाचा मुलगा हे दोघेहि अनियंत्रित व अशिक्षित असतात, दोघेहि स्वच्छंद व निर्धास्त असतात ०पोरें-नअव घर, गाव, देश यातील मुख्य कर्त्या पुरुषाहून इतर बायका, मुलें इ० सर्व माणसें ०बाज-वि रंडीबाज, बाहेरख्याली [हिं] ०बाजी-स्त्री बाहेरख्याली पणा, रंडीबाजी [हिं] ०बायल-स्त्री (गो) विधवा स्त्री ०बेटा-पु रांडलेक 'तुका म्हणे कोरान्न रांड। बेटा भाड मागता का।'-तुगा २९८३ ०बोडकी-स्त्री विधवा स्त्री 'त्या रांडबोडकीनें स्त्न जुळलन्।'-मोर ११ ०भांड-स्त्री (निंदार्थी) रंडकी, बाजारबसवी, बटीक [रांड द्वि] ०भाडण-न १ बायकांचें भांडण २ (ल) बिन फायदेशीर, निरर्थक गोष्ट ०भाषण-न बायकी, नामर्द, दीनवाणें भाषण ०मस्ती-स्त्री १ पतिमरणानंतर विधवेस येणारा रडपणा व जोम २ (ल) नियंता न होता झाल्याबरोबर एखाद्या माणसास येणारी टवटवी, चपटाई धिटाई ०माणूस-न १ (दुर्बलत्व दाखवावयाचें असता) स्त्री, स्त्रीजाति, स्त्रीमात्र २ (तिरस्कारार्थी) बुळा, निर्जीव, बायक्या मनुष्य, भित्रा मनुष्य [रांड+माणूस] ०मामी-स्त्री (परडणेनें) विधवा स्त्री ०मांस-न (निंदार्थी) पतीच्या मृत्यूनंतर विधवा स्त्रियांस एकटें राहतां आल्यामुळें व मोकळेपणा मिळाल्यामुळें कधीं कधीं यणारा रडपणा. (क्रि० चढणें, येणें). [रांड+मांस] ०मुंड-स्त्री १ केशवपन केलेली, अनाथ व अनुकम्प्य अशी विधवा २ (शिवी) रांड, बोडकी, अवेदा घेरडी, विधवा. [रांड+मुंड] ०रळी-स्त्री विधवा किंवा विधवेसारखी, (व्यापक) विधवा 'रांडरळी म्हणती हा मेला बरें झालें' [रांड+रळी] ०रांगोळी-स्त्री (व्यापक) रंडीबाजी व वदफैली [रांडद्वि] ०रांडोळी-स्त्री १विधवा किंवा तिच्या मारखी स्त्री. रांडरळी पहा २ शिदळकी ३ बायकांशीं सगत टेवणें, रंडीबाजी ०रूं-न विधवा स्त्री ०रोट-राटा-पु आपल्या मरणानंतर बायको विधवा होईल यासाठीं त्याच्या बेचीं नवऱ्यानें तिच्या तरतुदीकरितां दिलेलें वेतन, वाइलवाटा, रांडरोटयाची चाल मुख्यत्वें गुजराथेंत आहे [हिं] ०रोटी-स्त्री लढाईंत पडलेल्या किंवा सरकारकामीं आलेल्या माणसाच्या बायकोस निर्वाहाकरितां दिलेली जमीन इ०. [हिं] ०लें(ल्यों)क-पुन १ रंडापुत्र, विधवेचा मुलगा, एक शिवी 'काय केलें रांडलेका। तुला राजी नाहीं तुका।' २ (व) मेलें या शब्दाप्रमाणें वाक्याच्या आरंभीं किंवा मध्य निरर्थक योजतात 'आम्हास नाहीं रांडलेक अस यत!' ०वडा-पु सर्व बायकामाणसें; घरात सत्ताधारी पुरुष नसल्यामुळें होणारें स्त्रियांचें प्राधान्य २ बाजारबसवी, रांड, बटीक इ० शब्दप्रचुर शिव्या, शिवीगाळ, गालिप्रदान (क्रि० गाणें, गाजविणें, उठवणें) 'किती रांडवडे। घाउनि म्हारांचे बापुडे।' -तुगार ७४६ [रांड+वाडा] ०वळा-पु स्त्रियांच्या कज्जाच्या भांडणांतील शिवी, रंडकी, रांड बरकी, बाजारबसवी इ० शिव्यांची माळका (क्रि० गाणें, वाजवणें) [रांड+आवलि] ०वांटा-पु वैधव्य ०वांटा कपाळीं येणें-विधवा होणें ०वाडा-पु कुंटणखाना, वेश्याची आळी ०व्यसन-न रांडेचा नाद, छंद ०व्यसनी-वि रांडबाज ०सांड-स्त्री विधवा [रांड+सांडणें किंवा रांड द्वि] ०सांध-स्त्री विधवेचा कोपरा [रांड+संधि] ०सांधीस बसणें-घरात उदास होऊन बसणें (रागानें एखाद्यास म्हणतात) रांडक-वि (कों) विधवा झालेली 'सदा मफलीस व रांडक बायको व भिकारी बैरागी हे निमदस्ती' [रांड] रांडका-पु विधुर ज्याची बायको मेली आहे असा पुरुष [रांड] रांडकी-स्त्री विधवा (तिरस्कार दया दाखविताना) [रांड] रांडगा वि (राजा तजा) रंडीबाज २ -पु (व) महार जातीचा वतनदार याला वतन इनाम जमीन असते याचा हक्क कर्नाटकातील लक्ष्मीच्या जत्रेंत रेडा मारण्याचा असतो हल्लीं हा शब्दास अपभ्रष्टता येऊन तो शिवीदाखल योजिला जातो रांडरू-न (तिरस्कारानें) विधवा स्त्री [रांड] रांडव-वि.

१ रडकी झालेली, विधवा (स्त्री) २ बायकोच्या मरणानें उघडा झालेला, मृतपत्नीक, विधुर [राड] रांडवणें–अक्रि विधवा होणें, राडावणें पहा [राड] राडवा–स्त्री विधवा स्त्री 'राडवा कर्ले काजळ कुकु।' –एभा ११ ९६६ रांडा पोरें–नअव १ कुटुंबातील कनिष्ठ दर्जाचीं माणसें (बायका मुलें व कुणबिणी) २ समाजातील हलक्या दर्जाचे लोक ०रोटा–पु विधवांनीं करावयाचें सामान्य घाडकाम (दळण, कांडण, मोल मजुरी इ०) रांडाव–वि (गो) विधवा राडावणें–अक्रि १ विधवापणाच्या केविलवाण्या स्थितीस प्राप्त होणें २ (ल) फिसकटणें, मोडावणें, नासणें, बिघडणें, भंग पावणें (व्यापार, मसलत, काम) (विशेषत या लाक्षणिक अर्थानेंच हा शब्द योजतात) 'त्याणीं माग ससार चागला थाटला होता पण थोरला भाऊ मेल्यापासून राडावला' [राड] राडावा–स्त्री (माण) बालविधवा, बालराड राडरांड–स्त्री १ रडण्यातली रडकी, अतिशय अनाथ व असहाय रडवी. २ (ल) नामर्द मुळा, अपात्र, नालायक, मनुष्य ३ पराकाष्ठेचा अनाथ किंवा निराधार मनुष्य राडुल–स्त्री (गो) (अनीतीच्या मार्गानें) विध्वस झालेला मुलगी राडूल–स्त्री (वॅ) विधवा स्त्रीला उपहासानें म्हणतात रांडे–उद्गा एक शिवी 'भाहे तृष्णेसी द्विज भारातें, म्हणे यथेष्ट घे राडे!' –सोमख ६ ७५ [राड, सबोधन] राडेचा–वि रांडलेक –उद्गा आश्चर्यवाचक उद्गार 'मग राडेचें! पाच वर्षांचें पोर पहा किंवा कशी पोथी वाचतो' राडेचा आजार–पु गर्मी राडेच्या–उद्गा (प्रेमळ) एक शिवी 'आहा राडेच्या! ' –देव ६२ राडोळी–स्त्री १ (कधुन तिरस्कारानें) विधवा स्त्री २ विधवे प्रमाणें वागणूक ३ कुचाळी, थट्टा 'करिता गोपिकासी राडोळी।' –एभा ६ ३६५ ४ मारामारी, कत्तल 'निकरा जाईल राडोळी।' –एरुस्व ६ ९ ५ क्रीडा ६ नाश 'कीं भीष्मदवें चरणातळीं। केली कामाची राडोळी।' –जै २४ ७ [राड] रांड्या, रांड्या राऊजी, राड्या राघोजी–वि १ रडीबाज राडव्यसनी, रांडछंदी २ बायकोच्या बाइल्या, नामर्द ३ बाईलवेडा ४ राड्याराघोबा राड्यारावजी, बायकात बसून किंवा त्यांजबरोबर फिरून गप्पा मारण्यात आनद मानणारा (मनुष्य) गप्पीदास, जुन्मावसा म्ह० राड्या रावजी आणि बोडक्या भावजी [राड] राढरु राढू–न (तिरस्कारार्थी) विधवा स्त्री राडरु पहा [राड]

राड बांधणें—क्रि (व) झड बांधणें, भितीस पाऊस लागू नये म्हणून आडोसा करणें

? राडवाळि—वि (महानु) राजकारणदक्ष 'प्रस्तुत नारायणें बाहाळियें। जन्म देउनि राडवाळिए।' –ऋ ७

राडा—पु १ पसारा, कामाचा रगडा, कचका (क्रि० घालणें पडणें) २ भानगड 'या उपर गुता राडा फार करून राहिले नाहीं' –पेद १४३ ३ खोल चिखल, रेबड ४ आकांत रडारड (मृत्युभयानें होणारी मनुष्यसमुदायाची)

राडिकें—न (महानु) विनोदाचें उत्तर, भाषण, वचन 'वेदाकाळें नि हा राडिकें।' –शिशु ११९

राण—न (प्र) रान शब्द, व त्याचे सामासिक शब्द पहा राणटा–वि गावढळ 'तेथें त्या राणटा स्त्रीजाति।' –राग ५६४ ०वटी माळ–स्त्री वनमाला ०वार–स्त्री रानवार पहा 'धरिता राणवार गुरराव।' –दावि ३१५

राणा—पु एक मासा –प्राणिमो ८१

राणा—पु १ (काव्य) राजा 'मी असे उज्जनीचा राणा। नाम माझें विक्रम।' –शनि ३६७ २ मुख्य, नायक 'तव बोले शिष्यांचा राणा।' [स राजन्, प्रा राण, हि राणा] राणी–स्त्री १ राजपत्नी, राजाची स्त्री २ (पत्त्याचा खेळ) राणीच्या चित्राचें पान [स राज्ञी, प्रा रण्णी (?), गु प सिं व राणी हिं रानी] राणि(णी) वसा, राणवसा–पु राणीची किंवा राजाच्या बायकाची राहण्याची, बसण्या–उठण्याची जागा, अत पुर, जनानखाना 'तव ते येउनि राणिवशासी।' –ह ३१ ११७ [राणी+वास] राणीचा जाहीरनामा–पु १८५७ सालच्या बडानतर लोक शात व्हावे म्हणून व्हिक्टोरिया महाराणीनें काढलेला एक जाहीरनामा राणी माशी–स्त्री मधमाशी, आकारानें मोठी असून अडीं घालून नेहमीं पोळ्यात राहणारी मधमाशी; (इ) क्वीन् बी राणीराउत, राणीराउ(व)ताणी–पुस्त्री श्रीमत व दरिद्री हा भेद श्रीमती, वैभव, निर्धास्तपणा किंवा धिटाई दाखविण्याकरिता भाषणसप्रदायात योजलेला शब्द 'राणी रावताणी त्याच्या घरीं पाणी भरती' हा राणीराव ताणी भीत नाहीं–खातरेंत आणीत नाहीं' राणी(णि)व–स्त्री (काव्य) १ राजाचा अधिकार, राजपण राजपद 'नातरि राणीव साहावी।' –शिशु ४७५ २ राज्य 'जीत असता हे पाडव। पुनरपि न जिरे राणीव।' –मुआदि १४ १०० ३ राज्यसुख 'मजवीण भोगा सुखें राणीव।' –मुआदि १८ ६९ ४ (महानु) अधिकार सामर्थ्य 'भक्तीसी राणीव जाली।' –भाए ४७ राणीवी–स्त्री राज्य समृद्धि [प्रा] राणेपण–न १ मोठेपण 'परि राणेपणें घार्तंधरा। बोल हे तुम्हीं।' –ज्ञा १० ३२३ २ (महानु) राजेपणा 'आता देवा काई विसरले राणेपणें।' –भाए १४३ राणेराऊ–पु राजराज अधिराज 'नागार्जुनाचा दातारू। राणेराऊ श्रीचक्ररू।' –शिशु ७ राणो–पु (गो) (राणे नावाच्या लोकांनीं बड केलें होतें यावरून) बडखोर मनुष्य

रात—पु (वॅ) रक्तिमा, लालेपणा, डोळ्यांची आरक्त स्थिति [स रक्त] रात(ता)जन–पु एका झाडाचें नाव

[रक्त+अंजन] रातडा-वि किंचित् राता, तांबडा (तांदूळ, विशिष्ट फळें डोळे इ०). [राता] रातडी-स्त्री तांबड्या जोंधळ्याची एक जात

रात—स्त्री १ रात्र 'सुग्रीव म्हणे यत्नें लंकेचें भस्म जा करा रातीं।'-मोरामायणें युद्ध ५५७ २ रातकिडा [स रात्रि. प्रा राती, हिं प गुज व उरिया रात,सिं राति, पोर्तुगि अराची] म्ह० (गो) रातच बोल दिसाक पोल=रात्रीच बोल दिवसाच्या वेळीं फोल होतात रातच्यारात-क्रिवि रात्रभर सामाशब्द-रातकिडा-पु रात्रीं किर्र आवाज काढणारा एक किडा रातविरात-स्त्री संकटाचा,धोक्याचा, अनुपपत्तीचा काल; वळप्रसंग 'रातविरात आहे, चार जिनस घरात बाळगून ठेवावे' -क्रिवि संकटकालीं, रात्रीबेरात्रीं 'धान्य पडून ठेवावें, रातविरात उपयोगी पडेल' [हिं रात+विरात] रातवड्डा-पु (गो) एका रात्रीचें काम रातवणी-न. (बायकी) रात्रीं हातपाय धुण्या करितां, शौचाकरितां किंवा पिण्याकरितां ठेवलेलें पाणी [रात्र+वणी=पाणी] रातवा-पु १ रात्रीचा सर्व काल, रात्रपणा (क्रि० पडणें, होणें) २ रात्रीचा पाऊस 'रातवा पडू लागला, रातव्याच्या पावसानें किंवा रातव्यानें बाजरी नासेल ३ बुजू नये म्हणून घोड्याला रात्रीं बाहेर काढणें (क्रि० धरणें) [रात] रातवा घेउन निघणें-रात्र असतांना निघणें (पावसानें) रातवा धरला-पावसानें रात्रीं पडण्यास सुरुवात केली रातसार-क्रिवि रात्रभर रातांधळा-वि ज्यास रात्रीं मुळींच दिसत नाहीं असा, रातांधळेपणा प्राप्त झालेला रातांधळें-न एक नेत्र रोग ह्यामुळें मनुष्यादिकांस रात्रीं दिसत नाहीं रातोराती-क्रिवि रात्रीं, मध्यरात्रीच्या वेळीं [रात] रातावणें-अक्रि (काव्य) रात्र पडणें, होणें 'रातावलें आता जाऊं द्या घरा।' [रात] रातिवळा-पु (कों) रात्रीं गुरांच्या पुढें टाकलेली वैरण किंवा ओलें गवत रातिवा-पु रात्रपणा, रात्र 'जे काडाचनि आवारें। करिति रातिवा।'-शिशु ९४४ राती-स्त्री १ (काव्य) रजनी, रात्र आनंदकंदा प्रभात झाली उठ सत्वरी राती।'-भूपाळी घनश्यामाची २० २ अंधार [स रात्रि] रातीच्या रातीं-क्रिवि (कुण) रात्रीच्या मुदतींत, रात्रीच्या रात्रीं रातीं(ति)दिवो क्रिवि रात्रंदिवस 'तव राहटवी रातिदिवो।'-माज्ञा १८ ५०४ [प्रा] रातोरात-क्रिवि १ रात्रीच्या रात्रीं, दिवसाची इ० वाट न पाहता रात्रीच्या वेळीं २ सर्व रात्र, रात्रभर 'हें पत्र म्या रातोरात जागून लिहिलें' ३ रात्रीच्या वेळीं, रात्र असताना 'एव्हां निघालास तर रातोरात पोंचशील' रातोराती-क्रिवि रात्रीं, मध्यरात्रीच्या वेळीं [रात] रात्र-स्त्री १ रजनी, रात्रि, सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंतचा काळ, पृथ्वी दैनंदिन गतीनें आपल्या आसाभोंवतीं फिरताना तिचा सूर्यानें अप्रकाशित असलेला अर्धा भाग २ रातकिडा, किर्री. [सं रात्रि] (ग्राम्य) ०ओरडणें-किर्रीच्या शब्दानें नादणें. ०वैऱ्याची असणें-अतिशय दुःसह व हालांत रात्र जाणें मरती रात्र झाली-शपथेचा एक प्रकार. यदासाठीं वसणें पहा सामासशब्द-०किडा-पु रातकिडा किर्री रात्रंदिवस, रात्रंदिस-क्रिवि रात्रीं व दिवसा, अहर्निश, अहोरात्र, सर्वदा रात्रांध-वि रात्रीं ज्यास दिसत नाहीं असा, रातांधळें झालेला [स] रात्रि-स्त्री रात्र, रजनी [स] रात्रि(त्रिं)चर-पु १ निशाचर, राक्षस २ चोर [स] रात्रिंदिव-क्रिवि (काव्य) रात्रीं व दिवसा; सर्वकाळ 'जे रात्रिंदिव तुझें हित साधाया धरुनि धनु जपती।'-मोकर्ण ३ ३७ [स] रात्रिर्वर्तीं-क्रिवि रात्रीं, भर मध्यरात्रीं [रात्रि+वर्तीं] रात्रौ-क्रिवि रात्रीस, रात्रीच्या ठायीं [सं] रात्रौणें-अक्रि रात्र करणें 'ऐसें माहीं यावें रात्रौनि सायासीं।'-शिशु १८३.

रातणें—अक्रि १ (काव्य) रतणें, अनुरक्त होणें, भुलणें, भाळणें 'अभागकडवें नामगोष्टी माझी सोय सांड। आतां रातलें अनता तुका म्हणे।' २ रमणें, रत होणें, विलास करणें 'आपुली अंगना रातली परा।'-मुआदि ३४.९ [सं रत]

रातनवाय, रातंराव—स्त्री (प्र) रतनवाव पहा पाण्याचें पाणी घेण्याकरितां खणलेली खाच

रातब—पु रतीब, खुराक [अर]

रातंबा—पुन १ रातंबीचें फळ, कोकंब २ तांबड्या आंब्याची जात रातंबेपिकणें-(ल) उन्हांत गेल्यामुळें गोऱ्या, नाजूक मनुष्याचे गाल रक्तवर्ण होणें रातंबी-स्त्री अमसुलाचें झाड, हें झाड कोंकण, मलबार, उत्तरकानडा या भागांत होतें ह्याच्या फळास रातंबे किंवा कोकंब म्हणतात फळांतील मगज खातात पाण्यात कोळून साखर घालून सरबत करतात बियांचें तेल खाण्यास व औषधास उपयोगी आहे [स रक्ताम्र] रातंबें-न रातंबीच्या झाडाचें फळ रातंबेल-न रातंबीच्या बियांचें तेल, कोकंबतेल [रातंबी+तेल]

रातबा-मसाला—पु रोजचा खुराक व इतर योग्य खर्च 'तथील कमाविसदार यास तुम्हीं रातबामसाले विशीं कागद व जासूद जोडी दणें '-पया २०२

रातवणी—न (कु) १ फार कमी पाणी २ लग्नात वधू वराना खेळण्यासाठीं केलेलें लाल पाणी रातव्याचा रुपया-पु लग्नाच्या दिवशीं नवरा मुलगा नवरीच्या घरीं यतांना उपाध्यायास द्यावयाचा रुपाया

राता—पु तांदळाची एक जात तांबडेतांदुळ -वि १ काळसर तांबडा (तांदूळ, फळें खाण्याचे पदार्थ) २ तांबूस (डोळे) [स रक्त=तांबडा] सामासशब्द- रातांजन-पुन एक झाड

'जाई जुई राताजन।' –ह १४.१२७. रातांया-यी-चें, रातांबेल-प्र रातवा इ० पहा. रानाळी–स्त्री. (प्र.) रताळी पहा. एक वनस्पति राताळूं-ळें–न. रताळें पहा. एक कंद. रातोत्पल-दल–न. तांबडे कमळ. 'अति सुरंग चरणतळें। उपमे कठिण रातोत्पलें।' –एरुस्व १ २१ [सं रक्तोत्पल]

**राद्धांत**—पु सिद्ध केलेलें सत्य, प्रमाणानें सिद्ध, ठरविलेली खरी गोष्ट किंवा अनुमान, सिद्धांत [सं.]

**रांधण**—न. मातीचा तवा, पदार्थ भाजण्याचें खापर. [सं. रध्]

**रांधण-न**—न. १ शिजविणें, रांधणें, पाकक्रिया. २ रांधण्याचें भांडें, मडकें 'राधण नाहीं आमुचे घरीं' –भवि ९. १७०. ३ स्वयंपाक. ४ (गो) चुल, [सं. रध्-रंधन] रांदायणी–स्त्री. स्वयंपाकीण बाई [सं. रंधन] रांधचेकुड–स्त्री (कु) स्वयंपाकघर रांधणी–स्त्री. (व.) स्वयंपाकघर. रांधणेंसक्रि शिजविणें, उकडणें [सं रंधन] म्ह० सारी रात्र जागली आणि शेंगावारीं राधली. रांधतें घर–न १ स्वयंपाक घर; राधतें घर. २ माजघर रांधतेंघर–स्त्रीन (ना) स्वयंपाकघर; पाकशाला रांधनीपल्ल–न (गो) चुल्खंड. रांध(दा)प–न. १ शिजविणें, उकडणें. २ राधलेले पदार्थ, स्वैंपाक. [राधणें] रांधपखण–न. (हेट) स्वैंपाकघर रांधपी–पु १ सैंपाकी; आचारी २ (हेट नाविक) जहाजावर जेवण तयार करणारा इसम [राधप] रांधपीण–स्त्री (गो.) स्वयंपाकीण. [राधप] रांधय–न (गो) एक आमटीचा प्रकार रांधवणा–पु सैंपाकी, आचारी 'बहुत रायाचा राधवणा।' –मुविराट २ ४४ रांधवणी–स्त्री स्वयंपाक करणारी सुगरण स्त्री 'जैसी राधवणी स्वसोय निवी।' –ज्ञा २ २५४ –वि स्वयंपाक करण्याची(चूल). 'राधवणी चुलीपुढें।' –ज्ञा १३ ५६२. रांधवणी–न. स्वयंपाकाची खरकटीं भांडीं व हात धुतलेलें पाणी [राधणें+पाणी] रांधापघर–न (रत्नागिरी) स्वयपाकघर. रांधिये उणें–वि पुरतेपणीं किंवा मुळींच न शिजविलेलें. रानपीण–स्त्री. (कु.) स्वयंपाकीण [रांधण]

**राधा**—स्त्री १ कृष्णसखी, अनयाची स्त्री २ नाचकामाकरिता स्त्रीवेष धारण करणारा पुरुष राधाईमावशी–स्त्री. (जादूगार व कोल्हाटी लोकात) नळीच्या तोंडाशीं असलेली नाचणारी बाहुली. ०नगरी-नगरी रेशीम–न रेशमाची एक जात राधाष्टमी–स्त्री. राधेचा वाढदिवस म्हणून पाळण्यात येणारी आश्विन वद्य अष्टमी. [सं] राधेय–पु राधापुत्र कर्ण [राधा=एक कोळ्याची स्त्री.]

**रांधा**—पु १ रसायन, शिजवून केलेलें मिश्रण, पाक, काढा 'शरीर अवगुणाचा राधा।' –तुगा ७३९. २ रसायन तयार करण्याची क्रिया, कृति ३ शिजविणें ४ शिजलेलें अन्न [राधणें] म्ह० राधा वाढा उष्टीं काढा.

**रान**—न. (जंबिया) चट्टीच्या कादणीजवळील मांडीवरचा पुढील भाग, चौकमधील एक डाव. आपल्या हातातील जंबियानें जोडीदाराच्या उजव्या मांडीवर चट्टीच्या कादणीजवळ मारणें. [फा.]

**रान**—न १ जंगल, वन, विशेषत जंगलातील झुडपें, टेंगण्या झाडाझुडपांचा समुदाय. २ तण्पद, माळ; रुक्ष प्रदेश; नापीक व निर्जन प्रदेश. ३ मनुष्यास उपभोग्य असा भाजी–पाला इ०काहून भिन्न असें तण, गवत, उपद्रवी–निरुपयोगी वनस्पती इ०. 'भाजीचे वाफ्यात कोठें कोठें रान रुजलें आहे तें उपटून टाक.' ४ शेतात उगवणारें गवत, तन. ५ शेत ६ झाडी; राई; वन, वृक्षवाटिका. 'केंदर विनाऱ्यास सारें नारळीचें रान.' ७ देश; प्रदेश, भाग. 'मारवाडदेश म्हणजे उंटाचें रान'' त्या रानचे मनुष्याम हें रान मानत नाहीं.' ८ विदेश, परका मुलख. 'परस्परें या रानातील उमराव व रजवाडे याम पत्रें देऊन तुमची कुमक करविली.' –भाव १३. ९ (ल) फार मोठी वाढलेली हजामत प्रदेश ह्या सामान्य अर्थी रान शब्दापूर्वी विशेषणात्मक शब्द जोडल्यानें त्याचा विशेष अर्थ होतो; उदा० डोंगररान, खडकरान; धोंडेरान किंवा गोटेरान, वनजररान गवतरान; माळरान इ० तसेंच काळें रान, पांढरें रान, चिक्कणरान काळ्या–पांढऱ्या–चिक्कण मातीचा प्रदेश. नवें रान=पूर्वी जंगल किंवा माळ असून नुकतीच लागवडीस आणलेली जमीन [सं अरण्य, प्रा रण्ण] म्ह० (गो.) रान झालें लागीं घरां जाली पैस=म्हातारपण प्राप्त होणें, मरण जवळ येणें या अर्थी (ग्राम.) ०उठणें–लोक खवळणें, क्रुद्ध होणें. 'म्युनिसिपल इमारतीवर संयुक्त निशाण लावण्याचा ठराव हुजूरपक्षानें फेटाळला त्यामुळें शहरातील रान उठलें होतें' –के २२.७ ३०. ०उठविणें–जागविणें–पारधीकरिता धडधड आवाज करून सावजाना जागें करणें. झाडीतून पारध, सावज बाहेर हुसकणें 'रान उठविल्या शिवाय, जागविल्याशिवाय शिकार कशी सापडेल?' ०फाडणें–१ जंगल–जमीन लागवडीस आणणें २ झाडें झोडपून व ओरडून ओरडून शिकार उठवणें ३ रानाचा, जगलाचा शोध लावणें. ०खवळणें–१ एखाद्यावर खवळणें, उठणें (रान, श्वापदें) २ अतिशय क्षुब्ध होणें, (राग, भूक, लोभ, काम इ० कार्नी). 'लवकर जेवायला वाढा, आज इकडे रान फार खवळलें आहे' ०घेणें–१ रानात पळून जाणें (गुरानीं) २ (ल.) वेडग मार्गाचा स्वीकार करणें, बारगळणें ३ रानात शिरणें पहा. ०बदलणें–सोडणें–पारखें होणें–(ल) आपलें मन किंवा उद्देश बदलणें, एखाद्यासबंधीचा आपला विचार फिरविणें, आपला पूर्वीचा मुद्दा सोडून देणें. ०भारणें–१ सर्व प्रदेशावर जादू पसरणें, मंत्र टाकणें. 'तमाम गारोडी रान भारतो तसा प्रकार त्यानें केला.' –भाव

१४ २ (ल) यथास्थित पैसे चारणें ०मानणें–त्या देशाची हवा इ० प्रकृतीस मानवणें, पसत पडणें 'कोंकणच्या माणसास हें रान मानवत नाहीं' ०हांकणें–(शिकार उठविण्याकरिता) झाडें झोडपणें व आरडाओरड करणें रानात, आडरानांत पडणें–एकटें सापडणें, उदास होणें रानात शिरणें–(ल) (सभापणप्रमगीं) सरळ मार्ग सोडून अयाग्य गाष्टी सागत बसणें, विषयातर करणें, बहकणें रानीं रिघणें–अरण्य सेविणें 'ब्रह्म-सुखाळु लाधला ते ही। ज रानीं रिगाले। –ऋ १६ रिकाम्या रानीं–क्रिवि बेफायदेशीर, व्यर्थ, निरर्थक, फुकट(बोलणें, चालणें) 'आता एथे काम नाहीं काज नाहीं रिकाम्यारानीं कशाला बसावें, रहावें, फिरावें इ०' रान या शब्दापुढें पक्षी, पशु व वनस्पति यांचीं नावें जोडून रानटी किंवा न माणसाळलेला, न लागवड केलेला या अर्थी बरेच समास होतात जसें:– रानडुक्कर; रान माजर, रानकळ, रानउडीद, रानतूर, रानपडवळ, रानमटकी, रान मसुर, रानमाठ,रानमूग इ० तसेंच रानभावा–केळी–कोंबडा–जेवण या व यासारख्या दुसऱ्या अनेक सामासिक शब्दात रान ह्याचा रानात राहणारा किंवा होणारा असा अर्थ होतो, काहीं विशिष्ट सामाशब्द– ०आवा–पु वृक्षविशेष ०आलें–न रानात होणारें आलें ०आळू–न तरें अळू हे पर्जन्यकाळीं उगवतें, याचा रग पाढरा, हें फार थड आहे याची भाजी चागली होते ०उट–वि खेडवळ, गावढळ रानवनातील (मनुष्य, पशु) [रान] ०कंद–पु एक कद ०करी–पु रान्या, गवत लाकूडफाटा इ० आणण्याकरिता रानात फिरणारा माणूस ०काढ्या–वि शिकार कर ण्यासाठीं रान काढण्याकरिता लावलेला (मनुष्य), पारध्याकरिता सावज कचाट्यात आणणारा ०कादळ–न एक वन्य वृक्ष ०कापशी–स्त्री रानातील कापशीचें झाड, देवकापशी, देवपळ्ही हून भिन्न व पळ्हेशीं जुळणारी हिचें बीं लहान व वाटोळें असून देवकापशीचें माठें व लाबट असतें ०कापूस–पु रानकापशीचा कापुस ०कावळा–पु कावळ्याच्या जातींतील जगली पक्षी ०केळ–ळी–स्त्री केळीची जगली जात हिच्या पानावर जेवतात कादा उकडून किंवा वाळवून त्याचें पीठ करून खातात ववदर व ही एकच ववदर पहा ०कोंबडा–डी–डें–पुस्त्रीन जगली कोंबडा ०खरडा–पु जगलखरडा पहा ०गट–वि १ खेडवळ, गावढळ २ वन्य, लागवडीशिवाय उगवणारा [रान] ०गाजा–ज्या–पु एक औषधी मूळ, सालवण याचीं पानें बेलाप्रमाणें त्रिदळ असून यास निरनिराळ्या रगाचीं फुलें येतात याचें मूळ सर्व प्रकारचे तापा वर गुणकारी आहे ०गाय–स्त्री तातॅरी देशातील गाय वनगाय ०गोवरी–स्त्री जगलात सापडणारें इतस्तत पडलेलें शेण शेणी याच्या उलट शेण थापटून लावलेली गोवरी ०घेवडा–पु एक वेल ० घोळ–स्त्री घोळ नामक भाजीचा एक प्रकार हिचें पान रगानें तांबूस व चरबट असतें ०चा राजा–पु भील किंवा कात करी ०चिमणी–स्त्री १ चिमणीसारखा एक लहान पक्षी २ जाभळीं व पाढरीं फुलें येणारें एक झाड ०जाई–स्त्री उच वाढ णारें वेलासारखें झुडुप ०जेवण–न वनभाजन, रानात किंवा झाडाखालीं केलेलें जेवण रानट, रानक(ग ट–वि १ रानात राहणारा, रानटी, अज्ञानी 'होतां तापत्रयातें त्वरित भववनीं रक्षिता रानटाचा।'–केका १२२ २ आडगावीं राहणारा, शहर, कचेरी, दरबार इ० ठिकाणीं न जाणारा, अडाणी (मनुष्य) ३ जीत भात, गहू इ० न यता गवत फार उगवतें अशी जमीन ०टाकळी–स्त्री टाकळीची एक जात रानटी–ठी–वि १ रानासबधीं, आपो आप उगवणारा २ गावढळ, खेडवळ, रीतभात नसलेला [रान] ०टोणगा–पु जगली टोणगा, रेडा ०टोळ–पु टोळाची एक जात ०डुक(क्क)र–पुन भुरमुग, छस, भात इ० पिकाचा फडा उडविणारें रानटी जनावर ०तरवड–पु तरवडाची एक जात ०तीळ–पु काळा तीळ पहा ०तुळस–स्त्री एक वनस्पति, बैज यती, ही तुळशीसारखीच असत पानें मात्र मोठीं असतात हिला मंजिऱ्या येतात बीं काळें, किंचित् तांबूस व खसखशीएवढें असून पाण्यात घातलें असता फुगतें हें तुकमराई (सब्जाचें बीं) प्रमाणें असतें यासहि तुकमराई म्हणतात ०तूर–स्त्री एक लहान पिवळ्या फुलाचें झुडुप ०तेरडा–पु तेरड्याची एक जगली जात ०दांडगा–वि आडदांड,रानटी, धिप्पाड, राक्षसी काम करणारा ०दांडगे–पुअव सर्व तऱ्हेचीं शस्त्रें घेऊन शत्रूचा किंवा लुटारू धाडीचा प्रति कार करण्याकरिता जाणारा शेतकरी किंवा खेड्यातील लोकाचा समुदाय ०निंबू–न राननिंबोणीचें फळ निंबोणी–निंबण–स्त्री एक मोठें काटरी झाड ०निवडुंग–पुन जगली निवडुग ०पासरा–पु दुकानदारीची झिंवड ०पाळ–वि नापीक,भुकिरत, वरड; माळवजा (भातजमीन) ०पिंपळ–पु पारोसा पिंपळ एक झाड ०बाजरी–स्त्री गवतासारखी वनस्पति ०भरी–क्रिवि रानोमाळ 'रानभरी झाले साधारण।' एभा२३ ३१६ ०भरी–भरू–वि १ भयभीत, घाबरलेला, पलायमान परागदा (पशु, मनुष्य) 'महा वारण जे उन्मत्त। दैत्यें सोडिले तयावरत। तयास प्रल्हाद सिंह दिसत। मग त होत रानभरी। २ (ल) चैनीकरितां इतस्तत भटकण्याच्या हेतूनें ज्यानें आपली बायका पोरें सोडलीं आहेत असा [रान+भरणें] ०भरू होणें–१ रस्ता चुकणें, आडरस्त्यास जाणें २ गोंधळणें, घाबरणें, घाबरें होणें ०भाजी–स्त्री १लागवडीशिवाय उगवणारी भाजी २वनात होणारी खाद्य वनस्पति ०मटकी–स्त्री रानात होणारी मटकी, मठ ०मसूर–स्त्री एक जगली झाड, हीं झाडें महाबळेश्वराकड पुष्कळ होतात, ह्याचें बीं मसुरासारखें असतें ०माजर–पुन जगली माजर, मोठा व धाकटा असे याचे दोन भेद आहेत ०माणूस–

न १ एक प्रकारचा वानर २ ( ल ) रानटी, खेडवळ माणूस ०मूग-पु रानात होणारा मुगाची जात ०मोगरा-पु अरद पानाची जाई ०म्हैस-स्त्री जंगली म्हैस ०रावताण-णी-नळी रावताण पहा ०वट-स्त्री मोठ्या रस्त्यापासून फुटलेली रानास जावयाची वाट 'पुढच्या आंब्याजवळ वाट उजवी फुटली आहे ती रानवट आहे ' -वि १ जंगली, रानवट न केलेली व साफ न केलेली ( जमीन ) २ खेडवळ, गावंढळ, रानटी ( मनुष्य ) ३ वन्य आपोआप उगवणारा ( वृक्ष, वनस्पती ) ०वत-न ( राजा ) वन्य वृक्षाचे पान, ज्यांची पानें सामान्यत भाजणाकरिता, पुडघ्याकरिता उपयोगी पडत नाहीत अशा झाडांचे पान [ रान+पत्र ] ०वन-न ( व्यापक ) रान, जंगली प्रदेश रानात फिरणें, वन्य पदार्थांवर उपजीविका करणें किंवा निर्वाहाकरिता वन्य पदार्थ शोधणें ( क्रि० करणें, पाहणें, फिरणें हिंडणें ) 'रानवन मला व्हावयाचें-किंवा मी करीत असतों ' [ रान+वन ] रानवा-पु लागवडीस न आणलेली पडीत जमीन, जंगल, रान 'गावाला रानवा असल्यावाचून तृणकाष्ठाची सोय होत नाहीं ' रानवाट-स्त्री जंगली व रानवट प्रदेशावरुन जाणारी वाट ०वाळूक-न ( वन, ल ) दगड ०वाळूक मारणें-( ल ) दगड मारणें ०शार्दूल-पु एका जातीचें श्वापद 'रानशवद आणी रीसें । -दा ३ ७ ९ ०शेकट-पु रानशेवगा पहा ०शेण-शेणी-गवरी-स्त्री १ रानात पडलेलें गाई-म्हशीचें वाळलेलें शेण याच्या उलट वळशेण २ जेव्हा एखाद्या मनुष्याचें ज्ञान समज, सामर्थ्य किंवा संपत्ति यासंबंधीं पूर्णपणें निषेध दाखवावयाचा असतो तेव्हा उपमानाप्रमाणें योजलेल्या (शेण, गोवऱ्या, माती, धूळ दगड धोंडा रास इ०) शब्दांपैकीं हा एक शब्द आहे उदा० त्याला रानशेणीचें पीठ समजतें ? =त्याला काय समजतें ? ०शेर-पु एक वनस्पति, हुरा ०शेवगा-पु एक झाड सामान्यत रानेशेर ०सट(ट)वी-स्त्री सटवीचें रूप धारण करणाऱ्या देवीचें किंवा दुर्गेचें नाव 'उच्छिष्टचांडाळी रानसटवी जखणी।' -ह १३.६८ ०सावज-न रानातील जंगली पशु 'कीं रानींचें रानश्वापद उन्मत्त।' -नव १२ १३१ ०सिवार-न शिवारातील जंगल गावचें रानसिवार खोताची सत्ता आहे ' -मसाप २ ५९ ०साडवण-स्त्री रान तोडून साफ केल्यावद्दलची जकात -अस्पृ ३८ ०सा(व)र-साळ-पु रानडुकर रानसोवर बळकट।'-कालिका २२ १९ [रान सुकर-सुअर-वर] ०हळद-दी-स्त्री. एक वनस्पति ०हुरा-पु सामान्यत रानशेर राना घळी-स्त्री एक लहान फुलझाड हिचा औषधात उपयोग करतात रानी-परज-स्त्री सुरतपासून नवापुरपर्यंत राहणार रानटी लोक रानामाळ-क्रिवि १ रानात आणि माळात २ तुजावजा, अव्यवस्थित, अस्ताव्यस्त रीतीनें, पायून 'तैसे ब्राह्मण रानोमाळ। भयें पळोनि पळतात।' ३ ( ल ) पसरल्याप्रमाणें इकडे तिकडे अस्ताव्यस्त फेकल्याप्रमाणें 'वाऱ्यानें पोथीचीं पत्रें रानोमाळ झालीं ' [ रान+माळ ] रानोरान-क्रिवि रानांतून आणि वनांतून, दरीखोऱ्यांतून, सर्व देशभर 'माझी गाय चुकली म्हणून मी रानोरान फिरलों ' [ रान द्वि ] रान्या-वि रानावनांतील खेडवळ गावढळ, रानटी, रानट [ रान ]

रान्ह-न्हें-न भाकरी भाजण्याचा मातीचा तवा, पाळ राधण पहा [ राधणें ]

रांप-पु ( वे ) पराची बाजू किंवा पडवी

रा(रा)प-पु १ तुरटपणा, विशिष्ट फुलांचा व वनस्पतींचा तुरट आणि आंबट रस ( क्रि० चढणें, येणें, बसणें ) २ चोवळी सुपारी किंवा एखादा तुरट पदार्थ ज्यांत शिजविला आहे असें पाणी, फळ, पुष्प इ० काळ्या द्रवाच्या अंगीं असलेला काळा इ० रंग 'सुपारीचा राप धोतरावर पडला तर धोतर खराब होईल' रा(रां)पणें-अक्रि १ हवेवर उघडें ठेविल्यामुळें किंवा लोखंडाशीं संबंध झाल्यामुळें काळें होणें ( तुरट किंवा आंबट फळ, भाजी-पाला ) काळवटणें २ छानदार छटा येणें, रंगणें 'तया अनुरागाचिया चोळे। रापें इंद्रियाचें मैळें।' -भाए ७९६ ३ चांगल्या रीतीनें भिनणें, मिसळला जाणें, मुरणें ( मसाल्यानें खार, क्षारानीं रस इ० ) ४ कढीच्या उष्णतेमुळें गुणविशिष्ट आणि स्वादिष्ट होणें ( आंबे इ० ) ५ अति खोल भिनणें व छटा येणें ( खार, मीठ, क्षार, रंग ) ६ सर्व अंग व्यापणें, सर्व शरीरावर परिणाम होणें ( ताप उपदश इ० आजार, विष किंवा दुसरें रोग कारक द्रव्य औषध याचा ) ७ असा विकार भोगणें ( अंग, शरीर यानीं ) ८ सर्वत्र पसरणें व विश्वासास पात्र होणें ( आवई, बातमी ) ९ पूर्ण सतेज टवटवीत, जिवंत दिसणें (पूर्वी कृश व निस्तेज असलेला मनुष्य ) १० व्यापणें व्यापणें व ताब्यांत, कबज्यात घेणें 'फौजेनें किंवा परचक्रानें मुलूख रापला ' 'रवहानें देश रापलें ' ११ ( ल ) परिचित चांगला माहितगार होणें [ राप ]

रा(रा)पण-स्त्री ( कु को ) मासे धरण्याचें मोठें जाळें, ( कु ) अनेक जाळीं एकत्र करून मासळी धरण्याचें साधन

रापणी-स्त्री १ चाचपणी, दाबणी २ चाचपून शोधणें [ रापणें ] रापणें सक्रि १ चाचपणें पाहण्याकरिता दाबणें व चिवळणें 'ह्यां त्याचें पोट रापून पाहिलें पोटात कवळ आहे ' २ ( आट्यापाट्याचा खेळ ) सुरपट नामक रांग मध्यरेषेवरून चालणें, अशा रीतीनें खेळणाऱ्याना ती रेषा ओलांडू न देणें ३ -अक्रि ( अंधारात ) चाचपून पाहणें, चाचपणें

रापदळी-स्त्री ( महानु ) शरीर हलविणें, अंगविक्षेप 'रळिया रापदळिया करीतु।' -दाव २१६

**रापणें, रांपा**—न्पु ( राजा ) सुपारीवरचा पापुद्रा सोल ण्याचें एक हत्यार, ( कु ) रापो सुपारी इ० तुरट किंवा आवट फळें कापण्याचें हत्यार [ प्रा रप=छिलणें ]

**रांपा**—पु ( चांभारी धंदा ) चामडें कापण्याचे, दोहों बाजूंस धार असलेलें हत्यार.

**रांपी**—स्त्री १ चामाराचें, कातडें कापण्याचें उलटया खुर- प्याच्या आकृतीचें हत्यार, कापणी २ लहान रापा रापा पहा [ प्रा रंप=छिलणें ]

**रापा**—स्त्री पावसाळा, एकसारखी सतत वृष्टि ( क्रि० घालणें, बसणें, पडण, लागणें, चालणें, जिरणें, विरणें, मोडणें ) ०**लागणें**-अक्रि. एकसारखा पाउस पडणें **रापेचा पाऊस**-पु. एकसारखी सतत वृष्टि, सततधारपाऊस

**राफ, रांफेचा पाउस**—स्त्रीपु राप पहा एक सारखी वृष्टि ( क्रि० घालणें, बसणें, पडणें, लागणें, चालणें, विरणें, जिरणें, मोडणें )

**राफजी**—पु वोहरी लोकास तुच्छतेनें वापरण्यांत येणारा शब्द –मासिक मनोरंजन पृ १०६ फेब्रुवारी सन १९३५

**राब**—स्त्री १ काकवीपेक्षा दाट असा उसाच्या रसाचा राधा २ दुखणेकऱ्यास पिण्यास द्यावयाचें पेय पीठ घालून दाट केलेलें आणि कटविलेलें साखर घातलेलें पाणी ३ ( कों ) रोपाकरिता भाजलेली जमीन ४ अशा रीतीनें तयार केलेल्या जमिनीवर केलेलें रोप ५ जमीन भाजण्याकरिता लागणारें गवत, पानें, केर कचरा, टहळ इ० ६ तेल-तुपाचा गाळ, बरी [ दप्रा रब्बा, हिं राब ] ( वाप्र ) ०**करणें**-( जुन्नरी ) जमीन भाजण्यासाठीं पान-पाचोळा वगैरे शेतात पसरणें ' त्यानें भातासाठीं राब केला आहे ' ०**जाळणें**-( जुन्नरी ) शेतजमीनीवर पान-पाचोळा पस रून जाळून जमीन भाजणें ०**बरडळणें**-भाजलेली जमीन नांग रून दाताळ्यानें ढेकळें फोडून सारखी करणें **राबड**-स्त्री चिड बिड, रेंदा; चिखल, गाळ, खळमळ, रबड [ राब ] **राबडी**-स्त्री रबडी पहा वासुंदीचा एक प्रकार, साखर व मसाला घालून आट वून दाट केलेलें दूध. २ पातळ गूळ, पातळ चिखल [ राब ] **राबणी**-स्त्री टहाळ, शेण, गवत, बारीक माती घालून रोपटा तयार करणें व भाजणें, भाजावळ, दाढ **राबणें**-सक्रि जमीन नांगरणें, लागवडीस आणणें ' आम्ही वर्षास दहा बिघे शेत घरीं राबतो ' **राबरी**-स्त्री घट न झालेला, पातळ गूळ **राबाचें पाणी**-न उपयोग केलेलें पाणी

**राब**—पु १ रीत २ स्वभाव ३ वारंवार जाणें येणें, एखादें कृत्य पुन्हा पुन्हा करणें, अभ्यास, वापर ( क्रि० घालणें, पाडणें ) ' आताशीं घरात मनुष्यें थोडीं म्हणून पुढला दरवाजा बंद करून मागील दरवाजानेंच राब घातला आहे ' ४ आटोकाट मेहनत, श्रम ' कुकर्माचा करवी । राबु जरी । '–ज्ञा १३ ३० ५ धुमा कूळ ' हा टायवरी लोभु। करी स्वैरत्वाचा राबु । '–ज्ञा १४ २३० ६ कुटुंबातील माणसाची वर्दळ, विस्तार, पसारा ' तुमचा रा व मोठा तुम्हाला एवढें घर पुरणार नाहीं ' [ राबणें ] ०**लावणें**- सवय लावणें

**राबड**—स्त्री मेहनत, श्रम, कष्ट **राबडणें**-अक्रि मेहनत, श्रम करणें [ राबणें ]

**रांबणावळ**—स्त्री ( कों ) १ ओढाळ जनावरास ताब्या वर आणून तें कळपाबरोबर चारण्याकरिता गुराख्यास द्यावयाचें वेतन, बक्षीस.

**राबणी राबणूक**—स्त्री १ येजा, वापर, जाता येता, राहणें; जन्म घालविणें. २ सवयीचा, परिचित होणें ३ पहारा, चाकरी ' सर्वेंद्रियाच्या आगणीं । विवेक करी राबणी । '–ज्ञा १४ २०६ ३ ( व्यापक ) लागवड, नांगरणी, शेतीचें काम ' दहा बिघे जमीनीची राबणी करावयास शंभर रुपये तरी खर्चास पाहिजेत ' [ राबणें ] **रा(रा)बणें**-अक्रि १ सवयीचें होणें, परिचित होणें ( परक्या कळपाशीं गाय इ०, नुकताच शाळेंत घातलेला मुलगा, घरास रानमांजर, ओझ्यास खादा, पाठ इ० ) २ चांगला मळ- लेला असणें ( रस्ता ), वारंवार लिहिल्यामुळें शाईनें सारवल्या सारखा होणें ( खर्डा )

**राबणें**—अक्रि नित्य येणें जाणें असणें, राबता असणें ( रस्ता, मैदान जमीनीचा तुकडा यावरून ), वारंवार जाणें येणें असणें ( एखादयाच्या घरीं, एखाद्या जागेंत ), राहणें, असणें, जन्म घालविणें ( एखादा घरात, जागेंत ), विशिष्ट रीतीनें, सवयीनें जन्म घालविणें, वापरणें, परिचित होणें **राबता**-पु १ वारंवार जाणें येणें, येणाऱ्या जाणाऱ्याची गर्दी, दाटी, वर्दळ, वापर, परिपाठी, अभ्यास, सवय, पौन पुन्य ( एखाद्या कृत्याचें ) ' आज माणसाचा राबता दिसत नाहीं '–मदरु १ ५५ २ ऋणानु बंध, स्नेह, दळणवळण ' आपला व खानाचा स्नेह व राबता बराच आहे ' [ अर रफ्त ]

**राबणें**—क्रि मेहनत, श्रम करणें **म्ह**० १ राब राबतात दव कापतात २ राबल तो चाबल **राबता**-पु महाराकडून हक्कानें घेण्यात येणारें सरकारी काम किंवा त्या कामाच्या मोबदला त्याच्याकडून घेण्यात येणारा पैसा –वि मेहनत करणारा ' जया प्राणाचे घरीं । असे राबत भाऊ चारी । '–ज्ञा १३ २८ **राबता महार**-पु गावचें सरकारी काम करणारा महार, पाळीचा महार ' व राबता महार वगैरे मशारनिल्हे याजकडे देत जाणें ' –शेमारो २ ४७ **राबती**-वि चालू, लागवडीची ( जमीन ). ' इनाम पडजमीन बिघे ५ ठेवविली ती राबती जमीन होती ' –वाडबावा २ ८३ **राबतोण**-स्त्री ( व ) मालकाच्या शेतात

काम करणाऱ्या नोकराची बायको. रावत्या-पु सार्वजनिक काम करणारा महार; पाळीचा महार; धनगीमहार. [ रावता ]

**रावस**—वि. १ टोसर (नागली, कांग, कुळीथ, राळे, सावा इ० धान्यास म्हणतात). २ अरबट चरबट; चाईट (अन्न, जेवण ). ३ धाणेरडा; अव्यवस्थित; डुकरासारखा खाणारा किंवा तशी खाण्याची रीत.

**रांवा**—पु (सुतारकाम ) सामता; टोपण; छिद्र पाडण्याचें हत्यार.

**रांवा(व)ड-डा**—वि. (राजा. ) भटकणारा; स्वैर वागणारा; उनाड; वारगळ **रांवा(व)डकी**-स्त्री. (राजा. ) स्वच्छंदी वर्तन; उनाडकी [ रावाड ]

**राभस**—वि रावस पहा.

**राभस्य**—न. १ अविचार; दांडगेपणा. 'म्हणोनि तैसी कर्मा। राभस्यें खाडे सीमा।' —ज्ञा १७.३९६ २ अविचाराचें भाषण. 'येतुलें हें राभस्य बोलिलेती तुम्ही।' —ज्ञा १०.३१९. [सं रभस]

**राम**—पु १ परशुराम, रामचंद्र, बलराम यास सामान्य संज्ञा. २ (ल ) सामर्थ्य; तथ्य; जीव 'त्या उपरण्यांत आतां कांहीं राम उरला नाहीं ' ३ (सांकेतिक ) सीता किंवा सीताबाई हें जसें अधेलीस त्याप्रमाणें राम हें रुपयास नांव आहे. ४ वाईट बातमी ऐकली असता किंवा दुसऱ्यानें बोललेल्या दोषादिकाचा निषेध कर्तव्य असता हा शब्द उच्चारतात [सं. रम्=रमणें] (वाप्र ) ०नसणें-( मारुतीला सीतेनें प्रसन्न होऊन दिलेल्या तिच्या गळ्यातील रत्नहाराचें एक एक रत्न त्यानें फोडून पाहिलें पण त्यात रामाची मूर्ती त्यास दिसेना म्हणून तें व्यर्थ समजून तो सर्व हार त्यानें फोडून टाकला ह्या कथेवरून ) सत्व, अर्थ नसणें. ०म्हणणें-होणें-( मरताना माणसाच्या तोंडात रामाचें नाव यावें अशी हिंदूंची समजूत आहे ह्यावरून ) मरणें; मरण्यास सिद्ध होणें, मरणोन्मुख होणें **रामाचें नांव, रामचर्चा**-एखाद्या गोष्टीचा पूर्ण अभाव होता असें जोरानें सांगावयाचें असतां योज तात 'अजून तरी त्याला पश्चात्ताप झाला होता म्हणाल, तर रामाचें नांव ' सामाशब्द- ०कली-ल्ली(भैरव)-स्त्री. (राग ) ह्या रागात षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. जाति संपूर्ण-संपूर्ण वादी पंचम संवादी ऋषभ. गानसमय प्रात काल वरील स्वराशिवाय तीव्र मध्यम व कोमल निषाद ह्या स्वरांचा विशिष्ट प्रयोग रागवाचक असाच दिसतो 'प्रभात समयीं रामकली।' —दावि १८६. [ रामकेलि ] ०कां(का)टी-ठी-स्त्री. बाभळीची एक जात हिला पुळाटी किंवा रामबाभळ असेंहि म्हणतात. ही सामान्य बाभळीपेक्षां अधिक उंच, सरळ व गेंददार असते. ०कांठी-वि पांढरे रेशमी काठ असलेलें ( वस्त्र ) ०कुंड-न १ नाशकास गोदावरीवर असलेलें एक कुंड, तीर्थ ( स्नान करणें, मृताच्या अस्थी टाकणें इ० करितां ) २ ( यावरून ) कोणत्याहि नदीकांठी असलेलें असें कुंड, तीर्थ ०कोदंड-न. रामाचें धनुष्य. 'जसें चातकाला घनाचें चि पाणी। स्वभक्तां तसे राम कोदंड-पाणी।' [सं.] ०कृष्णपंथ-पु आराध्य देवांचीं नांवें (राम, कृष्ण, गोविंद, हरि इ० ) उच्चारण्याचा पंथ, संप्रदाय. 'ज्ञानदेवा जिणें नामावीण व्यर्थ। रामकृष्ण पंथ क्रमियेला।' ०गोळा-पु (रामनव-मीच्या फराळाकरितां केलेला ) ताकात भिजविलेल्या लाहीपिठाचा गोळा. ०चंद्र-पु दशावतारांतील सातवा अवतार; दाशरथी राम ०चर्चा-क्रिवि. पूर्णपणें एखाद्या गोष्टीची नाकबुली किंवा अभाव जोरानें दाखवावयाचा असतां भाषण -संप्रदायात योजावयाचा शब्द. 'तो तुम्हाला किती सांगो, पण मी त्याला रामचर्चा एक अक्षरहि बोललों नाहीं.' [सं. राम+चर्चा=उच्चारणें, नाव घेणें ] ०जन्म-नपु १ रामाचा जन्मदिवस. २ रामनवमीचा उत्सव [सं ] ०जनी-स्त्री. गाणारी कसबीण, वेश्या. 'गावात गाणाऱ्या रामजन्या पांचपंचवीस होत्या.' —विक्षिप्त १.५९. [ राम+जानी ] ०जयंती-स्त्री. १ रामजन्माचा वार्षिक उत्सव. २ चैत्र शु० ९. [सं ] ०टेकी-वि रामटेक नामक गावासंबंधीं(विड्याचीं पानें इ०). ०टोला-पु १ विटीदांडूच्या खेळात विटीवर दांडूनें मारलेला पहिला टोला. (क्रि० मारणें ).२ (ल.) जोराचा प्रहार ( काठीचा, मुठीचा). ३ मोठी व जाड भाकरी. ४ (सामा. ) मोठी, प्रचंड वस्तु. [ राम=प्रकर्ष, जोर] ०त(ती)ळ—न (गुज कों.) कारळे. ०तुरई-स्त्री. एक भाजी. ०तुळस-स्त्री तुळशीची एक जात. ०थडी-स्त्री. पितळेचे मोठे मणी. —गुजा १७. ०दास-पु १ एक प्राचीन महाराष्ट्रीय राजकारणी साधु ह्यानीं ठिकठिकाणीं मठ स्थापून धर्मजागृति केली. ह्याचे दासबोध, मनाचे श्लोक, राम-गीता; दासगीता इ० ग्रंथ प्रसिद्ध आहेत २ (सांकेतिक ) एक-आणा. ०दासी-शी-पु श्रीसमर्थ रामदास यानीं स्थापिलेल्या संप्रदायातील मनुष्य **दासी मल्हार**-पु. (संगीत ) एक राग. यात षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर लागत त जाति संपूर्ण-संपूर्ण. वादी मध्यम, संवादी षड्ज गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर. ०दूत-पु. मारुती, वानर. [सं.] ०नगरी-वि. १ रामनगर संबंधीं. २ तांबडे पंख असलेला व आकारानें जाड असलेला ( राघू ) ०नवमी-स्त्री चैत्र शुद्ध नवमी; रामाचा जन्म दिवस. ०नामी-वि रामाचें नाव असलेली ( आंगटी ). ०पंचायतन-न राम, लक्ष्मण, सीता, भरत, शत्रुघ्न आणि मारुती यांचा समु-दाय. ०पत्री-स्त्री. खोटी, नकली जायपत्री. मारपत्री व ही एकच. ०पाहारा-पाहरा पारा-पु सूर्योदयापासून पहिले

तीन तास, पहिला प्रहर, पवित्र, देवाधर्मांचा वाल ' रामपहान्यात खोटें बोलू नको, खरें सांग ' ०पात्र–न पाणी पिण्याचें पितळी भांडें, फुलपात्र [स] ०पुरी लडी–स्त्री रेशमाची एक जात –मुंव्या ९७ ०प्रतिज्ञा–स्त्री सत्य व खात्रीचें वचन [स] ०फळी–फळ–स्त्री एक फळझाड व त्याचें फळ हें झाड बरेंच उंच असतें पानें अशोकाच्या पानासारखीं लांब असतात फळ मोठें असून रंग तांबूस असतो चवीस सीताफळापेक्षा किंचित् गोड हें वातहारक आहे [स गुज रामफल] ०बाण–पु १ रामानें सोडलेला बाण हा कधींहि व्यर्थ जात नसे (यावरून ल) २ खात्रीचें, ठाम, अचूक वचन, करार, भविष्य इ० ' त्याचा प्रश्न म्हणजे रामबाण, कधीं खोटा व्हावयाचा नाहीं.' –वि कधीं न चुकणारें, अचूक गुणकारी (औषध इ०) [स] ०बाण औषध–न हटकून गुण करणारें औषध ०बाभळ–स्त्री बाभळीचा एक भेद रामकाटी पहा राम बोलो भाई राम–पु (गुज) प्रेतास नेताना मोठ्यानें म्हणावयाचे शब्द. ०मं(मां)-दार–पु एक वृक्ष, मांदाराचा, रुईचा एक भेद ' डाळिंब सावरी राममांदार।' [सं] ०रग(गा)डा–पु पराकाष्ठेची दाटी, गर्दी (लोकांची, कामांची, कामाची, उद्योगाची) [राम=पुष्कळ+रगडा] ०रट्टा–पु १ मोठा प्रहार रपाटा (काठीचा, मुठीचा) (क्रि० दाखविणें; देणें) ३ कचका भार (अवाढव्य उद्योगाचा, कामाचा) ४ घोटाळा, गोंधळ ५ दाटी; चेंप, गर्दी [राम=अतिशय+रग] ०रस–पु मीठ [प्रा] ०रक्षा–स्त्री १ रामाचें एक सुप्रसिद्ध स्तोत्र २ हें स्तोत्र म्हणून अभिमंत्रिलेली विभूति राख ३ (निदार्थी) लाहीपीठ, वाळलेल्या पानें मिरच्या इ० काची रास [स] ०राज्य–न १ ज्यात लोकांचें सर्व शत्रूपासून रक्षण केलें जातें व त्याजवर न्यायानें व चांगल्या रीतीनें राज्य केलें जातें असें राज्य, श्रीरामचंद्रानें केलें तसें उत्कृष्ट सुखाचें व शांततेचें राज्य २ रागें भरण्यास कोणी नसल्यामुळें (मुलांनीं) केलेलें स्वैर वर्तन ' घरात तीन दिवस कोणी वडील मनुष्य नव्हतें तेव्हां मुलांनीं रामराज्य चालविलें होतें ' [स] (वाप्र) ०राज्य करणें–१ सुरक्षितपणें व सुखानें राहणें २ निर्भयपणें वागणें ०राम–पु ब्राह्मणाशिवाय इतर लोक दुसऱ्याच्या सत्कारार्थ एका हातानें वंदन करताना जो शब्द उच्चारतात तो, अशा प्रकारच्या नमस्कारासंबंधीं शब्द हा पत्रलेखनातहि योजितात [राम] ०राम ठोकणें–एखाद्याचा निरोप घेणें, त्यास सोडून जाणें 'परीक्षा झाल्यानंतर शाळेला रामराम ठोकला ' ०रामी–स्त्री १ परस्परानीं परस्परास रामराम करणें २ रामराम करता येण्यापुरती ओळख ३ सामान्यतं रामरामी [रामराम] ०रोट–पु (ना) जाड पोळी, रोटी –वि धटिंगण, आडदांड ०लीला–स्त्री आश्विन महिन्यात उत्तरहिंदुस्थानात कांहीं ठिकाणीं रामाच्या चरित्राचे केलेले नाटकप्रयोग [स] ०वचन–न सत्य भाषण, वचन [स] ०वरदा(यि)येनी–स्त्री तुळजापुरची भवानी ' रामवरदायेनी ते तुळजास्वामिणी।' –रामदासी २१ [रामवरदायिनी] रामाचें राज्य–न रामराज्य पहा रामानुज–पु वैष्णवाम धील एक पंथ, भेद [स] रामानुजाचार्य–पु वैष्णव धर्मपंथातील एक पंथप्रवर्तक ह्यानें वेदांतसार, वेदार्थसंग्रह, वदांतदीप, ब्रह्मसूत्रें व भगवद्गीतेवरील भाष्य हे ग्रंथ रचिले रामानुजाचार्यांच्या पंथातील लोक दक्षिण हिंदुस्थानात पुष्कळ आहेत –ज्ञाको (र) ९८ [स] रामायण–न १ रामचरित्रवर्णनपर वाल्मीकीनें लिहिलेलें महाकाव्य, रामकथा, रामकथावर्णनपर काव्य २ (ल) लांबलचक, कंटाळवाणी गोष्ट, चऱ्हाट ' भामचें एकदा रामायण संपूं द्या मग तुम्ही दुसरी गोष्ट काढा ' ४ अस्ताव्यस्त पसारा, घालमेल गोंधळ ' ह्या पोरानें धान्याचें आणि कागदपत्राचें रामायण केलें ' [स] म्ह० ताकापुरतें रामायण=आपलें कार्य साधण्यापुरतें आर्जव करणें रामेश्वर–पु शिवाच्या बारा ज्योतिर्लिंगापैकीं दक्षिणेंतील एक स्थान [स] रामा–स्त्री १ सुंदर, रमणीय स्त्री २ (सामा) स्त्री ' पीडित दशाननाला त्या श्वेतद्वीपवासिनी रामा।' –मो रामायणें ११५३ [स]

रामगा–पु (माण) भुताचें नांव अगर जात

रामठ–ठा–पु हिंग ' जरी कर्पूरचूर्ण मिश्रित केला। तरी रामठा अंगीं दुर्गंधी।' –जै ४० १३

रामणें–अक्रि (व्र) रावणें पहा

रामाठा–ट्या, रामेठा–ठा–पुस्त्री पु रानातील एक फुलझाड ह्याला पिवळें सुपकेदार फूल यतें हें महाबळेश्वरच्या डोंगरावर पुष्कळ सापडतें याचीं पानें चार बोटें लांब व रुंद असतात ह्याचा चीक डोळ्यास लागल्यास मोठी इजा होते

रामोसी–शी–पु १ एक जात व तिच्यापैकी एक व्यक्ति ह्याच्या दोन पोटजाती–पुरंद किंवा भडाते व भालगे याची मुख्य वस्ती पुणें, सातारा या भागात विशेष आढळते हे जागलकी, मजुरी, गाड्या हाकणें, हमाली शेत करणें इ० धंदे करतात २ (ल) चिन्दर [स अरण्यवासी–रामवंशी, रामठ]

राय—स्त्री मत, अभिप्राय [फा]

राय—पु राजा नृप राव पहा ऐसें सांगोनि रायासी।' –एरुस्व ६ ४७ [सं राजा, प्रा राआ–या, हिं गुज राय] सामाशब्द– ०आवळी–आवळा–स्त्रीपु राय आवळ्याचें झाड व त्याचें फळ ह्यास हरपररेवडी असेंहि म्हणतात ०कुरा–री–पु स्त्री एक कोंकणी झाड डाक घेऊन जाणार शिपाई रात्रीच्या वेळीं ह्याच्या लाकडाचा दिवटीसारखा उपयोग करतात ०केळ–स्त्रीन केळीची एक जात व तिचें फळ, हें तांबड्या जातीच्या

केल्यासारखें असतें [ वे ] ०गिडगिडी–स्त्री ( महानु ) ल्हान नगारा ' रायगिडगिडी वोवडिआ । '–शिशु १०५३ ०घणस–पु सर्पाची एक जात –प्राणिमो ७० ०घोळ–स्त्री एक प्रकारची भाजी ०घडक–पु (महानु) घाय, धाव ' मग रायघडक निशान लागला । '–सत राजी ६ १३५ ०पण–न राजेपणा ' स्वप्नींचेनि जैं अवतरे । रायपणें । '–ज्ञा १५ ३४० ०पुरी–वि रायपूर शहरासंबंधीं ( साखर, लुगडें, खण इ० ) –पु (साकेतिक) भामटया ०बोर–स्त्री न एक वृक्ष व त्याचें फळ ०भुलावण–स्त्री राजास भुलवणारी किंवा मोह घालणारी स्त्री, सुंदर व मोहक स्त्री ०भोग–पु तांदुळाची एक जात –वि राजानें खाण्याजोगा, उत्तम (पदार्थ) [ स राज+भोग ] ०माड–पु १ (कों) ज्यापासून माडी काढतात तें माडाचें झाड २ सरकारी हक्काचा माड ०मुनी–स्त्री एक फुलझाड व त्याचें फूल ०राजेंद्र–पु (पोवाडे काव्य) राजाच्या एखाद्या प्रधानाची पदवी ०विनोदी–वि बहुरूपी व माकडचेष्टा करणारा, मस्कऱ्या, नकल्या, माधवी दडीगाणें गेहल्करी । रायविनोदी । '–दावि ४७४ ०शेवती–स्त्री एक फुलझाड, शेवतीचा एक प्रकार ०स्थळ–न राजधानी ' पूर्वकालच्या राजधान्या अशाच किल्ल्यावर करीत नाहींतर मैदानातलें रायस्थळ शत्रु केव्हां येऊन लुटून नेईल याचा नेम नसे '–के ९ २ ३७ राया–पु डौलानें बोलताना फाकडे, फंदी, अफीणबाज इ० कानीं स्वत स लावलेली ऐश्वर्याची व वैभवाची पदवी [ स रा=प्रकाशणें, राय ] (वाप्र ) रायाप्पा नाइकाचा फराळ करणें–बडा फराळ करणें फक्त पाणी पिणें

राय—न १ सोन्याचा डाख बसवितांना उपयोगांत आणावयाचें मिश्रण २ ( सोनारांत प्रचलित ) तांबें रायडें सोनें–न ( सोनारी धंदा ) तांबें मिसळलेलें मिश्र सोनें

रायघाचळ—न दोन धागे काळे व एक धागा मावळा असे उभार व आडवणासहि दोन दोरे कले, एक मावळा किनार कोणत्याहि प्रकारची असें विणलेलें लुगडें

रायजनी—स्त्री १ राजनीति २ विचार करणें [ फा ]

रायण—न कडू वृंदावन राटोण पहा

रायणी—स्त्री एक झाड खिरणी [ स राजादनी प्रा रायणी ]

रायदिंडा—पु एक झाड, दिंडयाचा एक भेद

राय(या)त—स्त्री कृपा, अनुग्रह, मेहेर [ अर रेआयत् ]

रायताधा—पु रयताधा पहा प्रजा विशेषत शेतकरी वर्ग

रायतें—न कोशिंबिरीच्या उपयोगी मुळा गाजर, काकडी इ० चिरून किंवा किसून त्यांत मोहऱ्या, दहीं इ० घालून केलेलें तोंडीलावणें, (व ना ) लोणचें [ राई ]

रायनी—स्त्री ( व ) लोणचें, रायतें [ राई ? ]

रायपी—पु (कु ) सोवळेकरी [ राधपी ]

रायबारी—वि ( गो ) मंगलकार्यांत राबणारा

रायरस्ती—क्रिवि ( गो ) राजरोस [ राजा+रस्ता ]

रायराय—वि राईराई एवढे, बारीक, ल्हान ' राय राय तुकडे केले जरी । '–अफला ८ [ राई ]

रायवणी—न १ मोहऱ्या, आंबे इ० मिळवून केलेलें तोंडीलावणें मोहरवणी पहा २ मोहऱ्यांचें पाणी ' नारवणी चुनवणी । मीठवणी रायवणी । '–दा ३ ७ ६८ [ राई+मोहरी पाणी ]

रायवळ—न जंगली लाकूड (इमारती वगैरे तयार होऊन पडलेलें)–वि १ साग किंवा जंगली साग, शिसव, (खैर व फणस याशिवाय ) किंवा कांहींच्या मतें साग व शिसव यांखेरीज सर्व हलक्या लाकडास लावण्याचें विशेषण २ सामान्य, वन्य, निकृष्ट, कलमी किंवा इरसाल नसलेला ( आंबा, आंवळा, जांभूळ इ० ) [ राई ] रायवळी–वि रायवळ जातीच्या लाकडाचा केलेला

रायांगण—न ( महानु ) देवळापुढील अंगण ' अचोके रायांगणीं उभी ठेली बाळी । '–धवळे पू ७८ [ राज+अंगण ]

रायेण—न कडू वृंदावन रायणी पहा रायेणाचें मातुर्के–न कडू वृंदावनाचें फळ ' जैसें रायणाचें मातुर्के । '–विपू ७ ७२

रारा—उद्गा १ ( महानु ) मंत्र ' करणेया रारा करीं टाऊनि अविद्या विष उतरी । '–भाए ७७९ २ यंत्र ३ नियाची डहाळी

रारावणें, रोराण करणें—अक्रि रडणें, रीरी करणें [ध्व]

राव—पु १ नृप, राजा ' व्यास योगियांचा राव । '–मुआदि ३९ ८७ २ नांवापुढील सन्मानाची एक पदवी उदा– बळवंतराव, माधवराव क्वचित् नुसता राव शब्दहि येतो ' काय राव सांगावें, तुम्ही काल नव्हतां मोठी मौज झाली ' ३ एक मराठा जात व तिच्यापैकीं एक व्यक्ति मराठा पहा ४ समशेर बहादर, तिसमारखां ५ दक्षिण हिंदुस्थानांत ब्राह्मण, मराठे, जैन आणि शेंगार राव ही पदवी लावतात कोणी विणकराची पेरिके नांवाची जातहि कधीं कधीं राव पदवी लाविते ६ मेवाडांत विशिष्ट शौर्य गाजविल्याबद्दल एखाद्या व्यक्तीस दिली जाणारी पदवी [ स राज, राय ] म्ह० राव करीत नाहीं तें गांव करितो (वाप्र ) राव खालीं आले–एखादा मोठा मनुष्य घोडयावरून, मोठया पदावरून खालीं आला असतां त्यास उद्देशून निघणारा उद्गार राव घोडयाखालीं आले–राव मेले रावाचा रंक होणें–मोठया, श्रीमान मनुष्यास दारिद्र्य, गरीबी येणें सामाशब्द –रावकी–स्त्री रावाची स्थिति गुण, रावपणा ' याला हणमंतराव म्हणून सारे हाक मारितात, याला रावकी कोणी दिली ? ' रावजी–पु प्रधान स्थावरवाचा बहु मानाचा

शब्द. [ रावे ] रावरंक-पु. राजा व रंक; श्रीमंत व भिकारी. 'साधूला रावरंक सारखे.' रावो-पु. १ राजा. 'देशाधिपतीस दंडिता रावो।' -दा ३.८.९. २ श्रेष्ठ मनुष्य. 'तो चतुराचा रावो।' -रास २.४७८.

**रावखंडा**—१ तुटका; तुटलेला (ओंठ) २ ओंठतुटचा. ३ (ल) आ पसरणारा; खिंडार पडलेला, उघडा व भकास दिसणारा, विशोभित. (वाडा, घर, खिंड, खाडी) 'या पाख्यास कवलें लावलीं तीं चार ओळी कमी आलीं त्यामुळें पाखें रावखंडें दिसतें.' [ सं. राजी+खंड ] रावखंडें-न. तुटका ओंठ

**राव(व्ह)टी**—स्त्री. राजे इ० कांनीं राहण्याचें कापडी घर, लहान तंबू, राहुटी पहा. [ हिं. राउटी ]

**रावण**—पु १ रामानें मारलेला लंकेचा राजा. २ (ल.) (निंदेनें) शरीरानें मोठा असा टोणगा, बोका इ० [ सं. रु=शब्द करणें ] म्ह० रावणास भिकेचे डोहळे=नीच व हलक्ट साधनाचें अवलंबन नाशास, अधोगतीस कारणीभूत होतें याअर्थी. (वाप्र.) रावण किंवा रावणाची लंका जळणें-कानाचीं भोकें बोटांनीं बंद केलीं असतां ऐकूं येणाऱ्या आवाजास म्हणतात रावण माजणें-मातणें-होणें-अतिशय ताठेबाज, उद्धट, शिरजोर होणें. सामाशब्द- ०खोत-वि (राजा.) दांडगा; टणक (मनुष्य). ०फळ-न एक वन्य फळ. याचे रामफळाच्या उलट गुणधर्म असल्यामुळें ह्यास हें नांव आहे. ०भात-पु. मसालेभात; बटाटेभात, वांगीभात यासारखा भात. ०राज्य-न १ अंदाधुंदीचा, झोटिंगपातशाहीचा प्रदेश. २ अंदाधुंदी, झोटिंग पातशाही. ३ बेबंदपणा. याच्या उलट रामराज्य. [ सं. ] ०वेला-स्त्री. विशिष्ट वेळ, काल. ही लढाई करण्यास, स्वारीवर निघण्यास अशुभ आहे रावणाचा लेक-पु. (ल.) १ फुशारखोर, अरेराव मनुष्य. २ (ल) ताठेबाज, कह्यांत न राहणारा मनुष्य. -चा वाजंत्री-पु डांस. -ची खाई-स्त्री (ल) सर्व खाणारी, गट्ट करणारी, ग्रस्त करणारी जागा, धंदा, काम इ०, ज्यांत सर्व कांहीं खपतें तें. जसें-कच्च्याबच्च्यांचा संसार, अगस्तीचें पोट, अधिक वाढलेलें शहर. 'संसार ही रावणाची खाई आहे. जो पदार्थ आणावा तो गडप होतो.' रावणारि-पु श्रीराम. [ सं रावण+अरि ] रावणी-पु. इंद्रजीत, रावणपुत्र. [ सं ]

**रावणी**—स्त्री (कु.) उबारा; अंडीं उबविण्यासाठीं केलेली व्यवस्था; रोवण.

**राव(वि)णें**—न लेप 'उभिलें संध्या-रागाचें रावणें।' -शिशु ५९३. -सक्रि. रंगविणें. 'राविले कुंकुमरसें।' -शिशु १७. 'जेणें राविली वस्तु धवळ।' -अमृ ७.९६. [ रापणें ]

**रावणावळ**-स्त्री. (ना.) रंगणावळ; रंगविण्याची मजुरी.

**रावणी**—स्त्री. चांभाराची कुंडी

**राजो. ६. २९**

**रावण्या**—स्त्री. अव. प्रार्थना; विनवण्या. (क्रि० करणें). [ राव राव असें म्हणणें ! ]

**रावताण-णी**—स्त्री. घोडेस्वारानीं केलेली लुटमार, नासधूस; रानटी, लुटारू किंवा रानात हिंडणारे ह्या अर्थी अथवा प्रकर्षार्थी ह्या शब्दापूर्वी रान शब्द जोडतात. जसें-रानरावताणी ह्याचें खातरेंत नाहीं; हा रानरावताणीस भीत नाहीं, मानीत नाहीं इ०; अशा रीतीनें रानरावताणी व राणीराउताणी या दोन शब्दांच्या अर्थामध्यें घोंटाळा होतो. राणीराउताणी पहा. [ राउत ]

**रा(रां)वस**—पु एक तांबड्या रंगाचा समुद्रांतील मासा.

**रावळी**—स्त्री. देवदासी, देवळी. -ऐरा २०३. [ राऊळ ]

**रावळूक**—स्त्री. (गो.) केस झडणें.

**रा(रां)वा**—वि रावखंडा; ओंठतुटका [ रावखंडा ]

**रा(रां)वा**—पु. राघु, पोपट. 'किती रावे असतील तुझ्या धामीं' -र म्ह० जो जो रावा पढे तो तो पिंजऱ्यांत पडे=मूर्ख स्वतंत्र असतात व शहाणे गुलाम बनतात ०मुख-वि. पोपटाच्या तोंडासारखा तोंडाचा आकार, ठेवण असलेला (घोडा). घोड्याचें एक अशुभ चिन्ह.

**रावा**—पु दळलेली हळद

**रावुत, रावूळ**—प्र. राउत, राऊळ पहा.

**रावेणी**—स्त्री. (ना.) लोणच्याचें पाणी; पाडाचे आंबे उकडून केलेलें रायतें. रायनी पहा. [ राई ]

**रा(रां)वेरी**—स्त्री. तांबड्या रंगाच्या कपड्याची एक जात.

**राशा**—वि. १ मध्यम प्रतीचा. राशी पहा. २ नपुंसक; नामर्द. ३ दुर्बळ; मूर्ख. ४ बेडसर [ रास ] राशि-शी-स्त्री. १ रास; ढीग. (समासांत) पुण्यराशि, पापराशि, तेजोराशी; तपोराशी; गुणराशि. २ सरसकट ढीग, ढिगारा; सळमिसळीचा समवाय. ३ मूळ घटक 'समाजांतील प्रारंभीची राशी म्हणजे जसें दंपती किंवा कुटुंब...' -आदिवऱ्याची महाकाली (प्रस्तावना) ६. ४ गणिताच्या क्रियेकरितां मांडलेला आकडा किंवा आकडे (धन, गुण्य, भाज्य इ०) ५ बेरीज, एकंदरी ६ (आकुण, निक्ण, मणी याहून भिन्न) कणसाच्या पहिल्या मळणीपासून झालेली धान्याची रास मदन पहा [ सं ] (वाप्र) राशी पुंजीस येणें-राशीस, साठ्यास पडणें, (खर्चेनेच भागून) निवळ नफा म्हणून उत्पन्न होणें; हिशात पडणें, सग्रहीं पडणें राशीवर-क्रिवि मळलेल्या धान्याच्या ढिगावर, खळ्यावर, मळणी झाल्यावरोबर. 'अदमण दाणे केले करार ते मी देईन राशीवर।'

**राशि-शी, राश**—पुस्त्री १ नक्षत्रचक्राच्या किंवा क्रांति वृत्ताच्या कल्पित बारा भागांपैकीं कोणताहि एक भाग, रास. मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या, तूळ, वृश्चिक, धन, मकर, कुंभ व मीन अशा बारा राशी आहेत, तागचा पुंज. [ स ]

**राशीस बसणें, लागणें**–१ अनिष्ट असणें (मह) २ तीव्र वैरामुळें एखाद्याचा नाश करण्याकरितां त्याचा पाठलाग करणें ३ एखाद्याच्या खनपटीस बसणें, हात धुवून पाठीस लागणें ४ मन लावून, एकचित्तानें अभ्यास करणें [राशि] सामाशब्द– ०कूट–न दोन माणसाच्या जन्मकाळीं उदय असलेल्या दानराशी किंवा लग्नाच्या वेळीं घटित पाहताना दिसून येणारी वधूवराच्या परस्पर राशींची अनुकूलता [स] ०घटित, राशघटित–न जन्म पत्रिकेवरून वधूवराची मैत्री, विरोध याविषयीं ज्ञान, वधूवराचें घटित [स] ०चक्र–न भचक्र, भमडल बारा राशी पहा ज्यात मुख्य ग्रहाच्या कक्षा सर्वोशीं सापडतील, अशा क्रांतिवृ त्ताच्या दोहोंकडे आठ आठ अशापावेतों विस्तारलेला एक वर्तुळ पट्टा कल्पिला आहे तो –सूर्य १८ [सं] राशिचक्रसबंधी प्रकाश–पु कांहींसा अंधुक व त्रिकोणाकार उजेड सध्याकाळीं पश्चिम क्षितिजाकडे व सकाळीं पूर्व क्षितिजाकडे दिसतो तो–ज्योतिषाचार्यांची मूलतत्त्वें ०नाम, राशनाम–न जन्मराशीवरून मुलाचें ठेवलेलें नाव [स] ०भोग–पु राशींतून ग्रहाचें गमन [स]

**राशी**—वि १ राशा, राशीचा, मध्यम गुणाचा मध्यम 'राशी तूप' २ मधल्या पायरीचा, धड पुरुष नव्हे, धड स्त्री नव्हे असा, नपुसक [राशि किंवा रास]

**राष्ट्र**—न १ देश, राज्य, मडल, प्रांत २ धार्मिक, सामाजिक व राजकीय आपलेपणा भरलेला लोकसमुदाय, एका दिशाची व एकाच मनोभावनेनें प्रेरित झालेली देशातील जनता ३ जमलेला समुदाय, पुष्कळ मडळी, मेळा, वृंद 'साखरेच्या भोंवतीं पहा कसें मुग्याचें राष्ट्र जमलें आहे' ४ (ना) प्रस्थ, कारभार, वैभव [स] सामाशब्द– ०गीत–न स्वदेश, स्वभाषा, स्वविक्रम, स्वधर्म किंवा सस्कृति याचें निदर्शक गीत ०ध्वज–पु सर्व राष्ट्रास मान्य अशा वर्णे व चिन्हांकित निशाण राष्ट्रीय झेंडा, निशाण ०सघ–पु सर्व देशातील एकजुटीची सस्था, जगातील राष्ट्रामध्यें समेटाचें कार्य करणारी सस्था, (इ) लीग ऑफ नेशन्स् 'राष्ट्रसघाच्या बैठकींत हिंदी प्रतिनिधीचें नतृत्व बिकानेरच्या महाराजाकडे आलें –क १७६३० [स] ०सभा–स्त्री सर्व भरतखडाचें राजकारण करणारी एक सभा, काग्रेस 'राजकीय हक्क सपादण्यासाठीं आमच्या लोकानीं अलीकडे जी राष्ट्रसभा स्थापिली आहे'–आगर ३६७ [स] राष्ट्र(ष्ट्र)ण–न १ झुड, जमाव (दंग्यातील) अस्ताव्यस्त मेळा २ मोठा पसारा (अवाढव्य कामाचा, सामानाचा) मोठा राडा (जेवणावळीनतर अन्नाचा); अडगळीचा विखरडा (कागनतर जिनसाचा हत्याराचा) (क्रि० घालणें पडणें) [स राष्ट्र] राष्ट्रि(ष्ट्री)य–वि राज्यासबधीं, राष्ट्रासबधीं प्रन्नासबधीं राष्ट्राच्या हिताचें [स राष्ट्र] राष्ट्रीय अस्तित्व–न स्वतत्र वृत्तीचें जीवन; स्वत चें राष्ट्र स्वत चालविण्याची भावना 'हिंदुस्तानच्या लोकानीं राष्ट्रीय अस्तित्व कधींच सपादूं नये'–टि ३२ राष्ट्रीयत्व–न स्वधर्म, स्वभाषा, स्वदेश व पूर्वज यांच्याविषयीं आदर, अभिमान 'स्वधर्म, स्वभाषा, स्वदेशाभिमान, पूर्वेतिहासस्मरण हीं राष्ट्रीयपणाचीं लक्षणें होत'–टि २२३७ [सं] राष्ट्रीय शाळा–स्त्री राष्ट्रीय शिक्षण देणारी शाळा राष्ट्रीय शिक्षण–न ज्या शिक्षणानें राष्ट्राची इभ्रत व पपति वाढून त्याची इतरावर छाप बसेल असें राष्ट्र बनविण्या सारखें शिक्षण राष्ट्रीय सभा–स्त्री जनतेच्या प्रतिनिधींची राजकारणविषयक सभा, काँग्रेस, राष्ट्रसभा पहा [स]

**राष्णा-स्ना**—पुन एक वनस्पति व तिचें मूळ रास्ना पहा

**रास**—पुभ नग, सख्या दाखविणारा शब्द सर=बैल, म्हशी व गाई याची सख्या, नफर=उटाची सख्या, नग=हत्तींची सख्या या प्रमाणें रास हा घोड्याची सख्या सागण्या करिता योजतात 'घोडे रास दाहा बैल, गाय इ० सर पाच उट नफर वीस' [अर रास=डोकें] ०करदन–न एक जिन्नस मोडून दुसरा जिन्नस नवीन केला असता मोडलें तें नावें व नवें केलें तें जमेस लिहिण्याची जमाखर्ची पद्धत दुबेरजी 'दुरा मोत्याचा बावत रासकरदन'–समारो १२३९ [अर रास=डोकें+फा करदन]

**रास**—पु गवळ्याचा गाण्याचा नाचण्याचा, खेळण्याचा उत्सव, कृष्णानें गोपींबरोबर केलेली नृत्यक्रीडा 'ऐसा रास विलास, साहनि सुखें लाविल्याच्या दीपिका। –आनदरस चरित २७ [स] (वाप्र) ०माडणें–नृत्य चालविणें सामाशब्द– ०क्रीडा–स्त्री कृष्ण आणि गोपी यानीं केलेलें मडलाकार नृत्य [स] ०लीला–स्त्री रासक्रीडा [स] रासोत्सव–पु कृष्ण व गोपी याच्या गाण्याचा व नाचण्याचा उत्सव रास पहा [स रास+उत्सव]

**रास**—वि क्रिवि (शिल्प) सरळ तिरकस नव्हे असें (बतलेला कपडा किंवा कपडा बेतणें) याच्या उलट इरफ –वि १ उभें (कापड) 'पुढें रास बाजू ठेवावयाची' २ (व) चिकणी (सुपारी) 'रास सुपारी येथें मिळेल' ३ (व) अनुकूल, योग्य 'दखलाच रास आहेत हे लोक' [फा रास्त]

**रास**—स्त्री (ज्यो) राशि पहा रासकूट-घटित-नाम–राशिकूट इ० पहा रास–स्त्री १ ढीग, राशि राशि पहा २ सरसकट ढीग 'तुम्ही आवे निवडून घेणार तर सवादोन रुपयानीं मिळतील व रास घ्याल तर रुपयानें' ३ (व) खळ्यातील धान्याचा ढीग (कु) कणसें मळून वारवून स्वच्छ केलेला धान्याचा ढीग ५ (गणित) मुद्दल व व्याज मिळून झालेली रकम [स राशि] (वाप्र) ०भरणें म खळ्यातील जमीनीवर धान्याची

रास करणें सामाशब्द- ०पुजा-स्त्री. मळलेल्या धान्याच्या राशीची पूजा ०माथा-पु राउवट, शेतमाल तयार होऊन खळ्यात धान्याच्या राशी पडण्याचा हंगाम ह्या शब्दाचा प्रथमाविभक्तींत उपयोग करीत नाहींत [रास+माथा] ०माथां -माथ्यास-क्रिवि शेतांतील धान्य काढून, मळून, त्याची रास केल्यानतर (सावकार दर्णे, वारणें, घेणें इ०) 'ह्या पैका हरभ-न्याच्या रासमाथ्यास फडशा करीन' ०वट-वि १ राशी, राशीचा, मधल्या पायरीचा, गुणाचा, मध्यम, सामान्य २ हलक्या दराचा, दणगट ३ (व) अडदाड [रास] ०वटा-पु रासोटा पहा ०वळ-वि १ समायिक २ (कों) साधारण प्रतीचा रासिवा-पु राशि 'सुखाचा वीर निवळु। रासिवा मीची।'-ज्ञा १६ ३५६ [रास] रासी-वि मध्यमप्रतीचें राशी पहा रासुं(सा)डा-पु (व) धान्याची मळणी पूर्ण झाल्यानतर गडी-माणसें खळ्यावर स्वयपाक करून धान्याच्या राशीला नैवेद्य दाखवून जेवतात तो समारम पूर्वी वर्णित राशीला बकऱ्याचा बळी देण्याची चाल असे रासोटा-पु रास काढून नेल्यानतर राहणारा खळ्यावरील धान्याचा अवशेष ह्यावर महाराचा हक्क असतो [रास+टाय]

रासणी—स्त्री सागडीचा किंवा जोताचा म्होरक्या बैल [रास]

रासतुरा—पु एक फुलझाड व त्याचें फूल [राजतुरा अप]

रासना—स्त्री एक औषधी वनस्पति रास्ना पहा

रासनाहणें-न्हाणें-न्हाण—न १ लग्नात वरपक्षीय स्त्रियास वधूपक्षीय स्त्रियाकडून वाद्य वाजवून न्हावयास घालण्याचा समारंभ २ (ल.) गमत, खेळत, पुष्कळसें ऊन्ह पाणी घेऊन केलेलें स्नान [सं रास+स्नान, फा रास=रोजें+स्नान]

रासनी-णी—स्त्री बी पेरल्यावर तें झाकून टाकण्यासाठीं शेतात फिरवावयाचें एक औत, रेकला (माण) भुईमूग परल्या नतर वरची माती साफ करण्याचें गुठें रासन्या-वि रासनी हाकणारा

रासबेरी—स्त्रीन १ एक झुडुप व त्याचें फळ २ त्या फळाच्या रसाचें पेय. हें लालसर असतें

रासभ—पु गर्दभ, गाढव रासभी-स्त्री गर्दभी, गाढवी 'परि तयात ही रासभी।'-केका ५४ वि गाढवासारखें [स]

रासरु(रो)शी, रासरू(रो)स—क्रिवि (प्र) राजरुशी इ० पहा

रासी—वि (कों.) हलकी (माडी, दारू) राशी पहा.

रास्त-स्ती—वि १ खरा, न्याय्य, नेकीचा, नीतीचा, सरळ (मनुष्य, भाषण, कृत्य, आचरण) 'हुजूर आलियावर रास्ती न्याय करून '-मराआ ३१ २ खरें, प्रामाणिक, नक्की, पूर्ण मेजाचें (वजन, माप), -क्रिवि खऱ्या रीतीनें, न्यायानें, नेकीनें, प्रामाणिकपणानें [फा रास्त्] सामाशब्द- ०कौली-स्त्री सत्यवक्तेपणा 'यात रास्तकौली इंग्रेजाची वोढून राहिली।'-ऐटि १५९ [फा] ०गो-वि खरें बोलणारा, सत्यवादी. [फा रास्त्-गो] ०गोई-स्त्री सत्यवादित्व, खरेपणा, सत्य भाषण 'दुनियेंत रास्तगाई परमेश्वरानें किनिया दिली आहे.'-ऐटि १५९. [फा रास्त् गोई] ०मामलगी-स्त्री न्याय्य वर्तन 'त्याप्रमाणें गायकवाड याचें पत्र आणून ठेविलें असतां महाल गुजारत न केलें हे रास्तमामलगी की काय?'-स ७ ३५७२ [फा] ०रवी-स्त्री सरलगामित्व, सरळपणा 'जदीद करार झाला त्याची ही अहवाल, तेव्हां रास्तरवी कायमी कोठें राहिली?'-स ७ ३५३७ [फा] रास्ती-वि रास्त, योग्य. रास्ती माप-न खरें, प्रामाणिक माप, मोजण्याची रीति-याच्या उलट वोटधरणी माप, हातधरणी माप

रास्ना—पु लुगड्याची एक जात, प्रकार, पाढऱ्या किंवा कोणत्याहि रगाच्या उभ्या काड्या असलेलें लुगडें [फा रास्त=सरळ]

रास्तार—न (व घाटी) पसारा, राशान पहा

रास्ना—पु एक औषधी वनस्पति सर्व प्रकारच्या वायूवर यावयाचा रास्नादि काढा प्रसिद्ध आहे सर्प, विंचू याच्या दंशावर ह्याचा कादा ठेंचून बाधतात [स रास्ना, हिं रासन, रास्ना, व रास्ना, गुज रासना, कर्ना रसना, ते रासना पुडका, ता रासुन]

राह, रहा—स्त्री १ मार्ग, रस्ता 'जेन्राल मक्कूर ताव आणिता न सकता राहेंत आपले हमराही सरन्जाम टाकीत.. गडीच्या भासरस जाऊन पोहोंचला'-रा १० १८७ २ वाट, अवधि, मार्गप्रतीक्षा 'दीड महिना राह साहबाचे यावयाची पाहिली'-दम ६८ ३ सरळ मार्ग, योग्य वागणूक 'त्यास राहावर आणूं निदान त्यास तवी करू'-रा १४६ [फा. राह्] राहदार-वि १ मार्गदर्शक २ नाकेवाला -रा ६ २७० [फा राह्+दार्]

राहकळ—स्त्रीन १ कावरेंबावरें होऊन गरगरा फिरणें (म्यालेल्या गुराच्या कळपानें) २ निकराची झोंबाझोंबी व ओढाताण (निवावर उदार होऊन झगडणाऱ्या माणसाची)

राहगुजरी—स्त्री एक प्रकारचा कर [फा]

राहट—स्त्री (महानु) झाडी, अरण्य, जाळी 'उदय अस्त द्वैत वाट। नाहिच राहट दिवाराति।'-ज्ञानप्रदीप ३६९ रहाटी पहा

राहट—स्त्री राहटी राहटण-स्त्री वर्तणूक 'न घडे अन्यथा राहटण।'-बोधवैभव १६८ [फा राह्] राहटणें-उक्रि आचरणें, वर्तणें. 'शुभाशुभ राहट प्राणी। तितुकें दृष्टी

हेरवती।'-सुभादि १६.१३८. राहटी-स्त्री. १ वागणूक. रहाटी पहा. 'तैसी भूतमात्री राहटी। मवाळ ते।'-ज्ञा १६ १७०. २ मार्ग, रीति ३ व्यापार,व्यवहार ४संसार. 'गृहिणी होवोनि दरिद्र यागी। राहटी करणे जळो तें।'-सुभादि १५ ४०. [फा. राह्]

राहटवणी, राहटया, राहणी, राहदारी, राहदारी जकात, राहसाळी—रहाटवणी, रहाटया इ० पहा.

राहडी—स्त्री. १ राड; चिखल. २ (विष्ठा इ० दुर्गंधिपदार्थांनीं भरलेलो) खाच. 'इंगळ चालती राहडी।'-ज्ञानप्रदीप ७४०.

राहणें—अक्रि. १ नांदणें, वास करणें; असणें; मुक्काम करणें. 'आम्ही सांप्रत काशींत राहतों.' २ एका स्थितींत टिकणें. 'एका बोटावर काठी कशी राहील.' ३ मावणें; समाविष्ट होणें (भांड्यांत पदार्थ). 'या दौतींत अच्छेर शाई राहील.' ४ सळणें, थांबणें; बंद होणें, शेवट होणें. 'पाऊस राहिला म्हणजे तुझ्या पोटांतील तिडीक राहील' ५ मागें पडणें, सर्व्यां टाकलें जाणें, न संपता पडून राहणें, तात्पुरतें बंद पडणें (काम इ०). 'वाड्याचें काम अर्धे झालें अर्धे राहिलें.' 'यंदा त्याचें लग्न होणार होतें पण राहिलें.' ६ उरणें, शिल्लक असणें; हातात, स्त्रिशात शिल्लक, बाकी म्हणून असणें. ७ मागें येणें; थांबणें. 'त्या शिवी दिलीस तर तो तोंडात मारल्याशिवाय राहणार नाहीं' ८ शिथिल होणें; असमर्थ होणें (अवयव, इंद्रियें); मोडावणें; खचणें (सामर्थ्य, दम) ९ ठेवला जाणें; पदरच्या माणसाप्रमाणें, चाकराप्रमाणें असणें; कामावर, दिमतीस असणें. 'तुं एका महिन्याचा चाकर. मी कालपासून राहिलों.' १० (आयाचा शेवटीं असणाऱ्या धातुसाधितां बरोबर ह्या क्रियापदाचा प्रयोग असतां) मागें फिरणें, थांबणें. असा अर्थ होतो 'हा मारायाचा-खायाचा-बसायाचा-जायाचा-राहिला.' ११ (तिरस्कारार्थी) असूं देणें, बाजूस सारणें, दुर्लक्ष करणें. 'होउनि वृद्ध कृपातें भीष्म म्हणे काय तो मुद्दा? राहो।'-मोभीष्म १२. १२. [सं. रह्=थांबणें] साधितशब्द- राहतक-न १ राहते पण. २ (ल) राहण्याची क्रिया. 'बालगि जोतो पुसे जातक। कोणी राहतक पुसेना।'-भारा बाल ९ ४१ राहराहों-क्रिवि. पुन पुन', वारंवार 'राहराहों शोध घ्यावा। परातराचा।' -दा १५ १.४ [राहून राहून] राहव(वि)णें-सक्रि राहवून, ठेऊन घेणें 'कैकेयी चालली रायासरसी। राहविता तिसी न राहे।' -भारा बाल १.८२. राह(हा-हि)वलेपण-न रंगेलपण. 'का सरलेया गीताचा समारंभु। न वचे राहवलेपणाचा क्षोभु।'-ज्ञा १८.४२४.

राहळ—स्त्री. देशाचा एक भाग. रहाळ पहा.

-राहा, राहाट, राहाटवणी, राहाड, राहाण, राहाणें, राहादारी, राहासाळी—रहा, रहाट, इ० पहा.

राहाटणें—अक्रि. १ वर्तणें; आचरणें. राहटणें पहा. २ (महानु) फिरणें. 'परि समग्रें अंधकारीं। राहाटों नये।'-माए २९७. ३ वर्तणूक; व्यापार. [राहणें] राहाटवि(व)णें-सक्रि. १ वापरणें. 'म्हणौनि विचारावया शास्त्र। राहाटवावें जें वक्त्र।' -ज्ञा १७.२३२. २ वागविणें. 'ज्ञाता इंद्रियाचा मेळावा। राहाटवी तेथ पांडवा।'-ज्ञा १८.४९३. ३ व्यापार करविणें, चालविणें. 'देहनिर्वाहापुरें। राहाटवी ज्ञातां पायातें।'-ज्ञा १८. १०२९. राहाटी-स्त्री. १ वागणूक. २ रिवाज, परंपरा. ३ पडलेला प्रकार, प्रसंग. 'असो अशी होतां राहाटी। मग उठते झाले चतुर्येजेठी।'-नव १२.१३२.

राहाटमाळ—स्त्री. रहाटगाडगें.

राहाडं—स्त्री धगधगीत निखाऱ्यांची खाई.

राहाडी—स्त्री. राडी; राड. राहडी पहा.

राहाण—न. १ (महानु.) ज्यामध्यें पिशाच संचार होतो असें शरीर. 'तें श्रीरंगाचें राहणें। जग प्रसीध अवतरणें।'-ऋ ६५. २ अंगांत देवत आणून बोलवणें; देवताचा, भुताखेतादींचा संचार होण्याकरिता करावयाचा विधि, मांड. 'योगियापुढें राहाण।'-दा ७.९.१९. रहाण पहा

राहाणी—स्त्री. पेहराव; रीत, रिवाज; आचार विचार; वागणूक, रूढी. 'पाश्चात्याची राहाणी हिंदुस्तानापेक्षां निराळी आहे.'-के १७.५ ३०.

राहाणें—न. अंगांत दैवत आणणें. रहाण पहा. ०घालणें-क्रि. अंगांत दैवत आणून बोलवणें.

राहित्य—न रहितपणा, शून्यता; अभाव. रहित पहा. बहुधा समासात योजतात. जसें-द्रव्यराहित्य, जलराहित्य, ज्ञानराहित्य इ०. [सं. रहित]

राही—स्त्री. कृष्णसखी राधा; राधिका; राई पहा 'राही रखुमाई सत्यभामा माता। पांडुरंग पिता माहियेर।'-तुगा २५८१. [सं. राधिका, प्रा. राहिआ, राही]

राहु-हू-हो—पु १ एक उपग्रह; नवग्रहांतील आठवा ग्रह. २ ज्याचें शिर विष्णूनें धडापासून वेगळें केलें असा एक दैत्य, त्याचें डोकें तो राहुग्रह व धड केतु ग्रह झाला. याच्यामुळें सूर्यचंद्रास ग्रहणें लागतात असें म्हणतात. ३ (ज्यो.) भूमिच्छाया; वरचा पातबिंदु [सं.] (वाप्र) राहूकेतु मागें लागणें, राहूसारखा मागें लागणें-येणें-पाठ घेणें-रानपटीस बसणें, अतिशय सतावणें, एखाद्याच्या मागें लागून त्याला त्रासण्यास पाडणें. सामाशब्द- ०ग्रस्त-वि. राहूनें ग्रस्त केलेला; ग्रहण लागलेला (सूर्य, चंद्र). [सं.] ०ग्रास-पु ग्रहणामुळें होणारा सूर्य-चंद्राचा अस्त. [सं.] ०पर्व-न. ज्या दिवशीं ग्रहण लागतें

तो दिवस, पर्वकाल. [ सं. ] ०मेळ-पु ग्रहण; राहूचा संयोग 'तेथ रविचंद्र राहुमेळु । होतां पाहे पुण्यकाळु ।' -ज्ञा १७ २७२. [ प्रा. ] ०संपात-पु. ज्याप्रमाणें भूमध्यवृत्त आणि क्रांतिवृत्त हीं एकमेकास २३॥ अंशांचा कोन करून छेदितात, त्याप्रमाणें चंद्राची कक्षा व क्रांतिवृत्त हीं एकमेकास ५ अंशांचा कोन करून छेदितात तीं ज्या दोन बिंदूंतून छेदितात त्यापैकीं एकाला राहुसंपात म्हणतात. -सृष्टि ११३. [ सं. ]

राहु(हो)टी—स्त्री. ल्हान तंबू. रावटी पहा.

राहून राहून—अ. पुनःपुनः; थांबून थांबून; अधूनमधून. 'या नक्षत्राचा पाऊस एकसारखा लागत नाहीं, राहून राहून पडतो.' [ राहणें ]

राळ—स्त्री. १ शालनिर्यास; एक ज्वालाग्राही डिंकासारखा पदार्थ. ज्यापासून हा डिंक निघतो तीं झाडें बंगाल, अनुचा पहाड व उत्तरहिंदुस्तान यांत होतात. २ रातकिडा. हा सरलपक्ष कीटक बिळांत राहतो. याचा रंग उदी असतो. ३ ( ल ) नासलेली, बिघडलेली, विचका झालेली, भंगलेली, फजीति झालेली, मोडलेली स्थिति. पिठाड, पीठ, धूळ, भुसाडा इ० पहा. ४ हुर्रेवडी; फटफजीती. 'झाडाचा पाला समजून राळ करितात.' -वफा प्र २. ५ चांदीसोन्याचा गट. [ सं. राल ] ( वाप्र. ) ०करणें-१ घाबरवून सोडणें, फट फजिती देणें, दुर्दशा करणें. २ नाश करणें. 'आशा तृष्णा कल्पना काम क्रोध काळ । दुरविलीं शुद्ध बुद्धि केली राळ ।' -तुगा ४०६६. ०पाट-पु. एखाद्या जिन्साला नक्षी काढताना तो जिन्नस चिकटून रहाण्यासाठीं राळ लावलेला चौकोनी, चाटोळा लाकडी तुकडा.

राळा—पु एक प्रकारचें हलकें तृणधान्य. याच्या पांढरा, पिवळा व काळा अशा जाती आहेत. ह्याचा भात वगैरे करितात. देशावर गरीब लोक राळ्यावर निर्वाह करतात. राळवण-न. १ राळ्याचीं ताटें, पेंढा; कणसें तोडल्यानंतरचें ताट, राळे बडविल्यानंतर राहिलेलें गवत. २-नक्षी. (ल) शिणलेली, पुष्कळ श्रमलेली स्थिति. (जिवाचें) राळवण-न. मरे मरेतों काम, कष्ट करण्याची स्थिति. राळसाळ-स्त्री. केरकचरा; उरले सुरले अवशेष, बगळ. -वि. टाकाऊ, रद्द;

राक्षस—पु. १ मानुष किंवा अमानुषरूप देवाचा शत्रु, कुबेराचा सेवक व त्याच्या निधींचा रक्षक, स्मशानांत आण्यायेण्याची रहाळ असणारा, मृत शरीरांना सजीव करणारा उग्र पिशाच म्हणून निरनिराळ्या रीतींनीं वर्णिलेला देव किंवा पिशाच, असुर दानव; दैत्य. २ क्रूर, भयंकर, अक्राळ विक्राळ, अघाशी, खोपाळू मनुष्य. ३ साठ संवत्सरांतील एकुणपन्नासावा संवत्सर. [ सं ] सामासिकशब्द-०गण-पु जन्मकाळच्या नक्षत्रावरून केलेल्या देवगण, मनुष्यगण, व राक्षसगण ह्या तीन वर्गांतील शेवटला वर्ग. [ सं. ] ०गणी-वि. राक्षसगण असलेला. ०मुखी-मोहरा-मोरा-मोहरी-क्रिविवि. दक्षिणाभिमुख; दक्षिणेकडे. गंगमोहरा पहा. [ सं. ] ०विधि-विवाह-पु विवाहाच्या आठ प्रकारांपैकी एक प्रकार. बलात्कारानें केलेला विवाह; पालकांच्या व कन्येच्या इच्छेविरुद्ध तिचें हरण करणें. अष्ट विवाह पहा. 'परणें पाहे राक्षस विधि ।' -एरुस्व १२.६६. [ सं. ] ०वेळ-वेळा-स्त्री. सुर्यास्ताच्या व रात्रीच्या मधील काळ; तिन्हीसांजा. [ सं. राक्षस+वेळ ] राक्षसान्न-न. तामस अन्न ( बाजरी, उडीद, मसुर, राळा, मिरची इ० ). [ सं. ] राक्षशी( सी ,ण-स्त्री. १ राक्षसाची स्त्री. २ दुष्ट स्त्री. [ सं. राक्षसी ] म्ह० राक्षसणी पीठ कांडितात घरामध्यें-रानामध्यें-तेथें=पराकाष्ठेचा ओसाडपणा दाखविण्याकरितां योजतात. राक्षसी-शी-स्त्री. राक्षसाची बायको; राक्षसस्त्री. -वि. १ राक्षसाच्या संबंधी; राक्षसास योग्य. २ प्रचंड, भीम; साहसी; मनस्वी ( कृत्यें ). ३ आसुरी; तामस; अघोरी ( उपाय ). ४ कुत्सित, अयोग्य; जबर ( अन्न, खाणें ) ( समासांत ) राक्षसी-कृत्य-करणी-खाणें-भाषण-घोडा-बाग-मजल-जोर इ० [ सं. राक्षस ] सामासिकशब्द- ०अवतार-पु अतिशय क्रूर आणि रानटी मनुष्य. ०उपाय-उपचार-पु आसुरी, अघोरी उपाय, उपचार. ०झोंप-स्त्री. अतिशय गाढ व दीर्घ काल झोंप. ०दौलत-स्त्री सात्त्विकपणा, टिकाऊपणा नसलेली भरभराट, संपत्ति ०धान्य-न. बाजरी (कारण हें धान्य हेमाडपंतानें लंकेहून आणलें अशी समजूत आहे). ०पीक-न अतिशय विपुल पीक. ०भाषा-स्त्री. संस्कृताच्या अपभ्रंशानें बनलेली व नाटकांत राक्षसांच्या, पिशाच्याच्या तोडीं घातलेली, हेंगाडी भाषा. ०माया-माव-स्त्री. राक्षसाची माया, कपट. ०मुलूक-ख-पु. नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेश. ह्याच्या उलट देवमुलुक ( नर्मदेच्या उत्तरेकडील प्रदेश ). ०विद्या-स्त्री. राक्षस आणि पिशाच यांस काढून लावण्याची, त्यांस ताब्यांत ठेवण्याची विद्या. ०वेळ-वेळा-स्त्री. राक्षस वेळ पहा. ०संपत्ति-स्त्री राक्षसी दौलत पहा. ०हाड-न टणक व बळकट मनुष्य. राक्षेस-पु राक्षस. 'किती येक राक्षेस ते हाकलीती।' -राक १४

राज्ञी—स्त्री. राणी, राजपत्नी [ सं. ]

रिआया—स्त्री. प्रजा, रयत. रअय्या पहा 'रिआया व मुजारियान परगणे चाकण.' -रा ६ १५३ [ अर ]

रिकब-बी, रिकाबी—स्त्री. घोड्यावर बसण्यासाठीं व बसून पाय ठेवण्यासाठीं दोन बाजूंस सोडलेल्या दोन कड्यांपैकीं प्रत्येक. [ अर. रकाब ]

•रिकवि(वी)णें—सक्रि. रिचविणें; रिकाम करणें [ स. रिक्त; प्रा. रित्त, रिक ]

दगनी ।'-मुमादि १६ १३८ **राहटी**-स्त्री १ वागणूक. रहाटी पहा 'ऐसी मूलमाया राहटी । मवाळ ते ।'-ज्ञा १६ १७० २ मस, रीति ३ व्यापार व्यवहार ४समार 'गृहिणी होवानि दरिद्र सागी । राहटी करणें जळो तें ।'-मुमादि १७ ४० [फा राह्]

**राहटवणी, राहट्या, राहणी, राहदारी, राहदारी जकात, राहसाळी**—रहाटवणी, रहाटया इ० पहा

**राहडी**—स्त्री १ राड, चिखल २ (विष्ठा इ० दुर्गधिपदार्थांनी भरलेली) खाच 'इंगळ चालती राहडी ।'-ज्ञानप्रदीप ७४०

**राहणें**—अक्रि १ नांदणें, वास करणें, असणें, मुक्काम करणें 'आम्ही सांप्रत वाडीत राहतो' २ एका स्थितींत टिकणें. 'एका चोटावर काठी कशी राहील' ३ मावणें, समाविष्ट होणें (भाड्यात पहा) 'या दौतींत अर्धेर शाई राहील' ४ खळणें थांबणें, बंद होणें शेवट होणें 'पाऊस राहिला म्हणजे तुझ्या पोटातील तिडीक राहील' ५ मागें पडणें, सन्या टाकलें जाणें, न सपतां पडून राहणें, तात्पुरतें बंद पडणें (काम इ०) 'वाड्याचें काम अर्धे झालें अर्धे राहिलें' 'यंदां त्याचें लग्न होणार होतें पण राहिलें' ६ उरणें, शिल्लक असणें, हातात, निशात शिल्लक बाकी म्हणून असणें ७ मागें घेणें, थांबणें 'त्या शिवी दिलीस तर तो तोंडात मारल्याशिवाय राहणार नाहीं' ८ शिथिल होणें, असमर्थ होणें (अवयव, इंद्रियें), मोडावणें, खचणें (सामर्थ्य कम) ९ टेकला जाणें, पदरच्या माणसाप्रमाणें, चाकराप्रमाणें असणें, कामावर, दिमतीस असणें 'तू एका महिन्याचा चाकर मी कालपासून राहिलों' १० (आयाचा शेवटीं असणाऱ्या धातुसाधिता बरोबर ह्या क्रिया पदाचा प्रयोग असतां) मागें फिरणें, थांबणें असा अर्थ होतो 'हा मारायाचा-खायाचा-बसायाचा-जायाचा-राहिला' ११ (तिरस्कारार्थी) असु देणें, वाजूस सारणें, दुर्लक्ष करणें 'होउनि तृप्त नृपातें भीष्म म्हणे काय ती सुद्धा ? राहो ।'-मोभीष्म १२. १२ [स रहू-थांबणें] साधितशब्द- **राहतक**-न १ राहते पण २ (ल) राहण्याची क्रिया 'यालागिं जोतो पुसे जातक । कोणी राहतक पुसेना ।'-भारा बाल ९ ४१ **राहराहीं**-क्रिवि पुन पुन वारवार 'राहराहीं शोध घ्यावा । परातराचा ।' -दा १५ १ ४ [राहुन राहन] **राहव(वि)णें**-सक्रि राहवून, ठेऊन घेणें 'कैकेयी चालली रायासरसी । राहविता तिसी न राहे ।' -भारा बाल १ ८७ **राह(हा-हि)वलेपण**-न रगलपण 'का सरलेया गीताचा समारभु । न वचे राहवलेपणाचा क्षोभु ।'-ज्ञा १८ ४२४

**राहळ**—स्त्री देशाचा एक भाग रहाल पहा

-**राहा, राहाट, राहाटवणी, राहाड, राहण, राहाणें, राहादारी, राहासाळी**—रहा, रहाट, इ० पहा

**राहाटणें**—स्त्री १ वर्तों, आचरणें राहटणें पहा २ (महानु) फिरणें 'परि समग्र अधकारी । राहाटों नये ।'-गाए २९७ ३ वर्तणूक, व्यापार [राहण] **राहाटवि(घ)णें**-सक्रि १ वापरणें 'म्हणौनि विचारावया शास्त्र । राहाटवावें जे वस्त्र ।' -ज्ञा १७ ३३२ २ वागविणें 'ज्ञाता इंद्रियांचा मेळावा । राहाटवी तेथ पांडवा ।'-ज्ञा १८ ४९३ ३ व्यापार करविणें, चालविणें 'वद्रुनिशीदापुतें । राहाटवी हातीं पायातें ।'-ज्ञा १८ १०२९ **राहाटी**-स्त्री १ वागणूक २ रिवाज, परपरा ३ घडलेला प्रकार, ४ क्रम 'असो अशी होता राहाटी । मग उठते झाले चतुर्वेदी ।'-नव १२ १३७

**राहाटमाळ**—स्त्री रहाटमाळगें

**राहाड**—स्त्री धगधगीत निखाऱ्याची खाई

**राहाडी**—स्त्री राडी; राड राहडी पहा

**राहाण**—न १ (महानु) ज्यामध्यें पिशाच सचार होतो असें शरीर 'तें श्रीरंगाचें राहणें । जग प्रसीध अवतरण ।'-ऋ ६५ २ अगात दैवत आणून बोलणें, देवताचा, भुताखेतादींचा सचार होण्याकरिता करावयाचा विधि मांड 'योगियापुढे राहाण ।'-दा ७ ९ १९ रहाण पहा

**राहाणी**—स्त्री पेहराव, रीत, रिवाज, आचार विचार, वागणूक, रूढी 'पाश्चात्त्याची राहाणी हिंदुस्तानापेक्षां निराळी आहे'-के १७५३०

**राहाणें**—न अगांत दैवत आणणें रहाण पहा ०**घालणें**-क्रि अगात दैवत आणून बोलवणें

**राहित्य**—न रहितपणा, शून्यता, अभाव रहित पहा बहुधा समासांत योजतात जसें-दूषणराहित्य, जलराहित्य, ज्ञानराहित्य इ० [स रहित]

**राही**—स्त्री कृष्णसखी राधा, राधिका, राई पहा 'राही रखुमाई सत्यभामा माता । पांडुरग पिता माहियेर ।'-तुगा २५८१ [स. राधिका; प्रा राहिआ, राही]

**राहु-हू-हो**—पु १ एक उपग्रह नवग्रहातील आठवा ग्रह २ ज्याचें शिर विष्णूनें धडापासुन वेगळें केलें असा एक दैत्य. ह्याचें डोकें तो राहुग्रह व धड केतु ग्रह झाला यांच्यामुळें सूर्य-चद्रास ग्रहणें लागतात असें म्हणतात ३ (ज्यो) भूमिच्छाया, वरचा पातबिंदु [स] (वाप्र) **राहुकेतु मागें लागणें, राहुसारखा मागें लागणें-येणें-पाठ घेणें**-सनपटीस बसणें, अतिशय सतावणें, एखाद्याच्या मागें लागून त्याला त्रासण्यास पडणें सामासिकशब्द- ०**ग्रस्त**-वि राहूनें ग्रस्त केलेला, ग्रहण लागलेला (सूर्य, चद्र) [स] ०**ग्रास**-पु ग्रहणामुळें होणारा सूर्य-चद्राचा अस्त [स.] ०**पर्व**-न ज्या दिवशीं ग्रहण लागतें

तो दिवस, पर्वकाल [ स ] ०मेळ-पु ग्रहण राहूचा संयोग ‘ येथ रविचंद्र राहुमेळु । होता पाहे पुण्यकाळु । ’ -ज्ञा १७ १७२ [ प्रा ] ०संपात-पु ज्याप्रमाणें भूमध्यवृत्त आणि क्रांतिवृत्त हीं एकमेकांस २३॥ अंशाचा कोन करून छेदितात त्याप्रमाणें चंद्राची कक्षा व क्रांतिवृत्त हीं एकमेकांस ५ अंशाचा कोन करून छेदितात हीं ज्या दोन बिंदूंतून छेदितात त्यांपैकीं एकाला राहुसंपात म्हणतात -सृष्टि ११३ [ स ]

राहु(हो)टी—स्त्री ल्हान तंबू राहुटी पहा

राहून राहून—अ पुन पुन , थांबून थांबून, अधूनमधून ‘ या नक्षत्राचा पाऊस एकसारखा लागत नाहीं, राहून राहून पडतो ’ [ राहणें ]

राळ—स्त्री १ शालनिर्यास, एक ज्वालाग्राही डिंकासारखा पदार्थ ज्यांपासून हा डिंक निघतो तीं झाडें बंगाल, अबूचा पहाड व उत्तरहिंदुस्तान यांत होतात २ रातकिडा हा सरलपक्ष कीटक बिळांत राहतो याचा रंग उदी असतो ३ ( ल ) नासलेली, बिघडलेली, विचका झालेली, भंगलेली फजीति झालेली मोडलेली स्थिति पिटाड, पीठ, धूळ, भुसाडा इ० पहा ४ दुर्दशा, फटफजीती ‘झाडाचा पाला समजून राळ करितात ’ -कफा ग्र २ ५ चांदीसोन्याचा गंज [ स राल ] ( वाप्र ) ०करणें-१ घाबरवून सोडणें, फटफजिती देणें, दुर्दशा करणें २ नाश करणें ‘ आशा तृष्णा कल्पना काम क्रोध काळ । दुरविलीं शुद्ध बुद्धि केली राळ । ’ -तुगा ४०६६ ०पाट-पु एखादा जिन्नस नक्षी काढताना तो जिनस चिकटून राहण्यासाठीं राळ लावलेला चौकोनी, वाटोळा लाकडी तुकडा

राळा—पु एक प्रकारचें हलकें तृणधान्य याच्या पांढरा, पिंवळा व काळा अशा जाती आहेत ह्याचा भात वगैरे करितात देशावर गरीब लोक राळ्यावर निर्वाह करतात राळरान-न १ राळ्याचीं ताटें, धेंढा, कणसें तोडल्यानंतरचें ताट, राळे बडविल्या नंतर राहिलेलें गवत २-नष्टी (ल) शिणलेली, पुष्कळ श्रमलेली स्थिति (जिवाचें) राळरान-न मरे मरेतों काम, कष्ट करण्याची स्थिति राळसाळ-स्त्री केरकचरा, उरले सुरले अवशेष, वगळ -वि टाकाऊ, रद्द

राक्षस—पु १ मानुष किंवा अमानुषरूप देवाचा शत्रु कुबेराचा सेवक व त्याच्या निधींचा रक्षक स्मशानांत जाण्या येण्याची रहाळ असणारा मृत शरीरांना सजीव करणारा उग्र पिशाच म्हणून निरनिराळ्या रीतींनीं वर्णिलेला देव किंवा पिशाच असुर दानव, दैत्य २ क्रूर, भयंकर अक्राळ विक्राळ, अजागळ, झोपाळू मनुष्य ३ साठ संवत्सरांतील एकुणपन्नासावा संवत्सर [स ] सामाशब्द-०गण-पु जन्मकाळच्या नक्षत्रावरून केलेल्या देवगण, मनुष्यगण, व राक्षसगण ह्या तीन वर्गांतील शेवटला वर्ग [ स ] ०गणी-वि राक्षसगण असलेला ०मुखी-मोहरा-मोरा-मोहरी-विक्रिवि दक्षिणाभिमुख, दक्षिणेकडे गगमोहरा पहा. [ स ] ०विधि-विवाह-पु विवाहाच्या आठ प्रकारांपैकीं एक प्रकार बलात्कारानें केलेला विवाह, पालकाच्या व कन्येच्या इच्छेविरुद्ध तिचें हरण करणें असा विवाह पहा ‘ परणू पाहे राक्षस विधि । ’ -एरुस्व १२ ६६ [ स ] ०वेळ-वेळा-स्त्री सूर्यास्ताच्या व रात्रीच्या मधील काळ, तिन्हीसांजा [ स राक्षस+वेळ ] राक्षसान्न-न तामस अन्न ( बाजरी, उडीद मसुर, राळा, मिरची इ० ) [ स ] राक्षसी(सी,ण-स्त्री १ राक्षसाची स्त्री २ दुष्ट स्त्री [ स राक्षसी ] म्ह० राक्षसणी पीठ कांडितात घरामध्यें-रानामध्यें-तेथें=पराकाष्ठेचा ओसाडपणा दाखविण्याकरिता योजतात राक्षसी-शी-स्त्री राक्षसाची बायको, राक्षसस्त्री -वि १ राक्षसाच्या संबंधी, राक्षसास योग्य २ प्रचंड, भीम, साहसी, मनस्वी ( कृत्यें ) ३ आसुरी, तामस, अघोरी ( उपाय ) ४ कुत्सित, अयोग्य, जबर ( अन्न, खाणें ) ( समासांत ) राक्षसी-कृत्य-करणी-खाणें-भाषण-घोडा-बाग-मजल-जोर इ० [ स राक्षस ] सामाशब्द- ०अवतार-पु अतिशय क्रूर आणि राकटी मनुष्य ०उपाय-उपचार-पु असुरी, अघोरी उपाय, उपचार ०झोंप-स्त्री अतिशय गाढ व दीर्घ काल झोंप ०दौलत-स्त्री सात्विकपणा, निकाऊपणा नसलेली भरभराट संपत्ति ०धान्य-न बाजरी (कारण हें धान्य हेमाडपतानें लंकेहून आणलें अशी समजूत आहे ) ०पीक-न अतिशय विपुल पीक ०भाषा-स्त्री संस्कृताच्या अपभ्रंशानें बनलेली व नाटकांत राक्षसाच्या, पिशाचाच्या तोंडीं घातलेली, हेंगाडी भाषा ०माया-माव-स्त्री. राक्षसाची माया कपट ०मुलूक-ख-पु नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेश ह्याच्या उलट देवमुलूक ( नर्मदेच्या उत्तरेकडील प्रदेश ) ०विद्या स्त्री राक्षस आणि पिशाच यांस काढून लावण्याची, त्यास ताब्यात ठेवण्याची विद्या ०वेळ-वेळा-स्त्री राक्षस वेळ पहा ०संपत्ति-स्त्री राक्षसी दौलत पहा ०हाड-न दणकट व बळकट मनुष्य राक्षेस-पु राक्षस ‘ कितीयेक राक्षेस ते हाकलीती । ’ -राक १ ४

राज्ञी—स्त्री राणी, राजपत्नी [ स ]

रिआया—स्त्री प्रजा रयत रमत पहा ‘ रिआया व मुजारियान पर्गणे चाकण ’ -रा ६ १५३ [ अर ]

रिकब-बी रिकाबी—स्त्री घोड्यावर बसण्यासाठीं व बसून पाय ठेवण्यासाठीं दोन बाजूंस सोडलेल्या दोन कड्यांपैकीं प्रत्येक [ अर रकाब ]

•रिकवि(वी)णें—सक्रि रिचविणें रिकाम करणें [ स रिक्त प्रा रित्त, रिक्क ]

**रिक्शा, रिक्शा**—स्त्री मनुष्यानें ओढण्याची गाडी ही जपानांत व मद्रास शहरींहि आढळते [जपानी रिक्शा, जपानी रिशा=आगगाडी]

**रिकाड**—न (रेकॉर्ड अप) संग्रह यादी, नोंद [इ रेकॉर्ड]

**रिकाडी**—स्त्री (विणकाम) कापडामध्यें आडवें सूत भर ण्याकरितां सूत गुंडाळलेली कांडी

**रिकाब-बा**—स्त्री आरोहिणी, रिकब-बी पहा [अर] ०दाल-पु रिकबीची वादी, रिकबीचा चामड्याचा पट्टा –वि रिकबीच्या जागीं भोंवरा असणारा (घोडा), हा अशुभसूचक मानितात [अर] ०भावरी-स्त्री रिकिबीच्या वादीचा डाव असतो त्या ठिकाणीं घोड्यांच्या अंगावर असलेला भोंवरा हा अशुभ होय –वि. रिकाबदाल (-वि) पहा ०साट-पु रिकिबी बांधण्याचा दोर

**रिकाबी-बी, रिकेबी**—स्त्री बशी, उंगणाचें ताट 'भोज नास रिकाबा दयाच्या नव्या करविल्या'–पेशवेकालीन महाराष्ट्र ३४८ [अर रिकाबी]

**रिकामका**—वि रिकामा, निरुद्योगी, कामधंदा नसलेला [रिकामा] ०खटाटोप-पु निरर्थक दगदग, फायदा न मिळतां विनाकारण करावें लागलेलें काम, श्रम

**रिकामा**—वि १ ज्यांत कांहीं नाहीं असा, पोकळ 'ही घागर रिकामी आहे' २ (ल) पोकळ, निराधार, पुरावा नसलेला, कोरडा, पुराव्यानें, प्रमाणानें, उदाहरणानें ज्याची सत्यता, यथार्थता सिद्ध करता येत नाहीं असा (वाद, विधान, हकीकत) उदा० रिकामा डौल रिकामी स्तुति ३ ज्या जागेवरील अधिकारी किंवा काम करणारा मनुष्य अद्यापि नेमण्यात आलेला नाहीं किंवा रजेवर गेलेला आहे अशी (जागा) 'ह्या कचेरींत तीन चार कुनाच्या जागा रिकाम्या आहेत' ४ निरर्थक व्यर्थ, निष्फळ, निष्प्रयोजन खोटा (दगदग, पायपिटी, चौकशी बोलणें) 'नको साधु वडिवार रिकामा रक्षुनि नाना परी'–प्रभाकर–लावणी–लक्ष्मीपार्वती संवाद (नवनीत पृ ४१५) ५ जरूर ही सामुग्री, हत्यारें इ० साधन ज्याचे जवळ नाहीं असा 'माझीं हत्यारें सारीं घरीं आहेत, मी रिकामा तुमच्या घरीं येऊन काय करणार?' ६ ज्याला नोकरी, उद्योग–धंदा नाहीं असा बेकार, निरुद्योगी, कामावीण, कधीं रिकामा असू नको।'–अनंतफंदी लावणी (नवनीत पृ४३७) ७ उपयोगांत नसलेली, कामांत न गुंतविलेली (वस्तु गाडी इ०) 'तुमचा चाकू रिकामा असला म्हणजे मला आमच्या द्या' ८ एखादी उद्दिष्ट न साधलेला प्रयोजनशून्य, फलशून्य मी तुला पुढें घालून घेऊन जाणार रिकामा परत जाणार नाहीं' ९ ज्यास कोणी मालक नाहीं असा (देश, मुलूख इ०) 'आर्यांना दंडकारण्याचा प्रदेश रिकामा सापडला' [स रिक्त, रिच=रिकामें करणें] म्ह० रिकामा न्हावी कुडाला (भिंतीला) तुमड्या लावी (वाप्र) ०वसणें–उद्योग नसणें, बेकार असणें, निरुद्योगी राहणें, आळशीपणानें वेळ काढणें 'सहज रिकामे बैसाल घरीं। संसार चाले कैशापरी।' सामाशब्द– **रिकामचावडी-टेकडी**–स्त्री निरुद्योगी लोकांची चकाट्या पिटीत बसावयाची जागा–अड्डा, निरुद्योगी लोकांचा समूह–टोळी–कंपू ०चेष्टा–स्त्रीअव निरुद्योगी माणसाचे चाळे, उपद्व्याप, रिकामपणाच्या खोड्या ०चोट-टवळा-टेकडा-वि (अशिष्ट) निरुद्योगी, आळशी (मनुष्य), उपयोगी न पडतां पडून राहिलेली (वस्तु) म्ह० १ रिकामचोट आणि गावास उपद्रव. २ रिकाम टवळा आणि गावचा होवळा' **रिकामटी, रिकामणूक**–स्त्री सवड, फुरसत, विरामा वेळ, रिकामीक 'पुराणीं बैसतां नाहीं रिकामटी। खेळतो सोंगटी अहोरात्र'। –तुगा ४२३४ **रिकामढंग, रिकामे ढंग**–पुअव रिकाम॰ पणाचे चाळे, निष्फळ उपद्व्याप, निष्प्रयोजन काम. ०पण-पणा–न पु फुरसत, सवड, कामांत न गुंतल्यामुळें मिळणारी सावकाशी, सुटी, रजा, विश्रांति ०वाणा–णी–वि व्यर्थ, फुकट, आळसानें घालविलेले, निष्फळ ०वेळ–स्त्री फुरसतीचा वेळ, सवड **रिकामा ताठा**–पु पोकळ गर्व, पोकळ डौल, मोठेपणाचा खोटा आव म्ह० 'नाकीं नाहीं कांटा रिकामा ताठा'–**रिकामीक**–स्त्री रिकामपण, फुरसत, सवड **रिकाम्या पोटीं**–क्रिवि अन्नशापोटीं, जेवण्यापूर्वी **रिकाम्यारानीं–णी**–क्रिवि विनाकारण, फळाची आशा किंवा संभव नसतां 'तुमचें तिकडे कांहीं का होईना? मला काय त्याची पंचाईत? रिकाम्या रानीं मी कशाला आपल्याला त्रास करून घेऊ?' (ज्यांत जनावरें नाहींत अशा रानांत शिकारी जात नाहींत यावरून वरील प्रयोग) **रिकाम्या हातानें**–क्रिवि आणावयाची वस्तु न आणता, रिक्त हस्तानें **रिकयामी**–वि (गो) रिकामा 'हाव रिकयामी ना'

**रिकिबी, रिकीब**—रिकब पहा ०दार–वि रिकेबदार, रिकाबी धरणारा रिकिबीस धरून पळणारा (सेवक) **दर रिकेबीस**–क्रिवि पुनःपुन्हा, वारंवार, वरचेवर (वाईट गोष्टीविषयीं उपयोग)

**रिक्त**—वि १ रिकामा, रिता, पोकळ, मोकळा, कोरडा २ (ल) विहीन, (जवळ नाहीं) नसलेला, वियुक्त [स रिच्=रिकामें होणें] ०अवकाश-स्थळ–पुन पोकळी, हवा किंवा दुसरा कोणताहि पदार्थ नसलेली जागा (इ) व्हॅक्यूम ०कोष्ठ-न अन्नाश अगर मलाश ज्यांत नाहीं असें पोट किंवा कोठा, मोकळें, साफ पोट [स] ०पाणी-हस्त–वि रिकाम्या हाताचा; हातांत कांहीं एक देणगी देण्यास न घेतां जाणारा, हात हालवीत

जाणारा 'रिक्तपाणिनं पश्येत राजानं देवता गुरुम्।' 'रिक्त पाणि दरुशन। सोसेना कि मनातून।'–ज्ञानप्र दीप ६१८. [रिक्त+ पाणि=हात] ०भाषण–न खोटें बोलणें, खोट्या उठावण्या, पोकळ आश्वासन, खोटें वचन, वल्गना वडवड ०मध्य प्राणी–वि ज्याच्या शरीरात पोकळी असते अशी एक प्राण्याची जात-वर्ग, (इं) सिलेंटेरा या पोकळीला शरीरविवर असें नव आहे –प्राणिमो १३९ रिक्ता, रिक्तातिथी–स्त्री शुक्लपक्षातील चतुर्थी, नवमी आणि चतुर्दशी या तिथी

**रिक्थसमभाग**—पु (कायदा) सारखा वारसा [स रिक्थ=वारसाहक्क+समभाग]

**रिखाटा**—पु सोट, विनफांदीचें झाड 'रिखाट्यासारखे दोन जीव'–भा ७

**रिंग**—स्त्री १ आगठी २ वळें, कडी, कडें, वसवी, मुदन, इ० कोणतीहि वर्तुलाकार वस्तु [इं] **रिंगण**–न रिंग, वर्तुला कार जागा, सर्कशीतील खेळ करण्याचें वर्तुलाकार स्थान, रगण **रिंगोळी**–स्त्री (चानारी धदा) रिंग टोचण्याचें हत्यार

**रिंगण**—न मुलाचें रागणें, सरपटणें, घसरणें, सरकणें [स रिंगु=जाणें, हालणें] ०चेंडु–पु पाच किंवा त्याहून जास्त गड्यानीं चेंडूनें खेळावयाचा एक खेळ –मखेपु ५८

**रिंगणा**—पु (ना) शाव्

**रिंगणा**—पु (इमारतकाम) घराच्या तातऱ्याच्या खालची व खावाच्या आधारावर असलेली रावणी लहान तुळई कडी

**रिंगणी**—स्त्री एक कांटेरी औषधी रोपटें ही पित्तशारक, अग्निदीपक, मल्भेदक व वातनाशक आहे –योर १४२ [दे प्रा रिंगिणी, हिं रेंगनी, गु वे भा रिंगणी] **रिंगणमूळ**–न रिंगणीचें मूळ हें औषधी आहे

**रिंगणी, रिंगी**—स्त्री १ रिठ्याचें झाड २ रिठा (फळ) हीं फळें साबणाप्रमाणें कपडे इ० धुण्यास उपयोगी पडतात **रिंगणें, रिंगी, रिंगणें,**–न रिंगीचें फळ, रिठा (कु) रिंग्या

**रिंगणें**—न लहान मुलाची तोंडात घालून चोखण्याची वस्तु चोखणी

**रिगणें, रिंगणें**—अक्रि १ रिघणें, शिरणें, प्रवेश करणें 'चापेआचभा सेजरातु। रीगता झाला।'–शिशु १७६ २ उद्युक्त होणें तयार होणें 'वृक्ष जेणें प्रतिपाळिला। तो त्या आधीन जाहला। वा जो छेदावया रिगाला। त्यासही वाला स्वाधीन।'–एभा ७ ३६४ [स रिंगु=जणें हालणें] **रिगम-मु, रिगु गू, रीग**–पु रिघाव, प्रवश अवकाश, शिरकाव (गो) रिगवो [द रिग] **रिगवणी रिगवणें**–न १ प्रवश २ आरंभ 'झालिया वसनाचें रिगवणें। वृक्ष सपुष्प सफळ तणें।' –एभा १६ ७२ **रिगनिग, रिगिनिगी, रिग्रीनिघी**–स्त्री. ये जा, येणें जाणें, जा ये 'पै प्राणाची अंतौरी। क्रियाशक्ति जे शरीरीं। तियेचि रिगिनिगी द्वारीं। पाचें द्दीं।'–ज्ञा १३ १०२. [रिगणें+निघणें] **रि(री)गा(घा)वा**–पु १ प्रवेश, रीघ, रिघाव, प्राप्ति 'मग ब्रह्मसाक्षात्कारीं रीगावा। तुज मी करीन।' –भाए २१२ २ प्रारभ, सुरवात 'तयापरी पाडवा। जया सुराचा रिगावा।'–ज्ञा १८ ७८१ **रिगुंक, रिगौंक**–क्रिवि (गो) प्रवेश होण्याला, शिरण्यास

**रिंगण्या**—पु (व) ज्यानें वैल लगड लागतो असा एक वातविकार

**रिंगरिंग जाणें-करणें**—क्रि (कुण) हळु हळु जाणें, अतिसावकास चालणें [स रिंग-हालणें]

**रिंगरिंग**—स्त्री (ना) लहान मुलाची पिरपिर

**रिंगळुं**—न (गु) वागें

**रिंगी**—स्त्री (ना) दोन बैलाची लहान गाडी, रेग्ला ह्यात तीन माणसें बसू शकतात याला तट्याचा टप असतो [स अनुरगा=गाडी]

**रिघणें**—अक्रि १ दाटीमध्यें किंवा अडचणीच्या जागेमध्यें बळानें प्रवेश करणें, शिरणें, घुसणें २ जाणें, निघणें, आत जाणें 'प्रभुच्या पाठीसीं तदनुजाश्रय रिघाला।'–मोकी ३ ५६ ३ सुरण, रताळें इ० कद जमिनींत मोठें वाढणें पोसणें, घरणें ४ घडणें, घडून येणें **रिघणी**–स्त्री रिघाव, प्रवेश **रिघिनिघी, रिघनिघ**–स्त्री रिगनिग, जाय, येजा **रिघाव-वा**–पु शिरकाव, प्रवेश, वाट, मार्ग 'वीं तस्करीं होता घरात रिघावा। त्यासहि प्रकाश देई जैसा दिवा।'–नव १६ १६४ **रिघू, रीघु**–पु १ रिघाव, प्रवेश २ समज ज्ञान 'गर्वाभिमान्या न होय रीघु।'–दावि ३८३ **रिचेरिचे**–क्रिवि हृद्‍हळू, सावकाश

**रिचवणें, रिचावणें**—अक्रि १ ढासळून पडणें, कोसळणें, तुकडे तुकडे होऊन पडणें (रास, ढीग, भिंत विहीर इ०) 'हीं भांडीं नीट एकावर एक ठव न हीं तर रिचवतील' २ जोरानें किंवा वेगानें (पाऊस, झाडाचीं पानें किंवा फळें, पोत्यातील धान्य, जखमेंतून रक्त इ०) गळणें, वाहेर पडणें, वाहणें, उसळणें 'दवेंद्र जैं रिचवलाच बलाहकातें।'–र ६० ३ अजीर्णांश जोरानें बाहेर येणें (ओकारीच्या रूपानें किंवा मळाच्या रूपानें), ४ जोराचा रच किंवा वाती होणें ५ (विनोदानें) घोड्यावरून पडणें [स रिच]

**रिचविणें रिचाविणें**—सक्रि १ (एखाद्या वारदानातील चिन्नम ओतून तें) रिकामें करणें, ओतणें खाली करणें, वाहेर काढून टाकणें २ आदळणें, रागानें फेकणें, आपटणें, बाजूस फेकणें, नजरेआड करणें ३ सांडविणें, ढीग करणें, भरणें, (रिकामें

करणें याच्या उलट अर्थे ) धान्य पोत्यांत भरणें, सांठविणें. ४ मिळून करणें; दावणें; दपटणें. ' कडब्याच्या व सांडाच्या गाडया त्यांना फुकटांत रिचविता आल्या.' –खेया. [ सं. रिच्= रिकामें करणें ] रिचवणी–स्त्री. रिकामें करणें, रितें करणें.

रिञ्छोली–स्त्री. पंक्ति; ओळ. –मसाप २.६८.

रिज–स्त्री. रीझ; कृपा; मेहेरनजर. ' दुर्बळ ब्राह्मणावर फार त्याची रिज.' –ऐपो १३८. [ दे. ]

रिजणें, रिजाऊ–रिझणें, रिझाऊ पहा.

रिजाला–वि. नीच; हलकट, क्षुद्र; हलक्या मनाचा. [अर]

रिझक–वि. रिझाक पहा.

रिझणें–अक्रि. संतोष पावणें; समाधान होणें; आनंदित होणें; संतुष्ट होणें; रंजन होणें. ' संजयो म्हणे कौरवराया । गुणा रिझों ये रिपुन्चिया ।' –ज्ञा १७.४२७. [ सं. ऋध्; प्रा. रिज्झ; हिं. रीझना ]

रिझव(वि)णें–सक्रि. संतुष्ट करणें, रंजविणें; आनंदित करणें; समाधान देणें ' हे रिझवितील आयणीतें । सज्जानांचियें ।' –ज्ञा ६.४५५. [ रिझणें ] रिझाऊ–वि चित्तरंजक; रम्य; मोहक; पसंत पडण्यासारखें, आनंददायक; सुखकर. [रिझणें] रिझाक, रिझक–वि प्रिय; प्रियकर, आवडता; रिझविणारा. ( लावण्यांत व पोवाड्यांत ह्या शब्दाचा उपयोग केला आहे ).

रिझला–वि. नीच रिजाला पहा.

रिठा–पु १ रिंगें, साबणासारखें कपडे धुण्याच्या कामीं उपयोगी पडणारें एक फळ याचें पाणी विषनाशक आहे (गो.) रिठो. २ या फळाचें झाड [ सं अरिष्ट, रिष्ट, प्रा. रिठ्ठ ] रिठी–स्त्री. रिठ्याचें झाड. रिठें–न. रिंगें, रिठा ( फळ ). रिठेमाळ–स्त्री. रुद्रमण्याची माळ. ( रिठ्याच्या फळांत जी काळी व कठिण बी असते तिचे थजरबट्टु अथवा रुद्रमणी करतात ). ' मग रिठासुर तो मायावी । गुंफिली रिठेमाळ अति बरवी ।' –निगा ११.

रिठा–पु एका असुराचें नाव

रिठोळ–पु टोळ, सोटगैरव; उनाड किंवा उच्छृंखल मनुष्य ' रिठोळाच्या संगतींत राहतोस हें बरें नव्हे. '

रि( री )ण–न देणें, कर्ज, ऋण समर्थी प्राणसमर्पण करुनि तुझें फेडिलें नृपा रीण ।' –मोकर्ण ३ १८. [ स. ऋण, प्रा. रिण ] ॰कार ॰करी–वि. १ धनको, सावकार, ऋणकरी. ' तुका म्हणे चरीं । बहु चेंपले रिणकरी ।' –तुगा ५७१. २ कर्जदार; रिणको, कर्ज घेणारा. ॰ग्रस्त–वि. कर्जदार, कर्ज काढणारा, कर्जांत बुडालेला. ' आळसी खादाड रिणग्रस्त ।' –दा १२.९.१. [ सं ऋण+ग्रस्त ] ॰दार–वि कर्जदार; ऋणको. ॰फेड–स्त्री. कर्जफेड, कर्जांतून मुक्तता, सुटका. ॰वोड–वोडया–वि कर्जांत बुडलेला ' रिणवोड्या हरी जाणतोसी मुळीं । तुजमी निराळीं होतों का रे ।' –व ४८६. [ ऋण+बुडणें ] रिणको, रिणकोनाम–वि. कर्ज घेणारा. धनको पहा. रिणाईतस्वरूपी, रिणायत–स्वरूपी, रिणायीतस्वरूपी, रिणानुबंध, रिणी–ऋणानुबंध ऋणाईत इ० पहा

रिता–वि. १ पोकळ; मोकळा. २ रिकामा ( सर्व अर्थ–विशेषत. पहिले पांच अर्थ ) पहा. ३ ( काव्य ) वांचून; विरहित; गरज किंवा कमतरता असलेला. ' चतुर मी जालों आपुल्या भोंवता । भावेंविण रिता स्फुंद अंगीं ।' –तुगा २०१९. [ सं. रिक्त ] ॰भरला–वि. होय नाहीं; केलें किंवा न केलें; असा लगा; सरावाईद; बरोबर किंवा चूक. ' जें काम मी सांगितलें त्याचा जाब मला रितावरला यावयाचा होता ' रिताड–स्त्री. १ माल, टाकून रित्या झालेल्या गाडया, बैल, तट्टें इ० २ –न. रहाटगाडग्यावरील रिकाम्या लोटयांची माळेची बाजू. ३ स्त्री. रिकामें असण्याची स्थिति. याच्या उलट भरताड. रिति–ती–वि. रिकामी; मोकळी; व्यर्थ. रिकामा पहा. रितें–वि. १ रिकामें; पोकळ. २ ( गो. ) सहज. ' हांव रितें आयलें ' =मी सहज आलें होतें ' ॰सोप–वि. निरर्थक. रीतहाती–स्त्री. ( महानु ) हातात काकणें नसलेली; विधवा. ' आता वेल्हाळ वेघवती । जाली रीत हाती ।' –भाए ९२. [ सं. रिक्त+हस्त ]

रिती–तु–स्त्री. चाल; प्रकार. रीत पहा. [ सं. रीति ]

रिद्धि–स्त्री. १ संपत्ति; समृद्धि; ऐश्वर्य. २ स्वाभाविक सिद्धि; पूर्वतप साध्य सिद्धि. [ सं ऋद्धि ] ॰सिद्धि–स्त्री. रिद्धि आणि सिद्धि नावाच्या गणपतीच्या दोन दासी ( संपत्ति व परिपूर्णता यांच्या दर्शक ) ' रिद्धिसिद्धि दारीं सदा बोळंगति । सकळ संपत्ति सर्वांघरीं ।' ( परसाव्याच्याघरीं ) ॰पाणी भरणें–( एखाद्याची ) संपत्ति आणि दशा भरपूर असणें. रिद्धि आणि सिद्धि या दासी प्रमाणें कामें करतात अशा तऱ्हेचा नशीबवान् असणें.

रिद्धी–स्त्री. ( व. ) वृद्धि; सोयर; जननाशौच. [ सं. वृद्धि ]

रिपट–टें–न. ( व. ) यालिपीठ, ल्हान पानगा.

रिपरिप–स्त्री. १ पिरपिर; कटकट, एकसारखें मागत राहणें, दुखणाइताची कुरकुर, निकडीची भुणभुण २ सारखें दोष देत राहणें, धमकीवजा वडबड; टकळी. ३ पावसाची झिमझिम, झुमझुम. ( क्रि० लावणें, लाडणें, करणें ) [ ध्व ] –क्रिवि पिरपिर; किरकिर, झुमझुम, गुरगुर.

रिपाड–र–पुन. छपराचें ओंधण, कांबी, भितीचें कूड. [रीप]

रिपु–पु. शत्रु, वैरी, दुष्मन्, अरि. [ सं. ] रिपुंजय–वि. शत्रूला जिंकणारा, शत्रूवर जय मिळविणारा. [ सं. रिपु+जिंकणें ]

रिपेअर, रिपेर–स्त्री. डागडुजी, दुरुस्ती. [ इं. रिपेअर ]

रिपोर्ट, रिपोट, रपोर्ट–पु इतिवृत्त; अहवाल; बातमी; हकीकत; खालच्या अधिकाऱ्याकडून वरच्या अधिकाऱ्याकडे

जाणारी कैफियत 'त्याच्या तक्रारी ऐकून घेऊन त्यावर रिपोर्ट करण्याकरितां एक कमिशन नेमण्याचा विचार आहे '–आगर ३.४६९ [इ रिपोर्ट] रिपोर्टर–पु बातमीदार, निवेदन करणारा, माहिती सांगणारा [इं ]

रिफाक्त—स्त्री सारा मैत्री, स्नेह 'तुम्ही रघुनाथ नयांची रिफाक्त सोडून दणें –ख ७ ३५६९ [अर रफाक्त]

रिफाहत—स्त्री स्वस्थता –आदिलशाही फर्मानें [ फा ]

रिबडी—स्त्री (नगरी) आमटीची रबडी, घट्ट आमटी; चिखलासारखा दाट पदार्थ

रिबाड—न (राजा कुण ) चिखल

रियाज—पु रोजह, वागा –आदिलशाही फर्मानें [अर रोम्रा अव ]

रियात—स्त्री रीत, मार्ग, रीति, रयात पहा 'रियात करून घ्यावयाची '–बाडबाबा ३ २३७ [फा रिआयत]

रि(री)याती—स्त्री (रयत शब्दाचें अनेकवचन) प्रजा 'रियाती आहत याजकरितां निदान वेचाळीस हजाराची जागा घेणें '–बाडबाबा १ ६४

रियासत, रियापत—स्त्री १ राजवट, राज्य, सत्ता २ राज्यविस्तार [फा रियासत]

रिवरिवणें, रिवरिव—रवरव ६० पहा

रिवाज—पु रूढी, चाल, शिरस्ता, वहिवाट, रीत, प्रकार, तऱ्हा, पद्धत [अर रिवाज्] ०पडणें–प्रचारात येणें, रूढ होणें

रिश्ते(श्ते)दार—पु (व) नातेवाईक आप्त, सबधी [हिं]

रिश्वत—स्त्री लाच 'भवानीपताच्या मार्फत दहा लक्ष पावेतों रिश्वत घेऊन हगामा होऊ दिला नाहीं '–परमव ६८ [अर रिश्वत]

रिषी—पु (ताम्रपट) ऋषि –शक १०१६ चा शिलाहार ताम्रपट

रिश्क—पु जाच, जुलूम [अर ]

रिस—स्त्री राग, क्रोध, चीड, त्रास [हिं, स रोष]

रिसीक–पु (कु) छल्क

रिसाड—वि १ घाणेरडा, ओंगळ २ आळशी

रिसाल—पु कर्तव्य, काम, पत्र धाडणें, पुस्तक प्रबध, ल्हान टापू [अर ]

रिसालतपनाह—पु भविष्यवादित्वाचें आश्रयस्थान –आदिलशाही फर्मानें [फा ]

रिसाला—पु १ घोडदळ, घोडेस्वाराची पल्टण, स्वाराचें पथक (साधारण १०० जणाचें) २ सरजाम, सामुग्री 'त्यात साल मजकुरीं तोफा, बाण, जेजला याचा रिसाला बहुत तयार करविला '–ख ८७५ [अर रिसाल] रिसाल(ले)दार–पु रिसाल्याचा मुख्य अमलदार [अर ] रिसालदारी–स्त्री घोडदळाचें आधिपत्य

रिसीट—स्त्री पावती, पोंच [इ ]

रिसीव—वि श्रेष्ठ –मनको

रिसीव्हर—पु धणारा, वादातील मिळकत किंवा दिवाळें निघालेल्या मनुष्याची मालमत्ता आपल्या ताब्यात घेऊन तिची व्यवस्था लावण्याकरिता कोर्टानें नेमलेला मनुष्य [इ ]

रिस्त—स्त्री रसद पहा

—स्त्री १ गायनातील स्वरसप्तकापैकीं दुसरा स्वर २ मुख्य गायकाचें गायन चाललें असता त्याचा हस्तक किंवा साथीदार त्याच्या मागोमाग त्याचेच सुर म्हणत जातो ते (क्रि० नेणें, धरणें, ओढणें) [ध्व ] ०ओढणें–१ दुसऱ्याच्या सुरात सुर मिळविणें २दुसऱ्याच्या म्हणण्यासारखेंच म्हणणें, पुनरुच्चार करणें

रीग-घ—स्त्री रिगवणी, रीघ रीघावा, रिगणें, रिघणें पहा

रीगवेद—पु (प्र) ऋग्वेद पहा

रीगावी—स्त्री (महानु)प्रवेशद्वार 'पूर्वाभिमुख रीगावी।' –ऋ ११५ [रिगणें]

रीज—स्त्री रीझ पहा.

रीझ-ज—स्त्री १ करमणूक, आनद, रंजन २ आवड, पसति, प्रीति, कृपा, खुशी, अगत्य 'त्या पानशावर रावसाहेबाची रीझ।'–ऐपो २८२ [स रजन, हिं रीझ] ०बूज–स्त्री सुखसमाधान

रीठ—न (ना व) १ बखळ, पडक्या घराची जागा, पूर्वी वस्ती असलेली परतु सध्या नसून ओसाड पडलेली जागा २ ओसाड व मोडकळीस आलेलें घर, घराचे भग्नावशेष (वाप्र) रिठावर दिवा लागणार नाहीं–नि सतान होऊन घर पडून त्याचें रीठ होईल व तेथें कोणीहि घर बाधणार नाहीं

रीठा—पु रिठा पहा रीठी–स्त्री रिठ्याचें झाड

रीढकास्थी—स्त्री पाठीच्या कण्याचीं हाडें, मणके [रीढक+अस्थि]

रीत—स्त्री रीति, प्रघात, मार्ग, पद्धत, चाल, वहिवाट [सं. रीति] म्ह० (व) रीत वाटली म्हणून जात थोडीच वाटली ०पाडणें–वहिवाट घालणें, नवीन चाल पाडणें, प्रघात सुरू करणें ०भात-भात–स्त्री रीतरिवाज, चाल, वहिवाट, प्रघात [रीत+भात] ०रवेस–पु १ चाल, रीत, पद्धत वागणूक 'परतु राजानें माझी रीतरवेस पाहून किल्ल्याची देखरेख मात्र करावी '–बाळ २ ६३ [स रीति+फा रवेश] ०सर–वि सशास्त्र, रीतीला अनुसरून, वहिवाटी–रूढीप्रमाणें

रीति—स्त्री १ पद्धत, तऱ्हा, वहिवाट, प्रचार २ सवय, चाल, सराव ३ रिवाज, शिरस्ता, लोकरीति, रूढी; चालरीत,

एखाद्या ठिकाणची वहिवाट ४ (साहित्य) लेखनप्रकार उदा० वैदर्भी, मागधी इ० 'वैधर्भी तरि मागधी स्फुरु अम्हां येवोत रीति अशा।' –रुम १२२ [स रीति; री–चालणें, हालणें] ºइ० सरळ रीतीचा अडळ कृतीचा ºभूत–पु (व्याकरण) भूतकाळचा एक प्रकार क्रिया सतत चालली होती असें हा काळ दाखवितो उदा० करीत असे याचप्रमाणें रीतिवर्तमान व रीतिभविष्यकाळ जाणावे ºस्थिति–स्त्री चालरीत, वागणूक, आचार विचार, वर्तन व परिस्थिति 'त्याची रीतिस्थिति चांगली आहे'

रीति—स्त्री रिता भाग, न्यूनता, कमीपणा 'ब्रह्मसमन्वें पाहतां पाहीं। स्थावरजंगमाच्या ठायीं। तिळभरी घाडी रीती नाहीं। आपण पैं पाहीं वोंदला।' –एमा ७ ४३६ [सं रिक्तता]

रीप—स्त्री ओंवण करण्याकरितां लाकडाच्या वेलेल्या पट्टयां पैकीं प्रत्येक, तर्फे उभे चिरून चारचार बोटें रुंदीच्या (वाशांवर मारून ओंवण करण्याकरिता) केलेल्या पट्या, ओंवण, पांजरण

रीफ—पु कठडा –मसाप ३ ७६

रीम—न कागदाचे वीस दस्ते (चोवीस कागदांचा एक दस्ता याप्रमाणें) ४८० कागद [पोर्तु रेमा, इं रीम]

रा री करणें—रेंगाळणें, सावकाश, मदगतीनें चालणें 'त्याच्या जवळ एवढें मोठें सैन्य असुनहि वेढयाचें काम रीरीच चाललें होतें' –स्वप ४४४

रील—न सूत गुंडाळण्याचें चक्र, रीळ, बावीन [इं]

री(रीं)स—पुन १ अस्वल 'मी काय आहे वृकव्याघ्र रीस। –शिली २ (ल) आळशी, घाणेरडा मनुष्य, ओंगळ, मूर्ख माणूस [स ऋक्ष]

रीस—स्त्री १ अपराध, गुन्हा चूक २ असंतोष, गैरमर्जी, राग ३ त्रास, कंटाळा, तिटकारा 'कसाईस मोल येथें नका रीस मानूं।' –तुगा ३३५ ४ (व ना) किळस, वीट, शिसारी ५ (गो) भय भीति [स रोष]

रीस—स्त्री विराणी, आगीचा प्रसार होऊ नये म्हणून भोंव तालची जाळलेली जागा, ईर –बदलापूर २८५ [ईर, स वीर्य]

रीसी—स्त्री मूळव्याध –वैद्यकबाद ४६ [स अर्श]

रीळ—न दोऱ्याचा गुंडा दोरा गुंडाळण्याचें साधन रील पहा

रु०—(संक्षेप) रुपये

रुई रुइ—स्त्री १ एक झाड, अर्क वृक्ष २ निवडून सरकी काढून स्वच्छ केलेला कापूस पिंजलेला कापूस 'याशिवाय रुई वगैरेचा व्यापार चालतो' –विक्षिप्त १ २५ [हिं रू] ºदार–वि कापूस भरलेला ºफूल–न १ रुईचें फूल २ रुईच्या फुला सारखें वस्त्रावर अगर दागिन्यावर काढलेलें फुलाचें चित्र आकृति ºफूलकाठ पु रुईच्या फुलासारख्या आकृती असलेला वस्त्राचा काठ, किनार ºफुलकाठी–वि रुईफुली काठाचें ºफुली–वि रुईच्या फुलासारख्या नक्षीचा ºमादार–पु पांढरीं स्वच्छ फुलें येणारी रुईची एक जात, याला मादाररुई असेंहि म्हणतात

रुइ—पु रोही, नीलगाय 'पळे जवुका स्वार मृग थडकले रुई।' –ऐपा ४३४ [स रोहित (मृगविशेष) –रोहिअ–रोही–रुई–भाअ १८३३]

रुई—स्त्री योग्य रीत, रूढी, प्रकार, मार्ग, रिवाज, शिरस्ता, शिस्त, चाल, वहिवाट 'वाजवीचें रुईनें अमल करून रयेत अबाद राखणें' –वाडसमा ३ १२४ [फा. रूय्] रुईचा–वि रीतसर, योग्य रीतीचा, लोकमान्य रुईस येणें–रीतीस येणें, प्रघात पडणें, रूढीस अनुसरून असणें, जमणें

रुईखुई—क्रिवि कसावसा, कष्टानें, सायासानें 'आताच दुख ण्यातून तो रुईखुई उठला आहे'

रुईरयात, रुरयात—पु भीडमुरवत 'तुम्ही हरदूवाधास जाणून याचा त्याचा करिना मोकरगाव व जमीनदार दोन्ही महा लचे मेळवून कोण्हाची रुईरयात (रुरयात) न करिता वाजवी मनास आणून' –वाडमा २ १९५

रुकरुक, रुकसत—रुखरुख, रुखसत इ० पहा

रुकशाग—स्त्री बाडगूळ, आम्न्यावर वाढणारी वनस्पती [स वृक्षाग]

रुकसत, रुक्सत—स्त्री रजा, रवानगी 'कितेक सरदार वगैरे यास आपआपले स्थळास रुक्सत केले' –पेद १२ [अर रुख्सत]

रुका रुक्का—पु १ पै आण्याचा बारावा भाग २ जमीन मोजण्याचें एक परिमाण हें अडीच विघ्यापर्यंत (२॥ ५, ८, १०, २०) निरनिराळया ठिकाणीं निरनिराळें आहे ३ पत्र, रोखा, पत्ता, चोखट, यादी 'बादीचा रुका' –रा ७ २०४ 'रुक्या प्रमाणें सामान तपासून' –ऐरापुप्र २ १४० ४ सोनें, द्रव्य, धन 'तत्काळ सिद्ध तो करि हरि हरि जैसा सदा रुका सवदे।' –मोशांति ६ ५१ ५ अर्धा आणा –इम ४५ [अर रुक्आ, तुल० स रुक्म=सोनें] ºअडका–बिस्वा–पु पैसा अडका, संपत्ति 'तथापि रुकाविस्वा मिळेना।' –गीता २ २१६५

रुकार—पु १ समति अनुमति, परवानगी, होकार (क्रि० देणें) २ समतिलेखाची नक्कल केल्यावर रुजवात घेतल्याबद्दल रु अक्षर लिहून केलेलें चिन्ह [रुजवात घेणें यांतील पहिल्या अक्षरावरून] रुकारणें–अक्रि १ समति देणें, दाखविणें, पसंति दर्शविणें २ –सक्रि हो म्हणणें अनुमति देणें

रुकावट—स्त्री प्रतिरोध अडथळा विरोध, प्रतिबंध अट वणूक [हिं रोकना] ºसे–क्रिवि थांबून थांबून

**रुक्न**—पुस्त्री १ साव, आधार मदत २ उमराव राज्याचा आधारस्तभ; एक पदवी 'रुक्नुद्दौला' ३ कवितेचा चरण [फा रुक्न=स्तभ]

**रुक्म**—न सुवर्ण, सोनें 'दासी शत दासहि शत आठ गदा नाग रुक्मरथ सोळा।'–मोउद्योग ७२ [स] ०**पुंख**-वि सोन्याचें पुच्छ, पिसारा असलेला (बाण) 'रुक्म पुंख सरले।' –कृमुरा २५५४ **रुक्मांभ**-वि सोन्यासारखी कांति असलेलें 'रूप रुक्मभ सकाश।' –गुच ३६ ३८८

**रुक्मिकेली, रुक्मबाहु, रुक्मरथ**—विनापु रुक्मिणीच्या भावाचीं नावें 'तैसे रुक्मिकेली रुक्मबाहू। दोघे भाऊ दोहींभायी।' –एरुस्व ९ ६०

**रुक्मिणी**—स्त्री कृष्णाची पट्टराणी. **रुक्मिणीसुत**-पु मदन

**रुक्वाना**—क्रि अडवळा करविणें [रोखणें]

**रुख**—स्त्री इच्छा, रोख [हिं]

**रुख, रुंख, रुखा**—पु १ झाड, वृक्ष 'वाटतें रुखावरी चढोनि।' –दावि १३ २ खोड, फांद्या तोडलेलें झाड, बोडकें झाड, खोडाचा खालचा भाग ३ रहाटगाडग्याच्या कनेकडाचीं टोकें ज्या दोन आडव्या लाकडावर टेंकलेलीं असतात त्यापैकीं प्रत्येक [स वृक्ष, प्रें जि रुक] **रुखराए**-ये-पुअव १ (महाद्रु) मोठीं झाडें, थोर वृक्ष २ अश्वत्थ, पिंपळ 'तैसें रुखराए पाझिरैले। अतराळीं।' –शिशु ६१७ [स वृक्षराज] **रुखा(खां)डी-डवा, रुखी, रुख्या**-वि झाडावर चढण्यात पटाईत नेहमीं झाडावर चढणारा [रुख, स वृक्ष] **रुखाडुं**-न ताडावर किंवा माडावर चढणारा पायाला दोरीचा घालतो तो फासा, पायडा [रुख] **रुखाळू**-न झाडावर वाढणारें एका जातीचें अळू [रुख+अळू]

**रुख**—पु १ तोंड, चेहरा २ बाजू दिशा, बिंदु –सक्रि रोखणें, अडविणें [हिं] ०**घेणें**-(ना) तोंड देणें

**रुख**—पु बुद्धिबळातील हत्ती [इ रुक]

**रुखणें**—अक्रि रागें भरणें, रागावणें [स रुष्]

**रुखत**—न (खा) रुखवत

**रुखय**—स्त्री (कों) एका जातीचा साप हा बहुधा झाडावर आढळतो [स वृक्ष]

**रुखरुख**—स्त्री चिंता, टोंचणी, (एखादी वस्तु हरविली असता किंवा दुष्टाऱ्याची अगर मूर्खपणाच्या कृत्याची आठवण झाली असता होणारा) पश्चात्ताप, चुरपुट, चटका, हुरहुर, खेद [ध्व]

**रुखरुखित**—वि ओसाड, रखरखीत [वृक्षरहित]

**रुखवत**—न लग्नात नवरा मुलगा वधूच्या घराकडे लग्नासाठीं जाण्यापूर्वी वधूपक्षाकडून वराच्या घरीं त्याला व त्याच्या स्नेह्यांना जो उपहार देण्यात येतो तो, किंवा असा उपहार देण्याचा समारंभ (क्वचित् हा समारभ वरप्रस्थानानतर वधूमंडपातहि करतात) २ अशा प्रकारच्या फराळाची सामुग्री, सामान [फा रिश्वत्=लाच, रुश्वत्=लगणी]

**रुखसत, रुख्सत, रुखस्त**—स्त्री १ रजा, सुटी २ परवानगी, निरोप, सोडवणूक ३ विरोध –वि रवाना केलेला, पाठविलेला, सोडलेला, मोकळा, कामावरून काढलेला [अर रुख्सत]

**रुखा**—वि १ रुक्ष, नीरस, वचव, शुष्क, कोरडा, अस्निग्ध (भक्ष्य पदार्थ) २ ओसाड, वृक्षरहित व जलशून्य, रखरखीत, भयाण (प्रदेश) ३ कठोर, निर्दय, मायाविरहित (बोलणें, भाषण) ४ कर्णकटु घोगरा, कानाला गोड न लागणारा, बेताल (आवाज, स्वर, गाणें इ०) [स रुक्ष]

**रुखें रुखें**—क्रिवि (व) कोरडें; वेचव, रुक्ष [रुण]

**रुखा**—पु जडयाचें हत्यार –शर

**रुखो**—पु (गो) पिपासारखें उच लाकडाचें भाडें ताक ठेवण्याकरितां याचा उपयोग करितात

**रुखसार**—पु गाल –आदिलशाही फर्मानें

**रुगरदा, रुगर्दा**—पु कापूस भरून केलेला तस्या –वि कापसानें भरलेली (उशी, गिरदी, इ०) [रू+गर्दा]

**रुगणें**—अक्रि (व) मदावणें, रेंगाळणें 'विहिरीचें काम रुगतच चाललें आहे' [रेंगाळणें]

**रुगळणें**—अक्रि बारीक होणें, कृश होणें, वाळणें, उतरणें

**रुगाळा**—पु कृशता, क्षीणता, काटकुळेपणा, किरकोळपणा, किडकिडीतपणा –वि १ कृश, बारीक, किरकोळ, पातळ २ काटकुळा, सडपातळ, किडकिडीत

**रुगु**—पु (निंदार्थी) ऋग्वेदी (हा शब्द यजुर्वेदी ब्राह्मण ऋग्वेद्यास उपहासार्थी लावतात) [ऋग्वेदी]

**रुगें**—न रुपें –शर

**रुग्ण-ग्न**—वि रोगी, रोगग्रस्त, आजारी [स रुग्ण, रुज्=दुःख होणें] ०**दंत**-वि किडक्या दाताचा, किडके दात असलेला ०**परिचर्या**-स्त्री रोग्याची शुश्रूषा, रोग्याची चाकरी ०**परिचर्यापथक**-न रोग्याची शुश्रूषा करण्याकरिता उभारलेलें पथक, (इ) अॅम्ब्युलन्स कोर 'काँग्रेसचीं रुग्णपरिचर्यापथकें मोटारींतून हिंडू लागलीं' –क १४ ६ ३० **रुग्णालय**-न आजाऱ्यांना ज्या ठिकाणीं ठेवून औषधोपचार केले जातात असें घर, (इ) हॉस्पिटल [स रुग्ण+आलय]

**रुच**—स्त्री रुचि, चव, गोडी –न (कुण) मीठ –वि रुचकर [स रुचि]

**रुचक**—न एक आल्कली -मराठी ६ वें पुस्तक २ री आवृत्ति १८७५) पृ १६२ -वि रुचकर, स्वादिष्ट

**रुचकर**—वि रुचिकर, स्वादिष्ट, मधुर, चवदार [स रुचि]

**रुचकी**—वि रुचेचा-ची-चें 'पव्वसाची कीं रुचकी पानें।' -दावि १८०

**रुचणें**—अक्रि १ आवडणें, गोड लागणें; 'ध्यान रुचो प्रभुचेंचि जसें रुचतें शिशुन्त्या पय अन्न मनातें।'-मोरामायणें १ २९७. २ शोभणें, शोभून दिसणें, योग्य दिसणें, बरोबर वाटणें 'तुम्ही पिढीचे भग्न तुम्ही प्रसंगीं भिक्षा मागितली तरी रुचेल पण आम्हा गृहस्थाला लोक हांसतील' ३ (कुर्वीनें उपयोग) रुचणें [स रुच्=आवडणें]

**रुचि**—स्त्री १ गोडी, चव (पदार्थांत असणारी), स्वाद, रसाळपणा २ रसनेंद्रियांत असणारी चव घेण्याची शक्ति, तोंडाला असणारी चव ३ आवड, गोडी, आनंद, सुख 'यश श्रवण कीर्तनीं रुचि दिली तरी द्यावरा।'-केका १२ ४ (वों) मीठ ५ कांति, प्रभा, तेज 'वासरमणिकोटिरुचे।'-मोभीष्म १ ४५ [स रुच्=१ आवडणें २ शोभणें, प्रकाशणें] ०कर-वि १ रुचकर, चवदार, तोंडाला गोडी आणणारा, पदार्थाला स्वादिष्ट करणारा, रसाळ, खमंग २ करमणूक करणारा, रंगविणारा, रंजविणारा, रमणीय [स] रुची-रुचि पहा **रुचीक**-वि १ रुचकर, स्वादिष्ट, आवडणारें २ (ल) रमणीय, रमविणारें म्ह०(गो) रुचीक सोरो नी पतीक पसारो=चव घेऊन घेऊन सोरो (दारू) संपविली व पत (वानगी) देऊन देऊन दुकान संपविलें **रुच्य**-वि १ रुचकर, मिष्ट, चवदार 'दखें रोगातें जिणावें। औषध तरी देयावें। परी तें अतिरुच्य व्हावें। मधुर जैसें।' -ज्ञा ३ १९ २ सुखदायक, मनोरंजक **रुचिर**-वि मोहक, सुंदर [स रुच्-प्रकाशणें]

**चीकि, रुचिक**—पु रुचेचा चीक 'रुचिक विववे घालिती। नाना दुःखें दडपे देती।'-दा ३ ७ ३५ [रुचे+चीक]

**रुजई**—स्त्री (व) कापूस घालून शिवलेलें पांघरूण, दुलई रजई पहा

**रुजणें**—अक्रि १ कोंब येणें, मोड फुटणें, (एखादें रोपटें) जमिनींतून वर येणें २ लागणें, उगवणें फुटणें, जगणें, वाढणें. ३ (उपदेश इ० चा) परिणाम होणें फलद्रूप होणें बिंबणें [सं रुह्-रुजणें=वाढणें] **रुजत घालणें**-पेरणें रुजण्याकरिता पुरणें 'हिंदुस्थानांतील नारळ दिला तो तिनें पालचे रुमरणाये रुजत घातला'-पाव्ह ४० **रुजवट**-वि उगवलेलें, रुजलेलें, मोड आलेलें, कोंब फुटलेलें, पालवलेलें, मूळ धरलेलें (बीं किंवा रोप) **रुजवण**-न पेरलेलें बीज, फुटलेला अंकुर उगवलेलें, मूळ धरलेलें बीं किंवा रोप रुजण्याकरितां पेरलेलें किंवा लावलेलें बीज अगर रोप

**रुंजणें**—अक्रि रुंजी घालणें 'त्या सुवासा वेधून। भ्रमर तेथें रुंजती।'-ह १ ३२ [ध्व]

**रुजवात**—स्त्री रुजुवात पहा **रुजवाती**-वि ज्याची रुजवात घ्यावयाची आहे असें (रकम, नांवनिशी, रक्कम इ०)

**रुजा**—स्त्री १ रोग, पीडा; दुःख २ ज्या ठिकाणीं रोमरंध्राचीं तोंडें बंद झाल्यामुळें गळलेले केंस परत येत नाहींत ती जागा -योर २ ४२७ [स रुज्]

**रुजामा**—पु १ रू भरलेली बिछाईत पातळ गादी, जाजम, सतरंजी, जमिनीवर आंथरण्याची बैठक, तक्या, गादी इ० कापूस भरलेली वस्तु 'रुजामे भरजरी कनकवर्णे।'-नव १५ ११० २ रूदार आंगरखा [फा]

**रुंजी**—स्त्री १ गुंजारव, भ्रमराचें गुणगुणणें 'तों तेथें एक भ्रमर। अकस्मात पातला सुंदर। रुंजी घालीत क्षणमात्र। गोपि कानीं दंखिला।'-ह २१ १५४ २ (एखाद्या वस्तूभोंवती) गुणगुणत घातलेली घिरटी, चक्कर फेरी ३ पारव्याचें किंवा कबुतराचें (एकमेकांचे मागें लागून) घिरट्या घालणें व घुमणें (क्रि० घालणें) [ध्व रुजणें]

**रुजु**—वि सरळ [स ऋजु] ०त्व-न सरळपणा, सरलत्व [स] **रुजुवणें**-अक्रि १ फेडणें, पूर्ण करणें 'मुळदेव देव्याचें रुजवती रिण।'-दावि ३६५ २ सरळ करणें

**रुजुवात**—स्त्री (निरनिराळे हिशेब, कागद लिखाण, यादींतील रकमें इ०) समक्ष ताडून पाहणें, कबुली, समक्षता, प्रत्यय, लक्ष्य, बरोबरपणा, सत्यता, खरेपणा, निष्ठा (क्रि० घेणें करणें, घालणें इ०) 'गनीमपराभव प्रत्यक्ष जनांत रुजुवातीस आला या आनंदें खुशाली'-चित्रगुप्त ४५ [अर रुजुअत्, रुजूअ] ०पत्रक-न तिजोरींतून काढून आणलेली रक्कम जमा केली किंवा नाहीं तें पाहून त्याचा ठेवलेला दाखला -वडोदें पहिलवान व कुस्ती पृ २८ ०हर्फेखान-पु खानाचे पूर्वीचे शब्द, म्हणणें 'मागील रुजवात हर्फेखान दूर करावा'-वाडमा १ २२३

**रुजू**—स्त्री १ निष्ठा २ संमति कबुली ३ रुजवात (क्रि० घेणें, घालणें, पाहणें) -वि १ (एखादें काम करण्यास) तयार, तत्पर, राजी, कबूल 'तुम्ही सांगाल तें करावयास मी रुजू आहे' २ हजर, गुदरलेला, दाखल, सादर सरकारजमा, जसें 'मी काल्च चाकरीवर रुजू झालों' 'तुम्ही चोर धरले ते सरकारांत नेऊन रुजू करा' ३ मान्य पसंत संमत रुकार दिलेला 'अनुपकारी मनुष्यावर उपकार केला असतां व्यर्थ म्हणतां परंतु तो ईश्वरास रुजू होतो' 'जबरदस्तीमुळें त्यास रुजू होते'-रुम २६० ४ सहीशिक्का केलेला, पसंति दर्शविलेला ५सामील, बाजूचा ६ बरोबर, दुरुस्त केलेला मालक सर्व पत्राच्या खालीं व मोतेबा खालीं रुजू या अर्थी रू असें लिही लिहिण्यांत चूक झाली तर

तो मजकूर न खोडतां पुढें रुजू लिहून नतर शुद्ध मजकूर लिहीत म्हणजे पूर्वीचा मजकूर रद्द समजा उदा० बुधवार प्रातःकाळ रुजू सोमवार ' 'पीलखोडें घेतलें रुजू भागानगर घेतलें ( म्हणजे पीलखोडें न घतां भागानगर घेतलें ) [अर रुजूअ] (वाप्र) •घालणें–ताडून पहाणें 'पुर्वील विशादीचें जाबते रुजू घालावे' ०होणें–१ पटणें, मान्य होणें, पसंत पडणें 'फाकू नका रुजू जाल्यावाचून । खागाजी कोण धरती धण्या।'–तुगा ३३६ २ भेटणें, नजर दणें, सन्मुख येणें, अर्पित म्हणविणें 'आम्हास रुजू जाहले नाहींत.'–मराचियोशा ३ सामाशब्द– •गुदस्त–रि गेल्या साली किंवा मागील वर्षी पतत होऊन दाखल झालेला •मु(मो)कावला–पु ताडून पाहणें, समकक्षता, रुजवात, ताडण्या करिता एकत्र आणणें, तुल्ना (क्रि० करणें, होणें)

रुझणें, रुझवण—रुजणें, रुजवण पहा

रुझी—स्त्री रुजी पहा

रुटका—पु विघ्याहून लहान असें जमीन मोजण्याचें परिमाण हें मुसलमानांनीं सुरू केलें रुटकेबंदी–स्त्री रुटका या मापाप्रमाणें ठरविलेला सारा, रुटक्यावर ठरविलेला धारा, जमीनमहसूल

रुटुखुटु, रुटुगुटु रुटुघुटु, रुटुघुट—क्रिवि मंदगतीनें, हलु हलु, सावकाश, धीरधीर (घोड्याची चाल किंवा कामाची गति) •करणें–बारीक सारीक कामें करणें, पुष्कळ लहान लहान धंदे करणें, नाना उद्योग करून कसें तरी पोट भरणें

रुट्टनवसणें—अक्रि (व) रुसून बसणें

रुट्ट—पु (चे) तगादा

रुठणें—सक्रि मारणें, बडविणें 'एवढा माह्याकालु रुठला।'–उपा ११९

रुंड—न (अप) रुड, शिर, मुंडकें, धडापासुन वेगळें केलेलें डोकें [स] मुह० एक घाव आणि दोन रुडें (तुकडे) •माला–ळा–स्त्री मुंडक्याची माळ ही शंकराच्या किंवा काली देवीच्या गळ्यात असते 'गळा रुंडमाळाचे हार।'–पाळणेसग्रह पृ २४.

रुंढ–ढी—स्त्री दुर्गादेवीच्या देवळातील कौल घेताना उचलून पहाण्याचा दगड, उचत्र पहा [रुड]

रुढणें—अक्रि १ बातमी पसरणें, अफवा उठणें 'रामसिंगाचे पोरानें चोरी केली असें सगळ्या गांवभर रुढलें' २ व्यवहारात आणणें 'तैसें लटिकें ये रुढे । जइ यणें उनिवडे।'–अमृ २ ३५ [रूढ होणें]

रुण—न ऋण, कर्ज, णें, रीण, रिण पहा 'द्रव्य नसेल तरी घ्यावें । रुण कळातरें।'–दा ३ २ ३७ [स ऋण]

रुणझुण—स्त्री मंजुळ आवाज, झुमझुम बारीक मधुर आवाज (विशेषत घागऱ्या, पैंजण इ०चा) गोड आवाज [ध्व]

रुणझुण-णां–क्रिवि गोडपणानें, मंजुळपणानें 'रुणझुणा वाजती नेपुरे। वांकी योगाटती गजरें।'–दा १ २ २३ रुणझुणकार–पु मधमाशांचा गुंजारव, वगैराचा सूक्ष्म आवाज रुणझुणणें–अक्रि १ रुणझुण आवाज करणें, गोड नाद निघणें, मंजुळ वाजणें (पैंजण, नूपुर इ०) २ गुरुणें, घोटाळणें 'वल्लासी तू कृष्णाचा हर। पार्वती घेतोसी समग्र। तू शठाचा मित्र शठ साचार। कासया येथें रुणझुणसी।'–ह २१ १२६

रुणरुणणें—अक्रि (वेगानें जाणारा गोफणीचा दगड, बदुकीची गोळी इ०) सु सु वाजणें, घु घु करणें, गुणणें [ध्व]

रुगा—पु (वों) १ झुरणी, सतत होणारें दु:ख, हृद्रोग २ उतरती कळा [ध्व अथवा स रणरण]

रुणाईत, रुणाईतस्वरूपी, रुणानुबंध, रुणी—ऋणाईत इ० पहा

रुण्य—स्त्रीपुत्र (व) आळ्या, किडी (एकवचन रुणी).

रुत—पु १ ऋतु हगाम २ विटाळशीपणा, रजस्वलावस्था ३ कोरडी भिक्षा 'रुत म्हणिजे माध्यान्ह समयावसरी । घरोघरीं फिरोनि ग्रामांतरीं। आणी कोणही जही सुपभरी। तन्हि घेणें मुष्टि येक।'–स्वादि ५ ५ १३ [स ऋतु]

रुतण-न—स्त्री रुपण, भुसभुशीत जागा, मऊ जमीन, (एखादा पदार्थ) रुतून राहील अशी जागा (उदा० चिखलाची जागा, वाळूनें युक्त असें स्थान इ०) रुतणें–१ बोचणें, टोंचणें, खुपणें, मऊ पदार्थात कठीण पदार्थ शिरणें, घुसणें, फोडून आत शिरणें, चेपून शिरणें 'भूईवर निजलें म्हणजे अगांत खडे रुततात' २ अडकून पडणें, रुपणें, बुडून अडकणें, चिकटून पडणें, पुरला जाणें, पुरलेला असणें 'ना तरी निर्दैवाच्या परिवरीं । लोह्या रुतलिया आहाति सहस्रवरी। परि तेथ बैसोनि उपवासु करी। कां दरिद्रें जिय।'–ज्ञा ९ ५९ रुती–स्त्री रुतण, अडकवण 'मम तेची ओल प्रबळ। ते ठायीं रुती गुती सबळ।'–एभा १२ ५७६

रुतबा, रुत्वा—पु दर्जा, पदवी, अधिकार, योग्यता 'अष्टप्रधानाचे बरोबरीचा रुत्वा'–भाऐपया १०३ [अर रुत्वा]

रुत्वत—पु दर्जा, योग्यता अधिकार –आदिलशाही फर्मानें [अर रुत्वा]

रुतू—पु १ ऋतु, वर्षाचा विभाग दोन महिन्याचा काल २ विटाळ रजोदर्शन न्हाण ३ मादीचा प्रसवण्याचा हगाम, फुलाचा किंवा फळाचा हगाम, मोसम [स ऋतु] •स्नात–दर्शन–मती–वती, रुतुस्नात–ऋतुस्नात इ० पहा

रुथेनिअम्, रूथेन—पुस्त्रीन (रसा) एक प्लातिन वर्गातील धातु हा प्लातिनच्या कच्च्या धातूशीं सयुक्तस्थितींत असलेला आढळतो यापासून अम्ल वगैरेंचे संयुक्त क्षार मिळतात –ज्ञाको (र) ११५ [इ]

रुंद—वि विस्तीर्ण, चवडा, आडवा, विस्तृत, रुंदीनें युक्त असा [सं पृद-प्रुद-रुद-भाभ १८३२ देश रुंद] रुंदट-ड-वि अधिक रुंदीचा, अधिक विस्तृत 'राजपथासम रुंदट।' –ज्ञाप्र २५० –रुंदसो, रुंद्राड, रुंद्रा-वि (कु गो) रुंद, मोठा, विस्तृत रुंद्राट्ट-ड-वि फार रुंद, अतिशय रुंद विस्तृत रुंदावणी-स्त्री रुंद करण्याची, रुंदी वाढविण्याची क्रिया रुंदावणें-अक्रि रुंद होणें, (शरीर) पुरणें रुंद होणें रुंदावा-पु रुंदपणा रुंदी; पन्हा रुंदाविणें-सक्रि पसरून रुंदी वाढविणें, विस्तृत करणें, रुंद करणें; वस्त्र इ० पसरून विस्तृत करणें रुंदाळ-वि फार रुंद अतिशय रुंद रुंदी-स्त्री चवडाई आडवी लांबी, पन्हा रुंदुला-न (चि) रुंद तोंडाचें सुगड, मडकें –मसाप ३ १८९ रुंदेला-वि रुंद, रुंदट, विस्तृत

रुंद—पु (व) जखमेंतील पू

रुदन—न रडणें; शोक रुदणें-अक्रि रडणें [सं रुद्] रुदंता-स्त्री रडारड 'फौजेंत निकट तिकडे रुदती झाली।' –भाव ५७ रुदित, रोदित-न रडणें, रुदन, शोक, रडारड

रुदया—पु दर्जा, अधिकार रुतबा पहा

रुदवणें—सक्रि (कर) गुतविणें सगळीं भांडी रुदवू नकोस' –अक्रि गुंतणें, व्यापणें, कार्यमग्न असणें 'कपड्यानीं सगळ्या खुंट्या रुदविल्या आहेत'

रुदवा—पु दर्जा, पदवी [अर रुत्बा]

रुद्ध—वि १ अडकून पडलेलें अडथळा आलेलें २ थांबविलें गेलेलें ३ वेढलेलें गुंतलेलें [सं]

रुद्र—पु १ शंकराचा एक अवतार, शंकर २ ब्रह्मदेवाच्या कपाळापासून उत्पन्न झालेला देव देवताविशेष हे रुद्र अकरा आहेत अकरा रुद्र पहा (यावरून ल,) ३ अकराचा समुदाय अकरा ही संख्या ४ रुद्रताल शिवस्तोत्र, ह्या तालांत अकरा मात्रा व पांच विभाग असतात ५ अकरावा रुद्र मारुती, हनुमान 'चूडामणिसह देवी प्रभु आणाया निरोप दे रुद्रा।' –मोरामायणें १ १८७ –वि भयंकर, रडविणारा [सं रुद्=रडणें] ०काठी-वि तीन धागे काळे व एक पांढरा नंतर एक काळा व एक पांढरा असें उभार व आडवणहि त्याच प्रकारचें किनार कोणतीहि असें (लुगडें) ०कोप-पु भयंकर प्रसंग, भयंकर संकट क्षुद्र इतर जे शूद्रचे तयावरि रुद्रकोप या क्षणीं। –ऐपो ३७० ०गाठ-स्त्री कापड विणताना त्यात चौकटीसारखें उठविलेलें चिन्ह ०गाठी-वि रु, गांठी असलेलें (लुगडें वस्त्र इ०) ०ताल-पु तालाचा एक प्रकार रुद्र अर्थ ४ पहा मंगलाचरणाचा एक जिवाचा एक ताल आणि भरतवाक्याला रुद्रताल हा टवल्लेच' –मा ३८ ०पिशाच-पुन १ काशींत केलेल्या पापाचें क्षालन होईपर्यंत (काशींत मेल्यानंतरहि) पिशाच योनींत राहिलेला जीव २ (ल) शीघ्रकोपी, अविचारी, रागीट मनुष्य ०बलि-पु रुद्र देवताना अर्पण केलेला मांसाचा बळी ०भूमि-स्त्री स्मशान मसणवटी ०मळी-स्त्री (व) अधारी, झोंपड 'असा नास चालवलेला पाहिला कीं आमच्या डोळ्यांना रुद्रमळी येते' ०योनि-स्त्री १ काशी येथील विश्वेश्वराच्या देवळावाहेरील सडकांतून गेलेला भुयारासारखा प्रदक्षिणेचा मार्ग ह्या मार्गांत मनुष्य मेल्यास तो रुद्रपिशाच होतो हा मार्ग उतरता आहे व ब्रह्मयोनीचा मार्ग चढावाचा आहे यावरून ब्रह्मयोनि आणि रुद्रयोनि हे शब्द ज्या घराचे भाग उचसखल असतात त्याला लावतात २ लांब व अरुंद गल्ली, बोळवडी ब्रह्मयोनि पहा ०घात-स्त्री घार बोटें लांबीची अकरा मुर्ताची वात अशा वातींचा लक्ष लावतात ०वि(वी)णा-पु वीण्याचा एक प्रकार ह्याचा आकार तंबोऱ्यासारखा असतो दांडीचें टोक वळवून पाठीकडे नेलेलें असतें दांडीच्या मागें भवन्याला एक गोल भोपळा बसविलेला असतो दांडीवर मेणात चोविस पडदे पक्के बसविलेले असतात ह्याला चार तारा असून त्या सा, प, सा, म, ह्या स्वरांत व आणखी तीन तारा प, सा व तार सा मध्यें लाविलात वाजविण्याचा सर्व प्रकार वीणाप्रमाणें असतो ०विंशति-स्त्री प्रलयकाळ (भाधवप्र यात हाच शब्द रुद्रवश रुद्रवशी असा आला आहे) 'भयानका क्षिति झाली घर-घाली रुद्रविंशति जगिं फाटली।' –ऐपो ३६८ [साठ संवत्सरांतले शेवटचे वीस संवत्सर रुद्र देवतेचे म्हणजे संहार देवतचे असल्यामुळें ते अनिष्ट मानतात] ०संख्या-वि अकरा 'कृष्णावालुवटीं ब्रह्मचारी पूजिले। रुद्रसंख्या नाभिपर्यंत पुरिले।'–सप्र ३ ३७ ०सावर्णि-चवदा मनु पहा –गीर ७५२ रुद्राचल-पु रुद्र नावाचा पर्वत [रुद्र+अचल] रुद्राणी-स्त्री पार्वती 'शिव भवानी रुद्राणी। का पान पावतीच कोणी।'–एरुस्व ५ ७४ रुद्रावतार-पु १ शिवाचा अवतार शिवाचें उग्रस्वरूप २ (ल) तापट किंवा रागीट मनुष्य तामसी व्यक्ति [रुद्र+अवतार] ०धा ण करणें–संतापणें अतिशय संतप्त होणें; अति क्रोध येणें रुद्राक्ष-पु १ एक वृक्षविशेष आणि त्याचें फळ याचे मोठे मोठे वृक्ष होतात पानें गंगेरीसारखीं असतात हीं झाडें कोंकणात थोडीं व म्हैसुरकडे फार आहेत या झाडाच्या फळातील बिया तेच रुद्राक्षमणी याची माळ करून शिवभक्त गळ्यात धारण करितात रुद्राक्षाला एक ते सहा मुखें असतात याच्या आणखी जाती गौरीशंख व रुद्राक्षल अशा आहेत २ शंकराचा डोळा शिवनेत्र 'कल्याणाचे क्षण निर्वाण मारा। रुद्राक्षींच्या पावकातुल्य धारा।' –मुरामायणें बालकांड ११० [सं रुद्र=शंकर+अक्षन्-डोळा]

रुध, रुधट—वि रुंद, रुदट पहा.

**रुघणें, रुंघणें**—सक्रि १ अडवणें, रोखणें, अडथळा आणणें, प्रतिबंध करणें 'ते गजवर्गो लागे कैसा। व्याधें रुरला मृगु जैसा।'–ज्ञा १२ १८६ २ व्यापणें, बंद करणें, वेढणें, महन काढों 'आणि आथी नाथी तितुकें। रुरलें असे येणेंचि एकें। कल्पांतींचेनि उदकें। व्योम जैसें।'–ज्ञा १५ ५३ [स रुध्]

**रुघणें, रुंघणें, रुंधवणें**–अक्रि १ अडथळा येणें, अडकून पडणें, थांवणें २ (रस्ता, वाट, जागा इ०) माणसें, गाड्या इ०च्या दाटीमुळें अडणें किंवा त्यातून जाणें कठिण किंवा अशक्य होणें, भरून जाणें, पूर्ण भरल्यानें बंद होणें 'स्वरूपें कृष्णाच्या अविरत निचें मानस रुधे।'–सारुह ७ ८१ ३ धंदा–उद्योगांत गुंतलेला असणें, एखाद्या गोष्टीनें व्यापला जाणें, एखाद्या कामात अडकला जाणें, गुतणें [स रुध्] **रुधविणें** सक्रि (मनुष्य, प्राणी, वस्तु) गुंतविणें, कामाला लावणें, उपयोगाला आणणें, उद्योगांत अडकविणें [रुघणें]

**रुधणें**—रुघणें पहा

**रुधा**—वि रोध पावलेला –मनको

**रुधावणें, रुंधावा रुंधी**—रुद्यावणें, रुद्यावा, रुदी पहा

**रुधिर**—न १ रक्त २ –पु मगळ हा ग्रह –वि तांबडा [स] ०ततु–पु (शारीरशास्त्र) रक्तातील तंतु दोर, रक्तामधील एक पाढरें ततुमय द्रव्य ह्या द्रव्यामुळें रक्त गोठतें ०द्रव–पु रक्ताचे कण ज्यांत असतात असें द्रव द्रव्य, रक्ताधार जल, रक्तकणधारी रस ०पेशी–स्त्री रक्तगोलक, रक्तात असणारा तांबडा किंवा पांढरा गोलक ०लसिका–स्त्री रक्त थिजल्यावर त्यातून वेगळें होणारें पाणी, रक्तजल, लस ०वाहिनी–स्त्री रक्त जीतून वाहतें अशी शरीरांतील नळी, नाडी, धमनी, शीर ०वाहिनीसमूह–पु रक्तवाहिन्यांचा समूह **रुधिराभिसरण**–न रक्ताचा शरीरात सर्वत्र होणार संचार, हृदयातून सर्व शरीरभर व सर्व शरीराच्या भागातून परत हृदयात रक्ताचें जाणेंयेणें [रुधिर अभिसरण] **रुधिराभि-सरणयुद्ध**–पु रक्ताभिसरणसस्था **रुधिराशन**–पु राक्षस [रुधिर+अशन=पाणी] **रुधिरूं**–न (महानु) रक्त हातींचें रुधिरू पीतातीं तान्हेले। तहम भणौनी। –शिशु १०५६ **रुधिरोद्गारी**–पु साठ संवत्सरातील सत्तावनावा संवत्सर

**रुंन**—वि (गो) रुद

**रुपटका रुपटकी, रुपडी**—पुस्त्री रुपयाबद्दल तुच्छता दर्शक शब्द

**रुपडल्ली**—स्त्री घोडयाच्या खोगिराच्या खालचें वस्त्र घामोळें 'रुपडल्ली गोंडे १६ सह'–ऐरापुप्र ९ ५११

**रुपडें**—न १ रूप, सुंदर रूप, गोजिरवाणी आकृति (प्र) रूपडें पहा २ रूपवान मूल 'वामन रंगक रुपडें। जिकडे तिकडे पडे दृष्टि।'–ज्ञानप्रदीप १०९१ ३ (गो) कवच [स रूप]

**रुपणें**—अक्रि १ रुतणें, दलदलीत किंवा भुसभुशीत जागेंत खचणें, खोल जाणें, शिरणें, अडकणें २ बोचणें, खुपणें, रुतणें 'जैशी केशनखें आगें वाढती। आपुलीं आपणातें रुपती।'–ऋवि ६ २१८ ३ खोंचणें, रोवणें, पुरणें 'आचारभंगाचीं झाडें। रुपती इंद्रियापुढें। मग जरी तेणेंकडे। क्रिया जाय।'–ज्ञा १४ २४९ **रुपण**–स्त्रीन रुतण, मऊ जमीन, भुसभुशीत जागा, (जमीन, मामल भाग, किंवा सामान्य पदार्थ यांचा) रुपलें जाण्यासारखा भाग **रुपणी**–स्त्री (कों) रुपण्याची, पुरण्याची काठी, पुरुष दीड पुरुष उंचीची काठी 'विवळया माडवास खाजगी रुपण्या चागल्या परवडतात'

**रुपद्**—स्त्री (रसा) एक धातु ही अनाम्लिक असुन रजतासारखी पांढरी असते ती हवेंत उघडी राहिल्यास तिचें प्राणिद बनतें तिचीं बरींच प्र णिदें व गधकिदें माहीत आहेत –ज्ञाको १९ (र) ११६

**रुपया, रुपाया, रु**—पु १ सोळा आणे किंमतीचें चांदीचें नाणें निरनिराळ्या राज्यांत व निरनिराळ्या टांकसाळींतील रुपयांना निरनिराळीं नावें होतीं त्यांचें प्रमाण पुढील प्रमाणें– कंपनीच्या १०० रुपयांबरोबर १०४ चांदवडी, १०४ विसवडी, १०६ भडोच, १०९ बडोदी, बाबाशाई, ११२ खंबायती, १०७ अमदाबादी, ३७९ देसलशाई, १०९ कितुरशापुरी, १२३ औरंगाबादी, १२३ इराणी ज्या परगण्याचें अगर देशाचें नाव रुपयाला असे त्या परगण्यात अगर देशात तो चाले याशिवाय आणखी पुढील प्रकारचे रुपये होते –शिक्का, तळेगावी, पन्हाळी, उखळी, कंरी, वेलापुरी, अंकुशी, कोरे, ऐन शिक्का, मलकापुरी, अरीकी, यागलकोगी, नीळकंठशाही, तुटकरी, अरकॉगी, इटावा, जरीकडा, काशीशिक्का, फुलचरी, दौलताबाद शिक्का, हुकेरी, गजीकोट, छत्रपती २ धन, संपत्ति, पैसा, नाणें रुपया व त्याचे भाग यांना पुढीलप्रमाणें सांकेतिक नांवें आहेत – राम=रुपया, सीता=अधेली, लक्ष्मण=पावली, भरत=चवली, रामदास=आणेली [स रूपक रु] ०**माडणें, रुपयाची मोड माडणें**–रुपयाची मोड करणें रुपयाचें नाणें किंवा खुर्दा करणें

**रुपस**—वि रूपवान्, देखणा 'वेदश्रुतिनें रुपस। सगुण सर्वांगीं डोळस।'–ज्ञाप्र ४४६ [रूप]

**रुपा**—वि पाढऱ्या अगावर काळे किंवा तांबडे ठिपके असलेला (बैल)

**रुपाया**—पु १ रुपया पहा २ नानक शहाचा अनुयायी –सिंधी इमजी कोश

**रुपाळूं**—वि रूपवान्, पत्रड, सुंदर, सुरस [गु]

**रुपुस्त**—स्त्री गंजिफाच्या खेळांतील एक पारिभाषिक शब्द तोंडाकडून किंवा पाठीकडून (फा रू=तोंड+पुश्त=पाठ]

रुपें—न रजत, अशुद्ध चांदी, ही मौल्यवान् धातु प्राचीन काळापासून नाणीं, दागिने इ० करिता उपयोगांत आणल्या जाणाऱ्या धातूंपैकीं आहे ही धातु पारतन्यय घनवर्धनीय आहे –ह्मको (र) ११७ २ गंजिफांचन खेळातील एक रंग ३ जोंधळ्याचा हिरवा पाला [ सं रूप्य, प्रा रुप्प ] रुपेरी–स्त्री (जर) शुद्ध चांदीची जरतार –वि १ रुप्याचें केलेलें २ रुप्याचा मुलामा दिलेलें ३ रुप्यासारखें दिसणारें –रुपेरीकांटा–पु बाभळीचा काटा. ( हा पांढरा असतो यावरून ). रुपेरी डोळे–पुअव पांढरे डोळे, कवडीसारखे डोळे रुपेरी डोळे करणें–मरणें रुप्याचे डोळे होणें–अंतकाळ आल्यामुळें डोळे पांढरे होणें, मरणोन्मुख होणें रुपेरी निखल (निलरज)–। १ छीट, चित्रवस्त्र, रुपी किंवा चित्रें अगर वेलबुटी काढलेलें कापड २ रौप्यपट [ फा ] रुपेरी पाऊस–पु शोभेच्या दारुकामातील रुप्यासारख्या फुलांचा ( नळा इ० लावला असतां ) पडणारा पाऊस रुपेरी पेरण–स्त्री पांढऱ्या पाटीची पेरण ( पेरण= फणे, नेच्याच्याजातीचें झाड ) रुपेरी बिडी–बेडी–स्त्री (ल) सेवावृत्ति, द्रव्याच्या लालचीनें करून घेतलेलें बंधन ' ही रुपेरी बेडी आपोआप सुटली यांत मला आनंदच आहे ' –सन्याशाचा संसार रुपेशाई लोखंड–न शिकेशाई लोखंडापेक्षा कमी प्रतीचें लोखंड रुप्याचा सफेत मुलामा–पु ( ल ) पांढरा रंग, रुप्यासारखा रंग ' केसावर जरादेवीनें रुप्याचा सफेत मुलामा चढविल्यामुळें शरीर शिथिल दिसे ' –विवि ८ १ ५

रुबकार—क्रिवि १ सन्मुख, जवळ ठेपलेली, निश्चित, समक्ष, पुढें ' लढाई रुबकार आहे ' –पेद ५ ५ ५ २ तन्मयतेनें, सलक्ष्य [ फा रु+ब+कार् ]

रुबगुंड—पु ( तजावरी ) पाट्यावरवंट्याऐवजीं तामीळ प्रांतांत वापरण्यांत येणारा धान्याच्या तरवावर बनविलेला दगड उखळातील रुभा वरवंटा [ तामीळ का ] रुबणें–सक्रि ( तजावरी ) रुबगुडात पदार्थ वाटणें

रुंबड, रुमड—पु १ ( हेट ) औदुंबर, उंबर. २ ( कों ) असोला नारळ व्यापारी लोकांत रूढ

रुबया—पु एक महिन्यापर्यंत निघणारा घोड्याचा दात –अश्वप १ ११८

रुबरु, रुबरू, रुबेरूब, रोबरो—क्रिवि १ समक्ष, समोर, समोरासमोर प्रत्यक्ष ' हें गोष्ट रुबरूच जाली तर बहुतच उत्तम आहे '–पेद २१ ११४ २ अपेक्षित नजीक ' नित्यानीं लढाई रुबरू आहे ' –दिमरा १ २०१ [ फा रू-ब-रू ]

रुंबल, रुबाल—पु ( कों कुण ) रुमाल

रुबाइयात—स्त्री चतुष्पदी, चार चरणाची कविता [ फा ] रुबाई–स्त्री १ विवाहगीत २ चार ओळींची कविता [ अ ]

रुबाब—पु १ दरारा, ऐट, मिजास, ताठा २ दमामा, एक तऱ्हेचा ताशा [ अर रु+आब ]

रुबीत—क्रिवि रुबरू पहा

रुयूअ—वि पाव –आदिलशाही फर्मानें [ अर ]

रुब्या—स्त्री भव ( व. ) डाळया

रुमझुम—स्त्री घुंगुरांचा आवाज [ ध्व ] रुमझुम-झुमां–क्रिवि मंजुल आवाजानें, घुंगुरांच्या आवाजानें

रुमड—पु ( कु ) उंबर रुंबड पहा

रुमडा—पु १ जुन शहाळें, कोंवळा परंतु शहाळ्याहून जुन असा नारळ २ –वि ( कु ) असोला ( नारळ )

रुमडी—स्त्री ( कु ) नागराचा दांडा, रुमणी

रुमणी–णें, रुम्हुणी–णें, लुमणें—स्त्रीन नागर, वखर, डवर, तिफण, कोळपें इ०चा दांडा–मूठ रुमणवाक, रुमणी-रुम्हुणयाक–पु शेताचा किंवा वखलीचा रुमणीच्या वळणा सारखा बांक किंवा वळण ' शेतास जागोजाग रुमणवाक आहे म्हणून मोजणी कठीण ' [ रुमणी+वाक ] रुमणमोड्या–वि १ रुमणी धरणारा, नांगर हांकणारा, नांगऱ्या २ गावंढळ, खेडें गावीं राहणारा, खडुत रुमणवाक–पु रुमणवाक पहा

रुमा—विना न १ सांबर देशांतील सरोवर हा शब्द ऋग्वेदांत आढळतो रुमा सरोवराजवळील जो प्रदेश तो रुमदेश –भाज ८३३ २ –स्त्री विना सुग्रीवस्त्री –हको

रुमा(मा)मस्तकी, रुमेमस्तकी—स्त्री एक औषधी पदार्थ.

रुमाल—पु १ चौकोनी वस्त्र, फडका, तोंड पुसणें, हात पुसणें इ० करिता उपयोगांत आणावयाचें वस्त्र २ डोक्याला गुंडाळण्याचें चौकोनी वस्त्र ३ वेष्टनवस्त्र, कागद, वह्या इ० गुंडाळून बांधून ठेवण्याचें कापड ४ जमाखर्चाचे कागद इ० फडक्यांत बांधून केलेलें गाठोडें, दप्तर ५ राजेरजवाडे इ०च्या वर वारण्याचें शल्यासारखें वस्त्र ' रुमाल दीपिका विचित्रें वारिती करीं । ' सप्र २१ ३१ ६ तहाचें निशाण लढाईंत सेनापतीनें किंवा राजानें रुमाल फिरविला तर तो दुसऱ्या पक्षाच्या राजास किंवा सेनापतीस शरण गेला असें पूर्वी समजत ७ देशपांड्याला किंवा कुळ कर्ण्याला दिलेली इनाम जमीन ( हीस असें नांव पडण्याचें कारण या लोकांना रुमाल किंवा दप्तर बाळगावें लागतें ) ८ ( खा ) उपरणें ( कों ) दुमाल [ फा रूमाल, रु=चेहरा+माल ] रुमाली–स्त्री १ ( व्यायाम ) मुद्गल फिरविण्याचा एक प्रकार २ –पु चड्डी, (माळवी) लंगोट ' पहिलवानानें जांगियाचें आंत रुमाली घातलेला असून '–पहिलवान व कुस्ती ११ ३ (वेरडी) शरीर आंत जाईल असें भिंतीला किंवा धान्याला पाडलेलें भोंक –गुजा १० ४ कबुतराचा एक प्रकार–जात –वि चौकोनी रुमाली गज–पु कापड मोजण्याचा १४ तसूचा गज जमीन

मोजण्याचा १६ तसूचा गज असतो त्यास रेशमी गज म्हणतात **रुमाली घडी**–स्त्री चोळखण इ० ची एक प्रकारची त्रिकोनी घडी, शिंपी घडी **रुमाली पाटी**–स्त्री दोन, तीन पायल्या धान्य राहील अशी वांबूची पाटी, टोपली **रुमाली रस्ता**–पु एक मेकास काटकोनात छेदणारे रस्ते 'रुमाली रस्ते बांधून चार।' –अफला ४९ **रुमाल्या**–वि नेहमीं डोक्यास रुमाल बांधणारा व कधीहि पागोटें न घालणारा

**रुमोरुम**—वि (व) पूर्ण रुमोरुम सूप झाला तवढ्यानें'

**रुय, रुयटी, रुयफुल, रुयमादार, रुयी**—रुई रुइनी, इ० पहा

**रुयदाद, रुएदाद**—क्रिवि प्रविष्ट, प्राप्त 'आ अमा रत्–पन्हाकडील खैरीयत कल्मी करून शादमानी रुयदाद होय तें केलें पाहिजे' –पया ६८३ [अर]

**रुरयात**—स्त्री भाडभीड, पक्षपात, भेदभाव, मुरवत रुईरयात पहा 'चौकशी करून कोणाची रुरयात न धरिता' –वाडसमा २ २२८ [फा]

**रुलोरुला**—पु एक प्रकारचा लगाम –अश्वप १ १८५

**रुवा**—न अव (कों) खरजेच फोड रू पहा

**रुशवत, रुश्वत, रुष्वत, रिश्वत**—स्त्री लांच [फा रिश्वत] **लाचरुश्वत**–न लाचलुचपत

**रुषा-शा**—पु (महानु) क्रोध, संताप 'तरुमरण रुषा दाखवीले मुरारी।' –गस्तो ९ ३९ [स रुष्, रुषा]

**रुषी**—पु (अप) ऋषि [स ऋषि] ०**संख्या**–वि (सांक तिक) सात ही संख्या

**रुष्ट**—वि १ रागावलेला २ रुसलेला, नाराज, नाखूष [स रुष्=रागावणें] **रुष्टी**–स्त्री राग, क्रोध, राग आला असता असणारी स्थिति; रुसवा 'तुष्टी तुष्टी आणि रुष्टी। दोन्ही तृण प्राय मानिये दृष्टी।' –मुवभा ११ ४५

**रुसकत, रुस्कत**—स्त्री परवानगी, रजा; नोकरी सोडणें रुखसत पहा

**रुसणें**—अक्रि १ मित्र इ० आपल्या आप्तानें केलेली गोष्ट आपल्या मनास न आल्यानें त्यानें आर्जव करून समजी करावी अशा तऱ्हेचा भावनापूर्वक कोप येणें, (स्वत) रागावणें; (स्वत स) घुस्सा यण, नाखूष होणें, राग धरणें, अबोला धरणें २ (ल) दूर करणें, नाश करणें, नाहींसें करणें आता तंचि हात वरी। तुज सांगों गोमटी। जया कमातें किरीटा। कमचि रुस।' –ज्ञा१८ १६५ ३ साहणें दडवणें 'आभाळें भानु ग्रास। तैं आभाळ कोणें प्रकाशे। सुषुप्ति सुषुप्तया रुसे। तैं तेंचि कोणा।' –अमृ ७ १६ ४ त्याग करणें, टाकणें 'या सापिया योगसियनी। वळकु दखिल' गा वहुतीं। सकलाचिया संपत्ती। रुसानिया।' अधो ६ ३१ –ज्ञा ६ ३८७ ५ (महानु) मारणें 'आड टाकों महाकाळु। ते हीं रुसैन।' –शिशु ९२० [स रुष् प्रें जि रुस] ०**फुगणें**–अक्रि रागावणें आणि चरफडणें, घुम्यासारखें वसणें **रुसका**–वि (कों) वारीक सारीक गोष्टीवरून रागावणारा किंवा रुसणारा, वारवार रुसणारा [रुसणें] **रुसवा**–पु राग, घुस्सा, रुसण्याची क्रिया, रुसलेपणा **रुसवाफुगवा**–पु राग आणि चरफड, हट्ट, रुसणी, तक्रार 'मुलीकडल्यानीं मुगकडल्या झाडूनसाऱ्या मान करणींचा रुसवाफुगवा जियल्यातिथ कसा अगदीं मनाजोगा मिटवून टाकला' **रुसविणें**–सक्रि (एखाद्याला न आवडणारी गोष्ट करून त्याला) राग किंवा घुस्सा आणणें, नाखूष करणें, चिघडविणें खोडया काढणें [रुसणें चें प्रयोजक]

**रुसीत**—क्रिवि रुजू होऊन 'जमीनदार व सस्थानिक वगैरे घाटग आदीकरून रुसीत होऊन मर्यादेनें वर्तत नाहीं' –वाडशाछ १८७

**रुसु(सू)म**—पु १ देशमुख व देशपांड्याचा जमिनीच्या उत्पन्नातील भाग २ हक्क पैका, कर फी, हक्क म्हणून द्यावयाचें देय हक्क शेंकडावळ, दरसाल मिळणारी नक्त नेमणूक 'रसदचा ठराव करून घऊन त्या–ऐवजीं जमीदाराचा ऐवज हक्क रुसुमा बद्दल' –वाडसमा ४ १२ [अर रस्म् (=चाल, रीत) चें अव] ०**इलाखा**–पु कुळकण्याचा हक्क 'रुसुम इलाखा नाहींच वीं वा।' –दावि ३८

**रुस्कत**—स्त्री रुखसत पहा

**रुस्त**—वि (गो) धाडसी

**रुस्तम, रुस्तु(स्तू)म**—पु मोठा पराक्रमी व धाडसी पुरुष इराणचा भीमसेन, इराणातील बारा वीरांपैकीं एक (शहानामा काव्यातील एक वीरपुरुष याची इस्फादियारबरोबर दोन दिवस कुस्ती झाली व त्यानें गदेनें त्यास मारिलें) [फा] ०**राव**–पु रुस्तमसारख्या पराक्रमी योध्याला द्यावयाची पदवी मावळांतील कडू आडनावाच्या देशमुखास ही पदवी होती –शिदि ८३२ **रुस्त(स्तु)मी**–स्त्री शौर्य, शक्ति, पराक्रम, धारिष्ट 'शाबास तुमच्या हिमतीची व दिलरी रुस्तुमीची।' –पया १४०

**रुह**—वि वाढणारा, उत्पन्न होणारा उगवणारा ह्याचा उप योग उपपदतत्पुरुषसमासात उत्तरपदीं होतो उदा० शिरोरुह= केंस सरोरुह=कमळ कररुह=नख महीरुह, भूरुह=झाड 'तगनि करुभूरुह श्रमहर स्वयें पाकले।' –नरहरी गगारत्नमाला १४८ (नवनीत पृ ४३२) [स रुह्–वाढणें]

**रुह राही**—स्त्री नीलगाय

**रुहई**—स्त्री एक मोठें झाड

**रळणें**—अक्रि १ लोळणें, लोंबणें, सैल किंवा मोकळेपणें हालणें 'कडिसिंदा पायघुळामाजीं रळती सपरा।' –मुआदि

३९ १५ २ (अलकार, केस इ० ) शोभा देत झालणें, झुरुणें ' कस्तुरी मळवट चदनाची उटी। रुळे माळ कठीं वैजयती।' –तुगा २ 'भाळीं कुरळीत केस रुळती।' ३ शोभिवत दिसणें, शोभणें, सुदर दिसणें ४ (वस्त्र, दागिना इ० ) वापरण्यानें चोळ वटणें, मळणें, चुरगळणें ,'काष्टो रुळला दिसे चिरा मस्तकींचा श्रीरगा।' –होला १४ ५ मळणें, झाकणें, लोपणें 'म्हणोनि ज्ञानें उजळें। का अज्ञानें रुळे।'–अमृ ४ १७ ६ परिचय होणें, सराव होणें, वहिवाटणें, एकाद्या कामात किंवा नोकरीवर किंवा काहीं मडळींत अभ्यस्त किंवा परिचित होणें, भीड मोडणें, परिपाठ पडणें ७ एखाद्या विषयात सफाई प्राप्त होऊन प्रगति होणें, होऊ लागणें ८ –सकि गुडाळणें, घडी घालणें, चुरगाळणें [स रुट्]

**रुळलेला**–वि वहिवाटलेला; परिचित, वापरानें सोयीचा किंवा सुखकारक झालेला, ज्याच्या आगवळणी एखादी गोष्ट पडली आहे असा, एखाद्या शास्त्रात, कामात अगर कलेंत वहिवाटलेला **रुळला मळला**–वि (कपडा, दागिना इ० ) वापरानें मळलेला, घाप रूस घाण झालेला [रुळलेला आणि मळलेला]

**रुळें**—न स्त्रियाच्या पायाच्या घोटयावर घालण्याचा एक अलकार

**रुक्ष**—वि १ शुष्क, कोरडें, ओलावा नसलेलें, स्निग्धता रहित २ कोरडा, कठीण, वेचव, रसहीन, पाणी किंवा रस नस लेला (खाद्यपदार्थ) ३ पाणी किंवा झाडें नाहींत असा, वृक्षहीन; वालुकामय, ओसाड, रखरखीत (प्रदेश) ४ कठोर, कर्कश, नसुर, ज्याच्या योगानें अत करण रजन नाहीं असें, रस, कारुण्य अगर माधुरी नाहीं असें (भाषण, लिखाण, गायन) 'इत्यादि रुक्ष वाणी कृष्णेला जो सभेंत आयकवी।' –मोकर्ण ६ ६२ [स रूक्ष=कठोर बोलणें]

**रुक्ष**—पु रीस, अस्वल 'वाल्मीक मुनि आणि रुक्षवानर गण। बिभीषणादि सकळ भक्तेंसी।' –स्वानुदिन ७ ४ ७७ [स ऋक्ष]

**रुक्षांग**—न (कों) दुसऱ्या झाडावर वाढणारें एक झाड याला फक्त पात्या येतात व तें झाडाच्या ढोलींत किंवा खोवणींत वाढतें याच्या पात्याचा रस इगवणीवर घेतात [स वृक्षाग]

**रू**—पु १ पिंजलेला व सरकी काढलेला कापूस २ (खा) कापूस [स रूत, दे प्रा रूअ, हिं रुई] **०दार**–वि ज्यात कापूस भरलेला आहे असें, मऊ [हिं] **०भरी रजई**–स्त्री कापूस भरलेली रजई –पशवेकालीन महाराष्ट्र ३३०

**रू**—न १ गजिफाची पुढची बाजू २ फौजेची अघाडी, रोख ३ भीड धाक, भय [फा रूअ] **रुवाकडून मागणें**–गंजिफाच्या डावात उतारीनतर जें पान मागणें तें पोटाकडून म्हणजे चनडीच्या खालच्या बाजूनें मागणें

**रू**—न (कों) खवडा, डोक्यातील फोड –अव रुवां–वें

**रू**—पु एक प्रत्यय हा ल्युना दर्शक प्रत्यय पाणिनीय स्टरच् प्रत्ययापासून निघाला आहे उदा०वासरू=व्याप्रतर,म्हसरू= महस+तर, वासरू=वत्सतर–वच्छअर–वासरू इ० –भाभ१८३४

**रूईनें**—क्रिवि शिरस्त्याप्रमाणें [अर रूय]

**रूख**—न (चद्रपुरी) पाण्यातील नाव, पाण्यावरून जाण्याक रिता केलेलें लाकडी साधन, डोंगा [सं वृक्ष]

**रूख**—पु १ झाड, वृक्ष 'रुखु मोडिले हें वाणितां।' –दाव ४६० २ रहाटगाडग्याच्या कणेकडाचीं टोकें ज्या दोन आडव्या लाकडावर टकलेलीं असतात तीं प्रत्येक ३ शाखारहित झाड, झाडाचा सोट ४ झाडाचा वुधा [स वृक्ष]

**रूख**—पु १ तोंड 'ते इग्रजी वकिलास रूख दणारच नाहींत'–दिमरा १ ५४ २ लक्ष्य, रोंख, दिशा, इरादा, रीत 'रूख कोणीकडे जावयाचा हें समजलें नाहीं'–रा १० २६५ [फा रुख] **०न देणें**–समोर बोलणें न करणें 'आनि स्वामी कडील धोंडाजी अगर आम्हासी रूख देत नाहीं'–पेद १० ७२ **०मिळविणें**–(व) मिळतें घेणें, सलोखा करणें

**रूखनळणी**—स्त्री कमळाचा वेल 'जळामध्यें राहे रविप्रिय सदा रूखनळणी।'–दावि २२४ [स वृक्ष+नलिनी]

**रूच**—स्त्री १ स्वाद चव, लज्जत, रसाळपणा २ चव, स्वाद घेण्याची शक्ति, रुचि ओळखण्याची शक्ति, जिभेची गोडी ३ आवड, गोडी; चव, रुचि, नाद [स रुचि]

**रुचक, रूचकास्थि**—न १ ज्या हाडाचे दांत बनतात तें हाड अस्थि पद्दा २ एक उपरत्न हें पिवळें, हिरवें, पिंगट अगर शुभ्र वर्णाचें असतें हें काश्मीरमध्यें सांपडतें

**रूजी**—स्त्री १ (महानु) रुजी, गुजारव 'धुमाडि करि ताति मधुकरा। रूजी घालिताति।'–शिशु २८६ २ हर्ष, रंजन 'ऐसें नानाविध खेळु खेळतु। देऊं राभासीं रूजी उपजवीतु।' –दाव ८८ [रुजी]

**रूटका**—पु विघ्यापेक्षां लहान असलेलें जमीन मोजणीचें परिमाण [फा]

**रूढ**—वि १ उगवलेला, उत्पन्न झालेला २ वृद्धिंगत, वाढ लेला ३ प्रचारात किंवा चालू असलेला, जाहीर; समाजात चालू असलेला, सर्वप्रसिद्ध, सुप्रसिद्ध ४ सर्वसामान्य, माहीत अस लेला, प्रसिद्ध (मत, सप्रदाय, कल्पना, व्यवहार, चाल इ०) ५ कुप्रसिद्ध वाढलेलें, प्रसृत झालेलें [स रुह्=वाढणें] **०पण**–न प्रतिष्ठा प्रचारात येणें 'माधुर्यी मधुरता। शृगारीं सुरेखता। रूढपण उचिता। दिसे भलें।'–ज्ञा १ ३६ [सं रुह्] **०शब्द**–पु जो स्वत सिद्ध असून सकेतानें किंवा रूढीनें अर्थाचा बोध करून देतो असा शब्द –नि ४९ **रूढणें**–अकि १ प्रसिद्ध

होणें, रूढ होणें, प्रचारात येणें, पसरणें 'तुझ्या कृपाबळेंचि सर्व रूढले यया मही।' –निमा १ ३२ २ उत्पन्न होणें, वाढणें तयार होणें 'तै अज्ञान एक रूढे। तेणें कोहविकल्पाचें माडें। –ज्ञा १५ ३४२ ३ बोलणें –शर **रूढव(वि)णें, रूढावणें**–सक्रि १ वाढविणें 'जगीं कीर्ति रूढवीं।' –ज्ञा ३ १९० २ जाहीर करणें, प्रसिद्ध करणें, प्रगट करणें 'लोकात रूढविलें पूर्णें। कीं गोवत्स मारिलें शार्दूलें।' ३ प्रघात पाडणें, प्रचारात आणणें **रूढि, रूढ**–स्त्री १ वाढ २ उत्पत्ति ३ प्रसार, फैलाव, प्रसिद्धी ४ चाल वहिवाट, शिरस्ता, सप्रदाय, प्रघात ५ कीर्ति, प्रसिद्धी, योग्यता 'तुका म्हणे कवी। जगामधीं रूढी दावी।' –तुगा ६२१ ६ केवळ लोकसकेतावरून ठरलेला अर्थ

**रूप**—न १ बाह्य स्वरूप, देखावा २ आकार, आकृति दृश्य पदार्थ ३ चेहेरा, तोंडवळा, मुद्रा, मुखवटा ४ (न्याय शास्त्र) डोळ्यानीं दिसणारे पदार्थांचे रंग आणि आकार हे धर्म, नेत्र ह्या इंद्रियाचा विषय ५ नमुना, विशेष मासला ठराविक ठेवण, विशिष्ट घडण, अवस्था, स्थिति ६ सौंदर्य, शोभा, तेज, पाणी; भूषण, शोभादायक गुण, बाधेसुदपणा 'हें काम असें कीं मनुष्यानें जीव देऊन केलें तरी रूप यायचें नाहीं' ७ मूळ धर्म, स्वभाव, गुणधर्म, मूळ अवस्था ८ (व्याकरण) नामाचें अगर धातूचें प्रत्यय इ० लावून सिद्ध झालेलें स्वरूप, स्थिति ९ (व्याकरण) कोणताहि धातु विधि अगर निषेध या अर्थी चालविला असता त्याचें होणारें रूपातर रूपें दोन आहेत–करण रूप व अकरणरूप १० तादात्म्य, प्रतिबिंब, सोंग, सारखेपणा, वेष उदा० पितृरूप, पिशाचरूप; वायुरूप, अलकाररूप इ० ११ (गणित) एक ह्या सख्येची सज्ञा, बीजगणितात व्यक्त सख्या १२ एक परिमाण दुसऱ्या परिमाणात नेलें असतां होणारा बदल उदा० अडीच रुपयाचें आण्याचें रूप चाळीस आणे १३ (वैद्यक) निदानाचा दुसरा प्रकार १४ एखाद्या कामाचा श्रेयस्कर किंवा प्रशसनीय परिणाम, चीज, फलद्रूपता 'कृतघ्नाची नोकरी कर ण्यानें रूप होत नाहीं' –पु चक्राचली गजिफातील सातवा रग [स] (बाप्र) ०**करणें**–सागणें निरूपण करणें, वर्णन करणें 'जरी प्रज्ञेचेनि आथिलेपणें। श्रीगुरुनामध्या रूप करूं म्हणे।' –ज्ञा १० १४ ०**पालटणें**–१ आकार बदलणें, निराळी आकृति घेणें, वेश बदलणें 'असो वानररूप पालटोनि। अणुप्रमाण वेष घेोनि।' –राधि १९ १०१ २ तोंडवळा, रग, वर्ण, वय सोंग इ० बदलणें, चेहरा बदलणें ०**होणें**–एखाद्या कामाचा सुपरिणाम होणें, चीज होणें; श्रेय मिळणें, फलदायी होणें 'जीव देऊन काम करू द्या पण त्या कामाचें रूप व्हावयाचें नाहीं' '**रूपास येणें**–आकार येणें, उपत्न होणें, नावारूपास येणें; चागल्या स्थिती प्रत येणें, चागले गुण दिसू लागणें 'हा इथुदरू गाढिलां साचार। तयासि सायास लागती फार। मेवगी रूपास येता साखर। चवी खाणार जाणती।' सामाशब्द– ०**कार**–न मूर्ति, प्रतिमा, प्रतीक –निपु ०**वेरूप**–न चागलें किंवा वाईट रूप [स रूप+विरूप] ०**रंग**–पु बाह्य देखावा, सामान्य स्वरूप, आकृति आणि रग रगरूप पहा 'रूपरग चातुर्यकला पाहुनि झालों खुशी।' ०**रत्नपरीक्षा**–स्त्री नाणीं आणि रत्नें याची परीक्षा, चौसष्ट कलापैकीं ही एक कला आहे ०**रेखा-षा**–स्त्री १ बाह्य देखावा, बाह्य मर्यादा २ धाट, आगळा, घडणा, बाधा ३ आराखडा, कच्चा नकाशा ०**लावण्य**–न आकाराचें किंवा बाध्याचें सौंदर्य, आकार, चेहरा व ठेवण याचा मोहकपणा, देखणेपणा बाधेसुदपणा ०**लिपी**–स्त्री सारणी, सूत्र –साठे, रासायनिक परिभाषा (इ) फॉर्म्युला ०**वती**–स्त्री सुदर स्त्री, देखणी स्त्री [स] ०**वान्**–वि १ सुदर; देखणा, चागल्या बाध्याचा २ रूप असलेला, आकृति असलेला, आकारयुक्त [स] ०**विकार**–पु एका रूपातून दुसऱ्या रूपात जाणें, रूपातर, अवस्थातर उदा० बेडूक मूळचा जलविहारी. परंतु स्थलविहारी होऊन हवेचें श्वासोच्छ्वसन करू लागला या रूपातरास रूपविकार म्हणतात –प्राणिमो ७६ **रूपांतर**–न १ अन्य रूप, दुसरें स्वरूप, नवें स्वरूप २ फरक, बदल [रूप+अतर] **रूपाभिमान**–पु सौंदर्याचा अभिमान, देखणेपणाबद्दलचा गर्व [रूप+अभिमान] **रूपावलि-ळी**–स्त्री नामें किंवा क्रियापदें याचीं प्रत्यय लावल्यानतर होणारीं रूपें दिलेलें पुस्तक [रूप+आवलि] **रूपडें**–न १ (का०य) सुदर रूप, गोजिरवाणें रूप, रूप, मूर्ति, मोहक मुख 'सावळें रूपडें चोरटें चित्ताचें। उभें पऱ्रीचें विटेवरी।' –तुगा २६३० २ मुखवटा, मुखगोप, बुरखा **रूपस**–न स्वरूप, सौंदर्य –वि (काव्य) चागल्या आकाराचा, सुदर, रूपवान्, नीट नेटका, सुरेख, शोभिवत, देखणा 'कुटी उपहासे रूपसा।' –मुसभा १५ २७१ **रूपी**–वि रूप घतलेला, त्यासारखा, एखाद्याची आकृति धारण केलेला समासात पिशाचरूपी, देवरूपी, दैत्यरूपी. **रूपिणी**–स्त्री रूप घेतलेली 'प्रणवरूपिणी मूळप्रकृति।'

**रूपक**—न एक अर्थालकार जेथें उपमान आणि उपमेय याचा अभेद वर्णिलेला असतो तथें हा अलकार समजावा, मुख्य बोलण्याचा विषय अन्योक्तीनें सागणें [स रूप्=रूप देणें]

**रूपक**—पु एक ताल ह्याच्या मात्रा सात व विभाग तीन असतात हा कर्णाटक सगीत पद्धतींतील आहे ह्याचे मात्रा प्रकार पाच आहेत ते असे– ५ ६.७ ९ ११ 'सुनाच्या रूपका। वरि नाचता पादकटिका।' –भाए ४६० **रूपकालप्ति**–स्त्री. (सगीत) चीजचे बोल व तिचा ताल ह्यानें रागाचें प्रकाशन करणें **रूपकालाप**–पु (सगीत) रागविस्तार करीत असतां यांत चीजचीं अक्षरें व ताल नसून स्वराच्या समुदायाचे वेगळाले भाग पाडून केलेलें रागाचें मंडन किंवा रागविस्तार असतो.

रूपुस्त—क्रिवि पुढें व मागें, वर व खालीं, तळाकडून व माथ्याकडून, पोटाकडून व पाठीकडून, आरंभीं व शेवटीं, दोन्ही टोकें धरून, जोडीनें 'कृत्युगाच्या रुपुस्ताम म्हणजे मागें व पुढें मिळून दोन्ही बाजूस'—गीर १८९ [फा रूम+पुरत] रूपुस्ताचीं कामें-पुढचीं-मागचीं कामें

रूपेरस—वि (गो) रूपवान्; सुंदर [सं रूप]

रूप्य—न रुपें, चांदी [स] रूप्यजस्ती-स्त्री रुप्याचा मुलामा; जर्मनसिल्व्हर

रूय—न (गो) चार पै, फया

रूयकार—पु हुकूम, आज्ञा [हिं] रूयकारी-स्त्री सुनावणी

रूवगुंड—न (तंजावरी) १ वैश्वदेवाचें कुंड २ उखळ. रुवगुंड पहा

रूवरू रूरुरू—क्रिवि रुवरू पहा 'त्यास निरोपसमयीं विद्यमान राजश्री बाबासाहेब शुक्रवारचे वाड्यात रुबरू पाहून दिल्हा'—वाडदुवा ११३ [फा]

रूवल—न रूम देशांतील एक दीड रुपया किंमतीचें नाणें

रूम, रूमशाम—न रोम, तुर्की साम्राज्य, कॉन्स्टँटिनोपल

रूय—स्त्री १ रुई पिंजलेला कापूस २ रुईचें झाड ह्याच्या बोंडात कापसासारखे तंतु असतात

रूयदाद—वि प्राप्त आलेलें [फा]

रूयेशा—पु घोडेस्वार [फा]

रूरयात—स्त्री मुर्वत, भाडभीड रुरयात पहा 'कोणाची रूरयात न धरिता उभयताचा हरएक मजकूर मनास आणून वाजवी असेल त्याप्रमाणें विदित करणें'—ख ७ ३४९० [फा रू+रयात]

रूवी—स्त्री रुईचें झाड.

रूळ—पु स्त्रियांचें एक पादभूषण, पैंजण, नूपुरासारखा चांदीचा दागिना 'रूळ साखळ्या घालुन हळु हळु च्यार कदम चालावें।'—सला ४६

रूळ—पु १ वाटोळी आखणी २ आगगाडीचा लोहमार्ग ३ छापताना टाइपास शाई लावण्याचें साधन ४ रस्त्यावरील खडी दाबण्याचा वाटोळा दगड अगर लोखंडी यंत्र [इ रूलर रोल] (एखादा प्रश्न भलत्या) रुळावर नेणें-गैरमुद्याचें, अप्रस्तुत बोलणें 'प्रश्न भलत्या रुळावर नेऊ नकोस'—सुदे २३३ रूळणें-क्रि रुळणें पहा रूळी-स्त्री नव नियम कायदे 'सरकार रूळी करणार आहे'—दि १ ३२५ [इ रूल]

रे—उद्गा. अरे; हे (हाक मारताना उपयोग) 'भूप म्हणे रे सुता'—मोकर्ण ५ १२

रे—पु एका जातीचा मासा

रेइला—वि (महानु) रचिलेला 'रेइल्या हाडांची मोळी। गुन्डावया यठी। वोढोनि शिराचीं। निहारिजे।'—ज्ञान प्रबोध ७१२ [स रच्, रेडणीचें धातुसाधित]

रेक—स्त्री धगळ, विपुलता, रेट, रेलचेल

रेकटी—स्त्री रेघोटी, बारीक रेघ [रेघ]

रे(रें)कणें—अक्रि १ (म्हैस, रेडा इ०नीं) ओरडणें २ घोगऱ्या आवाजानें बोलणें, गाणें, मोठ्या, कर्कश शब्दानें बोलणें, मोठ्यानें हांक मारणें ३ धरफडणें, पिरपिरणें, अमनुष्यपणानें ओरडणें (गो) रेस्योंचे [स रेप्=अव्यक्त शब्द करणें] रेंकत-क्रिवि हद्द जडपण, आळसटपणानें, आळसावत, मंद गतीनें, (क्रि० करणें, बोलणें, चालणें) [रेंगत याबद्दल वरील शब्द या वाक्प्रचारात आलेला दिसतो यादिवाय इतर ठिकाणीं याअर्थी रेंकणें याचा उपयोग नाहीं] रेंकत येणें-(म्हैस अभिलाषानें ओरडत येते त्याप्रमाणें) लालचीनें, आपण होऊन येणें, उत्सुकतेमुळें धावत येणें 'आम्हास श्रीमंत होऊद्या, मग कोण पाहिजे तो रेंकत येईल' रे(रें)काट्या-वि म्हशीसारख्या आवाजाचा; रेंकत बोलणारा, घोगऱ्या आवाजाचा, कर्कश आवाज असलेला

रे(रें)कला—पु १ छकडा, एक्का, एक बैलाची गाडी २ जमिनींत बीं पेरल्यानंतर वर माती लोटण्याचें आउत, कुळव ३ सुरुंग लावून खडक फोडण्याचें एक साधन ४ एक प्रकारची तोफ; एक बंदुकीसारखें हत्यार 'बिलयांत फिरंगी रोहिला जगीं। मारितो रग रेकल्याचा।'—ऐपो १८२ [हिं रहकला]

रेकार्ड—न १ दप्तर, कागदपत्रें, फाईल, मागील पत्रव्यवहार अगर प्रकरणें यांचें टांचण, एकेजागीं टाचून ठेवणें २ आलेख, ध्वनिलेख, यंत्राच्या साह्यानें घेतलेला गाण्याचा आलेख फोनोग्राफची तबकडी

रेख्ता—पु हिंदुस्थानी किंवा फारसी भाषेंतील एक गीताचा प्रकार [फा रेख्तह्]

रेख—स्त्री (कों) रेघ, रेषा [स रेषा]

रेख(खा)टणें—सक्रि १ (कागद भिंत इ०वर) चित्र, आकृति शब्द इ० काढणें २ (कागद, भिंत इ०वर) अव्यवस्थितपणें रेघोट्या काढणें, रेषा काढून विरूप करणें, चितारणें [रेखणें]

रेख(खा)टणी रेखणी स्त्री १ आकृत्या किंवा रेषा काढणें आखणें २ वर्णन, विस्तार, आखणी ३ आखण्याची पट्टी, आखण्याचें साधन, रूळ

रेखणें—सक्रि १ (जमीन, कागद भिंत इ०वर) रेषा किंवा रेघोट्या काढणें २ (चित्र, कांहीं आकृती) भिंत, कागद इ०वर रेषांच्या योगानें काढणें ३ घासुन गुळगुळीत करणें ४ (देव साधु इ०च्या प्रतिमा मूर्ती) मनात ठसवून घेणें, कल्पिणें

अंग, कपाळ इ०वर ( गंध इ० ) रेघाच्या रूपानें चिन्हित करणें कोरणें, नीट करणें, प्रमाणात लावणें, काढणें 'चतुर्भुज माळा रुळे येकावळी। कस्तुरी निढळी रेखिलीसे।'–तुगा ८ ६ वस्त्राच्या चुण्या किंवा डोईच्या केसाच्या पट्या चापूनचोपून वसविणें ७ वर्णन करणें, बिंबविणें, ठसा उमटविणें, चित्रित करणें 'एकोनि जो स्वहृदयातचि रेखिला हो। प्रत्यक्ष तोचि नयनीं हरि देखिला हो।' [रेखा, रेषा] **रेखला, रेखलिया**–वि १ नीटनेटका प्रमाणबद्ध २ कोरीव, कोरलेला, रेखलेला, सुंदर ३ योग्य, बरोबर, ततोतंत ४ चित्र काढलेला 'म्हणोनि माझी वैखरी। मौना चेहि मौन करी। हे पाणियावरी मकरी। रेखिली पां।'–अमृ १० १७

**रेखणें**—क्रिवि ओरडणें, रेंकणें पहा 'आडवे होऊनि रेखत गेलें।' –दावि ४८४ [रेंकणें]

**रेखा**—स्त्री १ रेघ, रेषा २ काढलेलें चित्र किंवा आकृति ३ मर्यादा, सीमा 'जेथ साहित्य आणि शांति। हे रेखा दिसे बोलती।'–ज्ञा ४ २१८ ४ रांग पंक्ति, ओळ ५ हात, बोटें इ०वर जन्मजात चिन्हें असतात तीं 'ध्वजवज्रांकुशरेखा। चरणींचीं सामुद्रिकें देखा।'–एरुस्व १ २२ ६ लंका व मेरू यांना जोडणारी दक्षिणोत्तर रेषा, याम्योत्तरवृत्त, ध्रुवामधून जाणारी रेषा, शून्य रेखांश ७ काव्यरचना 'नवल बोलतीये रेखेची वाहणी। देखता डोळयाही पुरों लागे धणी।'–ज्ञा ६ १८ ८ यथोक्त कर्म ९ ( नृत्य ) नृत्यामध्यें अंगप्रत्यंगाची जनचित्ताला आनंद देणारी मनोहर ठेवण [स रेषा] ०**कला**–स्त्री चित्रें काढण्याची कला ( इं ) ड्राइंग ०**गणित**–न भूमिती. **रेखांतर**–न रेखांश, पहिल्या रेखावृत्तापासूनचें पूर्व–पश्चिम अंतर [रेखा+अंतर] **रेखापात**–पु मध्यान्हरेखा पहा **रेखावृत्त**–न भूगोलावर उत्तर व दक्षिणध्रुव यांना जोडणारें व भूमध्याला छेदून जाणारें वृत्त, माध्यान्हवृत्त, याम्योत्तरवृत्त **रेखांश**–पु कोणत्याहि स्थळाचें पहिल्या याम्योत्तरवृत्तापासून पूर्वेकडील किंवा पश्चिमेकडील अंशात्मक अंतर

**रेखाटा**—पु नकाशा, आराखडा, रेषाचित्र

**रेंगडी**—स्त्री एखाद्या अवयवाला येणारा पेटका ( क्रि० वळणें )

**रेंगणीया**—स्त्री मिरचीची एक जात या जातीची मिरची मोठी असते –कृषि ५६८

**रेंगणें**—अक्रि १ रांगणें, सरपटणें २ आळसानें, मंदगतीनें अगर अनुत्साहानें काहीं काम करीत राहणें, चुरचीत चुरचीत काम करणें [स रिंख् रिंग्]

**रेंगरेंग**—स्त्री ( ना )किरकीर, पिरपीर रिंगरिंग पहा

**रेंगळ**—स्त्री रेलचेल, धरळ, रूप्ट्रटणा, देंगुरय,इ.ईद

**रेंग(गा)ळणें**—अक्रि १ आळसावणें, आळस भरणें, आळसानें अगर मंद गतीनें काम करीत राहणें २ मागें पडणें, मागें राहणें ३ दमणें, अति श्रांत होणें, मोठ्या परिश्रमामुळें थकणें, [रेंगणें] **रेंगाळता**–वि ( राजा कुण ) अति मंदपणें काम करणारा

**रेंगळा**—न ( कु ) चांभाराचें एक हत्यार

**रेंगापोंगा**—पु ( व ) निर्बळ लोक, रडका कारखाना दुर्बळ संघ 'आमचा रेंगापोंगा आहे तुमच्या भरवशावर'

**रेंगी**—स्त्री ( व ) आच्छादन नसलेली व वजनानें फार हलकी अशी बैलगाडी रिंगी पहा

**रेघ**—स्त्री १ रेषा, ओळ २ कांहीं आकृतीची मर्यादा ३ चेहरा, हजामत, दाढी करून कपाळावरील केंस न्हाव्याकडून काढून महिरपीच्या आकाराची आकृति हौशी लोक कपाळावर करवितात ती ( क्रि० धरणें ) सरकारी किंवा इतर कामाच्या कागदावर निरनिराळ्या लांबीच्या व प्रकारच्या व निरनिराळे अर्थ असलेल्या रेघा मारतात त्यांचीं नावें – किंदरी, खितावती, खडे, दुरकानी, तिरकानी, दफाते बिलैन, चीत, मसुदर किंवा मशोदर, मद्दर, शरायती, हरफ, हिकायती इ० ( क्रि० ओढणें, काढणें,फाडणें ) [स रेषा] ०**ओढून देणें किंवा काढून देणें**–एखाद्याच्या वर्तनाला शिस्त लावून देणें, त्याला वर्तनाचे नियम घालून देणें ०**धरणें**–दाढी करून कपाळावरील केंस काढून महिरपीप्रमाणें आकार करणें ०**मारणें**–हद्द ठरविणें, ओळ पाडणें **रेघे रूपास आणणें–येणें–चढणें**–उत्कर्षाच्या स्थितीस पोंचविणें, पोंचणें, वैभवशाली करणें, होणें, नावारूपाला आणणें, येणें, ऊर्जितावस्थेला आणणें, येणें **काढल्या रेघेनें–रेघे–चालणें वागणें–करणें**–ठरवून दिल्याप्रमाणें, सांगितल्याप्रमाणें, नेमल्याप्रमाणें वागणें, आखून दिलेल्या मार्गानें चालणें **रेघनरेघ**–क्रिवि पूर्ण, खडानखडा, बारीकसारीकसुद्धां **रेघरूप**–न १ पदार्थाची घटना किंवा आकारमान २ पदार्थाचें स्वरूप ३ उत्कर्षाची स्थिति, भरभराट, पूर्णपणा रेघेरूपास आणणें पहा **रेघटी, रेघोटी**–स्त्री ( वाकडीतिकडी ) रेघ, रेषा, ओळ **रेघाटणें, रेघोळणें**–सक्रि रेखाटणें पहा

**रेंघळण**—अक्रि १आळसानें किंवा मंदगतीनें ( काम, धंदा, माणूस इ० ) चालणें चालत राहणें, आळसावत करणें, बोलणें, चालणें, गमणें, कसें तरी ओढीत ( काम ) करणें २ मागें पडणें, मागें राहणें; रेंगळणें रंघळणें पहा ३ आजारांत खितपत पडणें, कुचमणें ४ घसरत चालणें, ( उतारावरून ) घसरणें ५ नाना प्रकारचीं विघ्नें येऊन ( कांहीं काम ) अडखळत चालणें, रखडत चालणें ६ प्रयत्न निष्फळ झाल्यानें एखाद्या व म त व्यत्यय यणें, रखडणें

रेघी—वि रेघानीं युक्त असी, पाव, अर्धा, पाऊण याच्या निदर्शक एक, दोन, तीन अम्या रेघानीं युक्त [रेघ] ०उजळणी-गुणाकार-वेरीज-भागाकार-वजावाकी-स्त्रीपुस्त्री रेघा युक्त सख्याची उजळणी, गुणाकार इ०

रेघोतळी—स्त्री (सोनारी) दागिना किंवा भाडें याच्यावर नक्षीच्या नाजूक रेघा उमटविण्याचें किंवा ओरखडून काढण्याचें सोनाराचें एक हत्यार गुजरणी, छटकारा पहा

रेच, रेचन—पु १ ढाळ, जुलाब, रेचकामुळें झालेले शौच, गुदद्वारें जोराचें मलविसर्जन २ ढाळक, जुलाब होण्याकरिता घ्यावयाचें औषध ३ सारक औषधाचा प्रयोग सलोपचार पहा [स रिच्=रिकामा करणें]

रेंच—पु १ मनुष्य जेवण्यास वसला असता कोणी भरल्या पायाचा मनुष्य तेथें आला किंवा त्या जेवणाराला कोणाची दृष्टि लागली तर त्या जेवणाराची अन्नावर एकदम अरुचि उत्पन्न व्हावी, मळमळू लागावें किंवा वाती व्हावी असा जो प्रकार होतो तो (क्रि० भरणें उतरणें, लागणें) २ एखाद्याच्या पाठींत किंवा दुसऱ्या गात्रात वैत्यादि कारणानीं उत्पन्न होणारा ताठपणा ३ खुमखुम, गर्व, हिंमत ताठा, तोरा, गुर्मी ४ (राजा कुण) (एखाद्यास) पुष्कळ मारणें, जोराचा मार, ठेंचणें ५ (कों) अपचननाशाचा एक तोडगा हा पुढील प्रमाणें—एका मडक्यात कढी निखारे त्यावर मीठ, मोहरी, मिरच्या व बारीक खडे टाकून विकारी माणसाच्या पुढून व मागून तें मडकें वरून खालीं उतरून परातींत उपडें ठेवून परातींत पाणी ओततात काहीं वेळानें पाणी मडक्यात ओढलें जातें ०उतरणें-मोडणें-करणें-१ पाठीच्या शिरा मोडून ती हलकी करणें पाठीचा ताठपणा, करक, उसण इ० जोराचा धक्का मारून किंवा चिमटयानें मास ओढून ताणून नाहींसा करणें २ (ल) गर्व हरण करणें खोड मोडणें, रग जिरविणें, नक्षा उतरणें; पराभव करणें 'हा उतरिताचि त्याचा असता तरि मानवेंद्रसुत रेंच।'—मोवन ११ ३२

रेचक—न ढाळक जुलाबाचें औषध, सारक औषध —पु प्राणायाम करताना आत घेतलेला श्वास बाहेर टाकणें पूरकानें ओढलेला वायु कुंभकात स्थिर झाल्यानतर तो सोडणें —वि सारक [स रिच्=रिकामा होणें] रेचणें-सक्रि सोडणें नाकानें, वायु सोडणें 'वायु जो धारण धरावा। तो जव फुग्ना अब्द्रासव्हा। तवचिवरी विरोधावा। मग रेचावा शनै शनै।'—एभा २७ १८३ रेचन-न १ रेचक औषध सारक औषध २ रेच जुलाब जोराचें मलविसर्जन रेचित-वि १ मोकळें केलेलें, सोडलेलें २ ढाळ झालेला पोटा साफ झालेला ०अंगहार-पु (नृत्य) उजवा हात रेचित करून शरीराची उजवी बाजू वाकवून रेचित करणें, ती बाजू ताठ करून पुन्हा डाव्या बाजूस त्याच क्रियाची आवृत्ति करणें शेवटीं क्रमानें रेचित उरोमंडल व कटिछिन्न करणें ०कटि-स्त्री नृत्यामध्यें दोन्ही पाय अंचित करून कवर खालीं घालविणें ०भुवई-स्त्री नृत्यामध्यें एखादी भुवई गमतीनें वर उचलिली म्हणजे दुसऱ्या भुवईची होणारी स्थिति ०मान-स्त्री नृत्यामध्यें क्वर निवृत्त करू लागताच शरीराला एक प्रकारची गति मिळते त्यावेळीं मानेसहि गति मिळते, ही गति मिळण्यापूर्वीची स्थिति ०संयुक्तहस्त-पु (नृत्य) हंसपक्ष हात वर करून फिरविणें व मग आपल्या समोर पसरून उताणे करणें

रेचकना—पु (ना) दुबळक्या लाकडास दोन आडव्या काठ्या बाधून केलेलें कुंपणाचें, वाडग्याचें फाटक, बेडे

रेचकनिकुट्टक करण—न (नृत्य) उजवा हात रेचित करून उजवा पाय निकुट्टित करणें, डावा पाय ह्या बाजूपासून त्या बाजूपर्यंत हलवीत राहणें

रेचका—पु (कर) भार, कामाचा बोजा 'कामाच्या रेचक्याखालीं तिचा पिट्टा पडला' [रचणें]

रेचा—पु (व) कापूस वठण्याचें, सरकी काढण्याचें यत्र

रेचावड—स्त्री लागवड.

रेज—पु १ धातूचा कण, ल्हान तुकडा २ ल्हान नाणें ३ एक कौंवडा ४ मजूर मोलानें लावलेलीं मुलें [स रजस] ०गण-गाण-पुन १ सोन्याचादीचे कण २ दागिने, नाणीं, भाडींकुडीं इ० चे तुकडे कण इ० ३ कपडा बेतल्यावर उरणारे कापडाचे ल्हान तुकडे (समुच्चयानें) ४ उरणारे तुकडे, चाराचुरा, चिटोऱ्या ५ बदुकीचे छरे ०गिरी-स्त्री १ बदुकीचा भडिमार छरे तोफाची किंवा बदुकीची एक फेर; शिलग, रजक २ लढण्याचें कौशल्य, शौर्य ३ तोफेंतून उडविण्यात येणारे धातूचे तुकडे —वसईची मोहीमे 'तोफेचे तोंडीं दिली रेजगिरी म्हणे पेटवा लौकर।'—ऐपो ३५३ [स रजस् फा राजगिरी]

रेजकदाणी—स्त्री दारू ठेवण्याचें पात्र, छरे किंवा बदुकीच्या गोळ्या ठेवण्याचें पात्र 'रेजकदाणी दिगाची'—वाड बाबा २ ४२ [फा रजकदाणी]

रेजगी—स्त्री १ मोड, किरकोळ नाणें चिल्लर, सुर्दा २ फोडलेल्या तासलेल्या लाकडाचे किंवा दगडाचे तुकडे, खड, घलप्या इ० समुच्चयानें [फा रेजगी]

रेंजणी—वि (गो) सदोदित दुखणाईत रेंजणेयचें-क्रि (गो) सदोदित आजार लागणें

रेंजणें—सक्रि. (राजा) आदरबुद्धीनें किंवा पूज्यभावानें लेखणें, आदर बाळगणें, भिणें, धाक बाळगणें (निषेधार्थी प्रयोग) 'जो आपाला रेंजीत नाहीं तो मुलुख्याला काय रेंजणार'

रेंजर—पु जंगलखात्याचा फिरता अधिकारी [इं]

**रेजा**—पु १ कापडाचा तुकडा; उंची कापडाचा ल्हानसा तुकडा; (सामा.) तुकडा; किरकोळ वस्तु. २ (कों.) लांकडी गज. (जाळींत बसवितात तो). खिडकीचा गज ३ फाशांवरील पगडा; टिंब. (सक्‍रेजा–दोन फाशांवरील दान. सहा आणि एक). ४ मुकटी. –मुंव्या ३५. ५ सोन्याच्या किंवा चांदीच्या लांब लगडी पाडण्याकरिता धातूचा रस दोन्ही टोंकांस बंद असलेल्या ज्या पन्हळासारख्या लोखंडी साधनांत ओततात तें साधन; मूस; भट्टी. ६ (विणकाम) पदर इत्यादि नसलेला सनगाचा कांहीं भाग, तुकडा. ७ (व) कारागिराच्या हाताखालचा सागकाम्या मजूर. [सं. रजस्, फा. रेजाह्=कापडाचा तुकडा] ०बाकी–स्त्री. वस्त्राचा अवशिष्ट भाग किंवा बेगमीच्या धान्यापैकीं कांहीं अवशेष.

**रेंजी**—स्त्री. (गो.) खरूज.

**रेजीम**—न. कागदाचें रीम; कोन्या ४८० पानांचा किंवा २० दस्त्यांचा गड्डा. [पोर्तु]

**रेजो**—पु (चि.) १ गज २ हातूचा. ३ (सिंधी) सोन्या–चांदीची वीट, लगड करण्याचा साचा, मूस रेजा पहा.

**रेट, रेंट**—न. (अशिष्ट) १ जाडा रोट; जाडीभरडी भाकरी. (क्रि० रगडणें; रचटणें; झोकणें, खाणें, बडवणें, ठोवणें; करणें). 'मग ती रेट भाजती.' –तोब ९७ २ (व.) वाळ केलेल्या भाकरीचा तुकडा. [रेटणें]

**रे(रें)ट**—स्त्रीपु १ गर्दी; दाटी; खेचाखेंच. (क्रि० करणें, घसणें; होणें). २ नेट, पदार्थ पुढें सरकविण्यासाठीं त्याला मागून लाविलेला जोर, मागून दिलेला दाब; धक्का. (क्रि० लावणें, देणें). ३ (व) भार, जोर, वजन. ४ (व) दाडगा किंवा उद्दाम मनुष्य. 'उमारेट मुसलमान.' [रेटणें]

**रेटकपणा**—पु रेटून नेण्याचा गुण; काम जोरानें पुढें करण्याचा किंवा करविण्याचा गुण.

**रे(रें)टणी**—स्त्री. रेटण्याची क्रिया, नेट देण्याची, पुढें ढकलण्याची क्रिया, ढकलणी. [रेटणें]

**रे(रें)टणें**—सक्रि १ पदार्थाला पुढें जाण्यासाठीं गति देणें, ढकलणें; मागून दाब घालणें, दुपसणें. २ (कांहीं अनिष्ट प्रसंग) प्रतिकार करून थाववणें, संभाळून धरणें, थोपविणें ३ (कठिण काम) नेटानें पार पाडणें; (धंदा, नोकरी, उद्योग इ०) विघ्नास न जुमानतां चालविणें. ४ कष्टानें चालविणें, संकटाच्या स्थितींत काढणें किंवा कंठणें (दिवसकाळ). ५ (खावपदार्थ) आधाशीपणानें खाऊन टाकणें; गिळणें. **रेटून जावसाल करणें**–भीडमुरवत न ठेवतां स्पष्टपणें आपलें म्हणणें मांडणें, उघड बोलणें, धीटपणानें आपलें म्हणणें सांगणें **रेटून**–क्रिवि. १ जोरानें, आवेशानें २ मोठ्या प्रमाणांत रे(रें)टणें–अक्रि १ सरकणें, स्थानभ्रष्ट होणें; आपली जागा सोडणें; (फार दाबामुळें खांब, तुळई इ०) कलणें. २ (धान्य, पाणी इ०) विपुल होणें, पिकणें; अमर्याद होणें; अतिशय होणें. उदा० पीक रेटलें, पाऊस, रेटला, अमदानी रेटली.

**रेटमकहाणी**—स्त्री. भाकडकथा.

**रेटमत**—न जबरदस्तीनें लादलेलें मत. 'रेटमत कीं हो दासाचें।'–दावि ४१२. [रेटणें+मत]

**रे(रें)टा**—पु. धक्का, नेट; जोर. **रे(रें)टाई**–स्त्री. १ रेटण्याची किंवा ढकलण्याची क्रिया, धक्का; ढकलाढकली. (क्रि० करणें.) २ (ल) जोर, जुलूम; बळजबरी; धटाई; दांडगाई 'तावीद केली असता भारी जमावानें तुम्हांसी रेटाई करून जाणार असतील.'–वाडसमा १.१९६. ३ संकटें, विघ्नें इ० कडे दुर्लक्ष्य करून किंवा त्यांना न जुमानता काम चालू ठेवण्याची क्रिया. ४ चालढकल. **रेटारेट–रेटी**–स्त्री. १ ढकलाढकल, खेंचाखेंच, ढकलण्याची क्रिया. २ (ल.) चालढकल, हेळसांड, दुर्लक्ष. 'मला बारीक ज्वर येत होता त्याची रेटारेट केली म्हणून बळावला.' [रेटणें] **म्ह०** दिवस गेला रेटारेटी आणि दिवे लावून कापूस वेंटी. **रेटूक, रेंटूक**–न (तुच्छतेनें) जाड भाकर, पोळी, पापड इ०

**रेड**—स्त्री. आंबे, फणस, धान्यें इ० चें वैपुल्य, समृद्धि, रेलचेल, चंगळ. (क्रि० होणें; पडणें) 'आज आंब्यांची बाजारात रेड पडली आहे. कोणी विचारीत नाहीं.' [हिं.]

**रेंड**—पु (विटीदांडूचा खेळ) विटीचें एक टोंक हातांत धरून दुसरें जमिनीकडे करून ती खालीं सोडून जमिनीस लागण्यापूर्वी वरच्यावर तिच्यावर टोला मारून ती फेंकणें, कोठें कोठें लेंड अगर चिट्टी म्हणतात. –मखेपु १८.

**रेडका**—पु एक प्रकारची गाडी.

**रेडणें**—अक्रि शिंपणें, ओतणें. 'पाणी रेडलें.'–मौज २. ६ ३०. [गु]

**रेंडमुंड**—वि. (व) आडमुठा, विचार न करणारा, आडदांड –क्रिवि (व) कांहींएक विचार न करतां 'रेंडमुंड जाऊन पडला आगावर'

**रेडा**—पु म्हशीच्या जातीचा नर, हल्या; टोणगा, महिष [स रिपू=हिंसा करणें]

**रेडा, रेडका**—पु (विशेषत रेडका) बदवा नांवाची पिशवी उघडण्यांच्या ज्या दोन दोऱ्या असतात त्यापैकीं प्रत्येक तडकणीसाठीं गोणी, पोतें इ० वर घातलेला दोरीचा फास.

**रेडी**—स्त्री १ पारडी, ल्हान म्हैस (दूध देऊं लागण्यापूर्वीच्या स्थितींतील) **रेडुक**–न पारडूं, म्हशीचें वासरू, रेडकूं

रेडकूं, रेडूक—न १ पारडू, म्हशीचें पोर २ (तुच्छतेनें) म्हैस [रेडा]

रेडिअम—स्त्री पिचब्लेंड नावाच्या खनिज द्रव्यापासून मिळणारी अतिशय दुर्मिळ अशी धातु हिचा १८९८ मध्यें शोध लागला हिच्यामध्यें प्रकाश देण्याची शक्ति आहे —ज्ञाको (र) १२९

रेडू—पु (ना) बसणाराना खालीं पाय सोडून बसता येईल अशा प्रकारची हलकी, उघडी गाडी; पायगाडी गाडी, रेडका

रेडेअननस—स्त्री जंगली अननसाचें झाड याच्या पात्यांची दोरखंडें करतात

रेडेमान(ण)गा—पु एक प्रकारचा वेड, वायू

रेड्डी—स्त्री तेलगी शेतकऱ्याची मुख्य जात

रेण—पु रेणु पहा

रेणवी—स्त्री खाऱ्या पाण्यातील माशाची एक जात

रेणा—स्त्री विना म्हाईन नदी 'आमचे रेणानदीकाठचे पाश्चात्य आर्यबंधु रूरावळीनंतर अग्निमीळेवर धडाका उठविनात' —नि ८४८ [इ न्हाइन]

रेणु—पुस्त्री १ धूळ, केर, रजःकण २ फुलांतील पराग ३ पित्तपापडा [स]

रेणुका—स्त्री विना जमदग्नीची पत्नी व परशुरामाची आई

रेणें—न (राजा) जें गवत, कडबा इ० खाऊं लागलें नाहीं, केवळ दुधावरच आहे अशा वासराची, रेडकाची विष्ठा रेणेंणें—अक्रि अशी विष्ठा (रेडकू वासरू इ०नीं) विसर्जिणें, वासरानें रेणें, हगणें

रेणोल—पोर्तुगीज सैन्यातील एक प्रकार —वसईची मोहीम

रेत—न पुरुषाचें वीर्य, धातु शुक्र पुरुषाच्या शरीरातील गर्भोत्पादक धातु 'देवुनि म्हणे मुनि, असो यणें जरि तुज न होय सुत रेतें। —मासभा १७४ २ (शकराचें रेत) पारा जळें कोणाच्या शिखिश्ददर झुतें स्नक्र झ्ाण गा–रेतें।'—मो अनुशासन ३४५ [स रेतस्] रेत पात, रेतस्खलन-रेतपुन वीर्य गळणें वीर्यपात रेतस्तंभक-वि वीर्यपात बंद करणारें (औषध) रेतोधान—न गर्भाधान [स]

रेताई—स्त्री चकारी आगण्यासाठीं दिलेली मजुरी

रेती रेत—स्त्री १ वाळू अगदीं बारीक वाळू २ (सोनारी धंदा) बारीक कणकण रूपानें असलेली सोन्याची पूड [स रेत, रेतज] रेतरदक रेतदाणी-पुस्त्री. शाईनें लिहिलेल्या कागदावर घालावयाची वाळू ज्या भाड्यात ठेवलेली असते तें भांडें वाळूदाणी, वाळूची डबी [हिं] रेताड-वि रेती पुष्कळ असलेली (जमीन, माती)

रेंद, रेंदग(गु)ड, रेंदड, रेंदा, रेंदाड—स्त्री नपु स्त्री.पु. न १ घर, गुराचा गोठा इ० तील करकचरा किंवा गदळ २ चिखल, घाण ३ तेल तूप इ०च्या बारदानातील गाळ, पाण्यांत जमलेल्या मातीचा अंश, मातीमुळें गढूळ झालेलें पाणी ४ व्रण, गळू इ०तील दाट पू, रक्त ५ शेणाची रास ६ पाघळलेला गूळ. ७ राड, खातेरें रेंदा-रेंदाड-रेंदगड-रेंदगुड काढणें-झोडपून काढणें, रक्त निघेपर्यंत मारणें रेंद-वि आळशी, मंद, सुस्त, जड रेंदवणी—न गढूळ पाणी,गदळ पाणी [रेंदा+पाणी] रेंदसरा-पु पाणी पाझरून यण्यासाठीं किंवा पडण्यासाठीं ठेविलेलें भाड [रेंदा+सरणें] रेंदाड, रेंदगड, रेंदगुड-वि चिख लानें भरलेलें, घाण किंवा धूळमिश्रित (पाणी, तेल, तूप, रक्त इ०) रेंदावणें-अक्रि १ (पाणी इ०) गढूळ होणें, घाण होणें २ (गळू इ०मध्यें) पू साचणें, पुवानें डबडबणें, पू गळण्यासारखें वर वरीत होणें रेंदाविणें-सक्रि (पाणी इ०) गढूळ करणें, घाण करणें रेंद्या-वि खवचीत 'रेंद्या चिखुल तें वाळलेसें वाग। —दावि ७६१

रेंद—न (राजा कु) १ ताडीमाडीचा मक्ता २ दारूचा गुत्ता ३ दारू गाळण्याची भट्टी, रेंदसरा रेंदकरी-पु मक्तेदार, दारू, ताडी विकणारे लोक रेंद(दे)सरा-पु दारू गाळ ण्याची भट्टी रेंदा-पु १ दारू गाळण्यासाठीं आंबविलेला, कुजत घातलेला पदार्थ २ पितळ करण्याकरता मिसळण्याचा पदार्थ ३ सोन्यांत घालावयाचें हीण रेंदे-न अबकारीकर दारू गाळणी वरील सरकारी कर 'रेंदे व गादीयादेखील'—बाडबाबा ३४ रेंदेकरी-पु दारू मक्तेदार रेंदेर-पु (गो) भंडारी, माडी, ताडी इ० काढणारी जात

रेंदा—पु तवारूची जुडी

रेंदीयाचेंदीया—क्रिवि (महानु) कसें तरी 'रेंदीयाचेंदीया दर भरीजेति।'

रेप, रेंप—स्त्री तापामध्यें अंगात उठणारी शिणिक, शिणक. रेपा—स्त्री (विशेषत अनेकवचनीं प्रयोग) १ थंडीतापामुळें अंगात उठणात त्या वेदना, शिणका २ आमाशानें पोटांत निघणाऱ्या कळा, वेदना, मुरडा

रेंप रेप—स्त्री १ मोठा दगड, शिळा खडक २ (ल) अगडबंब माणूस, राक्षसी माणूस पशु इ० ३-स्त्रीपु दाट चिखल, चिखलाचा लगदा रेपावर रेप-क्रिवि चिखलाचे थरावरथर रेपा वर रेंप घालणें बसविणें-आधाशीपणानें खाद्यपदार्थ पोटात घालणें, एकावर एक अधाशीपणानें खाणें रेंपणें, रेपणें-अक्रि कांहीं हालचाल न करता सुस्तपणानें बसणें पः चिकटून बसणें, चिखलाच्या गोळ्याप्रमाणें (रड मनुष्यानें) फतकल मारून बसणें

रेफ—पुस्त्री. रफार; र हें अक्षर. अर्थ र दर्शक चिन्ह; अक्ष राच्या डोक्यावरचें र चें अर्धवर्तुळाकृति चिन्ह. उदा० अर्क या शब्दांतील क या अक्षरावरील चिन्ह. [सं रिफ्=कर्कश नाद करणें]

रेय—स्त्री. (कों.) १ मऊ चिखल, राड, रातोरा. २ समु द्राच्या कांठावर येणारा मऊ गाळ. रेयट—स्त्री. (गो) चिख लाची जागा.

रेंयट—स्त्री. रमत गमत किंवा सुस्तपणें काम करणें; दीर्घ सूत्रीपणा; चेंगटपणा. [प्रां.] रेमटकहाणी—स्त्री. कंटाळवाणी हकीगत; लांबलचक गोष्ट. (क्रि० लावणें; मारणें; सांगणें; लागणें; घालणें). 'देसांनीं सांगावी रेमटकहाणी। चित्ता रंजवणी करा वया।'—तुगा ३८४६.

रेंयटणें—सक्रि. (पदार्थाला) तेल, तूप इ० चोपडणें; माखणें; घाटेल तसें चोपडणें. रेंयट्या, रेंयटी–वि मंदपणें किंवा सुस्त पणें काम करणारा, चेंगट; दीर्घसूत्री; भटक्या, आळशी.

रेंयटणें, रेंमटणें—सक्रि. (राजा.) १ सुपसणें, शिरक वणें. २ जोरानें दाबणें, चेपणें

रेयटी—स्त्री (राजा.) रेवडी पहा.

रेयड—न. १ घाण; रक्त मिश्रित पू. २ –स्त्री. चिखल, शेण, गू, इ०चा ढीग अगर पसारा; रेंदाड; घाण; रबडा, चिखलाची जागा. रेयडणें–सक्रि. (भांडें, अंग इ०) बरबटविणें; माखणें; चोपडणें; फासणें. –अक्रि बरबटलेलें असणें किंवा होणें; (रस्ता, शरीर, नाक, तोंड, भांडें, वस्तु इ०) माखलेलें असणें. रेयडी–टी–स्त्री. (राजा.) १ पाघळून पातळ झालेला गूळ. २ बिल बिलीत झालेलें फळ; अतिवक्ल्यानें आंबा, फणस इ०चा बिलबिलीत झालेला गीर; कुजून शेण झालेला जिन्नस.

रेयीट—न. दोन लोखंडी पत्रा जुळविण्याचा खिळा. [इं.]

रेबीन—स्त्री. (चामारी धंदा) पट्टी, फीत; गोठ घालण्याच्या उपयोगाची वस्तु [इं. रिबन]

रेयो—पु (गो.) चिखल, गारा..

रेभ—स्त्री. (प्रां.) (भिंत, जमीन इ०तील) भेग; फट, चीर

रेमट, रेमटणें, रेमट्या—रेंयट, रेंयटणें इ० पहा.

रेम्या, रेमेडोक्या, रेम्या डोक्या—वि. १ मंद, अनु त्साही. २ मूर्ख; मद्दड; मठ्ठ, बुद्धिहीन; दीर्घसूत्री. 'हा प्रकार पाहून रेमेडोक्या सार्जंटाचा संताप झाला'—के २४.६.३०. [रे आणि मे बावळटपणाचे निदर्शक आवाज]

रेया—उद्गा. राया, अहो. 'मारिले मारिले असुर। क्रोधें फरश धर। कोपले रेया।' –विठा–रेणुकानंदन पदें (प्रभात, व १ अं ८)

रेंरे रेंरें—स्त्रीन १ पिरपिर; रड 'हरिदास ते रेंरें करिती। पोटासाटीं।'—दा १८ १०.२८. २ अति संथपणानें किंवा मंद गतीनें काहीं काम करण्याचा प्रकार. ३ धैर्य गमावणें, धीर खचणें; बाको. ६. ३२

अनुत्साह. ४ एखादें काम करतांना चालविलेली कुरकुर, ओढ काढणें. (क्रि० लावणें). [रव] ०करीत–क्रिवि. रेंद रडत रेंगटत.

रेरे, रेरेरेरे—उद्गा. (आश्चर्य व दुःख यांचा निदर्शक उद्गार) अहाहा; अरेरे; हाय हाय.

रेरे—स्त्री. हांक; जोराची हांक, परत पुन्हा बोलावणें. 'मला काय रेरे करतोस, तुला काय ओम लागली.'

रेल—स्त्री. १ वैपुल्य; समृद्धि; चंगळ. २ महापूर; लोंढा. (क्रि० येणें). ३ रेती; बारीक वाळू. [हिं. रेल; प्रा. रेल्ल] ०पेल– पेल–टेल–स्त्री. अति वैपुल्य; बाहुल्य; अघळपघळ पुरण्याहतकें एखाद्या पदार्थाचें वैपुल्य.

रेलणें—अक्रि. १ कलणें; झुकणें; (भिंत इ० चें बांधकाम) सचून तिरकें होणें; एका बाजूला तोलणें; एका बाजूला पडणें; सरकणें. २ एखाद्याला टेंकून उभें राहणें; टेंकणें; दुसऱ्यावर भार देऊन राहणें, रेटणें. ३ (साखर, मीठ इ०ची रास ओली झाल्यानें) विरघळून पडणें; भिंत इ० ढासळून पडणें; पडून तुकडे होणें. ४ (कपाळाचा घाम, पू, रक्त, भिंतीचा रंग) झिरपणें; गळून पडणें; उडून जाणें. [अर. रेल्ला; सं. लुठ्; प्रा. रुल्ल]

रेलवे—पु. आगगाडीचा रुळाचा मार्ग. –स्त्री. (ल) आग गाडी. [इं.] ०स्टेशन–पु. आगगाडीचें उभें राहण्याचें ठिकाण. [इं.]

रे(रें)व—स्त्री. १ बारीक वाळू, रेती. २ धान्यांत वगैरे असणारी बारीक रेती; साखर, दळलेलें पीठ इ०कांतील कचकच. ३ –न. आकाशांत लांबलचक पाडऱ्या ढगाचे पट्टे कधीं कधीं पसर लेले दिसतात ते समुच्चयानें किंवा तशा पट्ट्यांनीं व्याप्त असें आकाश. (क्रि० निघणें; चढणें; वाढणें, पसरणें; विरणें; निखारणें; विरळणें). ४ गाळ. 'मग दुःखाचेनि बरबटें बोंवलें। पार्टी मरणा चिये रेवे रेवले।'—ज्ञा ७.८८. रे(रें)वट, रे(रें)वटील–वि.. वाळूची; रेताड, वाळू असलेली, पुष्कळ खडे आहेत अशी (जमीन). रे(रें)वठा–पु वाळूचा किंवा रेतीचा ढीग, रास रेंवडा–पु (कों.) १ वाळू; रेती. २ रेताड जागा; खडे असलेली जागा.

रेवचिनी, रेवचिनीचा—स्त्री. रेवाचिनी इ० पहा.

रेवड—स्त्री. १ कावळे, घोंगडें इ०च्या दशा वळून, गुंफून किंवा दुसरें रंगीत सूत, रेशीम इ० भरून गुंफलेला गोफासारखा पट्टा. (क्रि० घालणें, वळणें). २ (कों) लपेट ३ परवड.

रेवडावण—क्रि (गो.) (फडका इ०) डोक्याला गुंडाळणें.

रेवडी—स्त्री १ साखरेच्या किंवा गुळाच्या पाकांत तीळ घालून केलेली वडी २ (ल) फजिती, एखाद्याचा उडविलेला बोऱ्या, लाजिरवाणी स्थिति [हिं] ०उडणें–होणें–फजिती होणें. 'धरली वेदरची वाट, रेवडी झाली।'—ऐपो २३७.

**रेवडी वळविणें**-हवेलडी उडविणें; फजिती करणें **०दाणा दाण**-स्त्री पुर्गी फजिती **रेवड्या वळणें**-फजिती होणें

**रे(रें)वण**—स्त्री १ किल्ल्याच्या तटाच्या बाहेर किंवा खंद काच्या बाजूला सरक्षणासाठीं उतरता मातीचा ढीग घालतात तो (यावरून ल ) उतरण, घसरगुंडी २ खदक, विहीर इ० खाचा भरण्याची माती, दगड इ० भरताड ३ रुतण, रुपण, दलदलीची जागा, भुसभुशीत जागा [रेंव] म्ह० चढणीस घोडा रेवणीस रेडा **रेवणी**-स्त्री १ खदकाच्या बाहेर घातलेली मातीची वरवडी; रेवण २ स्टाखालीं खदकाच्या पुढें जी थोडी जागा असते ती किल्ल्याच्या रक्षणार्थ ज्या बाहेर चौक्या असतात त्या येथेंच अस तात 'सावनूरकर नबाब याजकडील पठाण किल्ल्याचे रेवणीवर सतरज्या हातरून वर बसवून तिरदाजी करीत'-हरिवशाची बखर पृ ९ ३ किल्ल्याच्या बाहेरील प्रदेश, परिखावलय 'सभोंता खदक मग रेवणी।'-अफला ४९

**रेवंणा, रेवण्णा**—पु लिंगाईताचा देव 'येक म्हणती रेवणा कर्ता।'-दा १३ ८ १४

**रेवणी**—स्त्री (को) माशाची एक जात

**रेवणें**—अक्रि १ (भि त, खाब, विहीर इ०) खालीं दबणें, खालीं जाणें, शारणें, रेलण २ चिखलांत अडकून पडणें, रुतणें, रुतणें 'जेणें या न भवाख्यपङ्कुहरीं हे रेवती, द वरा।' -मोकृष्ण ७३ ६ ३ (नदी, विहीर, खड्डा इ०) होरणें, भरणें, माती, गाळ इ०नीं भरून येणें ४ (दुखणें बैफ भूत इ०) अगात शिरून भिनून राहणें मुरणें 'दुखणें आंगात चांगलें रेवलें आहे बरेच दिवस औषध घ्यावें लागेल' ५ एखाद्या ठिकाणीं अगर एखाद्या धयात पुष्कळ काळ रहाणें किंवा मुरणें, मुरब्बी बनणें -सक्रि (विहीर खाच इ०) भरून काढणें

**रेवंत**—पु घोड्यावर बसून मृगया करणारी देवता [स रमत] -भाअ १८३२

**रेवती**—स्त्री १ सत्ताविसावें नक्षत्र २ बलरामाची बायको ३ चमेलीच्या जातीचें एक झाड ४ अधेली, अर्धा रुपया (बळ रामास राम म्हणतात व रुपयाचें सांकतिक नाव राम असल्यानें बलरामाच्या पत्नीचें नाव हें अधेलीकरिता साकतिक नाव झालें) [स ]

**रेवद रेवदी चिनी**—स्त्री रेवाचिनी पहा
**रेवदंडी**—वि रवदडा येथील (रुपया)
**रेवनी**—स्त्री (व) रवणी पहा [रेवणी]
**रेवलिआ**—स्त्री रेंव [दे ]
**रेवलें**—वि रुपयाजोगें
**रेवस**—न एक झाड [फा ]

**रे(रें)वसळ**—वि रेताळ, रेताड, रेंवट, रेती असलेलें (स्थळ, जागा) [रेंव+शाला]

**रेवसाम्ल**—न एक वनस्पतिजन्य अम्ल (इ) मॅलिक ॲसिड

**रे(रें)वा**—पु १ बारीक रेती, बारीक खडे, धान्या तील अगर साखरेंतील कचकच २ गाळ, गाळसाळ 'पोटात अनाचा रेवा बसला' ३ ढगाचा जमाव, ढगाची दाटी ४ जमाव, साचा, जमलेला किंवा साचलेला गाळ 'मोरीमध्यें रेवा बसला-जमला-भरला-दाटला' ५ धुकें, खार, [रेंव]

**रेवा**—स्त्री १ नर्मदा नदी 'रुमराला सेवाया धरणिवरि रेवातट बसे।'-अकक २ रसमजरी ३१ २ पृथ्वी 'रेवा करी जो धवला कराऩीं।' [स ]

**रेवा**—पु (सगीत) गायनशास्त्रांतील एक राग या रागात षड्ज कोमल ऋषभ, तीव्र गाधार, पचम कोमल धैवत हे स्वर लागतात जाति औडुव-औडुव, वादी गाधार, सवादी धैवत, गानसमय सायकाल

**रेवाचिनी**—स्त्री एक औषधी वनस्पती चीन हिमालय, पूर्वबंगाल व सीलोन येथील जगलात रेवाचिनीचीं (गाभोजचीं) झाडें आढळतात झाड ६-७ हात उच असतें या झाडापासून पिवळा चीक येतो त्यातील पिवळ्या राळमय द्रव्याला रेवाचिनीचा शिरा म्हणतात यात रेचकगुण आहेत शिवाय याचा रगारंहेहि उपयोग होतो रेव चिनीच्या मुळाचा औषधात फार उपयोग होतो [स रेवनी] **रेवाचिनीचा शिरा, रेवंदसार**-पु रेवाचिनींतील राळमय पिवळें द्रव्य याचा रेचक, रग व शिल्प यामध्यें उपयोग होतो

**रेवाज**—पु रिवाज पहा

**रेवाडी जोडा**—पु मारवाडी साधा जोडा

**रेवातकू**—पु (महानु) सुर्याचा घोडा 'रेवांतकू सावळेयां आगा।'-शिशु ५३१

**रेवाळ-ळें**—न १ बारीक रेती; धान्यातील कचकच धान्य पाखडून, चाळून राहिलेली रेंव, गदळ इ० २ मुरूम, वाळूयुक्त जागा ३ दाट धुकें, विरळ ढग (क्रि० धरणें, जमणें, पडणें, निघणें, विरळणें) **रेवाळ**-वि रेती, माती, कचकच, वाळू इ० मिश्रलेलें, रेताळ रेतीची [रेंव]

**रेवीपेवीं, रेवींदेवीं**—क्रिवि कांहीं इकडे सांडलें तिकडे सांडलें, कांहीं गुरानें खालें कांहीं पोरांनीं उडविलें कांहीं पुजलें, कांहीं गेलें इ० प्रकारानीं अव्यवस्थेमुळें नासधूस होऊन (धान्य) [रेंव द्वि किंवा रेंव+पेंव]

**रेंया**—पु (कु) रुबडमाती, रेती [रेंव]

**रेश-शा**—स्त्री १ रेष, रेषा २ तंतु धान्यातील धसकटें, कसर ३ तनुमयता [स रेषा]

**रेशीम**—न तुतीच्या किंवा एरंडाच्या पानावर उपजीविका करणाऱ्या एका जातीच्या किडयापासून निघणारा वस्त्रें इ० कर ण्याच्या उपयोगी असा धागा, दोरा, कृमिज तंतू [ फा रेशम्-अब्रीशम् ] ०भरणें-न. १ कापडावर रेशमानें नक्षी काढणें २ (चांभारी) तळास रेशीम शिवणें **रेशमाची आरी**-स्त्री (चांभारी) रेशीम भरण्याचें हत्यार **रेशमाची गांठ रेशी (पि)मगांठ**-स्त्री (पतिपत्नी, जीवात्मा व देह इ०मधील) कधींहि नष्ट न होणारा संबंध, जन्माची गांठ २ सुरकर बंधन 'जगनिवासा का अतरलों रेशिम गांठिआ।' -ऐपो ४१० **रेशमाचा किडा**-पु ज्या किडयापासून रेशीम मिळतें तो किडा याला एकदर चार अवस्थांतून जावें लागतें (१) अंडें (२) अळी (३) कोश व (४) पतंग अळीची पूर्ण वाढ झाली म्हणजे तो किडा स्वतःला आपल्या तोंडातून धागा काढून गुरफटून टाकतो हा धागा म्हणजेच रेशीम **रेशमी**-वि रेशमाचें २ (ल) रेशमासारखें मऊ, खरखरीत नव्हे असा ३ रेशमासारखा, सौम्य, गरीब **रेशमी कांठी, रेशीम काठी**-वि काठास रेशीम घातलेलें, रेशमाचे काठ असलेलें **रेशमी गज**-पु जमीन मापण्याचा गज ह्याची लांबी १८ तसू होती रुमाली गज पहा ०जोडा-पु रेशमाचे काठ असलेली धोतर जोडी ०नारिंग-न नारिंगाची एक जात याची साल फार पातळ असते ०मुसलमान-पु मुसलमान योध्याची एक जात ह्यांना दंडाला रेशमी गंडा बांधून शत्रूवर सोडिले जात ०संत्रा-पु संत्र्याची एक जात या जातीचें फळ कौला संत्र्यासारखें असतें फळ अति लहान असून त्यांत रस कमी व बिया पुष्कळ असतात याचा तेल काढण्याशिवाय दुसरा उपयोग होत नाहीं -उद्यम, मार्च १९३६ **रेशीमदाल**-सूत्रतंतु, रेशमाचे तंतु, रेशमी धागे

**रेषा**—स्त्री १ रेघ, रेखा, ओळ 'ज्याला लांबी आहे परंतु रुंदी व जाडी मुळींच नाहींत त्याला रेषा म्हणावें' -महमा १ २ तंतु ३ आकाशातील धसकटें किंवा लघुमय भाग [ सं ] ०उमटणें-उपटणें-भाग्याची रेषा स्पष्ट दिसूं लागणें, दैव उघडणें, अकल्पित रीतीनें भाग्य उदयास येणें 'शाहू महाराजांची कृपा म्हणण्यापेक्षा त्यांच्या दैवाची रेषा उमटून त राज्य लक्ष्मीचा उपभोग घेऊं लागले म्हटलें तरी चालेल' -मराठ्यांचे पराक्रम ०ओढून देणें-काढून देणें-एखाद्याच्या वागणु कीला मर्यादा घालून देणें ०काढणें-जंगलाच्या हद्दीवर पन्नास फूट जागा जाळणें -बदलापूर ३२९ ०परिमाण-न लांबी मोजण्याचें माप मराठी -आंगुळें, तसू गज, दंड, काठी, कोस, योजन इंग्रजी -इंच, फूट, यार्ड, पोल, फर्लांग, मैल इ० ०मय-वि रेषांनीं युक्त, रेषांनीं भरलेलें ०वृत्त-न विषुववृत्ताशीं लंब व दोन्ही ध्रुवांतून जाणारें वृत्त, याम्योत्तरवृत्त माध्यान्हवृत्त **रेखुं**-सकि लिहिणें, रेखाटणें, चित्र काढणें 'मग आदरीलें चीत्र रेखु।' -उषा २८ १५ [ सं लिख् ]

**रेपे**—पु (कों) चिखल

**रे(रें)स**—पु १ आण्याचा पंचविसावा भाग रुपयाचा ४०० वा भाग २ एक पोर्तुगीज, ताम्याचें एकपंचवीसांश आणा किंमतीचें नाणें [ पोर्तु रीस ] ०भर-वि थोडासा, अत्यल्प, यत्किंचित् (बहुधा निषेधार्थी प्रयोग होतो) 'एक रेंसभरहि मी दबून हलणार नाहीं' -स्वप १८९

**रेस**—स्त्री घोडयाची शर्यत, घोडदौडीचा जुगार [ इ ]

**रेसिडेंट**—पु संस्थानिकाच्या दरबारीं असणारा इंग्रज सरकारचा प्रतिनिधि [ इ ] **रेसिडेन्सी**-स्त्री संस्थानातील इंग्रज वकिलात

**रेहकणें**—अकि (व) रेंकणें, म्हशीचें ओरडणें, हेल काढून कर्कश रडणें [ ध्व ]

**रेहकला रेहेकला**—पु रेकला पहा

**रेहकी, रेंगी**—स्त्री (ना) बैलगाडी

**रेहटणें**—अकि (ना) रेटणें, तडस लागेपर्यंत खाणें २ चोप देणें, पटाड्‌ पटाड्‌ मारणें, चोपणें

**रेहटा**—पु (व) विष्टेचा पोह, शेणाचा पीळा, पोतेरा

**रेहदेह**—पु (व) हलगर्जीपणा, निष्काळजीपणा, हेळसांड 'प्रकृतीची अशी रेहदेह करूं नका'

**रेहपट, रहेपट, रह्मपट**—स्त्री (ना व) थप्पड, जोराची चापट

**रेहू**—स्त्री एका जातीचा मासा [ हिं ]

**रेहूस लाहूस**—पु सर्दीमुळें घोडयाला होणारा रोग यामुळें घोडा जमिनीवर निजला तर उठूं शकत नाहीं' -अश्वप २ ३००

**रेंहकला**—पु सुरुंग उडविण्याचें हत्यार -पेशवेकालीन महाराष्ट्र ५३४

**रेळ रेळवेळ रेळणें**—रेल, रेलचेल रेलणें इ० पहा

**रेळरेट**—वि भरपूर, चिक्कार

**रेळा**—पु (कों) (रंग, साखर, मीठ इ० चा) ओघळ, पाझर [ रेळणें ]

**रैयत, रैयतावा**—स्त्री पु रयत, रयतावा इ० पहा

**रैवत**—पु चवदावा मनु

**रैवस**—स्त्री रिवाज, रीत समारंभ [ फा रवेश ]

**रोऊळ**—स्त्री (हेट) शेवाळी

**रोक**—पु एक माशाची जात -प्राणिमो ८३

**रोंक**—पु रोंख पहा

**रोकड**—स्री १ नाणें, रोख पैसा, रोख रकम २ सोनें, चांदी, रत्नें इ० ऐवज [ स रोक, हिं ] **रोकड बाजार**-पु सराफीचे पेशर बाजारात विकल जाउन तिचें भांडवल जमतें तें **रोकड घही**-स्री कॅशबही **रोकडा-ड**-वि १ प्रत्यक्ष सोनें नाणें इ० रूप असलेला (ऐवज), रोख (रकम ); नगदी 'काहीं पैसा रोकडा । फळातें काढिला ।'-दा ३ ४ १३ २ (ल ) रोख ठाक स्पष्ट तावडतोब, धकाधक्की, प्रत्यक्ष, मूर्तिमत साक्षात्, धडधडीत ( जबाब, शिवी प्रत्युत्तर इ० ) 'साधूच्या लपनी हाता नीचाचा घात रोकडा ।'-माभवरीवाख्यान ७१ ( नवनीत पृ ३६१) ३ तावडतोबीचा, लगोलगीचा ४ -क्रिवि आतां, इत कयातच, सध्यां, या घटकेला 'तो गुरुला घरीं गेला आहे त्या पक्षां रोकडा आठ चार दिवस तर येत नाहीं ' ०जबाब-पु भीड मुरवत न बाळगतां स्पष्ट शब्दांनीं दिलेलें उत्तर **रोकडी कारकून**-पु खजिन्यावरचा कारकून **रोकडी हुंडी**-स्री दर्शनी हुंडी, दिल्याबरोबर पैसे मिळतील अशी हुंडी **रोकडोबा**-पु एक ग्रामदेवता ( तावडतोब नवसाला पावतो म्हणून हें नाव ) हा पुण्याजवळ भाऊदर्याला आहे **रोकड्या**-पु सावकाराचा किंवा सरकाराचा खजिनदार, प्रवासात सराफाचे पैसे बाळगणारा

**रोंकणी रोकणें, रोंकणें**—रोखणें, रोखणी, पहा

**रोकवणी**—न ( कों ) विटाळ झाला असता एकवार स्नान करून पुन्हा शुद्धयर्थ डोक्यावरून घ्यावयाचें पाणी

**रोकाण**—न ( गु ) हरकत, अडथळा, रोखण

**रोख**—पु रोष राग, क्रोध 'मग बोले क्षण याया रोखातें ।' -मोवन ४ १६१ [ स रोष ]

**रोख**—वि १ रोकड, नगदी रुपये, सोनं इ० ( ऐवज ) २ तयार प्रत्यक्ष, उधार न राखता प्रत्यक्ष दिलेला 'पैसा रोख, माल चोख ३ ( ल ) रोखठोक तात्कालिक, तयार, चलाखीचें, तरबेज ( उत्तर जबाब इ० ) [ स रोक ] ०ठोक-वि १ जिन्नस विकत घेतला तत्क्षण देण्याचा दिलेला, उधारीचा नसलेला, तावडतोब, तत्काळ दिलेला 'रोखठोक पैसा दिला म्हणजे जिन्नस स्वस्त मिळतो २ ( ल ) निर्भीडपणाचें, खरें, चलाखीचें, तावडतोबीचें ( उत्तर मुद्दा इ० ) -क्रिवि निर्भीडपणाचें, आंत बाहेर न ठेवता काय तें रोखठोक बोलावें मागें पुरपुर कामाची नाहीं '[ रोख+ठोक ] ०रकम स्री ( जमाखर्च ) ज्या रकमेचा ऐवज शिलकेंत प्रत्यक्ष पडतो किंवा होतो ती ०विक्री-स्री १ उधार न ठेवता केलेली विक्री पैसे घेऊन केलेली विक्री २ विकून तावडतोब मिळालेला पैसा, रोखीच्या सौदाचा पैसा

**रोंख**—पु १ झोंक, वळण नम, दिशा कल, भार ध्येय, लाक्ष निघाला मोंगलें भागानगरचा धरला रोंख । -ऐपो २६० २ कटाक्ष, रागावून लावलेली नजर ३ ( ल ) धोरण, उद्देश, हेतु, वेत, मन 'वरील पक्षाचा एकदर रोख जुन्या मताविरुद्ध आहे ' -नि ५६१ ४ ( कुस्ती ) डाव करणाऱ्याचा डाव चालू न देणें ही क्रिया [ फा ] **रोखण रोंखणी**-स्री १ रंधा; लाकूड तासून सपाट करण्याचें हत्यार २ रंध्यानें लाकूड तासणें रंधणें, रोखणें [ हिं ] **रोखणें**-सक्रि १ दाखविणें, नम धरणें, बंदूक, तोफ इ० चा विवक्षित लक्षाकडे रोख करणें २ सपाट करणें, समपातळींत आणणें, रोंखणीनें साफ करणें [ रोख ] **रोखणें**-सक्रि सारख्या नजरेनें लक्ष लावून पाहाणें, न्याहाळणें, निरीक्षण करणें, हेतु धरून टक लावून पहाणें 'दृष्टीं कार्मुक रोंखिलें मग मदें तणें दृढ लेखिलें ।'-आसी ४० **रोखून पाहाणें**-१ टक लावून पहाणें एखाद्या वस्तूकडे एकसारखें पहात रहाणें, एखाद्या वस्तूवर सरसी नजर ठेवणें २ नम धरणें निशाण धरणें, नेम लावणें

**रोखणें**—सक्रि १ अडविणें थांबविणें, अडवून धरणें, पुढें यऊ न देणें, प्रतिरोध करणें, ग्रासणें 'मृत्यूनें जननास बाधेवपणें कीं यौवना रोखिलें ।'-वामन, स्फुट श्लोक ६५ ( नवनीत पृ १४१) २ व्यापणें तोंड्यात घेणें, धरणें [ हिं ] **रोखून धरणें**-पुढें येऊ न देणें, अडवून धरणें, अडचणीच्या जागीं अडविणें-गाठणें, कोंडून धरणे

**रोखा**—पु कर्जखत, कर्ज घेतल्याचा लेख २ दस्तऐवज; करारनामा, करारपत्र, लेख, कागद, पत्र 'अजुनी वरि तेंव्हीं रहे तीचा फाडुनि टाका रोखा हो ।'-मध्व ५५ ३ आज्ञा पत्र साऱ्याचा अथवा माल पुरवठ्याचा सरकारी हुकूम, करारमाफक तगादा व वरात काढणें तें मागणीपत्र ताकीदपत्र, जरूरीचा हुकूम त्यानीं महाराजास न भेटतां स्वार व रोखा गेला '-मराचिथोशा १२ [ अर रुक्आ ] **रोखेबाजार**-पु रोख व भाव याची देवघेव पद्धतशीर रीतीनें होण्यासाठीं मोठ मोठ्या शहरातून त्याच विशिष्ट बाजार निर्माण होतात व ज्या मध्यें कर्जरोख्याची खरेदीविक्री चालते अशा बाजारविषयक संस्था ( इ ) स्टॉक एक्सचेंज -कालेकृत व्यापारी उलाढाली **रोखा रोखी**-स्री उधारी न ठेवता मालाची रोख किंमत घेऊन केलेला व्यवहार 'उधारीपक्षा रोखारोखींत सुख आहे '-क्रिवि १ रोखीनें उधार न ठेवता ( एखादा व्यवहार करणें ) २ तावड तोब एकदम, जलदीनें, तत्काळ ( बोलणें करणें ) [ रोख हिं ] **रोखी**-स्री १ तावडतोब पैसे देऊन किंवा घेऊन केलेला व्यवहार, उधार न ठेवता केलेला व्यवहार 'आम्ही काय बाजारात घेणें तें रोखीनें घेतों, उधार करीत नाहीं २ नाणें, पैसा नगदी ( पैशाचा व्यवहार याअर्थी ) मापट किराणा ह्याचे उदमापेक्षा रोखीचे उदमास योग्यता अधिक ( ह्या शब्दाचा रोखीचा, रोखीनें इ० प्रत्ययात रूपातच विशेष उपयोग होतो )

**रोंखारोखी**—स्त्री समक्षासमक्ष भेट, बोलाचाल 'त्याची माझी आज रोंखारोखी झाली' [ रोंखणें द्वि ]

**रोग**—पु ( खा भिल्ली ) १ राग २ रंग

**रोग**—पु. १ मोठें दुखणें; आजार, प्रकृतींतील बिघाड शरीरप्रकृतींत उत्पन्न होणारी विकृति २ शरीर प्रकृतींत बिघाड उत्पन्न करणारें कारण 'त्याचें पोट दाबून पाहिलें, चांगला आंब्या एवढा रोग हाताला लागला' ३ ( फळाफुलातील ) नासका अगर किडका भाग, रोगोत्पादक किंवा प्रकृतींत बिघाड करणारा भाग 'अगस्त्याचे फुलातील मधली काडी तो रोग आहे तो काढून टाक' ४ विकृतिकारक पदार्थ, रोगकारक वस्तु अन्न इ० 'हे धडधडीत किडके तांदूळ दिसतात आणि पैसा खर्चून हा रोग कशाला आणिलास?' ५ दुसऱ्याचें चांगलें पाहून होणारें दुःख किंवा त्रास, ज्यामुळें अंत करणास व्यथा होते असा रोग ( चिंता, मत्सर इ० ). ६ तिरस्करणीय, घाणेरडा, रोगट, कुसकट पशु किंवा मनुष्य [ स रुज्=रोग होणें ] ॰ग्राम–पु रोगाचें वसतिस्थान, शरीर ॰निदान–न. रोगाची परीक्षा, कोणता रोग झाला आहे हें ठरविणें ॰भावना–स्त्री रोगाचीं लक्षणें, उदा० क्षयरोगभावना, पित्तज्वरभावना, पांडुरोगभावना २ लक्षणें दिसू लागली आहेत असा रोग ३ रोगपरीक्षा, रोग ठरविणें ४ पिशाचबाधा ॰मल्ल–पु सदां रोगी, रोग व दुखणीं यांनीं जर्जर झालेला मनुष्य, रोगिष्ट माणूस ॰मसाला–वि ( ना ) रोगानीं जर्जर झालेला, रोगेल, मरतुकडा ( तिरस्कारार्थी उपयोग ) ॰राई–स्त्री १ लहानमोठे रोग; दुखणींपाखणीं २ वाईट गुण, उपद्रवकारक धर्म, विकृति उत्पन्न करणारे एखाद्या वस्तूचे गुण 'त्याला डिकरी दिली म्हणजे त्याची रोगराई चट जाते' [ रोग+राई स राजि=ओळ ] ॰लक्षण–न १ एखाद्या दुखण्याचीं लक्षणें, रोगाची भावना २ रोगाचीं पूर्वसूचक लक्षणें, होणाऱ्या रोगाचें सूचक चिन्ह **रोगघणी**–न १ रोगाचीं बीजें बरोबर वाहून नेऊन कोठा स्वच्छ करणारें रोग्याच्या पोटांतून बाहेर पडणारें पाणी, मल, ओकारी इ० २ भाजीपाल्यांतील शिजवून किंवा आदवून काढलेला अहितकर रस, पाणी ३ रोग आणणारा पाऊस उदा० आश्लेषा नक्षत्राचा पाऊस, पिकावर रोग आणणारा पाऊस [ रोग+पाणी ] ॰वारें–न. रोगराई, क्षुद्र दुखणें 'समर्था कदा रोगवारें नकोरे।' –वेसीस्व ( प्रस्तावना १२ ) ॰वेळ–ळा–स्त्री तीस घटकांतील विशिष्ट ३॥ घटका वेळ शब्द पहा **रोगट**–वि १ रोगानें किंवा दुखण्यानें पछाडलेला, आजारी २ खुरटलेला, मुरडलेला रोग झालेला ( भाजीपाला, फळें इ० ) **रोगटणें**–अकि १ रोग होणें, विकृति जडणें, आजारी पडणें २ ( झाड, वेल, फळ, फूल इ० ) खुरटणें, मुरडणें, कीड लागणें [ रोगट ] **रोगणें**–अकि ( को ) रोगानें झिजणें, क्षीण होणें, रोड होणें. **रोगपणें**–अकि रोगानें पीडणें, रोग होणें 'नव्हे पचपचीत तनु रोगपली।' –प्रला २१९

**रोंगा**–वि ( राजा ) १ रोडका, कृश अंगाचा, रोगट, आजारी दिसणारा २ सुकट व आवट चेहऱ्याचा, रुसलेल्या चेहऱ्याचा. **रोगड्या–ड्या**–वि आजारी, रोगानें झिजलेला, अशक्त, नाजूक प्रकृतीचा, रोड **रोंगाळणें**–अकि १ रोगट असणें, होणें, अजारानें अशक्त होणें २ रेंगाळणें, झिजणें [ रोंगा ] **रोगिष्ट–ष्ठ**–वि रोगी, आजारी, कांहीं तरी रोग जडलेला, सतत आजारी, रोगट शरीराचा [ स रोगिष्ट ] **रोगी, रोगिया**–वि ( काव्य ) १ ज्याला पडू, क्षय, दम, कुष्ठ, मेह इ० चिरस्थायी रोग जडला आहे असा, रोगिष्ट, प्रकृतिस्वास्थ्य बिघडलेला, आजारी, दुखणाईत 'का जिव्हालंपट रोगिया। अन्नें दूपी धनंजया।' –ज्ञा १८ १३६ २ अहितावह, अपथ्यकर, रोगकारक **रोगीण**–स्त्री देवीची भक्तीण या नेहमीं आजारी असतात भावीण पहा **रोगेणें, रोंघणें**–अकि ( राजा को ) रोगणें पहा **रोगेल, रोगेला, रोगलेला, रोग्या**–वि रोगट, नाजूक प्रकृतीचा, रोगिष्ट, सदा रोगी, रोगाड्या **रोगो**–वि ( कु ) आळशी

**रोगण**—न १ तेलिया रंग, तेल, राळ, मेण इ० चें चिकट मिश्रण, व्हार्निश हें लाकडास लाविल्यानें लाकूड पाण्यानें भिजत नाहीं व तकाकित दिसतें २ वरील चिकट मिश्रणाचें माखण; तेलिया रंगाचा हात, व्हार्निसचें सारवण [ फा रौघन् ] **रोगणी**–वि ज्याला रोगण लाविलें आहे असा, रोगणानें माखलेला, तेलिया रंग दिलेला 'रोगणी भिंती लखलखाट बर लप्यारी।' –प्रला ९२ **रोगणी रोटी**–स्त्री फत्तीरी रोटीचा प्रकार –फत्तीरी रोटी पहा –गृशि २ १७०

**रोगन, रोगान**—न चरबी, तेल, तुपासारखा पदार्थ हा पदार्थ इराणांत चोहोंकडे मिळतो ह्याचा उपयोग भाताबरोबर व रोटीबरोबर खाण्याकडे करतात –सारसंग्रह २ २३२ [ फा रौघन् ]

**रागोत**—न ( भिल्ली, खा ) रक्त 'कोहुरतां कोहुरतां रोगोत निग्यो'

**रोंगोपाग**—न ( राजा कोळी ) घनपागहून लहान व बारीक मासे पकडण्याचें जाळें [ रोंगा+पाग ]

**रोंघावणें**—अकि ( व ) रेंगाळणें, हद्द हद्द चालणें

**रोचक**—न पादेलोण –वि १ रुचिकर, अप्राप्त रुचि किंवा चांगला स्वाद आणणारा, चवदार २ तोंडाला रुचि उत्पन्न करणारा, निमेला गोडी आणणारा [ सं ] ॰ता–स्त्री आवड, गोडी 'अत्यंत जें रुचिर रोचकता आलें।' –सारुह ६ ७४ **रोचन**–न १ स्वाद गोडी, रुचि उत्पन्न करण्याचा गुण २ रमणीयता, स्वादामुळे उत्पन्न झालेला मोहकपणा, आनंद ३ गोरोचनाचें शुद्धिरूप [ स ] **रोचना**–स्त्री १ रुचिरपणा, चवदारपणा, गोडी २ रमणीयता; सुरसादिरव **रोचष्मती**–स्त्री रुचि, आसक्ति.

रोंचणें—सक्रि टोंचणें, भोसकणें, रुपसणें –अक्रि शिरणें, घुसणें, रुतणें, पोंचणें

रोचिस्—न (काव्य) प्रकाश, प्रभा तेज, उज्ज्वलता, प्रभाव [स]

रो(रौं)ज—न (गो) भेंड्याचें फूल

रोज—न (मांविक) गळवताच्या बांधकामास लागणारें प्रारंभींचें मुख्य लांकूड हीं रोजें दरेक गलबतास दोन असतात, पुढें मागें व दुसरें पुढें पुढील रोज हें मुख्य होय

रोज—पु १ दिवस (२४ तास) अहोरात्र 'तीन रोज मुर्दा राहिला अजुनि कांहीं हेतू नाहीं पुरला।'–ऐपो १६४ २ दिवसाची मजुरी, एका दिवसाचा पगार 'घटूला बारा आणे रोज मिळतो' ३ सरकार किंवा सावकार इ० कडील तगादादार आला असता त्याचा आपल्याकडून खोळंबा होऊन दिवस मोडल्या मुळें त्याला द्याव लागणारें द्रव्य –क्रिवि प्रत्यहीं, प्रतिदिवशीं, दररोज, प्रत्येक दिवसाला 'बकासुर रोज गावकऱ्याकडून गाडा भर अन्न घेत असे' [फा रोझ्] म्ह० रोज मरे त्याला कोण रडे =तीच तीच गोष्ट वारवार होऊं लागली म्हणजे तिच्यांतलें स्वारस्य जाऊन तिजकडे दुर्लक्ष्य होतें सामाशब्द– ०करी–पु रोजच्या बोलीनें कामावर ठेवलेला गडी ०काम–न. १ दररोजचें काम २ प्रत्येक दिवसाचें काम ज्यांत टिपून ठेवलेलें असतें ती वही, डायरी 'त्या दिवशींच्या रोजकामात उल्लेख '–ऐरापुत्र २ ११६ ०कीर्द–स्त्री १ दिनचर्या, डायरी २ रोजचा जमा व खर्च, रोजच्या रोज जमाखर्च लिहून शिल्लक काढतात ती कीर्द, रोजचा जमाखर्च ठेवण्याची वही, रोजखर्डा ३ रोजच्या गरजा, कुटुंब पोषणादि कामास नित्य लागणारा खर्च, कुटुंबाच्या नित्य गरजा पुरविणें (क्रि० चालणें) 'रोजकीर्दी जमा धरुनी सकळ। खता विरा काळ बरावरी।'–तुगा १८९४ [फा] ०कीर्दवही–स्त्री रोजच्या हिशोबाची वही ०खरडा–खर्डा–पु व्यापाऱ्याचें रोजच्या व्यवहाराचें टाचण, रोजचें कच्चें टाचण, रोख विक्रीचें कच्चें टाचण [रोज+खर्डा, सिं खरिडो] ०गार–पु १ धंदा, चाकरी, नोकरी, उद्योग; पोट भरण्याचें किंवा निर्वाहाचें साधन, पैसा मिळविण्याचा उद्योग 'आता शेतकीच्या रोजगारात जीव राहिला नाहीं' २ कोणताहि उद्योग, काम 'त्याची गोष्ट यापाशीं सांगणें व याची त्यापाशीं सांगण असला रोजगार आम्हाला होत नाहीं' [फा] ०गारशीर–वि धंद्या–उद्योगांत पडलेला ·नोकरी असलेला, चाकरमान्या. ०गारी–वि १ नोकरी असलेला, उद्योग असलेला, नोकर २ व्यापारधंदा किंवा अन्य व्यवसाय करून पोट भरणारा ०गुजारा–पु रोजच्या गरजा भागवून दिवस ढकलणें (क्रि० करणें होणें, चालणें) [फा] ०गुदस्त–स्ता–क्रिवि काल, आदल्यादिवशीं (जमखर्चांतील शब्द) [फा] ०दार, रोजनदार, रोजं(जिन)दार–पु रोजमुशाहिरा काम करणारा, मजूर रोजंदारी रोज(जि)नदारी–स्त्री रोजची मजुरी रोजच्यारोज केलेल्या कामाबद्दल दिलें जाणारें वेतन. रोजदुक्र–पु (राजा बुण) रोजमुरा ०नामा–पु (कायदा) एखाद्या फिर्यादीचें किंवा कोर्टाचें रोजच्या कामाचें टाचण, टिपण. ०नामा–निशी–मामचा–पुनपु १ रोजकीर्द; रोजच्या जमाखर्चाचें टिपण २ रोजची हकीकत लिहिण्याची वही, डायरी, रोजच्या कामाचें टिपण, दिनचर्या, दैनंदिनी [फा] ०मजुरी–स्त्री दिवसाचा पगार, दिवसाचें वेतन ०मजुऱ्या–वि रोजानें काम करणारा, दिवसाच्या कामाची त्याच दिवशीं मजुरी घेणारा, दिवसाच्या कामाची मजुरी ठरवून काम करणारा ०मरा मारा–मुरा–मुन्हा रोझमरह–पु मजुरी, मुशाहिरा, दिवसाचें वेतन, पगार 'तमाम फौजामिरोनि दिले रोजमुरे त्यांशीं।'–ऐपो २७५ ०मेळ–पु १ रोजच्या जमेचा व खर्चाचा मेळ. २ रोजकीर्द, रोजचा रोखीचा व्यवहार नोंदण्याची वही, रोजखर्डा ०रोज–क्रिवि प्रत्यहीं, दररोज ०वडा–पु (कारकून लोकांत रूढ) दिवसाचा हिशेब, एका दिवसाचा जमाखर्च ०वारी–स्त्री रोजच्या कामाच्या हिशाबाचें पुस्तक (माहेवारी, सालवारी इ० प्रमाणें हा शब्द सारावसुली खात्यात रूढ आहे) रोजारोजी–स्त्री १ रोजमजुरी, प्रत्येक दिवशीं मिळणारा दिवसाचा पगार, मजुरी. 'रोजारोजी करून पोट भरतो' २ हातावरचें पोट, रोज मिळवून रोज खर्च करणें 'मी रोजारोजींत आहें'–क्रिवि मिळवावें आणि खावें अशा रीतीनें 'मी काय उत्पन्नभक्षी नाहीं, माझा निर्वाह रोजारोजी आहे' [रोज द्वि] रोजिंदार, रोजिनदार, रोजिनदारी–रोजनदार, रोजनदारी इ० पहा ०उठून–क्रिवि प्रत्यहीं, रोजच्या रोज, दररोज 'आम्ही रोजउठून तुम्हाला नाक घोटून पुरवावें?' रोजचा–वि नित्याचा, नेहमीचा. रोजचे रोज–क्रिवि दररोज, प्रत्येक दिवशीं, नित्य रोजि(जी)ना–पु रोजची मजुरी, मुशारा –वि क्रिवि दररोज, प्रत्येक दिवशीं 'रोजीना चार हतीप पचवीस रुपये खर्च'–ख २. ५४० [फा रोझीना] रोजी स्त्री १ कुटुंबाचा एक दिवसाचा खर्च, रोजचा खर्च २ दिवसाचें वेतन, पगार, मजुरी ३ (ल) दुसऱ्यापासुन रोजच्या रोज मिळणारी वस्तु, रोजचा भत्ता, रोज मिळणारें अन्न ४ मोहरमात फकिरास केलेला धर्म, भिकाऱ्यास दिलेला पैसा [फा] रोजीवाला–वि रोजची नेमणूक, मजुरी, भिक्षा मिळविणारा, रोजगारी

रोजआवळी–ळो–स्त्रीपु (गो) रायआवळी, रायआवळ्याचें झाड व त्याचें फळ

रोजना—स्त्री रुदन, रडणें, शोक 'तुम्ही जोठें गेल्यावर मी करीते रोजना।'–होला १६९ [स रोदन]

**रोजमरी**—स्त्री वासाच्या पानाचें झाड -यागेची माहिती १०४ [ इं ]

**रोजह**—पु बाग रियाज पहा -आदिलशाही फर्मानें.

**रोजा**—पु मुसलमानांतला उपवास, निरशन रमजान महिन्यात मुसलमान लोक हे उपवास करतात या उपवासात सूर्योदयापूर्वी व सूर्यास्तानंतर जेवणाची मुभा असते [ फा ] रोजदार-पु (ना) रमजान महिन्यात उपवास करणारा मुसलमान

**रोजी**—स्त्री (गो.) ग्रास, घास

**रोजो**—पु (बडोदें) तीन वर्षे टिकणाऱ्या झाडाचा कापूस -कृषि ३८५

**रोझा-जा**—पु १ समाधिमंदिर, दर्गा, थडगें २ बाग (औरंगाबादेजवळ रोझा नावाचें जें गाव आहे तेथें मूळची बाग होती) [ अर रौझा ]

**रोझीनह**—क्रिवि रोजीना, प्रत्यहीं [ फा ]

**रोझेल**—स्त्री आंबाडीची एक जात (तांबडी आंबाडी)

**रो(रों)ट, रोटगा, रोडगा**—पु कणकेचा भाकरी सारखा जाड व भाजलेला गोळा, जाड भाकरी, जाड, मोठी भाकर [ हिं, फा रोटिंग ] **रोटपाट**-पु (खा) पोळपाट **रोटक-का**-पु रोटी, भाकरी **रोटा**-पु १ भाकरी, जाड व मोठी पोळी २ आंबलेला युरोपियनांचा पाव [ हिं ] ३ अन्न, पोटापाण्याची चिंता **रोटिगा**-पु रोडगा, रोटगा 'कादेंभरित रोटिंगे केले।'-दावि २८ **रोटी**-स्त्री पोळी, चपाती, पाव, कणकेची भाकर [ दे प्रा रुप्पिया रोटग, हिं रोटी ] ०**मागणें**-(महानु) घासदाणा मागणें (एक प्रकारचा कर) 'रोटी मागे सातें पातलीं।'-शिशु १६२ ०**पात्र**-न चपाती किंवा भाकरी खाण्याची थाळी. 'वीं राव घेउन रोटीपात्र। भो-न करी श्लाघ्यत्वें।'-नव २१ ११ ०**पीर**-पु पिराचा प्रसाद 'रोटीपीर पाठविला।'-ऐपो१८ ०**व्यवहार**-पु एकमेकाच्या हातचें खाणें, अन्नव्यवहार ०**सुटी**-स्त्री भरीतरोडगा 'बहिरव खंडेराव। रोटीसुटीमाटी देव।'-तुगा७९१ **रोट** पु केशर, साखर, बदाम दूध इ० घालून केलेली रव्याची जाड पोळी

**रोटी-ठी**—स्त्री फुलें येणारें झुडूप

**रोटी-टी**—वि (ना) खेळात लबाडी करणें किंवा चिडणें

**रोठ**—पु विरोध -मनको

**रोठा-टा**—पु नारळाच्या झाडास लागणारा किडा हा नारळाचें झाड खोडांतून खराब करतो -कृषि ७१७

**रोठा-टा, रोठी-टी**—पुली पिकून तयार झाल्यावर झाडावरून काढलेली सुपारी, मोठी पादरी सुपारी 'क्षीर न खाय खळाची प्रभु विदुराच्याचि जेवितोचि कण्या। आवडतिच्या सुपाऱ्या रोठ्या वरवट्या, नव्या जुन्या चिकण्या।'-स्फुट आर्या

**रोंठेलाट, रोंटेलाट**—स्त्री. (क.) १ दुसऱ्याला फसविताना स्वत च फसणें, दुसऱ्याला खड्यात पाडताना आपणच खड्यात पडणें (हा शब्द एका सुपाऱ्याच्या व्यापाऱ्याच्या मूर्खपणाच्या कृत्यामुळें रूढ झाला गिऱ्हाइकाला चांगल्या सुपाऱ्यांच्या ऐवजीं वाईट सुपारी देताना, चांगली देऊन शिवाय त्यानें वाईट सुपारीहि मोफतच दिली व अशा तऱ्हेनें तो फसला यावरून वरील अर्थ रूढ) २ अतिशयपणा, वैपुल्य, उधळेपणा

**रोठ्या**—वि (व) मूर्ख, धडधाकड परंतु मद्दड, टोंब्या. (मनुष्य)

**रोड**—पु मोठा रस्ता 'मुंबई रोड, टिळक रोड इ०'[ इं ]

**रोड, रोडका-गा**—वि कृश, बारीक, क्षीण, वाळलेला; शिंगटा, फाटक्या अंगाचा, रोडावलेला 'जें स्थूल ना रोड।' -विपू २ ३८ [ स रुद्=रडणें, रुद्र -रुड्ड -रोड (=रडका, वाळलेला, आसवें ढाळणारा -भाअ १८३३, का रोडि ] ०**मल्ल**-पु (विनोदानें) अत्यंत कृश मनुष्य [ रोड+मल्ल ] **रोडगेला**-वि साधारण रोडका, जरासा काटकुळा, बारीकसा **रोडणें, रोडावणें, रोडेणें, रोडेजणें**-अक्रि (राजा) (काव्य) रोड होणें, कृश होणें, वाळणें, सुकून जाणें, खराब होणें. 'शरीर अत्यंत रोडलें। तें सूर्यनारायणें रक्षिलें।' **रोडिंकपण**-न (महानु) कृशता, क्षीणता, बारीकपणा 'काई पुर्तो रोडिंकपण।'-शिशु १२० **रोड्या, रोडा**-वि (निंदनें) कृश, अशक्त, फाटक्या अंगाचा, बारीक

**रोडकी**—स्त्री कोकिळेच्या जातीचा एक पक्षी

**रोडगा**—पु रोटगा, रोट आठ भाग गव्हाचें पीठ व एक भाग हरभऱ्याचें पीठ घेऊन त्यात ओंवा, हिंग, मीठ, दूध घालून त्याची जाड पोळी निखाऱ्यावर भाजली म्हणजे हा रोडगा होतो -योर १ ७५

**रोंडनारो**—वि (खा भि) तोडणारा 'एक लाकडें रोंडनारो खाडी तेडी ल रडे रोंडतलो '-भिल्ली १५

**रोडा**—पु रक्तरोडा (वनस्पति) पहा

**रोडा**—पु भाजलेल्या विटेचा तुकडा, दगडाची कपरी, [ हिं ] **रोडी**-स्त्री १ विटाचे दगडाचे तुकडे, रस्त्यासाठीं खडी. २ बारीक बारीक दगडाचा ढीग, रास, दगडधोंडे.

**रोंडी**—स्त्री (ना) रडी चिडणें रडी पहा 'असत्याची खाईल जे रोंडी। तिजवर पडो आकाशाची धोंडी।'-मध्व १६८

**रोणदिवी**—स्त्री (प) रोवणदिवी पहा

**रोणसा**—वि (गो) रोडका, कृश

**रोत-थ, रोत(थ)णें**—रोवथ, रोवथणें पहा

**रोती सुरत**—स्त्री रडकी मुद्रा रडगा, दु खी चेहरा, तोंड (कधीं हसतमुख नसणाऱ्याबद्दल योजतात) [ हिं ]

रोद—स्त्री विना (महानु) पंदराचें किंवा वडाचें नांव 'रोदेचीं सोनें केलीं।' –ऋद्ध ९८०

रोदन—न रडणें, शोक, रुदन 'न साहे वियोग करिती रोदना। भ्रमिष्ट भावना वहाचिया।' –तुगा १०९ [स]

रोदा—पु आंतड्याची केलेली तांत, तांत; तार [फा रूदा]

रोद्द—पु (शा) रोज 'ती रोद्दिही हाकाली उठौन ' –भिशी २७ [रोज, तुल० सं रौद्र, प्रा रोद्द=अहोरात्रीचा पहिला मुहूर्त]

रोध—पु १ विरोध, अडथळा, प्रतिबंध, अटकाव 'तैसें धृतिरोधें तया। पांचाही केलें।' –ज्ञा १८ १०१५ २ विरोध, शिरकाव न होऊं देणें; भरून गेल्यामुळें बंद होणें उदा० द्वाररोध, मार्गरोध [स] रोधणें–सकि १ (घाट, रस्ता) बंद करणें, अडविणें 'उठा, एकीकडे बसा कोणी सोंवळ्यानें ज णार यणार त्याची वाट रोधू नका' २ प्रतिबंध, अडथळा आणणें, विरोध करणें, कोंडणें 'तपोबळें स्वसामर्थ्यें। मार्गपथीं रोधिला।' –मुआदि ११ १३३

रो(रो)प-पा—नपु १ लहान झाड, कोंवळें झाड 'कीं सतोपतरूचें रोप। थांबलें जैसें।' –ज्ञा ६ २५६ २ धीं पेरून रुजल्यानंतर उपटून व्यवस्थित लावावयाचें रोप ३ (ल) पुढें मोठें होणारें व सध्या लहान व नुकतेंच ज मलेलें किंवा उत्पन्न झालेलें आशास्थान 'चक्रवर्तीचें हें रोप।' –र २२ रोपटा-डा पु लहान, फोफावणारें परंतु उपटून दुसरीकडे लावता यण्याजोगें (आंबा फणस इ० चें) झाड –शके १२८९ चा नागाव शिलालेख रोपटा–पु रोप तयार करण्याकरता भाजून, खणून इ० प्रकारें तयार केलेली जागा रोपटें-डें–न फुलझाडाचें किंवा भाजीपाल्याचें रोप लहान झाड रोपण–न १ लावणी, परणी २ बीजसंभव आरोपण, आधान 'गर्भीं प्रभुचें पाहुनि रोपण। तव्हांच केला दुर्घट हा पण।' –ऐपो २०९ २ दूषण लावणें, आरोप करणें दोष देणें रोपणें–सकि (काव्य) १ (झाड) लावणें पेरणें रोवणें २ खुपसणें, खोंव सणें, घुसविणें रोवणें –अकि घुसणं, आंत जाणें, शिरणें, शिरकणें रोपदळ न (कों) नारळ–सुपारीचीं रोपें, लहान झाडें (दुसरीकडे उपटून लावण्या योग्य अशीं) 'आमचे वाडींत रोपदळच बहुत आहे, झाडें नाहींत' रोपलावणी–स्त्री (इट) काढलेलें रोप शेतात योग्य खत घालून व चिखल करून लावणें रोपा–पु १ (सामा) रोप पहा २ (कों) नारळ यण्या पूर्वीचें नारळाचें झाड माडा रोपाचें भात न लावणीचें भात; रोपें लावून आलेलें भात रोपी–स्त्री (कों) रोप सुपा रीचें लहान, केंवळें झाड (सुपारी यण्यापूर्वीचें)

रोप—पु बाण 'दुर्योधननृप मूर्छित केला भेदुनि उरात रोपानें।' –मोभीष्म ४१ [स]

रोपित—न रोपारोप, (क्रि० करणें) –वि. लावलेलें, पेरलेलें (बीं), स्थापित [स रोप]

रोपीटोपी—वि (बालभाषा) चिमुकलें, लहानसें, इवलेसें. [टोपी ?]

रोप्य—न चांदी रौं –वि चांदीचें, रुप्याचें [स रौप्य] ०मुद्रा–स्त्री चांदीचें नाणें, रुपया

रोब, रोआब—पु धाक, दरारा, सत्ता वत दबाव 'तेव्हां हें बादल सल्तनतीचे बेहबुदीची पातशाहीचे दाब–रोबीची सर्का रांनुन अमलात आली' –रा १२ १२ 'हा दाबरोआब सर्वांना दिसों लागला' –रा ७ खल्प, २० २७ [अर रुआब]

रोवटणें, रामटणें—सकि (राजा) खुपसणें, (डोळा, मातीचा गोळा, पाट इ० कांमध्यें बोट, लाकूड, कटयार इ०) भोसकणें; जोरानें दाबून आंत शिरकाविणें, आंत चेपणें, दाबणें

रोवरा—रूवरू पहा

रोंपाट—न (पु) १ शिमग्यांतील खेळकऱ्याचा जमाव (आरडाओरड करीत जाणारा), घोळका २ (ल) गोंधळ, गडबड रोंमा पहा

रोंबें, रोंबी—न स्त्री (कों) दूषित रक्त काढण्याची तुबडी.

रोंभा, रोंभाडा—पु (ना य) १ घोटाळा, पसारा, लिगाड 'लग्नाचें काम म्हणजे सगळ्या सुखाचा रोंभाडा' २ आक्रोश, ओरडणें ३ घोंटाळा, बाधा 'रोंम्यात पडलें काम'

रोम—न शरीरावरील केस, लव [सं] ०कूप–पु शरी राच्या कातडीवरील फार बारीक भोंक, रोमाचें छिद्र [स] 'ज्याचे रोमकूपीं ब्रह्मांडकोटी। तो हरि वैकुंठीं नांदत।' –एभा २४ २६० ०बीज–न केसाचें मूळ 'तव बाहेरी विरूढी करप। रोमबीजाची।' –ज्ञा ६ ३३४ –रंध्र–न १ त्वचेतील सूक्ष्म छिद्र, रोमकूप पहा 'त्याच्या सर्व रोमरंध्रातून घाम आला म्हणजे ताप निघेल' २ (सामा) रोम, केस 'रोम रोमि चैतन्य खेळवी राष्ट्राच्या ईश्वरा।' –राष्ट्रीय पद्यमाला [रोम + रंध्र] ०रक्षा रोमरक्षा व्यतीपात–स्त्री अव पु एखाद्या कामाचा निरर्थकपणा दाखविण्याकरिता ह शब्द योज तात उदा० 'त्याचे कां तू नादास लागला आहेस, तेथें काय रोमरक्षा आहेत?' रोमरक्षा या शब्दाचा एकवचनी प्रयोग पुढील वाक्यातील धूळ, राख माती याप्रमाणें होतो 'तेथें काय धूळ आहे त्याला काय राख समजतो, तेथें काय माती मिळ णार आहे' ०राजी–स्त्री केसाची ओळ रांग [स] ०शांति–स्त्री जननेंद्रियावरील केस वाढणें [स] ०शुद्धि–स्त्री केस नसणें केशरहितपणा 'रोमशुद्धि जैसी। तव्हातासी।' –ज्ञा १७ २३५ ०हर्ष–पु अंगावरचा काटा, रोमांच पहा ०हर्षण–

न. १ रोमांच उभे राहणें. 'मग त्याच्या अंगावर रोमहर्षण होणें तर दूरच.' -सामं २.१७४. २ भय, धाक दाखविणें. 'तुम्ही टासून राहावें म्हणजे त्यांच्यानें रोमहर्षण होत नाहीं.' -माव १४. ०हर्षवायु-पु ज्यांत रोमांच उभे राहून फार हर्ष येतें असा वातविकार. रोमागणित-क्रिवि. प्रत्येक केंसाबरोबर; केसागणीत. रोमांच-पु. अतिशय आनंद, भय, प्रीति, इ० विकारांच्या प्राबल्यानें अंगावर उभा राहणारा कांटा; अंगावरील केंस (लव) ताठ उभे होणें 'आपाद कंचुकित। रोमांच आले।.' -ज्ञा ९.५२७. रोमांचळ-पु. काटा; रोमांच. 'आंगीं रोमांचळ उठीले।' -उषा ६२.६. रोमांचित-वि. १ आनंदातिशयानें किंवा इतर विकृतीमुळें ज्यावर केंस उभे राहिले आहेत असें (शरीर); ज्याच्या अंगावर कांटा उभा राहिला आहे असा (माणूस); 'रोमांचित धर्म म्हणे,•बाई गातिल तुझा प्रभाव सती।' -मोवन १३.८१. रोमावली-ळी-स्त्री. १ केसांची रांग-पंक्ति-ओळ. २ छातीपासून खालीं बेंबीपर्यंत गेलेली पोटाच्या मध्यभागची केसांची रांग. 'सागरीं लहरींची नव्हाळी। तैसी उदरीं त्रिगुण त्रिवळी। वर्माकर्म रोमावळी। बहिर्मुख पाडलिया।' -एभा १.३६. [सं. रोम + आवलि] रोमाळ-वि. केंसाळ; फार केंसाचा. 'एक अरत्नाकार रोमाळ।' -मुआदि १०.९९.

**रोमट**—न. (गो.) शिमग्यांतील एक खेळ, रोंवाट पहा.

**रोमणदिवा-दिवली-दिवी, रोमणी**—रोवणदिवा इ० पहा.

**रोमगवाक्ष-मोड्या, रोमणी-णें**—रमणवाक इ० पहा.

**रोमंथ, रोमंथन**—पुन रवंथ, पोटात गेलेला घास पुन्हां तोंडांत आणून गुरें तो चघळीत बसतात ती क्रिया. [सं.] रोमंथक-वि. रवंथ करणारा (प्राणी).

**रोमशवेखंड**—न वेखंडाचा एक प्रकार

**रोंमें**—न. तुंबडी; दूषित रक्त काढण्याचें साधन; रोंबें पहा

**रोम्हणवाक-मोड्या, रोम्हणी-णें**—रमणवाक इ०पहा.

**रोंय-यी**—स्त्री. एक विशिष्ट आवाज (जोरानें फेंकलेल्या वस्तूचा), घुई; रों. [ध्व]

**रोयण**—न. (गो.) वाहूळ

**रोयल्ली**—स्त्री. (कु. हेट नाविक.) एक प्रकारचा लहान (गलबताचा) नांगर याला वर उलट वळलेले पाच पाय (आंकडे) असतात; रोयली

**रोराण**—न १ घुशींचा एकदम होणारा रों रों असा मोठा आवाज. २ (ल.) गोंगाट; पोरें इ० च्या ओरडण्याचा गलका किंवा गलबला, किलबिलाट ३ थोडया कारणावरून झालेलें शिवीगाळ, मारहाण इत्यादि प्रकारचें मोठें माइग [ध्व.] शको. ६.३३

**रोरावणें, रोंरोंणें**—अक्रि. (राजा.) १ गुरगुरणें. २ (दुरीनें) रोंरों असा आवाज करणें. रोंरों-अ. १ (घुशीप्रमाणें) रों रों अशा आवाजानें. २ सूं सूं करीत, बाणाच्या गतीमुळें होणाऱ्या आवाजानें. [ध्व.]

**रोंव**—पु. १ मोड आलेलें पेरण्याचें बीं; रहू; रोंप; नुसतेंच रुजून वर आलेलें बीं; कोंब. [सं. रुह्-रोह; दे. प्रा. रोव]

**रोवण**-स्त्री.न (कों. प्रां.) पेरणें.

**रोवण**—स्त्री. १ जमिनीचा मऊपणा व भुसभुशीतपणा २ (नदीच्या किंवा ओहोळाच्या. कांठाचा) जमीनीचा खच, पडझड. ३ पुष्कळ बिळें, भोकें असलेली स्थिति (जमिनीची अति लागवडीनें किंवा फुळवित्यानें, नागरल्यानें झालेली); जमिनीचा भुसभुशीतपणा. [रोवणें] ०घेणें-(खोंवडीनें) अशी उखविणें. (गो.) रोवावचें. ०दिवली-दिवा-दिवी-स्त्रीपु १ प्रवासात उपयोगी व पाहिजे तेव्हा जमिनींत रोवता येणारा एक लांब लोखंडी दांडा असलेला दिवा; टाणवाई २ (ल.) आळशी माणूस. रोवणी-स्त्री. (गो.) पेरणी. रो(रों)वणें-सक्रि. १ (खाब, खुंटी, झाड,) जमिनींत पुरणें, घट्ट बसविणें, स्थिर करणें. 'जेणें भ्रांतीपासुनि दिसतलें। गुरुवाक्यें मन धुतलें। मग आत्मस्वरूपीं घातलें। रोवुनिया।' -ज्ञा ५.३४. २ पेरणें; लावणें (बीं इ०) ३ खुपसणें; खोंचणें; टोंचणें; शिरकाविणें. 'रोंवोनि उपडिता दामणा। छिद्र शोधिता न दिसे कोणा।' -मुआदि १३.१६ ४ दाबणें; दाबून ठेवणें. 'नकारावरी पद दुजें वचलोनि रोवी।' -र ५७. -अक्रि शिरणें, घुसणें; रुतणें, आंत जाणें, टोंचणें. [सं. रोपण.]

**रोवंतणें**—अक्रि (महानु.) रोवंथणें; रवंथ करणें. 'श्रीकृष्णें नीववीलें पशु सकळ। आनंदें रोवंताती।' -दाव १४२. [सं. रोमंथ] रोवंथ-पुन रवंथ; खाल्लेलें चघळणें. [सं रोमंथ] रोवंथणें-अक्रि. रवंथ करणें; चघळणें.

**रोवळा**—पु एक माप, (केळी) खंडीचा एकदशांश.

**रो(रों)वळी**—स्त्री. १ तांदूळ, भाजी धुणें इ० उपयोगाची विशिष्ट आकाराची बांबूची परडी, दुरडी. २ पुष्कळ बारीक बारीक भोकें पाडून दरीद्र उपयोगाकरिता केलेली धातूची परडी, चाळणी [का. ओरोळगि] रो(रों)वळणें-सक्रि (तांदूळ, इ०) रोवळींत घालून धुणें रो(रों)वळा-पु मोठी रोंवळी.

**रोंवा**—पु (चांभारी, कों.) चामड्यावर नक्षी उठविण्याचें साधन.

**रोशन**—वि १ विशद, स्पष्ट; श्रुत (क्रि० करणें) 'दंदगीस रोशन होय हे अर्दास' -रा १५ ७६. २ लखलखित, सुरेख [फा. रौशन्] ०दान-पु झरोका; खाणें. ०नाईक-पु. मशालजी. ०शुद-वि. माहीत झालेला, ज्ञात रोशनाई-स्त्री.

१ (दिव्यांचा) लखलखाट; चकचकाट. २ असंख्य दिवे लावून सण करणें; दीपोत्सव; दिवाळी. ३ (ल.) आनंद; उत्साह; रमणीयता; शोभा (एखाद्या स्थळाची, प्रसंगाची). ४ आरास; शोभिवंत करणें, शृंगारणें. रोशनी-स्त्री. उजेड. रोशनाई पहा. 'रात्रीं रोशनीनें नबाब दौलाचे येथें आले.' –रा ७.१०४. [फा.] रोशनाई, रोसनाई-स्त्री. रोशनाई पहा.

रोशें, रोशेल गवत—न. एक प्रकारचें गवत. याचें तेल काढतात. –वगु ५.४५. [सं. रोहिष] रोशेल-न. रोशें गवतापासून काढलेलें औषधी तेल (वातविकारावर उपयोगी) [रोशें+तेल]

रोष—पु. राग; रुसवा; क्रोध; नाखुषी; संताप. 'रोषें प्रेम दुणवटे।' –ज्ञा ९.१८. [सं. रोष] रोषाविष्ट-वि. क्रुद्ध; संतापलेला. [रोष+आविष्ट]

रोषणें—न. अव. पहारा; रोखणी; नजर ठेवणें. 'भंवती आत्मीयाचीं रोषणें।' –उषा पृ. ९ [रोखणें]

रोस—पु. (गो.) आमटी. [रस]

रोह—पु. रोव; रुहू; कोंब; मोड; अंकुर; मोड आलेलें धान्य. [सं. रुह्] ०फरणें-धरीं रोपलीत बीं पेरणें; धान्याला मोड आणणें. रोहें-न. (कों.) अगदीं कोंवळें झाड; रोप.

रोह—पु हरिण; रोही.

रोहक—न. (व.) खटाई; खरड; पिठा; दही मरम होणें. 'कामानें चांगलें रोहकच निघालें माझें.'

रोहक—पु भूत; ब्रह्मराक्षस. 'दक्षिणेचें सौभाग्य गळसरी कोण्या रोहकाला।' –ऐपो ४१०. [सं.]

रोह(हं)क—पु (काव्य) रोख; मनाचा कल; प्रवृत्ति. 'परवस्तु चोरावया देख। अखंड लागला असे रोहंक।' [रोख]

रोहकणें—सक्रि. १ रोखणें; धरणें; अडविणें; थांबविणें. २ धरून व्यापणें; पछाडणें; वेढणें, [रोखणें; सं. रोधन; प्रा. रोहण]

रोहका—पु. (व. ना.) रवंथ. 'गाई रोहका करीत बसल्या.'

रोह(हि)टी—स्त्री. उगवलेलें धान्य; धान्य पेरल्यानंतर प्रथम दिसणारा अंकुरसमुदाय. [रोह]

रोह(हि)डा—पु १ एक औषधी झाड; रक्त-रोहिडा. २ एक किडा; विचित्रगब [सं. रोहित]

रोहंत, रोहमंत—पुस्त्री. रवंथ; चघळणें. [सं. रोमंथ]

रोहशेल—न. रोशेल पहा.

रोहिण—स्त्रीपु. मुंग्यांचें वारूळ. –शिपु. [सं. रोहण]

रोहिणी—स्त्री. १ सत्तावीस नक्षत्रांपैकीं चवथें नक्षत्र. २ नऊ वर्षांची कुमारिका. ३ वीज. ४ रोही जातीची हरिणी. ५ बलरामाची आई. ६ मृगजळ. 'नातरी मीना नाम मंगळु। रोहिणीतें म्हणती जळु।' –ज्ञा ५.११६. ७ (संगीत) एकोणिसाव्या श्रुतीचें नांव. ८ शुद्धरक्त वाहून नेणारी रक्तवाहिनी. हिला शुद्धीनें धमनी म्हणतात. ९ रोहीण; एक वृक्षविशेष. रक्तरोहिडा, मंजिष्ठ; या झाडाच्या सालीचा रंगाला उपयोग होतो. [सं.] ०जल, रोहिणीचें जळ-न. मृगजळ. –ज्ञा २.१२१. 'विश्व असत्य रोहिणीचें जळ। वाटतें सकळ भ्रांतिरूप।' –च १५७. ०पतिवर-पु. १ चंद्र. २ वसुदेव. ०रोग-पु. बाळपुळीचा रोग. 'रामकृष्ण परमहंस यांच्या दुखण्याचें पर्यवसान रोहिणीरोगांत झालें. –विवेकानंदजीवनरहस्य.

रोहिला—पु. पठाण; मुसलमानांतील एक भेद. यांच्या वस्तीवरून 'रोहिलखंड' (बरेली विभाग) हें प्रांतनाम पडलें.

रोही—स्त्री. १ गोड्या पाण्यांतील एक गोजिरवाणा मासा. २ एका जातीचा हरिण; नीलगाय. हा आकारानें बैलाएवढा, रंग काळसर पांढरा असतो. 'जंबुक चितळे रोही भेंकरें कुरवाळुन धरणें।' –ऐपो ६१. –प्रला २५१. [सं. रोहित; प्रा. रोहिअ]

रोहें-न. हरिणाची एक जात; रोही अर्थ २ पहा.

रोहो—पु. (गो.) लांकूड पोंखरणारा किडा.

रोहो—पु. १ आरंभ; सुरवात; उपक्रम, उत्पत्ति 'म्हणोनि फळाचा लागु। देखे जिये असलगु। तिये कर्मी चागु। रोहो मांडी।' –ज्ञा १८.६५२. २ वाढ, वृद्धि, दृढता. 'आणि वाढे जंव जंव मोहो। तंव तंव विषयीं रोहो।' –ज्ञा १६.३७०. ३ अंकुर [सं. रुह्-रोह]

रोहो-हू, रोहोक, रोहोकणें, रोहोटी, रोहोंत, रोहोमंत, रोहोशेल—रोह, रोहशेल इ० पहा.

रोहोपोहो—पु. १ व्यवहार; दळणवळण; येजा; घसण; घरोबा (क्रि० पाडणें; घालणें; करणें; पडणें; असणें). २ परिचय; ओळख. (क्रि० पाडणें; घालणें). [राहणें+पाहणें]

रोळ—पु. क्रम; नियम; वहिवाट; प्रघात; परिपाठ 'हा अनादिसिद्ध रोळ।' –विपु ३.५७. [तुल० इं. रूल]

रोळ—पु. रस्त्यावरची खडी दाबण्याचें यंत्र; रूळ. [इं. रोलर]

रोळणें—सक्रि. रेलणें; बळ देणें. 'बसणारानें आपलें शरीर दोन्ही बाजूस रोळीत जावें म्हणजे चाउ लागेल.' –अश्वप १.१८९. [रेलणें]

रोळणें, रो(रों)ळा-ळी—रोंवळणें, रोवळा-ळी पहा.

रोळा—पु वृष्टि, समुदाय. 'दिव्य सुमनाचा रोळा। कृष्णचौपासीं विखुरला।' –एभा ३१.३७. [तुल० इं. रोल]

रोळें—पुअव (दादर) दांते.

**रौखे**—पु.अव. (महानु.) पैसा. 'सांडोनी ईश्वराची जवळीक रौखे जोडी।'–ज्ञानप्रबोध ३१९. [रोख]

**रौंडा**—न. रुंड; धड; कबंध. 'रौंडा करी ताण्डव तुम्ही नाचविले।'–शिशु ४५०. [सं. रुंड]

**रौणक**—स्त्री. (ना.) रौनक पहा.

**रौंद(दा)ळणें, रौंदळा**—खंदळणें, खंदळा पहा.

**रौंदली**—स्त्री. (व.) रोवलेला दिवा; रोवणदिवा. [रोवण-दिवली]

**रौद्र**—वि. १ राग; क्रोध; कोप. २ नवरसांपैकीं एक रस. उदा० 'गांगेय कोपा चढला कसा रे। ज्या मानिती हाचि कृतांत सारे। इ०'–भीष्मार्जुनयुद्धांतील वर्णन. –पु. १ रुद्रासंबंधीं; शिवाचा; शंकराचा. २ भयंकर; अत्यंत भीतिदायक; उग्र; अकाळविकाळ. ३ तामसी; रागीट; रागावणारा. 'एकें रौद्रें अतिमित्रें। भयानकें एकें पवित्रें।'–ज्ञा ११.१२९.

**रौद्री**—विना स्त्री. (संगीत) आठव्या श्रुतीचें नांव. ०**पिंडी नृत्य**–न. त्रिशूलाच्या आकृतींत उभें राहून नर्तकांनीं केलेलें नृत्य.

**रौनक**—स्त्री. १ सौंदर्य; शोभा. 'दौलतींत कांहीं बाकी राहिली नव्हती, त्या दौलतीस खावंदावरोबर रौनक आणिली.'–रा ५८६. २ (ल.) महत्त्व; उच्च दर्जा. [फा. रौनक] ०**अफ्जा**–वि. १ शोभावर्धक. ही एक पदवी आहे. 'हजरत येथें रौनक अफ्जा होणार.'–रा ७.१०६. २ एक पदवी. [फा.]

**रौप्य**—न. रुपें, चांदी [सं.] ०**मुद्रा**–स्त्री. रुपया; चांदीचें नाणें. ०**शृंखला**–स्त्री. (रुप्याची साखळी) (ल) सरकारी पगार, नोकरी. 'सुशिक्षितवर्ग सरकारनें रौप्यशृंखलेनें बद्ध केला आहे.'–टि १.६४

**रौरव**—पु. एकवीस महानरकांतील एक महानरक. [सं.] –ज्ञा १६.२२६. रवरव पहा.

**रौक्ष्य**—न रुक्षत्व; काठिण्य; कोरडेपणा; कठोरपणा; तापटपणा. रुक्ष पहा. [रुक्ष]

**ऱ्याघ**—स्त्री. (रेघ) चेहरा; हजामतींतील एक प्रकार. मोद पहा. –बदलापूर ३७. [रेघ अप.]

**ऱ्यांऱ्या**—स्त्रीपु लहान मुलाचें रडणें; ट्यां ट्यां. (क्रि० करणें). २ (ल.) हताश होऊन, भिऊन मुलाप्रमाणें वागणें; रे रे करणें. [ध्व.]

**ऱ्हद**—पु डोह; नदींतील खोल पाण्याची जागा. 'तेय ज्ञान ऱ्हदीं आल्हादलें। तुझें आंग।'–माए २६९. [स. ह्रद]

**ऱ्हद**—पु (शाप) एक धातु; (इं.) ऱ्होडियम्. ही प्लातिनमशीं संयुक्त असते. **ऱ्हदवणें, ऱ्हेणें**–वि. (राजा. कुण.) राहणें. 'आठ दी रिकाम ऱ्हदवचें.'–मसाप २.११०, –लोक २.८०.

**ऱ्हस्व**—वि. (ह्रस्व) १ आंखूड; कमी लांबीचा. २ गिड्डा; टेंगणा; 'एकें कृशें एकें स्थूळें। एकें ऱ्हस्वें एकें विशाळें। पृथुतरें सरळें। अप्रांतें एकें।'–ज्ञा ११.१२४. [सं. ह्रस्व] ०**गोल**-पु. (ज्यो.) लघ्वक्षानें दुभागिलेलें दीर्घवर्तुळाचें अर्धे त्या लघ्वक्षाभोंवतीं भ्रमविलें असतां जो आकार उत्पन्न होतो तो.–सूर्य ८. ०**जंतु**–पु. अतिसूक्ष्म जंतु. (इं.) बॅक्टिरीया ०**मूर्ति**–वि. टेंगणा; गिड्डा; खुजा. ०**स्वर**–पु. ज्याच्या उच्चारणास एकमात्रात्मक काल लागतो असा (अ, इ, उ, ऋ, लृ) स्वर. **ऱ्हस्वास्थि**–स्त्री. आंखूड हाड.

**ऱ्हास**—पु. नाश; उतरती कळा. ह्रास पहा. [सं. ह्रास]

**ऱ्ही**—स्त्री. लज्जा; लाज. [सं.]

**ऱ्होव**—पु. (राजा. कुण.) रहू; कोंब फुटलेलें धान्य. रोह पहा.

---

# ल

**ल**—वर्णमालेंतील अठ्ठाविसावें व्यंजन. वर्णविकासः–पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार लेखांत, दुसरी कुशानवंशी राजाच्या वेळच्या मथुरा येथील लेखांत (इ. स. १–२ रें शतक), तिसरी झालरापाटण येथील राजा दुर्गगणाच्या लेखांत (इ. स. ६८९) व शेवटची इ. स. ११०८ मधल्या ओरिसा लेखांत दृष्टीस पडेल. –ज्ञाको (ल) १९.

**ल(इ)ई**—वि (कुण.) बहुत; पुष्कळ; अतिशय; मोठ्या संख्येचा, परिमाणाचा. लय पहा. –तुगा १४१. 'उत्तरेचा महिमा लई। जाऊनि राहा हिमालयी।'–मध्व ३५२. ०**लूट**–स्त्री. (कुण.) रेलचेल; विपुलता; ढीगचे ढीग; मोप; मस्त. लय पहा. [लई+लूट]

**लईण-न**—स्त्री. १ रांग; ओळ; रेघ. २ सैन्याची तुकडी. ३ पोलिस वगैरे लोकांच्या घरांची रांग [इं. लाइन]

**लक-कण-कन-कर-दिशीं**—क्रिवि. १ चक-कण; झककण. २ झटक्यांत; क्षणांत [लक-लख]

**लकचें**—अक्रि (गो.) तोल जाणें.

**लकट(ड)णें**—उक्रि १ (प्र.) लगटणें पहा. २ लोटणें; ढकलणें. [सं. लग्]

**लकड**—स्त्री. (कों.) १ अतिशय उंच वाढलेलें माडाच्या जातीचें झाड. २ (ल.) शरीरानें कृश, सोटासारखा उंच असलेला मनुष्य. [लाकूड] सामाशब्द– ०**कोट**–पु. मोठमोठीं लाकडें जमिनींत उभीं पुरून भिंताडासारखें केलेलें आवार; लाकडाची तटबंदी; मेढेकोट. [लाकूड+कोट; हिं. लकडकूट] ०**खाना**–पु. १ इमारतीचीं किंवा जळाऊ लाकडें ठेवण्याची घरांतील स्वतंत्र

ती हुद्दन न पडता ज्याच्या योगानें लोंबत राहते तो अश. ४ सयोगभूमि ५ जोड, दुवा (दोन पक्षातील, बाजूंतील, व्यक्तीं मधील) [सं लग्] (वाप्र) लगीं असणें-मधघ असणें, लागू असणें लगीचें काम-न ज्यात छपराला लगीचा आधार असतो तो इमारतीचा प्रकार याच्या उलट पिढपाचें किंवा पिढपापाटाचें काम

ल(लं)ग—स्त्री (कारकुनी शब्द) दुकानाच्या यादीपैकीं एखादा कालम अपुरा राहिल्यास तो दुसऱ्याच्या बरोबर करण्या साठीं पहिल्या कालमात रकमेच्या ठिकाणीं शून्य व पुढें लग शब्द लिहून पूर्णता करतात ती [लागणें, किंवा फा लन्ग= लंगडा] लगपूज-न वरीलप्रमाणें रकमेच्या ठिकाणीं लिहिलेलें पूज्य (क्रि० घालणें, देणें, मांडणें, लिहिणें)

लंग—न (कु) लहान माशाचें जाळें

लंग—वि अतिशय क्षीण व अशक्त झालेला (दुखण्यानें, उपासानें) [लगणें किंवा लघन]

लंगचो—पु (कु) चिमटा

लगट—पुस्त्री १ नेटाचा व निश्चयाचा पाठलाग (सामान्यत एखाद्या विषयाचा, वस्तूचा), (शब्दश व ल) शक्तीचा व बुद्धीचा अत्यत उपयोग करणें, सघटित व नेटाचा प्रयत्न २ जोराचा हल्ला, घालून जाणें 'तो एकाधाचि कोप रीससाक योध सघ करि लगट।'—मोकर्ण ३३ ११ २ पाठ न सोडणें, चिकटणें, पिच्छा पुरवणें ३ —स्त्री दाट मैत्री, घसण (क्रि० करणें, लावणें, घालणें, पाडणें) —वि चिकटून राहणारा, पाठ न सोडणारा, चिकट 'रामभाऊचा मुलगा किनई फार लगट आहे' [लागणें] (वाप्र) ०करणें-(वाईट अर्थी) जवळ जाणें, अगाशीं अग लावणें लगटणें-सक्रि १ चिकटविणें, चिकटण्यास लावणें २ मिसळणें, भेसळणें 'श्रीवर्धनचे सुपारींत भोंवरगावची सुपारी लगटतात' ३ ढकलणें, दपटणें, लाटणें, रगडणें, रपाटणें —अक्रि १ चिकटणें 'पावसाचे योगानें सगळे कागद एकास एक लगटले' २ (ल) दाट घोंस लागणें (फळें, फुलें याचे) लटकणें 'पीक पिकेल घुमरी। पुरुषार्थ चारी लगटोनि।'—एभा ६ ३०७ ३ नेटणें, भिडणें 'लगटल्ला स्वर्गाचिये सीमा।'—सुभादि २७४९ ४ पोंचणें, लागणें, पावणें, ठेपणें 'फौज येऊन किल्ल्याशीं लगटली तरी तुमची तयारी काहींच नाहीं पुढें कसें?' [स लग्]

लगट—स्त्री (वरघाटी) १ मोठी पाटी २ बैलाच्या पाठी वर-पाणी आणण्यासाठीं-ठेवावयाची लोखडी चौकट लगड, माकण

लगड—पु वहिरी ससाणा, कावळ्यासारखा एक मासभक्षक पक्षी 'लगडझगड जळखडे वाटोवाट।'—ऐपो २४२

लगड—स्त्री सोनें, चादी इ० धातूची काब, वीट.

लगड—स्त्री माकण, पशूच्या पाटीवर घागर ठेवण्याकरितां केलेली लाकडी किंवा लोखडी चवकट, पशूंच्या पाटीवरील घागरी लगट पहा 'नदीच्या गावीं लगडीनें पाणी आणतात' २ ओझें. —दार.

लगडणें—अक्रि १ लगट करणें लगटणें पहा २ फल-पुष्पांनीं गजबजणें. 'सत्संगाचे निजमेळीं। परमार्थ आय पाल्हाळीं। लगडोनि ये स्वानदफळीं। सर्वकाळीं सफलित।'—भारावाल १. १६.

लंगडणें—अक्रि लंगणें, एक पाय अधू असल्यामुळें दुसऱ्या पायावर भार देऊन चालणें, पाय काढीत, वेडेवाकडे चालणें [स लग्-लंग, फा लगीदन, हिं लगडना] लंगडणी-स्त्री एक पाय अर्धवट किंवा न टकता उडया मारीत चालणें लंगडदीन-वि लंगड्या मनुष्यास थट्टेनें म्हणतात लंगडशाई-शावी-स्त्री १ लंगडत चालणें (क्रि० घालणें) २ लहानांचा खेळ एक पाय आखडून धरून दुसऱ्या पायावर उडत चालणें (क्रि० घालणें, करणें) —वि लगडा [लगडा] म्ह० लगडशादी पायात वादी

लंगडा-वि १ एक पाय आखुड किंवा अधू असलेला. २ अधू, पगू, हतशक्ति, विकल, व्यगी (पाय, हात इ०नें-मनुष्य, पशु) २ (ल) (एखाद्या जरूर असलेल्या मनुष्याच्या किंवा वस्तूच्या अभावामुळें) पगू, कमजोर, निकामी (काम, यत्र, इ०) 'एक बैल नाहीं यामुळें नागर लगडा झाला' म्ह० लगडच्या लंगड आन गावखोरी पण चरेना लंगडी-स्त्री एक खेळ, एक पाय दुमडून दुसऱ्या एकाच पायानें उडया मारीत चालणें ०कोशिंबीर-स्त्री एक मुलींचा खेळ —मखेपु २७१ ०सबब-स्त्री तुटपुंजें, अप्रयोजक, अप्रमाण कारण, अपुरें निमित्त, असमर्पक कारण 'वजनदार पुढाऱ्याना काहीं लगड्या सबबीवर एकत्र व्हावें लागलें'—के १७ ५ ३०.

लगडत(थ)गड—स्त्री (साहित्य किंवा फुरसत नसल्या मुळे) काम अपुरें करणें, रपाटणें, रगडणें. 'लाकडें पुरतीं नव्हतीं आणि पर्जन्य तर आला आगावर तेव्हा लगडतगड करून एकदाचें घर बाधलेसें केलें' २ अनेक मसलती, बेत योजणें, अनेक उपाय, क्लृप्ति काढणें ३ —क्रिवि कसें तरी, निष्काळजीपणानें, वरवर. [ध्व]

लंगणें—अक्रि (ग्र) लगडणें, लगडत चालणें

लंगणें—अक्रि दुखणेकरी, रोड होणें, वाळणें [स लघन]

लगत—स्त्री १ जोड, सधि, जोडलेपणा, समीपता, भिडून असणें (जमीन, शरीर इ० चें) 'या स्थळास नदीची लगत आहे' २ सोयरीक नातें ३ दाट परिचय, घसण 'ही गोष्ट त्याजपाशीं बोलायाइतकी त्याची आमची लगत नाहीं' —क्रिवि १ जवळ, समीप, सनिध 'दसरा नवरात्राचे लगत आहे म्हणून

फोण्ही नवरात्रांतच घालतात ' २ लागोपाठ, लगोलग ' लगत तीन चिठ्ठया पाठविल्या तेव्हां तो निपून आला ' ३ अनुक्रमानें, खंड न पडता (कालाचा, स्थलाचा) ' एथून लगत तीन दोनें आमची आहेत ' [लाग] सामाशब्द- ०मजकूर-पु परिच्छेद, भाग न पाडलेला (लेखी किंवा तोंडी) मजकूर, लागोपाठ मजकूर तुटक मजकुराच्या उलट ०लाखोटा-पु १ हुंडीपत्राचा इ० मजकूर आत लिहून त्याच हुंडीपत्रास चिकटवून पाठविलेला कागदाचा लाखोटा, हुंडीला चिकटविलेली आणि हुंडीबरोबर घडी घातलेली सूचना आत असणारा लाखोटा २ आंतील मजकूर व वरील पत्ता निरनिराळ्या पदावर नसून एकाच पदावर असतात तें पत्र, पत्र व लाखोटा एकच असा प्रकार ०हुंडी-स्त्री सूचनेचें पत्र सोबत असलेली हुंडी लगता-पु १ संबंध, जोड, जवळजवळ असणें (देशाचें, पदार्थाचें) २ शेजारीं, भिडून असणारा प्रदेश, सरहद्द प्रदेश, सीमाप्रांत ' यंदा करनाटकच्या लगत्यास चांगलें पीक झालें ' -वि लागून, जोडून असलेला ०जाब-पु १ लगतलाखोटा, हुंडीबरोबर घडी करून हुंडीला चिकटविलेलें हुंडीच्या सूचनेचें पत्र २ हुंडीच्याच लिफाफ्यात लिहिलेली हुंडीसबंधी सूचना, जाब ०लाखोटा-पु लगत लाखोटा पहा ०लोळ-पु १ मागें लोंबणारा वस्त्राचा घोळ, मागें फरपटणारें वस्त्र २ मालिका, माळ, लांबण (क्रि० लावणें, लागणें) ३ शर्तें, मळे, झाडें इ० कांची लांब मालिका, आश्रिताची, पदार्थाची, साधनें-उपकरणीं यांची लांबच्चक मालिका, गाडी लगताळ-स्त्रीपु माला, माळका, हार, एकसारखा क्रम (क्रि० लावणें, लागणें) लगताळा-ळ्या-वि १ चिकट, पाठ पुरविणारा, तेलगमट २ अंगावरील वस्त्राचा घोळ मागें टाकणारा, कपडे फरपटवीत जाणारा (ल) गबाळ, मोंगळ लगती-वि १ विवाहानें संबंध असलेला, सोयरीक असणारा, सोयरा, नातेवाईक 'तुम्ही पडला श्रीमंताचे लगती, तेव्हां तुम्हास असें कसें बोलावें?' २ स्नेहाचा, प्रीतीचा [लगत]

लगतग—स्त्री १ एखाद्यानें ठेवलेली ठेव बळकावणें, लबाडीनें तिचा अपहार करणें २ एखाद्या धंद्यातील लबाडी, अप्रामाणिक व्यवहार

लगतन्या—स्त्रीअव लक्तन्या पहा (क्रि० निघणें, काढणें)

लगदन—न (राजा) (मांस, कणीक इ० च्या) गोळ्याचा हातानें, तोंडानें तोडलेला तुकडा, लचका (क्रि० घेणें, तोडणें) [लगदा]

लगदा—पु १ लादा, भिजवून, चांगला मळून केलेला गोळा (चुना, चिखल, कणीक इ० कांचा) २ एक घास होईल एवढा मांस इ०काचा गोळा, लचका ' रिपुहृदयाचे चि तोडिती लगदे । -मोकर्ण २१ २१ ३ घट्ट पदार्थ (चिघळणारा गूळ, पळपळीत भात इ०) ४ (समासांत) पचपचीत व मऊ (भात, पीठ, भाजी इ० शब्दांशीं विशेषणाप्रमाणें योजतात) ५ पुडका गोळा, गुंता (रँग, कागद, पानें इ०चा)

लगद्रा—पु १ लाखेचें पुरण, लाखेचें मढवण (दागिन्याना केलेलें) २ पागडीचा एक प्रकार, लाखेनें मढविलेली पागडी ३ (ल) खोटें सोनें

लगधग—स्त्री १ (घाईनें, घाबरीनें) जाणें, येणें, काम करणें, झटपट, लगबग, चपलता २ गडबड, धावपळ [ध्व]

लगधगी-ग्या-वि चपळ, चलाख [लगधग]

लगन—न (प्र) लग्न, विवाह [स लग्न, हिं लगन]

लगनकळा, लगनघटका, लगनचिठ्ठी, लगनचुडा, लगनटका, लगनटीप, लगनसराई—लग्नकळा इ० पहा

लगफग—क्रिवि जोराच्या वाऱ्यानें कपडा इ० कांच्या फडफडण्याप्रमाणें आवाज होऊन; फडफड [ध्व]

लगबग—स्त्री १ घाई व गडबड, त्वरा, उतावळी ' लगबग उठला हे राजभ्रंवेस जाली ।'-सारुह ४ ७१ २ झटपट, चलाखी ३ उत्सुकता -क्रिवि (काव्य) घाईनें, गडबडीनें, त्वरेनें, लगबगा-गें-क्रिवि (काव्य) घाईनें, गडबडीनें ' लगबगें येईजा ।'-नव १२ ११२ लगबगी-ग्या-वि सदा घाई असलेला, अतिशय उतावीळ लगबगून-क्रिवि (क्वचित् काव्यांत व अशिष्ट भाषेंत) घाईनें, गर्दीनें [लगबगणें क्रियापदापासून]

लगभग—क्रिवि (चुकीन) सरासरी ' लगभग बारा वर्षे झालीं त्या गोष्टीला ' [लगोलग हिं]

लगम—स्त्रीपु लगाम पहा

लगर—स्त्री (प्रा) (मोत्याचा, फुलाचा) सर [?]

लगर—वि (प्रा) आडदांड, उमेट, बदखोर [लगर?]

लगर—स्त्री (व) लांबण, मालिका ' मालाच्या दुव्याची लगर लागली '-वि (व) दीर्घसूत्री, चेंगट लगरी-वि लगर

लंगर—पु १ गलबताचा लोखंडी नांगर २ लोखंडाची मोठी साखळी ३ (ल) साधारण प्रमाणापेक्षा मोठा, अवजड पदार्थ (दागीना, तोडा, साखळया, दोऱ्या इ०) 'सव्वा शेराचा लंगर ज्यानें हातामधीं घातला।'-ऐपो ७१ ४ चुना, पोहे इ० कुटण्याचें एक यंत्र ५ मोहरमच्या सणांत फकीरास वाटतात तें अन्न, शिधा ' अनुहत लगर बाजे । फकीर दरवाजे दरवाजे ।' 'शहर मजकुरीं पेशजी मोंगलाई अमलांत दररोज लंगर पांच सात पल्लें धान्याचा चालत होता '-वाडथोमारो २ २७२ ६ मठ [फा लङ्गर] (वाप्र) ०तोडणें-(माण) जत्रेंत खंडोबापुढें पुजाऱ्यानें लोखंडी साखळी तोडणें सामाशब्द- ०खाना-पु १ अवाढव्य, विस्तीर्ण कारखाना २ (ल) जेथें दाद लवकर लागणें कठिण असें सस्था प्रकरण इ०, अजगर ' गुरु गोविंदसिंगाच्या जयंतीच्या वेळीं जो लंगरखाना उघडण्यांत आला होता त्यांत

खाना, लाकूडपर २ लाकडांची वखार [ लकूड+खाना, हिं लकड खानह् ] ०दिवी–वि रोडका, लुकडा, उंच व कृश [ लाकूड+दिवा ] ०वाला–पु इमारतीची किंवा जळाऊ लाकडें विकणारा [ हिं ] लकडा–पु १ मोठी काठी. २ वाळलेला, रोड झालेला मनुष्य 'त्याचा लकडा बनला' ३ वाळलेला व लाकडासारखा कडकडीत झालेला पदार्थ ( कपडा, भाकर पाळलेलें झाड इ० ) लकडी–स्त्री १ लाकडाप्रमाणें घट्ट होईतोंपर्यंत कढविलेला उंसाचा रस; लाकडासारखा कडक झालेला गुळाचा पाक गुळाचा एक प्रकार २ लाकूड, काठी जोंधळ्याचा एक प्रकार [ हिं ] (वाप्र) लकडी घांचून मकडी घठ(ळ)त नाहीं–मारझोडेशिवाय सौम्य उपायांनी वंद होत नाहींत, त्याला मारच पाहिजे [ लाकूड+मारड ] लकडी कोट–पु लक्कडकोट पहा लकडी पूल–पु नदी इ०कावर बांधलेला लाकडाचा पूल लकडी पेंढी–स्त्री (वों ) दोळीकरिता मुलानीं घरोघर फिरून मागितलेलीं लाकडें, ओंडके व गवत इ० (व्यापकार्थी) लकडघा–वि उंच आणि लुकडा [ लकड ]

लकडा–पु १ गवताशीं लागणारें, ओल्यासारखें वाटणारें निरर्थक काम निकड तगादा, नेट, आर्से ( देणें, ससार, इ०चें ) ( क्रि० लावणें लागणें, धरणें ) (वाप्र ) ०लावणें–तगादा, निकड लावणें; स्वस्थ बसु न देणें, कांहीं सुचु न देणें

लक्तर–री—स्त्री १ चिंधी २ फाटलेली वस्तु, वस्त्र इ० [ स लक्तक ? तर्, लक्त्=लाव ] लक्तरच्या–स्त्रीअव १ चिंधड्या तुकडे (वस्त्राचे) (क्रि० निघणें, होणें, काढणें ) २ फाटलेलें वस्त्र जीर्ण कपडे [ स लक्तक, फा लत्र् ]

लक्ताड—वि (व ) हुज्जतखोर, वज्जेदलाल [ लचका+तोडणें ? ]

लक्लुराय—न ( गो ) प्रेमळपणा, प्रेम

लकपक—वि चकपक चापचोप, ठाकठीक, नीटनेटका, छानदार [ लक द्वि ]

लकब—स्त्री १ मार्दद सवय रीत, दुर्गुण, खोड 'हुसन्यास बडावू लागल्यापासून त्याला तातरें बोलण्याची लकब लागली' २ घाटणी, पद्धति, शैली, ढब 'बोलण्याची चालण्याची, लिहिण्याची लकब' ३ आसक्ति, व्यसन [ अर लक्ब्=टोपण नाव ]

१ लकलक—वि क्रिवि चकचकीत, झणझणीत, लक (बीज, झिल्ईची भाडीं इ०प्रमाणें ) दिपल्याप्रमाणें ( क्रि० करणें, हाणें ) 'त्याची भाडीं पहा कशीं लकलक करतात तीं' [ अनुकरण, लक द्वि ] ०करणें–( पित्तक्षोभ इ० मुळें डोळ्यापुढें लकलक होणें, वाजतें वर्ण. 'कान्हे उपासानें आज डोळ्यापुढें लकलक करतें' लकलकणें–अक्रि १ चकचकणें, प्रकाशणें २ लकलक करणें

लकलकाट–पु चकचकाट, उज्ज्वलता, अतिशय प्रकाश, तेज, लकलकी लकलकी–स्त्री, चकचकाट, चकचकी, उज्वलता. लकलकीत–वि १ चकचकीत, झगझगीत. २ (ल ) स्वच्छ, निर्मळ, नामी, लक, लकपक, मकपक ( मनुष्य, वस्त्र, सामान इ० ) ३ ( उप ) साफ, उघडा, नागवा, मुनका, सुना 'दोन दागिने होते ते चोरानें नेले आता ती लकलकीत झाली' 'झाडें तोडून मोडून रान लकलकीत करून तेथें विहिरा बांधू लागला'

लक(व)वा—पु वातरोग, अर्धांगवायु

लकसप(फ)कस, लकसकस—क्रिवि (व ना ) घाईघाईनें [ लक+स(सदृश) द्वि ]

लक्का–क्का—पु कबुतराची एक जात याची दुम नेहमी उभारलेली व पसरलेली असते, मानेचा झोंक नेहमीं पाठीकडे असतो –मराठी ३ रें पु (आ ८) पृ ६८ [ अर लक्का ]

लंका—स्त्री तयरसूची एक जात कृष्णा आणि गोदावरी या नद्यामधील भागातील लवारास म्हणतात –कृषि ४१९ [ स ]

लंका—स्त्री १ रावणाची राजधानी २ सिंहलद्वीप, सीलोन बेट ३ राक्षस, वानर, झाडें इ० काढ्या दारूच्या केलेल्या आकृती, दारूचीं झाडें ४ ( विनोदानें, निंदेनें ) लहान पोरगी (व ) केस पिंजारलेली, धड नीट नसलेली गयाळी मुलगी ५ जारिणी, स्वैरिणी स्त्री [ स ] म्हण० १ (व ) लंकेत जन्मले तितके राक्षस=वाईट कुळात चांगलीं माणसें जन्मणें शक्य नाहीं, याअर्थी २ लंकेत, लंकेस सोन्याच्या विटा=लंकेत पुष्कळ सोनें असलें तरी त्याचा आपणास काय उपयोग ? ( मिळकतीप्रमाण खर्चहि जास्त या अर्थानंहि वापरतात ) (वाप्र ) ०लुटणें–अवाढव्य संपत्ति मिळणें ०होणें–(गो ) सौंदर्यवान, सालंकृत होणें सामाशब्द– ०दहनसारंग–पु (संगीत) एक राग यात षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पचम, कोमल निषाद हे स्वर लागतात धैवत स्वर वर्ज्य जाति षाडव–षाडव वादी ऋषभ संवादी पचम गानसमय मध्याह्न [ स ] ०लूट–स्त्री अगणित संपत्ति मिळविणें, लंका लुटणें पहा लंकेची पार्वती–स्त्री (लंकेला जाऊनहि गोसाविणीच्या वेषात असणारी शिवपत्नी, पार्वती ) १ जिच्या अगावर एकहि दागिना नाहीं अशी उच व रोडकी स्त्री २ ( सामा ) अलंकाररहित सवाष्ण स्त्री. ज्यांवर खोगीर, जीन वगैरे काहीं नाहीं असा रोडका घोडा लंकेश्वर–पु लंकाधिपति रावण 'अहा रानींचिया पालेखा.रा । नेवाणें करविजे लंकेश्वरा ।'–ज्ञा ११ २३ [ लंका+ईश्वर ] लंकोदय–पु तारे, ग्रह, राशी यांचा सीलोनातील उदयकाल यास चरसंस्कार करून वाटेल त्या ठिकाणचे त्या त्या खगोलाचे उदयकाल काढतां येतात कारण या शहरावरून पहिलें याम्योत्तरवृत्त जातें अस

मानतात ई उज्जयिनीच्या याम्योत्तरवृत्तावर आहे ' मेषाचा लंकोदय चार घटका अडतीस पळे '

**लकाटणें**—अक्रि अतिशय चमकणें, स्पष्ट दृष्ट होणें, लक लकणें, झळकणें. [ लखलख ] **लकाकणी**-स्त्री चकाकणी, चमकणी, झळकणी **लकाको**-स्त्री चकचकी, चकाकी, उज्वलता पराकाष्ठेची रोषणाई, तेज, तजेला [ लकलकी ]

**लकार-ऱ्या, लकारविद्या-विद्यांतला**—वि (ग्राम्य) लुच्चा इ० शब्दाचा ल ने आरंभ होतो यावरून सांकेतिक) लबाड, लुच्चा, लफंगा इ० **लकारी**-स्त्री (सांकेतिक) लबाडी लुच्चेगिरी लबाडी शब्दाशी हा जोडून योजतात उदा- लबाडी लकारी

**लकारी, लकीरी**—पु एक जात व तिच्यातील एक व्यक्ति हे लोक लाखेच्या बांगड्या, कंगण्या व इतर अलंकार करतात व रोगणें ( वार्निशें ) बनवितात [ लाख+करणें ]

**लंकिन कांट**—पु ( नाशिक ) जरीच्या कांटाची जात -ज्ञानप्रकाश ९ ११ ११ ३१

**लकिरी**—स्त्रीपु ( सामा ) लकेरी पहा

**लकीर**—स्त्री रेषा, रेघ, पंक्ती, ओळ [ हिं ]

**लकीरी लकेरी**—स्त्री १ तेज, चकाकी जिल्हई २ ( ल ) माधुर्य, मोहकता, ढबदारी, चित्ताकर्षक गुण ( गाण्यात, बोलण्यात इ० ) ( क्रि० मारणें ) ३ सुगुण, छटा, वास गंध ( रंग, स्वाद, राग इ० मध्यें एखाद्या परक्या गुणाचा ) (क्रि० मारणें ) ' गोल्या रंगात कोणत्याहि रंगाची लकेरी पाहिजे असल्यास ' -मॅरट २३ ४ काठ किनारी ( किनखाबाची जरीची, रेशमाची इ० ) ' या इंग्रजाचें सूत चांगलें आहे पण लकेरी चांगली नाहीं ' [ लक् ! ]

**लकीलक**—वि क्रि वि लकलकीत पहा ' झाडें तोडून मोडून रान लकीलक करून तेथें किल्ला बांधू लागले '

**लकुच**—न एक फळ, लिकुच ' लकुच कटुचि अमृतवरा करवी हीं शर्करेंत घोळविला । '-मोवन ९ ६८

**लक-चक-लख**—न १ वीज इ० कांचें तेज स्फुरण होणें किंवा तसा भास होणें, लकलक करणें, चकचमक ' अकस्मात् वीज चमकताच माझ्या डोळ्यापुढें लक झालें ' २ आकस्मिक भीति, आकस्मिक दुःखाचा धसका, धक्का -वि १ स्पष्ट, ठस ठशीत २ चकचकीत, झगझगीत इ० लखलखीत पहा ३ उघडा बंब, अगदी नागवा ४ वकळक, निर्धूत, उघडा ( नग्न गोसावी ) ५ छानदार, सुरेख [ ध्व ] ( वाप्र ) **लक भाजडी फड्डा उजो-( गो )** नसता खर्च करून ऐट मारणें

**लकड, लक्कडकोट लक्कडखाना**—( प्र ) लक्कड, लक्कडकोट इ० पहा

**लक्कन, लक्कन, लक्कर, लक्कदिशी**—क्रिवि १ लक्कन पन कर दिशी इ० पहा २ झटकन, चटकन, पटकन, क्षणांत [ ध्व ]

**लक्तर**—न लत्तर पहा

**लक्ताळ**—वि ( व ) बेशरम, निर्लज्ज लत्ताड पहा

**लखणी**—स्त्री पेंग झोपेमुळें येणारी डुलकी ( क्रि० देणें ) २ ( कु ) झोंप **लखणें**-अक्रि ( कु ) पेंगणें, डुलकी येणें [ स. लख्=झालणें ]

**लखपचोतरी-शी**—स्त्री १ ( लाख संख्येवर आणखी पाच ) खोटें किंवा भरमसाट अवास्तव बोलणें, थाला, गप्पा २ ( कांहींच्या मतें लाख सारविणें यावरून) पोकळ जिव्हाई, दिखाउपणा, असत्य बोलणें, खोटपणा ( मनुष्याचा, हृदयाचा ) -वि दिखाऊ पण पावळ, दिसण्यात चांगला पण खोटा, नकली [लाख+पच(पंच)+उत्तर] **लखपचोतऱ्या**-वि खोट्या, निराधार गोष्टी सांगण्याची, थाता झोकण्याची खोडी असलेला

**लखपति-ती**—पु लक्षाधीश, लाखों रुपयांचा मालक [ स लक्ष+पति, गुज ]

**लखमा**—पु ( क ) अर्धांगवायु लकवा पहा

**लखलख**—स्त्री १ चकचकणें, चकाकणें, चमकणें, लकलक पहा २ तीव्र क्षुधा, वखवख ( क्रि० सुटणें ) [ ध्व ] **लखडलखड करणें**-अक्रि वखवख करणें अधाशासारखें वागणें [ अनुकरणवाचक ] **लखलखणें**-अक्रि १ लकलकणें, चमकणें २ तीव्र क्षुधा लागणें [ ध्व ] **लखलखाट, लखलखी, लखलखीत**- लकलकाट इ० पहा

**लखलाभ**—पु ( लाख रुपयांचा लाभ ) १ अतिशय मोठा लाभ ' आपली भेट झाली हाच आम्हास लखलाभ झाला ' २ दुकानदारापासून एखादा जिन्नस विकत घेतला असता, गिऱ्हाइकास तो लाख रुपयांच्या योग्यतेचा होवो अशी इच्छा दर्शविण्याकरिता दुकानदार उद्गार काढतो तो ' जा, ही शालजोडी तुला लखलाभ असो ' [ स लक्ष+लाभ, हिं लख=लाभ ]

**लखलो(लू)ट लखालू(लो)ट**—स्त्रीपु वैपुल्य, प्राचुर्य, रेलचेल -वि क्रिवि विपुल, प्रचुर, रेलचेल [ लाख+लुटणें, लोटणें ]

**लखापडी**—स्त्री ( गुज ) पत्रव्यवहार लिखापढी पहा ' निरर्थक लखापडी कमी करण्याबद्दल नियम ' -( बडोदें ) खानगी खातें अपवाद ३० [ लिहिणें+पढणें, हिं लिखापढ ]

**लखेरा**—पु लाखेचे दागिने करणारा किंवा त्यास झिल्ई देणारा लकारी, लकेरी पहा [ लाख, हिं लखेरा ]

**लखोटा**—पु १ पाकीट २ बंद केलेलें पत्र लाखोटा पहा

**लग**—पु १ खांबावर आडवी टाकलेली तुळई २ आधार, लगा पहा ३ -पुशी. अवयव, अंग, सांधे इ० मोडलीं असता

वांटेल त्या माणसाला भोजन करण्यास मुभा ठेवण्यांत आलेली होती '-प्रबोध (पुणें) १६ १ ३६ ०खानी-स्त्री १ भयाकळ्य व भव्य (कारखाना, घरा, स्वाजमा इ०) २ अडाणी, सांड दांडलोकाची टोळी ०दोर-पु गलबताच्या नांगराचा दोर [द.] ०द्दाडाचा-वि मोठ्या हाडाचा; मोठाड, जाडजूड, पटाकडा लंगरी काम-न (लगरानें केल्याप्रमाणें काम) ढंगी व वेडौल मनुष्य, पाजील वाढलेला, लोटया माणूस

लंगरू—वि. घोडयाची एक चाल -अश्व १ १९४. [लगडो?]

लगलग—स्त्री. १ घाई, उतावीळपणा, त्वरा, धांदल (क्रि० करणें) २ (ना) आधाशीपणा -क्रिवि जल्दीनें, झपाट्यानें (काम करणें, जेवणें, इ०) [स लग, म लग द्वि] लगलगां-क्रिवि लवकरीनें

लगविणें—सक्रि लगाविणें पहा

लगहीन—न (कों) गवंडी कामाचें हत्यार

लगा—पु (विणकाम) सुताचे ५ किंवा १० योक एकत्र ताणून केलेला ताणा

लगा—पु १ सिरा, लग २ (ल) संबंध, नातें, धागा दोरा, सूत, संबंधाचें, दळणवळणाचें साधन (क्रि० लावणें) ३ (संधी, लक्ष, उद्देश या अर्थी) लाग पहा (क्रि० लावणें) ४ आश्रय, आधार 'रक्षी श्रोणीतें जो रूढ होतो आयुचा लगा मरणीं।'-मोकर्ण ११ ६९ [लग् = संयोग होणें] ०वांधा-दा-पु १ संबंध, अंग, बंधन (नात्यांचें, मित्रत्वाचें) २ आश्रय, आधार 'आम्हांस एथें कोण्हाचा लगावांधा असता तर भिक्षा कशास मागितली असती?' ३ दैवयोग, नेमानेम, लागाबांधा पहा 'लगाबांधा जमा लागला असतो तसें घडतें' ४ पूर्वजन्मींचा संबंध, ऋणानुबंध [लागणें+बांधणें]

लंगाड—न (गो) टवाळी

लगाम—स्त्रीपु १ घोडयाला ताब्यात ठेवण्याकरितां व वळविण्याकरितां त्याच्या जवडयांत अडकविलेली लोखंडी सांखळी, कडी मुखयंत्रण सभा लगाम, करवती लगाम, कडोळी-ची लगाम किंवा कडयाळ, कडयांचा लगाम, काटया किंवा काटे लगाम, काटेकडी लगाम कुऱ्हाडया लगाम, सांखळी लगाम, सुतळया लगाम असे लगामाचे कांहीं प्रकार आहेत 'तव भुज या तरल्लीवरवांवरनीं लगाम हा बा! हो।'-मोकर्ण ७ १४ २ वरील सांखळी कडी अगीनीला किंवा जेराला लावून केलेलें नियंत्रणसाधन, वादी ३ स्वाधीनसूत्र, मार्गदर्शकतत्त्व, व्यवस्था दिशा दाखविणें, ताबा 'या फौजेचा लगाम वक्षीचे स्वाधीन आहे त्यास वश करा म्हणजे झालें' ४ कुस्तीचा एक डाव जोडी दाराला खालतीं धरून घोडयाला लगाम देतात त्याप्रमाणें आपलीं दोन बोटें जोडीदाराच्या गालफडांत घालून त्याला चीत करणें [फा. लिगाम्] (वाप्र) ०घालणें-आळा घालणें लगामी-वि. १ स्वाधीन, अधीन २ व्यवस्थित, शिस्तवार याच्या उलट बेलगामी. लगामीं-क्रिवि हुकुमाखालीं, ताब्यांत, शासनाखालीं (क्रि० असणें, चालणें, वागणें, लागणें, ठेवणें, चालवणें, आणणें, लावणें) 'हा जन तुमच्याचि असे इतरा कोण्हाचियाहि न लगामीं।' -मोवन ८ ६६ -आय २४

लगाव—पु १ नेम, रोख (एखाद्याजागीं तोफ इ०च्या मान्याचा). 'नगरच्या किल्ल्यास भिंगारकडून लगाव आहे' २ संबंध, संधान या शब्दाचे हिंदींत यापेक्षां जास्त अर्थ होतात. [लागणें, हिं लगाऊ]

लगाव(वि)णें—उक्रि (चाबूक, काठी इ०कानीं) मारणें; ठोक देणें [हिं लगाना] (शिव्या) लगावणें-शिव्या देणें

लगिन्या बैल—पु गावडीशीं लग्न लावून मोकाट सोडलेला गोऱ्हा, सांड, पोळ [लगीन+बैल]

लगी—स्त्री १ निशाण, पताका, झेंडा. (विशेषत स्वारी पुढें चालवीत असतात तो) 'जाधव दवाण घोरपडे धाटणें लग्या भडकती जरी।'-ऐपो २३३ २ खांबाच्या माथ्यावर ठेवलेली तुळई, लग पहा [स लगुड, स लग, हिं लगी, म लग]

लगीत—वि (व) लागवडीत असलेली, वहीत (जमीन)

लगीत—वि (व) पुष्कळ

लगीन—न (प्र) लग्न पहा [अप लग्न] लगीन गोष्ट, लगीन घटका, लगीन घर, लगीन चिठी, लगीनचुडा, लगीनटका, लगीनदीप-लग्नगोष्ट, लग्नघटका इ० पहा लगीन म्हाणप-क्रि (गो) लग्नाचा सोहळा उपभोगणें ०सराई-साडा-स्त्री लग्नसराई-सादा पहा

लंगुटा, लंगुटी, लंगुटीयार, लंगूटबंद—लंगोटा इ० पहा

लगुंडा—पु लगोंडा पहा

लंगूल—न शेपूट. [स लांगूल]

लगू, लोग—क्रिवि (व) पर्यंत घरालगू ये' [हिं लग]

लगे—उद्गा एखाद्यास उत्तेजन देणें, चेतविणें, या कामीं योजावयाचा शब्द धन्य! वाहवा! भले! [लागणें] ०ढोल-स्त्री चटपट व चलाखी (कामाची) (क्रि० लागणें) -क्रिवि (कोल्हाटी, भोरपी, गारुडी इ०कानीं ढोलकें वाजवून जल्द व पुन पुन उच्चारलेला उद्गार) झपाट्यानें, चलाखीनें, चटपटीनें व जोरानें (चालू काम एखादी क्रिया, चळवळ) (क्रि० लावणें, चालणें करणें) लगेधूम पहा [हिं लगीचहूर]

लगे—क्रिवि लागलीच, लगोलग पहा [लागणें] ०हाते करून-क्रिवि घाईनें व अर्धवट, कसें तरी 'पाऊस होईवर आला

तेव्हां लगेतगेकरून एकदाचें घर शेकारून घेतलें ' ०तार-क्रिवि (व) एकसारखा; मध्यें खळ न पडतां 'लगेतार बारा वर्षें नोकरी केली ' [ हिं लगातार ] ०धूम-क्रिवि झपाट्यानें, चट पटीनें, जलदीनें, झटक्यात, क्षणात ( क्रि० पळणें, धावणें; जाणें, येणें ) हा शब्द भोरपी इ० लोक चमत्कार दाखविताना योजि तात व लगढोल या अर्थीच पण थोड्या फरकानें हा येतो ०लगे-स्त्री घाई; गर्दी, उतावळी ' अशी लगेलग करी तर काम बिघ डेल, सावकाश करा ' -क्रिवि घाईनें, गडबडीनें, उतावळीनें ' तुमचें पत्र येणें आलें तेव्हां लगेलगे जेवलों आणि तसाच आलों ' ०हात-क्रिवि १ त्याच वेगानें, त्याच दमात, त्याच कामावरो बर 'तुम्ही बाजारात जाताच आम्हा तसेंच लगहात पुढें जाऊन त्या गृहस्थास बोलावून आणा ' २ दुसरी एखादी गोष्ट करीत असतां, त्याचवेळीं; एकसमयावच्छेदेंकरून ३ (सामा) लाग लीच, पाठीमागून, तावडतोब 'एका शब्दावरून निराळ्या शब्दाचे वाचक असे शब्द लगेहात हाव तितके करतात ' -नि १८६

**लगेसा**—स्त्रीवि (अशिष्ट) जरूर असेल तितका [ लागेल-लागेलमा+असा ]

**लंगोट**—पु १ लगोटा, मोठी लगोटी, २ तालीम, कुस्ती यासाठीं वापरावयाची चड्डी [ हिं ] ०पेच-पु (मल्लविद्या) एक विशिष्ट पेच ०बंद-पु १ ब्रह्मचर्य पालन करणारा मनुष्य इसम २ फक्त लगोटी नेसणारा मनुष्य, सामान्य कामकरी मजूर लगोटा-पु मोठी लगोटी लगोटी-स्त्री १ फक्त गुह्येंद्रियें झाकण्या पुरती करगोट्यातून ओंवलेली-खोवलेली वस्त्राची पट्टी ( क्रि० नसणें ) २ चार सहा-बोटें रुद व हात-दीड हात लांब असा वस्त्राचा तुकडा, अरुद व फार लांब असलेला तुकडा, पट्टी (जमीन इ० काचा) [ फा हिं ] लंगोटीयार-मित्र-पु बालमित्र, लहानपणीचा मित्र म्ह० सर्वांशीं गाठ पडावी पण लगोटीयाराशीं गाठ पडू नये

**लगांडा**—पु १ एका ठिकाणीं चिकटणारा गोळा (केसाचा, दोऱ्याचा, पानाचा, कागदाचा इ० ) २ लगदा, गुता, चिकटा, चिकटण जसें- डिंकाचा-रक्ताचा चिकाचा कणिकचा लगोंडा ३ चिकटलपणा, चिकटलेली स्थिति [ लागणें+गुडा ]

**लगोरी**—स्त्री १ चेंडूनें पाडण्याकरिता एकावर एक रचलेले लाकडाचे किंवा खापराचे सात वर्तुलाकार चपट तुकडे प्रत्येकी २ अशा रीतीनें रचलेल्या विटा, रोडे दगड इ० प्र लगोऱ्या-अव १ खेळण्यासाठीं एकावर एक रचलेली रास, उतरड २ डाव, खेळ चेंडू फेंकून एकावरएक ठेवलेले सात तुकडे ( लगोऱ्या ) पाड ण्याचा प्रकार का लगर्वेडू ३ लकतऱ्या पडा [ स लघु+उपरि? किंवा लग्न+गोल ]

**लगोल(ला)ग**—क्रिवि पाठोपाठ, लागलीच मागून, खंड न पडतां, एकसारखें, अविरत [ लागणें, लग द्वि ]

**लग्गा**—पु १ सधि (ना) २ सधान; वशीला लाग पहा. [ स लग् ]

**लग्न**—न १ सोयरीक, शरीरसबध, विवाह ( क्रि० करणें होणें ) २ मुहूर्तावर कलेला विवाहसमारभ ( क्रि० लावणें, लागणें ) ४ ऐक्य, साहचर्य ' मग लग्नीं जेविं उँकारु। विर्वांचि विलसे। ' -ज्ञा ८ ११६ ५ योग; मुहूर्त, समय -ज्ञा १६ ३०३. 'हनुमान् प्रभुला भेट ज्या लग्नीं फार चारतें । '-मोरामायणें पु ६ ६ क्रांतिवृत्तातील प्रत्येक राशीबरोबर एकामागून एक वर येणारा विषुववृत्ताचा विभाग, विवक्षित कालीं उदयाचलाशीं सलग्न असणारा राशि ७ राशीचा उदयकाल, राशींत सूर्याचा गमनकाल (अहोरात्रात एकदर बारा राशींचीं बारा लग्नें होतात ) उदा० मेष वृषभ लग्न, उदय-अस्त लग्न -वि १ सयुक्त, सबद्ध, चिकट लेलें २ (ल) निगत आसक्त, तल्लीन [ स ] (वाप्र) ०नाहणें-विवाहविधींत सांगितलेलीं नहाणीं व दुसरे सस्कार करून घेणें सामाशब्द- ०क-पु हामीदार, जामीन ०कळा-स्त्री लग्नसमारभामध्यें नवरीच्या चेहऱ्यावर दिसणारें किंवा दिस-तेंसें वाटणारें तेज, टवटवी ०कार्य-न मगल कार्य (लग्न, मुज गर्भाधान इ ) [ स ] ०कुंडली-स्त्री जन्मकालीं पूर्वेकडे उदय पावलेल्या राशीचा दर्शक अक पहिल्या घरात मांडून तेथून डावी कडे क्रमानें प्रत्येक घरात तदनुरोधानें राशि व त्या राशींचे ग्रह लिहून तयार केलेलें बारा घरांचें कोष्टक [ स ] ०गंडांत-पु कर्क सिंह, वृश्चिक धनु व मीन मेष या लग्नाच्या सधीची एक घटका (जसे, कर्काची शवटची अर्धी व सिंहाची पहिली अर्धी मिळून एक ) [ स ] ०गीत-न विवाहगीत, मगलाष्टक [स] ०गोष्टी-न एव अव १ एखाद्याचा विवाह किंवा दुसरा एखादा इष्ट हेतु सिद्धीस जाण्याकरिता त्या मनुष्याची केलेली शिफारस, प्रशंसा जसें-' नोकरी नसली म्हणून काय झालें, तो मुलीवर पाचशेर सोनें घालील अशी आमची खात्रीच आहे ' ' हा चागला पतीचा माणूस आहे, याला हजार रुपये कर्जाऊ दिले तरी चिंता नाहीं इ० २ अनुरागाचीं पोकळ किंवा निरर्थक बोलणीं, मदतीचीं आश्वासनें ०घटि(टि)का-स्त्री १ लग्न किंवा मुंज लावण्याकरिता ज्योति शास्त्रात शुभ म्हणून सांगितलेला मुहूर्त, वेळ २ मुहूर्त साधण्या-करिता पाण्यात टाकलेलें वेळ मापण्याचें अर्धगोलाकृति भांडें, घटि-पात्र ३ असा निश्चित केलेला आणि साधलेला काल, मुहूर्त ४ (ल) अणीबाणीची वेळ, प्रसग, काहीं करून अडचण पार पाड लीच पाहिजे अशी वेळ ब्राह्मण तर जेवावयास बसले, घरात तूप नाहीं अशी लग्नघटिका खोळबली आहे म्हणून तुमच्याकडे धावत तूप मागावयास आलों ' [ स लग्नघटिका ] ०घर-न १ ज्यामध्यें

लग्नसमारंभ चालला आहे तें घर; जानोशाचें घर. २ (ल.) लग्नासल्याप्रमाणें माणसांनीं गजबजलेलें, फार गडबड चालली आहे असें घर. ३ लग्नासारखा भरमसाट खर्च चालला आहे, आनंदीआनंद आहे असें घर. ०चिठी-ट्ठी-ठ्ठी-स्त्री.१ लग्नाचा परवाना (सरकारकडून शूद्रादिकांस मिळत असलेला). २ लग्नमुहूर्त ज्यांत आहे असा जोशानें केलेला कागद. ३ लग्न-मुंजीची आमंत्रणपत्रिका; कुंकोत्री. ०चु(चू)डा-पु लग्नांत नवरीस व तिच्या बाजूच्या वऱ्हाडणींस बांगड्या इ० भरण्याचा विधि. हा वाण्याच्या पूर्वी होतो. ०टका-टक्का-पु. लग्न लागल्याबद्दल घेण्यांत येणारा सरकारी कर (हा शूद्राकडून घेण्यांत येई). ०टीप-स्त्री. लग्नाच्या मुहूर्तांची यादी. ०तीथ-स्त्री. ज्या तिथीस लग्नाचा मुहूर्त येतो ती तिथि. [सं. लग्नतिथि] ०थर-पुन. लग्नासाठीं घेतलेलें कापडचोपड. थर पहा. [दे.] ०नक्षत्र-न. लग्नास शुभ असलेलें नक्षत्र. [सं.] ०पत्रिका-स्त्री. वधूवरांच्या पत्रिकांवरून लग्नाचा शुभ मुहूर्त नक्की करून उभय कुलांच्या उल्लेखासह तो ज्यावर लिहून ठेवतात तो कागद. लग्नापूर्वी याची पूजा करतात. [सं.] ०प्याला-पु. (तेली) नवऱ्यामुलानें लग्नासाठीं मुलीकडे जाण्याचा समारंभ; वरघोडा. -बदलापूर २६९. ०भुज-पु (ज्यो.) मेषादिक लग्नाचा भुज; चारकांड. ०मंडप-पु. लग्नसमारंभाकरितां उभारलेला मांडव. [सं.] ०मास-पु. लग्न करण्यास शुभ म्हणून सांगितलेला महिना; लग्नाचा मोसम. [सं.] ०मुहूर्त-न. १ लग्नास शुभ अशी वेळ, मुहूर्त. याचे दिवा, गोधूल किंवा गोरज आणि रात्रौ असे तीन प्रकार आहेत. २ (लग्न आणि मुहूर्त =मोहतर, कमी दर्जाचें लग्न). लग्नकार्य पहा. [सं.] ०वेळा-स्त्री. लग्नघटिका; लग्न लावण्याची वेळ. 'त्रिवेणीसंगमीं तिसी साधियेली लग्न वेळा।' -मध्व ३९१. ०शिष्टाई-स्त्री. लग्नाची मध्यस्थी; लग्नासंबंधीं बोलणें; लग्न जुळविणें. ०शुद्धि-स्त्री. चिंतिलेल्या कार्याच्या आरंभाकरितां राशींची निर्दोषता, शुभता [सं.] ०सराई-स्त्री. लग्नाचा हंगाम, मोसम (मार्गशीर्षापासून ज्येष्ठ महिन्यापर्यंत). ०साडा-न. १ लग्नांत वधूपक्षाकडून वराच्या आईस देण्यांत येणारें लुगडें. २ (कांहीं प्रांतांत) वराकडून वधूस देण्यांत येणारें उंची वस्त्र (पैठणी). ०सोह(हा)ळा-पु. लग्नसमारंभांतील मेजवान्या, उत्सव इ०; विवाहोत्सव. 'लग्नसोहळा ते वेळीं। चार दिवस जाहला।' लग्नाऊ-वि. लग्नाच्या प्रसंगास उपयोगी, योग्य (अहेरी वस्त्र इ०). लग्नाचा-वि. लग्नाच्या संबंधाचा (नवरा, बायको). लग्नाक्षता-स्त्रीअव. लग्नांत वरानें व वधूनें परस्परांवर टाकलेले तांदूळ (सामा.) लग्नविधि. लग्नीक-वि. (गो.) बांधलेला. लग्नक पहा. 'कुटुंबाचा मालक आपल्या वडिवाटाचा हिशेब देण्यास लग्नीक आहे.' -गोमांतक रीतीभाति ११. [सं. लग्नक]

लग्या-अ. फांसे, जुगार या खेळांतील एक संज्ञा.

लंघणें-अक्रि. १ क्षीण, अशक्त होणें. २ थकणें व वैगणें (रोग, उपवास, श्रम यांमुळें). -सक्रि. (काव्य) १ ओलांडणें; आक्रमणें. -ज्ञा १५.३५९. 'श्वापद पक्षियांचे पाळे। पळती लंघिती अंतराळें।' -मुआदि ४.१०७. २ (ल.) अतिक्रमणें. [सं. लंघन]

लंघन-न. १ उपवास करणें (विशेषतः पथ्य म्हणून). (क्रि० करणें; धरणें; पडणें). उपोषण व उपास पहा. 'जेवूं नेणतां बाळक। लंघनचि वीं॥' -ज्ञा १७.२५०. २ ओलांडणें; आक्रमणें; वरून जाणें. ३ उल्लंघन; अवज्ञा. 'भीमप्रिया प्रियसखी लवहि न साहेल लंघन गदा हें।' -मोवन ९.१३. ४ क्षीण होणें. ५ (संगीत) एखादा स्वर रागालापांत टाळणें अगर त्याला फारच थोडा स्पर्श करून जाणें. [सं.] लंघलें-लोघलें-पुअव. दुखणेकरी व अशक्त; श्रांत व जर्जर. [लंघणें द्वि.]

लघळ-वि. लधाळ पहा. ०पणा-पु लाळघोटणी, लोचटपणा. 'ह्या लघळपणाबद्दल घेरड्या, स्त्रीराज्यांतून तुला आतांच्या आतां हांकलून दिलें जाईल.' -वाय २.४

लघाळ-स्त्री. १ मालिका; रांग, ओळ (वस्तूंची) (क्रि० लावणें; लागणें) 'एथून तेथून पापकृणाची लघाळ लागली.' २ लांबलचक भाषण; भाषणाची शेज, गाडी (विशेषतः टाळाटाळीचें व निराधार). (क्रि० लावणें; लागणें, होणें). ३ (सामा.) दीर्घसूत्री, नीरस बोलणें. [? सं. लघ्वी=लहान गाडी+आली=ओळ]

लघाळ-वि १ पुढेंपुढें करणारा; लाघवी; लघळ; लाळघोट्या. २ अतिशय बडबड्या; बोलका. ३ लोचट; चिवट; कोडगा. ०की-स्त्री. १ लघळपणा. २ गप्पा; अतिशय बडबड. ०मावशी-भवानी-बाई-स्त्री. १ लघाळ, बडबडी व गप्पा मारणारी बाई. लोचट स्त्री.

लघिमा-पु. १ हलकेपणा; कमीपणा. २ अष्टमहासिद्धीपैकीं एक सिद्धि; पराकाष्ठेचा, निसर्गबाह्य, हलकेपणा. -एभा १५.४२. ३ हलुवारपणा. 'ऐसिया लघिमा चालतां।' -ज्ञा १३.२५५. [सं. लघु]

लघिष्ठ-वि. अत्यंत हलका [सं लघु परमावधिवाचक रूप]

लघु-वि. १ हलका; (भारानें) जड नव्हे असा. 'गुरुत्व जेव्हडा चांगु। तेव्हडाचि ताहनि लघु।' -अमृ ९.६९. २ लहान; छोटा. (आकारानें) ३ ऱ्हस्व (स्वर). याच्या उलट गुरु. ४ (संगीत) एकमात्राकाल. ५ हलका; क्षुल्लक; क्षुद्र (योग्यतेनें). 'बनी सुमति ताटका लघु न हे भली लाजशी।' -केका ५५. [सं] सामाशब्द- ०कथा-स्त्री. एकवाङ्मयप्रचार; शक्य तितक्या परिणामकारक रीतीनें आणि शक्य तेवढ्या कमी पात्रप्रसंगाच्या साह्यानें सांगितलेली एकच गोष्ट. -प्रतिभासाधन. ०कोण-

न–पु. (भूमिति) काटकोनापेक्षां लहान असलेला कोन; (इं.) ॲक्यूट ॲंगल. ०कोणत्रिकोण–पु. (भूमिति) ज्या त्रिकोणाचे तिन्ही कोन लघुकोन असतात तो कोण. ०ग्रह–पु. (ज्यो.) सात मोठे ग्रह व पृथ्वी हीं खेरीज करून बाकीचे लहान ग्रह; ग्रहकल्प. उदा० मंगळाच्या पलीकडचे सूर्याभोंवतीं फिरणारे सुमारें २०० लहान ग्रह. [सं.] ०चीर–न. रुमालासारखें वस्त्र. 'शुभ लघुचीर हातीं पेऊनी। हरीवरूनि वारीत रुक्मिणी। –ह २७.७१. ०तम साधारणभाज्य–पु. (गणित) दिलेल्या संख्यांनीं जीस निःशेष भागतां येईल अशी सर्वांत लहान असलेली भाज्य संख्या. [सं.] ०त्व–न. १ हलकेपणा. २ लहानपण. ३ (ल.) क्षुद्रता; मान्यतेनें हलकेपण; वैभव, ऐश्वर्य, गांभीर्य किंवा अधिकार यांचा अभाव, उणेपणा. ४ अवमानाची, हलकेपणा आल्याची भावना. (क्रि० येणें; वाटणें). 'ते पिढीजाद भिक्षुक, त्यांणीं याचना केली म्हणून त्यांस लघुत्व येतें असें नाहीं.' ०दंती–वि. लहान दांत असणारा (घोडा). घोड्याचें एक अशुभ चिन्ह. अशुभचिन्हें पहा. [सं.] ०न्यास–पु. पूजेंतील लहान देवतास्थापन विधि; न्यासाचा एक प्रकार. याच्या उलट महान्यास. न्यास पहा. [सं.] ०भोजन–न. फराळ; अल्पाहार; उपाहार. [सं.] ०मंगल–न. उपनयन व विवाह याशिवाय बाकीचीं जातकर्मादिक कर्मे, संस्कार प्र. [सं.] ०मालिनी–वसंत–पु. एक रसायण; मात्रा. ०मूत्र–न. लघवी दाबून धरणें; मूत्रनिग्रह. –वि. मूत्रावरोधास समर्थ असलेला. [सं.] ०लाघव–न. चापल्य. 'किरातें लघु लाघवें करून। बाणामागें विंधोनि बाण। वदन संपूर्ण भरियेलें।'–मुमादि ३०.१८६. [सं.] ०लेखन–न. ऐकलेलें भाषण टाविक चिन्हें इ० कांनीं लवकर व थोड्या जागेंत लिहून घेणें. (इं.) शॉर्टहॅंड. [सं.] ०लेखनपद्धति–स्त्री. अशा तऱ्हेनें लिहून घेण्याची लिपी, प्रकार. ०लेखक–वि. लघुलेखन करणारा. ०विष्णु–पु. (गो.) लघुरुद्राप्रमाणें एक अभिषेकविधी. ०वृत्त–न. लहान वृत्त; गोलाला मध्याखेरीज इतर ठिकाणीं सरळ पातळीनें कापिलें तर तेथें गोलाच्या पेक्षां लहान त्रिज्येचें जें वर्तुळ होतें तें. –सूर्य १०. [सं.] ०शंका–स्त्री. १ लघ्वी; मूत्र करणें. २ मूत्र. [सं.] ०शंकेस जाणें–लघ्वी करण्यास जाणें. ०सुदर्शन चूर्ण–न. एक ज्वरनाशक चूर्ण. यांत गुळवेल, पिंपळी, हिरडेदळ, सुंठ, लवंग, काडेचिराईत इ० औषधी असतात. [सं.] लघ्वक्ष–पु. (ज्यो.) वृद्दक्षाशीं लंबरूप असणारा व्यास. –सूर्य २२. [सं.] [लघु+अक्ष] लघ्वाहार–पु. फराळ; अल्पाहार करणें. [सं. लघु+आहार] लघ्वी–स्त्री. १ मूत्र करणें. २ मूत्र (लघुशंका) ३ नाजूक स्त्री, परी. [सं.]

लंच–स्त्री. (क.) (खड्यांच्या खेळांत) डाव; खेळाचा शेवट.' गोपे तुझ्यावर लंच झाली.'

लचक–स्त्री. १ कचक, उसण; मुरगाळणें. (क्रि० भरणें; निघणें; बसणें). २ उसण भरल्यानें होणारें दुःख; चमक. (क्रि० मारणें). ३ चट; चटक; आवड; छंद. (क्रि० लागणें). [ध्व. लच्. हिं. लचकना] लचकणी–स्त्री. १ लचक भरलेली असणें. २ उडी मारणें; दचकणें इ० लचकणें–अक्रि. १ कचक, लचक भरणें; शिरेवर शीर चढून वेदना होणें; चमक मारणें; मुरगाळणें. २ उडी मारणें; दचकणें; खालीं, बाहेर, दूर, अकस्मात् सरकणें; घसरणें. 'तेवीं लचकलिया दिठी।'–ज्ञा १४.८४. ३ मुरडणें; मुरकणें. 'या शिवून शिकून कशा उगाच लचकति ललना।' म्ह० १ लोभ लचकला पान्हा सुटला (वात्सल्य उद्भवून पान्हा आला). २ लोभ लचकला, डोळा पिचकला. लचका–पु. १ चट; चटक. (क्रि० लागणें). २ अकस्मात् भरलेली लचक. (क्रि० बसणें).

लचकंद–ड–न. (व.) काटा कोरण्याचें, कापण्याचें व उपटण्याचें एक शस्त्र (सुई, चिमटा इ०) ज्यांत आहे अशी कडी. [सं. लुञ्च्=कापणें, उपटणें]

लचका–पु. १ हातानें, तोंडानें तोडलेला तुकडा; चावा (मास, कणीक इ० कांचा). (क्रि० घेणें; तोडणें; काढणें; मारणें; निघणें; जाणें).

लचकुटा–वि. (प्र.) लतकुटा पहा. कोडगा, निलाजरा.

लचं(चां)ड, लचं(चां)डी–नस्त्री. १ घोटाळ्यांत घालणारें काम; अडचण; संकट. २ घोटाळ्याची स्थिति; कातर; पेचाटी. 'येरे लचांडा देरे गचांडा.' (आपणावर बळेनें संकट ओढून घेणारासंबंधीं म्हणतात). ३ उलाढाल; भानगड, झेंगट; कुलंगडें. ४ तोहमत; तुफान. ५ एखादें गोंधळविणारें साहस, गोष्ट; त्रासदायक योजना, क्लृप्ति. लचं(चां)ड खोर, लचं(चां)डी–वि. १ नाहीं नाहीं तीं लचांडें करण्याचा स्वभाव असलेला; उलाढाली करणारा; घालमेल्या; कचाट्या; उलाढाल्या. २ द्वाड; लुडबुड्या; कळ लावणारा; भांडण चेतविणारा. (सामा.) लुच्चा; भामटा.

लचणें–अक्रि. (अशिष्ट) कचणें, खचणें; [हिं. लचना]

लचला लवंगला–वि. १ थकलाभागला; दुखावला, लंगडालुला झालेला (पुष्कळ चालण्यामुळें, ओझें वाहण्यामुळें). २ (ल.) उठवणीस, मोडकळीस आलेला; बुडालेला (व्यापारी). [लचकणें+लवंगणें]

लचलच–चां, लचालचा–क्रिवि. चाटण्याच्या शब्दाचें अनुकरण करून. (क्रि० चाटणें; पिणें; खाणें; खेवणें). [ध्व.]

लचा(च्या)ड–ळ–वि. १ बडबड्या; वाचाळ; रिकामा गप्पीदास. २ लांडा कारभारी; चुगलखोर. ३ रिकामटवळा; क्षुद्र भाषण करणारा. ४ लोंचट. 'जाग्रक क्षुद्रक लच्याळ।'–दा ३.

३.२८. ४ लाचखाऊ. ५ (व.) बेशरम. लचा(च्या)ड(ळ)की, लचा(च्या)ळी-स्त्री. १ बडबडणें; रिकाम्या गप्पा मारणें. २ चुगलखोरी; कुचाळी; हलकटपणा, छिछोरी.

लंछन—न. (प्र.) लांछन पहा. 'अवघेयां लंछन आणी।' –गीता २.१५४५.

लच्छासाग—पु. (संगीत) एक राग. विलावल रागाचा एक प्रकार. या रागांत षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, कोमल निषाद, तीव्र निषाद हे स्वर लागतात. जाति संपूर्ण-संपूर्ण. वादी धैवत. संवादी गांधार. गानसमय दिवसाचा पहिला प्रहर.

लज—स्त्री. (गो.) लाज. [सं. लज्-लज्जा]

लजणें—अक्रि. लाजणें. 'तैसे अनुसरले जे मज प्राणें। तयांचेन काइसेनिहि न लजे मी।' –ज्ञा ९.२४०. म्ह० (गो.) लजेक मानी पेजेक पडाना=आपली गरज भागवावयाची असेल तर लाज धरून होणार नाहीं.

लज(ज्ज)त—स्त्री. १ रुचि; स्वाद; गोडी, खुमारी. २ चट; चटक; वाईट संवय, खोडी. (क्रि० करणें). ३ छटा; वास, गंध; छाया; चुणूक, झुनुक (एखाद्या विशिष्ट किंवा परकीय गुणाची–रंग, राग, भाषा, रीति, रुचि इ०मध्यें) [अर लज्जत] ०दार-वि. रुचकर; स्वादिष्ट

लजितीफजिती—स्त्री. फजिती, बेअब्रू; छी. थू:, [फजिती हि.]

लंजूर—वि. (मुंबई) कमजोर.

लज्जा—स्त्री १ लाज, विनय; सभ्यता, मर्यादा दर्शविणें २ लाजरेपणा, लाजाळूपणा. ३ भीड; संकोच. [सं.] म्ह० (सं.) एक लज्जां परित्यज्य सर्वत्र विजयी भवेत्।' ०कज्जा, लज्जेकज्जेनें-क्रिवि. लाजेकाजेनें, लाज धरून. लज्जा(ज्या)यमान-वि. लाजलेला; लज्जित, शरमिंधा 'नगरीचे लोक लज्जायमान। कपाटें लावूनि बैसति।' [सं. लज्जमान] लज्जालु-पु लाजाळू भावाची वनस्पति. –वि लज्जायुक्त, लाजाळू. [सं.] लज्जावती-स्त्री लाजाळू नामक वनस्पति. –वि. लाजाळू (स्त्री.). [सं] लज्जावान्-शील-वि. १ विनीत, मर्यादशील, सभ्य. २ लाजाळू लज्जित-वि लाजलेला, शरमिंधा. [सं] लज्जेचा-वि. १ लज्जावान्-शील पहा. २ लाजिरवाणें; लाज आणणारें (कृत्य).

लज्जा(ज्या)होम—पु. (प्र.) लाजा होम; विवाहांत लाह्यांचा होम करतात तो.

लट-ठ—पु. सोडगा; सोटा. [हिं. लठ]

लट—स्त्री. १ गुप्तेंद्रियावरील केंस; झाट. २ गुंतागुंत (केसांची, ओकरीच्या सुतांची, तंतूंची) [हिं.].

लट—स्त्री. १ (व.) साठ कागदांचा संच दोन लटांची एक जोडी, चार जोडयांची एक गड्डी होते. –के १९.४ ३५. २ (राजा. कुण.) लाट. –मसाप २.१०५. [लाट]

लटक—स्त्री. १ लकब; धाटणी; रीत; तऱ्हा (गाणें, बोलणें, चालणें इ० काची). 'त्याचे गाण्याची लटक मी साधावयाला जातों पण साधत नाहीं.' २ संवय, रीत. 'हरिभजनाची लाव लटक।' –राला ९१. ३ वाईट संवय, चाल; दुर्गुण; खोड. [हिं]

लटक—पु खोडसाळ, दुष्ट मनुष्य.

लटक—न. एक वृत्त, चाल. उदा० वजे सनई घनघोर। नगारनकी लगे झोर। बाजे कर्णा वंभोर। दिसों नाद धुमती।' –अवक १.३३.६९. [हिं.]

लट-कण-कन-कर-दिनीं-दिशीं—क्रिवि. १ अकस्मात किंवा वेगानें उठणाऱ्या, उडणाऱ्या, उसळणाऱ्या मनुष्याच्या किंवा वस्तूच्या क्रियेचें दर्शक अथवा त्यावेळीं होणाऱ्या शब्दाचें अनुकरण होऊन. [ध्व.]

लटकणें—अक्रि. १ (वरच्या आधारानें) लोंबणें; ओथंबणें. २ टांगणें; अधांतरीं लोंबणें, लोंबकळणें. [हि लटकना] लटकत चालणें– नखऱ्यानें ठुमकत चालणें; लचकणें. लटकन-पु. (ना. व.) कंदील; टांगता दिवा. [हिं.] लटकविणें-क्रि. टांगणें; लोंबत ठेवणें. लटकावणें पहा. लटकावणी-स्त्री. टांगणी; लोंबणी; लटकत ठेवलेली स्थिति लटकाव(वि)णें-क्रि. १ टांगणें; लोंबत ठेवणें. २ ऐटीनें, झोकांत अंगावर घेणें, धारण करणें (पागोटें, शाल, दागिना). ३ पटकावणें, आत्मसात् करणें, लांबविणें (दुसऱ्याचा माल). [हिं. लटकाना]

लटका-की—वि १ खोटा; खरा नसलेला; वस्तुस्थितीच्या विरुद्ध; असत्य. 'पण करिति मदुक्ती काय लटकी ही।' –मोसभा ५.३३. २ खोटा; लबाड; विश्वासघातकी; अप्रामाणिक, लुच्चा. ३ व्यर्थ; रिकामा, निष्फळ. 'गेलों खरा पर काम झालें नाहीं. लटकी खेप मात्र पडली' ४ अन्याय्य; वृथा, अयुक्त; असमर्पक. 'मी कांहीं अपराध केला नसतां मला लटक्या शिक्षा कां देतां?' ५ अधु, व्यंगयुक्त (अवयव, इंद्रिय इ०). लटका पर नेटका-खोटा पण चांगला दिसणारा; दिखाऊ, दर्शनी; चांगला. सामाशब्द– ०ताठा-पु. रिकामा दिमाख, डौल. म्ह० भाकांत नाहीं काटा आणि लटका ताठा ०फटका-चिटका-लांडा-वि. खोटा; विश्वासघातकी; अप्रामाणिक, लुच्चा. [लटका हि] लटका(को)रा-वि. खोटा, लबाड. [लटका] लटकेपण-न. लबाडी; खोटेपण लटिका, लटीक-वि. (विशेषतः काव्यांत) खोटा. लटका पहा. 'लटिकें हें तुम्हां वाटेल खेळणें। एका कृष्णाविणें अवघेंचि।' –तुगा ३३. –मोसभा ५.७३. लटीकवाद-पु. (राजा.) खोटें सांगणें, बोलणें; खोटें बोलण्याचा दोष, पाप.

',देतों म्हणून घेतलें आतां जर न दिलें तर मजकडे लटीकवाद येईल ' लटिकेपण-णा-नपु खोटेपणा 'ईश्वरवाक्य वृथा गेलें। आनि देवासि आलें लटिकेपण।'-कथा १४९५.

लटपट—स्त्री. १ चलाखी, जल्द हालचाल. २ (पेंच घालून खेळतांना, मुलांचे खेळ रंगांत आले असतांना चिमण्या इ० पक्षी भांडतांना, वादविवादांत वगैरे दिसून येणारी ) धडपड, खळबळ ३ घाई, उतावीळपणा, धादल ४ तळमळ, अस्वस्थता ५ मोठ्या भयानें होणारा थरकाप, घाबरगुंडी 'साप पाहताच त्याची लटपट झाली '६ द्मरीतुमरी, अरेतुर,बोलाचाली, भांडण (क्रि० झडणें, होणें, लागणें) 'काल देवळांत त्याची आमची लटपट झाली ' ७भोंदाताण, झटापट 'प्रत्येक पदर्थांत तिन्ही गुणांची लटपट चाल-लेली असते -गीर१५६. (निदार्थी) लबाडी, फसवगिरी -क्रिवि ढिला बसविलेला खाब, खुटा, खुंटी, खिळा इ०कांच्या हलण्याच्या रीतीचें किंवा शब्दाचें अनुकरण होउन (क्रि० हालणें, करणें) [ध्व] लटपटणी-स्त्री डगडगण, डकडकणें, लटलट हालणें लटपट पहा [लटपटणें] लटपटणें-अक्रि १ ढिलेपणामुळे डग मगणें, डकडकणें, हालणें (खाब, खुंटी, खिळा) २ फसणें, पिसकटणें, बिघडण, नासणें, चुलींत किंवा रसातळास जाणें, नष्ट होणें (काम, जागा, अधिकार, मसलत, संपत्ति) 'मामलतीचे छंदास पडला तेंव करून पहिली सावकारी होती ती लटपटली ' ३ (निरुपयोगी, व्यर्थ म्हणून) दूर, बाजूला फेंकला जाणें, नापसत, रद्द केला जाणें, गाळला जाणें, रद्द पडणें 'पहिला कार भारी येताच नवे कारभारी झाले होते ते लटपटले ' ४ निस्तेज, फिकें पडणें, वजन न पडण 'त्याचे वक्तृत्वापुढें आमचीं सान्याचीं वक्तृत्वें लटपटलीं ' ५ गोंधळणें, घाबरणें [लटपट] लटपट पंची-उद्गा (पोपट, ढोल) पोपटास म्हणायला शिकवितात तो शब्द -स्त्री १ (ल) घोटाळा, गोंधळ २ फसविण्याच्या उद्दे शानें केलेलें घरसोडीचें, गोंधळविणारें भाषण 'खऱ्या मार्मिक श्रोत्यास केवळ लटपट केल्यानें लेशम।त्रही द्रव येणार नाहीं ' -नि ३ लबाडी, फसवगिरी ४ बढाई, शेखीच्या गोष्टी (अंगीं तादृश सामर्थ्य नसता केलेल्या) 'एवढें ढोलानें वशाला बोलता, तुमची लटपटपची चालायाची नाहीं ' [लटपटण+पची+पोपट] लटपटीत-वि १ आवाज करून डगमगणारा, डगडगणारा, खिळ खिळा (ढिला बसलेला खाब, खुंटा, खुंटी इ०) २ (ल) डळ मळीत, अस्थिर, अनिश्चित, चपल (अधिकार, नेमणूक, काम, मसलत, भाषण, वर्तन) [लटपट] लटपट्या-वि १ चपल, चलाख, झटपट्या (मनुष्य) २ धादरा, गडबड्या ३ पुढें पुढें नाचणारा, लडबड्या; लुडबुड्या ४ लबाडी करणारा, फसव्या [लटपट] लटापटी-स्त्री लटपट पहा

लटं(टां)बर-बळ—न १ सामान सुमान व सटलें, प्रवा सात बरोबर असणारें ओझें, सामान, गुरेंढोरें, बायकामुलें २ घोटाळ्यात घालणारा किंवा लोढणें म्हणून वागवावा लागणारा (चाकरांचा, गुरांचा इ०) समुदाय, (जिनसाची) रास, माल ३ गुंतागुंतीचें, घोंटाळ्याचें काम, कृत्य (वाद, कज्जा इ०) [ध्व. लट किंवा भरमसाट बनविलेला शब्द]

लटरफटर—न सटर फटर पहा [ध्व]

लटलट-लटां—क्रिवि कापण्याच्या, जल्द हालण्याच्या रीतीचें दर्शक किंवा शब्दाचें अनुकरण होउन [ध्व] लटलट करणें-१ जल्द हालणें, कांपणें २ लटपटणें, डगडगणें लट-लटणें-अक्रि १ झोके खाणें, डोलणें, वाऱ्यात स्वच्छंदानें झुलणें, खेळणें, झोलकरणें २ कांपण, थरथरणें, अत्यंत चचल स्थितींत असणें ३ डगमगणें, डगडगणें, ढिलेपणामुळें इकडेतिकडे हालणें. ४ (ल) लडबडणें, लुडबुडणें, लुचेपणानें, दुसऱ्यास त्रास होईल अशा रीतीनें पुढें पुढें करणें ५ पाणीदार व चकचकीत दिसणें (मुख्यत्वें मोतीं) ६ टवटवीत, टुकटुकीत, सुप्रसन्न दिसणें(चेहरा, वर्ण) [लटपट]

लटा—पु (कु केट) जुनें, फाटलेलें कांबळें, घोंगडीचा जुना तुकडा [स लक्तक, फा हिं लत्ता=चिंधी]

लटारणा—वि फार मोठा, जगी, अवजड, प्रचड.

लटिंगा—पु (गो) आखुड व जाड (दोन तीन हात लांब) लाकूड, काठी, सोटगा, दाडके [लुट]

लटुपटु लटु(टू)फटु-टू, लटुब(बु)टु-टू, लटफट्यां, लट(टू)ब(बु)ट्या, लटु(टू)फ(व)ट्या—वि लुडपुडु इ० पहा.

लटुन्या—वि (व) लुडबुड्या 'जेथें तेथें हा लटुन्या आहेच ' [स लट्]

लट्ट—वि अज्ञानी 'करि उदार कथा भलता लट्ट।'—वामन वामनचरित्र ४ [स लट]

लटोर—पु १ लटिंगा पहा २ जोंधळ्याची मोठी व टप्पोरी जात, अरगडींतील एक भेद ३ एक वनस्पति -वि भक्कम, जाड, लठ्ठ (मनुष्य, वस्तु) लटोरें पडवळ-न आखूड व जाड पडवळाची एक जात

लट्ट-ट्टा—पु (अश्लील) पुरुषाचे जननेंद्रिय.

लट्ट—स्त्री जननेंद्रियावरील केस, लट पहा

लठ—स्त्री १ (व) लाठी, काठी; सोटा २ कापड मोज ण्याचा गज ३ मूर्ख किंवा अशिक्षित मनुष्य [हिं] ०बाजी-स्त्री झोडपट्टी, चोपणें, चाप लठाईत-वि (व) १ लाठी चाल-वणारा २ धष्टपुष्ट लठुंगा-वि भक्कम, राकट; मजबूत, बळकट, अटस

लठणें—अक्रि गडबडा लोळणें, लोळण घेणें [सं लुठन]

लठन-न लोळण [स]

लठ्ठ—पु १ सोटा; सोडगा, जाड काठी २ ओबड-धोबड जळणाचें लाकूड; ओंडकें -वि १ विलक्षण मोटा, भव्य, जाड, घसाडा ( मनुष्य, अवयव, दागिना, दोर, दोरी इ० ) २ स्थूल, फोपशा [ हिं. ] सामाशब्द- ०निरंजन लठ्ठ(ठ्ठं)भारती-पु ( मूळ गोसाव्या संबंधी रूढ ) शरीरानें धष्टपुष्ट, दाडगा मनुष्य ( विशेषत निरक्षर व आडाणी ) -वि १ धष्टपुष्ट २ बेफिकीर ३ दांडगा ४ मूर्ख लठ्ठा-पु ( व ) मोठ सोडगा लठ्ठा, लठ्ठ्र लठ्ठया-वि अजस्र, अमर्याद मोटा; अवम, जाड; मसाडा ( मनुष्य,पशु वस्र, भांडें, जिन्नस) लठ्ठ पहा लठ्ठाई-स्त्री दांडगाई जनावराप्रमाणें धुडगूस,लढाई लठ्ठामिश्र लठ्ठाश्रम लठ्ठवगाडया, लठ्ठेश्वर-पु लठ्ठनिरंजन पहा लठ्ठामिश्रई स्त्री. १ उमेदपणाचें वर्तन, दांडगाई २ लठ्ठालठ्ठी [ मिश्र=मैथिली ब्राह्मणाची पदवी ] लठ्ठालठ्ठी-स्त्री सोटे, दाडवीं इ० कानीं परस्परामध्यें चालणारी मारामारी, ( सामा ) भांडण, हमरी तुमरी 'आम्हां लोकात एवी तर इतकी, कीं यत्किंचित् लाभ होण्याचा सुमार दिसू लागला न लागला तों लठ्ठालठ्ठी सुरू व्हाव याची !' -के लठ्ठाश्रम-मी-पु ढोंगी, दांभिक, धटिंगण अवा जोगी लोठाश्रम पहा 'लठ्ठाश्रमाच्या लागून पायीं। विघ्न आणिलें राज्यात।' -नव १८ ३५ [ लठ्ठ+आश्रमी ] लठ्ठेश्वर-लठ्ठनिरंजन पहा लठ्ठ्या-पु ( बायकी ) १ दाडगा, स्वैर, मोकाट माणूस लठ्ठा पहा २ एखाद्या स्त्रीनें ठेवलेला माणूस; जार

लठ्ठा—पु ( माल्वी ) मांजरपाट ( कापड )

लड—स्त्री ( प्रा ) पानाचें ओझें, भारा

लड—स्त्री १ सर, माळ ( मणी, मोतीं, फुलें इ० ची ) २ रेशमाची सोन्याचांदीच्या जरीची इ० गुंडी

लंड—पु १ ( अश्लील ) पुरुषाचें जननेंद्रिय, शिश्न २ ( ल ) खोल मसलतीचा व लुच्चा मनुष्य ३ दाडगा, उन्मत्त, बेगुमान इसम ४ खलेज आत्ताई मूल इ० ५ देवधर्माला न जुमानणारा, मावडी, विषयी मनुष्य -वि १ स्वच्छंदी, स्वैर २ ठक पक्का धूर्त ३ दाडगा, उन्मत्त उनाड 'ऐसा मान्यतेचा पुष्ट गड्डु। तो अभिमानी परमलड्डु। -ज्ञा १६ २३६ ४ ( व ) धीट, धीमा बेगुमान, बेफिकीर [ फा लन्द्, लवन्द् ] सामाशब्द- ०पण-न दाडगाई, उन्मत्तपणा 'म्हणविती दास न करिती सेवा। लड पणें देवा पोटभरीं।' -तुगा ८८८ ०भारती-पु ( निंदार्थी ) नागवा असणारा गोसावी इ० लंडा-पु ( अश्लील ) पुरुषाचें जननेंद्रिय, लड लडाई-स्त्री १ कावेबाजपणाची व लुच्चेगिरीची वर्तणूक २ दाड, आत्ताई सोटाईची वर्तणूक दस्ती ३ हट्टीपणा, खळेली [ लड ] लडामुंडी-स्त्री ( कु ) भांडण ( लड मुड इ० शिव्या देण्यावरून ) लडी-स्त्री १ ( निंदेनें ) भित्रा, बायक्या, नामर्द मनुष्य 'भवाच्या भयें काय भीतोस लडी।' -राम २७ -वि १ भित्रा २ लड, दांडगा ( मनुष्य ) 'असें भगुनियां दवली लडी।' -ऐपो २२५ ३ अविचारी; लबाड, लुच्चा 'लडी लटिका लबाड।' -दा २ १ ३३ [ लड ] लंडीपण-न नामर्दपण, दौर्बल्य 'शठ टाकूनिया तुच्छ लंडीपण परतपा।' -वामन, गीतासमश्लोकी २ ३

लंड—वि ( प्र ) लांडा पहा ०पुच्छ-वि १ लांडा, शेपूट कापलेला, तोडलेला, बोखाडलेला २ ( एका लबाड, शेपूट तुटक्या उंदराच्या गोष्टीवरून ) मुलांच्या टोळीचा नायक, लहान पुढारी लंडोबा-वि लबाड

लडका—पु मुलगा, पुत्र 'बाराजण लडक्यानीं।' -ऐपो ५६ [ हिं लडका, तुल इं लॅड ] लडकी-स्त्री मुलगी

लडणें—अक्रि ( व कुण ) रडणें, शोक, विलाप करणें, आक्रंदन [ रडणें ]

लडथड—स्त्री १ वादग्रस्त, अनिश्चित गोष्ट २ वादाची जागा, मुद्दा; विवादास्पदता ( हिशेबात, व्यवहारात ) ३ वरील गोष्टीसाठीं ) वाद तटा, झटापट 'त्याचें आमचें वरकड सारें उरलें तुटलें परंतु शभर रुपयांचे रकमेची लडथड पडली आहे' लाझा पहा ४ भानगड, घोटाळा, चवढव 'त्यानें कामाची लड थड करून टाकली' -वि ( बायकी ) अस्वच्छ; ओंगळ, अर्धवट केलेलें 'तिचें काम फारच बाई लडथड आहे' [ ध्व लड+थड किंवा लडणें द्वि ] लडथड, लडथडचाणा-णी करणें-सतावणें छळणें त्रास देणें ( मुलानें ) लडथडणें-अक्रि मध्यें येऊन अडथळा करणें, लुडबुडणें लडथडया-वि १ नेहमीं फिर्यादि किंवा वाद करण्यास सज्ज, कज्जेदलाल २ गोंधळ घालणारा, घोंटाळा माजविणारा ३ ( व्यापारधद्यात ) खटपटया, गडबड्या, उलाढाल्या, घालमेल्या ४ गबाळ, अर्धवट काम करणारा

लडदू(दु)-धू—वि १ धटिंगण, धट्टाकट्टा, भव्य २ गबदूल ३ निरुद्योगी, रिकामा म्ह० ( क ) रबी लडदू जाबी लडदू= रिकाम्या माणसाची येजा, येणें जाणें

लडब(फ)ड—स्त्री १ लटलट होणें, ढिलाई शिथिल झालेली स्थिति, फडफडत इतस्तत झोलकावणें, लोंबणें ( यंत्र, एखादी रचना, कपडे इ० चें ) २ लवलवीतपणा, शैथिल्य बलहानि ( अगाची ) ३ व्यग्रता व क्षुब्धता ( जीवाची ) ४ घोंटाळा, विस्खलित स्थिति ( ससाराची, जिंदगीची हिशेबाची मसर तीची ) ५ लुडबुड पहा -क्रिवि १ ढिलेपणानें, शैथिल्यानें, लटपटा फडफडत इ० बडबड ( -नाम ) पहा ( क्रि० हालणें, मारून करणें ) २ अव्यवस्थित, गयाळ रीतीनें ( क्रि० चालणें, धावणें, बोलणें, जेवणें, नेसणें, करणें ) [ ध्व ] म्ह० ब्राह्मणी लडबडाम्यद्द=इकडून तिकडे व तिकडून इकडे विनाकारण लुडबुडणें

लडबडणी–स्त्री १ डगमगणें, डगडगणें, लडबडां हालणें २ लुरेपणानें, दुसन्यास त्रास होईल अशा रीतीनें मध्यें हात घालणें [लडबडणें] लडबडणें–अक्रि १ डगमगणें, डगडगणें, लटपटणें, ढिलेपणामुळ इतस्तत हालणें २ मध्यें शिरणें, हात घालणें, लुडबुडणें पहा ३ घरबटला, लेपटला जाणें –सक्रि लपेटणें, माखणें, लेपटणें [लडबड] लडबडलाटण्या-लाटया–वि १ दांडगा उद्दाम, खलेउ २ बेपरवाईनें, दांडगेपणानें लुडबुड करणारा लड बडीत–वि १ माखलेला, भरलेला, चोपडलेला (चिखल, शेण इ० कानीं) २ (प्र) लटपटीत, डळमळीत, खिळखिळीत [लडबड] लडबडया–वि भलत्याच रीतीनें, त्रासदायक रीतीनें, मध्यें हात घालणारा लुडबुडया पहा

लडलड—क्रिवि लाडानें, लाडेंलाडें, लडिवाळपणानें, लाडी गोडीनें (क्रि० बोलणें, करणें) [स लड्; म लाड]

लडलडणें—अक्रि (क्वचित उपयोग) लटलटणें पहा

लडा—पु (प्रां) मेंढा लडी–स्त्री मेंढी

लडाई—स्त्री लढाई १ दांडगेपणा-शार २ कज्ज्या, भांडण, युद्ध; लढाई 'तुमची व त्याची गांठ पडोन, लडाई होऊन ' –वाडसमारो २ ६१ [लढणें]

लडालडा—क्रिवि (कों) लडलड पहा 'मामाच्या रे घरीं। नको जाऊं लडालडा। येऊ द गाडीघोडा।'–सह्याद्रि, फेब्रुवारी १९३६

लडियाळ—स्त्री लाटदेशीय स्त्री [स लाटी]

लडिवाळ-ळी—पुस्त्री (काव्य) १ लाडुकपणा, लाडी गोडी, लाडीक, लालन २ (सामा) लाड, कौतुक, कोड 'पुरविली आळी। जे जे लडिवाळी।' [लाड] लडिवाळ-ड, लडिवाळ, लडिवाळा–वि १ आवडीचा, प्रिय, लाडका 'निवारी निजमक्ताचें साकडें। तीं लडिवाडें पै माझीं।'–एभा २८ ६७ –२ ५. २ लाडीगोडीची, लडिवाळपणाची (भाषा इ०) [लाड] लडेवाळ–वि लाडका, लडिवाळ 'जो सकल अनर्थांचा दाता। ज्याची लडेवाळ कन्या ममता। –एभा १३ ५१६

लडी—स्त्री १ लड, सर (मोत्यांचा, फुलांचा) २ (जरतारी धंदा) एक किंवा सवा तोळा वजनाचें तयार जरतार, लड पहा

लॅडीस—न एक पत्त्याच्या खेळातील विशिष्ट डाव याचे प्रकार दोन एक ३२ पानांचा व दुसरें ४८ पानांचें

लडो—पु (गो.) मार, ताडन

लड्ड—वि मूर्ख मदबुद्धीचा जड [स ल्ट्, लड् तुल० इ लड]लड्डमुडगें-पु (वे) लड्डाचा खेळ [लड्ड+मुडगा=गोळा]

लड्डु, लड्डुक—पु लाडू [स]

लड-डी—स्त्रीपु माळ, सर (मोत्यांचा, फुलांचा) लडी पहा.

लढ—स्त्री १ समुद्रांतून, नदींतून वाहात किनान्यावर आलेला गाळसाळ, रेंदा २ गुतागुत, गुंताडा, गुरफटा ३ (ल) भानगड, घोंटाळा (क्रि० पडणें, काढणें, सोडणें, उलगडणें, उकलणें) [हिं लट] लढणें–अक्रि दाट येणें, एकमेकाला चिकटणें (फळें, कणसें, माळेंतील मोतीं इ०) ल्हडणें पहा लढया–पु (कों) लढ अर्थ १ पहा.

लढ-ढें—न १ (रा व) शेतीचा माल वाहून नेण्याची विन तट्टयाची, लांबट, पुढें निरुंद व मागें रुंद होत गेलेली बैल गाडी २ (खा) कपाशी वाहण्याची गाडी

लढण—स्त्री (व) सवय, मोड 'मुलीला जशी ल्ढण लावावी तशी लागते'

लढणें—अक्रि १ युद्ध करणें, झुंज करणें, द्वंद्व करणें २ झगडणें, भांडणें, तंटा करणें ३ (ल) स्पर्धा करणें, चढाओढ करणें, टक्कर मारणें [हिं लड़ना] (वाप्र) लढून पडणें–मोठया औत्सुक्यानें, उत्कंठेनें एखाद्यावर झडून पडणें, तुटून पडणें

लढत–स्त्री युद्ध, झुज, झगडा (क्रि० लागणें, चालणें, होणें) लढा अर्थ १ पहा [लढणें] लढता–वि १ लढाऊ, युद्धकुशल, लढवई पहा 'शिंदे याची फौज एवढी लढती, तिची ही गत' –भाव ७५ २ लढवय्या, लढणारा, योद्धा लढवय्या-पु लढण्यांत हुशार असलेला मनुष्य, योद्धा, वीर [हिं] लढव(वा)ई–वि १ झुंजार, रणधीर, रणशूर २ लढाईस योग्य (मनुष्य, घोडा, जहाज, रथ, शस्त्र) [हिं] लढविणें–सक्रि १ झुंजावयास लावणें २ बरोबरी, स्पर्धा करण्यास लावणें 'हें पागोटें त्या पागोटयाशीं लढवून पाहिलें परंतु लढत नाहीं' ३ चालविणें, करणें, योजणें, उपयोग करणें (मसलन, शकल, युक्ति, यत्न, तजवीज, साधनें) लढा–पु १ भांडण, वाद, तंटा, वादाचा विषय, भूमि (क्रि० लागणें, चालणें, असणें, होणें, राहणें व तोडणें, चुकविणें) २ प्रतिबंध, अडथळा, निरोध, हरकत, निग्रह करणारें, आड येणारें, गति कुंठित करणारें कारण 'त्या कागदावर घोटणी नाहीं म्हणून रेघ ओढताना मध्यें लढा लागतो' ३ (शब्दश व ल) गुंता, गुंताडा, गुरफटा लढाई–स्त्री १ भांडण, तंटा करणें २ सामना, रण, संग्राम ३ युद्ध, युद्धसार [हिं. लड़ाई] (वाप्र) ०जिंकणें–लढाईंत जय मिळविणें, विजयी होणें लढाऊ–वि लढण्यास योग्य (मनुष्य, पशु जहाज इ०). [हिं लड़ाऊ] ०गलबत-जहाज–न लष्करी जहाज

लढा—पु दारूगोळा भरलेली गाडी, रणगाडा. लढ-ढें पहा [हिं]

लत—स्त्री १ खोड, दुर्गुण, वाईट सवय (क्रि० लागणें, पडणें, जडणें व मोडणें, सुटणें) २ दोषीपणा, सदोषता (क्रि० लावणें, लागणें) 'हा आपल्या वचनास लत लावणार नाहीं'

३ फजीती. ४ युक्ति ५ (व.) वेड; पिसें. ' वेवाची लत आहे त्याला. ' [ सं. रुट; हिं. लत ] लता(टा)घणें–अक्रि. वाईट चालीस लागणें; बिघडणें. [ हिं. लत=खोड, संवय ]

लत–स्त्री. (प्र ) लत्ता; लाथ. ' ज्ञानरहित सदा लत खाती।' –दावि ७६१. [ सं. लत्ता ] ०कुटा–टा–कुटार–फोडगा–गादय–खोर–खोरा–वि. निर्लज्ज; निगर्गठ; वाईट चालीस चिकटणारा; लाथाबुक्क्या–निंदा–शिव्या यांना न जुमानणारा. [ लात+कुटणें, फोडणें ] ०खोरा–पु १ बाहेरच्या चौकटीच्या उंबऱ्याप्रमाणें आंतल्या चौकटीचा खालचा आडवा तुकडा. २ (व. घाटी ) जिन्याच्या पायरीस लावलेलें लाकूड. लताडणी–णें–(प्र.) लथाडणी–णें पहा.

लतमला—पु घोड्याच्या गुडघ्यावरील रोग. –अश्वप १.२८८.

लता—स्त्री. १ सरपटणारी किंवा झाड इ० वर चढणारी वनस्पति; वेल. २ फांदी; डहाळी. [ सं. ] ०गृह–मंडप–नपु. वेलीचा मांडव; कुंज. [ सं. ] ०बंध(नृत्त)–पु. (नृत्य.) नर्तकांनीं निरनिराळ्या तऱ्हेनें जाळें विणल्याप्रमाणें उभें राहून नृत्य करणें. [ सं. ] लतिका–स्त्री. लता; वेल. [ सं. ]

लताड—न. (कु.) पडकी भिंत.

लतारणी—स्त्री. ( नाविक. कों. ) घोंव हाकारण्यासाठीं डोलकाठीच्या भाकट्या गाल्यांतून भरून घेतलेली दोरी. ही दोरी मागच्या हरसास अडकवितात व पुढच्या टोंकास लोखंडी कड्यास वेढा देऊन तें टोंक दोरींत मिळवितात व त्या कड्यांत बोंवाचा हूक अडकवून लतारणी खेंचून बांधतात.

लती, लतेला—वि (व. ना.) लहरी. [ लत ]

लत्त–त्ता—स्त्रीपु लगतचा देश, प्रदेश; सरहद्द; लगता पहा.

लत्तरवाल्या—स्त्री.अव (उप) चिंध्या; लक्तऱ्या. [ फा. लत्र=लक्तर+वाली ]

लत्ता—पु चिंधी; धडपा. [ फा लत्ता ] लत्ती–स्त्री. लक्तरी; फडफड उडणारी चिंधी, फाडलेली धांदोटी. लत्त्यावरया–स्त्रीअव. चिंध्या आणि लक्तऱ्या. [ लत्ती द्वि ]

लत्ता—स्त्री लाथ; पायानें मारणें [ सं ] ०प्रहार–पु. लाथेचा तडाखा; जोरानें लाथा मारणें. ( क्रि० करणें; देणें ). [ सं ] लत्तेस शनी येणें–असणें–शनि जन्मस्थानापासून द्वितीयस्थानीं असणें –शनैश्वर पहा.

लथ(था)डणें—अक्रि लपेटलें, बरबटलें जाणें [ हिं लथ-ड़ना ]

लथ(था)डणें—उक्रि. १ यथेच्छ लाथाखालीं तुडविणें, मारणें. २ (ल.) नामोहरम करणें; जिंकणें ( प्रतिपक्षी–युद्धांत, वादांत ). ३ तिटकारणें; धिक्कारणें, तिरस्कारानें बाजूला सारणें; भर्त्सनेनें व अनादरानें वागविणें. ४ मोडणें, नासणें; भंगून टाकणें; विघात करणें; फिसकटविणें ( भरभराटीचा उद्योग, शिजलेली पक्व झालेली योजना ). लथाडणें पहा. [ सं. लत्ता; म. लात–थ; हिं. ल्थाड़ना ] लथ(था)डणी–स्त्री. लाथा मारणें इ० ( शब्दशः व ल. ); लथाडणें पहा. लथडप(स)थड, लथडालथड–स्त्री. १ नाश; विघात; मोडतोड; लाथाडणें. २ चालढकल; चालुगर ( कामाची ). ( क्रि० लावणें ). लथडप(सथडप)–क्रिवि. चालढकलीनें; हलगर्जीपणानें. [ लथडणें द्वि. ] लथडया–पु. प्रहार. ' मुष्टी लत्ता लथडये धडका।' –भुवन ३.५४.

लथाबळ—वि. १ (व.) गबाळ; बेशिस्त ( वेणी, कुंकू, व लुगडें नीट नमणाऱ्या मुलीस म्हणतात ). २ लावडी.

लथ्थड—स्त्री. (व.) १ लहानसा फेरफटका; फेरी; उभ्या-उभ्या भेट. 'तितक्यांतच एक लथ्थड मारून आली.' २ (व.) नुकसान. ' त्याही व्यापारांत लथ्थड लागली. ' [ हिं. लताड ]

लदडफदड—वि. घाणेरडा; बरबटलेला. ' तिचें काम फार लदडफदड आहे. ' [ लथडणें द्वि ]

लंदफंद—(ना.) फंदफितूर. [ फंद द्वि. ]

लदाव—पु. १ ज्यावर कमान रचतात तें मातीचें किंवा लाकडाचें काम. २ कमानीखालच्या, कमानदार दरवाजाचा, खिडकीचा भराव ३ लादलेलें ओझें [ हिं. लदाऊ, म. लादणें ]

लद्दा—पु १ चिकटलेलापणा ( केंस, कागद इ० कांचा ); लगदा. २ चिकटलेला गोळा. ३ ( इतर अर्थी ) लादा पहा.

लद्दा मुगद—पु (वे.) भाताचा प्रकार.

लप—स्त्री. वाक, वांकणें. ( क्रि० खाणें ). [ ध्व. ]

लपकणें—अक्रि. (व.) वाचणें; थबकणें. [ ध्व. लप ! ]

लपका—पु ओलसर आणि मऊ पदार्थाचा गोळा; लबका ( चिखलाचा, शेणाचा, लोण्याचा, खालीं टाकलेला, मारलेला ). ' एकादा इसम खिडकी किलकिली करून खालची मौज पहात आहे तोंच एकादा चिखलाचा लपका येई ' –नि ३४५. [ ध्व. लप ! ]

लपंगा–ग्या, लपं(पां)गें—(प्र.) लफंगा–ग्या व लफंगें पहा.

लंपट—वि. १ ( क्रिया, संसार, प्रापंचिक सुखें यांविषयीं ) निरत, आसक्त, (विशेषत) कामुक; स्त्रीव्यसनी. (समासांत) स्त्री–विषय लंपट ' निष्काम तो झाला कामासी लंपट । गोपिकांची वाट पाहात बैसे । ' –तुगा २४१. [ सं. ]

लंपट—वि. लापट; लटपटीत; ढिला ( स्क्रू, सांधा इ०, त्याचप्रमाणें त्यांचें भोंक, घर ) लापट पहा.

·लप(पा)टणें—न (ढोर, न्हावी) वस्तरा चटपटण्यास लागणारें चामडें.

लपटणें—सक्रि. लपेटणें पहा.

लपटणें—अक्रि. चिकटणें. [सं. लिप्त; हिं. लिपटना.]

· लपणें—अक्रि. थांकणें; खचणें: कचणें (तुळई, वासा, खांब). [लप]

लपणें—अक्रि. दडणें; छपून, गुप्त राहणें. [सं. लुप्] लपणि–स्त्री. लपण्याची इच्छा. 'लपणि धरुनि एके पर्वतीं तो निधाला।'–कृष्णकौतुक १३. अकक २.२६. लपंछपं, लपनछपन–न. लप्पं छप्पं पहा. लपंडाई-व-स्त्रीपु १ लपण्याचा व शोधून काढण्याचा खेळ; हा खेळ वात्स्यायन कालींहि होता. २(ल) तोंड चुकविणें; उघड न बोलणें; गुप्तपणा. ३ (ल.) काळें; कपट; लबाडी; छद्मी, चोरटीं कृत्यें. (क्रि० करणें; खेळणें). [लपणें+डाव] लपण–स्त्री. १ लपण्याची; दडण्याची जागा; आसरा; आडोसा. 'आपभयें पळतां यासी। लपणी मिळाली प्रमापासीं।'–एभा १३.१५. २ स्वतःस लपविणें; दडणें. (क्रि० धरणें; घेणें; करणें; साधणें). ३ रहस्य; खुबी. 'या ब्रह्मविद्येच्या लपणीं।'–दा ७.७.५७. [लपणें] लपणाछि(शि)पणी–स्त्री. (ना.) लपंडावाचा खेळ. लपणीचपणी–स्त्री. लपंडाव खेळ. –तुगा. लपविणें–सक्रि. दडविणें; छपविणें: दुसऱ्यास न दिसूं देणें. लपविणें व दडविणें हीं क्रियापदें अर्थानें काहींशीं भिन्न आहेत. दडविणें पहा. लपीथपी–पुस्त्री. लपंडावाचा खेळ. 'नभ तुज-मार्जी खेळे। लपीथपी।'–ज्ञा १४.९. [प्रा] लपूनछपून, लपतछपत–क्रिवि. १ चोरून; गुप्तपणानें (वर्तन करणें). २ गुप्तपणानें; उघडीक न होईल असें; दडून (असणें, राहणें) [लपणें+छपणें] लप्पंछप्पं–न. १ लपंडाव. २ शेखीचें बोलणें; अप्रासंगिक, टाळाटाळीचें भाषण, लबाडीचें, मूर्खपणाचें दिलेलें कारण, निमित्त, सबब इ० (क्रि० लावणें; मांडणें; करणें) [लपणें+छपणें]

लपांगा-ग्या—वि. (विरू.) लफंगा-ग्या पहा.

लपाटण-णें—न. (न्हावी) चटपटणें, पलाटणें पहा.

लपाटी—स्त्री. (क.) एक प्रकारचा घारा.

लपेट—पुस्त्री. १ भोंवतीं आच्छादन; आवरण, मढण (कपड्याचें, कातड्याचें, चिखलाचें, रंगाचें). २ -स्त्री घेर; परिघ, वेढा. ३ उष्ण वाऱ्याची झळ; तसेंच थंड वाऱ्याचा बाधक झपाटा, झोड. (हिं. लपाट). ४ हवा; धाड (साथीची इ०) (क्रि० येणें). ५ साथ; सार्वत्रिक आजार. ६ आपणाची धूर्तपणाची हातोटी (आंतील डावपेंच, वस्तुस्थिति कळूं नये अशी). सारवासारव करण्याची कला. (क्रि० मारणें). 'त्याची अशी कांहीं बोलण्याची लपेट आहे की, वर शंका करावयास अवसरच सांपडत नाहीं.' ७ लटपट; कावा. ८ दब; धाटणी; पद्धत (लिहिणें, बोलणें इ. ची). ९ पदर; पट्टी. [सं. लिप्; हिं लपेट] लपेटणी–स्त्री. गुंडाळणें; वेष्टण, लेप देणें. [लपेटणें] लपेटणें–क्रि. १ गुंडाळणें; वेष्टणें; झाकून टाकणें. २ सभोंवतीं वेष्टणें; गुंडाळणें. [लपेटना] लपेटा–पु. १ आच्छादन; मढण (कपड्याचें, कातड्याचें, चिखलाचें, रंगाचें). 'अडुळशाचा पाला एका पानांत घालून त्याचा पुडा करून त्याचे भोंवतीं शेणाचा लपेटा देऊन फुपाट्यांत भाजावा.' २ ज्याच्या भोंवतीं सोन्याची किंवा रुप्याची तार गुंडाळलेली आहे अशा काचेच्या बांगड्या. 'अरे कासारा, या मुलीचे हातांत लपेटाच भर.' [लपेट; हिं. लपेटवां] लपेटी–स्त्री. (विरु) लपेट अर्थ ६ पहा. लबाडीचा व्यवहार; लटपट. (वाप्र.) लपेटी खालीं-लपेटून नेणें–लपेटी मारून साधून नेणें; गुप्तता राखून वेळ मारून नेणें; सारवासारव करणें. लपेटी, लपेटीचा–वि १ लटपटीचा, लबाडीचा. २ गूढ; गुप्त (भाषण, काम, मनुष्य). [लपेट] ०लपेटीदार–वि. लपेटी असलेलें (अक्षर, भाषण).

लपोट(ड)शंख—वि. (प्र.) लतोडशंख पहा.

लप्पड—स्त्री. (ना.) थप्पड; जोराची चपराक. [हिं. ध्व. लप्?]

लफं(फां)गा-ग्या, लफंग्या-ग्या—वि. १ लुच्चा; फसव्या. २ नुसत्या वल्गना करण्यांत हुषार. ३ कांहीं तरी सबबी पुढें करणारा; चुकवाचुकवी, टाळाटाळी करणारा ४ थापा, पोकळ वचनें देण्यांत पटाईत. [अर लफाझ्=बडबड्या; हिं.] लफंगें, लफांग-गें-न. १ लचांड; संकट; अडचण; पेंच. २ वाईट, निरर्थक गप्पागोष्टी, कुटाळक्या. ३ एकसारखी, गैरफायदा, उलटाल, कचाट.

लफडा-डें—पुन. १ सतावणारें, त्रासदायक काम, संकट, अडचण. २ लचांड; झेंगट. ३ निष्फळ व खडतर वाद; रिकामी वाचावाच, झटपट. (क्रि० लावणें; लागणें). लांझा पहा.

लफणें—अक्रि. (प्र.) लपणें पहा.

लफलफणें—अक्रि १ थलथल हालणें (जनावराची कांस, पोट इ०). २ गडबडीनें, असंबद्ध बोलणें. 'वाचा लफलफीत जडत्वें गाढी।'–एभा २२.५३०. [ध्व.]

लफा, लफेदार—(प्र.) लप्फा, लप्फेदार पहा.

लफाट—पु. (ना.) अंगठा.

लफाट—वि. (व.) १ लबाड. २ लुच्च्या; हाताळ.

लफाट्या–(व.) बाता झोकणारा; बाताड्या; लफंगा.

लफाड—न. (व.) मैदान; मोकळें अंगण, रफाड पहा.

लफ्फड—स्त्री. (व.) थप्पड. 'एक लप्फड मारूं?' [ध्व. लफ्]

लफ्फा—पु १ किनखाव, जरीचें कापड, मोठा जरीचा पदर (शेला, पागोटें इ० काचा). [हिं लप्पा] लफ्फेदार-वि किनखापी किंवा जरतारीच्या काठाचें मोठ्या पदराचें (शेला, पागोटें इ० वस्त्र) लफ्याचा-वि जरीचा 'एकादा महाराज लफ्याचा पदर लावून पुढें आला मी शकुन उत्तम '-नि २३०

लफ्फा—पु १ गोल इमारती लाकूड, लाकूड चौरस करण्या करिता वरच्या अंगाचा करवतून काढलेला तक्ता २ खावास, तुळईस बळकटी येण्याकरिता जोड दिलेला तुकडा [स लिप्त, प्रा लिप्प?]

लफ्फा—पु एक गळ्यातला दागीना

लब—न (उत्तर कों) कोरफड

लब—स्त्री १ निरोपाचें काम; निरोप नेणें (क्रि० करणें, मारणें) —बाड-धोमारो १६० २ (क्र) ओठ 'कागद लब लावून सारखा फाडला निरोपाचें काम हा लबचा अर्थ कदा चित् फा लब्=ओठ ह्या पासून निघाला असावा निरोपकाम हा अर्थ सार्वत्रिक आहे ओठ हा अर्थ क्वचित् आहे व तो काहीं लाक्षणिक किंवा काल्पनिक प्रयोगांत दिसून येतो जसें-घेऱ्याची लब (=शेंडीच्या मुळाभोंवतालीं असणारा घेऱ्याचा ओठ) शेंडी आणि घरा हीं जेथें मिळतात ती जागा मिशाची लब इ० [फा लब्=ओठ तुल० लॅ इ लाबियम, लेबिअम] सामाशब्द— लबई-स्त्री निरोपाचें काम, लब [लब] लबे कामगिरी— स्त्री लब जासूदगिरी 'हिंमत लबेकामगिरी '—शारो ११ लबे शाई-स्त्री निरोप पोचविण्याचें काम लबेचा लबेशाईचा— पु निरोप्या चाकर-गडी-माणूस-काम इ०

लब—स्त्री बाक वकता लप पहा [लप] (वाप्र) ०खाणें- बाकणें, कच खाणें खचणें (तुळई वासा इ०)

लंब—पु १ ओळंबा २ (भूमिति) काटकोन करणारी रेषा ३ (ज्यो) जी रेषा पातळीच्या छेदींत असून त्या छेदन बिंदूतून त्या पातळींत निघणाऱ्या एकदर रेषावर लब असते ती रेषा त्या पातळीवर व ती पातळी त्या रेषेवर लब आहे असें म्हणतात —सूर्य ७ ४ अक्षपूरण, अक्षकोटि —वि १ लांब २ मोठा, बृहत् [स] ०क पु लब ओळंबा, आदोलक [स] ०कर्ण-पु १ (सांकेतिक) गाढव ससा, हत्ती इ० लाब कानाचा प्राणी २ (विशेषत) गाढव (लक्षणेनें वापरतात) [स] ०च्याड-चेड-छोड-वि प्रमाणाबाहेर उंच किंवा लांब (मनुष्य झाड, तुळई, दांडा) ०छडी-वि लांब पल्ल्याची (तोफ) ०ज्या-स्त्री अक्षकोटिज्या [स] ०मान-वि ओळंबणारा लोंबणारा [स] ०रेषा-स्त्री १ लब अर्थ २ व ३ पहा २ (ज्यो) उभी रेषा (इ) व्हर्टिकल अक्ष पहा —सूर्य १५ [स] ०वर्तुल-ळ-न लबवृत्त [स] ०वर्तुलाकार-वि लंब वर्तुळाच्या आकाराचें [स] ०वृत्त-न १ (ज्यो) दृग्मडळ-वलय (इ) व्हर्टिकल २ अंड्यासारखें लांबट वर्तुळ (इ) इलिप्स [स] ०स्वस्था-स्त्री (गोलाची) यथार्थ स्थिति [स] लंबा-क्रिवि १ पूर्ण लांबीनें असलेला, ठेवलेला; भुईवर पसरलेला, जमीनदोस्त झालेला (मृत्यु मूर्च्छा, प्रहार, इ० कार णानीं) 'अकस्मात् जेव्हा पटकी आली तेव्हा एका दिवसांत हजार माणूस लबे झालें' २ फस्त, फन्ना, खर्च केलेला, उडालेला (पैसा, साठा) ३ खालीं आडवा पडलेला जमीनदोस्त (कोस ळल्यामुळें-घर भिंत, झाड) [स लब, हिं लबा] (वाप्र) ०करणें-चोप देणें ०होणें-१ पसार होणें २ मरणें सामा शब्द- ०चवडा-वि लांबलचक, पाल्हाळिक 'त्यांनीं एकदर हकीकतीचा लबाचवडा विस्तार करून' —सूर्यग्र २५७ [हिं] लंबाडा-ड्या-ड्या-वि उंच व सडपातळ, सडपातळ व ढ्या, शेकाटा लंबाणभाऊ-उंच, काटकुळ्या, बेडौल माणसास विनो दानें म्हणतात लंबांतर-न (ग) दोन समातर रेषांपैकीं एकी तील कोणत्याहि बिंदूपासून दुसरीवर टाकिलेला लब —महमा ५१ लंबायमान-वि प्रमाणाबाहेर, फार मोठ्या लांबीचा अतिशय लांब लांबलचक [स लबमान] लंबासन-न १ एक आसन, लांब पसरणें २ (ल) निजणें, पसरणें [स] लंबी-स्त्री (जमीन मापणी) लबी जसें- शेताची रस्त्याची घराची लबी [लांबी] (वाप्र) ०ताणणें-लावणें लागणें-आळसानें हातपाय ताणून पसरणें लबीत-वि लांब 'बहुसाल लबीत होत्या विशेषा।' —राक ख १ पा ८ लंबू-पु (सकत) पुरुषाचें जननेंद्रिय, मनु लबे-क्रिवि लबा (वाप्र) ०करणें-मारणें गिलच्यांनीं गोख हींत दहापाच वैरागी सत्पुरुष होत तेही बसले ठिकाणीं लब केले' —भाव २८ ०चालणें-(व) मर्यादातिक्रमण करणें लंबोदर— पु १ गणपति —वि लांब पोटाचा, ढेरपोट्या [सं लब+उदर]

लबक—स्त्री १ चट; चटक (वाईट गोष्टीची), दुर्गुण, खोड लचक पहा २ पद्धति धाटी (चित्रें काढण्याची घोल, ल्याची इ०) [लब्ध] लबकणें-अक्रि १ चट चटक लागणें

लबकणें—अक्रि (चेंडू इ० पकडण्याच्या तयारीनें) पुढें वाकणें [लब]

लबका—पु (प्र) लपका (मास, चिखल शेण इ०) पहा पोचा गोळा

लबण लबणभाऊ—(विरु) लबाण पहा

लबतूक—क्रिवि (गो) अगत्यवाद

लबदा—पु ओला गोळा, लगदा पहा ०लोट-वि भगदी भिजलेला, मार बिब झालेला

लंबन—न १ आळवणें लोंबणें, लोंबकळती स्थिति २ (ज्यो) भूपृष्ठावरचें स्थल आणि भूमध्य हीं सांधणाऱ्या त्रिज्येवर वास्त

पदार्थाच्या मध्यांशीं होणारा कोन. दृक्सूत्र व गर्भसूत्र यांमधील अंतर. –सिद्धांतशिरोमणि. (इं.) पॅरॅलॅक्स. ३ ग्रहण दृग्गोचर होण्यास देशपरत्वें होणारें वेळांमधील अंतर. [ सं. ]

लवराण—न. (नाविक) डोलकाठीचा तोल जाऊ नये म्हणून जीं दोरखंडें बांधलेलीं असतात तीं प्रत्येक. याचा उपयोग क्रेन प्रमाणें होतो. यांनीं आतील वस्तु बाहेर व बाहेरील आंत घेतां येते.

लवलव—स्त्री. बडबड; जल्पना; जिभेची त्वरित गति. (क्रि० करणें; बोलणें; चालणें). [ ध्व. लव् ! फा. लब्=ओठ ] लवलव-वां–क्रिवि. (निंदा) जलद बोलताना, खातांना होणाऱ्या ओठांच्या शब्दांचें अनुकरण होऊन (क्रि० खाणें; जेवणें; बोलणें, चालणें). ' माझे गोष्टींत तूं बोलू नको म्हणून शंभर वेळां सांगितलें तथापि मध्यें लवलव बोलतो. ' [ ध्व. ]

लवलवीत—वि. पातळ. लिबलिबीत पहा.

लवाड—न. (ना.) मद्रास कडून येणारें एका जातींचें विड्याचें पान.

लवाड—वि. १ खोटें; असत्य; अप्रामाणिक (मनुष्य, भाषण, लेख, ग्रंथ, आचार इ०). २ सात्त्विक नसलेला; अंगच्या सद्गुणां-विरुद्ध वर्तन करणारा. ३ लुच्चा; गुलाम (लडिवाळपणें मुलास म्हणतात). [ हिं. लबाड ] सामाशब्द–०की–स्त्री. १ खोटेपणा, असत्यवादिता; लबाडी. २ बनावटगिरी; ठकबाजी ०झवाड-वि. खोटा व थोतांड्या; खोटा व कपटी. [ लवाड द्वि ] ०लवाड–लताड–ळ–वि. खोटा; हलकट; नीच; विश्वासघातकी; लुच्चा; सोदा इ० [ लवाड द्वि ] (वाप्र) ०वांचूनतब्हे–अद्याप पूर्णपणें असत्यवादी आहे; अजून सुद्धा तो लबाडच आहे. लवाडी–स्त्री. १ खोटेपणा; असत्यवादित्व, दुष्टपणा; अप्रामाणिकपणा; कपट. ३ खोटें, बनावट कृत्य; कपटलेख; ठकबाजी. ४ (कायदा) अन्यायाचा लाभ किंवा नुकसान व्हावें या इराद्यानें केलेलें कृत्य. म्ह० थोडी तों गोडी फार तों लवाडी. लवाडीलवाडी–लाताडी–ळी–स्त्री. लुच्चेगिरी; सोदेगिरी, लुच्चेगिरीची वर्तणूक. [ लवाडी द्वि. ]

लवाडनक्षी—न (विणकाम) एक प्रकारचें लुगडें. पोत फोणताहि, किनार रेशमी किंवा सुती, व किनारीमध्यें गोम नसून त्या जागीं पांढरे साधे घर भरून घेतलेलें असें लुगड्याचें वाण.

लवाडी—स्त्री. १ अवजड ओझें किंवा गठ्ठा आंवळून बस-विण्याकरितां व घट्ट करण्याकरिता योजलेली युक्ति (काठी घालून दोरी पिळणें इ०). २ दगड इ० उचलावयास, उचकटावयास लावलेली तरफ. ३ सैल दोरी पकडतां यावी म्हणून तिला बांधलेला काठीचा तुकडा; लवटी. ४ बाशाच्या माध्यांतून शिरकवलेली आडवी काठी. '(क्रि० घालणें)

लंवाण—पु. १ (धान्य, मीठ याची वाहतूक करणारी) एक जात किंवा त्यांपैकीं एक व्यक्ति; लमाण; वंजारी. २ (न.) त्यांच्या टोळीचे लोक, गुरें व सामान; वाट चालत असलेली किंवा तळ देऊन राहिलेली या लोकांची टोळी. [ हिं. लंबाडा ] ०भाऊ–पु. लंवाण जातीच्या मनुष्यास आदरानें म्हणतात. लंवाणी–वि. लंवाण जातीची, संबंधीं (जनावर, भाषा, चाली).

लवालव—स्त्री. (व.) रेलचेल; वैपुल्य. –क्रिवि. पुरेपूर. ' तेथें लवालव खायला मिळतें म्हणून वरचेवर जातो. ' [ लवलव ]

लंवित—वि. अवलवणारा; लोंवणारा; लोंवकळणारा. [ सं. ]

लवूद—वि. १ लुब्ध, आसक्त; परायण. २ नादी. [ सं. लुब्ध ]

लवेद—वि. गलेलठ्ठ; धट्टाकट्टा; जोरकस. [ हिं. लवेदा=सोटा ]

लवेदा—पु. १ प्रवासात बरोबर असलेला बायकामुलें, जना-वरें, चाकरनोकर इ० परिवार; खटलें. 'श्री. अणे यांनां सामानाचा फारसा लवेदा नको असतो. ' –स्वभावचित्रें १२३. २ (ल.) लचाड; अडचण.

लवोड—वि. अडाणी; खोटा; असत्य (मनुष्य, हकीकत). [ लवाड ] ०शंख–शिंग–वि. (एका खोट्या शंखाच्या गोष्टी-वरून) मोठेपणानें उगाच आश्वासनें द्यावयाचीं पण कृति कराव-याची नाहीं अशा स्वभावाच्या माणसास म्हणतात.

लब्ध—वि. १ संपादिलेला; मिळविलेला; मिळालेला. २ (गणित) काढलेला; निघालेला, प्राप्त. (भाजकानें भाज्य भागिलें असतां येणारें फल, अनुमान). ३ शब्द, वाक्य इ०कांपासुन व्यंजनेनें इ० निघालेला (अर्थ). ' त्या वाचून मला क्षणभर करमत नाहीं या वाक्यापासून त्याजवर माझा सर्व प्रेमा आहे असा अर्थ लब्ध होतो. ' ४ (समासांत पूर्वावयव असलेला) ज्यानें संपादलें, मिळ-विलें आहे असा. लब्धाधिकार, लब्धोपदेश; लब्धधन, लब्धविद्या इ० [ सं. ] सामाशब्द– ०प्रतिष्ठ–प्रतिष्ठित–वि. १ ज्यानें प्रतिष्ठा, किर्ति मिळविली आहे असा. २ (निंदार्थी) अधिक कीर्ति इ० मिळविण्याचा प्रयत्न न करता पूर्वीच्या भांडवलावरच जगणारा. ३ (निंदार्थी) खोटी प्रतिष्ठा मिरविणारा; स्वतःस मोठा समज-णारा. ' सुधारणेच्या सर्व पद्धती व्यर्थ, पोकळ व त्याचा उपक्रम करणारे लब्धप्रतिष्ठ '–नि ३५९ ४ (क.) फाजील लुडबुडणा. [ सं. ] ०प्रतिष्ठा–शिष्टाई–स्त्री कोरडी प्रतिष्ठा; प्रौढी; पोकळ गर्व [ सं. ] ०शूरत्व–न. वढाई; पुढारी. [ सं. ] ०संज्ञ–वि. पुनः स्मृति किंवा भान प्राप्त झालेला; सावध. [ सं. ] ०स्मरण–स्मृति–वि. १ (मूर्च्छेनंतर इ०) भानावर आलेला; सावध. ' तों होऊन लब्धस्मरण उठिला झाला । ' २ (अन्य-कारानें) स्मरण, आठवण ज्याला झाली आहे असा. [ सं. ] लब्धि–स्त्री. १ संपादन; लाभ; प्राप्ति. २ फायदा; नफा. ३ (गणित) भागाकार. [ सं. ] लब्ध्या–वि. लब्धप्रतिष्ठ. [ सं. ]

लभ्भे(भ्भा)चाट्ट—वि बनावट, खोटें करणारा; पदरचें रचणारा, बात्या

लभ्भाशाई, लभ्भु(भ्मु)शाई—स्त्री १ बनावट गोष्ट, खोटे लेख, कैफियती इ०, ल्वाडी २ थापफल, पोकळ बोल, बाता (क्रि० करणें, लावणें, मारणें, चालवणें) –वि लभ्भेचाट्ट पहा

लभाशाई–वि (दादर) ल्पल

लभणें—अक्रि मिळणें, प्राप्त होणें, लाभणें पहा 'बोलके पणाचेनि क्षोभें। लागसरू न लभे। बोला प्रभु।' –ज्ञा १३ ३२१ [स लभ्]

लभ्य—न लाभ फायदा, प्राप्ति –वि १ मिळविण्यास शक्य, योग्य, मिळण्यासारखें २ (लब्ध ऐवजीं चुकीनें योजलेला) संपादिलेला, मिळविलेला [स लभ्] ०मान–वि लाभणारा, मिळणारा [स लभ्] लभ्यांश–पु १ लाभ, मिळकत २ मिळविलेली, संपादिलेली गोष्ट [स लभ्य+अंश]

लमाण, लमाणभाऊ, लमाणी—लवाण इ० पहा

लमाणलगडी–पु एक मुलाचा खेळ –मखेपु ११०

लय—पुस्त्री १ वाद्य वाजविल्यानंतर मागें कांहीं काळ पावेतों राहणारा त्याचा नाद, ध्वनि २ (–पु) (वादनात) ताल देण्याच्या क्रियेमधील विश्रांतीचा काल ह्याचे द्रुत, मध्य व विलंबित असे तीन भेद आहेत ३ (वादनात, नृत्यात, चालण्यात) समकाल ४ गायन, वादन व नृत्य यांचें ऐक्य ५ (एका पदार्थाची दुसऱ्याशीं तद्रूपता झाल्यानें होणारा) नाहींसेपणा, लोप, अनस्तित्व ६ (खर्चामुळें, वापरामुळें) खलास होणें, क्षय, नाश, निःपात ७ झोंप ८ राजयोग समाधीस होणाऱ्या दुसऱ्या विघ्नाचें नांव ९ –पुन जगाचा नाश, प्रलय संहार उत्पत्ति आणि स्थिति या शब्दांबरोबर वापरतात 'कयास मज हा लया दूर करि दया दृष्टि झाकली।' –ऐपो ३६८ १० –पु चित्ताची एकाग्रता, एकतानता (क्रि० लागणें, होणें) 'लय लक्षूनियां झालें म्हणती देव।' –तुगा २८०८ [स. ली–लय] लयास जाणें–अक्रि १ तद्रूप ऐक्य होणें 'जरी स्तन्य बुद्धीसीं लया। जाइजे कां।' –ज्ञा १६ १८ २ विनाश पावणें, नाहींसें होणें सामाशब्द– ०क्रिया–स्त्री १ संहारकार्य २ गाण्यांत ताल धरणें [स] ०स्थ–वि तन्मय, समाधींत असलेला 'लयस्थें एकें।' –ज्ञा ११ १२९ [स]

लय—विक्रिवि (कुण) १ अतिशय; पुष्कळ, पराकाष्ठेचा, मायंदळ २ (विशेषणाच्या आरंभीं जोडला असतां) अतिशय, फारच उदा० लय मोठा, लय उंच, लय लांब [स लय (अवाङ्मयपणा पाहून मनाची आश्चर्यचकित, दिङ्मूढ स्थिति जी होते तिचें प्रतिबिंब म्हणजे लय, विनाश अशा संहारवाचक अर्थानें)]

लय, लयलूट–स्त्री (कुण) रेलचेल, समृद्धि अतिशयितता, लयकाळ येणें–अक्रि (व) संभार, परिवार येणें लयस–वि (व) परिपूर्ण; अव्यत 'सर्व सामान लयस,' इत्यादिशीं– क्रिवि (कुण) पुष्कळ दिवसपर्यंत, पुष्कळ दिवसांत [लय+दिवस]

लर्जा, लर्जी—पुस्त्री (संगीत) अनाहुत काळांत हाताची तयारी असल्याचें दाखविण्यासाठीं स्वराचा कंपितपणा करून दाखविण्याची क्रिया –कला १३८ [फा लर्झा=कंप]

ललकार, ललकारणी—पुस्त्री १ पुकारणें, हाक मारणें; (विशेषत) दरबारात राजाचें आगमन सूचित करण्यासाठीं भाट, चोपदार जी आरोळी देतात ती 'आदब, इ०' २ ओरडणें; मोठ्या आवाजांत सांगणें ३ उच्च स्वरात गाणें 'हा गातो तेंच तो गातो परंतु त्याची कांहीं ललकारणी निराळी आहे' [ललकारणें] ललकारणें–अक्रि १ मोठ्यानें पुकारणें, हाक मारणें २ मोठ्यानें ओरडणें, म्हणणें (दवंडी पिटताना, गातांना इ०) ३ (चालण्याची गर्दी करण्यासाठीं) सांगणें, ओरडणें (जनावराला हाकताना) ४ ओरडणें, गर्जना करणें (दरडावताना, खडसावताना) –सक्रि १ ओरडून हाक मारणें २ गायन करणें, गाणें 'फंदी अनंत कविवद छंद ललकारी।' –ऐपो २५३ [ध्व हिं ललकारना] ललकारी–स्त्री आरोळी, ओरड, पुकारा, गर्जना, मोठ्यानें हाका मारणें, ललकारणी पहा (क्रि० करणें, मारणें) [ध्व स ललत्कृ; प्रा ल्लक, हिं ललकारी]

लल(लि)त—पु (संगीत) एक राग ह्या रागात षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार कोमल मध्यम तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति षाडव–षाडव वादी कोमल मध्यम संवादी षड्ज गानसमय रात्रीचा चवथा प्रहर

ललन—न १ क्रीडा २ कंपन [स]

ललना—स्त्री १ स्त्री, महिला २ स्वैरिणी किंवा विलासी स्त्री [स लल्=विलास करणें]

लललल—उद्गा निराशेचा किंवा विस्मयाचा उद्गार, चचचच!

ललाट—न १ कपाळ 'सच्चिदानंद एक मेळीं। तेंचि त्रिवळी ललाटीं।' –एरुस्व १ ६१ २ दोन भिवयांमधील प्रदेश [स] ०रेषा–खा–स्त्री कपाळावरील लेख, दैव, नशीब [स] ०रेषा उभी राहणें–दैव अनुकूल, प्रसन्न होणें, नशीब उदयाला येणें

ललाम—न १ रत्न २ भूषण ३ शोभा 'अमोल्य ललामाचिया खाणी।' –मुभादि ४ ५४ ४ चिन्ह ५ कपाळावरचें चिन्ह –वि सुंदर [सं]

ललित—न. १ एक वृत्त. ह्याच्या चरणांत ११ अक्षरें आणि स, ज, स, ल, ग हे गण असतात. उदा० 'देवता मुनी नमिति सर्वदा। तुजवांचुनी कोण सर्व-दा।' २ प्रियांचीं राग विशारदर्शी लक्षणें; भाव. (आळसानें आळेंपिळे देणें, लोळणें इ०). ३ विलास; शृंगार. ४ स्त्रीचें नृत्य. ५ ललीत पहा. -वि. सुंदर; रमणीय; मनोरम. २ स्वैर; विलासी; विषयी (स्त्री). ३ कोमल. [सं.] सामाशब्द- ०अलंकार-पु. वर्णनीय जो प्रकृत अर्थ त्याचें वर्णन न करितां त्याचा प्रतिबिंबरूप जो अप्रकृत अर्थ त्याचें वर्णन करणें. उदा० 'न गणावा गदहदि मग लेसावा काय हो! मशक तातें।' -मोभीष्म १.२५. [सं.] ०कला-स्त्री. काव्य, गायन, वादन, चित्र, नृत्य इ० सौंदर्य-विषयक कोमल कला. (इं.) फाईन आर्ट [सं] ललिता-स्त्री. १ स्वैरिणी स्त्री. २ सुंदर स्त्री. ३ सामान्य स्त्री. ल्लना पहा. ४ देवी; पार्वती. [सं.] ०पंचमी-स्त्री. १ आश्विन शुद्ध ५ चा दिवस. ह्या दिवशीं ललितादेवीची पूजा करतात. २ या दिवशीं केलेली ललितादेवीची पूजा. [सं.]

ललुपतु, लल्लुपत्तु, लुलुपतु, ललोपतो—नस्त्री. अंजारणी गोंजारणी, भोळावणी; लाडीगोडी; खुशामत करणें. [दे. प्रा. लल्लि=खुशामत; किंवा लाला+पुता=पुसा] ०करणें-दादापाया करणें; आर्जव करणें. 'आम्ही कांहीं खोटें ललोपतो करीत नाहीं.' -पेद १०.६६. ललेथापे-स्त्री. थापटणें व हात करणें; गोंजारणें; कुरवाळणें. [का. लालें = अंगाई+थाप; किंवा लाड+थोपटणें]

लल्ल—वि. चंचल. -शर.

लल्ला—पु. आमिष; मधाचें बोट; प्रलोभन. (क्रि० लावणें; दाखविणें; देणें).

लल्ला(ल्हा)ट—न. (प्र.) ललाट पहा. म्ह०-दैव नाहीं लल्लाटीं पाऊस पडला दोंताचे काटीं ०रेषा-रा-ललाट रेषा पहा.

लल्हावणें—अक्रि (व.) लालचावणें. 'खायला लल्हा वला.' [लला]

ल(लं)व—स्त्री. १ (दाढी, मिशी, डोकें इ० ठिकाणीं असणाऱ्या राठ केसांवाचून) पाठ, पोट, हात, पाय इ० अव-यवांवरील बारीक, मऊ केस, अंगावरील केस २ प्राण्याच्या कातडीवरील मऊ केस, लोंकर. ३ खराऱ्यानें निघालेले घोड्याच्या अंगावरचे केस व मळ. [सं. लोम=ल्व]

लव—पु. १ अणु; सूक्ष्म अंश. २ (पल्ज्यो.) अंश, भाग. ३ अपूर्णांकाचा अंश (वरचा भाग). ४ तुकडा 'दारधारी रिपु-गणाचे लव। करिन ऐसें जाणावें।' -जै २९.१२. ५ छत्तीस निमिषाइतका काळ. 'निमिष निमिषार्ध त्रुटि लव क्षण।' -एभा २.७१५. ६ क्षण. -वि. थोडा अल्पस्व. 'प्रभुची दे न भीति लवलीला।' -मोभीष्म ४.४०. [सं] ०क-वि. किंचित. ०लेश-पु. किंचित् अंश, कण 'परांत गुणाचा लवलेश नाहीं.' [सं.]

लव—पुन. एक वृक्ष व त्याचें फळ.

लवकंड—स्त्री. १ लोळकंड; एकमेकांवर उडया मारणें व लोळणें, झोंबाझोंबी (खेळांत, भांडणांत-कुत्रीं, मांजरें, गुरें इ० कांची). (क्रि० देणें). २ (ल.) गर्दी; दाटी; रेटारेटी; हडळी. [लवंडणें]

लवकर—न. अवधी, अवकाश; (आधीची) वेळ; उशीराच्या उलट. 'अजून लवकर आहे एवढांच कशाला जातां!' -क्रिवि. १ जलदीनें; त्वरेनें, गर्दीनें. २ पटकन; पुष्कळ वेळ जाण्यापूर्वी. ३ आधीं; नेहमींच्या वेळेपूर्वी. 'यंदा लवकर पेरे झाले म्हणून शेतें लवकर पिकलीं.'

लवकळी—स्त्री. (व.) हलकल्होळ. 'इतक्यांत दंग्याची चोहोंकडे एकच लवकळी उठली.' [ध्व.]

लवका, लवकिरा—वि. (प्रां) लवचीक; मृदु; नरम; वांकणारें; नमणारें. 'हें पाटीचें झाड बळकट असून लवकें असावें लागतें' -मराठी ६ वें पु (आ. २ री.) पृ. २५६. [लवणें]

लं(ल)वका—पु हातानें, तोंडानें तोडलेला तुकडा; लचका (मासाचा, वणकेचा इ०) (क्रि० घेणें, तोडणें; काढणें व निघणें; जाणें).

लवखर—वि. (प्रां.) लवका; लवचीक पहा.

लवखाद—स्त्री. (घाईनें, उतावीळ पणानें घेतलेली) उडी; झडप; झांप (कांहीं वस्तु, वेणगी यावर) (क्रि० पडणें). 'उमेद-वारांची लवखाद पडती.'

लवंग—स्त्री. १ एक झाड. २ हिचें फळ. उत्पत्ति मलाका व अंबोयना बेटांत फार. लवंगा म्हणजे लवंगाच्या झाडाच्या न उमललेल्या वाळलेल्या कळया होत. उपयोग मसाल्यांत व सुगंधी पदार्थांत तेलहि काढतात. ३ एक सोन्याचें इ० लवंगेच्या आका-राचें कर्णभूषण. [सं.] सामाशब्द- ०का(क)चरी-सुपारी-स्त्री. कोवळी असतां लवंगेच्या आकाराच्या तुकड्यासारखी कातरलेली, शिजविलेली सुपारी; कोणत्याहि आकाराची ल्हान सांडें केलेली शिजवून वाळवलेली सुपारी. ०चुरी-चूर-स्त्रीपु. लवंगकाचरी सुपारी (संक्षेप) ०पट्टा-पु (तंजा) दालचिनी. लवंग(गी)पिपळी-स्त्री पिंपळीची अतिशय ल्हान जात ०फूल-न. लुगड्याचा एक प्रकार. लुगड्यावरील लवंगेच्या आका-राचें फूल. लवंगल-पु (शाप) लवंगांच्या तेलांतील मुख्य घटक. पुष्कळ सुगंधी तेलांत हा असतो. (इं.) युजेनोल. लवंगादि वटी-स्त्री. एक चूर्ण किंवा त्याची गोळी. लवंगी-वि. १ लवंगेची

२ लवंगेप्रमाणें बारीक, लहान किंवा तिखट. ०कापूर-पु लवंगेच्या अर्कापासून काढलेला कापूर. याच्या सुईसारख्या कांड्या असतात ०कुत्रें-न. कुत्र्याची एक लहान जात ०फटाकडा-पु. लवंगेसारखा बारीक पण वणखर आवाज करणारा फटाकडा. ०मिरची-स्त्री. लवंगेसारखी बारीक पण फार तिखट अशी एका जातीची मिरची. लवंग(ग्ये)तेल-न. लवंगानें तेल. [लवंग+तेल]

लवंग-का—स्त्री (गो.) पहार. [स लोहांग] लवंगी-स्त्री.१ (बोळी) साधी काठी. -गुजा ६२. २ लोहंगी; लोखंडाची वेटाळी जागजागीं लावून मजबूत केलेला प्राणघातक सोटा. ' विचवा लवंगी गुरेगुज संगसोटा बरची फेकिती।'-ऐपो १०९.

लवंगणें—अकि. लवकणें; मुरगाळणें; दुखावणें (शरीर, अवयव).

लँवगाट—न. (कु.) १ लचांड. २ (ल.) रखेली.

लवगी—स्त्री. (वे.) दोरी. [हिं. लाव=दोर]

लवं(घ)घा—पु दाह; शोष; अतिशय तृष्णा ' हैसाचि लवंघा सुटे। मग भुई ना सेजे सटे। पाणियाचें न सुटे। तोंडोनि पात्र।' -ज्ञा १७.१४९.

लवंचक—न. ढमारणी; पोकळपणा, निरर्थकत्व. ' आतां द्वंद्वांचें लवंचक। धांडूनि दुणीचें वेंचुक।' -अमृ ५.३३.

लवची(चि)क—वि. १ न मोडतां वांकणारा; लवणारा; लवका; लवचिरा. २ स्थितिस्थापक. ३ हटी, आग्रही नसलेला; दुसऱ्याचें ऐकणारा (माणूस).

लवटव—पु. परस्परचें प्रेम; लाडीकपणा.'जावया परपुरुषाशीं। लवोटवो लावी निज मतीसी।' -एभा २१.२७४. [? तुल० फा लाव=विनोद]

लवटी—स्त्री. ओझें, भारा आवळून बांधण्यासाठीं त्याच्या भोंवतालीं बांधलेल्या दोरींत घातलेली काठी, चीप. ०घेणें-(कों.) गाठ मारतेवेळीं सैल दोऱ्यामध्यें एक हात काठी घालून ती पिळवटून न हालेशी झाल्यावर करकचून बंद बांधणें. ' सांध्यावर लवटी घे म्हणजे धास्ती नाहीं '

लवटें—वि. १ लवण्याजोगें. २ लवलेलें. -शर. [लवणें]

लवंडणें—सकि. १ उलंडणें; कलंडणें; पालथें पाडणें. २ उलंडून सांडणें. -अकि. १ उलटणें; सांडणें; एका बाजूस किंवा पालथें पडणें. २ (कों.) घसरून पडणें ३ (बिछान्यावर इ०) निजणें; आडवें होणें, वामकुक्षी करणें.

लवडसवड-डी—स्त्री. लवकर; तातडी; त्वरा. ' एशी तेथिची जीवा आवडी। म्हणोनि तेंचि देखावया लवडसवडी।' -ज्ञा ११.५९८. -एभा ३.६१७ [लव म.सवड ?] लवडसवडीं, लवडांद चडीं-क्रिवि (काव्य) त्वराप्रमाणें; जलदीनें; घटपटीनें; घलाशीनें. -एरुस्व ५.७९. ' श्रीकृष्णें खांदा घेऊनि कावडी। पाणी वाहत लवडसवडी।'

लवडा—पु. (अश्लील) पुरुषाचें जननेंद्रिय; शिश्न; लिंग. [हिं] लवडेघट्ट-स्त्री. (अशिष्ट) १ अतिशय रेलचेल; मोठें वैपुल्य. २ (ल.) मातीमोल स्थिति.

लवंडा—पु १ (व.) मुलगा. ' तो माझा लवंडाच आहे.' २ पोऱ्या; गुलाम. [फा. लवन्द; हिं. लौंडा]

लवंडी—स्त्री १ बटीक, दासी. २ वेश्या. ३ रखेली. [फा. लवन्द; हिं. लौंडी] लवंडी(डि)चा-वि. (एक शिवी) नीचोत्पन्न; जारज. हा शब्द शिवी देण्यात, निंदा करण्यांत योजतात. ' फुणिकून आला लवंडिचा पातक।' -ऐपो १२६.

लवण—न. मीठ; क्षार. -पु. क्षाररस. -वि. खारट; खारें; क्षारयुक्त. [सं.] सामाशब्द- ०जल-न. (काव्य) (खारें पाणी) समुद्र. ' लवणजलविंदे करून। सर्व हा पसरला लवायमान।' [सं.] ०त्रय-न. सैंधेलोण, पादेलोण, बिडलोण हीं तीन लवणें; त्रिलवण. -योर १.१७६. [सं.] ०पंचक-न. संचळें (पादेलोण), सैंधव, बिडलोण, औद्भिद् (जमिनीमध्यें उकरून निघालेल्या खाऱ्या पाण्यापासून सूर्यकिरणांच्या किंवा अग्नीच्या साहाय्यानें झालेलें मीठ) व समुद्राच्या पाण्यापासून झालेलें मीठ. -योर १.१७६. [सं.] ०शाक-ख-पुस्त्री. खारावलेलीं फळें, भाज्या; लोणचें. [सं.] ०सागर-पु. खारा समुद्र. ' कां लवणाची कुंजरी। सुदलिया लवणसागरीं।' -ज्ञा १५.३१८. [सं.]

लवण—नस्त्री. १ खोलगट, सखल स्थल (जमिनींतील इ०), बहखल. (सामा.) खोल, आंत गेलेला भाग; खळगा. जसें- पायाची-मानेची-हाताची-लवण. २ वळण; बांकण (रस्त्याचें, नदीचें इ०). ३ (व.) लहानसा ओढा; नाला. ४ उतार; उतरती जागा. ५ लीनता; लवणें. [लवणें] म्ह० लवण तेथें जीवन. ०भंजन-न. (उप) १ पूज्यतेचें व नम्रतेचें मोठें आडंबर करणें; लवून नमस्कार करून पूज्यतादर्शक शब्दांनीं संबोधणें, बोलणें. (क्रि० करणें). ' पंडित भेटती समस्तर। लवण भंजन अतिनम्र।' -एभा १०.१७३. २ अत्यंत नम्रता; आदर; आर्जव. [लवणें + भजणें] लवणा-वि. (व) ओणवा. ' लवणा पड. ' लवणी-स्त्री. वांकलेल्या शरीराच्या अवयवाच्या खालील लवण; खळगी. २ बाक, वक्रता; कमान (रस्त्याची इ०); लवणांतील आत गेलेला भाग. [लवणें] लवणें-अकि. १ वांकणें. लवलेलें-वि वाकलेलें, नमलेलें. ' भारेंलवे प्रतिपदीं भू, शेष धरूं शके न लवलीला।' -मोभीष्म ४.४०. २ वांकणें; दबणें, दबकणें. ३ तळपणें (वीज) ४ स्फुरणें (डोळा). ५ कलणें (मन, मनोवृत्ति); बाढणें (मनदेवता-पिंगळी) ह्या अर्थी मन, मनदेवता, मनपिंगळी इ० शब्द कर्तृस्थानीं योजतात. ६ (व.) उडणें; उडी मारणें. ' भिंतीवरून लवला. ' ७ लीन, मग्न होणें.

'गुरुचरणीं त्यजुनि खेद लवतीस।'-मोवन ४ ७१ [स लीन, नमन, अप नवन, हिं नौना, प नौणा] लवन-पु पाणी वाहून जाण्याचा पाट, लवण अर्थ ३,४ पहा

लवथवणें—अक्रि १ लवलवीत स्थूल होणें २ लोंबणें 'अमुप लवथविती कातडी।'-दा ३ १ १९ 'लवथवती विकाळा ब्रह्मांड माळा।'-आरती शंकराची लवथवित-वि थलथलीत, लवलवीत [लवणें द्वि]

लवया—पु (राजा) हातानें धरून ओढलेला शरीरांतील मांसाचा गोळा, लचका (क्रि० घेणें, काढणें, तोडणें)

लवदार—न (कु) जुनें, फाटकें वस्त्र, चोंदर

लवधट—वि (ग्रा) १ निष्काळजी, बेपरवा, अविचारी २ दुराग्रही, हट्टी, अडेल

लवनी—स्त्री एक प्रकारचें सिताफळ [स]

लवनी—स्त्री (ग्र) लवणी पहा

लवफल—न लव या झाडाचें फळ हें लहान पण फणसा सारखें आंबटसर असतें 'गुलावजाव व लवफलें रा स्वामींनी पाठ आहेत'-पेद १८ ११७ [स लवलीफल?]

लवरलवर—क्रिवि (ना.) थरथर

लवलव—स्त्री १ बडबड, सुरसुर लवलव (बोलताना जिभेच्या लवण्यावरून) 'वृथा बोलाची लवलव।'-एभा २१ ४३ २ हालचाल, वळवळ 'कीं गर्भांधु नेत्रपातीं। न साडी लवलवा।'-कथा १ २ ३३ [लवणें द्वि] लवलव-लवा-क्रिवि १ अलद बोलण्याचें अनुकरण करून, ज्वलन, लुव लुव पहा (क्रि० बोलणें, करणें) २ घाईनें, गर्दीनें, त्वरेनें लवलवणें-अक्रि १ जल्द व चपळाईनें वाकणें व वळणें (अति शय लवचीकपणामुळें), वळवळणें (साप, किडा इ०नीं) २(ल) बोलण्याविषयीं उत्सुकतेनें फुरफुरणें, वळवळणें (जीभ), स्फुरण चढणें [लवणें] लवलवाट-पु (लवलवचा अतिशय) १ तळमळ, उत्सुकता २ घाई त्वरा 'सद्गुरूचें ध्यावया उच्छिष्ट। मजचि मोटा लवलवाट।'-एभा १२ ५४७

लवलव—स्त्री १ उपजतशीलपणा, कोमलता 'का भूमीचें मार्दव। सांगे कोंभाची लवलव।'-ज्ञा १३ १८० २ टवटवी, उत्सुकता 'तया अवधानाचिया लवलवा। पाहता व्याख्यान चढलें थावा। चौगुणें वरी।'-ज्ञा १३ ११५०

लवलवीत—वि १ लवका, लवचिक लवचीक २ मऊ व दबणारें (लोणी, मळलेली कणीक, शिजलेला भात, तुडवलेला चिखल इ०), लवथवीत 'रक्तपूर्ण मांसपेशी। तळीं पडली लवलवीत।'-मुमादि २६ ६६ [लवलवणें]

लवलक्षण—न (राजा) देखणेपणा, सौंदर्य, चारुता (टवटवी, सुरेखपणा इ० मुळें येणारी) [लव+लक्षण]

लवलाह—पु १ त्वरा, वेग 'पूर्वे पुण्याचेनि लवलाहें। तुज लाधलें अवस्मात हें। ब्रह्मज्ञान गा।'-विपु ७ १०२ २ सामर्थ्य. -माज्ञा १८ १०८९ [लव=क्षण] लवलाह लवलाही-हें-ह्या-क्रिवि. (काव्य) झटपट, जलदीनें, झटक्यात, क्षणात 'ऐसें म्हणूनि लवलाही। शेतासी आला ते समयीं।' 'तरी चद्रबिंब लवलाहा। काढूनि देईं राजणीचें।' ह ६ ९

लवलाव—पु चळवळ, लवलव पहा

लवली—स्त्री एक झाड हरपरेवडी पहा [स]

लवा—पु लव्हा पहा

लवा—पु सत्ता 'तेथें सरकारचा अमल व लवा '-ख ७ ३५६६ [अर लीवा=निशाण]

लवाज(जि)मा—पु १ नोकर चाकर, पदरचे लोक, मोठे पणा, डौल दिसण्यासाठीं बाळगावा लागणारा परिवार (माणसें, गाड्या, घोडे, नोकर वगैरे) बड्या माणसाचा इतमाम 'बरोबर लवाजिमा मातबर'-मराचिथोशा ३६ २ अट, लवाजीम पहा 'जाहीरदारींत सर्वांस दोस्तीचे लवाजिमे जाहीर होतील'-रा ५ १७० [अर लवाजिमा] लवाजीम-पु १ हक २ कर 'हक दक वगैरे लवजीम कूल जे असतील ते वसूल करून सरकारात जमा करणें'-वाडबावा २ ४५ [अर लवाज़िम्]

लवाद—पु १ मध्यस्थ, पच, दोन पक्षात तडजोड कर-णारा २ मध्यस्थी, तडजोड (कोर्टात न जाता खाजगी रीतीनें केलेली) [अर लवाम=वैवारी] ०कोर्ट—न आपसांतले तंटे सरकारी न्यायकोर्टात न नेता पचामार्फत तोडून घेण्यासाठीं स्थापि लेली सरकारमान्य सस्था लवादी स्त्री लवादाचें काम, पचा ईत -वि लवादाच्या, मध्यस्थीच्या सबधाचा [लवाद] लवादी लवादीचा निवाडा-हुकुमनामा-पु लवादानें, पचानें दिलेला हुकूमनामा, निवाडा

लवाळा—पु तृणविशेष, लव्हाळा लव्हा पहा

लवित्र—न कोयता [स]

लविथपी—स्त्री लपडाव -शर (ग्र) लपीथपी पहा

लवे-लागणी—स्त्री (पडवी व शेजार) सबध, ऋणानुबध (ल) विश्व किंवा प्रवृत्ति आणि माया 'भणाल लवे लागणिया। तरि मध्यें लटिका वायाचा।'-ऋ ४४

लवोटवो—पु मार्दव, लाडिकपणा लवटव पहा 'धन वता पुरुषापाशीं। स्त्री लवोटवो करी वैशी।'-एभा २१ ३३६ लवोथवो-पु १ लवम्व २ आदरातिथ्य 'वोस घरासि वस्तीसि पहाहो। निर्जीव पाहुणा आग राहो। त्याचा कोण करी लवो थवो।'-एभा २१ ४९८ [लवम्व]

लव्ह(व्हा)गी—स्त्री गदा, लवगी, लोहांगी पहा

लव्हलव्हें— क्रिवि ( खा. ) लवकर. लवलव पहा. ' लव्हलव्ह घालसील तव्हात गाव जोय. ' = लवकर लवकर चालशील तेव्हा तर गाव जवळ येईल. [ लव द्वि ] लव्हा-वि. (वे.) लौकर पीक देणारें.

लव्हा—पु. एक पक्षी.

लव्हा, लव्हाळा—पु तृणविशेष; दर्भासारखें गवत. हा चार फूट वाढतो व ओढयाच्या आणि खाडीच्या तीरांवर प्रायः आढळतो. याचा घरांचीं छप्परें, चटया इ०कडे उपयोग करतात [ सं. लव-वा ] लव्ही-स्त्री. बारीक व नाजूक जातीचा लव्हा.

लव्हा—वि. लहान. [ सं. लघु; प्रा. लहु ]

लव्हा—पु. मोठी तरवार. ' राया माधव जसन-मुलुख लव्हा केला । ' -ऐपो ३२५. १९. ०गर्द-स्त्री. तरवारींची खणाखणी. ' खना खना लव्हागर्द उडली । '-ऐपो २७१. [ लव्हा+गर्द=गर्दी ]

लव्हाणा—पु गुजराथी लोकांतील एक जात किंवा तींतील एक व्यक्ति

लव्हार, लव्हारकाम, लव्हारकी, लव्हा(व्हे)रसाळ—(प्र.) लोहार इ० पहा.

लश(ष)कर, लश्क(श्क-ष्क)र—न. १ सैन्य; फौज २ सैन्य जेथें राहतें तो भाग, कँप, गोट. -पु. नाईक, खलाशी, किंवा लष्करांतील नोकर, लास्कर. [ फा. लश्कर् ] ( वाप्र ) लष्करच्या भाकरी भाजणें-निष्कारण दुसऱ्याच्या उठाठेवी करणें ( पूर्वी सैन्य एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाई तेव्हा त्या त्या ठिकाणच्या लोकाना शिपायांच्या भाकरी भाजण्यासाठीं लावीत यावरून हा वाक्प्रचार निघाला आहे ). ' पत्र धाडणारा खरोखरच जानकीबाईच्या चळवळयाचा होता कीं ... लष्करच्या भाकरी भाजणारा होता ? ' -रंगराव लशकरगिरी, लश्क(ष्क)रगिरी-स्त्री १ सैन्यांतील चाकरी, शिपाईगिरी; स्वारीवर जाणें, २ ( उपजीविकेकरितां ) लष्कराबरोबर जाणें; लष्करांतील वाणी, शिंपी इ० चा धंदा ०भरती-स्त्री सैन्यात नवीन उमेदवार भरणें; ( इं ) रिक्रूटिंग ' लष्करभरतीची चळवळ निघाली तेव्हा सरकार पक्षपाती प्राफेसरानीं त्याचे अभ्यास बुडविले ' -केले १. ११७. लश(ष)करी, लश्क(ष्क)री-वि. सैन्यासंबंधीं. ०कायदा-पु युद्धामुळें किंवा बंडाळीमुळें नेहमींचा असलेला कायदा तहकूब होऊन लष्करी अधिकाऱ्याचा बसलेला अंमल व त्यांचा कायदा; ( इं. ) मार्शल लॉ ०पिवळा गहूं-पु मोठया दाण्याचा पिवळा व चमकदार गहू. -मुंव्या ४१. ०वेदा-पु वाहून नेण्यासारखें लष्करी सामान, बाजारबुणगें.

लशाकोडया—वि. ( राजा. ) कोड आणि लस असलेला; गलत्कुष्ठ झालेला [ लस+कोड ] लशी खरूज-स्त्री. लस वाहणारी, ओली खरूज [ लस+खरूज ]

लशून—लसूण पहा.

लष्ण, लषाण—न. ( व.ना. ) १ भूतबाधा. २ कुरूप व्यक्तीला उद्देशून योजावयाचा एक तुच्छतादर्शक शब्द.

लष्न-म—न ( व. ) १ व्यसन. ' हें लष्न नवें लागलें. ' २ लचांड.

लस—स्त्री जखम, फोड इ० तून वाहणारें पाणी, द्रवांश; रक्ताच्या पाण्याचा स्राव, द्रवांश. [ सं. रस, लसिका ].

लसण—न ( खा. ) लसूण पहा.

लसणा—पु कुऱ्हाड इ०कांस धार लावण्याचा दगड; निसणा.

लसणें—अक्रि. ( व. ) लचकणें. लसलसणें पहा. ' असा वरच्यावर लसलसतोस कां ? ' [ सं. लस् ]

लसणें—अक्रि. विलसणें; शोभणें. ' म्हणोनि परिहास हा सहज आजि येला लसे । ' -मो कृष्ण ६०.९ [ सं लस् ] लसत-वि. उत्कृष्ट; शोभायमान, उज्वल. [ सं. ] लसती-स्त्री. विलासी, सुंदर स्त्री. -वि विलसणारी, सुंदर. [ सं. ] लसत्कांचन-न तेजदार सोनें. ' एकें लसत्कांचनसम पिवळे । '-ज्ञा ११.१३५. [ सं. ] लसित-न १ विलास, क्रीडा २ उल्हास; उत्कंठा.

लसणें—बोचणें; मनास लागणें; डाचणें. ' सुंदर सकल वधूतें कशी न लसतीच होय दमयंती । ' -र १. [ सलणें ]

लसलस-स्त्री. १ अतिशय वळवळ; चळवळ. २ उत्कंठा. लसलस-लसां-क्रिवि १ अतिशय तप्त व क्षुब्ध द्रवपदार्थाच्या, क्षतात किंवा नासलेल्या फळांत बुजबुजणाऱ्या किडयांच्या व्यापाराचें दर्शक किंवा शब्दाचें अनुकरण होऊन. २ टवटवीतपणें; टकमकीतपणें. लसाकफसाक-क्रिवि. ( कु ) भपळफपळ. लसफशीत पहा.

लसलसणें—अक्रि. लसलस करणें १ रसरसणें; सळसळणें, वळवळ करणें ( पाणी इ० ). २ क्षत इ० कात किडे इ० कांनीं वळवळ करीत असणें; बुजबुजाट होणें. ३ भर येणें; भरज्वानी येणें ( तारुण्याची चमक, तेज ). ४ टुमटुमणें; टवटवणें, तरतरणें, प्रफुल्लित होणें. ५ अति उत्कंठित होणें. ६ बसबसणें. [ सं. लस्. द्वि. ] लसलसाट-पु ( लसलसचा अतिशय ) बुजबुजाट; वळवळ. ( क्षतात किंवा नासक्या पदार्थांत किडे इ० काची ) [ लसलस ] लसफशी(सी)त-वि. १ ढील; शिथिल, ओंगळ; घट्ट, जडस नसलेलें ( पागोटें, वेणी इ० ) लसलशी(सी)त-वि. १ अतिशय तप्त, फार खदखदलेला; उसळणारा, फसफसणारा ( द्रव पदार्थ ). २ क्षपाटयानें बुजबुजणारे ( क्षतांतील इ० किडे ); बुजबुजाट असलेलें ३ लुसलुशीत; टवटवीत, टकमकीत. ' तैसें हृदयीं अरदळ । अधोमुख कर्दळीनाळ । अति कोमळ लसलसित । ' -एभा १४.४६५.

लसूण—पुस्त्रीन १ एक वनस्पति याच झाड कायाप्रमाणें असतें लसुण स्वादाकरिता मसाल्यात, चटणींत वगैरे घालतात याचे अनेक औषधी उपयोग आहेत २ या वनस्पतीचा कादा किंवा कायाची पाकळी [ स लशुन, प्रा ल्हुण, ल्सण ]

लसणा-ण्या-पु १ एक रत्न, दुध्या काचमणि ( स. ) लशुन ह्यास बहिर्वक्र आकार दिला असतां त्याचें बिडालाक्ष किंवा मार्जारनेत्री हें रत्न होतें ह्याचे रग धूम्र, पिंवळट, पाढरट वगैरे २ ( कों ) फणसाचा प्रकार ( बारीक गरे असलेला ) [ ल्सुण ]

लसणी-स्त्री १ लसणाची पाकळी, कुडी २ तिच्या आकाराचा स्त्रियाचा एक अलकार ( जवा, तोडा इ० ) ३ वैदूर्यमणि –वि १ लसणीच्या पाकळीच्या आकाराचा (मणि इ०) २ लसणासबधींचा [ ल्सुण ] ०जवा-पु जव्याचा एक प्रकार याच्या कड्या लस णीच्या कुडीच्या सारख्या असतात २ लसुणजव्याप्रमाणें जोडणी ०चिंच-न वेताची एक ल्हान जात याला पिंगट फूल येतें ०सालंमिश्री-स्त्री सालमिश्रीची ल्हान जात याच्या उलट पंजाबी सालंमिश्री लसूणवी स्त्री लसुणाची पाकळी, कुडी

लसूण घांस—पु ( कों ) एक प्रकारचा चारा [ इ. ल्यूसर्न ग्रास ]

लस्सी—स्त्री. १ दूधपाणी २ ( व ) दूध व पाणी मिळून केलेली थडाई [ हिं ]

लहंगा—पु घागरा, परकर ( मोठ्या बायकाचा ) [ हिं, तुल० फा लुग् म लुगी ]

ल्हज—पु क्षण, पळ, निमिष [ अर ल्ह्ज ]

लहडणें—अक्रि ( प्र ) लागणें, लहणें, लगटणें ' ल्हडतील ताटाना कणस। मग शाळूची जंवा। देऊ दवाजीला दुवा। ' –टोकळकृत मोटवरचें गाणें

लहणी हुंडी—स्त्री हुडीचा एक प्रकार उदा० म चे पैसे ब जवळ आहेत क चे पैसे ब जवळ नाहींत तेव्हा ब वर दिलेली हुडी त्यानें स्वीकारावी म्हणून क नें अ पासून घेऊन ब कडे पाठविलेली हुडी [ लहणें + हुडी ] लहणें-न १ ज्याजवळ त्याचे पैसे नसतात अशा व्यापाऱ्यावर जेव्हा एखादा व्यापारी हुडी देतो तेव्हा तो त्याजकडे हुडीची रक्कम रोख अथवा ज्याकडे त्याचे पैसे असतील त्या व्यापाऱ्यावर दिलेली तितक्या रकमेची दर्शनी हुडी पाठवितो ही रोकड किंवा हुडी लहणें होय. २ जम, मेळ ( मनुष्याचा, वस्तूचा ) –वि लाभ दायक, धार्जिणें [ स लभन, प्रा ल्हण] (वाप्र ) ( ह्याचें मला, ह्याचें माझें) लहणें नाहीं–त्याच्या आणि माझ्यामध्यें ममता, स्नेह इ० नाहीं

लह(हा)वर, लाहंवर—न १ लष्कर पहा प्रवासाचा सरजाम, खटला, सामानसुमान आणि नोकरचाकर २ ( ल ) भिकाऱ्याचा, मुलाचा, रिकामटेकड्या किंवा त्रासदायक लोकाचा समुदाय ३ अडगळ वाटणारा ( कळप, खिल्लारें, गाड्या इ० काचा ) सरजाम, कारखाना, गाड्या, गुरेंढोरें इ० चें लचाड ४ अधाशी, सर्वभक्षक मनुष्य किंवा पशु

लहम—स्त्रीपुन ल्हज पहा [ अर हिं ल्ह ]

लहर—स्त्री १ तरग, लाट ( पाण्याची ) ' प्रकटति बहुतर ल्हरी, करि करिवरसा न्हदासि बहु तरल हरी। ' –मोकृष्ण १६. १० २ शरीरात उठणारा वेग, पेटका, झटका ( मादक, विषारी पदार्थ, विषारी दश, क्रोध, काम इ० का पासुन किंवा मरणकाळीं येणारा) 'सोसिल शोकविषाच्या कृष्णा मत्काय ह्या किती लहरी।' –मोस्त्री ४.९ ३शौचाच्या वेळीं होणारी पोटातील खळबळ,ओसर; शौचाचा आवेग ४ झगडा, वेदना इ० च्या वेळीं होणारी क्रिया, धडपड ५ वाऱ्याची झुळूक, मद वायु ६ हुक्की, एकदम होणारी इच्छा, प्रवृत्ति, कल ( मनाचा ) ' वामनाची तेव्हा ल्हर लागली नाहीं ' ७ विशिष्ट जातीच्या सापाच्या गळयाखालच्या रेघा ( ह्या जितक्या असतात तितक्या तो साप चावलेल्या मनुष्यास विषाच्या ल्हरी येतात अशी लोकात प्रसिद्धि आहे ) ८ नागमोडी सारखी रेघा ( कापड, वस्त्र इ० वरील विणकामातील किंवा रंगानें उठवि लेली ) ९ कापड, पोषाख याची नागमोडी घडी १० आकस्मिक झडप, प्रासणें ( झोपेनें ) 'झोपेची ल्हर' ११ छाया, झाक [ स ल्हरी ] सामाशब्द– ०दार–वि १ छादिष्ट, ल्हरी, तबियती इ० २ नामी, सुदर, ल्हर दाखविणारा ( पोषाख, गाणें, वाज विणें, भाषण, कविता इ० ) [ लहर ] ०वहर-स्त्री १ जोम, ज्वानी, भर; अत्युकर्ष ' नवतीची ल्हरबहर थोडी ' ' आब्यांची ल्हरवहर उन्हाळ्यात असती ' २ हुक्की [ लहर+वहर ] लहरा–पु १ ( सगीन ) छाया, थाट, सुर ( विशेषत तंतुवाद्यावरील ) ' कोणत्या रागाचा ल्हरा आणू बरें ? ' २ तान, ल्कैर ( वाप्र ) ०मारणें–छादिष्टपणानें क्रीडा करण, मौज मारणें लहरी–स्त्री १ लाट २ ( काव्य ) शरीरात उठणारा वेग, पेटका ' काम–क्रोध ल्हरी ', ' लागला म्हणोनि ल्हरी। भाजेची ना। ' –ज्ञा २ ७१ –तुगा १४० ३ ( व ) चुनडीप्रमाणें नागमोडी रेघा असलेलें स्त्रियाचें नेसण्याच एक वस्त्र ल्हर पहा –वि छादिष्ट, चचल, मनस्वी [ लहर ] ०दार–वि १ ल्हरी, नागमोडी (काठ, वस्त्र इ० ) लाटासारख्या रेघाचा ' किनखापे लाल ल्हरीदार '–समारो २ ७३ २ छादिष्ट ल्हरी, त हेवाज, विलक्षण ३ प.व्याच्या लाटप्रमाणें वरखालीं होणारें [ ल्हर+दार] ०बहरी–वि छादिष्ट, ल्हरी, ल्हरबहर पहा [ ल्हरी हिं ] ल्हऱ्या पिटणें–( व ) कमालीची उत्सुकता लागणें, दाखविणें ' जाण्यासाठीं ल्हऱ्या पिटतो जसा '

लहा—पु ध्यास लाहो पहा

ल्हा, ल्हालल्हा—स्त्री १ उसासा, धापा देणें २ लख लख करणें, झळाळणें, चकाकणें ३ (ल) स्पर्धेनें धापा देणें, लाल्हा होणें, स्पर्धेनें होणारी तडफड (क्रि० एखाद्याशीं बांधणें) –क्रिवि १ (उष्णतेच्या तापामुळें) धापा देणें उसासे टाकणें यांचें अनुकरण करून (क्रि० करणें) २ प्रखर सूर्य किरणामुळें हवेच्या हेलकाव्यांचें, मृगजळाचें अनुकरण करून (क्रि० करणें) ३ शेतांतील लहरीदार पिकांच्या लकाकण्याचें अनुकरण करून ४ अत्यंत रुक्ष होऊन पिकें जणु धापा टाकीत आहेत त्यावेळचें अनुकरण होऊन (क्रि० करणें) ल(ला)हाकणें अक्रि (ना) धापा टाकणें, जोरानें श्वासोच्छ्वास करणें

ल्हाई—स्त्री (कों कु) सागुतीचा किंवा मांसाचा खका किंवा फोडी

ल्हांगड—स्त्री दुचाकी गाडी (धान्य, मूस, वडवा इ० नेण्याची)

लहांगी—स्त्री गदा लोहांगी पहा

लहांचट-ड-र—वि १ नकाराला, निषेधाला न जुमानता खणपटीस बसणारा, दुराग्रही, हट्टी २ (मुख्यत्वें ल्हाचर) लचाळ (चहाडी करण्यांत, लुडबुडण्यांत), लुब्रा (व) वहाचर

लहाडी—स्त्री. (मराठवाडा) राडी, विस्तवाची खाच

लहाण—वि लहान पहा

ल्हाणें—अक्रि १ लाभणें, ल्हणें पहा. 'स्वर्गू न ल्हाणे एकु थवडी।' –शिशु १२३ २ पान असणें 'काव्य जाली माता वर्ळी। तिए टाळों न ल्हती जवळी। सेया गाउवा।' –शिशु ८५ [स लभन, प्रा ल्हण]

ल्हान—वि १ लघु सान, अल्प (वय, किंमत, सामर्थ्य इ०नीं) २ आखूड, छोटा (आकार, प्रमाण इ० नीं) ३ अल्प, थोडा [स लघु प्रा लहु] म्ह० (व) ल्हानशी बुटली साज सकाळ उग्ली=घरीं नवरा बायको दोघेच असल्यामुळें ज्यास फारसा खर्च नसतो अशास म्हणतात (बाप्र) ल्हान तोंडीं मोठा घास घेणें–आपला ल्हान दर्जा न ओळखतां एखादी मोठी गोष्ट करणें, आपल्याकडून होण्याजोगें नसलेलें काम करावयास सिद्ध होणें सामाशब्द– ०केळी-स्त्री एक वनस्पति देवकेळी पहा ०खुरी-वि १ ल्हान पायाची (गाय, बैल इ०) २ ल्हान बांऱ्याची, ठेंगणीठुसकी 'ल्हानखुऱ्या टेंगण्या देखण्या त्या कां होईना त्या राजी।' –सला ४३ [ल्हान+खूर] ०गा-वि १ धाकटा, अधिक बुटका-आखूड-ल्हान-लहान, (तारतम्यानें) कमी (उंची, रुंदी, वय इ० कांत) २ छोटा बुटका, आखूड, ल्हान (तारतम्याशिवाय) [ल्हान+गा प्रत्यय] ०झार्डी-पु (कों) एक मासा ०थोर-मोठा-वि ल्हान आणि मोठा, प्रत्येक आकाराचा, वयाचा व जातीचा, एकंदर ०पण-पणा-नपु १ ल्घुता; हलकेपणा 'ल्हानपण देगा देवा। मुंगी साखरेचा रवा।' २ बाळपण. [ल्हान] ०बापा-पु (खा) बापापेक्षां लहान असणारा चुलता [तुल० कानडींत चिक्क अप्पा, दोड्ड अप्पा (ल्हान बाप, मोठा बाप) असे शब्द धाकट्या व मोठ्या चुलत्याला वापरतात] ०लहु-लोहु-लव-वि लहुल्हान पहा ०वी-स्त्री. १ (वयाचा, आकाराचा) ल्हानपणा २ (ल) हलकेपणा; लघुत्व, थोरवी, मान्यता, गौरव यांचा अभाव [ल्हान] ०वीथोरवी-स्त्री तुलना करतांना दाखविलें जाणारें दोन माणसांतील (मुख्यत्वें वयाचें) अंतर, दोन वस्तुमधील तुलनात्मक अंतर, असमता 'स्त्री-पुरुषांची दोहों वर्षांची ल्हानवीथोरवी असावी' ०सर-वि ल्हानसा, काहींसा ल्हान 'हें घर ल्हानसरच आहे पण टुमदार आहे' [ल्हान] ०सहान-वि बारीकसारीक, ल्हान, हलका इ० (व्यापक व सामान्य अर्थी) [ल्हान द्वि किंवा ल्हान+साना] लहाना-वि ल्घु, ल्हान पहा [ल्हान] ल(ला)हानाव(ळ)णें-अक्रि १ कमी, अधिक ल्हान, अधिक अशक्त इ० होत जाणें, घटणें 'पाऊस ल्हाना वला म्हणजे मग जा' २ क्षीणक्षीण, बारीकबारीक होणें (विझणारा दिवा) ३ ल्हान प्रमाणांत येणें, संकुचित होणें (जवळचे भाग सुजले असतां, डोळा) [ल्हान] लहानाळ-वि (राजा) सामान्य प्रमाणापेक्षां लहान बांध्याचा (मनुष्य, पशु इ०) [लहान] लहानाळणें-सक्रि अधिक लहान-आखूड-अशक्त-मंद-कमती-करणें (शब्दशः व ल) 'आपण भ्रमें लाहाना ळला।' –दा ९ ३४ [लहान]

लहा(हां)वर—वि १ वाचाळ, बडबड करणारा २ लचाड, लुडबुड्या, लाडा कारभारी

ल्हाय, ल्हायल्हाय—स्त्री क्रिवि ल्हाल्हा पहा

लहाय—पु (कु कों) १ मांसाचा तुकडा २ काठीवर भाजलेलें मांस

ल्हासें—न ल्हान डाग, वण लासें पहा. 'उरीं जयाचे सिरवे ल्हासें।' –सारुह १ २३ [लास]

ल्हारी—स्त्री १ तीन आण्याचें एक जुनें नाणें, लारी. २ (यावरून) तीन आणे (एकवट)

ल्ही—स्त्री (व) लव्हाळें

ल्हीन—वि (प्र) लीन पहा [लीन] ०पणा-पु. (बायकी) लीनता, विनय. 'इतकी श्रीमंती मिळविली पण अजून अंगांत किती ल्हीनपणा!' –हाकाध २१

लहु—वि ल्घु, ल्हान, बारीक –क्रिवि (गो.) हळवेच, सावकाश [स लघु, प्रा लहु] ०ल्हान-वि लघ्वाकृति, ल्हान

यारीक २ लहान व सुंदर, लहान व देखणा ( सजीव प्राणी ) [ लघु+लहान ]

लहु(हुं)डी—स्त्री एक शस्त्र, लोखंडाचें अग्र बसविलेली काठी लोहांगी 'पाश लहुडी चडक-चक्र।'-मुआदि ३०१६४ -कृमुरा २५ १४ [ लोह+अग्र ]

ल्हेजा-मा—पु. ( व ) क्षण, ल्हज-म पहा 'लहेमाभर दम खा '

ल्हळणें—अक्रि ( व ) निश्चेष्ट पडणें 'बाधा झाली नि तो जागच्या जागीं ललला ' [ लोळण ] लळतलोंबत-क्रिवि १ फरपटत, खरडत २ लोंबत, लोळतलोंबत ( क्रि० चालणें, जाणें, येणें, धरणें, ठेवणें इ० ) [ लोळणें+लोंबणें ] लळतें घेणें-क्रि हलक्या हातानें, हळू, सहज रीतीनें घेणें लळती गोष्ट लळतें घोलणें-स्त्रीन. मन वळविणारें किंवा शांतवनपर भाषण

ल्हळत्या—वि ललित्या पहा

लळलळ-ल्ला—क्रिवि ल्वल्ओत रीतीनें ( हालणारी, बाहेर लोंबणारी जीभ) ( क्रि० करणें) [ म लल् ] लळलळणें-अक्रि फेसासह-लाळ बाहेर लोंबणें, इकडे तिकडे हालणें, ल्वल्ल करणें ( जीभ ) ल्ळल्ळाट-पु ललल करणें, लललणें 'तैसा जिभाचा लल्लाटु देखिला।आवालुवें चाटिता।'-ज्ञा ११ ४२८

लळा—पु १ प्रीति, ममता ( लालनपालन केलेलें, करीत असलेलें मूल, पशु इ०कावरील ) ( क्रि० करणें, बाळगणें, पाळणें लावणें) 'कीं हा जेंवि तसी न मायपुरवी दुष्यंदुद्भवाचा लळा।' -मोकृष्ण ५७ २९ २ लाड, हट्ट ( मुलाचे, आश्रिताचे ) म्ह० गव शील लळा तर पडेल गळा 'तुका म्हणे अहो केशीराजा दयाळा। बरवा हा ल्ळा पाळियेला शेवटीं।'-तुगा ४५५ ल्ळा याचा मूळचा अर्थ आईबापाची किंवा वरिष्ठाची प्रीति ममता हा आहे परंतु लौकिकांत कनिष्ठावर किंवा वरिष्ठावर केलेली प्रीति अशा दोन्ही अर्थीं हा शब्द योजतात [ स लल्-ड ] ( वाप्र ) ०चालविणें-पुरविणें-लाड पुरविणें, मनाप्रमाणें करणें-करू देणें, कोडकौतुक करणें ०देणें-प्रेम लावणें, माया करणें 'इंद्रिया ल्ळा देउनी।'-ज्ञा ३.१९४ सामाशब्द- ल्ळ( ळि-ळे )वाड, ल्ळेवडा, ल्ळवेडा-वि लाडका 'म्हणे रे बापा लळवेडा।'-ययराज १८ 'तीं लळिवाडें पैं माझी।' -एभा २८ ६७७ 'तो भक्त थकुडु। मिया केला ललेवडु।' -भाए ८०९ 'तेवी निजभक्त ल्ळेवाड।'-एभा २ ७० लळेया-वि हट्ट घेणारा 'का ज लळेयाचे ल्ळे सरती।'-ज्ञा ९ ३

लळी(ळि)त—न १ नवरात्र इ० उत्सवाच्या शेवटच्या दिवशीं रात्रीं उत्सवदेवता सिंहासनारूढ झाली असें कल्पून वासु देव, दडीगाण इ० ईश्वरभक्तांचीं सोंगें आणून त्या सोंगांनीं स्वसंप्रदायानुरूप देवतेस प्रसाद मागून सभासदास वाटण्याचा विशिष्ट समारंभ २ ( यावरून ) उत्सवप्रसंगीं सोंगें आणून नाटकाच्या प्रवेशाप्रमाणें खेळ करणें ३ अशा प्रसंगाकरिता रचलेलीं व म्हटलेलीं गाणीं, अभंग, पद इ० वचनाचा ग्रंथ ४(ल)दुष्परिणाम, दु खात, फजीती ( राज्य, संसार, व्यवहार इ० ची ) -तुगा ४८४ -शर ५ शेवटचें मंगल म्हणून मानलेल्या एका मालकेचा शेवटचा अभंग मंगल पहा [ स ललित ] ( वाप्र ) लळ(ळि)-तावर येणें-वाद इ० प्रसंगीं चिरडीस येऊन निकरावर येणें, अतिप्रसंग होऊन रागावणें ललित्या-वि लळीत करण्यात निपुण ( हरदास इ० )

ल्ळ्तम् गळ्तम्—न ( व ) अति सख्य [ गळणें द्वि ]

लक्ष—पु १ शतसहस्र लाख ही संख्या 'निवडूनि निजे सेना।लक्षवरी।'-ज्ञा ७ ११ २ -न ( ल ) आनंदाची गोष्ट, लाखाच्या योग्यतेची गोष्ट, लखलाभ लाख पहा 'ऐसें ऐकुनि म्हणती आम्हांला हेंचि लक्ष ते पितर।'-मोआदि ४ १४ [ स ] सामाशब्द- ०दीप-पुअव ( उत्सवांत लावलेले ) शंभर हजार दिवे, उत्सवांतील रोशनाई ०पू(पु)जा-स्त्री १ (फुलें, फळें विशिष्ट झाडाचीं पानें अक्षता इ० कांचीं) लक्ष संख्या वाहून ( देवाची इ० ) पूजा करणें २ वरील पूजेकरिता ( फुलें, फळें, इ० कांचीं ) जमविलेली वस्तूंची संख्या, लाखोली [ स ] ०भोजन-न धर्मकृत्य म्हणून लक्ष ब्राह्मणास भोजन घालणें [स] ०चौऱ्यायशी योनी-स्त्रीअव चौऱ्यायशीं लक्ष जन्म मनुष्यें चार लक्ष, पशु वीस लक्ष, कृमि अकरा लक्ष, खेचर दहा लक्ष, जलचर नऊ लक्ष, स्थावर तीस लक्ष एकूण ८४ लक्ष ०लाभ-पु लखलाभ पहा [ स ] लक्षश.-क्रिवि लक्षावधि, लाखोगणती [ स ] लक्षाचा मनुष्य-माणूस-पु पराकाष्ठेचा उत्कृष्ट, लायक मनुष्य; लाखमाणूस लक्षाधीश-पति-पु लाखों रुपये जवळ असलेला मनुष्य नवीन लक्षापती सावकाराच्या मालमत्तेची जप्ती करून जुलुम चालविण्यात येतो '-विक्षिप्त १ २० [ स लक्ष+अधीश पति ] म्ह० १ लक्षाधीश कीं कक्षाधीश २ लक्षापति कीं भिक्षापति लक्षानुलक्ष-वि लक्षावधि, असंख्यात [ स लक्ष+अनु+लक्ष ] लक्षावधि-क्रिवि लक्षश , लाखोगणती लाखों [ स लक्ष+अवधि ] लक्षेश्वर-पु लाख रुपयाचा मालक, श्रीमंत मनुष्य ईश्वर पहा [ स लक्ष+ईश्वर ] लक्षेश्वरी-स्त्री मोठ्या संपत्तीची मालकी लक्षाधीशपणा म्ह० लक्षेश्वरी कीं भिक्षेश्वरी

लक्ष—न १ लक्ष्य, नेम ( बंदुकीचा इ० ), बाणाचें उद्दिष्ट 'पै लक्ष भेदिल्याहीवरी।'-ज्ञा १८ ४२६ २ अनुसंधान, अवधान, चित्त 'कीं दोतीं धीं विसुरिजे। परी पिलीं लक्ष।'-ज्ञा

१६ १००, [स लक्ष्] लक्षक–वि लक्षिणारा, पाहणारा लक्षिणें (–कि) पहा लक्षणीय–वि १ दर्शनीय २ मननीय, विचारणीय [धें] लक्षणें–सकि (प्र) लक्षिणें पहा १ समजणें, कल्पना करणें 'रूप लक्षूनियां झालों म्हणती देव।'–तुगा २८०८ २ काळजी करणें, रेखणें ' स्वसुनादि रक्षील। मन्मातुळ जगदीशा, प्रेमें मजहूनि अधिक लक्षील।' –मोआश्व ३ ३१ ३ –सकि कळणें 'तेही लक्षे तें पुढें। लक्षण सांगों।' –ज्ञा १३ ३४१

लक्षण—न १ खूण २ सुचक चिन्ह, ज्ञापक विशेष, गुणधर्म, ज्याच्या योगानें एखादी गोष्ट निर्देशिली किंवा ओळखली जाते असें कांहीं 'धूम पाहिला असतां एथें अग्नि आहे असें ज्ञान होतें म्हणून धूम हें लक्षण अग्नि हें लक्ष्य, स्वभावाचे ज्ञापक गुणावगुण, प्रत्येकी 'पटकन दुसऱ्यास शिवी देणें हें सुझे अगीं वाईट लक्षण आहे' ३ अभिधा, व्याख्या, तत्त्वाचा परिस्फोट करून किंवा धर्म सांगून केलेलें एखादा गोष्टीचें वर्णन ४ (वैद्यक) निदान, निदानाच्या पांच भागांपैकीं तिसरा (चिन्हें) ५ (न्यायशास्त्र) गुण, उपाधि–जाति 'प्रत्येकास मुख्य तीन लक्षणें असतात'–यथि ४ ६ लवलक्षण, सौंदर्य ७ अवलोकन, दृष्टि ८ (अशिष्ट) लक्ष्मण, रामाचा भाऊ. [स लक्ष्=१ खूण करणें २ पहाणें] म्ह० नाव मोठें आणि लक्षण खोटें सामाशब्द– ०गीत–न एखाद्या रागास लागणारे स्वर, त्याची जाति, समय वादी–सवादी स्वर वगैरे माहिती ज्या चीजेंत सताल बांधून दिलेली असून जी चीज त्याच रागांत गावयाची असते ती [स] ०समन्वय–पु व्याख्या किंवा वर्णिलेल्या गोष्टीची व्याख्येशीं, वर्णनाशीं योग्य, यथार्थ जुळणी २ क्रियापदाचा कर्त्याशीं दाखविलेला बरोबर सबंध [सं लक्षण+समन्वय] ०हीन–वि (सामान्यत अपेक्षित लक्षणांनीं रहित (वधू), शुभलक्षणें नसलेला (घोडा) विशेष गुण किंवा सुलक्षण नसलेली (व्यक्ति, वस्तु इ०) [स लक्षण+हीन]

लक्षणा—स्त्री शब्दाचें किंवा शब्दसमुदायाचें अर्थलक्षण, भावार्थ, शब्दश दाखविलेल्या अर्थापलीकडचा गर्भित अर्थ जिच्या योगें बोधित होतो ती वृत्ति, वाच्यार्थाहून निराळा पण तत्संबद्ध अर्थ, लाक्षणिक किंवा अलंकारिक गर्भितार्थ उदा० 'चोराचे भयानें सारा गाव पळाला' येथें गाव ह्या शब्दाची लक्षणा गावातील लोकांचा जो समुदाय त्याजवर होती अजहल्लक्षणा पहा [स] सामाशब्द– ०सबध–पु (तर्क) शब्दानें किंवा शब्दसमुदायानें लक्षिलेली गोष्ट आणि मनात असलेली व गर्भित गोष्ट यामधील सबध वाच्यार्थ आणि भावार्थ यांमधील सबध व्यजनासबंध लक्षणैकचक्षुष्क–वि (तर्क) पदार्थांच्या लक्षणा–गुणधर्मांकडे ज्याचें लक्ष आहे असा लक्ष्यैकचक्षुष्काच्या उलट [स]

लक्षिणें—सकि १ पाहाणें, अवलोकन करणें २ (मनांत) उद्देश धरणें, हेतु ठेवणें 'लक्षुनिया मिथुळापथ। परम आनंदें चालले।' ३ (काव्य) वाट पहाणें, मार्गप्रतीक्षा करणें 'चार घटका तुझा मार्ग लक्षीत बसल्यें आहे' ४ लक्षणें, चिन्ह किंवा आनुषंगिक सूचक गोष्टी यांवरून जाणणें, समजणें 'मुलाची वाढ प्रतिक्षणीं पाहू लागलें असतां दिसत नाहीं परंतु महिन्यानें किंवा वर्षानें पाहिलें असतां कांहीं थोर दिसतें तेव्हां प्रतिक्षणीं वाढ आहे असें लक्षावें' ५ उमगणें, काढणें, ताडणें (गर्भित मत, अतर्गत सत्य) [स लक्ष्] लक्षित–वि १ लक्षिलेला, उद्दिष्ट २ पाहिलेला, दिसलेला ३ उमगलेला, लक्षणावरून, सूचक गोष्टीवरून किंवा स्वरूपावरून जाणलेला

लक्ष्मी—स्त्री (अपभ्रष्टरूपें लक्ष(छु)मी लक्षिमी) १ विष्णूची स्त्री, सपत्ति, उत्कर्ष, वैभव, सौंदर्य इ० ची देवता २ भाग्य नशीब, सद्दी ३ धन, सपत्ति इ० ४ (काव्य) श्री, शोभा, सौंदर्य, दर्शनीयता (सामा वस्तूची) ५ (कृषि) शेतीच्या उपयोगाचीं जनावरें (गाई, म्हशी, बैल, रेडे) 'पाटलाजवळ दोन खडी लक्ष्मी आहे' 'रानात लक्ष्मीला पाणी भेटत नाहीं' ६ (ग्रा व) स्त्री, बायको 'तुझ्या शेतांत निंदण्यास किती लक्षिम्या होत्या?' [स] (वाप्र) ०अवतरणें–लक्ष्मीची कृपादृष्टि होणें, समृद्धि येऊन शोभा प्राप्त होणें (कुटुंब, शेत, घरदार, व्यापार इ० स) लक्ष्मीचा होरा–पु भरभराटीचा काल, भाग्योदयकाल लक्ष्मीची मोठी बहीण–अक्काबाई पहा ०मोरीवाटे येणें–गडगज सपत्ति येणें, लदलद होणें. सामाशब्द– ०ताल–पु गाण्यांतील एक ताल [स] ०नारायण–पु लक्ष्मीसह विष्णु एक दैवत ०नारायणाचा जोडा–पु एकमेकाला शोभणारी नवराबायको, आदर्श दांपत्य ०पति–पु १ विष्णु २ धनवान् मनुष्य [स] ०पुत्र–पु श्रीमत मनुष्य [स] ०पूजन–पूजा–नस्त्री १ गृहप्रवेशानें नवऱ्या मुलीला सासरीं आणल्यानंतर दांपत्याकडून केलेली लक्ष्मीची पूजा २ अश्विन वद्य अमावास्येस धनिक, व्यापारी इ० लोक मोहरा, रुपये इ० द्रव्यावर लक्ष्मीचें आवाहनपूर्वक पूजन करतात तें लक्ष्मी(लक्षुम)बाईची दया–स्त्री लक्ष्मीची कृपादृष्टि ह्याच्या उलट अक्काबाईची दया ०राखण–न लक्ष्मीनें कुटुंबात रहावें म्हणून लक्ष्मीकरितां निराळा काढून ठेवलेला रोजच्या जेवणाचा भाग ०लीळ–पु लक्ष्मीचा पति [लक्ष्मी+लीला] ०वत वि लक्ष्मीवान् ०वान्–वि १ सपत्तिमान्, श्रीमान २ उत्कर्ष पावणारा वर्धमान आबादीचा [सं लक्ष्मी+वत्] ०विलास–पु एक रसायण हें विशेषत क्षयावर देतात [स] ०विलास तेल–न घृतल हें सर्व रोगनाशक आहे [स]

लक्ष्य—न १ लक्ष ठेवण्याची किंवा नेम धरण्याची वस्तु वेध्य, निशाण २ अवधान, सादर चित्त ३ ज्याच्या योगानें

पदार्थ पहावयाचे असतात आणि दिशा निश्चित करावयाची असते असें लहानसें भोंक ( तुरीययन्त्राचें इ० ) ४ सावज ५ (तत्त्व) ब्रह्मात्मस्वरूप –वि १ अवलोकण्यास, अवधान देण्यास, निरखण्यास, जाणण्यास शक्य, उद्दिष्ट, जरूर, योग्य २ समजलेला, सुचित किंवा उद्दिष्ट म्हणून ग्रहण केलेला, लक्षणेनें ज्ञेय. [ सं ] सामाशब्द– ०दर्शी–वि १ खोल दृष्टीचा, अचुक, योग्य दृष्टीचा २ चांगला नेम मारणारा, निशाणबाज ३ आसक्तचित्त [ सं ] ०भेद–पु लक्ष्याचा भेद, वेध ०भेदी–वेधी–वि लक्ष्याचा भेद, वेध करण्यात कुशल [ स ] लक्ष्यार्थ–पु लक्षणेनें प्राप्त झालेला अर्थ, गर्भितार्थ, वाच्यार्थाहून भिन्न अर्थ. ' तत्पदार्थ त्वपदार्थ दोहींचा जो लक्ष्यार्थ । त्यासि ऐक्य हा फलितार्थ महावाक्याचा । '[ स लक्ष्य+अर्थ ] लक्ष्यांश–पु १ लक्षावयाची, ध्यानात घ्यावयाची, विचार करावयाची, जाणावयाची इ० गोष्ट २ लक्षिलेली, मनात आणलेली, ग्रहण केलेली, समजलेली गोष्ट ' शबल जो वाच्य श बोलिजे । शुद्ध तो लक्ष्यांश म्हणिजे । ' ३ ( तत्त्व ) वाच्यांशाचा त्याग झाल्यावर शेष राहिलेला अधिष्ठान ब्रह्मात्मा –हवो [ स लक्ष्य+अंश ]

**लाइलाज**—वि निरुपाय, नाइलाज ' आता वारवार तुम्ही विचार लिहूं लागला तेव्हां लाइलाज जाणून लिहिलें आहे ' –ख १.२८, –ऐटि १ ५९ [ अर ला+इलाज् ] लाइलाजी–स्त्री निरुपाय, व्यर्थत्व, उपाय चालत नाहीं अशी स्थिति, कुंठितावस्था 'लाइलाजीस्तव दर पत्रीं मेवेसी विनती लिहितो '–दिमरा १२०

**लाइस**—स्त्री ( नाविक वु ) कापडी वोंब लाकडी वोंबावर ठेवल्यानंतर त्यास गुडाळणारी दोरी ०करणें–कि उलटें घल्हवून होडीच्या गतीस अवरोध करणें

**लाई**—स्त्री लाही पहा [ हिं ]

**लांक**—पुस्त्री एक धान्य, लाख [ स लक्ष ]

**लांक, लांख**—स्त्री १ ( माणसें, पशु किंवा पदार्थ याची दोरी इ० नें ) जुळणी करणें; सागड घालणें ( क्रि० घालणें ) २ ( पदार्थ, माणसें, पशु इ०ची काहीं कामाच्या सोयीसाठीं घातलेली ) सागड, एकत्रितपणा जूट ' तुमच्याजवळ आधेल्या नसल्या तर दोघां दोघा ब्राह्मणास एक एक रुपया देऊन दोघा दोघांची एक एक लाक करून दक्षिणा वाटा ' ३ दोन जनावरें ज्या सईलसर दोरीनें एकत्र बांधतात ती दोरी; लाकणदोर ४ ( सामा ) साथा, बंधन ( क्रि० घालणें ) ५ ( ल ) मेळ, जूट, जोड [ लाग ]

**लाक**—स्त्री ( गो ) खकड्याच्या पोटातील मगज

**लाकड**—न लाकूड पहा.

**लांकड**—स्त्री १ अति उंच वाढलेला ताड, माड २ अति उंच मनुष्य लकड पहा.

**ला(लां)कण-न**—न १ लाक पहा बंधन ' आणि येणेंही न सरे । लाकण लागे दुसरें । '–ज्ञा १४ १५२ मोटेच्या लोंढाच्या लोखंडी कड्या ज्यांनी बांधल्या असतात त्या चामड्याच्या वाद्या ( समुच्चयानें ) ०दोर–पु दोन बैल इ० एकत्र बांधावयाची दोरी ला–लांकणें–लाखणें–कि १ ( दोन पशु किंवा माणसें यांच्या माना एकत्र बांधणें ) २ ( जनावर, माणूस ) खुंटयाला, खांबाला बांधणें ३ एक दोरी दुसऱ्या दोरीमध्यें वळून किंवा गाठ मारून किंवा विरडे, गुळली यांच्या योगानें सांधणें, जुळविणें ४ ( माणसाला, जनावराला ) एखाद्या रक्षकाच्या, पतोजीच्या हवालीं करणें ५ ( सामा ) जोडणें, जुळविणें, सज्ज करणें ६ साखळी घालणें [ लाख, तुल० स लखनी ]

**लाकणें, लाखणें**—अकि ( दागिना, बांगडी इ० वर ) लाख चढविणें, लाखटणें, लाख भरणें, लावण [ लाख ]

**लाकणी**—पु ( कु ) वाघ वगैरेची शिकार करण्याकरितां लाविलेला चाप, सापळा [ लाकण ]

**लाका**—पु ( नदभाषा ) नफा ' तुम्ही या सणंगाला किती लाका घेतला ? '

**लाकीन**—उभ पण, परंतु, लेकीन ' लाकीन भोंसले याज कडोन पत्र आलीं नाहींत '–पया ८४ [ अर लाकिन् ]

**लाकूड, लांकूड**—न १ काष्ठ २ लाकडाचा तुकडा, दांडका ' ते यत्नातर मातले पशुवशा येती अहो ! लाकुडें । ' –मोकृष्ण ६८ ३२ ३ ( ल ) ताठ, दणक, न लवणारें शरीर, गात्र, शिंग इ० कोणताहि पदार्थ ' म्हशीला शेतकऱ्यानें खाऊं घातलें नाहीं म्हणून ती लाकूड झाली ' [ स लगुड, प्रा लक्कुड, हिं. लकडी ] ( लाकूड शब्दाचा समासात पूर्वपदीं लाकड असा उच्चार होतो ) ( वाप्र ) लाकडास माकड लावणें–विजोड अशा वधूवराचें लग्न लावणें, एखाद्या लग्नास हपापलेल्या माणसास कसली तरी बायको मिळवून देणें. ( जिभेचें ) लाकूड होणें–जिभेला कोरड पडणें, जीभ वाळणें ०पडणें–काष्ठपण येणें, लाकडासारखें जड होणें ' सर्वेंद्रिया लाकुड पडे । स्मृति भ्रमामाजीं बुडे । मन होय वेडें । कोंडे प्राण । '–ज्ञा ८ २२७ ०घळणें–होणें–काठी किंवा काष्ठाप्रमाणें निर्जीव–नि सत्व होणें लाकडाचा तट–पु लाकडी कोट भिंत, लढाईत तोफेचे गोळे अगावर येऊ नयेत म्हणून सरक्षणासाठीं असा तट उभारतात लाकडाचा क्षार–पु एक क्षार एखाद्या लाकडाचा काढलेला क्षार कोरड्या क्षारास प्रतिमार्य क्षार व काढ्याप्रमाणें पातळ असणाऱ्या द्रवरूप क्षारास ' तैजस क्षार ' म्हणतात. –योर १ २५९ लाकडाचें नयतेल–न लाकडापासून काढलेलें तेल; ( इं ) नाफ्तेल शुद्ध नाफ्था –सेंपू

१ १५३ लाकडाचे दोर-पुअव लाकडामध्यें असलेल्या बारीक बारीक रेषा. लाकडी-स्त्री (रा) काठी, दंड 'मान एकेकापे एकेक लाकडी दोन आवधों' -भिगी २ लाकडी, लाकडी-वि लाकडासारखाच, लाकडाचें केलेलं [ गु ] ०खेळ-पु लाकडी बाहुल्या इ० मेळणीं लाकडाच्या केलेल्या, भातुकली वगैरे खेळाच्या जिनसा( पूर्वी सामान्याकडून नव्या सुनेस श्रावणपाळीवर देत ) ०घोडी-स्त्री पखवाज ठेवण्याकरितां उपयोगांत आणतात ती लाकडी घडवंची घाडी पहा ०चोंच-पु (कों नाविक) नाळीच्या बाहेर दीड हातावयासाठीं मुख्य दाण्यावरील चोंच पाटलीस अडकवून नाळीच्या मुरड्याम बांधलेलें सरळ लाकूड हा डोलकाठीप्रमाणें उभा न करता पाळ्या ठेवितात हा कलमीपेक्षा लहान असतो याच्या तुळ्यास भोंक पाडून त्यात एक लाकडी खिळी (लहानसा लाकडी तुरा) घालून त्या खिळीस फेरे घेऊन बांधतात ०ठाल-पु ( चांभारी ) बुटांत घाला वयाचा लाकडी ठोकळा, वल्लूत लाकूड फाटे-पुअव १ घर वगैरे बांधण्यासाठीं उपयोगी लाकडें, गवत विग इ० साहित्य. २ संसाराच्या उपयोगी काटक्या, शेणी, गवत इ० जळण, सर्पण ०मारा-पु लाकडाचे ओझें-मारा ( डोक्यावर वाहण्याचा किंवा जनावरावर लादण्याचा ) ०मदारी-पु अतिशय रोडका, कृश मनुष्य मदारी पहा

ला(लां)केरी—स्त्री (कों) एक झाड

लाकोटा—पु चिकण लाखोटा पहा 'लई लई लाकोटा। साह चाला तो खोटा।' -मध्व ३३७

लाख—वि १ संख्यावाचक विशेषण एकावर पाच शून्यें देऊन होणारी संख्या; शभर हजार, लक्ष पहा 'लाख मरोत पण लाखांचा पोशिंदा न मरो' -राजसन्यास ७३ २ (ल) अतिशय उत्तम फार महत्त्वाची, बिनमोल (गोष्ट, युक्ति, माणूस) 'त्यानें काल एक लाख गोष्ट सांगितली' 'मावशी सुद्धा खरोखर लाख माणूस आहे' -निच २८ ३ (ल) पुष्कळ, अनेक 'अरे जा! तुझ्यासारखे लाख पाहिले आहेत' [ स लक्ष प्रा लक्ख, लाख ] म्ह० १ (कों) लाखोंश्री आणि भिकेश्री एकच ( मेल्यावर गरीब व श्रीमंत सारखेच ) २ लाख मरावे पण लाखाचा पालनवाला मरू नये (बाप्र) लाख नसावा पण साख असावी-संपत्ति नसली तरी पत असावी लाखानली गोष्ट-अतिशय महत्त्वाची गोष्ट सामा शब्द- लाखपंचोत्या-वि लाख गोष्टी सांगितल्या असता त्यातील पाच गोष्टी ज्याच्या खऱ्या असतील असा, गप्पा मारणारा, थापाड्या; गप्पीदास लाख-लाखाचा माणूस-पु अत्यंत श्रेष्ठ योग्य लाखात एक या योग्यतेचा मनुष्य लाख रुपयाचा-वि अत्यंत महत्त्वाचा, अमोल, उत्कृष्ट लाख रुपयांची संधि-स्त्री अमूल्य संधि, योग्य वेळ 'इतक्यात ही लाख रुपयाची संधी.. त्यानें वायां जाऊ दिली नाहीं' -लक्ष्मी आणि सरस्वती लाखांचा पालनवाला-वि अनेक माणसांचे, कुटुंबाचें पालनपोषण करणारा, अनेकांच्या उपयोगी पडणारा ( राजे, कोटयाधीश, सरदार, उदार लोक यासबंधीं योजनात) लाखाच्या ठिकाणीं-वि क्रिवि लाख रुपये दिले तरी न मिळणारी ( अडचणीच्या वेळीं दिलेल्या लहान रकमेबद्दल, मदतीबद्दल योजतात ). 'तू मला दहा रुपये आता दिलेस तर ते लाखांच्या ठिकाणीं आहेत' लाखी-वि जीस मोल नाहीं अशी, अमोल ( गोष्ट, वस्तु, मसलत ) 'ही लाखी मसलत रावपुरीस कोणी दिली असेल ती असो' -नि ५१९ लाखों-वि असंख्य, अनेक, लक्षावधी लाखोलाख-वि लक्षावधि, असंख्य [ लाख द्वि ] लाखोपति-वि लक्षाधीश, मोठा श्रीमान लाखोली, लाखौली-स्त्री १-लाख संख्या २ देव ला फुलें, फळें, धान्य मोजून त्याची वाहिलेली लक्ष संख्या (क्रि० वाहणें) -ज्ञा १३ ३८७ 'शतजन्मीं नमनाची मी तुज वाहत असेन लाखोली।' -मोशांति ६ ८ 'कणेरीची लाखौरी वाऊनी।' -शिशु ७३९,-दा १७ ३ ६ ३ (उप) शिव्यांचा वर्षाव, भडिमार करणें, एखाद्यास खूप शिव्या देणें [लाख+आवली] लाखोंशा-क्रिवि लक्षावधि, लाखो, असंख्य [ लक्षशः ] लाख्या-वि १ उत्कृष्ट, उत्तम, लाख रुपये किंमतीचा; बहुमोल ( मनुष्य, पदार्थ, भाषण ) 'तो लाख्या बोलणारा आहे' २ पहिल्या प्रतीचा, श्रेष्ठ, प्रतिष्ठित ( व्यापारी, पढीवाला ) ३ लक्षाधीश, धनाढ्य ( सावकार )

लाख—स्त्री १ रंग वगैरेंच्या उपयोगी पडणारा बोर, पिंपळ इ० वृक्षापासून निघणारा एक कृमिज पदार्थ एकप्रकारच्या किड्यापासून होणारा पदार्थ पत्रावर मोहोर करणें इ० कामीं लाखेचा उपयोग होतो लाखपासून रंग व राळ असे दोन पदार्थ होतात २ एक पक्का रंग [ स लाक्षा, प्रा लक्खा, हिं गु-लाख, फा-लाक तेलगू लाका ] ०कांडी-स्त्री ( सोनारी ) कोणत्याहि जिनसाच्या पोकळ भागात लाख भरण्यासाठीं केलेली लाखेची लांबट सळई, कांडी लाखट-वि लाखलेले, लाख चिकटविलेलें, लाखेनें माखलेलें, पोटीं लाख भरलेले ( सोन्याचे दागिने ) लाखटणी-स्त्री लाखेनें माखणें [ लाखटणें ] लाखटणें-सक्रि लाख भरणें, लाख माखणें, लाखणें -अक्रि दाटणें; बसणें चोंदणें ( घसा-कफ, बेडका साचून ), आवाज बसणें लाखट बेगड-स्त्री सामान्य हलका दागिना ( ज्यात लाख भरलेली आहे असा ) जस्तीपत्र्याचे रंग, मुलामा दिलेले जिन्नस [ लाखट+बेगड ] लाखट-लाखी-दागिना-पु लाख भरविलेला सोन्याचांदीचा दागिना लाखडी-स्त्री (कु) राखडी, डोकींत घालावयाचा

एक अलंकार लाखणें-कि मडकें इ०स लाख किंवा राळ मासणें, लावणें लाखदाणा-पु चीन देशातून आलेली उत्तम जातीची लाख. लाखपाड-पु १ आंगठीवर रत्नाचा खडा बसविण्यासाठीं कोंदणात लाख भरणें २ (अशी लाख भरलेली) आंगठी किंवा इतर दागिना, लाखेचा घाट. 'पु आधी लाखपाड कर मग मीवध्रन करून देईन' लाखलोटणें, लाखलोटें, लाखलोटकें, लाखलोटा-नपु लाखेनें मढविलेलें, लाखटलेलें गाडगें लाखलोटा-पु लाख लावण्याचा धडा (कि० करणें) -वि लाखेनें मढविलेलें, लाखटलेलें (कि० करणें) लाखवण-न मढविण्याचा पदार्थ, लाख, राळा, डिंक इ० [लाख] लाखाजोहर-न (लाक्षागृह) लाक्षाजोहार पहा. लाखीघराची आग 'पाडव लाखाजोहारीं जळतां । विवद्वारें काढिले।' -दा ४.८ ११ -मुआदि १ १४० जोहर पहा [लाख+जोहर] लाखाट, लाखाटणें-लाखाडी-स्त्री लाखड, लाखटणें पहा लाखाडी-स्त्री लाखेची काडी, लाखकाडी पहा [लाख+काडी] लाखाळणें-कि लाखणें पहा लाखाळें-न, १ लाखेचा दागिना २ लाखलोट लाखी-वि १ लाखेसारख्या रंगाचें 'तइप रुचिर लाखी उच हा नेसवीला।' -सारुइ २ लाखट लाखीरंग-पु रंगाचा प्रकार -सेंपु १ ७९ लाखीशाई-स्त्री लाख शिजवून तिच्या रसात काजळ घोटून तयार केलेली काळी शाई ही पाण्यानें धुतली जात नाहीं पूर्वी पोथ्या लिहिण्यासही वापरीत लाखें-न कातड्यावरील तांबडा चट्टा [लाख] लाखोटा-पु १ कागदाच्या पिशवींत घातलेलें पत्र, खलिता, मोहोरबंद पत्र 'जेणें अभयवर दिला त्या गुरु हस्तात म्याहि लाखोटा।' -मोकृष्ण ८३ २३ २ आत पत्र घालून जिचें तोंड (लाख, डिंक इ०नें) बंद केलें आहे अशी पिशवी, पत्र आत घालण्यासाठीं केलेली कागदाची पिशवी, लिफाफा, पाकीट पहा 'तयानें लाखोटा उखलुनी असें जें उकलिलें।' -सारुइ ५ ८३ ३ (कागद, केंस, पानें इ० चा) एकत्र झालेला, चिकटलेला गट्टा; पुजका ४ एकत्र चिकटून झालेली स्थिति गुता, लादा, लगदा उदा० कसाचा-पावडणाचा-चुन्याचा-दगडाचा लाखोटा 'चिकण मातीचा लाखोटा चांगला बसतो' ५ लाखलोटा, भाड्यास लाविलेला लाखेचा लेप 'वरि बरवा आत न जो तो काय करील काम लाखोटा।' -मोउद्योग १२ ११ ०फुगडी-स्त्री एक फुगडीचा प्रकार फुगडी खेळ म लाखोटा। घर माझा आगोटा'-भज ३२ लाखोला-वि लाखेचें बनविलेलें-केलेलें, लाखी (बांगडी, गोट वगैरे)

*लाख, लांख—स्त्री एक हलकें धान्य, एक कडधान्य याचा वेल असुन त्याला शेंगा येतात

लाख—स्त्री (कों) सांगड, जोडी लाक पहा

लांखण, लांखणें—लांकण, लाकणें पहा

लाखण-न, लाखणी—स्त्री १ फासा, बंधन; लाकण २ चाबुकाची दोरी बांधण्यासाठीं दांड्याम भोंक पाडून अडकविलेली चातड्याची कडी

लाखणिक—वि लाक्षणिक [स, लक्ष; प्रा लक्खण, लाख]

लाखणें—उकि (व) लक्ष्य करणें; (एखादी वस्तु) उद्दिष्ट म्हणून योजणें [लक्ष]

लाखन—न (शिंपीकाम) जोडणी, उभारणी, कच्चा दोरा भरण्याचें काम शिलाईचे मुख्य विभाग पाच -साधन, लाखन, यत्रण, दृढीकरण, पूर्तिकरण इ० [लाक, लाकण]

लाखरवा—पु (महानु) लाल फूल? 'तेयां पार्जातकाचें लाखरवा। अतमसास।' -शिशु ३०७

लाखलिंप—स्त्री लिंपणें, गिलावा करणें (खराब झालेल्या भिंती, जमिनी भोकें बुजवून वगैरे दुरुस्त करणें, सारवणें) [लाखणें+लिंपणें द्वि]

लांख(खा)ळणें—अकि चिकटण, मागमागें असणें, सारखं दिसतीला असणें (काहीं फायदा होईल या आशेनें) [लाक-ख]

लाखा—पु मेंढा, शिरड, अद्र, पोफळ इ० वर एक कृमिरूप रोग पडत असतो तो, ताका, टाका, फळाचा, धान्याचा रोग

लाखा—पु (शिंपीकाम) कच्च्या शिवणकामाला घालावा लागणारा दोरा, धावदोरा लाखन पहा 'ताण नाहींसा करून लाखा घालून घेतला पाहिजे' -शाकडे प्रश्नमाला ९ [लाक, लाकण]

लाखा—पु खूण, चिन्ह [स लक्ष] ०कातरणें-(धनगरी) मेंढराच्या कानास खुणेसाठीं ठराविक जागींच लहानपणीं कातरा घेतात तो (प्रत्येक धनगर आपल्या कळपातील मेंढरांना एका ठराविक जागींच कातरा घेतो, म्हणजे तीं ओळखण्यास सोपें जातें) 'बोकराच्या कानास लाखा कातर'

लाखावणें—राखावणें पहा

लाखी पुनीव—स्त्री (व) रक्षाबंधनाचा दिवस, राखीपुनव

लाखोणी, लाखोंडी—स्त्री (कु) राखोंडी, राखुडी

लाख्या—पु गुरांचें नरडें सुजून त्यास होणारा एक रोग लाखा पहा

लाग—पु १ संधि, वेळ, समय, शक्यता 'पाऊस पडण्याचा लाग दिसतो' 'आंबे पिकायचे लागास आले म्हणजे काढावे' झाडी जव्हा तोडली त हा किल्ल्याजवळ जायास लाग झाला' २ मनातील संधान, उमेदीची दिशा, प्रयत्न, नेम, खटाटोप, खटपट (कि० करणें) 'चाकरीसाठीं बहुत लाग केले परंतु एकही चालला नाहीं' 'तुझा अश्व धरूनिया याग। हसध्वज करी

सांग । परी सोडवावयाचा धुरा लाग । येथें कांहीं न चाले ।' –जै १६.३१. 'राजदूत पावले लागा ।'–मुआदि २५.६.३ ध्येय; विषय; हेतु; उद्देश; मनुष्य ज्याचा पाठलाग करतो ती वस्तु. (क्रि० धरणें; बांधणें). उदा० 'लाग साधला'=हेतु साधला; कार्य यशस्वी झालें. 'याच्या उलट लाग पडला,' 'एक लाग आला आहे.' =कांहीं तरी मिळण्याचा संभव आहे किंवा प्रयत्नास जागा आहे. 'तो लागावर चालला.' 'हा लाग योजून जातो' इ० ४ एखाद्यावर ओढवलेलें संकट; दुर्दैवाचा प्रसंग; हल्ला, घाला. 'आजपावेतों दोन तीन लाग निभावले, आतां हा लाग कठीण.' 'जीवावरचा लाग.' ५ हल्ला; झपाटा; तडाखा. 'सांडी सांडी भीमकीचा संग । अवध बाधिजसी निलाग । आला कोपिष्टांचा लाग । पडेल पांग दुजयाचा ।' –एरुस्व ८.२३. ६ पीक, बहार, झाड, शेत इ० पासून फळें, धान्य इ० रूप प्राप्ति. 'इसाल झाडास लाग कमी असतो.' ७ फळें आणि बहर देण्याची वेळ; योग्य काल; हंगाम; फलादि रूप उत्पन्न करण्याची वृक्षादींची स्थिति. 'नारळ, माड लावल्यापासुन दहाव्या वर्षी लागास येतो.' ८ धक्का; जहाज किनाऱ्यास येऊन लागतें ती जागा; जहाज होडी इ० चा तळ जेथें जमिनीस लागतो ती जागा. ९ चोळीला कांखेत हातीखालीं घालावयाचा जोड, तुकडा. १० धक्क, बैची; तिढा; टेकण; आश्रय; आधार; जागा; पाया; घर (जड वस्तु वर ठेवण्याकरितां). 'ह्या खाबाला ह्या घोडा लाग म्हणून पुरे.' ११ पदार्थाचा मादक गुण; तंबाखु इ० पदार्थांचा अंमली गुण. सुपारी खाल्ली असता ती कांहींना लागते तेव्हांचा मदास. १२ जनावराला एखाद्या ठिकाणीं होणारा रोग. 'तोंडलाग, पायलाग.' १३ मारा; स्पर्श; पोंच, पल्ला (बंदूक, तोफ इ०चा). 'बंदुकीचा–तोफेचा–तिराचा–गोळीचा–कमानीचा–लाग.' १४ शिकार; लूट; प्राप्ति; लग्गा. 'आम्ही तिघेजण संकेताप्रमाणें लाग लागेल तर पहावा म्हणून शहरात जाण्यास निघालों.' –विवि ८.११.२०३. १५ पत्ता; शोध; तपास; पाठलाग 'लाग प्रसेनतनुचा लावी हरि-चाहि मग महाभाग ।' –मोकृष्ण ८३.१११. –ऐपो १५९. १६ विशिष्ट गात्र, इंद्रिय इ०ची विकृति १७ स्थिति, अवस्था. 'निद्रिता-मागें बैसला वायु । अथवा पुढें आला स्वर्ग भोगु । त्यासि नाहीं रागविरागु । तैसा लागु झाल्याचा ।' –एभा ७.१२४. १८ संबंध. 'या प्रपंचाचा कठिण लागु । नाशासि मूळ स्त्रीसंगु ।' –एभा ८. ६९. १९ आवड, प्रीति. 'तैसा जाहला प्रसंगु । जें ज्ञानी आम्हांसि लागु । आणि तुजही अनुरागु । आथि येथ ।' –ज्ञा १३.६४४. २० अधिकार. 'एथ इंद्रियांचा पांगु । जया फिटला आहे चांगु । तयासीचि आथि लागु । परिसावया ।' –ज्ञा ५.६६. २१ (कों.) गवताच्या उत्पन्नाकरितां राखून ठेविलेली डोंगराळ जमीन. 'लागाची कुपण घरण्याची वेळ झाली.' २२ सामर्थ्य, मगदूर. २३ सोय. 'कदावरूनि पाहिला लाग ।' –दावि २१८. २४ रीघ; वाट. २५ युक्ति. 'हा बाहेर निघोन येइल असा लागेच ना लाग तो ।' –२५७. २६ मिलाफ. 'तुम्हा उभएता लाग लागों हे ना । सेवितां मी ।' –ऋ ८१. २७ (व.) पशुपक्ष्यादिकांचें मैथुन; कावळा, सर्प इ०ची सुरतक्रीडा. 'कावळ्यांचा लाग पाहिला.' २८ (जरकाम) तारेची दिशा बरोबर लावणारा, हूळ. २९ (लोहार-काम) मोठा अवजड हातोडा. रेवीट (रिव्हेट) फुलविताना एका बाजूनें ठोकतात व दुसऱ्या बाजूस याचा जोर लावतात. ३० (चांभारी) जपुन्या सागळीस लागलेला तुकडा. ३१ (संगीत) एका स्वरावर थांबून मग दुसऱ्या स्वरावर उडी घेणें. (–स्त्री.) उडी; उड्डाण (क्रि० मारणें). –क्रिवि. एकामागून एक; लागो-पाठ (लागलगट, लागट या अर्थी). [सं. लग्–लग्न; प्रा. लग्ग] (वाप्र.) ०करणें–हल्ला चढविणें. 'सर्वेचि पिपिलिका परिती लाग । वेढोनि माजला कीर्तनरंग ।' –दावि २६९. ०चालविणें–ठर-लेल्या क्रमानें किंवा सरणीनें चालू करणें. (कांहीं काम योजना, बेत). ०दवडणें–संधि घालविणें; लाभ दवडणें. ०दवडणें–एखाद्या गोष्टीच्या सिद्धीसाठीं आपल्या योजना चालू करणें, मार्गे लावणें. ०लावणें–१ (प्राप्तीसाठीं) संधान बांधणें; कांहीं वशिला खर्च करणें; हरएक प्रकारें उपाय, युक्ति योजून काम जुळेलसें करणें. २ माग काढणें; पाठलाग करणें. 'मागोनि लाग लावित नृपबळ येउनि ।' –मोमादि १५.६३. (एखादें काम) लागाला येणें–लागीं लागणें–लागावर येणें–मिळणें, जुळणें–एखादें काम सुरळीतपणें सुरू होणें किंवा चालू लागणें, सिद्धीच्या मार्गावर असणें. पंथाला लागणें. 'माझी पंचायत लागीं लागली.' लागास येणें–रंगारूपास, फलद्रूप होण्याच्या बेतांत येणें. सामाशब्द– ०पाठ–पु स्त्री. १ लगबग, त्वरा; घाई 'करा करा लागपाठ । धरा पंढरीची वाट ।' –तुगा २५६४. २ लागलेंच अनुसरण; पाठलाग, पाठपुरावा. (क्रि० पुरवणें; पुरणें, लागणें). ०पाळती–स्त्री. पाठीस लागण्याची क्रिया. 'जिमथें अर्थी माझियें पृष्टीं । लागपाळती केली त्वां ।' –नव १३.१३८ ०वग–पु संबंध. 'पाईक तो जाणे या इक्षीचा भाव । लागवग ठाव चोरवाट ।' –तुगा ३७५. ०बंदी–वि. जीस लाग लावले आहेत अशी, बागल्या प्रकारची (चोळी). 'नका सोडू तरी गाठ चोळी फाडाल लागबंदीची ।' –होला ५७. ०भाग–पु १ संबंध, लागाबांधा 'निष्ठुरा उत्तरीं न धरावा राग । आहे लागभाग ठायींचाचि ।' –तुगा १२१७ २ पाठलाग. ०माग–पु लागभाग, उपाय. 'पराक्रमाचा लाग-माग । क्षात्रकर्म कि कपटांग ।' –ज्ञानप्रदीप २४१. ०लाव्या–वि. युक्त्या, बेत वगैरे योजून काम साधणारा; संधान बांधण्यात कुशल. ०वण–स्त्री. पाठलाग. 'असाध्य साधुति अंजन । करी

लागवण खियांनी । '-एभा १० ५७७ ०वेग-क्रिवि घाई, त्वरा, लगवग ०वेग-स्त्री अतिशय त्वरा, घाई, गडबड 'आता लागवेग करा । ज्याचे धरा टाके ते । '-तुगा १९२९ -पु १ प्रतीक्षा, वाट 'पालटाचा लागवेग। म्ती म्हणोनि पहावा।' -दा ९ ६ ४२ २ संबंध, लागाबाधा नरदेहाचेनि लागवेगें । एक लागे भक्तिमगें । '-दा १ १० ? ०वेग-गीं-गें-क्रिवि त्वरित, ताबडतोब, लगबगीनें 'शत्रु निर्दाळी लागवेगीं। यश त्रिजगती न समाये।' -भारा १२ ३२ 'महत्कृत्य साहुनि मार्गे। दवास ये लागवेगें।'-दा २ ७ ३४ लागाची चोळी-स्त्री नक्षु तुकड्याची चोळी याच्या उलट असड चोळी लागावेगा-पु लागवेग, लागाबाधा 'न कळे कन्हणा ल गावेगा।'-उपा १२४

लागचा-वि ( गो ) लगतचा, जवळचा

लांग—स्त्री ( गु ) एक कडधान्य लाक-स पहा

लांग—स्त्री ( व ) शेताच्या धुऱ्याकर काढलेला माल 'वनचराई माफ करण्यात यावी व लाकूडफाटा व लागी वगैरे साठीं दगड मोफत मिळावे '-क १४५३७ पृ ५

लांग—स्त्री समुद्राचा किनारा, समुद्राचें पाणी जथपर्यंत पोंचतें तो भाग 'ग्लवत फुटून आतील नारळ लागेस लागले '

लागट—पुस्त्री ( सामा ) लगट पहा -वि १ लोचट, झिडकारिलें असताहि जो लगट करतो असा, निर्लज्ज, लत्तरोडगा. २ आसक्त, चिकटलेला, लागून असलेला ( निंदार्थी ) 'माया मला लागट हे न सोडी।'-सारह १ २२ ३ प्रेमी, लोभी, लडिवाळपणें विलगणारें 'मन लागट चोरटें। भीतरी वावरें।' -शिशु ७०८. ४ कीड लागून थोडें खराब झालेलें ( धान्य, फळ, लाकूड ) ५ जें खाल्लें असता घसा, जीभ इ० खवखवतात असा ( अळू सुरण इ० ) ६ जी खाल्ली असता छातींत बाध वसतो अशी लागणारी (सुपारी) ७ एखाद्याच्या मनाला लागेल असें, बोचक ( बोलणें, लिहिणें ) 'लागट लिहिणारानें लिहिलें तरी अनुनुक्सानीचे बाबतींत इग्रजी हद्दींतील वारटाची बजावणी आपणावर होऊ शकत नाहीं ' -विक्षिप्त २.१२० ८ उत्सुक 'या बोला श्री अनंतें। लागटा देखिलें तयातें।'-ज्ञा ९ २३१ ९ ( ना ) स्पर्शजन्य, सासर्गिक ( रोग ) -सन १८५७ पृ. ४१५ लागटा-पु १ सातत्य, अखडपणा २ माला, राग, ओळ ( क्रि० लावणें, लागणें, करणें, होणें ) [ लागणें ]

लागड—स्त्री ( व ) मोठा खटारा बडी 'लागडींत कापूस भर व वया विकावयास न '

लागण—स्त्री १ ( ऊस वगैरेस दिलेलें ) पहिलें पाणी २ जींत पेरणी केली जाते अशी वहीत जमीन लागवडीखालची जमीन 'लागणजमीन लागणशेत, लागणवावर ' ४ लागवड जमीनीची वहिवाट ५ पिशाच्चबाधा ६ बाधा, रोगप्रस्तता, देवी, ममारा, कॉलरा, प्लेग इ० नीं पछाडलेली माणसें, जनावरें इ०; किंवा अशाची सख्या -न ( कों ) एकदां पीक घेऊन पुन्हां पीक घेण्यासाठीं पहिल्या जागेवरून उपटून दुसरीकडे लावतात तें झाड, फादी, रोप 'मला मिरचीचीं २५ लागणें ठेव ' [ लागणें ] ०दार-वि १ मिरासदार, मिराणदार, जमीनीचा मालक २ जमीन प्रथम लागवडीस आणणारा ३ जमीन करणारा, ( मालक, खडकरी ), प्रत्यक्ष जमीनींत राबणारा ४ (ल) उपकारबद्ध, ऋणको, मिधा, जो एखाद्याचें काहीं देणें लागतो असा. 'मी कोणाचा लागणदार नाहीं '

लागणें—अक्रि (ह्या क्रियापदाचा सगम, सयुक्त किंवा सबद्ध होणें, जुळणें, चिकटणें, जडणें असा मूळचा एकच अर्थ आहे परंतु अनेक नामार्थी आणि शब्दार्थी उपयोग केल्यामुळें यास अनेक भिन्न अर्थाच्या छटा आल्या आहेत त्यापैकीं सर्वसामान्य व काहीं विशेष खालीं दिल्या आहेत ) १ स्पर्श करणें, शिवणें. 'तू त्याला लागू नको विटाळ होईल ' 'परि सावध व्हा लागो शुचि व्हाया हृदयलोह या परिसा।'-मोभीष्म ६ ११ २ लावणें, आत घालणें, घुपसणें ( रोप, झाड इ० ), लागवड, पेरणी करणें ( जमीनीची ) 'वाफा, अळें, सरी लागली ' ३ मूळ धरणें, रुजणें, चालणें जीव धरणें, एक जीव होणें ( लावलेलीं रोपें, कलमें ) ४ मार बसणें, आघात होणें ( शस्त्र इ०चा ) ५ ( ल ) मनाला बोचणें, परिणामकारक होणें, अतःकरणाला भिडणें ( रागें भरणें, शब्दाचा मार ) -दा १० ८ २७ ६ बद होणें, मिटणें, गच्च बसणें ( दरवाजा, खिडक्या, झाकण, पापण्या, डोळे ) ७ योग्य प्रकारें जुळणें, जोडलें जाणें ( शब्दश व ल ) ( तुकडे, विभाग, कविता, शब्द ) ८ बरोबर होणें, लागीं बसणें, नीट सामावणें ९ प्रचारात असणें, रूढ असणें ( तऱ्हा, पद्धति, रीत) १० चिकटणें, जडणें, आवळणीं पडणें ( दुर्गुण खोड रोग ) ११ येणें, उत्पन्न होणें, आसक्ति होणें ( भूक, तहान खोकला, कफ इ० ) १२ निपजणें व चालू होणें, प्रारभ होऊन सुरू असणें ( स्थल आणि काल यातील पदार्थ आणि प्रसग, विशिष्ट परिमाण किंवा प्रकार ). 'एप्रिल मावळ सपलें आणि देश लागला '' या अध्यायापासून ग्रथ कठीण लागला तेव्हापासून ह्याचा त्याचा कलह लागला '' हें काय सोपें लागलें आहे ? १३ बरेंवाईट कळणें, विशिष्ट प्रकाराचें किंवा जातीचें म्हणून समजणें, वाटणें 'आबे खाऊन पहा, गोड लागले तर घ्या '' त्याला बरी गोष्ट जरी सांगितली तरी वाईट लागते ' १४ प्राप्त होणें, मिळणें ( नोकरी चाकरी, नेमणूक ) 'इतकी खटपट करून अखेर त्याला नोकरी लागली ' १५ नातें किंवा सबध असणें, नात्याच्या सबधानें असणें 'तुझा तो काय मेहुणा लागतो ' १६ आढळणें, भेटणें, रस्त्यात मार्गांत येणें, पुढें येणें 'वाटेनें चार नद्या लागतात, 'तुम्ही वाचीत जा आणि पुढें धृतश्लोक

लागेल तेथें ठेवा.' १७ फळ धरणें; मव्हर येणें; वृक्ष फलोत्पादनाच्या स्थितीस येणें. 'ह्या प्रांताचे माड लागूं लागले म्हणजे असे लागतात कीं एका एका माडास हजार हजार नारळ लागतात.' १८ करपणें; बिघडणें; बुडाशीं जळणें. 'भात बुडाशीं लागला.' १९ कामांतून जाणें; खराब, घाण होणें; डागळणें; कुजण्यास, सडण्यास आरंभ होणें; बुरशीनें व्याप्त होणें. 'लांकूड लागलें' २० चिकटणें; चिकटून राहाणें. 'उदंड उपाधी तरी थोडी, लागोंच नेदी.' –दा ९.१०.५. २१ बसणें जडणें; विलगणें (मन). 'चित्त तें लागलें तुझें पायीं।' –दावि ५६. २२ चावणें; दंश करणें; शोषणें (साप, विंचू, चिकट पदार्थ). २३ इजा, आघात होणें. 'त्याला विंचू लागला' 'मला ठेंच लागली–दगड लागला.' २४ पडणें; धाड येणें (मेकाड, मोवा इ॰ची), व्यापणें, ग्रासणें (मेकाड इ॰नीं झाड). २५ परिणाम करणें, अनिष्ट व उपद्रव होईल असें करणें; (मादक पदार्थ, वाईट हवा, पाणी, उपवास, शिव्याशाप इ॰नीं). २६ जनावर, माणूस इ॰ची पाठ, पाय इ॰ गात्रांस (खोगीर, जोडा, लगाम इ॰च्या घर्षणानें) इजा होणें; घसटणें, खरचटणें, चोळवटणें; सोलवटणें. 'जोडा लागला.' २७ नेहेमींच्या एखाद्या आजारानें पछाडलें जाणें (जनावर). २८ पूर्णपणें व योग्य रीतीनें मिसळलें जाणें (साखर, तिखट, मीठ वगैरे अशांत एखादा पदार्थ). २९ घालविण्याची जरूरी पडणें, खर्चिला जाणें; व्यय होणें (पैसा, पदार्थ, वेळ). 'याच्या लग्नास पाचशें रुपये लागले.' ३० पाहिजे असणें; गरज असणें, सुस्थितीस पूर्णतेस जरूर असणें, (सामा. एखादी गोष्ट) (गरज, नड, उपयोगाचा प्रसंग) उत्पन्न होणें. 'क्षत्रियासि लागल्या अनुपत्ती। पूर्वोक्त करावी वणिग्वृत्ति।' –एभा १७४६२ ३१ योग्य स्वरात बसणें, स्वरानुकूल असणें (गळा, आवाज, वाद्य, सूर). ३२ पेटणें; दीप्तियुक्त होणें (दिवा, विस्तव), चेतणें (आग). ३३ प्रत्यक्ष आरंभ होणें, मुख्य विधि, संस्कार याला सुरवात व्हावयाची वेळ येणें (लग्न, मुंज इ॰ विधीची) ३४ (बोलताना) अडखळणें (माणूस, जीभ, शब्द). ३५ चालू होणें, क्रिया सुरू होणें; गति मिळणें, (एंजिन, यंत्र इ॰) ३६ चालणें; समर्थ, कार्यक्षम असणें (आपल्या विशिष्ट कार्यात); उपयोगास येणें. 'जंग चढला आहे म्हणून चाकू लागत नाहीं' ३७ तीक्ष्ण होणें, धारेनें युक्त होणें. 'दोन चाकू लागले आहेत, बाकीचे लागावयाचे आहेत.' ३८ निश्चित किंवा ठरलेलें असणें; न सुटण्यासारखें जोडलेलें किंवा पाठीमागें लागलेलें असणें. 'उपजल्या प्राण्यास मरण हें लागलेंच आहे.' 'संसाराचें कृत्य हें रोज लागलेंच आहे' ३९ सुरू होणें, सतत चालू असणें; एकसारखा असणें; एकसारखा राहणें, पडणें (पाऊस, थंडी, उष्णता). 'कालपासून पाऊस सारखा लागला आहे.' ४० मग्न, गुतलेला असणें ४१ मनात योजिलेला किंवा स्वाभाविक परिणाम होणें; यश येणें; उपयोग होणें. ४२ जुगणें, मैथुन घालणें, करणें (पशु. पक्षी यांमध्यें नरानें मादीशीं) (निंदार्थी माणसालाहि लावतात). ४३ योग्य स्थितीला येणें, फलदायी होणें (गाय, म्हैस इ॰ दूध देऊं लागणें, झाड फळाला येणें). ४४ संबद्ध, मालकीचा असणें; कार्यक्षेत्रांतील, कक्षेंतील, अधिकारांतील असणें. ४५ विवक्षित स्थितींत असणें; विवक्षित गुण, जात, धर्म असणें; विशिष्ट परिस्थिती असणें. 'मी कां श्रीमंत लागलों आहें? सवीस शाल जोड्या द्या म्हणतां तो.' 'हा काय मुसलमान लागला!' ४६ लावणें, अंगीं लागू करणें (गुन्ह्याचें कृत्य); करावयासाठीं, पार पाडण्यासाठीं एखाद्या व्यक्तीवर लादलेलें असणें; सोपविलेलें असणें (कर्तव्य, काम इ॰). 'हें काम मजकडे लागलें.' ४७ सक्तीचें, आवश्यक, जरूर असणें; करणें–भोगणें भाग पडणें 'ह्याचें ह्यातून न झालें तर तुम्हास जावें लागेल.' 'हा पळून गेला तर रुपये तुम्हाला द्यावयास लागतील.' ४८ अडकणें; गुंतणें. 'कोठें तुझा जाउनि हेतु लागे।' –सारह २.९४. ४९ झपाटणें; पछाडणें; अंगात येणें, बाधा होणें. 'चितूला चिंचेवरची हडळ लागली.' ५० (शौच, मूत्रविसर्जन इ॰) क्रियेची इच्छा होणें. 'शौचास–मुतावयास लागली. ५१ (क्रियापद ऊं, आवयास इ॰प्रत्यय लागून त्याचे पुढें 'लागणें' हें क्रियापदातील आलें असतां) क्रिया सुरू करणें; आरंभणें; घडणें; लागू होणें. 'तो तें करूं किंवा करावयास लागला'; 'तो मारूं लागला–देऊं घेऊं खाऊं–बोलूं बसावयास करावयास लागला.' ५२ क्रियापदांतील 'वें' ह्या प्रत्ययापुढें 'लागणें' क्रियापद आलें तर आवश्यक होणें, अनिवार्य होणें असे अर्थ होतात 'त्याला जावें लागलें.' ५३ बरोबर, बाजूला असणें; मदत करणें. 'हा ओझें मला उचलूं लाग'; 'हें काम मला करूं लाग' ५४ नांगर टाकण्याच्या स्थितीत येणें; कडेला येणें; स्थिरावणें, गति खुंटणें (जहाज, होडी). ५५ (ल.) अगतिक होणें; हालचाल बंद पडणें. [सं. लग् लग्न; प्रा. लग्ग; हिं. गु. लागना] म्ह॰ लागें बोट बाढे पोट=कुकर्में निमित्त होऊन एखादें वाईट काम होऊन जाणें. **(एखाद्यास–ला) लागला जाणें**– १ ऋणी होणें, असणें, मिंधा असणें. 'त्वां मला दोन पैसे दिलेस म्हणून मी का तुला लागला गेलों?' 'मी काय तुझें चार चवल लागतों?' २ जास्त परिचयाचा, आसक्त असणें **लागून असणें**– १ (स्नेह, लोभ, इ॰ मुळें) अगदीं चिकटला असणें; तंत्रानें किंवा मर्जीप्रमाणें वागणें. २ एखाद्या स्त्रीनें एखाद्याशीं व्यभिचारसक्त असणें. ३ मग्न गुंतलेलें असणें. **लागून जाणें**–नवरा सोडून दुसऱ्यापाशीं राहणें (एखाद्या स्त्रीनें) **कानास–कानीं–लागणें**– गुप्त गोष्टी बोलणें, कुजबुजणें 'किती लागती परस्पर कानीं। मधुर भाषणीं।' –रत्न १०. **पाणी लागणें**–१ एखाद्या ठिकाणच्या

हवेचा, चालीरीतींचा मनावर, वागणुकीवर परिणाम होणें ' विदेशी लागलें पाणी । '–दा ३ ६ २५ २ एखाद्या ठिकाणची हवा बाधणें ३ ( पुसणें ) एखाद्याकडे येणें असलेली रक्कम बुडणें, नाहीसें होणें **पायीं लागणें**–नम्र होणें, नमस्कार, वदन करणें ' समर्थपायीं राजराजेंद्र लागती । '–सप्र ३ ६६ **लागत**–न ( गु ) भाडें, खर्च ' अगाऊ लागत भरून पावती मिळविली पाहिजे '–(बडोदें) खानगी खातें लागतीचें नियम ४ **लागत-खेचों**–क्रिवि लागताच **लागतगुण**–पु संगतीचा परिणाम–गुण, संबंध जडल्यानें येणारा गुण ' कोणाचा कोणास लागतगुण असतोच ' **लागता गुण**–पु (वायकी) माणूस, संपत्ति, उत्कर्ष, वस्तु जोडण्याचा गुण, संपादन करण्याचा, मिळविण्याचा गुण **लागता जुगता**–वि. मार्गावर आणलेला, योग्य क्रमात, रांगेंत लावलेला, पायावर उभा केलेला [ लागणें+जुगणें ] **लागता वळगता**–वि. (गु) संबंधी, संबद्ध ' जबाबदार इसमानें आपले ताब्यातील व लागते वळगते नोकर लोकास वरचेवर माहिती देत जावी '–(बडोदें) आगी पासून बचाव ४ **लागतें**–न संबंध ' न सुझाविता मतें । न फिट आक्षेपाचें लागतें । '–ज्ञा१३ ३२७ **लागन**–क्रि. ( खा ) मनाला वाटणें **लागरा** वि १ मादक, अंमली, खाली असता लागणारी ( सुपारी, औषध, इ० ) २ खराब झालेला, किडीनें खालेला, किडका ( धान्य, फळ, लाकूड इ० ). **लागीर**–स्त्री न १ पिशाच, भूत २ पिशाच–भूत–समंध बाधा, पछाडणी ( क्रि० लागणें, काढणें, निघणें ) –वि १ किडकें, सडकें २ किडण्यासारखें किडण्याजोगें ( लाकूड, धान्य ) ३ नास–नुकसान–दुखापत पोंचेल असा ४ लागलेला. ५ बाधा झालेला, पछाडलेला ६ चिकटलेला, चिकट ७ मादक, माजरा, अमली ८ वाईट परिणाम करणारा, अहितकारी ९ दुसऱ्याचें प्रेम, लोभ, दया, जडवून–लावून घेणारा, लाडिक **लागीर होणें**–बाधा होणें, लागणें ( भूत, पिशाच्च )

**लागलागवड, लागलागण, लागलावण, लाग लगवड, लागलगावड**—स्त्री १ शेतीची मेहनत, मशागत, कृषिकर्म, शेतकाम, नागरणी, पेरणी, कुळवणी इ० २ वृक्ष संवर्धन, फळझाडें वगैरे लावणें ३ ( विशेषत शेवटचे तीन शब्द ) डागडुजी, दुरुस्ती ( घर इ० ची ) [ लागवड द्वि ]

**लागलाच, लागलीच, लागलेंच**—क्रिवि तावडतोब तत्क्षणीं, तेव्हाच, तात्काळ. ' जेवण आणि लागलाच गेला ' ' मागताच लागलेंच दिल्हे म्हणजे वरें वाटत ' [ लागणें ]

**लागलिगाड**—न अडचळा, लचाड

**लागवड**—स्त्री १ शेतकी संबधींचीं सर्व कामें ( नागरणें, पेरणें, वेणणें इ० समुच्चयानें ) २ शेतीचा खर्च, जमीन लाग वडींत आणणें, गोठे–सोपे इ०ची डागडुजी करणें, गाव वसविणें इ० कामासंबंधाचा खर्च ' हें घर नीट करा लागवड आम्ही देऊं ' ३ शेतें, वागा इ० मध्यें धान्यें, झाडें इ० लावणें. ४ ज्यांत धान्यें, झाडें इ० लाविलीं आहेत अशीं शेतें, बागा इ०. ' दहा बिघे लागवड होती तिचा धारा दिल्हा ' ५ (खुलासा) लागण ( प्लेग वगैरेची ) ६ ( सामा ) पेरणी ' जमीनीची लागवड केली तरच पीक येतें ' [ लागणें+वड प्रत्यय ] **लागवडीस आणणें-येणें**–१ ( जमीन ) लागवडीच्या योग्यतेस करणें, पीक यावयाच्या योग्यतेस येणें ( पानमळा, बाग, पोफळ, माड इ० ) २ फळाला, उत्कर्षाला येणें किंवा आणणें ( बाग, मळा, झाडें इ० )

**लागवडी**—वि लागणारें ' चित्र्याचें लागवडी सामान बरोबर जपून ठेवणें '–चिमा २८ ' शिलकी सामानात लागवडी सामानाचा समावेश होत नाहीं '–खाअ ९१

**लागवण**—न १ दुसरा वृक्ष व्हावा म्हणून कोणेक वृक्षाची लाविली जाणारी फांदी; वाढण्यासाठीं किंवा फुटण्यासाठीं लावणें, रोपण २ शेतीसाठीं राखलेला जमीनीचा तुकडा पेरण्यासाठीं, लावण्यासाठीं राखलेला जमीनीचा भाग –स्त्री १ लावणी पहा २ गावच्या हिशेबाचा एक प्रकार, कोणाकडून किती सारा यावयाचा असतो याबद्दलची नोंद [ लागणें ]

**लागवरी**—वि गर्भधारणा झालेली ' हरिता चपळा नारी । लागवरी न रिघती । '–तुगा १४६

**लागशी**—क्रिवि ( कों ) जवळ

**लागसर-सार**—क्रिवि जवळ, जवळीक ' म्हणोनी इये सभे । बोलेंपण चेनि क्षोभें । लागसरू न लभे । बोला प्रभु । '–ज्ञा १३ ३२१

**लागा**—क्रिवि तात्काळ ' लागा पावैल तीपुरारी । '–उषा ७२ १४

**लागाबांधा**—पु संबंध, ऋणानुबंध, नातेंगोतें, लगाबाधा पहा. ' त्याचे हातून याचें एकही काम होत नसता उगीच हा त्याला हजारों रुपये देतो त्यासमात याचा त्याचा कांहीं लागा-बाधा आहे ' [ लागणें+बांधणें, स लग्नबंधन ]

**लांगालुगा**—वि १ क्षुद्र, हलका, कमी, अपूर्ण, अर्धवट भरलेलें ( धान्याचें कणीस ) २ ( ल ) दुर्बळ, अशक्त, अयोग्य, नालायक ३ अर्धवट, वेडसर [ लुगा द्वि ]

**लागावळ**—स्त्री राग, ओळ ( साठलेल्या बदुकीच्या दारूची, धान्याची इ० ) **लागावळ-वळी**–स्त्री १ संबंध, नातेंगोतें ' संचित साडवल कांहीं होतें तें जवळीं । वित्त गोत पुत माया तुम्ही हे लागावळी । '–तुगा ३५० २ शिवाशीव, विटाळ [ लागणें+ओळ ]

लागी—स्त्री, लाग, लागीर, भूतबाधा 'सवंचित म्हणताहे लागि कोठें पडा गे ।' -मारह ७ ८६ -दावि १६.

**लागीं**—शअ १ करितां, साठीं, प्रत 'तुजलागी, रोप पीकेल अवघु । मुनिजनालागि ।' -भाए ३६ २ जवळ, स्थत ,३ ला, स 'किती शिणवूं तुजलागीं । मनांत प्रीतिपरी हरीपाईं ।' ४ कडे 'पातालागीं जाइ वर्गी ।' ५ प्रीत्यर्थ, कारणाकरितां 'निजजनया विरहालागीं यावें प्रभावें' 'प्राणलागीं पातला रघुवीर '

**लागी**—वि १ ओढलेलें, अवलंबून असलेलें, संबद्ध. २ योग्य, लायक 'हा घोटरओबा तुमचे लागी आहे, तुम्ही घ्या ' |**लागीभागीं, लागाभागास**-वि शअ क्रिवि १ जवळ, शेजारीं, समीप, आसपास ( क्रि० यणें, लागणें असणें ) 'पीक लागीभागी आली ' २ सदृश, जुळणारें 'त्याचें बोलणें आपल्या लागीभागी आहे ' ३ आलोकपात्र, भाव करण्यास, किंमती जवळपासचा 'हा सौदा लागीभागी आहे ' **लागभाग**-पु १ चिन्ह, सान्निध्याचें दृश्य 'आज पाऊस पडेल असा लागभाग दिसतो ' २ युक्ति, विचारीपणा, शहाणपणा 'याच पुढें अण्याचा लागभाग दिसत नाहीं ' [ लाग+भाग, किंवा लाग द्वि ]

**लांगी, लाह्याणी**—पु ( स्थापत्य ) नळ, नहर ( इं ) अॅकिडक्ट.

**लागुनी, लागून**—क्रिवि लागीं, पहा

**लागू**—वि १ सामील, संबद्ध 'तुम्ही एकमेकांना लागू आहात ' २ प्राप्त, आगत, स्पष्ट ३ यशस्वी, परिणामकारक, गुणकारक ( वस्तु, प्रयत्न, उपाय, साधन, सिद्धिवर ) ४ योग्य, रीतसर याच्या उलट गैरलागू ( क्रि० करणें, होणें, असणें ) [लागणें] **०करणें**-लावणें, चालू करणें. 'पंजाबला लष्करी कायदा लागू केला ' **०पडणें**-परिणामकारी, गुणकारी होणें ( औषध ) **०गोष्ट**-स्त्री ( कायदा ) मुद्याच्या गोष्टीशीं कारण, परिणाम, उद्देश तयारी, स्थळ, काळ, वगैरेमुळें संबद्ध असलेली गोष्ट ( इं० ) रेलेव्हन्ट फॅक्ट **०भागू**-वि ( वों ) जुळलेल, साधलेलें ( नातें, विवाह, धंदा, मैत्री यांमुळें ), संबंधी

**लांगूल-ळ**—न १ शेपूट, पुच्छ 'लांगूल उभारून धावि भग वृषभ ।' वळें लांगुळें रूधिल्या सर्व वाटा ।' -राक १ २३ २ ( नृत्य ) अंगठा, तर्जनी व मधलें बोट ह्यांचीं अग्रें वाकवून एकमेकांस लावणें करंगळी उभी ठेवणें व अनामिका थोडी वाकडी करून ठेवणें [स लांगूल] **०चालन**-न ( शेपटी हालविणें-कुत्र्याप्रमाणें ) १ लांडीगोडी २ कांहीं स्वार्थ साधण्यासाठीं, समर्थाची खुशामत, लाळघोटेपणा, हांजी हांजी ( क्रि० करणें )

**लागो**—वि ( गो ) खुशामत्या [ लागू ]

**लागो(गों)नी**—शअ लागीं लागून पहा 'सादवन नाहीं मजलागोनी '-रत्न २ ७४ 'जैसी ओरगे धेनु । हुंबरत य वत्सालागोनि ।' -ऋ ७७

**लागोपाठ**—क्रिवि एकामागून एक अशा क्रमानें, मध्यें खंड न पडतां किंवा न पडूं देतां, लागलाच, सारखेच 'त्या बाईला लागोपाठ चार मुली झाल्या '-शअ मागून, पाठोपाठ, मागोमाग [ लागणें+पाठ ]

**लागोभागो दिवाळी**—(लाभ देवो, नुकसान देवो, दिवाळी झालीच पाहिजे ) कोठल्याहि परिणामाकडे न पाहतां उद्योग चालविणें याअर्थी. उच्च ध्येय ठरवून काम करावें, फळ न आलें तरी रडूं नये, अशा भावनेनें काम करणें 'हे लग्न करावयाला लाग लागोभागो दिवाळी पहाटेच आहे ' कांहींजण याचा अर्थ-परिणामाविषयीं बेफिकीर राहून आपल्या कार्यक्रमांत ( विशेषत. चैनींत ) खंड पडूं द्यावयाचा नाहीं, असा करतात [लागणें, भागणें आणि दिवाळी ]

**ला(लां)गोर**—स्त्री मृतपिशाच्च वगैरेपासून बाधा किंवा त्रास, पछाडणी ( क्रि० होणें ) लागीर पहा [लागणें] **ला(लां)गोरणें**-क्रि भुताटकीमुळें त्रास, पीडा होणें, पछाडलें जाणें

**लगोरें**—न ( कु ) बाळंत बाळीची स्त्री [ लागीर]

**लाग्या**—पु स्त्रीचा जार किंवा यार -वि १ लागण्या पहा २ युक्त्या किंवा हिकमती करण्यांत पटाईत, संधानें बांधण्यांत चतुर, पटाईत [ लागणें ]

**लाघव**—न १ ( वजनाचा ) हल्केपणा 'आइकें देह होय सोनियाचें । परि लाघव ये वायूचें ।' -ज्ञा ६ २६८ २ लहानपणा (आकाराचा), संक्षेप 'लेखात लाघव यावें म्हणून कितीएक सकतानें सुणा लिहिल्या आहत '-ममाको (प्रस्तावना) ३ क्षुद्रता, लघुता, नीचता 'प्रसाद मग काय ती जरि निवारिना लाघवा ।' -केका ३६ ४ हलुवार पणा, नाजुकपणा, सुरेखपणा, कुशलता ( कारागिरीची ) ५ मऊपणा, गुळगुळीतपणा ६ आर्जव, पुढें पुढें करणें, लाडीगोडी, खुशामत ७ माया 'लाघव कळलें ब्रह्म यासी याचें । परब्रह्मसाचें अवतरलें ।'-तुगा २७ ८ चमत्कार, लीला 'चित्रीचा हंस निर्जीव। परि तो काय करिता झाला लाघव ।' -ज्ञानि १५२ -ज्ञा १४५ -मोकर्ण ३० ७१ ९ कपट, लबाडी, फसवेगिरी देवासी लाघव । कामा नये रे ।' -दावि ४७९ १० चापल्य, कौशल्य, चातुर्य 'आमुच्या बाणाचें लाघव । आजि फावले यादव । धावा पावा रंग सर्व । झाले गौरव आम्हासी ।' -एरुस्व ८ ५० 'वा नटलेनि लाघवें । नट जैसा न झकवे । तैसें गुणजात देखावें । न होतिया ।' -ज्ञा १४ २९० ११ मोद, कौतुक 'तो कल्पादि जन्मा मागवे । कल्पांतीं मरणें नाम्ये । आजि स्वर्गसंसाराचेनि लाघवें । झकवेना ।' -ज्ञा ८ २५८. ( समासांत )

हस्तलाघव=हातचलाखी शब्दलाघव=भाषण तील चातुर्य शब्दाचा अर्थ लावण्यातील युक्ती शब्दार्थाची फिरवाफिरव

**लाघवट**—स्त्री लघटपणा, फजीत सत्ती (काहीं अस दायक, अपमानकारक कृत्यात)

**लाघवी**—पु नट नाटकी, जादूगार मान्त्रिक 'जैसीं लाघवियें वेदीं चाळविलीं।'-ऋ २९ 'का लाघवियाचें विचित्र। विनोदलें।'-ज्ञा १८ ७९७ -वि १ लडिवाळपणा करणारा, मन आकृष्ट घणारा, आर्जवी, प्रेमळ २ नम्र सौम्य ३ हाजी हाजी करणारा लघट ४ चतुर, कुशल 'कीं जाण हाते स्वाधनासी। त्यानें लाघवी हृषीकेशी। तीर्थमिषें समस्त सी। पिंडारकासी स्वयें धाडी।'-एभा १ ३१८, -तुगा ११५ ५ धूर्त ठकबाज कपटी 'न गुरु तो ठक दाभिक लाघवी।-वामन, भरतभाव ३७ [लाघव]

**लाघ(घा)ळ लाघ(घा)ळकी लाघ(घा)ळमावशी भवानी-बाई**—लघाळ इ० पहा

**लाघावळ**—स्त्री लागावळ १ ओळ रांग मालिका (घरें, झाडें, टेंकड्या इ०ची) (क्रि० लावणें लागणें) २ मार्ग माग अनुसरण्याची दिशा (क्रि० लागणें जाणें येणें) ३ पुष्कळ वेळ चाललेल्या रिकाम्या गप्पा, लांबण [लागणें+ओळ]

**लाच लांच**—पुस्त्री १ आपलें काम करून घेण्यासाठीं किंवा आपल्या कामांत विघ्न आणूं नये म्हणून एखाद्याला गुप्त पणें दिलेलें द्रव्य इ० भाड (क्रि० देणें, भरणें) 'परी परमात्मया चक्रवर्ती। उगाणिती जव हातीं। तव लाचु न घेता धृती। घरिजती जिया।'-ज्ञा १८ ७४३ 'तुका म्हणे जैसी लांचासाठीं गाही। देती परि नाहीं ठावी वस्तु।'-तुगा २ कुमार्ग [प्रा ल्चा का ल्च गु लचा] म्ह० लाचलुचपत दक्षणा आणि घेई जे तत्क्षणा ०कर-वि लाचखाऊ 'ऐसिया पैजा महेशा। पचुरणें दाही दिशा। लाचकरु म्हणोनि वोळसा। कामु करी'-ज्ञा १३ २५ ०खाऊ-खोर-वि भाडखाऊ काम करून देण्याबद्दल अयोग्य रीतीनें पैसे खाणारा ०रुश्वत-लाच हे लाचरुश्वत खाणारे नाहींत'-विविध १ १४१ [लाच+अर रिश्वत] ०लुचपत-लूच-स्त्री लाच इ०(व्यापकार्थी) अप्रामाणिकपणानें दिलें घेत लेलें द्रव्य अयोग्य गैरवाजवी बक्षीस

**लाचकोडगा**—वि निर्लज्ज, निलाजरा, लाजकोडगा पहा

**लाचावणें**—अक्रि १ सवकणें, एखादे गोष्टीपासून एकवार लाभ झाल्यामुळें तीच गोष्ट पुनःपुनः करण्याविषयीं सवकणें, लाहावणें लालचावणें चटक लागणें (विशेषत वाईट अर्थी) 'मग सवादु तोंही पारुखे। तरी भोगिता भोगप थोकें। हें का साहावेल सुखें। लाचावलेया।'-ना १८८२ -एभा १ २९२ -तुगा ६ २ पैसे खाण्याची वाईट सवय लागणें

**लाचाव(वि)णें**—सक्रि १ लाच देणें २ आमिष दाखवून वश करणें, फितविणें 'ना तरि मेघमडळें। काई चातक लांचाविलें।'-भए ११ -मोकृष्ण ७८ १८ ३ मोहविणें, लुब्ध करणें 'प्रकटुनी गुण गोड। रसिकास लावा।'-मोरा [लांच]

**लाचुगा**-वि लाचखाऊ लाच खाणारा 'लाचुगी बुद्धी सदा उदासी। तैसी नाहीं तुम्हा साधूसी।'-एभा २ ६४

**लाचार**—वि (वों) निरुपायी, अगतिक, दीन, शरणागत 'परतु एक चिरजीव शत्रूच हातीं सापडल्यामुळें निरुपाय जाणोन लाचार होऊन चाकरी करितों'-ख ६ २९२२ [फा लाचार्]

**लाचारगी**-स्त्री निरुपाय, लाचारी 'परतु हुजुरात साप्रत खर्चाची तरतूदीक बहुत आहे यास्तव लाचारगी आहे'-रा १० २७३ **लाचारी**-स्त्री लाचारपणा, दीन-हीन दशा, निरुपाय, दैन्य -रा १२ ७९ 'हल्ली लाचारीमुळें वाटखर्च व सवारी व पोशाक वगैरे सरजाम बजे काम करून त्यार केले'-पदमव१०१

**लाचारी तोडी**—स्त्री (सगीत) एक राग यांत षड्ज, कोमल ऋषभ, कोमल गाधार, कोमल मध्यम, पचम कोमल धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाती सपूर्ण-सपूर्ण वादी धैवत सवादी गाधार, गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर

**लाछन लांछन**—न १ खूण, चिन्ह, डाग (विशेषत चद्रावरील) 'मृगलांछन' 'जो पुरुष चक्रवर्ती होणार त्याच हातावर कमलाचें लांछन असतें' २ कलंक, बट्टा, दुर्लौकिक बदनामी 'आता दोहीं पक्षीं लागलें लांछन। देव भक्त पण लाजविलें।'-तुगा १५६१ ३ नाव, अभिधान [स]

**लांछित** वि १ चिन्हित, खूण असलेला २ कलंकित, ज्याला डाग आहे असा 'लांछित चद्रमा' निंद्य [स]

**लाज**—स्त्री १ लज्जा, मर्यादा, विनय २ भिडस्तपणा, भीड, सकोच ३ प्रतिष्ठा, मोठेपणा (क्रि० ठेवणें, राखणें; सभाळणें) 'इच्छा पुरवील महाराजा। त्यासी लाज नामाची।'-भूपाळी गणपतिची ४ लांछन; अपमान, अवहेलना जसें-नवावर लाज आणणें-लावणें ५ शरम अपमान बेअब्रू याची मनाला टोंचणी (अतिरेक दाखविण्यासाठीं अनेकवचनी प्रयोग करतात) दुसऱ्याच्या पुरुषाशीं बेशरमपणानं बोलायला लाजा कशा नाहींत वाटत याना?'-फाटक, नाटयछटा ५ [स लज्जा] म्ह० लाज नाहीं मना कोणी काहीं म्हणा (वाप्र) ०काढणें-निर्लज्ज म्हणणें ०झाकणें राखणें-अब्रू सभाळणें,प्रतिष्ठा ठेवणें आमची राखावी ती लाज। परपरा हेंचि काज।'-एकनाथ ०लावणें-लाजविणें 'त्याला विजय लाज लावि खरी।'-मोकर्ण १७१ ०वाटून पिणें-अगदीं नि सग बनणें ०होणें-लज्जा वाटणें, सकोच वाटणें, अपमानाचा प्रसग येणें 'पतकरावास

तर मोठी लाज झाली ' -विवि ८ १ ८ सामाशब्द- ०काज- स्त्री ( सामा ) लाज, शरम, नम्रपणा ( क्रि० धरणें, बाळगणें, सोडण, सुटणें, जाणें, उडणें ) ०कोंबडा-पु फार लाजाळू सकोची, भिडस्त ' आमचा मुलगा पत्नीला लाजकोंबडा नाहीं ' ०मर्यादा-स्त्री मर्यादा, विनय, नम्रपणा, [ लाज+मर्यादा ] ०लज्जा-स्त्री लाजमर्यादा, लज्जा, लाज पहा [ लाज+लज्जा ] ०लावणा ण्या-लाव्या-वि लाज आणणारा, अब्रू घालविणारा ' हा वेगा वशात लाजलावणा निघाला । ' -थाळ २ १६१ ०वट-वि लाजरा, लज्जाशील, भिडस्त, नम्र ' यायकाची जा लाजवट असते ' लाजट-वि लाजरा जरा भिडस्त लाजणें- अक्रि १ शरम वाटणें शरमिंदे होणें २ संकोच वाटणें, भिडस्त पणानें दबकणें ३ विनयी, मर्यादशील असणें ४ ( लाजाळू नावाच्या वनस्पतीनें ) अगसकोच करणें [ लाज लज्ज ] लाजरा- वि लाजाळू लाजवट स्वभावाचा, विनयशील लाजरी-वि स्त्री १ लाजाळू ( स्त्री ) २ स्पर्श केला असता जिचीं पानें मिटलीं जातात अशी ( वनस्पति ) लाजव(वि)णें-उक्रि १ लाज आणणें, लाज लावणें, शरमिंधा करणें कोणेकाचें वैगुण्य बाहेर काढून तो लाजेल असें करणें ' बाल तुम्हास बोलावयास विसरलों खरा, आता तें काढून मला लाजवू नका ' २ (गुणात) मागें टाकणें ' तो असा दाता निघाला कीं ज्यानें कर्ण लाजविला ' लाजाळू-ळूं-स्त्रीन थोडया स्पर्शानें पानें मिट णारी वनस्पति, लाजरी ' लाजाळू गाडीत ठेवलें तर गाडी चालू लागताच त्याची पानें मिटतात ' -मराठी ६ पु (१८७५) पृ २२४ लाजाळू वि लाजरा [ स लज्जालु ] लाजिंद्रा- वि १ लज्जित ओशाळा मिंधा या शब्दाप्रमाण विशेषत उप योग २ लाजाळू [ लाज ] लाजेंकाजें-क्रिवि लाजलज्जेनें

लाजन—वि मर्यादशील लाजरी

ला-जबाब—निरुत्तर म्हणून यासी यथामतीनें बोलून ला-जबाब केलें ' -रा १२ २२ [ फा ला-जबाब् ]

लाजम लाजीम—वि योग्य ' हे मशाखन्-कितावतीचा सिलसिला जारी असावा हे लाजम आहे ' -ख ७ ३५६४ [ अर लाझिम् ]

लाजमा—पु वर हक्क [ अर लाझिमा ]

लाजवर्त—न नीलमणी ' लाजवर्ते पोवळीं । ' -मेस्तक ४१ [ फा लाज्वर्द ]

लाजहिर्णे—क्रि लाजणें -हवो

लाजा—पु अव लाह्या [ स ] ०होम-पु १ विवाह विधींत वधूवरांनीं अग्नींत लाह्यांची आहुति देणें २ अशा प्रकारें आहुति देऊन केलेला होम.

लाजा—पु भानगड लांझा पहा ' या उपरी खुनाचा लांझा सरकारचा तुम्हाकडे नाहीं ' -समारो ३ ८१

लाजारणें गोंजारणें—उक्रि प्रेमानें हात हात तोंडावरून फिरविणें [ गोंजारणें द्वि ]

लाजिम—लाजिमा पहा ०वार-वि शरमयुक्त, भयभीत झालेला, दाबला गेलेला, स्वत वर दुसऱ्याचा लाजीम (हक्क) अस लेला ओशाळा पहा ०दारी-स्त्री मिंधेपणा ओशाळगत पहा

लाजिमा-म्मा—पु १ धंदा, व्यवहार ( विशेषत अनि श्चित, धोकापूर्ण ) (क्रि० तोडणें, तुटणें, उलगडणें, राहणें) २ मालकी हक्क, वहिवाट, संबंध ' या वतनास हक्क लाजिमा इनामत व हलीं पूर्वील सनदाप्रमाणें देत जावें ' -शाछ ५५ ' शेतात तुझा लाजिमा नाहीं तू आपला ऐस ' ३ जबाबदारी -इम ४६. [ अर लाझिम ]

लाजिरवाणा-णी—वि १शरमिंधा, ओशाळा ( दुष्कर्माची प्रसिद्धि होणें इ०कारणामुळे ) ' त्याची मर्माची गोष्ट निघताच तो लाजिरवाणा दिसू लागला ' २ अपमानकारक, काळिमा लावणारी ( गोष्ट, कृत्य ) ' ज्याचें सप्तपिढयात कोणी याचना केली नाहीं त्याला याचना करणें लाजिरवाणी गोष्ट आहे ' लाजिरवाणी-णें-क्रिवि लाजिरवाणेंपणानें, लज्जास्पद रीतीनें ( बोलणें, जाणें इ०कांचें विशेषण ), ' मग बोलिली अंबिका । आम्हासि मूळ ना पत्रिका । तरी लाजिरवाणें त्र्यंबका । कैसें पुसावें ' -रुथा ३ ८ १४

लाजी—स्त्री ( गो ) एक मासा

लाजीम—पु ( क ) हक्क मालकी -वि आवश्यक, कर्तव्यपर, योग्य [ अर लाझिम ]

लाझा (ला)लाझ्या—पु १ अनिर्णित असमाप्त धंदा, व्यवहार देवघेव ( विशेषत नाशदायक भानगडीचा ) ( क्रि० तोडणें, तुटणें, न राहणें ) २ लढाई, लफडें, खरकटें -वाडथोमारो १ १५९ ३ बाधा, गुंता ' तुम्ही या कर्मांत नव्हता अशी साक्ष पुरवा म्हणजे तुम्हाकडे काहीं लांझा राहिला नाहीं ' ' आता लाझा आमुचे पदरीं । राहिला नाहीं सर्वथा । ' -भवि ५४ ११६ ४ आरोप, संबंध तर तुजकडे खुनाचा लाझ्या नाहीं ' -वाडशाछ १८ लांझी—लाझा पहा.

लाट—स्त्री १ पाण्याचा तरंग लहरी ' लाटा आपटता उठे ध्वनि शिरे तो ज्याचिया कर्दरीं । ' २ बगाडाचें वरचें आडवें लाकूड याला आकडा लावलेला असतो ३ चुना, पोहे इ० कुट ण्याचें, काढण्याचें साधन ४ तेलाची घाणी, उसाचा चरक इ० यत्रात जें उभें वाटोळें लाकूड फिरत असतें तें, रूळ ' लाट फिर विता आली उरावरी । ' -रामदासी २ १०६ ५ उसाच्या चरकाचें तुळवट जें बैल किंवा माणूस वर्तुळाकार फिरवितो, तें ६ देवाच्या मूर्तीपुढें जें सोवळ्याची मर्यादा राहावी, दाटी होऊं नये इ० कारणासाठीं आडवें लाकूड असतें तें -एभा २८ ३६१ (पाठभेद)

७ पराच्या माथ्यावात कढयासाठीं असते ती तुल्ई ८ जमीन सपाट करावयासाठीं दगड, लोखड इ० चा दडगोल फिरवितात तो ९ लाकडाचा मोठा ठोकळा १० ( हिं ) स्तभ, खांब विशेषत उत्तरहिंदुस्थानांत अशोकादि प्राचीन राजाचे लेख ज्यावर लिहिले असतात असे दगडी, लोखडी खाब प्रत्येकी ११ ( जरतारधदा ) कलाबतूच्या साच्यात ३०-४० तराक लावलेलें लाकडी साधन ' १२ रहाट व चाक याना जोडणारें आडवें लांकूड -मसाप २ ३ ७६ १३ ( गों ) देवळाच्या पटागणात एका खांबावर एक आडवी वहाळ ठसवितात ती हिच्या टोंकावर माणसें बसून फिरतात ही खांबावरूनहि मिरवीत नेतात [ स यष्टि, प्रा लट्ठी, हिं लाठी ] ०उठणें-१ वाद, चळवळ, दम इ० निघणें, प्रचार असणें २ ( नाविक ) दर्यात उळवळ चालणें

**लाट**—पु १ भारा, गठ्ठा, गट्ट २ विक्रीच्या वस्तूचे विशिष्ट गट करून ते सवलतीनें विकतात ती पद्धत, तसा गट ३ सोडत, लॉटरी ४ चगळ, चैन ' सुदर बायको आणि पैसा मिळाला आता लाट आहे बुवा ! ' ( इ ) लॉट -उद्गा वाहवा, भले, शाबास, जयजयकार

**लाट**—पु वडा मनुष्य, मोठा अधिकारी ( इ ) लॉर्ड याचा अपभ्रंश ' साधी गोष्ट सुद्धा लाट साहेबाच्या हातून घडत नाही ' -क १२ ७ ३० [ इ लॉर्ड ]

**लाट-ठ**—स्त्री ( गों कु ) खोल विहिरीचें पाणी वर काढण्याचें एक साधन ओकती पहा

**लाटण**—न पोळी, पापड इ० लाटताना ती पोळपाट लाटण्याला चिकटू नये म्हणून खालवर त्यास लावतात त पीठ [ स. लुट्-लू लुठन ] **लाटणी**-स्त्री वाटोळें फिरणें, फिरविणें, लाटणें **लाटणी-णें**-क्रीन लाटण्याचें उपयोगी गोल लाकूड, लाटण्याचें साधन **लाटणें**-कि १ वाटोळें गरगर फिरवणें, (लाटणें इ०नें ) ( विवक्षित आकार येण्यासाठीं ) ' वाटाया प्राज्य पुरण पापड पोळ्या प्रभृत लाटाया । '-मोगदा २ १६ २ ( रहाटगाडगें इ० यत्र-पाणी वर यावयासाठीं ) फिरविणें, चालविणें ३ लोंकरीस खळ देऊन त्याची गुडाळी करून ती गुरणुस इ० व्हावयासाठीं जमिनीवर ठेवून हातानें मागेंपुढें फिरविणें ४ ( ल ) दपटणें, दामटणें ' पुढें लाटोनि रहवर । पार्थासमोर घातले । '-मुआदि ४४ ८८ ५ चेपणें, रगडणें ' धनुष्यबळें हृदय लाटी । '-वेमीस्व ४ १०१ ६ ( कुलाबा ) विद्या पाडणें -वदलापूर ६६ ७ (कुस्ती) आपल्या एका हातानें जोडीदाराच्या माडीखालून हात घालून दुसऱ्या मांडीस धरून आपल्या दुसऱ्या हातानें जोडीदाराच्या गळ्याखालून हात घालून त्याच्या बाहुट्यास धरून आपल्या छातीनें जोडीदारास लाटल्यासारखें ढकलून पाडणें **लाटीव**-वि लाटलेली ( पोळी, गुरणुस इ० ) **लाटण्या**-वि धष्टपुष्ट व दांडगा; आडदांड आणि बेफिकीर, उसळणारा **लाटण्यासारखी**-वि लाटण्याप्रमाणें मोठ्या आकाराची आणि सुरेख ( बाजरी व त्यानें येत असल ) याच्या उलट बुरजी

**लाटणें**—उक्रि बळकावणें, उपटणें [ लाट ]

**लाटफळें**—न ( कु ) पोळपाट

**लॉटरी**—स्त्री १ सोडत, नशिबानें मिळणारें बक्षीस व त्याची योजना २ नशीबाची परीक्षा [ इं ]

**लाटा-डा-ढा**—पु १ वांझ म्हैस-गाय २ वांझ स्त्री, निपुत्रिक स्त्री ' घरात दोन लाडे पोसावे लागतात ' ' लाट्याचा उपयोग तरी काय व्हावयाचा ! ' -वि बाळोटी

**लाटा-टी-लाठा**—पु्स्त्री १ पापड इ०काच्या पिठाची लाटावयाच्या सोयीची जी वडी करतात ती २ लाटणें-णी. ३ लगड, पत्रा. ' लाटा खुरा ही मायाच आकारही सुवर्णाचें ' -यथादी १२ ५१३ [ लाटणें ] ०फिरणें-फिरविणें-(वरजावर, हिशेबात, कामावर ) कमें तरी दडपून नेणें, घालमेल करणें, गडबडगुंडा करून, ल्याडीनें रेटणें **लाटध्या**-पु १ मुसळ, लाट, वरवटा २ लाटण्याच्या आकाराचा गोळा ( पीठ, माती इ०चा ), लांबट गोळा

**लाटा**—पु ( राजा ) १ ( भातेणाचा, नाचणीच्या काडाचा वगैरे ) भारा २ नाचणीचें भुस ३ ( कुलाबा ) भात झोडून घेतल्यावर खालीं राहिलेलें तण गुडाळून करतात ती लोळी. ४ ( सामा ) ढीग, भारा ' दसऱ्याचे सुवर्णाचे लाट । लोक म्हणती परी ते काटे । ' -दा १४ १० ६ [ लाट ]

**लाटा-ट्या**—वि १ दडप्या, बेफिकीर २ धाडसी, धडाडीचा लाठा पहा ' तो पराक्रमी लाटा । राज्य करी अलोटा । ' -कथा १ २ ६३. ३ लाटणारा, दिसेल तें बळकावणारा [ लाटणें ] ०गंगाजी-गामाजी-कारभारी-पाटील-वि आडदांड, बेमुर्वत्या, लुटारू, लुबाडणारा ( माणूस )

**लाटानुप्रास**—पु ( साहित्य ) एक शब्दालकार त्यांत अर्थाच्या पण निराळ्या ध्वनीच्या शब्दांची आवृत्ति यांत होते. उदा० ' जो कल्याणगुणी गुणीच अगुणी मूर्त मनी ज्या वणी । ज्याच्या रूपगुणीं सदा गुणगुणी शभू निघे निर्गुणी । '

**लाटापिटी**—स्त्री ( ना )रणगर्जना, झोंबाझोंबी, मारामारी. [ लाटणें+पिटणें ]

**लाटालाट**—स्त्री १ दपटादपट, दडपादडपी २ ल्याडीन पशात घालणें, लाटणें [ लाटणें द्वि ] **लाटालाटीनें दपटणें**-कि न जुमानता बेधडक पुढें नेणें, दामटणें, दपटशा करणें

**लाटी**—स्त्री लाकडाची तुकडी, खाब लाट पहा

लाटू—पु (महानु) पुरुषार्थ 'लाटू दोघा समाना –गस्तो ४६

लाटोरी—स्त्री दोन घड्यांची पोळी [लाटणें+पुरी]

लाठ-ठा लाड-ठा—वि १ आडदांड व मजबूत, दांडगा, सशक्त व अगडबंब २ माजलेला 'आधींच तारुण्यें अति लाठा। वरि धनमदें भरला ताठा।' –एभा २३ २७७ ३ मोठा शूर, समर्थ, बलवान 'राजा म्हणे कटकग। ०वर्थ आलासी माझिया पोटा। नव्हसि वीरवृत्ति लाठा। अति करंटा नपुंसक।' –एरुस्व ६ ४२ –एभा २० २७० ४ प्रचंड, अति मोठा 'हा लाटा जुमाद म्हणोनि धनमाने अधिक लेखकरी।' –पच ४ ४ ५ तेजस्वी 'लाठा आईकीजे अग्नी।' –उदा ९५ ६६. ५ अपरंपार, रेलचेलीचा (पाऊस, पीक, बहर इ०) [लठ्ठ] लाठाई—स्त्री १ दांडगाई व आडदांडपणा २ जुलूम, जबरदस्ती

लाठिव—पु लठ्ठपणा 'आगवणेचिया लाठिवा। न पाहे क्षेनिया सर्वा।' –गीता १ ४०१

लाठी—स्त्री सोटा, काठी, दडुका रामपुरची लाठी प्रसिद्ध आहे हिला वर्षभर मोहरीचें तेल पाजून कमाविली असते तलवारीचा घावहि हिला यांधू शकत नाहीं –सव्या ६५ [स यष्टि, प्रा लट्ठि हिं लाठी] ०चालविणें—काठीनें मारामारी करणें, लाठी मारणें 'पोलिसांनीं लोकांवर लाठी चालविली' –के २१ ६ ३० ०राज्य—न लोकांना लाठीनें मारून सरकारनें राज्य चालविणें, दंडुकेशाहीनें राज्य करणें ०घाला लाठियाळ—वि लाठी वापरणारा, (ल) लाठी खेळण्यात पटाईत 'प्रक्षुब्ध लोकमत हा एक जहाल लाठियाल' –कले १ ३०२ ०वाले भरेकरी—पुअव क्षेत्रोपाध्यायाचे दलाल हे यात्रेकरूपासून अव्वाचे सव्वा पैसे काढतात –गागा २८२

लाठु लाठेपणा—पु १ धैर्य 'तव म्हणे दानव सौरसाठु। उदव देवा न सडी लाठु।' –भाए २१६ –ज्ञा २ ९ २ महत्त्व माझा १६ ५१ ३ दांडगेपणा ४ सामर्थ्य एवढ्या लाठेपणाचा उपावो। आतु नाहींचि म्हणे देवो।' –ज्ञा १६ ५१

लाठ्ठा—पु (व) दरवाजा

लाड—पुअव लालन मुलांवाळांवर केलेलें प्रेम त्याचें कोड कौतुक, प्रेमानें केलेलें लालनपालन, प्रेमाची भाषा, कृति [स लड्; प्रा लड्डिय हिं लाड] म्ह० लाडानें वेड गुळानें बोचड (वाप्र) ०चालविण-पुरविणें—हौस पुरविणें मागविणें, मागितलेली वस्तु देणें ०देणें—लाड करणें 'का लाड देशी हो। कान्हयातें बाई।' –आपद ८८ साम शब्द– ०झगडा-डें—पुन मित्रत्वाचें भांडण, प्रमकलह ०पुरघा-व्या—वि लाडपुरविणारा, हौस भागविणारा लाडक, लाडका—वि १ प्रेमाचा, प्रिय, आवडता २ एखाद्याच्या विशेष प्रेमातील ३ लाडिक, प्रेमळ, लडिवाळपणाचा (मुलाची भाषा, बोलण्याची पद्धत व त्याची वागण्याची रीत याबद्दल केलेला उपयोग) ४ प्रेमाचे, विलासी, गोडीगुलाबीचे, स्वार्थी, मनावेधक (शब्द, रीत) 'आत्ता या, पैका मिळाला म्हणजे दळ अशा लाडक्या गोष्टी कशाला सांगता?' ५ अविनयी, धीट, दांडगी (लाडामुळें) ६ सौम्य, मन मळविणारें, अधिकार दाखवून केलेलें नव्हे असें, राजीखुषीचें जसें–लाडका धंदा-व्यवहार-काम-गोष्ट इ० म्ह० १ लाडक पोर देवळीं हगे, गाढ पुसायला महादेव मागे २ लाडकी सई, दाढ्यान घेतली डोई 'लाडकणें—१ लाड करणें, कोड पुरविणें २ काळजी घेणें, लालनपालन करणें लाडवाविणें, लाडावणें—१ लाड करून बिघडविणें २ लाड करणें मी लेकरू त्वा मज लाडवावें।' –अकक २ –वेप २२ लाडणें—अक्रि लाडावलो असणें लाड, कौतुक होणें लाडला लाडिला लाडेला—वि लाडका, प्रिय; प्रेमी लाडसपणा—पु लडिवाळपणा 'असो हें भवमोचना। देवरायाचें लाडसपणा।' –ऋ १७ लाडाचा ताम्या—पु विवाहानंतर मुलीच्या बापानें जावयास दिलेलें पात्र (विशेषत मिठाईनें भरलेलें) वरदक्षिणा लाडिकपणा—पु लडिवाळपणा लाडीगुडी-गोडी—स्त्री एखाद्यावडून आपलें काम करून घेण्याकरिता त्याच्याशीं गोड बोलणें; लाडिकपणा करणें, काहीं लालूच दाखवून अनुकूल करून घेणें (क्रि० दाखविणें) 'लाडीगुडी चालव लाडकीशी।' –केक ७ लाडुकपण-पणा—नपु लाडीगोडी, लाडकपणा लाडूबाई—वि लाडावलेली, लाडात वाढलेली (स्त्री, मुलगी) 'देवाचकी होती लाडूबाई आपल्या घरीं म्हणज आमच्या घरीं ह पदरे पाय लागले नसते' –सदानंद पुणिगी लाडोवा लाडेवाडें किवि लडिवाळपणें, लाडीगोडीनें 'निज प्रीतीनें होऊनि वडें। त्यासीं सळ लाडेंकोडें।' लाडेजणें—क्रि लडिवाळपणा करणें 'तैसें संत माहेर माझें। तुम्ही मिनलिया मी लाडेजे।' ज्ञा १५ ५९७

लाड—स्त्री (प्र) राड पहा

लाड—पु १ एक जात व तींतील व्यक्ति हे लोक विड्याचीं पानें, सुपारी इ० विकण्याचा धंदा करतात २ एक राष्ट्र व जात –चौऱ्याशीचा लेख लाट पहा [स लाट, प्रा लाड] ०सोनार—पु सोनारांतील एक जात

लाड—वि (इ) लॉर्ड लाट पहा ०गवरनर—वि (व) मोठा अधिकारी, तिरमारखा 'भले तू हुकूम सागत? तू काय लाड गवरनर आहे कुठचा?' [लॉर्ड+गव्हर्नर]

लाडकें—न (गो) हु याची संभोगक्रिया

लाडगा—पु १ (वाई) एक वनस्पति –मसाप ३ ३ आवृत्ती २ एका वनस्पतीचें बी ३ एक फळ ४ (व) तुरीच्या

शेंगातील दाण्याची उसळ 'आज मी लाडगा रूप झाला' –वशाप ५१८ २४५

**लांडगा**—प. (व) लग्नात एका विवक्षित प्रसंगी नवर देवाजवळ जेवायला बसणारे मुलगे प्रत्येकी

**लांडगा**—पु एक हिंस्र पशु वृक **लांडगी**–स्त्री १ लाड ग्याची मादी २ कोळ्याची पात **लांडगेतोड**–स्त्री शत्रूवर एकदम आवेशानें तुटून पडून त्याची कत्तल करणें, एकसारखी, सरसहा कापाकापी, अचानक छापा 'चोहोंकडून तोंडें लागून लाडगेतोड झाली'–भाव १२१ लाडगावें पहा **लांडगावें**–न १ लाडग्याची धाड, त्यांनी केलेली नासाडी २ (ल) लूट, नागवणूक

**लाडन**—स्त्री न १ गूळ करावयाच्या कढईस उडीद राजगिरा इ०च्या पिठाचें लुकण लावितात तें २ गळेसारखा एक प्रका रचा पाने-फाद्या यापासून काढलेला चीक [अर फा लादन्]

**लांडरूं**—न १ (निंदार्थी) लाडोर, मोराची मादी २ (बायकी) एक शिवी

**लाडा**—वि वाझोटी, वाझ, लाटा पहा

**लांडा**—वि १ ज्याचें शेंपूट कापलें आहे किंवा नाहींसें झालें आहे असा (पशु पक्षी, सर्प, मत्स्य इ०) कापलेलें, तुटलेलें, आखूड (शेंपूट) २ थोटा, अग्रहीन, आखूड (हात, लेखणी, चाकू, इ०) ३ डोकें, टोंक, वरचा किंवा शेवटचा भाग नसलेली (वस्तु सामान्यत) ४ अपुरा, कमी प्रमाणाचा (लावी, रुंदी इ०त), भरपूर मापाचा नव्हे असा 'हा धोतर जोडा तुम्हास लाडा होतो आणखी चार बोटें रुंद असता तर ठीक दिसता' ५ (निंदार्थी-सुन्ता केली असने म्हणून) मुसलमान –कोरकि १९० [लंड] ०**कारभार**–पु अधिकार नसता विनाकारण मध्यस्थी आणि ढवळाढवळ करणें, नसती लुडबुड, उठाठेव (निंदार्थी उपयोग) 'आम्ही आपमात भाऊ एकमेकांच्या उरावर बसू पण शेजारचे कोणी शेकोजी आमच्या घरात येऊन लाडे कारभार करावयास लागले की तें आम्हाला खपावयाचें नाहीं'–नि ०**कारभारी**–वि लाडा कारभार करणारा, लुडबुड्या ०**बुचा**–वि योग्य सत्कार नसलेल्या ओका, भुडा (हात, गळा इ०) 'लाडाबुच्चा हात दादला करी भात' ०**भाई**–पु (निंदार्थी) मुसलमान लाडा अर्थ ५ पहा ०**भुंडा-भोंडा**–वि शेंपूट किंवा अग्र तुटलेला नसलेला लांडा पहा ०**भांडा कारभार-री**–लांडाकारभार-री पहा ०**लटका**–वि खोटा आणि लबाड, उणा, खोटा, कपटी, विश्वास ठेवण्यास अपात्र (वस्तु, व्यवहार, गोष्ट इ०) (प्र) लटकालाडा

**लांडिस**—न १पत्त्याचा एक डाव २ आगगाडीच्या रस्त्याची पाहणी करण्यासाठी वापरण्यात येणारें वाहन [इ लॉरी]

**लाडी करणें**—कि विस्तवावरून चालत जाणें [राइ]

**लांडीलबाडी, लांडीलटकी**—स्त्री चहाडी, चुगली इ० लहानमोठी लबाडी, फसवणूक, कपट, लबाडीचा व्यवहार 'परंतु दोघानीं मिळून लाडीलबाडी केली'–पद्म १२६ [लाडा+लबाड]

**लाडू**—पु एक पक्वान्न, धान्याचें पीठ भाजून त्यात तूप, साखर वगैरे पदार्थ घालून स्वादिष्ट बनविलेला गोळा याचे अनेक प्रकार आहेत २ लाडवाच्या आकाराच्या गोळ्या ३ (उप) मुष्टिमोदक, धम्मक, बुक्की 'आज गमूला शाळेंत दहा लाडू मिळाले' ४ (ल) फायदा, लाभ [स लड्डुक, प्रा. लड्डुअ, हिं लड्डू] ०**गडू**–पु १ वरात घरीं जातेवेळीं नवरानवरी देवास नमस्कार करावयास जातात तेंव्हा गडू व लाडू ठेवलेला असतो तो २ अशा विधीसाठीं आणतात तो गडू भाड ०**संत्रा**–पु संत्र्याची एक जात हें देठाकडे निमुळतें असून खालीं पसरट असतें याची लागवड आसाम–बंगालकडे करतात –उद्यममासिक पृ १९६ मार्च १९३६

**लांडूर**—स्त्री लाडोर पहा

**लाडोर**—स्त्री मोराची मादी (मोराएवढा लाब पिसारा नसून लाडा असतो म्हणून नाव) म्हण० (निंदार्थी उपयोग) मोर नाचतो म्हणून लाडोरहि नाचत, पण शोभत नाही (तिला मोरासारखा पिसारा नसल्यामुळें) अधानुकरण योग्य नाहीं

**लाड्या**—पु (व) एक प्रकारचा पक्षी, लावा पक्षी

**लाढण**—स्त्री गूळ करावयाच्या काहिलीस उडदाचें पीठ इ०चें लुकण लावितात तें, लाडन पहा

**लाढा**—पु १ लादा, लादा (गूळ इ०चा) २ अगाचा चिकटपणा, दरदरून घाम येण्यानें होणारी अवस्था (तापामुळें, उष्णतेनें, दवी, गोवर वगैरेमुळें)

**लाण**—वि (व) लाब, दूर दर्णें लाणच आणखी मागतो 'लका लाण आह' ०**करणें**–ताणणें, लाबवणें, मजल आणणें 'जीव घेईतोवर लाण केली' लाणें पहा

**लाण, लाणी**—स्त्री १ (शेत, पीक याची) कापणी २ (जुन्नरी) कातरणी (मेंढ्यावरील लोंकरीची) [स लवन]

**लाणी**—स्त्री कापण्याचें हत्यार, कोयता **लाण्या**–पु. (राजा) विळा कोयता

**लाणी**—स्त्री १ शेवट सीमा सकळा जाणणेया जे लाणी।'–ज्ञा ८ १०० २ स्थान, आश्रय 'तैसा ईश्वरावाचूनि काहीं। जिथें आणीक लाणी नाहीं।'–ज्ञा ? २४? [स स्थन?]

**लाणें**—न अवधि, शवट.

**लाणें**—न प्राप्ति, लाभ 'तेही पागियाचें लाणें पाहिले। मल्लिकारा लागी।'–शिशु ५६७. [स लग्न, प्रा लाण, हिं लेना]

**लात-थ**—स्त्री पायाच्या तळव्यानें केलेला प्रहार, लत्ता 'वधि तया हरि लात-बुक्यातळीं।'–वामन, नृहरिदर्पण ११७. [सं लत्ता, फा लत्] **॰मारणें**–१ लाथेनें हाणणें, तुडविणें (क्रि॰ मारणें, देणें) 'लाथ मारील तेथें पाणी काढील' (सामर्थ्यवान्, कर्तबगार माणसाबद्दल म्हणतात) २ अनादरानें त्यागणें, कस्पटासमान मानणें (रोजगार, कामधंदा अन्न इ॰) 'प्रपंच हरिणीस लात मारून।'–नव १५ २६ **लाताबुक्यांनीं तुडविणें**–लाथा व गुद्दे मारणें, अतिशय मारणें; फार अवहेलना करणें **बसतां लाथ व उठतां बुक्की**–अहोरात्र एकसारख्या लाथा बुक्क्या मारणें; सारखा छळ करणें **लात झोपडें**–(लाथ मारली असतां पडणारें झोपडें) अगदीं काडीमोडीच घर टाकाऊ झोपडी (निंदार्थी उपयोग) **लातड, लातड्या, लातरा, लातिरा**–वि लायाळ, लात मारण्याचा स्वभाव ज्याचा असा (गोमहिष्यादि पशु) [लात] **लात(थ)डणें**–लाथा मारणें, लातळणें [लात] **लातबुक्की**–स्त्री लाथा आणि बुक्क्या (सामा) जोरानें बडवणें, मारणें [लात+बुक्की] म्ह॰ १ लातबुक्की भाकरसुखी=पुष्कळ लाथा आणि गुद्दे व भाकरीहि सुकी (कोरडी-लुपाशिवाय), छळ असून शिवाय खाण्याचे हाल २ लातबुक्की आणि सदासुखी=मार असला म्हणजेच नीट असणारा **लातळणें**–क्रि १ लाथा मारणें, लाथाडणें (अहल्पणें किंवा स्वभावामुळें, जनावरानें) २ (ल) तिरस्कारपूर्वक भिडकारणें, नाकारणें **लाताखाऊ**–वि नेहमीं लाथा खाणारा, लतखोर पहा **लाताडडी**–स्त्रीन लाथ (क्रि॰ मारणें, देणें) **लाताड**–वि लातड पहा **लाता(था)ळ, लाता(था)ळें**–न १ दुगाण्या, लाथांचा सुकाळ (अनेक घोडे, गाढव यांच्या), जोराचा लत्ताप्रहार 'कोप धरिला ताळें वळभुजपरि कपितें करि लाताळें।'–मोकृष्ण ५० २ गोंधळ, रडपडीचें व दमरीतुमरीचें भांडण, कडाक्याचा वादविवाद व गोंधळ, वजनजपुरी [लात] **लानाळ लाताळ्या, लाथाड-ळ**–वि लायरा, लाथा मारणारा 'तथापि बहु लाथळी मग मदड मी हा किती।'–केका ५४ **लाताळणी**–स्त्री लाथा मारणें **लाता(था)ळणें**–क्रि लातळणें, लाथ मारणें [लात] **लाथरा, लाथेरा**–वि लातड पहा

**लातर**—स्त्री (गों) माशाची एक जात या माशाना भाक्टोबर-नोव्हेंबरमध्यें पकडतात

**लातिंथी**—स्त्री (क) पाला टेंचून टेंचून केलेला चोथा, गोळी 'लातिंथी कर' 'लातिंथी जखमेवर बांध'

**लाती**—स्त्री एक प्रकारची वडी तांदुळाच्या पिठांत शिजविलेल्या तुरी किंवा वाटाणे घालून त्याची वडी बांधून शिजवितात तो पदार्थ

**लाती**—स्त्री लागी पहा

**लाद्**—स्त्री (कु) अगावर उठलेला लहान तांबडा चपटा फोड

**लाद्णी**—स्त्री (व) धान्य किंवा कांहीं वस्तु साठण्याविण्याकरितां भिंतींत किंवा जमिनींत केलेली कोठीसारखी जागा २ भारा, वजन; ओझें ३ बुरजाच्या बाहेरील बाजूस किंवा किल्ल्याच्या भिंतीस, घराच्या पडवीप्रमाणें, युद्धाच्या सोईकरितां तयार केलेली जागा. मात्र या जागेवर पडवीप्रमाणें लाकडांची छावणी नसून विटा, रोडे, वगैरेची कमान असते 'इतक्यांत एक गोळा लादणी फोडून आंत आला'–मल्हारराव होळकरचरित्र ५५ ४ दडाला बळकटी देण्याकरितां बांधलेली उतरती भिंत ५ (घोडे, उंट इ॰ वर कठाळा, दळिता, कांहीं ओझें) लादण्याची क्रिया ६ तळघर [लादण] **लाद्णें**–उक्रि १ (बैल, गाडी, होडी, इ॰वर) सामान, ओझें, माणसें इ॰ चढविणें, ठेवणें २ कोणेकाच्या इच्छेविरुद्ध त्याला (कांहीं काम) करावयास लावणें, त्याच्यावर कांहीं जबाबदारी टाकणें, दोष, दुष्कृत्य आरोपित करणें ३ एकावर एक रचणें, वर जड ओझें घालणें ४ (विटा, चुना, रंग, गिलावा इ॰ चा थर) भिंत, जोतें इ॰ बांधतांना वर लावणें, चढविणें [दे प्रा लद्, गु लादवु हिं लादना, में जि लदव]

**लाद्नी**—स्त्री १ (व ना) तळघर लादणी पहा २ लदाव पहा

**लादा**—पु १ धुण्याच्या कपड्यांचा बोजा, ढीग २ बोजा, ओझें, भारा, लागत त्याहीशीं अतिशय जास्त प्रमाणांत असणारा कोणताहि पदार्थ (भात गूळ, इ॰) ३ (क) गुता, लगदा, एकमेकांत मिसळलेला जुडगा (केंस, कपडा, कागद इ॰चा) ४ अशी गुंतागुंत, एकत्रित झालेली स्थिति **लाद्यावर्दीचें काम**–न (लादलेलें असल्यामुळें) अव्यवस्थित, कसें तरी केलेलें काम

**लादा**—पु १ (वाटलेलें पीठ, मळलेला चिखल, चुना इ॰ काचा भिंत इ॰ कांवर मारण्याजोगा) गोळा, (सामा) चांगला भिजवून मळलेला गोळा २ पाण्याचे बांध तयार करण्यासाठीं पळीवानें खणून काढलेल्या मातीचे चौरस गोळे ३ (पीठ, भात, गूळ, इ॰ कांचें) पातळ स्वरूप, लिबलिबीत अवस्था ४ पाणवट चिखल 'लादा लागे कातर। ठाईं ठाईं'–दा ११ ६ १

**लादी**—स्त्री १ घडीव दगड (फरसबंदी, लादनी इ॰ कांचे उपयोगी), चीप 'चार दात नळाला दहा दात लादी असल्या म्हणजे आच्छादला जाईल' २ फरशी (शहाबाद तांडूर इ॰ कडील) ३ (सामा) चौकोना वडी, चिरा, चौकोनी घडण

**लाधण**—स्त्री लाडन पहा.

**लाधणें**—अक्रि १ लाभणें, मिळणें; प्राप्त होणें –एभा २ २४८ –तुगा ४५२ २ लाभणें, मिळालेली वस्तु आपल्या सुखाची

होणें, आपल्या जवळ टिकणें ( निषेधार्थी प्रयोग ) ' ही वस्तू अखेर याला लाधली नाहींच ' –सकि मिळविणें, संपादणें, जोडणें ' ऐसा पुत्र लाधसी । ' –मुआदि १६ ७५' [ स लभ्–लभ्य; प्रा लद्ध ]

**लान**—पु व्यभिचार केल्याचा आरोप ठेवल्यास मागता येईल असा घटस्फोट –पका ७५ [ स ला=तोडणें ]

**लानगो**—पु ( मि ) लाडगा ' लानगो लानगो आलेरे ! '

**लानी**—स्त्री लाणी पहा

**लाप**—स्त्री ( वे ) मृगारभीं उगवणारें कुरणातील गवत

**लापट**—वि लपट पहा [ स ]

**ला(ला)पट**—वि १ लटपटीत, ढिलें, घट न बसणारें, सांधे खिळखिळे झालेलें ( कुलूप, गाडा, पेटी इ० ) २ झिजल्यामुळें सैल झालेला (कुलुपाचा काटा, पेटीचें झाकण, खुटी, मळसूत्र इ० ). ३ निर्लज्ज, कोडगा, लोचट [ ? ध्व लप् ! ]

**लापण**—वि जीत रेती व चिकणमाती यांचें प्रमाण सारखें असतें अशी ( जमीन ) –कृषि १६

**लापणिका, लापण्णिका, लाफण्णिका, लापनिका–लापटणिका**—स्त्री. १ लांबलचक, कंटाळवाणी हकीगत, चऱ्हाट. २ लपाडीची मसलत, कपट, लपडाव ' प्रपंच वाटे लटिका। माया वाटे लापणिका । ' –दा १ ९ १६ ३ विवेचन, स्पष्टीकरण. लापनिका पहा ' कथा अन्वय लापणिका । नामघोष करता लिका ' –दा ४ २ ४५ ४ कुभांड, थोतांड –वि मिथ्या, खोटें ' सदा सर्वकाळ लटिका । बोले मायिक लापणिका ।' –दा ५ ३ ६० [ स लपनिका ]

**लापणी**—स्त्री भाषण [ स लापन ]

**लापणीक**—स्त्री १ (महानु ) विवेचन, स्पष्टीकरण २ लबाडीची मसलत, कपट ' हें तों तुज कळों येतसे अतरीं । लापणीक वरी हाच भाव ।' –तुगा ९४२ लापणिका पहा

**लापन**—न १ लावणें बद करणें २ रोवणें, स्थापणें, गच्च बसविणें ३ अर्थबोध होईल अशा प्रकारें जुळणी करणें, अन्वय लावणें, योग्य क्रम ठेवणें ( कविता, कूट दिशेब इ०चा ) व्यवस्थित रचना, योजना बहुधा समासात उपयोग, जसें–श्लोकलापन प्रय लापन [स ] **लापनिका**–स्त्री १ अन्वय ( कवितेंतील शब्दाचा ) संबंध, अर्थ लागेल अशी रचना, (श्लोक, वाक्य कूट इ०चा) अर्थ लावणें २ वाक्य, श्लोक इ० चा अर्थ समजून सागण्याची विशिष्ट धाटणी, शैली, सरणी, स्पष्टीकरण किंवा अनुवाद करण्याची रीत, पद्धत ' अर्थ तर एकच पण त्या टीकाकाराची लापनिका निराळी, याची निराळी ' ३ वादविवादाची, लेखनाची, संभाषणाची पद्धत, शैली, रीत, वक्तृत्वाची व निबंधाची पद्धत, रीत ४ शब्दपांडित्य 'तुल० –एभा १० ४१८ पहा [ स ]

**लापशी लापफशी**—स्त्री १ दूध, ताक, नारळाचा रस इ० त्यात शिंगाडे, रताळीं, तांदूळ वगैरेंचें पीठ, तवकील वगैरे लावून, कढवून करतात ते पेय, लावशी, खीर २ साबुदाणा पाण्यात धुऊन तुपाच्या फोडणींत मिरच्याचे तुकडे टाकून फोडणीस टाकल्यावर त्यात ताक ओतून मीठ घालून करतात तो प्रकार ३ साबुदाण्याची वगैरे खीर –गृशि ४७१. [ दे प्रा लप्पसिया, हिं. लपसी ]

**लांपळ, लांफळ**—वि लपट, लटपटीत, ढिलें

**लाफ**—पु दिवा ' लाफात तेल घालावयाची त्याची पाळी आहे ना ? ' –खेड्यातील स्वभावचित्रें [ इ लँप ]

**लाफा**—स्त्री. फळीला बळकटीसाठीं खिळे इ० नी ठोकलेली पट्टी

**लाफा**—स्त्री अव १ अतिशयोक्ति, विस्तार, तिखटमीठ, लावून, वाढवून, फुगवून सांगणें २ बढाया, बाता, गप्पा, बडबड ( क्रि० मारणें, झोंकणें, लावणें ) [ स लप्, बडबड करणें ]

**लाफ्या**–वि बाताड्या, गप्पीदास '

**लाफाळ**—वि लुब्ध, अधीन, लपट. (वाईट अर्थानें उपयोग)

**लांब**—वि १ दीर्घ, आखूड नव्हे असा २ ( स्थल किंवा काल या बाबतींत ) दूर, अंतरावरील ' अजून दिवाळी लांब आहे ' ३ विस्तारयुक्त, पाल्हाळिक ' म्हणाल बोलणें का केलें लांब।' –दावि ३००. –क्रिवि दूर, अंतरावर कधीं कधीं लंबा या अर्थी उपयोग लंबा पहा [ स लंब ] ०**लांब गोष्टी सांगणें**–१ पूर्वीची विपदवस्था विसरून उद्दामपणाच्या, शेखीच्या गोष्टी सांगणें २ गप्पा, बाता मारणें ०**बसणें**–( बायकी ) विटाळशी असणें सामाशब्द– ०**कान्या**–वि गाढव ' माणसाचे कान लहान असता ते लांबकान्याप्रमाणें का वागतात ? –नवुक ९. ०**लांब, लांबचे लांब**–वि १ फार लांब, दूर असलेलें २–क्रिवि. दूरच दूर **लांबट**–वि (विवक्षिताहून ) किंचित अधिक जो लांब तो ' माझ्या धोतरापेक्षा हें धोतर लांबट आहे ' २ लांब धाटाचा, आकाराचा ०**टांग्या**–वि लांब तंगड्याचा, पायाचा; ढांगळ्या, लंबाड्या ०**रुंद**–वि प्रशस्त लांबी रुंदी असलेला ०**लचक**–वि १ चागली लांबी रुंदी, उंची असलेला २ प्रशस्त उचनिंच, (सप्रमाण, पाहिजे तितका) लांब, अवाढव्य ३(ल ) दीर्घसूत्री, कंटाळवाणें ( भाषण, गोष्ट ) ०**लेखा**–पु भारी लांबण, विस्तार, उगीच पाल्हाळ, वाद चर्चा इ० ( निंदार्थी उपयोग ) 'या गोष्टीला होण्यास काहीं लांबलेखा नको आता करून यतों ' ०**सर**–वि. लांबट, अधिक लांब ०**हस्त**–वि. ( हिं ) विस्तीर्ण **लांबडा**–पु साप, ' घरात रात्रीं लांबडा निघाला होता ' –वि. लांबोडा, लांबट ०**करणें**–क्रि पुष्कळ चोपणें, ठोकणें, लांबा करणें ' शिवाजीनें अफझुल्खानाला लांबडा केला '

.. लांवण—स्त्री. १ येरंच मोठें अंतर; दूरपणा. ' स्थिर दिसतो खरा पण ही काय लांवण थोडी आहे. ' २ सावकाशी; दिरंगाई; दूर टाकण्याचा प्रकार. ' त्याच महिन्यांत लग्न करून घ्या. उगीच लांवण लावूं नका. ' ३ (तुलनेनें पाहतां) जास्त लांबी, अंतर. ' पायवाटेपेक्षां गाडीवाटेकडून लांवण आहे ' ४ विस्तार; पाल्हाळ (भाषणादि व्यवहाराचा). ' काय तें हुंशील सांगा, उगीच लांवण लावूं नका, उशीर होतो. ' [ सं. लंबन ] लांवणीवर घालणें-टाकणें-लोटणें-दूर मुदतीवर ढकलणें, उशीरां करण्यासाठीं ठेवणें. लांवणीवर पडणें-दूर मुदतीवर जाणें; पुढें ढकललें जाणें. लांवणें-अकि. १ लांब होणें; वाढणें ( स्थल किंवा काल या बाबतींत ). २ ( लांबी, विस्तार व अवधि या बाबतींत ). वाढणें ( वस्तु, व्यवहार, गोष्ट इ० ). ' काम एकदोन दिवसांत झालें असतें पण मुमेदार गेले, आतां चार महिने लांबलें ' प्रमाणाबाहेर वाढणें. ' प्रथमतः दहा हजारांत घर बांधावें असा बेत धरून आरंभ केला मग जें लांबलें तें पंचवीस हजारांवर गेलें ' ३ भर घातल्यानें प्रमाण वाढणें; अधिक होणें ( ताक, दूध इ०मध्यें पाणी वगैरे घातल्यानें ); विस्तार होणें. ४ ( बातमी, गुमगोष्ट, मसलत इ० ) अनेकांस विदित होणें; जाहीर होणें. ५ ( भाषण, ग्रंथ इ० ) कंटाळा येण्याइतकें अधिक मोठें, पाल्हाळीक होणें [ सं. लंबन ] लांवता-वि क्रिवि १ लौकर न करता हळू हळू केलेल्या, करून न दविलेला ( क्रि० धरणें ) ' दोन गृहस्थ येणार आहेत, कथा जराशी लांवती धरा. ' २ लांवलेला, बराच दूर गेलेला, ( आकाशांत बराच वर आलेला ) ' लावतिअे सुरिजें । केवि लाजिजे सु ! ' -शिशु ४७० लांवरा-वि लावट ' मोठाले पुच्छ हुंदुवक नयनें कर्णांवरी लावरे । '-वर्म ९ लांवविणें-क्रि. १ लांब करणें ( स्थळ, काळ या बाबतींत ), २ ( सामा ) लांबीरुंदी वाढविणें. ३ पुढें टाकणें; खेंचणें, ओढणें ४ ( मालकाकडून ) काटून नेणें, पळविणें, लुबाडणें [ लावणें प्रयोजक ] लांवघालांवघ-स्त्री. १ घाईनें, कसें तरी दूर नेणें, धाडणें ( चोराटीच्या भीतीनें द्रव्य, वस्तु इ० ) २ लुबाडणी, पळवापळव. लांवसून-क्रिवि. ( कों. ) लांबून. -लोक २ ४७ लांवी-स्त्री. १ लंबाई, दीर्घता. २ लांब बाजू. ३ अंतर, अवधि, मधली जागा किंवा वेळ; दूरता ४ एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंतचा विस्तार, त्याचें माप ' ५ ( गो. ) उशीर; दीर्घकाल ' हवदे पाठविण्यास लांबी जाहल्या-बद्दल राग धरूं नये ' लांबीवर पडणें-लांबणीवर पडणें; शिल्ल असणें. लांबून-क्रिवि. दुरून; अंतरावरून. लांबोडा, लांबुळा, लांबुडा-वि वाटोळा, चतुष्कोण इ० जे आकार त्यामध्यें लांबी म्हणून जें प्रमाण तत्प्रधान जो आकार तो; लांवट; दीर्घ वर्तुळाकार; अंडाकृति. ' तोफेच्या गोळ्यासारखा वाटोळा गोळा करूं नको; वरंवट्यासारखा लांबोडा गोळा कर. '

लांवणदिवा—पु. लामणदिवा पहा. ' वेविला लांवणदिवा । ' -यमा २८

लांवणी—स्त्री. ( हिंदुस्थाबाद ) मोठी पंची.

लांवणें—न. १ ( कों. ) विहिरींतील पाणी दोरीनें बाहेर काढण्याचें साधन ( बादली, पोहरा इ० ). २ लांवणदिव्याची सांखळी ३ ( व्हे ) पहाडांची जू.

लांवर—वि. १ मध्यें तोंड घालणारा; लुडबुडणारा; ( प्र. ) लाड्बर. २ ( मामा. ) लुडबुड्या; चोंबडा. [ हिं. लङ्बर=पोपट ]

लावरी—स्त्री. ( व्हे ) टप्पा.

लावशी—स्त्री. लापशी पहा.

लांवा—पु. शेतांतील भात कापतेसमयीं गळलेले किंवा एन्हवीं पडलेले जे भातगोटे त्यांच्यापासून उगवलेले रोप. ' लांवा उगवे आगरीं । बिमवधियेचा । ' -ज्ञा ६ ४४४. २ बिन भाजलेल्या शेतांत भाताचें टाकलेलें बी. ( क्रि० टाकणें ).

लांवा—पु. डाग; दोष ' मेरीं लांवा लागला पातकाचा । ' -सिंमं ८.१८४.

लावाड—वि ( रामदासी वाङ्मय ) लबाड. ' बाष्कळ लावाड ऐसें । जना कळों आलें । ' -दा १६.३.२२; -दा २.२.६.

लावाडवाणा-वि. लबाड. ' कित्ती येक लताड लावाडवाणे. ' -रामदासी २.१७९.

लांवी—स्त्री. लुकण; एक प्रकारचा चिकण जिन्नस. ही चुना किंवा सफेता आणि जवसाचें तेल एकत्र करून तयार करतात. कांचेची तावदानें घट्ट बसविण्यासाठीं किंवा गळकीं भांडीं दुरुस्त करण्यासाठीं ही वापरतात.

लांवीझोंवी—स्त्री. ( प्र. ) लोंबीझोंबी पहा.

लाशूद—वि स्वल्प. -राज्य ८.८२. -क्रिवि. अवश्यमेव; सर्वथा. [ फा. ]

लांवोडा—वि. लुब्रा; लांवर पहा. ' वायकांत पुरुष लांवोडा भाजून खातो कोंबडा. '

लांवोरा—वि. लोचट; कंटाळा येईपर्यंत पाठीमागें लागणारा ( भीक मागण्यासाठीं, द्रव्य गोळा करणें इ० साठीं ).

लाभ—पु १ फायदा; प्राप्ति. ' तुज लाभ काय यांत... । ' -मोविराट १.१८६. २ धान्य वगैरे मोजताना बरकत यावी म्हणून एक अशा अर्थानें वापरतात, नंतर दोन, तीन असें म्हणून माप टाकतात, बरकत पहा. ३ ( कु ) हिंशेबावर दिलेला जास्त माल ( नारळ वगैरे ). ( भेटीचा ) ०देणें-भेटणें; भेट घेणें ( आदर दर्शविण्यासाठीं योजतात ) लाभा येणें-१ लाभणें. २ अनुभवास येणें, समजणें. ' जऱ्ही वैसेनि हे लाभा । जायेचि ना । ' -ज्ञा १५ ५४२ सामाङ्क्ष्ट्र-.०काळ-पु फायद्याचा, प्राप्तीचा काळ, वेळ, हंगाम; उत्कर्षकाळ. ' जिवारीं जडविलेल्या जीवासाठीं

अंतकाळाला लाभकाळ समजावें लागे ' -राजमंत्रात ७ ३२८ दा९१ विनाशकाळ, आपत्काळ ०गुण-पु फायदा, प्राप्ति. 'त्याच्या संगतीनें मला कांहीं लाभगुण नाहीं.' ०दायक-वि ज्याच्या संग्रहानें संग्रहकर्त्यास द्रव्यादि लाभ होतो असा (अभ्र, नीळ इ० पदार्थ, शुभकर्म, व्यापार इ०), फायदेशीर ०दृष्टि-स्त्री लाभाची, फायद्याची दृष्टी. -वि ज्याला केवळ फायद्याची दृष्टी आहे असा, ज्यात स्वतःत लाभाची अपेक्षा ठेवणारा [सं.] ०लोभ-पु १ (लाभाचा लोभ) योग्य कार्यामध्ये मला कांहीं प्राप्त होईल असा जो लोभ असतो तो, लोभदृष्टि २ (लाभ द्वि) लाभ, प्राप्ति, फायदा (व्यापारार्थी व सामान्यपणें उपयोग) 'मी तीन वर्षे व्यापार करतों परंतु लाभलोभ म्हटला तर कांहीं एक नाहीं ' ३ प्रीति किंवा स्नेह, लाभाची अपेक्षा किंवा लोभाची भावना. 'लाभ लोभ धरून कोणी कोणाचेंच काम करतो ' 'लाभालोभावांचून कोण कोणाला पुसेल ' ०वेळ-ळा-स्त्री. १शुभकाळ, लाभदायक वेळ किंवा संधी 'लाभवेळ पाहून काम केलें असतां अवश्य लाभ होतो.' २ दिवसाच्या किंवा रात्रीच्या आठ भागांपैकीं एका वेळेचें नाव वेळ पहा ०हानि-स्त्री नफानुकसान, सुखदुःख 'ज्या लाभहानि जेथें, मेतो यायोनि काळ दाव्यानें।' -मोकर्ण ४७.६१ लाभणें-१ मिळणें, प्राप्त होणें 'आज मला भेट लाभेल ' सपादन होणें २ निष्पन्न होणें, उद्भवणें (फायदा, नफा) ३ उपयोगाचे, फायद्याचे असणें, उपयोगी पडणें ४ शुभकारक, लाभदायक होणें-असणें (मुहूर्त, मद्यपान इ० ला, गुण इ० करिता) लाभाईत-वि लाभदायक -'घरीं देवोनिया आनंदें बोल्ती। कन्या आम्हाप्रती लाभाईत।' -म ८ लाभागळी-वि लाभदायक 'बोलनी लीळा लाभागळी।' -शवि १११. लाभागोभा-पु (व्यापकार्थी) नफा, फायदा [लाभ द्वि] लाभाचा-वि फायद्याचा, लाभदायक 'त्या वाचुनि यागीं जो करणें समाप्त तो न लाभाचा।' -मोविराट लाभालाभ-पु १ नफानुकसान, नफातोटा २ दैव, नशीब [सं लाभ+अलाभ] लाभालोभा-पु (वों.) लाभलोभ पहा लाभालोभाचा-पु स्नेह किंवा लाभ यामुळें जोडलेला, गुंतलेला 'चौघे लाभालोभाचे असले म्हणजे निर्वाह होतो ' लाभावळी-स्त्री अनेक लाभ 'तो चिन्हें शुभ पाहुनी नृप म्हणे लाभो न लाभावळी।' -र ३०. [लाभ+आवलि]

लाभरा—वि लावर, लुबरा पहा

लामटे—पुअव (व) (प्र) लावटे, शेवया [लावट]

लामणदिवा, लाम्हणदिवा, लामणें, लाम्हणें—पुन १ लावणदिवा, लावणें दोरी इ० कास लागून टांगावयाजोगा जो लोखंड, पितळ इ० चा करतात तो दिवा २ (वों) ज्यास मध्यें सासळी लाविलेली असते असा पितळी कंदील [लावण+दिवा, तुल० सं. लावण्यदीप]

लामा—पु १ बौद्ध धर्माची तिबेटांतील शाखा. २ या शाखेचा गुरु ३ तिबेट किंवा मोंगोलिया यांतील बौद्ध भिक्षु दलाईलामा-प्रमुख लामा. (तिबेटी)

लाय, लायलाय—क्रिवि स्त्री लहालहा पहा

लायक—वि १ युक्त; प्रासंगिक, साजणारा (शब्द, कृति). २ समर्थ, योग्य, दक्ष, पात्र (माणूस) ३ योग्यता, योग्यस्थळ; उपयुक्त, लागू पडणारा (जिन्नस, जागा). 'जमीन पडीत जमानीची लायक-भिराईत ' -वाडसनदा ९१ ४ (गंजिफा) हतारी करतेवेळीं ठरावयाजोगा (हुकूम) [अर लाइक्] लायकी, लायकपण-स्त्री. १ औचित्य, योग्यपणा (शब्द, कृति यांचा). २ सामर्थ्य, योग्यता (माणसाची) ३ जुळतेपणा, योग्य मिळणी (वस्तु स्थळ इ०ची) [फा. लायकी] लायकीचा दाखला-पु योग्यतापत्र, शिफारसपत्र, (इं) सर्टिफिकेट

लायणें—क्रि (वों) लावणें पहा -लोक २८०.

लायनी—स्त्री अपशब्द, शिवी 'स्वतीस लायनी शिवीगाळी न करणें व तस्तीस न देणें ' -रा १६ २९ [अर लअन]

लायरी—स्त्री (मुंबई) मिजास [लहरी, लाहरी]

लारांज—न (गो) साखरलिंबू [पोर्तु]

लारी—स्त्री एक जुनें चांदीचें नाणें आकार लहान चिमटया सारखा, किंमत साधारणपणें आठ आणे 'दोन पाऊंड लारी ६ ' -भाद्विमं ८८.

लाल—वि प्रिय, प्रियकर, आवडीचा (माणूस) 'या जगांत खरेखुर सरस्वतीचे लाल कितीसे सांपडतील?' -विवि ८ ८.१४३. -होला १२० [सं] ०धनणें-(व) श्रीमंत, गब्बर होणें. लाला-पु मुलगा, पुत्र -वि (हिं) बहुमानार्थी महाराज, साहब या प्रकारचें विशेषण

लाल—पु १ एक रत्न; माणीक २ एक पक्षी -प्रला १३ -वि १ तांबडा, रक्त (रंग, कपडा इ०) २ अतिशय तांबडा (तांबडा शब्दाशीं जोडून). 'या पागोट्याचा रंग तांबडा लाल आहे ' ३ मूर्ख [फा लाल्] ०अंगार होणें-(व) अतिशय रागावणें ०कांगोणी-स्त्री एक झाड कांगोणी पहा ०गंध-न (व) वाङ्निश्चयाचें साक्ष गंध 'त्याचें लालगंध झालें'-लग्नाची तिथी ठरली ' ०गेरू-पु गेरूचा एक प्रकार ०चिडी-पक्ष्याची एक जात -मुव्या ४२ ०बावटा-पु १ प्रतिकूल परिस्थिति (क्रि० दाखविणें). २ समाजसत्तावादी मजुरांचें निशाण ०बोर-वि विशिष्ट रंगाचा (घोडा) 'घोडा अस्सल कानुलाचा। लाल-बोर टाकम तुरकी।' -पला ४.२६. ०बुझक्कड-बुजःकड-बुज कणा-पु (हिं) दीडशहाणा, स्वतःला हुषार समजणारा परंतु खरोखर मूर्ख व अज्ञानी असणारा (इसम) लालबुझक्कड या

नावाची अशी एक व्यक्ति होती म्हणतात ०भडक, ०लाल भडक-वि अतिशय तांबडा, अत्यन्त गर्द तांबडा, भडक तांबड्या रंगाचा ०वट-वि १ लालसर, तांबडसर २ अतिशय, भडक तांबडा [ लाल+वत् ] लालट-वि लालसर 'पूर्व दिशाही लालट झाली अरुणोदय होउनी।' -रत्न ४ २ लालटपणा-पु किंचित् लालपणा 'नतर लालटपणा आला' -वज्राघात ४९. लाली-स्त्री रक्तिमा; तांबडेपणा [ फा ]

लालच, लालचखोर—पु लालूच, लालूचखोर पहा. लालचणें, लालचावणें-अकि १ लोभाविष्ट होणें २ सव कणें, आमिष लागणें लालचाई-स्त्री लालूच, लालची पहा

लालची—स्त्री १ लालसा, लोभाविष्टता, इच्छा, लोभ, काम २ लालूच लाच (क्रि० दाखविणें) -वि लोभी, लालूच-खोर [ स लालसा ]

लालझगडा-डें—पु न प्रीतिकलह लाडझगडा पहा

लालचेल—वि १ लोभी; अभिलाषी २ जास्त ला चावलेला, लोभाकुल [ लालच ]

लालटिन-टेन, लालटेम—पु (व हिं ) हातदिवा 'लालटिन हातात घेऊन जा' [ इ लॅन्टर्न ]

लालडी—स्त्री हलक्या जातीचा लाल, एक रत्न, माण काचा तुकडा ( नथेंत घालतात ) 'राधा-कृष्णगाठ आम्ही लालडी त्या।' -रासक्रीडा २

लालणें—क्रि लालन करणें, संगोपन करणें, लाड करणें, सभाळणें पाहुनि घेउनि सेउनि लालुनि प वनसस्कृतिवध निवृत्ता।' -निमारामायण ४ ३० [ स लालन ]

लालन—न १ पुत्र इ० कास मागितलेला पदार्थ द्यावा, करतील तसें करू द्यावें, त्याजवर माया करावी, चुबनालिंगनादि करावें इत्यादिकेंकरून त्याचे मन सतुष्ट करण्याचा जो व्यापार तें, लाड, खुशामत 'दुर्मेनेनृपसंगतीस्तव यती वी पुत्रही लालनें।' -वामन, स्फुट श्लोक १५ ( नवनीत १३४ ) २ संगोपन, पाळण -ज्ञा १० २ [ स ] ०पालन-न १ लालन, लाड, लालनाचें आधिक्यदर्शकरूप २ सांभाळ, संगोपन, पालनपोषण

लालमो—पु ( इ ) एका माशाचें नाव

लालस—पु १ औत्सुक्य, तत्परता २ गोड, लडिवाळपणा 'एके जनलीला विलासें। एके पालनशीळे लालसें।' -ज्ञा ११ १३० -वि तत्पर, उत्सुक 'दासी तुझी परम लालस पाट पाहे।' -सारह ५ १०३ [ स ] लालसा-स्त्री अतिशय आवड, अवर इच्छा अभिलाष, आकांक्षा 'तयाही हा ऐसा। लोभें वेतला जरी लालसा।' -ज्ञा १८ ३९२ [ स ]

लालाभाईचा चुरमा, लालाभाईचुरमा—पु १ प्रत्ये कास प्रत्येक गोष्टीची चैन, रेलचेल, सुबत्ता; कल्पतरु असणें २ रंगविलासाची खोड, बेसुमार चैन, मौज [ लालाभाई=एका वेरागाचे नाव+चुरमा ] म्ह० लालभाईचा चुरमा आणि शेटजी सडक

लालामेह—पु ततुमय लाळेसारखी लघवी, एक प्रकारचा परमा [ स ]

लालित—वि १ लाडका, आवडता २ ज्याचें लालन केलें आहे तो [ सं लल्=विलास करणें लाड करणें ]

लालित्य—न आतील प्रेमविकारामुळें नायकाच्या ठिकाणीं उत्पन्न होणारी विशिष्ट कृति-आळसानें अंग टाकणें, कोमल दृष्टीनें पाहणें, नाजूक विकाराचे द्योतक असे इतर हावभाव करणें २ सौंदर्य, शोभा, मोहकता लालित्यपणा 'प्रत्येक धयात लालित्य उत्पन्न करण्याची त्या त्या धयाचीं विशिष्ट तत्त्वें असतात' ३ काव्य, प्रबंध, भाषण इ० त अर्थ-पदरचनाकृत सौन्दर्य उदा० अर्थ-लालित्य, वाक्यलालित्य, रसलालित्य, शब्द अथवा स्वर लालित्य [ स ]

लालुचणें—अकि लालसा धरणें, लालूच वाटणें, इच्छा होणें, आकांक्षा धरणें लालचणें पहा [ लालूच ]

लालुप्य—न आसक्ति [ स लोलुप्य ]

लालूच—स्त्री १ लोभ; हाव २ आमिष, मधाचें बोट (क्रि० दाखवणें, लावणें ) [ स लालसा, हिं लालच ] ०खोर-वि लोभी, लालची

लालें—न ओष्ठंबधन, मुकेपणा [ फा लाल् ]

लाल्हात—वि (महानु ) रमणीय, सुंदर '। जंव ताम्ह्याचा पडिभरु । तंव लाल्हात दिसे ।' -ज्ञाप्र ७६० 'तो बाळाकरु बालु । लाल्हातु दिसे।' -शिशु ३०४ [ स ललित ]

लाव—अ साहित्य, लवाजमा ( जमा किंवा ) लष्कर शब्दाला जोडून येतो 'लाव-लष्कर फौजेचा थाट।' -होपो १८.

लाव—पु निशाण [ अर लीवा ]

लाव—पु एक पक्षी, लावा [ स ]

लाव—स्त्री १ एक राक्षसी, लास अखीण, डुडळ, डुडळी, पिशाच्च ( हलक्या जातींत हिची उपासना आहे ) -ज्ञा ७ १४७ 'कपाटें उघडी नरनायका। लाव पाठीं लागली' -मुद्गलिद्राख्यान ( नवनीत पृ २०८) २ ( ल ) ओंगळ, दुष्ट, घातकी स्त्री 'तशा जावा लावा उचित करणी त दुपदा।' -मराघा ६९ ३ कजाग कोपिष्ठ स्त्री

लावक—पु एक पक्षी, लावा हा पक्षी फार लोलपट असतो 'वधूसि मधु पाहे माराया लावकासि लावकसा।' -मोभीष्म ३ ५० [ स ]

लावक—न १ भांडण तंटा २ कुरापत, लावालावी 'कांहें लावकें मा केउतें।' -शिशु ११६ [ लावणें ]

**लावगन**—स्त्री लागवण, लागवड 'लावणासहित पुगी फल निश्चभूमि .' -शके ११८१ चा ताम्रपट पाउराय ताम्रपट

**लावण, लावणिक**—वि खारट खारें, क्षारयुक्त [ स ]

**लावणी**—स्त्री. १ एक प्रकारची कविता, गाणें, चीज ही खास महाराष्ट्रीय आहे हीत शृंगार, वैराग्य वगैरे विषय असून पद सात लावणी बहुधा पहाडी, काफी वगैरे रागांत गाईलेली ऐकूं येते [लावणें]०बाज-वि १ लावण्या म्हणणारा २(ल)तमासगीर

**लावणी**—स्त्री १ लागवडीचें व पेरणीचें काम, लावण्याचा व्यापार ( रोपें, झाडपा इ० जमिनींत ) 'गुडघ्यावरी चिखल जाहला आतां करूं लावणी । सपरु काम गीत गाउनी ।' २ जमीन पिकायोग्य करणें, वहीत करणें ३ गणना, संख्या 'या निरूपणाचेनि नावें । अध्यायपद सोळावें । लावणी पाहतां जाणावें । मागिला घरीं ।'-ज्ञा १६ ६३ ४ स्थापना मांडणी 'प्रेमी देतां उलटणी । अनुराग रोपाची लावणी ।'-शिशु ६८१ ५ (गा) रतीब 'दुधाची लावणी दुसरीकडे लावुन जाय'(दुधाचा रतीब दुसरीकडे लावला पाहिजे) ६ जडवणूक शृंगार, आरास 'अवघी जडिताची लावणी ।'-गंपो १५ [स लापन?] (वाप्र) ०लावणें-क्रि १ तुलना करणें 'कृष्णागरु आणि मलयानिल । लावणी लाविता मोल तुटे ।'-भवि २ २४ २ व्यवहारी उपयोग करणें 'घर्तल्यावीण शिकवी । ब्रह्मज्ञान लावणी लावी'-दा २ १० ३६ समासान्त- ०अळपणी-स्त्री (व्यापकार्थी) पेरणीमळणी, अंकुर तें अखेरपर्यंतचें सर्व शेतकाम ०उगवणी-स्त्री शेतपेरणी, सारा वसुली इ० ०कमजास्ती टिपण-न लागवडीसंबंधाचें कच्चें टिपण विशिष्ट काळातील पडीत-वहीत जमीनीचा हिशेब ०जुंपणी-१ नांगरणी, जुंपणी इ०, लागवडीचीं कामें सर्व मिळून किंवा निरनिराळीं 'आमची लावणीजुपणी आटपली-उरकली-संपली-अगदीं चुडाली-चरी पिकली ''लावणीजुपणी मग कांहीं येत नाहीं' २ जडविणें, स्थापणें, जुंपणें, मार्गाला लावणें, सांखळीत बसविणें ०टुपणी-स्त्री (व्यापकार्थी) सर्व शेतकाम, कृषिकर्म, लागवड 'परगणे मजकुराची लावणीटुपणी उत्तम प्रकारें करून '-वाडबाबा १ ८४ [लावणी द्वि] ०पत्रक न लागवडीखालीं आणलेल्या (वहीत) जमीनीचा तक्ता, गांवची खातेवारी वही [लावणी+पत्रक] ०मांडणी-स्त्री (व्यापकार्थी) लागवण लागवडीला आणणें [लावण+मांडणें] ०सचणी-लावणीटुपणी पहा आपल्या तालुक्याची लावणीसचणी करून सुखरूप राहणें -वाडबाबा १ १५७ **लावणीचा**-वि आपल्या आपण झालेलें नव्हे लावणी करून केलेलें (वृक्षादि) 'लावणीचा क्रम बाय माय प्रकाश वर्णावया'-वमा २६

**लावणें**—न (झाडाची रोपाची) लागवड, स्थापना, लावणी -सक्रि १ जोडून ठेवणें, लावून ठेवणें, जुळविणें, बसविणें, चिकटविणें ''पत्र नादपेढ न व्हावें म्हणून त्यास तिकीट लावावें' २ पाठविणें, धाडणें, मार्गावर सोडणें 'सगळे खटले घराकडे लावले, मग मी निघून आलों' 'वित्तेशाकडे विमान । रामभद्रें लाविलें ।'-मोरा १ २४८ ३ पगारपत्रक, बील वगैरे रुजू करणें, सादर करणें (फेडीसाठीं), पाठविणें ४ बसविणें, पत्नी स्थापणा करणें, बसाहत करणें (गांव प्रदेश इ०ची) ५ (दुकान इ०) घालणें, उघडणें ६ (जहाज बोट) नांगरणें ७ कुळास (जमीन) लागवडीसाठीं देणें ८ (ल) हात देणें, घाटेर घालविणें 'नातरि वैर विकूनि गोटा । पुमा लावानि बांधिजे गाटा । इया करणी कीं घटा । कांइ हसो ।'-ज्ञा १३ ७३३ ९ पेटविणें 'लागचें करावें दामोदर । त्यांत घालावें पडुरुमर । कोणा नणतां मंदिर । लावावें तुझें ।'-कथा ५ ११ १६७ १० तोडणें, कापणें 'त्याचें जें कर्मसाडणें । तें तया पै मी म्हणें । शिसाराचें रागें लावणें । शिमचि जैसें ।'-ज्ञा १८ १७९ ११ नाहींसें करणें 'तैसा आत्मनाथाचिया आधीं । लाउनि विषयविषाची बाधी ।'-ज्ञा १६ १८८ १२ ओळीनें मांडणें, हारीनें ठेवणें, जुळविणें, व्यवस्थित करणें 'गंजिफा लावण्यात येनात' १३ व्यवस्थित, जागच्याजागीं ठेवणें 'विमान लाविलें अंतराळीं । सर्व शोधोनि वनस्थळीं ।'-कथा २ ९ २० १४ आरोपणें, माथीं मारणें, अंगीं लावणें (दोष इ०) 'दुसऱ्यास दोष लावण्यास जागा राहणार नाहीं'-विवि ८ ११ २०८ 'देव आपणाला पाप लावील असा लोकसमज होता'-कोरकि ४४१ १५ लावणी करणें, पेरणें 'अगोदर रोप तयार करून मागून भात लावावें' १६ करणें, देणें, योजणें, आणणें इ० अर्थींहि वापरतात उदा० धार लावणें, तजवीज लावणें, लाज लावणें इ० १७ लागणें पहा [स लापन?] **लावून घेणें**-(बायकी) वेढून घेणें (वस्त्र) **लावून पाहणें**-(एक पदार्थ दुसऱ्या पदार्थाशीं) ताडून पाहणें, परस्पराची किंमत, योग्यता इ० ठरविणें **लावून बोलणें**-टोमणे मारणें, दुसऱ्याला बोंचतील अशीं विधानें करणें

**लावण्य**—न १ सौंदर्य रूप -ज्ञा १ ४ २ शोभा, दिमाख ३ खारटपणा, क्षारता [स] ०खाणी-स्त्री (सौंदर्याची खाण) बायकांच्या अंगची सुंदरता व मोहकपणा या गुणांना उद्देशून हा शब्द योजतात (सामा) सुंदरी 'लावण्यखाणी । हस्तिनी वरून उतरे ते क्षणीं ।' अत्यंत अपरंपार सौन्दर्य असणाऱ्या व्यक्तीला म्हणतात

**लावतोड लावताड**—स्त्री १ अत्यंत पराकाष्ठेची घाई, लगबग कामाची देण्याघेण्याची-जाण्यायेण्याची-लावतोड' २ घाईमुळें चित्ताला वाटणारी अस्वस्थता चित्ताची व्यथा. मनाला त्रास चित्ताची-प्राणाची-अंतःकरणाची लावतोड' ३ कामामध्यें केलेली किंवा करावी लागणारी धावपळ, धडपड; उतावळेपणा,

पाई इ० ४ जोराची, निकराची ओढाताण ५ अत्यंत जोराचें, कडाक्याचें भांडण [ लावणें+तोडणें, किंवा लाव ( राक्षसी )-लावा( पक्षी ) याचें तोडणें ]

**लावपिसा**—पु एक क्रूर प्राणी लाव पहा 'रानगाई रान म्हैसे। रानशकटे आणि रिसे। रानदाती लावपिसे।'—दा३ ७ ९

**लावबाज**—वि लाव्याकडील कामगार, लावा पक्षी धरणारा 'तेथें आज्ञा कीं, रामचंद्र पायेदामी व महादजी सपाणा लावबाज पाठविले आहेत.'—पेद ८ २७ [ लाव+फा बाज ]

**लावरा**—पु लहान बोंबडयासारखा एक जंगली प्राणी, याचें मांस खातात —वडलापूर १०४

**लावलद**—वि निपुत्रिक 'तो लावलद, लेकीन दिले हयात असता मुतवना ( दत्तक ) पुत्र घेतला' —रा २२ १०३ [ अर् लावलद् ]

**लावलिजाव**—वि ( क ) जुजबी, तात्पुरतें 'लाव लिजाव काम करून कसें चालेल?'

**लावसट**—स्त्री राक्षसी, डाकीण, जखीण, लाव पहा -वि डालगज याअर्थी योजतात **लावसटणें, लावसरणें, लावारणें**-कि लावसटीपासुन बाधा-त्रास-पीडा होणें ( फळ, दूध, इ०स ) नारळ, ताडफळ इ० फळासंबधानें लावसणें हेंच क्रियापद बहुधा योजलें जातें

**लावा**—पु ( क ) लाहो पहा एकसारखी तीच गोष्ट करणें, धोशा, तडाखा लावणें 'त्यानें शिव्यांचा लावा घातला' [लाहो]

**लावा लावा**—पु एक पक्षी, लाहूर —सारुह ३ ४७ 'गरुड म्हणता प्रतिभला बाचल कसा म्हणोनि ओ लावा।' —मोविराट १ १११ [ स लावक ]

**लावा**—पु (काव्य) ( शोभा येण्यासाठी, खुलविण्यासाठी ) पदरचें घातलेले शब्द तिखटमीठ, साफसुरी, मसाला, झिलाई [ लावणें ]

**लावा**—पु ( कु ) तुकडा ( मासाचा )

**लावा**—पु खेळ, लीला. 'लावेंचि का बोल? हें तुझे लावे।' —माउयोग १० ११० [ लावणें ]

**लावारिस**—वि ज्याला कोणी वारस नाहीं असा, बिन वारशी [ फा ला=नाहीं या,अर्थी प्रत्यय+वारिस=वारस ]

**लावालाव लावालावी**—स्त्री १ तुकडयाला तुकडा, वस्तूला वस्तु जोडणें, वाढविणें २ नीट, व्यवस्थित करणें, मांडणी ३ ( ल ) खुलण्यासाठीं भर घालणें, तिखटमीठ, मसाला घालणें लावा पहा ४ इकडील इकडे तिकडे, तिकडील इकडे जाऊन सांगणें व अशा रीतीनें दोघाच आपआपसात भांडण लावणें, चुगली, चहाडी, कागाळ 'त्याची माला असे म्हातारी। तिनें लावालावी केली उत्तरीं।' —कथा ४.६ १५५ [ लावणें द्वि ]

**लाविरा**-वि लावालावी करणारा

**लांड्ह लांड्हा, लांड्हारणें**—अव लावा लावारणें इ०पहा.

**लाव्हर**—स्त्री वोंकरू, वोंकरी (एक वर्षाचें आतील वयाची), लाहोर

**लाशा**—वि १ लास ( डाग ) दिल्यासारखें चिन्ह ज्य आम्रादि फळावर असतें तो २ लासाचे चिन्हानें युक्त असा ( मनुष्यादि ) डागलेला [ लास ] **लाशें**—न काळा डाग [ लास ] **लास**-पु १ वायुविकृति किंवा अन्य रोग इ० च्या निरसनार्थ त्वचा तापलेल्या लोखंडानें भाजणें डागणी ( क्रि० देणें, घेणें ) 'अज्ञानाचें लासा। जय लागलेंचि न दीसे।' —भाए ५८९ २ अशी त्वचा भाजून पडलेला डाग किंवा वण ३ जन्मा पासुन माणसाच्या तोंड इ०वर जो तांबडा काळा, पिवळा इ० रंगाचा डाग असतो तो, तीळ, वाग ४ आंबा इ० फळ अशत सडल्याचा जो डाग सालीवर उत्पन्न होतो तो —न अंगावरील येमाळ तीळ ( मागील जन्माची खूण समजतात ) [ स लाछ, लाछन ] **लासणी**-स्त्री १ तापलेल्या लोखडानें दिलेली डागणी ( क्रि० करण ) २ ( शिंपकाम ) शाई कोळसा इ० नीं विणा वयाच्या वस्त्राच्या ताण्यावर केलेली खूण, लासन [ लास ] **लासणें**-सक्रि १ विस्तवात घालून लाल केलेल्या लोखंडाचा डाग देणें, भाजणें २ कोणत्याहि कारणासाठीं ( त्वचा किंवा पृष्ठभाग ) भाजून, डागून खूण करणें ३ पाजणीनतर ( ताण्याला ) लासें लावणें, खुणा करणें ४ भाजणें, जाळणें 'मूर्खा, दीपा पत स्वयंनि जन्हि म्हण' हें खरें फूल लासी।' —मोकृष्ण ५६ ३९ —दा ३ ७ २५ —दा १० १० ६१ —अकि १ जळणें 'कपडा लासल। जरा इस्त्री वर कर' २ बिघडणें, डागळणें ( फळ इ० ).

**लासरू**-नपु येमाळ तीळ, वाग, लास **लासें**—न १ डाग, वण लास पहा 'परी गुणत्रय वसे। निविरपणाचें लासें। श्रवे जें ठळिलें असें। तें बोलख तु।' —ज्ञा १७ ७३ २ ( विणकाम ) लास, लासणी पहा ( क्रि० लावणें )

**लास**—पु ( नाविक ) वल्ह्याचें टोंक जमीन इ०वर टेंकून होडी मागें ढकलणें ( क्रि० धरणें करणें )

**लास**—स्त्री ( हिं गु ) कलेवर 'तों एका लहान मुलाची लास तेथें टाकून ठेवलेली तिला दिसली' —मौज २ ६ ३०. [ फा हिं लाश ]

**लास**—पु ( चांभारी ) जोडयात आकार येण्यासाठीं घालवयाचा लाकडी ठोकळा, पायाचा टाकणा, कलबूत 'किती नबराची लास घेऊ?'

• **लास**—स्त्री १ एक राक्षसी, लाव पहा २ लाडगी, वृद्धी, चोल्दी

**लास**—स्त्री (कों) एक प्रकारची माती रंग आणि मेण मिसळून करतात

**लांस घालणे**—क्रि (गो) शिव्या बोलणें

**लासन**—न कापड शिवी विणलें गेलें हें मोजण्यासाठीं त्यास दोन हातावर खुणा करतात त्या प्रत्येकी लासणी पहा ०काठी–स्त्री सगंघ (कापडी वस्त्र) मोजण्याचें व खुणा करण्याचें साधन

**लांसरू**—न लास, राक्षसी (तुच्छतेनें छ्रीस योजतात) लास पहा

**लांसरू, लासूर**—न १ नेत्ररोग नासूर पहा 'डोळे लाल असून एकाला लासरू असल्यामुळें त्यातून पाणी गळत होतें' –सूर्योदय ८८ लासु–पु (महानु) २ चामखीळ नासरू एक डोळयाचा रोग 'तुझिये माया शक्तीचा डोळे लासु लागला ब्रह्मादिका' –भाए ५३५

**लासा**—वि (सामा) लाशा पहा

**लासी**—स्त्री १ डाकीण, राक्षसी, लास 'पाठीं लागलीसे लासी। इच्छा जित जैसी तैसी।' –तुगा ११९५ २ माजरी –ज्ञा १३ २५१ 'मयवा लासीचे दात अति तीख। येरा दिसती परि विलिया सुख।' –स्वादि १२ ३ ५६ –तुगा ३ कोल्ही 'तवतव हाडाति उठी। रसना लासि।' –भाए १९७

**लास्य**—न एक नृत्य, सुकुमार व शृंगाररसपोषक नाच –ज्ञा १७८ 'लास्य आणि ताडव। दोन्ही नृत्याचे भाव। लास्यक्रम माधव। दावीतसे तधवा।' –ह ५५६ [स]

**लाह**—पु छद, नाद लाहो पहा 'तगें निदसुरपणाचेनि लाहें। कर्माकर्माचें पमरी पाये। हिताहित कोण पाहे। देहमोहें मोहितु।' –एभा १० ३१६ [स लाभ, प्रा लाह]

**लाहकी**—स्त्री (भव लाहक्या) १ उकळी, अतिशय उष्णतेमुळें खालवर, घालमेल होणें, लहालहा होणें (क्रि० मारणें, देणें, टाकणें) २ अंगाचा दाह, तलखी होण, राग किंवा त्रास होणें 'अंगाची व शरीराची लाहकी झाली' ३ लाहो, एक सारखा ध्यास, हट्ट धरणें (लहान मुलानें), जीव काढणें (क्रि० देणें, टाकणें, वर प्रत्यय लावून) ४ उत्कट इच्छा ५ (माण) त्वरा, घाई (कार्यसिद्धीची) 'बसा हो! काय लाहकी आहे, जाल आता!' [लहा, लाही] लाहकणें–क्रि (व) धापा टाकणें, तगमग करणें (उन्हानें)

**लाहंगड, लाहचट, लाहंचड, लाहचर, लाहन, लाहनखुरी, लाहनगा लाहवर लाहागड, लाहावट, लाहाचड लाहाचर लाहान, लाहानखुरी लाहा लाहा**—लहंगड लहाचर इ० पहा (लाहा नें आरभ होणारें रूप अयोग्य, अमान्य आहे)

**लाहडा**—पु तगमग, अतिशय जोर, भर ताप, देवी, गोवर, खरूज या शब्दाना जोडून येतो जसें–तापाचा–देवीचा–गोवराचा–खरजेचा–काजण्याचा–लाहडा 'तापानें–देवीनें–खरजेनें–काजण्यानें–उन्हानें लाहडा' [लहा]

**लाहडा**—पु १ लगदा, राडा, गोळा (गूळ, चिखल इ० चा) २ गुता, गुतागुत, मिसळ

**लाहडा**—वि अत्यत लाचावलेला, मागें लागलेला, आसक्त, अत्यत लोभी, नादी, हावरा (चांगल्या आणि वाईट अर्थानें) [लाह]

**लाहणा**—पु प्राप्ति, उत्पन्न, लाभ 'म्हणोनि इये–अध्यायीं। निरूप्य जुरेचि काहीं। आता गुरुशिष्या दोहीं। स्नेहो लाहणा।' –ज्ञा १६ ४६ –वि १ लाभदायक, नफा देणारा 'गुरु उपदेश नाहीं लाहणा।' –दावि १५० २ प्राप्त होणारा, मिळणारा 'येतुलेनि पेंडुसुता। अनुभव लाहाणा आयिता।' –ज्ञा १३ १०४८ ३ आवडता, स्वाधीन 'एव माविकू देवाचा लाहणा –एभा २५ ६२० [स लाभ, प्रा लाह] लाहणी–स्त्री प्राप्ति, लाभ 'परि समर्थी झाली सुदैव गति लाहणी।' –राला १०. लाहणें–अक्रि १ प्राप्त होणे, मिळणें (नफा, लाभ म्हणून) –ज्ञा १ ७७ 'तुजदेखत मीं जयासि लाहेन। –मोकर्ण ३४ २६ २ लागणें लाधणें पहा 'मेलाचि मरोनि लाहे। गलाचि जावोनि लाहे। कर्मेवशें।' ३ उत्पन्न होणें, फळ मिळणें 'जैसें पेरिलें लाहणें।' –कृमुरा ४२ ५८ 'लाहोनि इच्छेसारिखें फळ।' –मुआदि ३ ७२ ४ धरणें, धैर्य करणें 'परि अपराधु तो आणीक आहे। जें मी गीतार्थु कवळु पाहे। तें अवधारा विनवू लाहें। म्हणऊनिया।' –ज्ञा १ ६६ ५ शेवट होणें, फळ मिळणें; परिणामीं हातीं येणें 'नातरी जैसें तोय। साखर घालिता गुळचट होय। लवण मिळविता पाहे। क्षारत्व लाहे तत्काळ।' [स लभ्; प्रा. लह]

**लाहणी**—स्त्री कापणी [स लापन]

**लाहणी**—स्त्री (उच्चारदोषामुळें) राहणी पहा

**लाहणी**—स्त्री ठाणवाई (दिव्याची)

**लाहयकी**—स्त्री (ना) लाहकी; त्वरा, घाई

**लाहरी, लाहारी**—स्त्री लारी, जुन्या काळचें चार–पाच आणे किंमतीचें एक चांदीचें नाणें साडेतीन मोठ्या लाहरींचा व चार लहान लाहरींचा एक रुपाया होतो 'लाहरी रजतवर्ती' –राज्य २ ८

**लाहलाहात लाहलाहत**—वि लुसलुशीत 'पुढां उपरति रागें लोहिवी। धर्म मोक्षाची शाखा पालवी। लाहलाहात नित्य नवी। वाढतीचि असे।' –ज्ञा १५ १९४ [लाह+लाह]

**लाहवा**—पु लावा पक्षी 'लाहवे राव।' –दावि २४४ [लाव]

लाहा—स्त्री. अतिशय इच्छा. लाह-हो पहा. –भाए ५१४.
लाहाइजणें—क्रि. लाभणें, लाहणें. ' दैवयोगें ब्रह्मवाणि । जरी न लाहाइजेचि श्रवणीं । '–ऋ ३.

लाहा—पु लास; अंगावरील तीळ. ' तम म्हणजे काळिमा । एया लाहासे । जैसें अवयें आग गौर वर्ण परि यणु एक अनदरय । ' –चक्रधर सिद्धांतसूत्रें ३६. [ लास ]

लाहा—पु. नादारी. ' मुंबई, कलकत्ता, मद्रास वगैरे मोठ्या शहरांत लाहा घेण्याचा स्वतंत्र कायदा आहे. ' –घरा ११४.

लाहांकणें—कि. (महानु.) शोक, दु:ख करणें. ' जेवीं अपत्य मातेसीं चुके । तें भंवतें पाहे तेवि भेके । हिंपुटी होउनी लाहाके । जियापरी । ' –ज्ञाप्र ९९७.

लाहाणा—वि. १ लाभदायक. लाहणा पहा. २ लाभ करून घेणारा. ' साधकहि येथ लाहाणा । जो या साधना साधूं जाणे । ' –एभा११.५०७ लाहाणी—स्त्री. प्राप्ति. लाहणी पहा. लाहाणें—न. १ प्रेम, निष्ठा. ' नवल भावार्थाचा महिमा । मज विश्वात्म्याचा झाले आत्मा । ऐसें लाहाणें तया आम्हां । मज पुरुषोत्तमा वश केलें । ' –एभा ११.१५५९. २ ऐक्य ३ प्राप्ति. ' जयां मोक्षाचें लाहाणें । ' –ज्ञाप्र ८९४. –क्रि. प्राप्त होणें. लाहणें पहा. ' लाहोनि उत्तम शरीर । व्यर्थ विषयासक्त नर । ' –एभा २०.१९३.
लाहातें—न प्राप्ति; लाभ. ' जीवा नाहीं कुडीचें लाहातें । चे भिन्नभिन्न पंचभूतें । ' –तुगा ७१३.

लाहान—वि. लहान पहा. लाहानाळणें—क्रि. कमी होणें. ल्हानाळणें पहा. ' अनसें वाढे शरीर । शरीराप्रमाणें विचार । वृद्धपणीं तदनंतर । दोन्ही लहानाळतीं । ' –दा १३ ६ ६; ९.९ ३४.

लाहानवति—कि गाळीव माती; वाळू. तयांची लाहानवती । मळिजे वातपीति । ' –भाए ४०१; १६३.

लहापाहा—वि. (व.) तेजदार; तजेलदार. ' पिकें लाहापाहा दिसतात. ' [ लखपख ]

लाहाबरा—वि (व ) कोणतेंहि काम हावरेपणानें, गडबडीनें करणारा. ' भारी लाहाबरा आहे तो मनुष्य. ' [ हिं ल्हबर ? ]

लाहासी—स्त्री. लास; लासी; राक्षसी. ' लाहासि अविवेचिआ । ' –दाव ४४६.

लाहासें—न. काळिमा. लास, लासें पहा. ' अज्ञानाचें लाहासें जेथ । लागलेचि न दिसे । ' –भाए ५८९.

लाहिरी—स्त्री ( मुंबई ) मिजास [ लहरी ]

लाहिरी—स्त्री चरणी. –वदलापूर १४८.

लाही—स्त्री. १ तांदूळ, मका, जोंधळा इ० भाजून फुलविलेला पदार्थ, दाणा ' काळाननीं द्विट् चमू घातली लाही । ' –मोरा१.३८८, –मध्व ५९५ २ तुरटी, मोरचूद वगैरेपासून वरीलप्रमाणेंच केलेला पदार्थ. ' टांकणखाराचा स्फटिक उष्ण केला म्हणजे त्याची लाही होते. ' –पदाव ११५. सामान्यत: अनेकवचनी (लाह्या) उपयोग. २ हल्ला. ' मोगल व भोसले यांची लाही येऊन मौजे मजकूर दरोबस्त लुटला ' –समा १.७. ३ अतिशय रागामुळें (अंगाची होणारी) तलखी; आग; काहली; दाह इ० [सं. लाजा; हिं. लाई; सं. लाजिका–लाई प्रा–लाया–लाह्या–भाभ १८३२] ०उडणें–क्रि. १ (गोळ्यांची–जरीमरीची–शिव्यांची–पायपोसांची लाही ) भरामर, सपाटयांत भडिमार,वर्षाव होणें. २ ( दाण्याची, आंब्याची इ० ) तडकाफडकी विक्री होणें ०फुटणें–मोठा मारा होऊन नाश होणें. ' भटरा घटका लाही फुटली । ' –ऐपो २१४. ०भाजणें–१ ( अंगाची ) गदमदणें; उबगणें. २ (उन्हाची) कडकडीत ऊन असणें; उन्हाच्या झळा येणें, लागणें. ०होऊन जाणें–संतापणें. ०लाही होणें–रागानें अंगाची आग होणें. ' हा अत्याचार पाहून सारखी लाही–लाही होत होती. '–स्वप १४५. ०पीठ–न. लाह्यांचें पीठ (जोंधळ्याच्या ) ०सांडगे–पुअव. कोहळे सोलून किसल्यावर त्यांत मीठमसाला घालून लांबट आकाराचे गोळे करून वाळवितात व तळून उपयोगांत आणतात. –गृशि ३६९. लाहाचा मान–लग्नसमारंभांत लाजाहोमानंतर वरपक्षाकडून वधूपक्षाकडील लाह्या घालणाराला नारळ पागोटें वगैरेचा केलेला आहेर.

लाहु–हू—पु लाहो पहा. ' पुढें गुण काय विसरावे आपखी भेटु नेत्र घेति लाहु । ' –सला ७९.

लाहूर—नपु लावापक्षी [ सं. शावक ]

लाहेंलाहें—क्रिवि. त्वरेनें, लगबगीनें. ' लाहेंलाह तातडी । पुढती पंखी बैसावया ' –हवि ३४.८४. [ लहालहा ]

लाहो—पु. १ छंद; नाद; हव्यास. ' राम राम स्मरा आधीं । लाहो करा गांठ घाला मूळबंदी ' –तुगा ३४४२. २ अत्यंत लोभ; हावरेपणा; अतृप्तता. ( क्रि० घेणें ). ' भुल्ला भक्तिभावें । लाहो घेतला देहीं । ' –भज ७५. ३ प्राप्ति; फायदा; लाभ. ' प्रपंच साधुनि परमार्थाचा लाहो ज्यानें केला । तो भलाभला । '. ' अश्रु नीर पुशि, दे सुख–लाहो । ' –वामन भरतभाव ६९. ४ टाहो; हट; सारखा आक्रोश. ' शोकातही घे प्रभुनाम लाहो । ' –वामन, भरतभाव ३०. [ सं लाभ; प्रा. लाह ]

लाहो—पु त्वरा, घाई, जलदी. ' ऐसें वरचिलीचि बरवा । मुख जावों लागले कावा । तंव रसस्वादाचिया हावा । लाहो केला । ' –ज्ञा ७.१९१.

लाहोजाळ—पु लोखंडी शस्त्रें. ' लवलवीत लाहोजाळ ' । –उषा ४८. [ सं. लोह+जाल ? ]

लाहोटा—पु १ फार लोभीपणा, हावरेपणा. २ उत्कट इच्छा, आकांक्षा. ( क्रि० घेणें ) [ लाहो ]

लाहोरी—वि लाहोरचा ( गायण, सातु ) [ लाहोर ]

लाहोर—स्त्री. एक वर्षाची शेळी. लाव्हर पहा.

लाह्य, लाह्यलाह्य—क्रिवि स्त्री लह्यलह्य पहा

लाह्यफी—स्त्री (व ना) पाई त्वरा लाहकी पहा

लाह्या—स्त्रीअव मुलींचा एक खेळ –मखेपु ३००

लाह्लाणें—क्रि तळमळणें, लाहालाहा करणें 'येऊनि अज्ञानें ग्रसिए। आर्ती लाह्याति जिथें।'–ऋ २ [ल्हा]

लाळ—स्त्री १ काटयाचे बारीक टोंक, कूस तूस(धान्याचें) (क्रि० शिरणें, राहणें, काढणें) २ विंचवाच्या नांगीचें टोंक

लाळ—स्त्री १ मुखरस, तोंडाला सुटणारें पाणी, खाण्याचा पदार्थ तोंडात घालून चर्वण करीत असता तो घशाखालीं उतर ण्यासाठीं व पचनास मदत होण्यासाठीं मिश्रणाचा स्वाभाविक पातळ पदार्थ २ जनावराना होणारा एक रोग याचेमुळें त्याच्या तोंडातून लाळ किंवा पाणी गळतें व कित्येक वेळा त्याच्या खुरा मून पाणी वाहू लागून ते सडू लागतात (क्रि० येणें, जाणें) [स लाला] (वाप्र) ०उठणें–तोंडास पाणी सुटणें 'परी अमृताही उठी लाळ।'–अमृ १० २० ०गळणें–(ल) दृढ स्नेह मैत्री असणें 'काय त्या दोघाची लाळ गळती' ०गाळणें–अतोनात किंवा फाजील स्तुति करणें 'राजाच्या पदरीं लाळ गाळणारे पुष्कळ असतात' ०घोटणें–१ तोंडाला पाणी सुटणें, अभिलाष धरणें 'देखुनी तुझें रूप वेडावले भूप। अतरीं घोटिती लाळा'–मव्व ३४,–द ३४७ २ लांगूलचालन करणें 'विश्वा मित्रानें मेनकेपुढें लाळ घोटावी?'–गारु ३ ४७ लाळेनें चणे भिजवून खाणें–(आपल्याच लाळेनें चणे भिजवून खाणें) मिळावयाचा अगर मिळणार अशी खात्री असलेला योग्य मान वगैरे तो मिळाला नसताहि पुढें भयाप मिळेल अशा आशेवर स्वत चें समाधान मानून घेणें, दुसऱ्यानें न केला तरी स्वतःच स्वत चा गौरव करून घेणें लाळणें–अक्रि १ लाळ गाळणें, लाळ पाडणें २ लाळ गळण्याच्या विकारानें युक्त होणें लाळी, लाळेरें–स्त्रीन लहान मुलाच्या तोंडातून गळणारी लाळ धर ण्यासाठीं गळयात अडकविलेला कापडाचा अगर रबराचा तुकडा लाळें–न जनावरास होणारा एक रोग लाळ्यो–पु (कों) सारखी लाळ गाळणारा मनुष्य

लाळणें, लाळवणें—क्रि लाड करणें 'तू पिता जालासी। कुन लाळऊनी कहीं न बोलाविसी।'–शिशु १०२,–ज्ञा २ ३५० [स लल्]

लाळणें—अक्रि लवलव करणें (जीभ), बाहेर लोळणें, लोंबणें 'होती मस्तक जिव्हा लाळी।'–दा १ २ ८८ जिव्हा लाळी वळा वळा। भयानक।'–दा ३ १० ५

लाळें—न घोडयाच्या सरोसरीस किंवा म्होरकीस खालच्या बाजूस एक अवयव असतो ज्यास जेरबद किंवा दवासन बाधितात तें.

लाळेमुळे—पुअव एक प्रकारचे मासे –प्राणिमो ८१.

लाक्षणिक—वि १ लक्षणेनें जाणावयाचा जो अर्थ तो, लक्षणासबधी २ साकेतिक, सांज्ञिक ३ वैशिष्ट्यबोधक, दिग्दर्शक, ज्ञापक 'ज्याप्रमाणें आल्होदोलान हैमा हा समूह लाक्षणिक असतो तसा आलिङ्हाडात काईआ हा असतो '–सेंपु ३ ४ अलकारिक, औपचारिक ५ अप्रत्यक्ष, गौण [स] लाक्षण्य–वि. लक्षणानीं, गुणधर्मांच्या योगानें ओळखता येणारे [स.]

लाक्षा—स्त्री लाख [स] ०जोहर–न लाखेच्या घराचें जळणें, लाक्षागृहदहन (पाडवांना जाळण्यासाठीं कौरवानीं केलेलें). 'पाडव निमाले लाक्षा जोहरीं।' लाखाजोहर पहा ०तेल–न लाखेपासुन काढलेलें तेल (औषधोपयोगी)

लाक्षायणा—स्त्री एक तीर्थाचें स्थान 'लक्षतीर्थें जेथें मज्जना सर्वदा। लाक्षायणी सदा वास तेथें।'–व २.५

लाक्षारस—पु. दहाभाग लोध्र, त्याच्या दहाव्या हिश्शानें सज्जीखार, थोडी बोरीचीं पानें व सोळापट पाणी घालून केलेला काढा –योग १ १८९ [स]

लि॥—(सक्षेप) लिहिलें, लिखित

लिंइ(ही),न—क्रिवि (खा मिळी) घेऊन 'हाकाल लकडी लिईन आवजा'–भिरः

लिंक—स्त्री साखळीची एक कडी, एक इग्रजी रेषापरिमाण, एका साखळीचा शतांश, ७ ९२ इंच [इ लिंक=साखळीचा दुवा]

लिकचोरी—स्त्री चोरून केलेलें काम, गौप्य लिका(की) चोरी–स्त्री चोरून काम करण्याची पद्धत लिकचोरी पहा [लिकणें+चोरी] लिकून चोरून–क्रिवि लपूनछपून, चोरून मारून, गुप्तपणें, लबाडीनें, दडून [लिकणें+चोरणें] लिकीर–वि (कों) लबाड, गुप्तपणें काम करणारा, खोल वृत्तीचा, एखाद्या कामात आपलें अग असताना नाहीं असें दाखविणारा [लिकणें]

लिकटणें—अक्रि चिकटणें, चिकटून राहणें

लिकडाव—पु (कों) लपडाव [लिकणें+डाव]

लिकडें, लिकडेंमिकडें—लिखडें, लिखडेंमिखडें इ० पहा

लिकण—स्त्री लपून बसण्याची जागा, दडण्याची जागा, दडी, आडोशाची जागा [लिकणें=लपणें, हिं] लिकणें–अक्रि लपणें, दडणें, छपणें [स लुप्? हिं लुकना, प्रा लुक]

लिकलिकणें—अक्रि लुकलुकणें, मद प्रकाशानें चमकणें, मध्येंमध्येंच एकदम चमकणें, (बारीक पदार्थ) थाबून थाबून प्रकाशित होणें, (लकलकणें व लिकलिकणें या दोन शब्दाच्या अर्थात थोडा भेद आहे) [ध्व, किंवा स लोक्] लिकलिकी–स्त्री. मरणवेळचा किंवा आजारपणातील डोळयातील निस्तेजपणा, मिचमिचीतपणा, फिकटपणा, मालवत्या दिव्याचा अंधुक उजेड, किंचित् चकाकी, चमक, लुकलुकी (क्रि० राहणें, होणें, करणें,

दिसणें ) ( लिकलिकी आणि लकलकी याच्यात भिन्नता आहे वेटिल्याचा अर्थ चमक किंवा अंधुक तेज असा आहे व दुस ऱ्याचा स्पष्ट प्रकाश, झगझगीत उजेड, डोळे दिपवून टाकणारा प्रखर प्रकाश असा आहे ) -री विलविलीत, पोरी उपटलेली 'माडीवरील मडक्यीपर्शी एक कमळ टिडकी टिकलिकी करून खाली पोही ' -नि ३४५ लिकलिकीत-वि चमकणारा, लुक लुकणारा; चकचकीत मध्येच चमकणारा, थांबून थांबून प्रकाश णारा; चंचल प्रकाशयुक्त अधुक प्रकाशाचा, जात आलेल्या तेजाचा

लिकपणें—सक्रि स्पर्शिणें

लिका—स्त्रीअव ( कु ) लिखा, उवाची अंडीं

लिखडें—न लहान आकाराचा दागिना, धारिक दागिना मिखडें-न विडूकमिडूक, बारीकसारीक दागिना ( -अव ) लिखडीं मिखडीं.

लिखणें—सक्रि ( काव्य ग्राम ) लिहिणें [ स लिख्, हिं लिखना ] लिखन-न १ लिहिणें, लेखन २ लिहिलेला कागद लिखाण, लिहिलेलें पुस्तक [ सं ] लिखा-पु १ लेख, दस्त ऐवज २ हिशेबाच्या, नोंदीच्या ( वह्या ) 'यजमानकृत्याच्या लिख्यांच्या व नामावळीच्या वह्या त्रिकूट सरकाराने नेल्या आहेत ' -वाडथमा ३ ६४ म्ह० एक लिखा हजार बका ( बखा हें रूप बका 'बक' चे अनेकवचन आहे यमक साधण्यासाठीं क चा ख झाला ) लिखाई-स्त्री १ लिहिणावळ, लिहिण्याबद्दल याव (ण्याचें मोल २ लेखन, लिहिणें ३ हस्ताक्षर, अक्षर; लेख लिखाण-न लेख लिहिणें; लेखन; हस्ताक्षर, पत्र लिखापटी-स्त्री ( खा ) वारंवार पडणारा पत्रव्यवहाराचा त्रास लिखा -पढा-पुसा-पु १ कायद्याचे, फिर्यादीचे, सरकारी कामाचे कागद २ दस्तऐवज, लेख, सनद, लेखपत्र ३ ( सामा ) कोण ताहि लेख, लिखाण -वि सुशिक्षित [ हिं लिखना+पढना ] लिखापढी-स्त्री लेखी व्यवहार, कागदावर लिहिलें जाणें, निश्चित होणें ( क्रि० करणें ) लिखावट-स्त्री लिखाई, लेख लिहिणें, लिपी लिखित-न पत्र, चिट्ठी, लेख ( हातानीं लिहि लेला ) ' लिखित पाठविलें सकळ नृपा कैसें । ' -र ११२ -वि १ लिहिलेलें २ काढलेलें आखलेलें, रखाटलेलें; चित्रित [ स ] लिखितार्थ-पु पत्रीं लिहिलेला मजकूर; एखाद्या पत्राचा, लेखाचा अर्थ-साराश-उद्देश इ० लिखें-न लिखाण लेखन ' वसोन समाप्त लिखें करी । ' -दावि २५१ [ स लिख्=लिहिणें ]

लिखा—स्त्रीअव उवेचीं अंडीं (-एव ) लीख [ स लिक्षा, प्रा लिक्खा ] लिखी-स्त्री लिखा काढण्याची लाकडी फणी

लिखो-स्त्री ( कु ) उवा

लिख्या—वि बारीक लहान ( डोळा ) [ स लिक्ष्या-खसखस ]

लिंग—न १ पुरुषाचें जननेंद्रिय, शिश्न २ ( व्याकरण स्त्रीपुरुषत्वभेद, पुल्लिंग, स्त्रीलिंग आणि नपुंसकलिंग अशीं तीन लिंगें व्याकरणात आहेत ३ शंकराची विशिष्ट प्रतिमा; ईश्वर प्रतिमा, शंकर, शिवलिंग ' दुर्दैम बाळासि जगा त्याचा विश्व नायक लिंग । ' -मोभीष्म ३ ३७ ४ आराध्यदैवत ' तव वैकुंठ पिठींचें लिंग । जो निगमपद्माचा पराग । जिये जयाचेनि हें जग । अंगच्छाया । ' -ज्ञा १५ ४६ ५ लिंगाईत , लोकांच्या नावा पुढील प्रतिष्ठावाचक शब्द उदा० सदलिंग, दादलिंग ६ लिंगा ईत लोक गळ्यात बाधतात तो शिवस्वरूप दगड ७ गुण, चिन्ह, लक्षण, स्वरूपबोधक चिन्ह ' आतां शांतीचें जी लिंग । तें व्यक्त मज सांग । ' -ज्ञा १६ १३६ ८ ( सांख्य मता प्रमाणें ) प्रकृति, सृष्टीतील चिच्छक्ति ९ ( ल ) अडचण, उपाधि, ज्याच्या योगानें मनुष्य बांधला जातो-त्याची स्वतंत्रता जाते-अशी गोष्ट, अडचण, त्रास ( क्रि० लागणें, अडकणें, असणें ) [ सं लिग्=चालणें, हालणें] लिंगविभक्ति संभाळून बोलणें-व्याकरणशुद्ध बोलणें ०देह-शरीर-पुन सूक्ष्म देह, वासनात्मक शरीर मन बुद्धि, दशेंद्रियें व पंचप्राण इतक्या सतरा तत्त्वांचा हा देह असतो ' आविद्या लिंगशरीराचा भगु । चुके निरयस्वर्गांचा मार्गु । स्वमार्गेंचि । ' ०भद्र-न कीर्तिमुखादि विशिष्ट आकृति, यत्न ' चोरविजति लिंगभद्रें । नवीं नवीं । ' -ऋ ७८ ०भेद-पु १ सूक्ष्मदेहभेद; लिंगदेहाचा भेद २ पुनर्जन्माचा उच्छेद ' हें गुज नव्हे प्रमादु । एथ प्रवर्तलिया दिसतसे बाधु । हा उपजा लिंग भेदु । बोलवरा आम्हा । ' -ज्ञा २ ३१ ३ वैषम्य, विषमता फरक; भेद ' तेथ मी नमस्कारा । लागि उरों दुसरा । तरी लिंग भेद पऱ्हा । जोडू जावों । ' -अमृ १ ५१ ०भेद विशिष्ट आक र्षण-न भिन्न लिंगाच्या माणसाचें परस्पराकडे आकर्षण ' आता पुस्तकें वाचून लिंगभेदविशिष्ट आकर्षण असें मी म्हणेन ' -सुदे १०१ ( इ ) सेक्स्युअल अॅट्रॅक्शन् ०वंत, लिंगायत-पु शिवाचे उपासक हा एक पंथ आहे या पंथाचे लोक गळ्यात लिंग घालतात ०व्रण-पु लिंगक्षत, शिश्नाला पडणारे चट्टे ०शरीर-न लिंगदेह सूक्ष्मशरीर याच्या उलट स्थूलशरीर लिंगाड-वि ( निंद्य ) लिंगाची पूजा करणारा, लिंगाईत लिंगडा-वि ( वों ) चेंगट्या, धिमा यड, मदगति आळशट काम करण्यात मंद लिंगडता( ड्या )ई लिंगिस्ताई-स्त्री ( वों ) मदपणा, आळशीपणा, कोणत्याहि कामातील धडपणा धिम्मेपणा लिंग डणें-अक्रि ( अडथळा अडचण इ० ) चिकटणें, दिलगणें, न निघे असें चिकटणें लिंगाईत-लिंगवंत पहा लिंगाध्यास-पु वासना तादात्म्य लिंगायत पु लिंगाईत लिंगवंत लिंग्या-पु (निंद्य) लिंगाईत, लिंगडा ' पथ क्रमति नित्य बरोबर लिंग्या घेउनी । ' -प्रला ३३

लेढ—न. (व.) १ रेत; वीर्य. २ एक शिवी. ०पाडणें—सक्त मेहनत करून घेणें. 'खूप लेढ पाडले त्यानें तेव्हां इतके पैसे दिले.'

लेंढार—न. टोळी, समुदाय; कळप. लेंढार पहा. 'हाक देती येक वेळे। सहस्रार्जुन पारधी खेळे। मग लेंढारें निघालें। सकळ सैन्य।' –कालिका २२.२०. [हिं. लेंढा]

लेण—स्त्री. रेघ; ओळ; रेषा. [इं. लाईन.]

लेणदेण—स्त्रीन. देणेंघेणें; देवघेव; देण्याघेण्याचा व्यवहार. [म. लेणें+ देणें, गु.]

लेणारत—न. ब्राह्मणांत बोडणाचे वेळीं करण्यांत येणारें कणकेचें पाटयाच्या आकाराचें सिंहासन व वरवंटयाच्या आकाराचा लोड. –बदलापूर २११.

लेणें, लेइणें—सक्रि. १ डोळ्यांत (काजळ) घालणें; कपाळावर (कुंकू) लावणें; अंगावर यथास्थानीं (दागिने) घालणें; धारण करणें. 'पौष्य भूपाळ पत्नी । दिव्य कुंडलें लेइली कर्णी।' –सुभादि २.८५. २ (काव्य.) (वस्त्र) नेसणें, परिधान करणें; धारण करणें. 'वस्त्रें सुंदर भूषणें उभयतां लेती नवीं नित्यहो।' –उमाविलास पृ. ६. भूतकाळीं ह्या क्रियापदाचा कर्तरिप्रयोग होतो. उदा० पीतांबर परिधान। लेइली अलंकार भूषण।' –एरुस्व ५.२०. ३ घेणें. लेणार-रा-पु. धारण करणारा; घालणारा. 'कृष्ण असे गोरसचोर। महाकपटी अकर्मी जार। हाच काय मणि लेणार। जाहला थोर अवघ्यांत ।' –ह २९.२८. लेता-पु धारण करणारा; लेणार पहा. लेणें-न. १ शरीराला शोभा देणारा कोणताहि पदार्थ-दागिना, कुंकु, काजळ इ० 'मग रायें तया लेणियाचें वृत्त पुसिलें।' –पंच १.३५. २ चैत्र महिन्यांत गौरीच्या उत्सवात भिंतीवर गोपुर इ०चें जें चित्र काढतात तें; मंगळागौरीच्या वेळीं देवीला वाहण्याचे कणिकेचे अलंकार. ३ पाडवहल्य; डोंगर पोखरून त्यांत सभामंडप, देवादिकांच्या मूर्ती इ० कोरून तयार केलेली गुहा; कोरीव लेणें. उदा. कार्ल्याचें लेणें, वेरूळचें लेणें [सं. लेपन-लयण-लेणें किंवा लेपन-लेवन लेणें; रत्न-लयन-लेणें, प्रा. लेण] लेणेंपण-न. अलंकारदशा अवस्था. 'मुकुटकुंडलें कर्कंकणें। न घडितां सोनें सोनेंपण। त्याचीं करितां नाना भूषणें। लेणेंपणें उणें नव्हेचि हेम।' –एभा २८.२६३.

लेधडणें—सक्रि. शेण, माती, खरकटें इ०नीं (भाडें, अंग इ०) माखणें, लिप्त करणें; चोपडणें, लिडबिडणें. [सं. लिप्] लेधडणी-स्त्री लेप, माखण, चोपडण, लिडबिडाट.

लेप—पु खाडीमध्यें सांपडणाऱ्या काळया पाठीचा व पांढऱ्या पोटाचा एका जातीचा मासा.

लेप—पु. १ सारवण माखण. २ अंगाला लावण्याची चंदन इ०ची उटी. ३ चुना, चिखल इ०चा भिंत इ०वर केलेला गिलावा. ४ भिंत इ०वरील रंगानें किंवा चुना इ०नीं काढलेलें किंवा लिपलेलें चित्र. 'निर्जीव लेपें हार गिळिला।' –दानि ३६५. 'लेपाचां देउळीं न बैसावें।' –सूत्रपाठ ४०. ५ भात, भाजी इ०चा हात, भाडें इ०ना चिकटून राहिलेला अंश; खरकटें. ६ बाधा; दोष; विटाळ; मळ; बाह्यात्काराची संलग्नता. 'जेथ न संचरे पुण्यपाप। जें सूक्ष्म अति निष्कंप। गुणत्रयादि लेप। न लगति जेथ।' –ज्ञा २.२३६. ७ रंग; वरचा रंग; मुलामा. 'तें आनंदचित्रींचे लेप।' –ज्ञा ६.२५६. ८ ओढा; सारवण; ओढा घालण्याचें द्रव्य, दुखणारें किंवा ठणकणारें गात्र इ०वर झाडाचीं पानें इ०चा बांधण्याचा टेंचा. [सं. लिप् = लिपणें; लावणें] लेपटणें, लेपणें–सक्रि. १ लेप देणें; माखणें, ओढा घालणें. २ लिंपणें; लिंपून आकृति तयार करणें. 'तेथें हंसमयूर कोरिला। नाना प्रकारचे लेपिले।' –शनि १३२. ३ एखाद्या पदार्थाचा दुसऱ्यास लेप लागणें; दोष लागणें; स्पर्श होणें. 'विहिन भंगाचा कर्दम। तुज लेपला नाहीं मीं।' –मुसभा ३.४. लेपन-न. १ ओढा घालणें; लिंपणें; लेप देणें. २ लेप देण्याचा पदार्थ. लेपवणी–न. १ खरकटीं भांडीं, हात इ० धुतलेलें अन्नांशयुक्त पाणी. २ (कु.) गुरांना द्यावयाचें पाणी; पेज वगैरे मिश्रित कदान्न. लेपवळ–न. (राजा) खरकटें; जेवण झाल्यानंतर ताटांत राहिलेले अन्नाचे अवशेष; खरकटयाचा पसारा. लेपाटा–पु औषध, चिखल इ०चा वेडावाकडा व जाडा लेप, ओढा (क्रि० लावणें; देणें). लेपाळणें–सक्रि. लेप लावणें, माखणें. लेपाळा–पु भांडीं, हात इ०वर तेल, तूप इ०चा जमलेला थर (क्रि० बसणें; लागणें; जमणें, दाटणें). –वि. १ लेप देण्यास योग्य; लिंपण्याजोगा, लेप देण्यास जरूर असलेला. लेप्य–न चित्र. 'ऐसें सप्तरंग भरोनि जाण। लेप्य काढिलें चितारियानें।' –कथासारामृत ७ ४२. –वि. लिंपलेला, लिंपून तयार केलेला. 'लेप्या लेख्या ज्या मूर्ति जाण। त्यासि करावे ना स्नान। इतरां मूर्तीसि स्नपन। यथाविधान करावें।' –एभा २७.१२२.

ले(लें)प—पुन. आथरण्यापांघरण्याच्या उपयोगी असें कापूस भरून केलेलें वस्त्र, रजई; दुलई. ले(लें)पडी–स्त्री. बसण्याची किंवा आथरावयाची दुलई, आथरण्याची लहान गादी. लेपडीची टोपी–स्त्री. लेपाची खोळ. (चहादाणीतील चहा थंड होऊं नये म्हणून त्यावर घालण्याची) ले(लें)पड–न. हलक्या जातीचा लेप, बारीकसा व बाईट असा लेप.

लेपसट—वि (ना) लेचापेचा; शिळपट; क्षीण.

लेपाटी—स्त्री. विशिष्ट प्रकारचें नळकांडें; ठाकर लोकांचें पांखराच्या शिकारीचें एक साधन. –बदलापूर १७६.

लेफ—नपु एक प्रकारचा मासा. लेप पहा.

लेफडा—पु ( कों ) सारवणाचा पट्टा किंवा रेघ, वांकडा तिकडा पट्टा 'सुरेल चागलें कपाळीं गंध लावणें तो लेफडा काय लावला आहेस ?' [लेप]

लेरक—पु ( व ) पुत्र, मुलगा

लेंरटा—वि ( गो ) आशाखोर

लेव(भ)डा, ले(लें)भळा—वि १ नेभळा,' ( पोशाखात, वागणुकीत ), दुर्बळ, नेभळट २ अस्ताव्यस्त, अव्यवस्थित, घाणेरडा ( मनुष्य, पोशाख ) ( लेभडा शब्द फक्त घाणेरडा या अर्थानेंच योजतात )

लेंमड—स्त्री ( कों ) रोडकेपणा, कृशता, क्षीणता, बारीकपणा, अशक्तपणा लेंमडणें, लेंमणें-अक्रि ( कों ) १ क्षीण होणें, रोडावणें, वाळणें २ ( आजार उपवास अगर श्रम यांनीं ) गळून जाणें, दमणें, खपणें, अशक्त होणें

लेभागू—वि उचल्या, एखादी वस्तु घेऊन पळणारा [ हिं लेना+भागना ]

लेभाशा, लेंभाळद्या—वि ( वना ) नेभळट, पुळचट, मुखकामाचा, अशक्त 'लेभाशा माणूस शेतकीच्या काय कामाचा ?'

लेभें—न वाद, तंटा, भोंगड, खग्लें, लडथड, लढा, खरकटें

लेलाम, लेलाव—न लिलाव पहा ०दार-पु लिलाव बोलणारा, पुकारणारा

लेलिहमुद्रा—स्त्री चौसष्ट हजार तंत्रमुद्रांपैकीं एक ही मुद्रा अशी – उजवा तळहात डाव्या उलट्या हातावर धरावा व बोटें नागाच्या जबड्याच्या उघडमिटीप्रमाणें खालींवर करावीं

लेलूत—स्त्री व्यसन आणणें व परत न करणें [ सिं ]

लेलेमजनू—पु गरीब, कींव करण्यास योग्य, भितरामाणूस लेले मजूर-पु ( व ) अशक्तपणामुळें काम करण्यास असमर्थ मनुष्य 'आपण पाहिजे तर लेलेमजूर, दुसऱ्यावर अवलंबून ' [ लैलामजनून या प्रेमी जोडप्याचें जें शिमग्यात सोंग आणतात त्यात याचें उच्च प्रेम न दाखविता काहीं तरी विकृत स्वरूपात अत्यंत पोळपट असा मजनू दाखविला जातो यावरून रूढ ]

लेवचें, लेवप—क्रि ( गो ) चाटणें लेंवटो पु ( गो ) हात चाटणारा, भाडें चाटणारा

लेवट—न ( कों ) मैथुनार्थ संयुक्त झालेलें जोडपें

लेवट—पु ( राजा ) भाजावळीकरता गोवरी, कवळ, जाड गवत इ० पसरल्यानंतर त्यावर जें फार बारीक गवत किंवा भाताणाचा चुरा पसरतात तो [ लेवा ]

लेवट—नपु जाड व मजबूत असा कापसाचा पदार्थ [ लेप ]

लेवटावच—क्रि ( गो ) देतों म्हणून न देणें

लेवणा णू—वि ( नरभाषा ) तीनचतुर्थांश, पाऊण शको. १ ४१

लेवणें—न ( कों ) लेवट पहा भाजावळी करता कवळावर घालावयाचें बारीक गवत –सक्रि भाजावळीकरता कवळावर गवत, भाटक्या इ० पसरणें लेवणी-स्त्री कवळावर गवत, काटक्या, माती इ० टाकण्याची क्रिया

लेवदेव, लेवादेवा, लेवादेवी—स्त्रीपु स्त्री देवघेव, व्यवहार, व्यापार धंदा, उदीम, घेणें देणें [ लेंवदेवणें, गु ]

लेवविणें—सक्रि चढविणें, घालणें, धारण करविणें 'लेवविलीं पाचपुटी आंगीं । ' –शिशु ९१ [ सं लेपन ]

लेवा—पु. लेप, लेपन, गिलावा, पुट, लिंपण. 'जैसे लेवे दिधेले तमा । काजळाचे। ' –ज्ञा १६ ३९० [ लेप ]

लेवाडा-ड्या—वि कृश दिसत नसता तितकी शक्ति नसलेला, मजबूत बांध्याचा नसल्यामुळें अशक्त, कमजोर, ढिला

लेश—पु १ अल्प अंश, सूक्ष्म भाग, कण. 'जें जें अत्यंत सुंदर दिसे । तें तें कृष्णाचेनी लेशें । ' –एरुस्व १ ७० २ दाघ, अवशिष्ट भाग 'करी तेथें भस्म लेशु । ' –अमृ ३ २६

लेश-स—वि एखादें काम करण्यास तयार, तत्पर, हुषार

लेश(स)पंड, लेसट—न त्रासदायक होणारी अनिश्चित गोष्ट, घोंटाळयात पाडणारी गोष्ट, त्रास, अडचण, लचाड, लिगाड लासा पहा.

लेषावळी—स्त्री लेखावळी, मोजदाद, गणती 'नृपती नाहीं लेषावळी । ' –उषा ८ ७१ [ लेख+आवली ]

लेस—वि तयार, उत्कृष्ट सामान वगैरे भरपूर तयारीनें असलेला, लेशमात्रहि न्यूनता नाहीं अशा तयारीचा 'छऱ्याच्या थैल्या लेस करून ठेविल्या आहत ' –ख ४३०९

लेस—स्त्री १ किनार, फीत जाळीदार फीत, जोडावयाचे काठ, बुटाचे बंद २ ( चांभारी ) गिरणींतील तुटलेला पट्टा शिवण्याकरिता काढलेलें सल [ इं ] ०दार-वि लेस लाविलेला, जाळीदार फीत जोडलेला 'अंगात लेसदार ब्लाऊज असून. ' –हाकाध १०७

लेंस—पु ( गो ) हातरुमाल

लेसट—न १ ( भांड्याला अगर हाताला ) चिकटून राहिलेला तेल, तूप इ० पदार्थाचा अंश २ अपूर्णता, उणेपणा, कमीपणा कमतरता ( इ० अर्धा कारभार, व्यवहार, काम, बोलणें इ० शब्दाना जोडून योजतात ) ३ लेशपड पहा

लेसन—न धडा, शिकविण्याचा पाठ 'याचें वीतभर लेसन तर त्याचें हातभर. ' –ब्रावि १७१ [ इं ]

लेसन लैसन—न परवाना, परवानगी, मंजुरी [ इं लायसेन्स ]

लेसा—क्रिवि तयारीनें, चांगल्या रीतीनें, जपून 'मग प्रमेयाचिया गावा। लेसा जाइज। ' –ज्ञा ७ २०९ [ लेस ]

लेसाटा—वि शेलाटा, पाटदुळा, ढगळा, उंच व बारीक
लेह—पु चाटण, चाटून खाण्याचा पदार्थ, औषध, अवलेह 'लेहें पेयें चोखें खाद्यें चतुर्विधें अन्नें वऱ्हाडीयां ओगरलीं ।' –धवळेउ ३८. [स लिह्=चाटणें] लेहन–न १ चाटण्याची क्रिया २ (नृत्य) जिभेनें ओंठ चाटणें, दुसऱ्याच्या नजरेस न पडण्यासारखी गोष्ट दुसऱ्यानें पाहणें, मुगीचें लागणें ह्या गोष्टी हा अभिनय दाखवितो लेह्य–वि चाटण्यासारखें, चाटून खाण्यास योग्य, चाटून खावयाचें (औषध इ०)
लेहुडा—वि (ना) खादाड, चगवलेला, खादाडमावसा.
लेहणें—सकि (काव्य) लिहिणें 'लेहोनि पत्रा लिखिलें प्रतापीं।' –अकक २ गजगौरीव्रत ३३
लेहाला—अ म्हणून, सबब, यासाठीं [अर लिहाजा]
लेडूपेडू—वि (व) ढुल्ला, पागळा 'शापेनें लेडूपेडू झाला'
लै—वि (अशिष्ट) ल्य, पुष्कळ, भरमसाट, अतिशय ल्य पहा. लैलूट–स्त्री विपुलता, ल्यलूट, अति समृद्धि –वि क्रिवि विपुल, अतिशय, पुष्कळ 'बटाट्याचें पीक लैलूट करण्यास कोणत्या पदार्थांनीं परिश्रम कळले असतात! '–माझीपण हीच गत १५
लैसा—वि मोठा 'मी एक पंडित मी एक वैदिक। मी एक ज्ञानी लैसा।'–अमृत १२० [ल्यसा]
लो—पु (काव्य) लय, नाद, छंद; व्यसन 'पुढें लो लागला खेळाचा।'–दा ३ २ २२ [लय]
लो—स्त्री १ लव, शरीरावरील बारीक बारीक केंस २ लोंकर; जनावराच्या अंगावरील केंस [स लव, लोम]
लोइली—स्त्री विशिष्ट प्रकारचा, मलवताचा लहान नांगर, लोयली पहा
लोई—स्त्री (व) पाघरावयाची धावळी, पांघरूण [लव हिं]
लोक—शअ (व ना) पर्यंत, पावेतों 'तू तेथलोक चाल' स्टेशनलोक जाऊन आणें अतालोक=आतापर्यंत [लग, हिं लों, लौं=पर्यंत]
लोक—पु १ जन मनुष्य मानवजात, जनता, समाज 'तू मात्र शहाणा लोक काय वेडे आहेत?' (सामा) लोक मर्यादा–रीति–लज्जा इ० (बहुधा अनेकवचनी प्रयोग) २ वर्ग, विशिष्ट समाज, संघ, जात, (या अर्थी पूर्वशब्दाशीं समास होऊन उपयोग) उदा० ब्राह्मणलोक शूद्रलोक मवाल्लोक शिपाईलोक, देवलोक, पिशाचलोक इ० ३ राष्ट्र, देश, राज्य, प्रांत 'प्रौढ होतं सपूर्ण लोक आल खरव उदयाला।'–ऐपो ३०४ –एभा १० ६०४ ४ राजे सरदार इ०काजवळ फिरा, शहर इ०चें रक्षण करण्याकरता ठेवलेली माणसें, सैन्य; सत्री, शिपाईनोकर ५ भुवन; जग, मानवजात, समूह 'देहक्रिया आरघी। न कविता होय बरवी। जैसा न चन्द्रेविरही। लाउ चाले।'–ज्ञा ८ १८७. ६ परका माणूस; तिऱ्हाईत इसम, अनोळखी मनुष्य 'आज आपल्याकडे लोक आले आहेत.' ७ मनुष्य, इसम, माणूस 'जो दाखवीत मऊशा कृपणार्जुन लो न लोक सामान्य।'–मोकर्ण २६ १८ ८ जगाचे, विश्वाचे भाग प्रामुख्यानें तीन लोक आहेत स्वर्गलोक, मर्त्य किंवा मृत्युलोक, आणि पाताळलोक पुढील सप्तलोकहि मानण्यांत येतात भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक, सत्यलोक याशिवाय प्रत्येक देवतेचा एकेक लोक कल्पिलेला आहे उदा० इंद्रलोक, चंद्रलोक, ब्रह्मलोक, विष्णुलोक इ० 'जे लोकांचीय व्यवस्था न पडे। जें या त्रिभुवनाचें कांहीं न माडे।'–ज्ञा १०.९५ ९ सद्गति, स्वर्गलोक, मरणोत्तर चांगली अवस्था 'मनुवंशीं जन्मुनिया जालों अनपत्य मी न लोक मला।'–मोमत्नरामायण बालकांड २० १० प्रदेश, ठिकाण 'अवघड स्थळीं कठीण लोक। तेथें राहणें नेमक।'–दा १५ २ २४ [स] म्हण० १ लोकां सांगे ब्रह्मज्ञान आपण कोरडे पाषाण =लोकांना उपदेश करावयाचा व स्वत मात्र त्याप्रमाणें वागावयाचें नाहीं २ लोक आणि शोक =लोकमत हें अतिशय वाईट, तिरस्करणीय, शोकाप्रमाणें त्याज्य असें आहे, या अर्थी उपयोग लोकांचीं घरें (किंवा दारें) पुजणें–सारखें लोकांच्या घरीं जाणें, या घरातून त्या घरांत असें नेहमीं लोकांकडे जाणें सामाशब्द– ०कथा–स्त्री १ दंतकथा, लोकांत प्रचलित असलेली परंतु ऐतिहासिक आधार नसलेली गोष्ट, कल्पित गोष्ट, परंपरागत गोष्ट २ एक प्रकारचें वाङ्मय प्राचीन काळापासून लोकांच्या तोंडीं असलेल्या गोष्टी, कहाण्या; लौकिक सारस्वत, (इं) फोक्लोअर ०गंगा–स्त्री समाज, लोकसमुदाय 'जात गंगा व लोकगंगा एक झालें पाहिजे'–भाऊ १९ ०गान–न जानपदगीत, खेडवळ लोकांचें गाणें ०ग्रह–पु लोकमत, लोकांची एखाद्या गोष्टीविषयींची समजूत कल्पना ०चर्चा–स्त्री जनतेमधील चर्चा, गप्पा, लोकांत चर्चिली किंवा बोलली जाणारी गोष्ट ०जवाई–पु (ना) जावई –शर ०तंत्र–न लोकमत, जनतेचा कल, प्रजेचें म्हणणें, प्रवृत्ति 'सरकारनें लोकतंत्रानेंच राज्यकारभार हाकावा'–केसरी २ १२ ३० –वि लोकानुवर्ती, लोकांना जबाबदार 'सरकार हें अधिक लोकतंत्र झालें पाहिजे'–केले १ ६४ ०त्रय–न तीन लोक, स्वर्ग मृत्यु व पाताळ ०धारजिणा–वि १ लोकमताला मानून वागणारा (परंतु स्वत च्या किंवा धन्याच्या हिताबद्दल निष्काळजी) स्वत च्यापेक्षा, स्वकीयाच्यापेक्षा लोकांच्या हिताला जपणारा २ लोकांची काळजी करणारा लोकाभिमुख ०नाथ–पु १ एक औषधी रसायन २ राजा, देव 'लोकनाथा, जगन्नाथा, प्राणनाथा पुरातना।'

–मारुतिस्तोत्र ०नायक–पु लोकांचा पुढारी 'लोकनायकाचें कर्तव्य पाहून खडतर आहे' –टि १४६७ ०नियुक्त–वि लोकांनीं नेमलेला, निवडलेला ०नीति–स्त्री लोकरीत, वागण्याची सामान्य पद्धत, समाजास मान्य गोष्ट, प्रघात, चालरीत ०नुत–वि लोकांकडून प्रशंसा केला गेलेला, लोकांनीं स्तविलेला ०परी–स्त्री लोकरीत 'लोकपरीनें वर्तती जनीं।' –दावि २६६ ०पक्ष–पु लोकांची बाजू प्रजापक्ष याच्याविरुद्ध राजपक्ष, सरकारपक्ष 'फेरोजशहांनीं आणीबाणीच्या प्रसंगीं लोकपक्ष राखा छला' –टि १४२२ ०पाल–ळ–पु १ राजा, प्रजेचा पालन कर्ता, नृप 'म्हणविता रक्षिता लोकपाळ।' –विक ८० २ इंद्र, यम इत्यादि लोकांचा स्वामी, अष्टदिक्पाल पहा 'इहीं लोकपाळ कले। लोकपाळीं विविध लोक रचिले।' –ज्ञा १०.१०२, –एभा १०.६०३ ०प्रवाद–पु बातमी, लोकवार्ता, वदंता, किंवदंती, जनप्रवाद (सामान्यत वाईट अर्थानें) 'लोकप्रवाद, कायकाय वदेया पिकवील तें सांगता येत नाहीं' –नि ४३८ ०प्रवाह–पु सर्वसाधारण चालरीत, वागणूक लोकरीत ०प्रशस्त–वि लोकसंमत, लोकमान्य, रूढीला धरून असलेला ०प्रसिद्ध–वि १ सर्वप्रसिद्ध, लोकांमध्यें अतिशय माहित असलेला, लोकांमध्यें प्रचलित २ सर्वसाधारण, सामान्य. ०प्राणेश–पु (लोकांच्या प्राणाचा मालक धनि) वायु हवा ०बंधु–पु १ लोकांचा भाऊ लोकहितकर्ता 'लोकबंधू जो होय रवी ऐसा।' –नल २ सूर्य ०बाह्य–वि १ (लोकांच्या सामान्य वागणुकींतून किंवा समजुतींतून निराळा) विचित्र, विलक्षण, चमत्कारिक २ लोकांना प्रिय नसणारें, लोकविरुद्ध ०बोली–स्त्री. लोकांचें बोलणें, लौकिक बोली 'गुणा निर्गुणा आणिलें लोकबोलीं।' –दावि २६६ ०भय–भीति–स्त्री जनतेची भीति, लोकप्रवादाची भीति, जनलज्जा ०भांड–वि भांडखोर, वडवडया –तुगा ०भाषा–स्त्री १ सामान्य जनतेची भाषा, बोली २ बोलण्यांतील भाषा, वाक्प्रचार ३ अडाणी भाषाप्रयोग, असंस्कृत बोली ०मत–न सामान्य जनसमूहाचा अभिप्राय, लोकांचें म्हणणें, त्यांचे विचार 'ज्या समाहतींत लोकमतदर्शक कायदेमंडळें आहेत त्यास या कायद्यानें आपल्या शासनपद्धतींत फेरफार करून घेण्याचे अधिकार देताना हा निर्बंध घालून ठेवला' –वस्व १३६ ०मतानुवर्ती–वि लोकांच्या मताप्रमाणें असलेला, लोकमताप्रमाणें चालणारा [लोक+मत+अनुवर्ती] ०मर्यादा–स्त्री १ जनरूढी, पडलेली वहिवाट, प्रचार २ जनलज्जा ३ जनाचा मान, लोकांविषयीं आदरभाव (क्रि० राखणें, ठेवणें, पाळणें, धरणें, बाळगणें) ०माता–स्त्री लक्ष्मी, लोकजननी 'न सेविती हे जरी लोकमाता।' –साह्व २१ ०मांदी–स्त्री लोकांचा समूह, गर्दी 'रवें चालती धावती लोकगाथा। पुरी थोर ते राम जेथें अयोध्या।' –मुरामायणें अयोध्या ४३ ०मान्य–वि १ लोकांना मान्य, प्रिय २ लोकांचा पुढारी नेता 'लोकमान्य हा शब्द उच्चारताच मनात्मून ही पदवी तुम्हीं मान्यच करता –केले १ २७६ बाळ गंगाधर टिळक यांना लाव ण्यात आलेली, देणारी पदवी 'गोसल्याची इंग्लंडातील कामगिरी' –(विश्ववृत्त एप्रिल १९०६) या लेखात प्रथम वि का राजवाडे यांनीं वापरली ०रंजन–न १ लोकांची करमणूक २ लोकांना संतोष, मुरा होईल असें आचरण, लोकांना खुष ठेवणें ०रमण–वि लोकांना संतुष्ट करणारा 'पूर्णब्रह्म स्वयें श्रीकृष्ण। वळी वज्रिराम लोकरमण।' –एभा १२०३ ०राजक–राज्य–न लोकमतानुवर्ती शासनसंस्था (इं) डेमॉक्रसी लोकराजकांचे दोष त्याना स्पष्ट दिसत होते' –महाजनि (मनोरंजन–आगरकर अंक) ०रीति रीत–स्त्री लोकांची वागण्याची पद्धत, जनरीतिरिवाज, सामान्य वागणूक ०लचांड–न लोकांच्या नाखुषीनें होणारा त्रास, येणारी अपत्ति, लोकांच्या अवकृपेचें संकट म्हं० सगळं लचांड पुरवेल पण लोकलचांड पुरवणार नाहीं ०लज्जा–लाज–स्त्री लोकमर्यादा पहा १ लोकमताला मानणें, लोकांना जुमानणें २ जनलज्जा, लोकभय, लोकांची वाटणारी शरम ०लोकपाळ–पु अव १ देशाचे किंवा समाजाचे पुढारी लोक प्रतिष्ठितवर्ग (व्यापकार्थी) २ राजा व त्याचे अधिकारी (राजमंडळ) ३ फौज, शिपाई ०वार्ता–वार्ता–स्त्री पु जनवार्ता, वदंता, वार्ता लोकप्रवाद पहा 'लोकवार्तेला गति मिळाली कीं ती किती फोफावेल याचा नियम नाहीं' –इप ३७ ०विद्या–स्त्री समाजशास्त्र –मसाप २ २१९ ०व्यवहार–पु लोकप्रवाह, सामान्य रीत, जनरीत, सर्वसाधारण वागणूक ०शाही–स्त्री लोकांच्या सत्तेखालीं त्यांच्या संमतीनें चालणारी व त्यांच्याच हिताची अशी राज्यपद्धति ०शिरस्ता–पु सामान्य परिपाठ, सामान्य रीत, लोकांची वागण्याची पद्धत, राहटी, रूढी ०संख्या–स्त्री एका विशिष्ट स्थानीं राहणाऱ्या एकदर सर्व लोकांची गणती ०संग्रह–पु समाजव्यवस्थेचें रक्षण, लोकसंस्थेचें संरक्षण अनेक अनुयायी मिळविणें, लोककल्याण, लोकदीक्षा, स्वत ला निराळ्या रीतीनें वागण्यास प्रत्यवाय नसताहि लोकांनीं आचारभ्रष्ट होऊं नये म्हणून स्वत च्या इच्छेविरुद्ध कांहीं आचाराचा स्वीकार करून लोकांची जुट राखणें ज्ञानी पुरुषांनीं यथाधिकार धर्मसंस्थापनेसारखीं लोकसंग्रहाचीं कामे करावीं' –गीर ५ 'तया लोकसंग्रहालागीं। वर्तता कर्मसंगीं। तो कर्मबंधु आंगीं। बाजेना।' –ज्ञा ३ १७१ ०सत्ता–सत्तात्मक–वि लोकांची सत्ता असलेलें लोकमतानुवर्ती, राजा नसून लोकांकडून राज्यकारभार चालणारी (शासनपद्धति) 'लोकसत्तात्मक राज्यपद्धतींत लोकच राजे असतात' –गागा २६ ०संपादणी–

स्री लोकांचीं मनें अनुकूल करून घेणें, लोकांचें खुशामत, लोकाच्या मर्जीकरितां केलेली वतावणी 'केलि बहुत स्त्रियांची रावो राणी। स्त्रीपुरुषभावो नाहीं मनीं। परी लोकमर्यादेसी। तैसीच करिती।' –ज्ञा ३ १७६ ०समजूत–स्त्री १ सर्वसाधारण लोकांचें मत, सामान्य समजूत २ (एखाद्या मनुष्याविषयींचें किंवा पदार्थाविषयींचें) लोकांचें यथायोग्य ज्ञान समाधान, योग्य जाणीव ३ केवळ लोकांच समाधान (आपलें किंवा आपल्या बाजूचें समाधान न मानतां फक्त लोकसमाधान) पहाणें ०साहित्य–न लोकांच्या जिव्हाग्रीं परंपरेनें वावरत असलेलें कथात्मक वा गीतात्मक वाङ्मय हें लिखित असलेंच असें नाहीं याचीं उदाहरणें– कहाण्या, सावित्रीचें गाणें, कावळाचिमणीच्या गोष्टी, ढकसेनाच्या गोष्टी इ० ०सिद्ध–वि लोकांत रूढ असलेलें, लोकांत चालू असलेलें, प्रचलित, वहिवाटीत असलेलें ०स्थिति–स्त्री एखाद्या जनतेची सामान्य स्थिति, लोकांची परिस्थिति 'गाड्या घोड्यांतून हिंडणाऱ्या गृहस्थापेक्षां गरिबांनाच लोकस्थिति अधिक चांगली समजते' –टि २ ८० ०स्फीति–स्त्री लोकप्रसिद्धि 'स्वर्गाची नजर यावसमुद्रावर, त्याच्या पुरस्कर्त्यांची लोकस्फीतीवर व इंग्रजनांची केवळ मौजेवर' –नि ६१९. ०हितैषी–वि जनतेचें हित इच्छिणारा, लोकांचें कल्याण पाहणारा [लोक+हितैषी, हित+इष्=इच्छिणें] लोकाग्रणी–पु लोकश्रेष्ठ लोकांचा पुढारी, नेता [लोक+अग्रणी] लोकाग्रह–पु लोकांची उत्कट इच्छा, जनतेचा आग्रह लोकाचळ–पु स्वर्गादि लोकरूपी पर्वत, जगरूप पर्वत 'एऱ्हवीं जगदाकाराचें सिरें। जें चिरस्थानीयांच धुर। ब्रह्मभुवन गा घवरं। लोकाचळाचें।' –ज्ञा ८ १५४ [लोक+अचल] लोकाचार–पु रूढी, लोकांची रीत, प्रघात, वहिवाट; लोकरीत 'अंतरनिष्ठ तितुके तरले। अंतरभ्रष्ट तितुके बुडाले। बाह्याकारें भरगळले। लोकाचारें।' –दा १८ १ २४ लोकांतर–न परलोक, (स्वर्ग, नरक इ०) मृत्युलोकाहून निराळा दुसरा लोक [लोक+अंतर] लोकांतीं–क्रिवि लोकांमध्यें, जाहीर रीतीनें, उघडउघड एकांतीं लोकांतीं करू मदारोळ। लेश तोही मळ नाहीं येथें।' –तुगा १५५१ लोकातीत–वि अलौकिक, लोकांवेगळें, या लोकीं न सापडणारें [लोक+अतीत] लोकानुकूल्य–न लोकांची अनुकूलता, जनमान्यता, लोककृपा, लोकप्रसिद्धि [लोक+आनुकूल्य] लोकापवाद–पु लोकांनीं केलेली निंदा, जनापवाद लोकप्रवाद [लोक+अपवाद] लोकालोक–पु सप्तद्वीपात्मक पृथ्वीला तटबंदीसारखा असलेला पर्वत, सप्तद्वीपा पृथिवी व सप्तसमुद्र यांना वेढणारा व सूर्यप्रकाशापर्यंतचा अवकाश व्यापून टाकणारा असा एक महान् विस्तृत पर्वत लोकालोकीं–क्रिवि १ तिऱ्हाइताकडून तिऱ्हाइतामार्फत २ विशेष पुरावा नाहीं अशा प्रकारें लोकांच्या तोंडून ऐकिलेलें 'ही खबर मी लोकालोकीं ऐकिलेली आहे' लोकी(कि)क–पु १ लौकिक, कीर्ति यश 'बहु लौकिक साहू नये।' –दा १४ १ ६८. २ प्रसिद्धि, चांगल्या किंवा वाईट रीतीनें लोकांस माहीत असणें –वि या लोकांतील 'प्रत्य संपादणें लौकिक।' –दा २ ७ १ [स लौकिक] लोकिकीं–क्रिवि (काव्य) लोकांत, लोकसमुदायांत 'पुत्रसंतान नसतां दुःखी। वांज नाव पडिलें लोकिकीं।' –दा ३ ३.३२ लोकैषणा, लोकेशना–स्त्री १ लोकांनीं आपणास बरें म्हणावें अशी इच्छा, कीर्तीची इच्छा 'वैराग्यें तनु क्षीण करावें सोडुनि लोकेशना।' –देप ६७ २ स्वर्गादि लोकांच्या प्राप्तीची इच्छा ३ लोकांमध्यें चांगली किंवा वाईट प्रसिद्धि, लोकमान्यता किंवा दुर्लौकिक 'मुख्यांत लोकेशना होती' –पेद २१ ११२ [स लोकैषणा] लोकोक्ति–स्त्री १ म्हण २ ज्याचा हट्ट अर्थच घ्यावयाचा, शब्दशः अर्थ घ्यावयाचा नाहीं असे शब्द समुच्चयानें, वाक्प्रचार. उदा० डोळ्यांत तेल घालून राहणें, डोक्यांत राख घालणें इ० ३ (साहित्य) ज्या वाक्याला वाक्प्रचारानें चारुता आली आहे असें वाक्य 'हरिऱ्या पुन्हा पुन्हा का वाढ्या नाकांत घालिशी शशा।' [लोक+उक्ति] लोकोत्तर–वि अलौकिक, असामान्य, असाधारण [लोक+उत्तर] लोकोद्धार–पु मानव जातीचा उद्धार, कल्याण, मोक्ष; जननमरणापासून मानवाची सोडवणूक, लोकांची उन्नति, प्रगति [लोक+उद्धार] लोकोपचार–पु केवळ लौकिकाच्या संरक्षणार्थ करण्याचा शिष्टाचार, जी करण्याला शास्त्राज्ञा किंवा आपली इच्छा नसून केवळ लोकमर्जीकरतां आपण करतों ती गोष्ट कृति [लोक+उपचार]

लों(लो)कर–स्त्री १ बकरी, मेंढरें इ० च्या अंगावरील मऊ केस २ शरीरावरील बारीक व मऊ केंस, लव ३ (कों) आंब्याच्या बाठ्यावर असणारा कापसासारखा पदार्थ, रेषा [स लोम] लों(लो)करी–वि लोकरीचा बनविलेला

लोकर–स्त्री रोकड, नगद –बदलापूर ३९

लोकल–वि स्थानिक; ठराविक मर्यादेच्या आंतील [इं] ०फंड–पु स्थानिक कर [इं] लोकलफंडी–वि लोकलफंडातून बांधलेली (सडक) ०बोर्ड–न स्थानिक स्वराज्यसंस्था

लोकाट–न एक झाड हें मूळचें चीन व जपान मधील आहे याची लागवड उत्तरहिंदुस्थानांत होते फुलें सुवासिक व फळें आवडगोड लागतात –झाको (ल) ५८

लोकी–पु (माळवी) दुध्या भोंपळा [हिं]

लोखंड–न एक कठीण धातु लोह याचा रंग मंदे करडा किंवा काळा असतो हा धातु कठीण, चिवट, उष्णतावाही आहे याचे तापवून ठोकून पत्रे व तार काढतात या धातूला हवापाण्यानें गंज चढतो [स लोहखंड, प्रा लोह] लोखंडाचे चणे

खाणें-एदतर तपश्चर्या करणें, फार कष्ट सोसणें लोखंडाचे चणे खावविणें-चारणें-आत्यंतिक जुलूम करणें, अतिशय त्रास देणें, अत्यंत हालअपेष्टा सोसावयास लावणें लोखंडकाम-न १ घर, यंत्र इ० मध्यें जे लोखंडाचे भाग लागतात ते समुच्चयानें लोखंडी सामान २ लोहारकाम लोखंडाची फणी-स्त्री खरारा 'तिच्या डोक्यावर लोखंडाची फणी फिरवावी' -आगर ३ १९७ लोखंडी-स्त्री १ लोखंडाची कढई, काहील २ एक वेलीसारखें झुडुप -वि १ लोखंडाचा बनविलेला २ (ल) कठीण, लोखंडासारखा टणक, मजबूत, कणखर (शरीराचा बांधा, हाडपेर इ०) ३ गाठी असलेलें व कठीण (लांकूड) ४ फार काम करणारा, कमी न होणारा (ताप) ५ जाडाभरडा, कठीण, मजबूत, टिकाऊ ०कडवा-पु अरगडी जातीच्या जोंधळ्याचा कडवा ०काव-स्त्री तांबड्या मुरमाच्या जातीचा दगड, लाल रंगाची कठीण माती ०केळ-स्त्री केळीची एक जात ०केळें-न लोखंडी जातीच्या केळीचें फळ ०चार-स्त्री एक प्रकारचें गवत ०चुना-पु मजबूत आणि टिकाऊ चुना किंवा अशा चुन्यानें केलेलें काम ०छाप-पु छापण्याकरिता शिशाचे केलेले ठसे (याच्या उलट शिळाछाप अगर दगडछाप) ०जर-पुस्त्री खोटा जर, लोखंडाचा जर ०झाड-न लोखंडासारखें कठीण लाकूड असलेलें झाड ०तगर-स्त्री तगर नावाच्या एका फुलझाडाची एक जात या जातीच्या तगरीला वास नसून फुलें ताठ असतात ०पाया-पु मजबूत व टिकाऊ पाया ०फळ-न लोखंडी झाडाचें फळ ०मन-न निर्दय मन, कठोर मन, निष्ठुर मन 'महाराजा सारखा लोखंडी मनाचा मनुष्य कुणाच्याहि हाल अपेष्टांनीं द्रव णारा नव्हता -विक्षिप्त २ १५२ ०मुरूम-पु कठीण मुरूम ०रस्ता-सडक-पुस्त्री लोहमार्ग, आगगाडीसाठीं रूळ घालून केलेला मार्ग ०लास-स्त्री (चाभारी) चामडें ठोकण्याची ऐरण ०हळद-स्त्री कठीण व तांबड्या रंगावर असलेली हळकी हळद लोखाण-न (कों) लोखंड

लॅग—क्रिवि (खान) पर्यंत लेक पहा [लग]

लोंग-गी, लोंघ—स्त्री भात, गहूं राळा, वरी इ० धान्याचें कणीस, लोंब

लोंग—स्त्री (कों) राख नावाचें धान्य

लोंगर—नपु १ केळीच्या झाडाला येणारा केळयाचा घड, घोस केळवड २ (राजा कुण) मोठी लोंग, मोठें व लांब कणीस

लोंघळावि(घ)णें—सक्रि (गों) चिखल, राख माती इ० मध्यें (वस्त्र) लोळविणें

लोंच—स्त्री (गो) लाच

लोंच—पु कुस्तींत पाय टाकण्याचा प्रकार 'शिपराच्या पुढील पायांत लोंच असा मिळवावा' -अक्षप १ १९०

लोंचका—पु ओढून काढलेला तुकडा लचका पहा

लोंचट-ड—वि १ लवकर न तुटणारा, चिवट, वातड, तुटता तुटत नाहीं अशी (भाकरी, पोळी इ०) २ लवचिक, वाकणारा ३ (ल) कितीहि झिडकारिलें किंवा रागें भरलें तरी लगट करणारा किंवा बोलावयास येणारा निर्लज्ज (मनुष्य) (गो) लोचटो

लोचण—स्त्री ०हाच्याचा केंस उपटण्याचा चिमटा [स लुच्]

लोचन—पु डोळा [स] लोचनावर्त-पु घोड्याच्या भुवईखालीं असणारा भोंवरा

लोचा—पु यनावर रेशमाचा गाळ

लोंचा—पु (कु) निकालांत न निघालेला व त्रासदायक होणारा वाद, तंटा, विशेष इ० लामा पहा

लोंजारणें गोंजारणें—सक्रि लाड करणें, कुरवाळणें, पाठी वरून हात फिरविणें [गोंजारणें द्वि]

लोट—पु १ पाणी, वारा, इ० चा (आणि यावरून मनुष्यें, प्राणी इ० चा) एकदम आणि जोरानें आलेला मोठा प्रवाह, लोंढा, समुदाय किंवा टोळी, जोराची पुढें येणारी लाट २ गति मान् पदार्थाच्या गतीचा किंवा वेगाचा जोर, गतिमान् पदार्थानें दिलेला धक्का किंवा अशा धक्क्याचा जोर. 'लहान चाकाचा लोट भारी, मोठ्या चाकाचा लोट हलका' ३ हरएक प्रकारचीं कामें, काळज्या, जबाबदाऱ्या इ० चें मनावर पडलेलें दडपण ४ वक्तृ त्वाच्या ओघाचा जोर ५ (ल) (गावें, फणस इ० ची) समृद्धि विपुलता, लयलूट ६ लोटांगण, नम्र होणें 'लोट घेति पोट खरदिती ओंठ भजनिं हालविती।'-राला १९ ७ (व ना) लहान ओढा, नाला, प्रवाह [लोटणें] ०गाडा-पु (साताऱ्या कडे) आंत सामान भरून ढकलीत न्यावयाची हातगाडी

लोटण—पु एक प्रकारचें कबूतर [हिं]

लोटण—पु जमिनीवर लोटत लोटत जावें अशी शिक्षा झालेला मनुष्य [लोटणें] ०चाल-स्त्री एक प्रकारची घोड्याची चाल चाल पहा ०दिवा-पु कितीहि हलला, डोलला तरी न पडणारा किंवा न विझणारा असा सागाड्यांत बसविलेला दिवा

लोटणा—पु खराटा, झाडणी केरसुणी, केर लोटण्याचें साधन

लोटणें—सक्रि १ (एखादा पदार्थ) ढकलणें, जोरानें पुढें रेटणें-सारणें, टाकणें 'प्रेम झोंबे कंठीं। देह धरणीये लोटी।' तुगा १८१५ २ जमिनीवरून (दगड, चाक इ०) त्याच्या आसाभोंवतीं फिरवीत ढकलणें किंवा पुढें दडपणें, रगडणें, लाटणें ३ बंद करणें जोरानें लावणें (दार) ४ (दिवस, काळ इ०) घालविणें

अतिक्रान्त करणें; वरून खाली घरंगळणें; ( गाय, बैल, जनावर, इ० ) पशाखाली घालणें ( नाखुषीनें किंवा आधाशीपणानें ) ६ (हत्ती, घोडे, सैन्य, इ०चा ) शत्रूवर एकदम घाला घालणें; जोरानें चालून जाणें; हल्ला करणें. ' देह समंधावरी लोटला । मंदल्यावरी उठावला । '–दा ५.९.४२. ७ दूर करणें; सारणें; दूर टाकणें. ' तेही तयाचा मग हात लोटी । '–मारद २.३१. –अक्रि. १ ढकलले जाणें. २ जोरानें येणें. घुसणें, वाहणें; एकदम येणें; पुष्कळ प्रमाणांत येणें, जाणें, जमणें. ' देवळामध्यें कशाला आज लाखों मनुष्य लोटले होते ' ' अवचितां सुखसागर लोटला । '–दावि १९१. ३ ( दिवस, वर्षे, काळ ) निघून जाणें, पुरे होणें; संपणें, नाहींसें होणें; गत होणें ' इष्टविरहशोकोदधिन दुःखमूर्च्छित लोटली घटिका । '–मोकर्ण ६.१. ४ ( भिंत, घर इ० ) कोसळणें; ढासळणें. ५ सर्व शक्ति एकवटून जोरानें ( शत्रूवर ) तुटून पडणें. ' आकाशाहूनि विजू पडत । तैसी दक्षावरि अकस्मात् । वीरभद्र लोटला ' ६ ( अश्रु ) जोरानें वाहणें, येणें; ( नदी, लोंढा इ० ) दुथडीभरून वाहणें; पूर येणें. ' जें पाणी लोटलें तें लागेच दोन्ही थडी भरल्या. ' ७ काळेकुट्ट आणि पावसाळीचे ढग येणें, जोराचा पाऊस येणें. ' तिकडे जो पाऊस लोटला तो गांवचे गांव वाहविला. ' ८ ( धान्य, फळें पीक इ० ) भरपूर येणें; अतिशय पिकणें; लयलूट होणें; समृद्धि होणें. ९ आयरणावर रेलणें; निजणें; पडणें. १० लोटांगण घालणें. ' लोटला पायीं हस्तिनचि । '–दावि ४४ ११ तोडून टाकणें; सोडणें. ' आणि निन्दादिक जें असे। तें येणें फळल्याणें नामे। हरि लोटलिया जैसें । येर आंग । '–ज्ञा १८.१२८ १२ पालटणें, बदलणें ' परी मनोधर्मु न लोटे । विकारविशुद्धि । '–ज्ञा २ ४१ १३ मोजणें; मोजून टाकणें ' बाप दु खाचें केणें सुटलें । जेथ मरणाचे भरे लोटले । '–ज्ञा ९. ४९६ १४ मरणें, जाणें ' येवढें महोरात्र जेथिचें। तेंग न लोटती जे मागयाचे । देखती ते स्वर्गींचे । चिरंजीव । '–ज्ञा ८.१५७. [ सं. लुट्, प्रा. लोट, हिं. ]

**लोटपोट**—स्त्री १ लोळण २ बेसुमार मौज, आनंद; हंसा, खिदळणें इ० चाळे किंवा क्रीडा. ३ पूर्ण तृप्ति किंवा समाधान ४ कसें तरी काम रेटण्याची क्रिया; चालढकल ५ वैपुल्य, चंगाळी ६ नृत्य, गीत, वक्तृत्व इ० पाहून किंवा ऐकून होणारी तल्लीनता, एकाग्रता किंवा करमणूक ७ एखाद्या वस्तूच्या दोन्ही बाजू. ०करणें–होणें–हसून हंसून मुरकुंडी वळणें, हंसून पोट दुखूं लागणें ' हंसून हंसून ती लोटपोट होऊन गेली. '–पये ४२.

**लोटलोट**—स्त्री. लोटणें, गडगडणें. ' होत लोटलोट आपटले । '–दावि १२३.

**लोट, लोहट**—पु ( को ) पोहोरा, विहिरींतून पाणी काढण्याचें ताब्याचें भांडें. [ सं. लोहघट ]

**लोटा**—पु ( हि. कु. ) घराचा ओटा. **लोटी**–स्त्री (राजा. कु ) ओटी; ओसरी. **लोटो**–पु ( राजा कुण ) ओटा.

**लोटा टया**—पु ( को ) १ रहाटगाडग्याच्या माळेस बांधण्याचें मातीचें भांडें. २ विशिष्ट आकाराचें तांबें, पितळ इ० धातूचें भांडें, तांब्या, गडवा, तंबची इ०; मोठी लोटी. ' कनकाचिया लोटी भिंगारेंनी । वेगीं सानुगें आणिलीं। '–शिशु ३१२. [ सं. लोहघट ] ०वाडगी–घासन–स्त्रीन १ गरिबापरची स्वयंपाकाची भांडीकुंडीं. २ स्वयंपाकाची तयारी. उदा० चुली सारवणें, सरपण आणणें, भांडीकुंडीं व्यवस्थितपणें ठेवणें इ० पोरांचें काम. ' लोटावाडगी करून मी भाकरी करावयाला बसलें. ' **लोटी**–स्त्री. १ तपेली; लहान तांब्या; लहान लोटा; विशिष्ट आकाराचें तांबें, पितळ इ० धातूचें पाणी ठेवण्याकरतां अगर पिण्याकरतां भांडें. २ तीर्थकुंड. –ऐरापुत्र १०.१ **लोटकें, लोटका**–पु न. ( कुणबी ) लहान मडकें; लहान भांडें.

**लोटा–टया**—वि. धष्टपुष्ट. लोटा–टया पडा.

**लोटांगण**—न १ देवापुढें, साधुपुरुषापुढें किंवा राजा इ०-कापुढें नम्रपणानें लोळणें; साष्टांग नमस्कार. ' घालूं लोटांगण तच्चरणीं । '–विक ४. २ ईश्वरादि प्रीत्यर्थ आडवें पडून चक्राकार लोटत जाणें, अशा लोटत जात असतां होणारा फेरा. ( असें लोटत क्षेत्रास गेल्यानें पुण्य लाभतें अशी समजूत आहे.) ३ एखादा पदार्थ उंचावरून घसरून खालीं गडगडत येत असतां त्याचे आपल्या भोंवतीं होणारे फेरे प्रत्येकी. [ लोटणें+अंगण ]

**लोटालोट–लोटी**—स्त्री. १ एकमेकांनीं एकमेकांस लोटणें, ढकलणें, ढकलाढकली. २ (ल ) एकमेकांवर कामाची ढकलाढकली ३ काम, उद्योगधंदा कमाबसा करणें; चालढकलीवर नेणें.

**लोटाळण–णें**—न (व.) लाटणें; पोळी इ० लाटण्याकरितां लागणारा गोल दांडा.

**लोटिंगो**—पु ( गो. ) लाडाचे हातहात तुकडे करून जंगलांतून शहरांत आणणें. [ लोटणें ]

**लोठा–टया, लोंठा–टया**—वि. लठ्ठ, अगडबंब; धष्टपुष्ट; गलेलठ्ठ; मजबूत, धिप्पाड ( माणूस, लाकूड, पशु इ० ). **लोठाथम**–पु १ कोणीहि अगडबंब, लठ्ठ व मूर्ख माणूस; धटिंगण; उच्छृंखल मनुष्य, लठ्ठ निरंजन. ब्रह्मचर्यादि आश्रमहीन मनुष्य. २ सडेसोट. ज्याच्यामागें बायकोमुलें इ० व्याप नाहीं असा माणूस.

**लोड, लोढ**—नपु १ टेकण्यासाठीं केलेला लांब आणि वाटोळा तक्या; पृष्ठोपधानक ' त्यावरि प्रेमाची गादी सुघड। पाठीशीं धैर्याचें केलें लोड । वरि आनंद चादवा अखंड । प्रकाशमय लाविला । '–ह ३३ ३ २ तुरपून शिवलें असतां होणारी वळकटी, तुरपून घातलेली शिवण; गोट. ३ सुताराच्या सामानाची

मूड ४ –न. पागर, गुरुं इ० आडतात एड अशाप्रकारचें आडवें लाकूड असतें तें. यांत जुंवाचा दांडा अडकवितात; वखर, पुरुन यांचें दिड.

**लोंड**—वि (खा.) रोड, अशक्त

**लोंडणा**—पु. जनावर पळूं नये म्हणून त्याच्या गळ्यांत बांधण्याचें अवजड लाकूड; अवजड पदार्थ. लोंडणें पहा.

**लोंडणी**—स्त्री. दवडणें, घालविण्याची क्रिया. ' सात घटिकां पुढें तयाची लोडणी । इंद्रियें गोडणी सर्व येती । '–च ११०.

**लोंडणें**—न. सुतार इ०चें कोरण्याचें, खोदण्याचें किंवा कातण्याचें हत्यार.

**लोंडमदान्**—वि. (व) लोंढण्यासारखा असणारा मनुष्य

**लोंडा**—वि. (खा. भिडी) लोखंडी.

**लोंडिगा**—पु (गो.) लाकडाचा ओंडा

**लोंडी**—पु (सोनारी) सफाई, पॉलिश करण्याचा दगड.

**लोंडेलट**—स्त्री लाडेलट पहा.

**लोंड**—पु लोड; लांबडा व गोल तक्या लोड पहा.

**लोंढणें**—सक्रि. (कापसावरून) सरकी काढणें, कापूस विचरणें. **लोंढमन**–न (ना) सरकी काढणें **लोंढाई**–स्त्री कापसानून सरकी काढणें किंवा त्या कामाची मजुरी.

**लो(लों)ढणें, लोड(ढ)णा** —न पु १ ओढाळ गुराच्या गळ्यांत अडकविलेलें लाकूड. २ (ल.) प्रतिबंधक गोष्ट लचांड, जबाबदारी; जोखड; आपणास अप्रिय असे माणूस किंवा काम–जें आपल्या पाठीस लागलेलें असतें तें ' वृद्धानें बालपत्नीचें लोढणें गळ्यांत अडकवून घेणें हें निंद्य आहे. '–टि ४.१३७ (३ वेटव आणि जड असा दागिना इ०. ४ मालाच्या ओझ्यानें गाडी उलथून पडूं नये म्हणून जें टेकण देतात तें. (व.) लोढन [सं. रोधनम्]

**लोढणें**—सक्रि १ पुष्कळ अभ्यास करणें, परिशीलन करणें; शिकणें. 'तो न पढो का ब्रह्मसूत्र । न लोढो सर्व शास्त्र । '–ज्ञा १७८५. २ ढवळणें. [स. आलोढन]

**लोढा**—पु (काशी) वरवंटा, चटणी इ० वाटून चूर्ण करण्याचा गोल लांबट दगड. [सं. लुठ्]

**लोढा**—पु. ढुढळणी; घोट. 'सुखी रक्त लोढे सोटी । '–वेसीस्व १०१.

**लोंढा**—पु १ अकस्मात येणारा पाणी इ० द्रव पदार्थाचा लोट, प्रवाह; पूर. ' तयाचि पाढे या तोंडा । येईल जळंवटाचा लोंढा । इया उमळती दाढा । दातासहित । '–ज्ञा १३५६४ २ मोठी आणि जोराची पाण्याची लाट ३ (ल.) धान्यें, फळें इ० कोणत्याहि पदार्थाची बाजार, शेत इ०मध्यें एकदम झालेली समृद्धि; अति विपुलता; असंख्य वस्तु. ४ गांव, देश इ०वर धाड घालण्यासाठीं परगांवाहून किंवा परदेशाहून आलेली लुटारूंची टोळी; यात्रा इ० प्रसंगानें एखादा स्थळीं एकदम गोळा झालेले लोक. **लोंढ्याबरोबर–सरसें वाहात जाणें**–समाजात रूढ असलेल्या किंवा होत चाललेल्या सरणीनें वागणें; प्रवाहाबरोबर वाहून जाणें.

**लोंढ्या**—वि. लोंठा–ट्या पहा.

**लोण**—न एक कापडाची जात. –मुंव्या १२३.

**लोण**—स्त्री. १ खान्या पाण्याच्या आश्रयानें खाडी इ०च्या काठीं उगणारें एक प्रकारचें गवत. २ लवण; मीठ. ' लाविल्या लोण न लगे ज्यासी । लोणक्षण त्या काय पढासी । तें तंव नाणावें पंक्तीसी । चवी त्यासी पैं नाहीं । '–एरुस्व १८.४८. ३ जमिनींतील क्षाराचा अंश. ४ सिंध प्रांतातील उमरकोट व शहानंदर येथील एका विशिष्ट झाडाच्या राखेपासून तयार केलेला पापडखार. ५ (ल) उतारा; ओंवाळणी. [सं. लवण; प्रा. लोण; गु लुण; सिं. लुण, पं. लुण] **०उतरणें**–दृष्ट काढणें; मीठमोहऱ्या ओंवाळून काढणें. ' तुम्हा निरा मज आज्ञा ते स्वभावें । उतरूनी जिवें जाइन लोण । '–तुगा ४३७. **०करणें**–ओंवाळणें; ओंवाळून टाकणें. 'सकल तीर्थांचिये घुरें । जियें का मातापितरें । तया सेवेसि वीर शरीरें । लोण कीजे । '–ज्ञा १७.२०७.

**लोणढ**—न. ज्या ठिकाणीं लोण नावाचीं झाडें पुष्कळ होतात तें ठिकाण. **लोणनी**–स्त्री. (राजा.) लवणाची खोलगट जागा. समुद्राचें पाणी पूर्वी भरत असून नंतर गाळानें भरून आलेली जागा. हीत मीठ पिकतें. **लोणा**–पु. १ एक प्रकारचा तांदूळ. २ जमीन इ०मधील क्षारांश. ३ (ल) अंगकांति, चेहेऱ्याची टवटवी; जनावराना ययेच्छ खाणें–पिणें इ० मिळत असल्यानें त्यांच्या अंगावर येतो तो तजेला (क्रि० येणें; जाणें.) ४ ओलीसारखा जमिनीवर येणारा मिठाचा एक विकार; ओलसरपणा. (जमीन किंवा माती यामधील क्षारांशामुळें जमीन किंवा भिंत कधींच खडखडीत वाळत नाहीं अशी स्थिति). (क्रि० चढणें). **लोणांवा, लोणा–(णं)वी**–पु स्त्री. आंब्याच्या कैऱ्या उकडून व मिठाच्या पाण्यात मुरवून केलेलें तोंडीलावणें, उकडांबा, खारविलेल्या कैऱ्या [सं. लवण+म.=भावा] **लोणार**–न मिठागर. **लोणारणें**–अक्रि. भिंत, जमीन याना लोणा चढणें

**लोण**—न आट्यापाट्याच्या खेळांत सगळ्या पाट्यांतून निघून जाऊन पलीकडची थोडीशी माती परत आणणें, किंवा अशी परत आणलेली माती. (क्रि० आणणें, येणें; देणें) अशी माती आणली म्हणजे डाव जिंकला असें समजण्यात येतें. [सं. लवण] **०वारगळणें**–एखादा नियम उल्लंघिल्या कारणानें निरुपयोगी होणें किंवा फुकट जाणें ' असा आजपर्यंत कोणी राज्यकर्त्यानें किंवा शास्त्र कारानं कायदा किंवा कानू केलेला आठवत

नाहीं कीं अमुक एक विषयास अमुक अमुकच पृष्ठें लागावीं. ती शास्त्रोक्त मर्यादा उल्लंघिली कीं लोण वारमळलें.'-निपटणकर. **मागून आलेलें लोण पुढें पोंचविणें**-(आटयापाटयांच्या खेळांत एखादा गडी सगळ्या पाटयांतून पार जाऊन परत येण्यास निघाला म्हणजे तो लोण घेऊन येऊं लागला असें म्हणतात. हें लोण तो वाटेंतील गड्यांस शिवून देतो. यावरून) मागून आलेली चाल पुढें चालविणें. 'जे आपले आचार विचाराच्या कसोटीला लावीत नाहींत ते गाढ विश्वास पूर्वजांनीं निगदित झाल्यामुळें मागून आलेलें लोण डोळे मिटून पोंचविणें एवढेंच आपलें कर्तव्य समजतात.'-आगरकर. **लोणपाटया** (भोमव.); **लोणप-(पा)ट**-न. १ आटयापाटया; मृदंगपाटया. २ (फक्त शेवटचा शब्द) खेळांतील सरशी; जय.

**लोणचें**—न. १ आंबे, लिंबें इ० चिरून त्यांत मीठ, मोहरी, हिंग इ० घालून खारवून केलेलें तोंडीलावणें. २ दोन्ही बाजूकडून खेळणारा गडी. (खा.) लोणगान. [सं. लवण] **लोणच्या**-वि. सालीला जाड व भोंवड असा (आंबा.) (जाड सालीच्या आंब्याचें लोणचें जास्त दिवस टिकतें).

**लोणमांस**—न. मांसापासुन शिजवून तयार केलेला पदार्थ. -गृशि २.९७. **लोणमांसाचा रस्सा**-पु. सागोती बारीक चिरून त्यापासुन तयार केलेला रस्सा. -गृशि २.५०.

**लोणारी**—पु लाकडें जाळून त्याचे कोळसे करणें किंवा चुनकळ्या करणें हा धंदा करणाऱ्याची किंवा लाकूड, कोळसा अगर चुनकळ्या विकणाऱ्यांची जात किंवा त्या जातीचा इसम.

**लोणी**—न दूध, दही घुसळलें असता त्यांतुन जो स्निग्धांश निघतो तो [सं नवनीत, प्रा. णोणीअ; पं. नौणी; हिं. नैनी] **०खाऊन ताक देणें**-स्वतःचा स्वार्थ साधून मग परार्थ पाहणें; मुख्य भाग आपण घेऊन निःसत्त्व व किरकोळ स्वरूपाचा भाग उदार होऊन दुसऱ्यास देणें. 'हजार युरोपियन कामगार सर्व लोणी खाऊन ताक मात्र आमच्या वाटयास देतात'-टि २.५.१२. **०लावणें**-खुशामत करणें, मनधरणी करणें; मिनत्या करणें. **लोण्याची कढी करणें**-लोणी वाटेल तितकें किंवा विपुलतेनें वापरणें. **लोण्याची सवत न साहणें**-शांत आणि लोण्याप्रमाणें मऊ अशीहि सवत असह्य होणें, विरोध सहन न करणें. **लोण्याच्या पुऱ्या तुपांत तळणें**-अशक्य गोष्टी शक्य होणें, न घडणाऱ्या गोष्टीची चिकित्सा करणें. **लोण्यांत दांत फुटणें**-अत्यंत सौम्य स्वभावाचा मनुष्य असभ्य, रागीट आणि कठोर असा होणें. **लोण्यास दांत फुटणें**-आपण ज्याचें लालन, पालन, पोषण केलें त्यानें आपणाशीं कृतघ्नपणें किंवा अमर्यादपणें वागूं लागणें **लोण्याचा कणी**, **लोण्याचें बोट**-स्त्रीन. अगदीं किंचित् लोणी, कणीएवढें लोणी, बोटाला चिकटलेलें लोणी; इवलेसें लोणी. **लोण्याचें आयलिंग**-न. लोण्यापासून थोडी पुरण्याची तुकडे पाडून केलेली वडी. -गृशि १.४४४. **लोणकढा**-वि ताजा; अगदीं नवा, थोरा करकरीत; नवीन, साजूक. (अगदीं ताज्या कढविलेल्या लोण्याप्रमाणें). [लोणी+कढणें] **लोणकढी, लोणकढीथाप-बार्ता-बातमी-गोष्ट-खबर, लोणकढें वर्तमान**-स्त्रीन. समयानुसार ठेवून दिलेली थाप; खोटी बातमी; गंमतीखातर आणि गंभीर मुद्रेनें सांगितलेली खोटी खबर. 'पण मला आपण आपली तसबीर द्यायची कबूल केली ना! कीं लोणकढी दिलीन!'-फाल्गुनराव. **लोणकढी दौलत**-स्त्री. नवीनच मिळालेली दौलत. **लोणकढें(ढें)तूप**-न शुद्ध लोणी कढवून तयार केलेलें ताजें तूप; साजूक तूप. **लोणकढें दारिद्र्य**-न नुकतेंच आलेलें दारिद्र्य. **लोणकाप्या, लोणीकाप्या**-वि. बोथट, धार नसलेला (चाकू, सुरी इ०). **लोणट**-वि. लोण्याच्या वासाचें किंवा चवीचें. **लोणणें**-सक्रि. (व.) घोटणें; आहाटणें; घाटणें, वरणाची डाळ शिजल्यानंतर ती लोण्यासारखी मऊ करणें. **लोणस**-वि. (वों) १ सत्त्वस; कसदार; ज्यामध्यें लोण्याचा अंश पुष्कळ आहे असें (दूध, दहीं). २ जीच्या दुधापासुन पुष्कळ लोणी मिळतें अशी (गाय, म्हैस इ०).

**लोत**—स्त्री. एक औषधी झाड व त्याचें मूळ. याच्या फुलाला धावाळे म्हणतात.

**लोथ-ध**—स्त्री. १ मुडदा; प्रेत, शव. २ माजून पुष्ट झालेलें शरीर; धूड; अवजड किंवा स्थूल शरीर, अगडबंब माणूस, पशु. 'देल्या दानवांचिआ लोथा। दाटला वर्तुवरेचा माथा।'-शिशु १४७. ३ फार मोठें फळ (पणस, चिबड, भोपळा इ०) ४ मोट; गाठोडें, बिराडें; कोयळा 'जैसीं अक्षरींचि नक्षत्रें वेचावीं। ऐसी घाड उपजेल कीं जीवीं। तें गगनाची वाध.वी। लोथ जैसीं।'-ज्ञा १०.२५९. ५ ओझें. 'कीं अनुभवाचा माथा। वाहणि सुखाचिया लोथा।'-ऋ ६४. ६ मोठा ढोकळा; मोठा पत्तर. [हिं. लोथड़] **लोथी पाडणें**-१ समूळ नाश करणें; सैन्याचा धुव्वा उडविणें. २ मृतप्राय होईपर्यंत एखाद्याला खूप कुचलणें. **लोथेला, लोथ्या**-वि. (व) स्थूल शरीराचा; दोंद सुटलेला; गलेलठ्ठ.

**लोद-ध**—पु (चोरांचा धंदा) कोंकणांतील एका झाडाची साल. (लाखेचा रंग पक्का व चमकदार होण्यासाठीं लोद टाकतात) [सं लोध्र, लोध]

**लोदळणें**—क्रि पीक भरपूर येणें, असें पीक जमीनींत साढून त्यावर पाऊस पडल्यामुळें दाण्यास मोड येणें.

**लोंदा**—पु उत्तम अन्नाचा घास, पिंड, गोळा.

**लोदी**—स्त्रीन.. पठाणाच्या एका जातीचें नाव.

**लोदु**—वि नीच -राज्य १ २६.

**लोधा**—वि ( बायकी ) नको असलेला, मनातून उतरलेला, तिरस्कृत, ज्याच्यावर राग झालेला आहे असा ( मनुष्य )

**लोधा**—वि एक प्रकारची नाचणी

**लोध**—स्त्रीपु प्रेत, शव, मुडदा लोध पडला 'एक पुरुष एक कुमर। जळोनि पडिले लोध शरीर।' –हरिश्चंद्राख्यान २५५ (नवनीत पृ १९७) **एकाद्याची लोध पाडणें**-एखाद्याला मारून किंवा कुस्लून मृतप्राय करणें **लोधी पाडणें**-(सैन्याचा) पूर्ण नाश करणें कत्तल करणें, मृतवत् पाडणें, ठार मारणें **लोधडा, लोधा, लोदा**–पु अगडबंब किंवा धिप्पाड माणूस, पशु **लोधा**–पु १ प्रेत, मुडदा २ प्राण्याचें तोडून किंवा ओर बाडून काढलेलें मांस, लचका ( क्रि० घेणें, तोडणें, काढणें )

**लोधट**—वि ( कों ) चिघळलेला, पातळ, लिबलिबीत ( गूळ, कणिक, साखर इ० ) **लोंधा**–पु चिकट व मऊ गोळा, पातळ व चिघळलेला पदार्थ, गूळ, पातळ भात, कणिक इ० –वि चिघळलेला, पातळ, बिलबिलीत, पाझरलेला

**लोधणें**—अक्रि ( काव्य ) १ लुब्ध होणें, झोंबणें, चिकटणें, गुंतणें 'ससारसुखाचेनि पडनमूर्खे। लोधोन पडती।' –दा ३ १० ३० २ सवय लागणें, लालचावणें, चटक लागणें 'मायबाप बधु बहिणी। नोवरी न दिसता वाटे काणी। अत्यत लोधला पापिणी। अविवेकें भुरंबिला।' –दा ३ २ ४० ३ लोभणें, लुब्ध होऊन येणें तरण्य रामपूजेसी। प्राणीमात्र लोधले।' –वेसीस्व ७ ५० ४ ( ल ) घडणें, बनणें, तद्रूप, तदाकार होणें 'जिव्हा लोधली रसें। कमळ सूर्यपणें विकाशे।' –अमृ ९ ३. ५ गाढ निजणें 'तयेंचि चक्र लोधले।' –गीता २ १३९८ [ स लुभ् ] **लाधलेपणें** क्रिवि लोभानें, लुब्ध होऊन 'नयन हे लोधलेपणें। निमेषोन्मेषाचें साडणें।'

**लोधा**—पु एका हलकरी जातीचें नाव

**लोध्र**—पुन एक वृक्ष व त्याची साल हे वृक्ष कोंकण, महाबळेश्वर, बंगाल व नेपाळ या प्रदेशात होतात पानें बकुळीच्या पानाएवढीं असतात उपयोग रंगाकडे व औषधीकडे याला हुरा असेंहि कोणी म्हणतात याच्या तांबडा व पांढरा अशा दोन जाती आहेत

**लोन**—न ( व खा ) मीठ **लोना**-पु ( व ) भिंतीला अगर जमिनीला क्षारामुळें आलेला ओलसरपणा लोणा पडला **लोनार**-पु मिठागर **लोनावळें**-न ज्यापासून मीठ मिळतें असें तळें [ लवण+तळें ] **लोनीया**–स्त्री मीठ तयार करणारी जात

**लोना**—पु एक लहान जातीचा मासा

**लोप**—पु १ गळणें, नाहींसें होणें, अभाव, नाश २ प्रचारातून जाणें, रद्द होणें, पडणें ३ बोलताना किंवा लिहिताना अक्षर, शब्द इ० गळणें, गाळणें, अक्षर, प्रत्यय इ० शब्दातून गळणें [ स ] **लोपणें**-अक्रि १ लुप्त होणें, नाहींसें होणें, दिसेनासा होणें २ प्रचारातून जाणें, गळणें ३ लीन होणें, मिळून जाणें **लोपविणें**-अक्रि ( काव्य ) लपविणें, अदृश्य करणें, दडविणें 'भगणें सर्व लोपवी।'

**लोपाचार**—पु ( कु ) वोंबडें वगैरे बळी देणें

**लोपामुद्रा**—स्त्री विदर्भ अगस्ति ऋषीची स्त्री

**लोप्लुवाय**—स्त्री ( गो ) अगत्य, कळकळ [ लोभ ]

**लोब**—पु ( गो ) लोभ, प्रेम, आकर्षण [ स लोभ ]

**लोंब, लोंबट-र-न**—स्त्री भात, गहू वरी, राळा, राजगिरा वगैरेचें कणीस, धान्याचा तुरा [ स लब ]

**लोंबक(का)ळणें, लोमकळणें**—अक्रि १ लोंबणें, लटकणें; ओळंबणें, अधांतरीं राहणें, लोंबत राहणें, वरच्या आधाराशीं संबद्ध असा पदार्थ खालच्या भागाला आधार नसल्यामुळें अधांतरीच लटकत असणें, झाडाची फांदी, खुंटी तुळई इ० हातानीं धरून पाय निराधार स्थितींत ठेवणें 'घोड्यावर बसलें असता रिकिबी नसतील तर पाय लोंबकळतात' २ ( व हीं काम, कारभार इ० ) शेवटास न जाता अपूर्ण स्थितींत पडणें, अनिश्चित अशा मन स्थितींत असणें [ लोंबणें ] **लोंबकळणी, लोंबक(का)ळा**–स्त्रीपु लोंबकळत राहण्याची स्थिति, झोला, लोंबण

**लोंबट-ड**—स्त्री ( कों ) १ नारळ, पोफळें इ० फळाचा घड, झुपका, समुदाय २ उपद्रव, त्रास, झेंगट, शुक्लकाष्ठ ३ संकट, अडचण, त्रासदायक गोष्ट

**लोंबण**—स्त्री ( राजा ) फळें, फुलें, नेसलेलें लुगडें, धोतर इ०चा लोंबत असलेला घड, घोस किंवा ओझा, लोंबकळत किंवा लटकत असलेला समुदाय ( क्रि० लागणें ) [ लोंबणें ]

**लोंबणें**—अक्रि १ वरच्या बाजूस आधार असून खालच्या बाजूस आधार नाहीं अशा स्थितींत ( पदार्थ, माणूस इ० ) लटकलेला असणें, टांगलेला राहणें २ ( ल ) सुरू केलेलें कार्य पूर्ण न होता लांबणीवर पडणें, अनिश्चित स्थितींत असणें ३ एखाद्या कार्याविषयीं साशंक असणें, एखादें काम धरता येत नाहीं सोडता येत नाहीं अशा क्लेशकारक परिस्थितींत असणें, कुचमणें, कुचंबणूक होणें, वाट पहात बसणें [ स लब ]

**लोंबणी**–स्त्री १ लोंबकळणें, लटकणें, झोका, हेलकावा २ कुचंबणा, थांबणें, संशयित स्थितींत राहणें **लोंबत्या**–वि ( व ) एखाद्याचे मागें मागें घोळ धरून फिरणारा, लोंबणारा, एखाद्याच्या अन्नावर पोसला जाणारा

**लोंबर**—न ( राजा ) मोठी लोंब, ओंबी, लोंबें कणीस 'जा भासे दिवसा दूर्व बळ शिरीं सोंडूनिया लोंबरें।' –कक १३९ [ लोंब ]

लोयरें—न गोवारीच्या शेंगाची पीठ पेरून केलेली भाजी

लोयाड—रि (रा गिरी) ल्याड

लायान, लोयानऊद, लोयानीऊद—लोभान इ० पहा.

लोंयी—स्त्री लोंवत कलीस, लोंगी, ओंघी, तुरा 'येंयी येंयी आल्या लोंया।' भोंडल्याच गाणं-मनाप ? १ [लोंवणें]

लोंयीझोंयी—स्त्री झटापट, जोराचा प्रयत्न, अनेक तऱ्हेची खटपट, आवेश, कांहीं कार्यार्थ सोसलेले कष्ट किंवा केलेली धडपड, लोंबून आणि झोंबून केलेला प्रयत्न 'साती दैवनें चलजेठी। लोंयीझोंयी घातले।'—नव ५ ८८ [लोंवणें+झोंवणें]

लोभ—पु १ एखाद्या पदार्थाच्या प्राप्तीची उत्कट इच्छा। २ हातचें जाऊं नये अशी इच्छा ३ हांव, आधाशीपणा 'द्रव्याचिया लोभउडा। करू नय तो करि धडा।'—ज्ञानप्रदीप १३५ ४ चिक्कूपणा ५ कृपादृष्टि, ममता, मेहरबानी, प्रीति, प्रेम 'सद्गुरु गुरुजींचा फार लोभ होता' लोभउचें-क्रि (गो) लोभ, प्रेम करणें लोभणें-अक्रि (काव्य) लोभ करणें, सुटणें, लुब्ध होणें, एखाद्या वस्तूच्या प्राप्तीची इच्छा होणें लोभणें, लोभवणें, लोभावणें-अक्रि १ (मनुष्य, पदार्थ इ० यद्दल) प्रेम असणं, प्रीति करणें, प्रेमानें खेंचला-आटला जाणें, 'मूढ़ीवा पतिला कधींहि लोभेना।'—मोशाति ३ ६८ २ उत्कट आकांक्षा असणें, एखाद्या वस्तूनें आकृष्ट होणें, प्राप्तीची इच्छा होणें लोभनीय-वि लोभ करण्यासारखा, स्पृहणीय, आकर्षक लोभापर-वि लोभयुक्त, कृपाळू ममताळू 'म्हणोनि त्याज्य जें नोहे। तेथ त्यागानें न सुवावें। त्याज्यालागीं नोहावें। लोभापरीं। —ज्ञा १८ १३३ [स लोभपर] लोभाविष्ट लोभातुर लाभिष्ट, लोभी-वि १ हावरा, अधाशी, फार लोभ असलेला एखादी वस्तु मिळण्याबद्दल किंवा आपणा जवळील न जाऊं देण्याबद्दल फाजील इच्छा करणारा २ चिक्कू कृपण, कजूप, पैसा खर्च न करणारा, कवडीचुंबक

लोभान लोभान नी ऊद—पु एक सुगंधी द्रव्य, ऊद एका झाडाचा चीक [हिं लोबान] ०दाणी-स्त्री धुपाटणें

लोभी—पु ०व्याध तारा लुब्धक पहा

लोंभें—न वाद तगा लैंमें पहा

लोम—नपु लव, अंगावरील बारीक केंस [स.] ०पाद-केंसाळ किंवा केंसासारखे पाय असलेला प्राणी उदा० कोळी, झुरळ माशी इ० ०विलोम-पु वर्णसंकर 'नाना प्रसंगें लोम विलोम अविचार।'—सप्र २१ ४८ लोमश-वि १ केंसाळ (जनावर गात्र) २ लोंकरीचा, केंसाचा बनविलेला-लें (वस्त्र, शालजोडी, बुरणूस, घोंगडी इ०) लोमहर्षण-वि रोमहर्षण अंगावर रोमांच उठविणारें, पुलकित करणारें

लोमकळणें—अक्रि लोंबकळणें पहा

लोमूर—न एक लोखंडाचा प्रकार-लोखंडीकाम मॅट्द २१

लोयली—स्त्री. गलबताचा एक प्रकारचा लहान नांगर, लंगर, लोरी, लोइली पहा

लोल—वि १ हलणारा; अस्थिर, चपळ, झुल्णारा, कांपणारा. 'लोल पताकी डोलत। रथ शोभत अतिशोभा।'—एरुक्म ५ ११ २ (ल) अति उत्सुक, अधीर, उतावीळ, आतुर 'असन्मानस तव भुजपीठर दखावया असे लोल।'—मोकर्ण १४ ४२ ३ लंपट, अघाशी, लोलुप, आसक्त, लुब्ध, एखाद्या विषयाकडे आकृष्ट झालेला 'त्या शोकसागराच्या पाणीं मुनि शंभुचीच मति लोला।'—मोवन ४ ११८ ४ क्षणभंगुर, नाश पावणारें, नाहींसें होणारें ५ क्षुब्ध, अस्वस्थ ६ लोळागोळा झालेला, पंख उपटल्या सारखा, असहाय 'रयत बिचारी लोल झाली उपल्ली पराला।'—ऐपो ४१२ [स लोल] लोलक-पु दागिन्यांतील लोंवता मणि हा बहुधा खालीं जाड व वर निमुळता आणि लांबट असतो [स] लोल(लि)गत-वि आसक्त, लोभी, हावरा 'साइन राम आनंदघन। ज्याचे मनीं विषयचिंतन। त्यासी कैंचें समा धान। लोलगतासी।'—दा ३ १० ६२ लोल(लि)गता-स्त्री १ आसक्ति, लोभ, एखाद्या वस्तूच्या प्राप्तीची इच्छा-हाव 'तापसां नाहीं लोलंगता।'—मुआदि २२ १४३ २ चंचलता 'लोलंगता नसे ज्ञानें घालेपणें।'—रामदास, अभंग (नवनीत पृ १६७) लोला-वि १ निर्जीव होऊन लोंबत राहिलेला (हात, पाय इ० अवयव, ताड, माड इ०चें पान). २ लुळा, अशक्त, निर्जीव, थोटा (माणूस पशु) ३ (ल) परतंत्र, असहाय. ४ लंगडा, लुळापांगळा, ०व्यंग असलेला, अर्धांग झालेला हा लोला झाला, हाऊन पडला' लोला-ळा-पु १ घंटचा लोळणा हा आतील घंटेच्या बाजूवर आपटून आवाज होतो २ घड्याळाचा लंबक ३ घशांत लोंबणारी पडजीभ, उपजिव्हा ४ लचका 'श्वानें अड़ें लोले तोडिती।'—दा १ १० ५७ लोलावणें-अक्रि आसक्त होणें

लोलाम-ब, लोलाम(ब)दार—लिलाम, लिलामदार पहा

लोलितकरण—न (नृत्य) एकदा डाव्या बाजूला व एकदा उजव्या बाजूला अंचित हस्त करून रेचित करणें व त्या वळीं हात जिकडे असेल तिकडे डोकें वळविणे लोलितशीर्ष-न (नृत्य) डोकें चोहोंबाजूस हलविणें वेड, क्रोध, देहभान नसणें रोगग्रस्तता, मद्यपानसेवनस्थिति, ग्रहबाधा ह्या गोष्टी दाखविणें झाल्यास हा अभिनय करतात

लोली—स्त्री लोयली पहा

लोलुत्व—न लंपटत्व लोभीपणा, आसक्ति 'आधार घडेना लोलुत्वाचा।'—दावि १८४

**लोलुप**—वि अति उत्सुक, अति लोभी; आसक्त, लुब्ध, उत्कंठित [ स ] **लोलुपत्व लोलुप्य**-न लोभ, आसक्ति, लपटपणा, हाव, लालसा 'आधीच प्रकृतीचे पाइक । वरी भोगालागीं तव रंक । मग तेणें लोलुप्यें कौतुक । वैसे भजती ।' -ज्ञा ७ १४१

**लोलो**—पु श शब्दाचा उच्चाराचा शुद्धपणा, योग्य ठिकाणीं शब्दावर आघात देणें, विराम इ० कडे लक्ष न देता केलेलें घोकणें, भाषण, वाचन, वेदपठन इ०, सरासरी ग्रंथ घोकीत किंवा पठत असणें -उदा गुराना पाणी पाजताना गुराखी उच्चारतात तो शब्द [ ध्व ] **०करणें**-(क ) भाडणें **०घालणें**-१ कर्मेतरी वाचणें, सरासरी ग्रंथ पठन करणें, घोकणें इ० २ भिकाऱ्यानें तगादा करून किंवा लोचटपणानें भीक मागणें, ( शिमग्यात होळकर भीक मागतात तशी ) उद्धटपणानें किंवा जोरानें भीक मागणें

**लोलो**—पु छद, नाद लो पहा 'लेलो लागाला लो । आदि शक्तिचा लागला लो ।' -रामदास [ स लय ]

**लोल्ह**—न ( व ) उनाड जनावराच्या गळयात बाधलेलें अवजड लाकूड, लोढणें

**लों( लो )व**—स्त्री १ अंगावरील बारीक केंस, लव लोम 'लोवेंचें वावळ । पाल्हैंनें इ ।' -भाए ३९७ २ मेंढरू इ०च्या अगावरील केंस, लोंकर [ स लोम ] **लोवाळ**-वि दाट लोक रीचा, केसाळ -शर

**लोंथा**—पु मास भिजवलेलें पीठ, चिखल, गूळ इ०चा तोडून काढलेला तुकडा, खड किंवा लचका, लेंय, लोया

**लोवसपण**—न ( महानु ) अज्ञानपण, कृपणपण, कुटिल पण वीं भीतरीं औदार्य वसे । तेथ लोवसपण काइसे ।' -ऋ ९१ [ लोभ ]

**लोवसू**—वि ( महानु ) कृपाळू लोभावू 'तो देव हृपि केशु । जीवाकारणें लोवसु ।' -शाप्र ४४७ [ लोभ ]

**लोवींग**—स्त्री ( गो ) पहार [ लोहांग]

**लोष्ट-ष्ठ**—पुन १ मातीचें ढेंकूळ 'ऐसे होती हरु तृण । लोह लोष्ट पाषाण ।' -ज्ञा १५ १७३ २ लोखडाचा कीट गज [स लोष्ट] **लोष्टशौच**-न मलविसर्जनानतर पाण्याच्या अभावीं मलद्वार ढेंकळानें पुसुन स्वच्छ करणें [ स लोष्ट+आशौच शौच ]

**लोसुण**—स्त्री ( कु ) ( ग्र ) लसूण पहा

**लोह-हो**—न १ लोखड २ लोखडाचें केलेलें शस्त्र तर वार इ० 'लोहाचें काळवखें पहिलें । फरा आकाशु गवसिलें ।' -शिशु ५८५ ३ लोहभस्म, लोखडाच्या गजापासुन अगर किटा पासुन केलेलें औषध ४ रक्त 'राया राणिएचा जाला । जरि पे लोहाचा कालोला ।' -शिशु ४७१ ५ सोनें, सुवर्णरूप धन -वि १ तावडा २ लोखडी [ स ] **०कांत**-नपु १ लोखड आकर्षून घेणारा पदार्थविशेष, लोहचुबक २ लोखडाची एक जात ३ ह्या जातीच्या लोखंडाचें औषधार्थ केलेलें भस्म, तिच्यार्चे भस्म **०कार**-पु लोहार, लोखडाचे पदार्थ वनविणारा [ स ] **०किट्ट**-न १ लोखडावरचा गज, जळलेलें लोखड २ मडूर नावाचें औषधी द्रव्य [ स ] **०घगाळ**-न मोठें लोखडी घगाळ; काहील 'सूर्यनारायण जेवावयास आले, साती दरवाजे उघडले, लोह घगाळें पाणी तापविलें ।' -आदित्यराणूबाईची कहाणी-कहाण्या भाग १ पृ ९ **०चुंबक**-पु लोखडाच्या वस्तूला आकर्षण करणारा दगड, लोहकांत -वि ( ल ) हट्ट घेऊन बसणारा, अनेक युक्त्या करणारा किंवा धरणें धरून बसणारा, झटून, चिकटून दुसऱ्यापासुन द्रव्य घतल्याशिवाय न सोडणारा माणूस [ स ] **०चुंबकाकर्षण**-न एका लोहचुबकाचें दक्षिण टोंक दुसऱ्या लोहचुबकाच्या उत्तर टोंकाजवळ आणिलें असता त्यां मधील दिसुन येणारें परस्पर आकर्षण **०चुंबकप्रतिसारण**-न दोन लोहचुबकाच्या उत्तर किंवा दक्षिण टोकामधील परस्पराप दूर लोटणें **०चूर्ण**-न लोखडाचा कीस **०तुला-ळा**-स्त्री. १ लोखडाची तागडी, लोखडी तराजू २ लोखडी गज, दांडा **०दंड**-पु १ लोखडी गदा, पातकी लोकाना मारण्याची यमाची गदा-हत्यार २ यम, शनि याच्या शातीसाठीं ब्राह्मणाला दान द्यावयाचा लोखडी सोटा, गज, लोखडी काठी [स] **०दंडक्षेत्र**-न विना पढरपूर 'शोधीत शोधीत हृषीकेशी । आला लोहदड क्षेत्रासी । दिंडीरवन म्हणती त्यासी । तेथें द्वारकावासी प्रवेशला ।' -ह ३६ १८० **०धुरोळा**-पु लोखडाचा-लोखडा सारखा धुरळा-धूळ, तावडी धूळ 'रणीं उठिला लोहधुरोळा । तेथें चालों न शके वारा ।' -एरुस्व ९ ३७ [स लोह+धूलि] **०परिघ**-पु लोखडी गदा-सोटा, लोखडी पहार 'जे वनिता असे जारीण । तीस यमदूत नेती धरून । लोहपरिघ तप्त करून । कामागारीं दाटिती ।' **०पेटि-का**-स्त्री लोखंडाची पेटी, तिजोरी, ( इ ) सेफ 'सरकारी व्याकेसारखी सुरक्षित लोह-पेटिकाच नाहीं ' -आगर ३ ६६ **०बंद**-पु लोखडाची साखळी 'दोहीं वाहीं कुजरथाट । मद गाळित गजघट । दातीं लोहबद निखट । वीर सुभट वळघले ।' -एरुस्व ८ १६ **०बंद-ध**-वि सानरी -शर **०भस्म-मंडूर**-नपु लोखडाच्या गजापासुन केलेलें एक रसायन लोखडाचें प्राणिद **०मय**-वि १ लोखडाचा वनविलेला लोखडी, लोखड असलेला लोहनिर्मित २ ( ल ) भयकर, क्रूर, निर्घृण [ स ] **०मार्ग**-पु लोखडी रस्ता, रेल्वे, आगगाडीचा रुळाचा मार्ग 'सरकारनें लोहमार्ग हिंदुस्थानात केले ते आपल्या सोयीसाठीं आहेत ' -टि १ ३३ **०लंगर**-पु, लोखडी बेडया, साखळदड 'लोहोलगर पायांत खिळविले ।'

-ऐपो २०९ ०शाळा१-स्त्री लोखंडाची एळई लोहं(हां)गी ल हांगी, लोहगी पाटी-स्त्री लोखंडाचे खिळे आणि कडा जागोजाग बसवून मारामारीसाठी केलेला सोटा, पहार [लोह+अंग] लोहिंची-स्त्री तांबूसपणा 'पुढां उपरति रागें लोहिंची। धर्ममोक्षाची शाखा पाल्वी। लाहणाहात नित्य नवी। वाढतीची असे।' -ज्ञा ११.१९४ लोहार-पु लोखंडाचे खिळे, कोयते इ० अनेक पदार्थ करणारा कारागीर [स लोहकार] लोहार काम-न लोखंडाच्या अनेक वस्तू करण्याचे काम लोहाराचें योग्य कर्म लोहारकी-स्त्री लोहाराचा धंदा लोहारडा-पु. (तिरस्कारें किंवा कुत्सितपणें) लोहार. लोहारसाळ-स्त्री १ लोखंडी कामाचा कारखाना, लोहाराची काम करण्याची जागा 'लोहारसाळेंतून खुरप्याला पाणी पाजून आण' २ लोहाराची भट्टी [स लोहकार+शाळा] लोहें-स्त्री पेटी, तिजोरी 'जैसी लोभियाचे हातीं। सापडे अवचितीं धनलोहें।' -एभा ७.५७० लोहो आगेळा-स्त्री लोखंडाचा अडसर 'कपाटें लोहो आगेळा पय मोठें।' -राक १२ [स लोह+अर्गळा] लोहोदक-न ज्यांत लोखंडाचा अंश आहे असें पाणी [लोह+उदक] लोहो लोखंड-न लोखंडाची भांडीं हत्यारें इ० वस्तू [लोह+लोखंड]

लोह—पु दगडी पाटी, लिहिण्याचा फळा, तक्ता -आदिलशाही फर्मानें [अर लौह]

लोह—क्रिवि (खा) त्वकर 'लोहलोह चाल' [स लघु का लघु?]

लोंहकर लोंहचट—लोंकर, लोंचट इ० पहा

लोहट-टी—स्त्री दगड, तुळ्या इ० जड सामान वाहावयाचा भक्कम गाडा

लोहडणा-णें—पुन लोढण पहा

लोहनाळी मोहनाळी—स्त्री प्रेमळता मायाळूपणा, मार्दव, कोमलता प्रेमाचें किंवा मायेचें वर्तन, भाषण इ० [म लोहो=लोभ, मोह=प्रेम, नवाळी]

लोहवदीऊद लोहभानऊद, लोहभानीऊद—लोभान इ० पहा

लोहांगी, लोहागकाठी—लोहगी पहा

लोहानी—स्त्री पठाणांतील एक जात

लोहाभिसारिक—न जयप्राप्ति इच्छिणाऱ्या राजानें अश्विन शुद्धप्रतिपदेपासून अष्टमीपर्यंत करावयाचें एक कर्म यांत सर्व राजचिन्हें, शस्त्रें व अस्त्र मंडपांत ठेवून त्यांची स्थापना केल्यानंतर होम करावयाचा असतो -एशा २०८ [स]

लोहाळ—वि.पुष्कळ लोंकर असलेला, 'मेंढा मारावा लोहाळ। पूजा पावली सकळ।' -तुगा २८४ [लव]

लोहाळा—पु एक जातीचें गवत लव्हा किंवा लव्हाळा पहा.

लोहित—न १ रक्त २ लाली, तांबूसपणा -वि. रक्तासारखें, आरक्त, तांबडें, लाल [स] ०त्व-न. तांबूसपणा, तांबडेपणा लोहि(हीं)ता-वि तांबड्या रंगाचा, तांबडा, लाल, आरक्त लोही-वि रक्तवर्ण, तांबडा, लाल 'लोही वारण-वद्द मार्यां। जैसा प्रभातेचा संध्याकाळु।' -उषा १६.८८

लोही—स्त्री पाणी तापविण्याचें लोखंडाचें भांडें, लोखंडाची कढई 'कनक गगाळें निघालीं। लोहा हांडे तपेलीं।' -वेसीस्व १४.३९

लोही—स्त्री १ एक प्रकारचें रेशमी कापड २ पडदा [स लोहित, हिं]

लोही—स्त्री मोहोर, सोन्याचें नाणें, द्रव्याची कढई 'नातरी निर्दैवाच्या परिवारीं। लोह्या रत्नलिया आहाति सहस्रवरी। परि तेथ बैसोनि उपवासु करी। कां दरिद्रें जिये।' -ज्ञा ९.५९

लोहु लहव-लु लहोव, लोव—क्रिवि हळूहळू [स लघु] लोहुसाण, लोहुसो-क्रिवि (गो) हळूहळू, बारीक बारीक, अस्पष्ट 'लोहुसो उलेता'=हळूहळू बोलतो [स लघु] लोहुल्हान-वि चिमुकला आणि गोंडस; ल्हुल्हान पहा

लोहो—पु लोभ स्नेह प्रेम, आकर्षण, लाहो (देवीचा गोंधळ घालताना व पुढील म्हणीतच या शब्दाचा उपयोग होतो इतर ठिकाणीं सहसा येत नाहीं) [स लोभ] म्ह० देखला गोहो लागला लोहो '=लग्न होताच किंवा नवऱ्याची गांठ पडताच अल्लड मुलगी त्यावर प्रेम करूं लागली (घराचा व आईबापाचा विसर पडला)

लोहोंकर, लोहोंचट—लोंकर, लोंचट इ० पहा

लोहोट-टी—लोहट-टी पहा

लोहोडणें—न लोढणें पहा

लोहोनाळी मोहोनाळी—लोहनाळी मोहनाळी पहा

लोळ—पु आगीचा झोत, जोरानें पेटलेला आगीचा कल्लोळ, सवेग असा आगीचा लोंढा, अग्नीच्या ज्वाळाचा भडका, गर्जत येणारी अग्नीची ज्वाला २ (मुंग्या, माशा इ० चा) दाट थवा, समुदाय, गोंगाट ३ (व) जळमट

लोळ—पु लोळण्याची क्रिया, लोळणें दु खातिशयानें गडबडा लोळणें (या अर्थी रडण्याचा किंवा रडून लोळ घालणें किंवा घेणें असा शब्द-प्रयोग करतात) २ (ल) (साप लोकांच्या उपद्रव इ० मुळें) एखाद्याची झालेली दुरवस्था किंवा पीडितपणाची स्थिति, थकवा, अति श्रांत स्थिति, भागोटा 'चोरानें किंवा तापानें माझ्या जिवाचा लोळ केला' ३ (लोप-ध क्या ऐवजीं अलण्याचा संभव) लठ्ठ पोटाचें पोर, अगडबंब माणूस, घुस, उंदीर इ० मोठा प्राणी, धूड 'काय हो घुशीचा लोळ सांपडला पिंजऱ्यांत' ४ अव्यवस्थितपणें बांधलेला गठ्ठा, अव्यवस्थित पदार्थ, चिरगुटें,

पोळ्या इ०ची रास दीग ५ काम, कारभार, कारखाना इ०चा पसारा; व्याप ६ पाळा, वेडेवांकडे कृत्य, व गमूड 'वदनी न करीसदि लोळ ते।' -वामन, नामासिवाग (नवनीत पृ ९९) [लोळणें] निजून लोळ पडणें-पसरणें एखादा मोठा ओंडपामारखें किंवा धोंड्याच्या ढगदगांच्या पमान्याप्रमाणें-गाटोडपाप्रमाणें पसरणें-पडून असणें. (या अर्थी पोपटगाचा लोळ कामाचा लोळ इ०) ०आक्रांत-पु मोठमोठ्यानें ओरडणें; प्रचंड व भयंकर गर्जना; आरोळा (क्रि० करणें, मारणें, स दणें; फाउविणें, उठणें, होणें) २ जोराचा प्रयत्न, धडपड, अविरत श्रम. ३ आरडाओरड; क्षोभ; एखाद्या गोष्टीविषयींची सार्वत्रिक तकार, पटकी, पाऊस, दरवडेमार, माहामारींनी धारण इ०मुळें उत्पन्न झालेली परिस्थिति 'पडान्याच्या-जरीमरीचा-पावसाचा-पाण्याचा-धारणीचा-माहामारीचा-लोळ-आक्रांत' [म लोळणें+आक्रांत] ०कंद, लोळकण-स्त्री १ लोळण, जमिनीवर गडबडा लोळणें (विशेषत अवघड काम असतां किंवा जबरदस्तीचा प्रतिकार करतांना), एखादा जबरदस्त मनुष्य दुसऱ्याला त्याच्या इच्छेविरुद्ध ओढून नेत असतां त्यानें पडणें, लोळणें धडपडणें इ० त्याच्या सर्व क्रिया २ एखाद्याचें मन वळविण्या करतां त्याच्यापुढें लोळण घेणें, लोटांगण घालणें (क्रि०घेणें,मारणें) 'रांडांच्या पायीं लोळकड घेणारा शुद्ध मूर्ख' -नारुकु ३ ४२ ३ कुत्रीं, मांजरें इ०चें खेळताना एकमेकांवर उड्या मारणें, एक मेकाच्या अगावर लोळण घेणें ०घोळ-पु १ (कागद, चिरगुटें, खाद्यपदार्थ इ०ची) कालवाकालव, हिंदकाडिबच, भुसकरणी, चुरडणें, घोटाळा, मिश्रण. २ हिशेब, जमाखर्च, कारभार इ०ची अव्यवस्था, घोटाळा, गुतागुत, गोंधळ ३ मनाची अस्वस्थता, गोंधळलेली स्थिति, विसकटलेली स्थिति (क्रि० करणें, होणें) ४ हटी किंवा द्वाड पोर जमिनीवर लोळून व हातपाय आपटून करतें तो गोंधळ, हूड किंवा उच्छृंखल पोरानें घतलेली लोळण, कलेली धडपड-गडबडणें [लोळणें+घोळणें] ०पट-स्त्री. लोळण, आजारामुळें आलेली पडून राहण्यासारखी स्थिति, अंथरुणावर पडून लोळणें, एखाद्या सायीन पुष्कळांना दुखणें येऊन लोळत पडण्याची स्थिति, आजारामुळें आलेली दुर्दशा, दीन दीनपणाची स्थिति [लोळणें+पडणें]; ०घडी-स्त्री निरनिराळ्या डाळींच्या पुरीच्या पिठाची लांबट वळवटी करून ती उकडल्यानतर तिची केलेली वडी [लोळण+वडी]

लोळकं(कुं)वणें, लोळकं(कुं)वा—लोंबकळणें, लोंबकळा इ० पहा

लोळगा—पु वायंगणें (उन्हाळी) भात करणें असल्यास त्यासाठीं केलेल्या रोहापैकीं निरुपयोगी रोह (रोप) -कृषि २३०

लोळण-णी—स्त्री १ (हटी किंवा द्वाड पोराचें) जमिनीवर गडबडा लोळणें (क्रि० घेणें, घालणें) २ लोटांगण ३ जबरदस्तीनें ओढून नेलें जात असतां त्या माणसाचें जमिनीवर लोळणें, अव्यवस्थितपणें हातपाय हापटणें (क्रि० घेणें) [लोळणें] ०घोळण-स्त्री (रागानें किंवा उतावीळपणामुळें) गडबडा लोळणें (क्रि० घेणें, घालणें) ०फुगडी-स्त्री मुलींचा एक खेळ यात मुली पायानें आंगठे दोन्ही हातात धरून गडबडा लोळत जातात -मराठे २२०

लोळणें, लोळत पडणें—अक्रि १ जमीन इ०वर पडून आग मारीं दशांसारखें होईल अशा तऱ्हेनें गडबडणें २ अंथरुणावर निजलेल्या मनुष्यानें निजलेल्या ठिकाणापासून अव्यवस्थितपणें कुशी वर वळून वळून दूर जाणें ३ नेसलेल्या वस्त्राचे सोगे जमिनीवर फरफटणें ४ उपयोगी पडण्याच्या स्थितींत असून (पदार्थ किंवा माणूस) काहीं उपयोग न केला जात असल्याकारणानें किंवा उद्योगधंदा न मिळाल्या कारणानें रिकामा राहणें, अव्यवस्थितपणें इतस्तत पडणें 'अनेक पदवीधर केवळ ब्राह्मण म्हणून लोळत आहेत' 'हा पहा तुझा चाकू येथें लोळत पडला आहे' (स लोठन, प्रा लोलण] ०घोळणें-सक्रि (मुकद्मा, कज्जा, गोष्ट, बेत इ०चा) सर्व बाजूंनीं किंवा साधकबाधक प्रमाणें विचार घेऊन खल किंवा वाटाघाट करणें, जोरानें आपले विचार मांडणें लोळवि(व)णें, लोळाविणें-सक्रि १ एखाद्यास लोळावयास लावणें २ (ल) पाडणें, मारणें, चीत करणें, पराभव करणें ३ ल्ने करणें, अंगावर चाल करून आलेल्याला आपल्या अंगच्या सामर्थ्यानें ढकलून देऊन किंवा चोप देऊन जमिनीवर आपटणें, लोळावयास लावणें. 'चोरानीं रात्रीं दोन असामीस लोळविलें' ४ लडवडविणें, मारणें, बुडविणें 'ते दर्वे भक्तिरसें जाणों स्वचरणरजांत लोळविले।' -मोद्रोण १० ४० [लोळणें चें प्रयोजक] लोळविणारा गीध-पु एक पक्षी. ई लॅमर गेयर

लोळसा—पु वेटाळें; कडें 'उगा लोळसा धोळ मोठा करीतो।' -राक १४.

लोळसावि(व)णें—सक्रि (वों) माती, वाळू इ०मध्यें वाटेल तसें किंवा दुखापत होईल अशा रीतीनें लोळविणें. [लोळण]

लोळा—पु १ घडघाळ, घटा इ०चा लवक २ पडजीभ. ३ पीठ, मास इ०चा तोडून काढलेला लचका-तुकडा-भाग लाबट वाटोळा गोळा (क्रि० घेणें, तोडणें, काटणें) [स लोल] ०तोडणें-१ आईबापानीं मुलीचें लग्न करून देऊन तिला दुसऱ्याच्या स्वाधीन करणें २ (कृपणानें) पैसा खर्चणें ३ (व) चावा घेणें, लचका तोडणें, एखाद्यावर खेंकसुन धावणें लोळी-स्त्री १ लहान घंटेचा लहान बारिकसा लोळा, लहान लोलक २ डूल, झुबर, इ०चा लोंबणारा मणि, लोलक ३ शेवूड इ०चा जाड,

पट आणि लोंबता गोळा ४ तोंडातील पडजीभ ५ पेल, गाय यांच्या गळयाखालचें लोंबतें व पातळ कातडें ६ (राजा) लाबट आणि सारखा भरलेला फणस ७ पुळें, मेण, पापडाचें भिजविलेलें पीठ इ० पदार्थांची लांबोडी गोळी

**लोळी**—स्त्री १ गादव इ०स येणारी लोळण्याची लहर, त्यानीं घेतलेली लोळण–णी (क्रि० येणें, घाल्णें, मारणें, येण) २ आळसामुळें किंवा गुंगीमुळें अगर पेंग आल्यामुळें झालेली लोळ ण्याची इच्छा, पडून राहण्याची इच्छा (क्रि० येणें) [लोळणें]

**लोळी**—स्त्री गल्बताचा लहान नांगर लोयली पहा

**लोळी**—स्त्री (लोहारी) फुदल, खोरें इत्यादींचें नेढें कर ण्याकरिता लागणारें लोखंड

**लोळुलें**—न मुलाच्या हाताऱ्या बोटांत घालण्याचा एक दागिना 'अगुळें लोळुलें वाघनखें सरी दिली कडिंच्या मणगटया।' –वसा ९

**लोळो**—पु (गो) लोळा

**लौकर लौंका, लौका**—लवकर, लवकर इत्यादि पहा

**लौकिक**—पु १ कीर्ति, प्रसिद्धि, नाव, योग्यता, एखा द्याच्या संबधानें लोकांत रूढ असलेलें मत २ चागल्या किंवा वाईट रीतीची लोकांमधील वाच्यता, लोकांत एखादी गोष्ट जाहीर होणें ३ सामाजिक व्यवहार, सार्वजनिक काम ४ समाजांतील लोकांची व्यवहारांत वागण्याची सरणी, प्रपंच, लोकाचार 'हा गृहस्थ लौकिकांत हुशार आहे' –वि या लोकांतील, ऐहिक, अवैदिक, केवळ लोकप्रसिद्ध २ सामान्य नेहमींचें ३ रूढ, प्रचारा तील ४ लोकाचाराला अनुसरून असलेलें [स] **लौकिकांत येणें**–मुलगा वयात येऊन ससार करू लागणें, मामलदा इ०ची जबाबदारी वाहू लागणें, प्रपचात पडणें **लौकिकावर येणें**–वाद इ०मध्यें पराभव झाल्याकारणानें किंवा अंगावर डाव आल्या कारणानें चिरडीस जाऊन अद्वातद्वा बोलू लागणें, शिव्याशाप वर्णें, एखाद्याबद्दल अचकटविचकट बोलणें सामाशब्द– ०ऋण–न लोकाचें कर्ज 'पूर्वीच्या ऋणीनीं वरील श्रुतींत अमुक असें जें एक नवीन लौकिक ऋण उपस्थित झालेलें आहे' –नि २१ ०**चतुर**–वि लोकाशीं वागण्यात किंवा त्यांना काबूत आणण्यात हुशार, लोकव्यवहारांत तरबेज ०**चातुर्य**–न लोकांशीं वागण्या तील शहाणपण ०**रीति**–स्त्री रूढीनें चालत आलेली रीत, सर्व साधारण पद्धत सर्व लोकांची चाल लोकांतील सामान्य चाल ०**ज्ञान**–न लोकाचें ज्ञान, लोकांसंबधीं ज्ञान **लौकिकाग्नि** पु स्मार्ताग्नि किंवा श्रौताग्नि नव्हे असा अग्नि ज्यावर स्वयंपाक इ० करतात तो विस्तव **लौकिकाचार** पु शिष्टाचार शिष्ट संप्रदाय, शिष्ट लोकांची वागण्याची सरणी [लौकिक+आचार] **लौकिका नुसरण**–न लोकांना अनुसरणें, लोकांप्रमाणें वागणें, लोकांच्या वहिवाटीप्रमाणें किंवा लोकरीतीप्रमाणें वागणें [लौकिक+अनु सरण] **लौकिकी**–वि १ लोकांत रूढ असलेलें, लोकांत प्रचलित असलेलें, लोकप्रसिद्ध पुष्कळ दिवसापासुन चालत आलेलें, पूर्वा पार चालू असलेलें २ व्यवहारचतुर, व्यवहारात हुशार, प्राप चिक बाबतींत निष्णात

**लौंग**—स्त्री (प्र) लवंग पहा

**लौंचीक**—वि लवचीक पहा

**लौंजी**—स्त्री आंब्याचें लोणचें [हिं]

**लौट**—क्रिवि परत [हिं]

**लौंडा**—पु पुरुष, नोकर; दास, नाच्या लवडा पहा [हिं]

**लौंडी**–स्त्री दासी, गुलाम–स्त्री; लवडी, पहा **लौंडीचा**–पु दासीपुत्र, एक शिवी

**लौंद**—वि १ लोध–ध, गलेलठ्ठ, दांडगा, फोपशा (मनुष्य किंवा प्राणी) 'शेणपा लौंद धट उद्धट।' –दा २ ३ ३२ २ मूर्ख, इल्कट 'ऐसे लौंद बेइमानी। कदापि सत्य नाहीं वचनीं।' –दा १८ ६ ५ [लोध]

**लौंधट**—वि स्वेच्छाचारी, उच्छृंखल, लवघट पहा

**लौल्य**—न १ लोभ हांव स्पृहा 'परि लौल्य वोखटें।' –पच ५ ९ २ चंचलता, लोलपणा [स लोल]

**लौह**—वि लोखंडी, लोखंडाचा, लोखंडासंबधाचा [स लोह]

**ल्याख**—वि योग्य शहाणा (मनुष्य), योग्य, बाजवी (बोलणें भाषण, कृत्य) युक्त, जोगता (वस्तु प्रवेश) [लायक]

**ल्याणें, ल्याइणें**—न लेणें, अलकार –सक्रि (दागिना, वस्त्र, इ०) अंगावर धारण करणें, लेणें 'अलकार ल्याइले अनेक।' –मुआदि ४६ ६ [लेणें]

**ल्याहणें**—सक्रि (काव्य) मिळविणें, घेणें, स्वीकारणें 'जरी ल्याहीन पति तरी जाईन मागुतीं।' –वसा ६५ [लेणें]

**ल्याहाडा**—वि (व) गोडखाऊ.

**ल्येक ल्योक**—पु (अशिष्ट) मुलगा; लेक पहा

**ल्हातणें**—अक्रि (काव्य) राहणें, सगतीनें असणें, बरोबर राहणें 'जे तुझी हे बुद्धि इंद्रियसंगतीच ल्हातसे ते श्रवण–मननें मागुती स्वरूपीं स्थिरावे जैं।' –शिगीता ७२

**ल्हाद**—पु आनंद हर्ष आल्हाद [स]

**ल्हार**—स्त्री (गो) लाट [स लहरि]

**ल्हाव**—पु लाहो लोभ, लोभीपणा; हाव [लाहो]

**ल्हावा–वो**—पु लाहर, लावा पक्षी, एक लहान पक्षी –लोक २ ८०

**ल्होवा**—पु (राजा) उन्हाळयात पिकलेली नाचणी किंवा भात, गिमवा **ल्होवी**–स्त्री नाचणीची एक जात, लहुवी, (भाव णांत पिकणारें नाचणीसारखें एक हलकें धान्य) [लघु]

# व

व—वर्णमालेंतील एकोणतिसावें व्यंजन. अक्षरविकास.–पांच अवस्था. पहिली गिरनार शिलालेखात, दुसरी व तिसरी ख्रिपू. १ ल्या शतकाच्या सुमारच्या मथुरेंतील जैन लेखात; चवथी इ. स. ८३७ मधील जोधपूर लेखांत व शेवटची पुढल्या शतकांतील एका दानपत्रांत आढळते. [ ओझा ]

व—उभ. आणि. 'आणि' आणि 'व' या दोन उभयान्वयींत फरक असा कीं, एका विधानात किंवा एक क्रियापद असताना दोन किंवा अधिक पदें किंवा कर्ते या दोघानींहि जोडले जातात. उदा० तो आणि (व) मी आलों, दिवस आणि (व) रात्र सारखीच. पण जेव्हा भिन्न गोष्टी दाखविणारीं, किंवा एक वाक्य कारण, आधार इ० व दुसरें परिणाम, शेवट इ० दाखविणारें अशीं वाक्यें जोडताना 'व' ऐवजीं 'आणि' चाच उपयोग करतात. उदा० 'मी आलों आणि तो गेला;' 'सूर्य उगवला आणि मी उठलों;' 'तो काळा आणि हा गोरा.' भोजशक ४१० तील मंगळवेढ्याच्या ताम्रपटात हा आढळतो [ अर व तुल० सं. उत–उभ–व, याप्रमाणें संस्कृतसदृश प्राकृतातून व फारसींत गेला.–भाभ १८३५ ]

व—अ. अथवा; वा. 'व चोळावें पल्ल मोडे।'–वैद्यक ७६. [ सं. वा ]

व—उद्गा. संबोधन १ (ना.) ओ! काय? याअर्थी २ (खा.) अग! वो पहा. [ सं. वै ]

वः—उद्गा. वाहवा! छान! 'कीं त्यानें म्हणावें पण व' –मोर ९. [ फा. वाह् ]

व॰—संक्षेप. १ वल्लद. २ वस्ति. ३ वद्यपक्ष ४ वकील

वइ—स्त्री. कुंपण. वई–ही पहा [ सं वृत्ति; प्रा. वइ ]

**वइचणें, वइरण, वइरणें, वई, वईकाठी, वईल, वईलचूल**—वैचणें, वैरण इ० पहा.

**वइंचणें**—उक्रि. वैचणें पहा. 'वइंचणें निसणें आणि गाळणें।' –साउइ ३.५२.

**वइला**—वहिला पहा.

**वइस**—न. वर्ष, वरिस पहा.

**वई**—स्त्री. कुंपण. वही पहा. 'वईवरलं कार्ले।'–मसाप २ १. ०**निघणें**–कुंपणींतून येणें; कुंपणींत असणें, जाणें 'जैसा मूषक निघाला वई।'–ह २१ २६. ०**निवडुंग**–पु निवडुंगाची एक जात, साबर–गोल निवडुंग –वगु ५.५५

**वईस**—न. विणलेल्या मालावरील निरुपयोगी म्हणून कापून टाकण्यांत येणाऱ्या दशा, कुरळ्या, निरुपयोगी कापूस, चिंध्या इ० याचा उपयोग यंत्रें साफ करण्याकडे होतो. [ इं वेस्ट् (कॉटन) ]

**वऊळ, वऊळदोडा, वक, वकटा, वकटें, वकणें, वकती, वकरा**—ओऊळ, ओकळदोडा इ० पहा.

**वंक, वंकट**—वि. वांकडा; वक्र. 'तैसे भ्रूभग वंकट। मिरवताति।'–ऋ ९७. [ सं. वंक, वक्र ]

**वकट**—नस्त्री. (विटीदांडूचा खेळ) एक अर्थाची संज्ञा; वकट पायावर विटी ठेवून मारतात याला 'पांव' असेंहि म्हणतात. 'वकट, पाय गेला फुकट' [ ते. वक्टु=एक ]

**वकट, वकटवणी, वकटवाणा, वकटवाणी, वकटा, वकटें**—(प्र) ओखट, ओखटवाणी इ० पहा.

**वक(कु)त**—पु वेळ, वखत पहा. 'माईला लेकरूं वळखेना असा वकत पडला।'–ऐपो ३३५. 'न्याहरीचा वकुत होईल'–यशोधन. [ अर. वक्त ]

**वंकनाळ**—नस्त्री मातेनें खाल्लेल्या अन्नाचा रस गर्भास ज्या वाटेनें पोहोंचतो तें नाळ; नाळद्वार. 'रस उपाय वंकनाळें। होत असे।'–दा ३.१ १२. [ देश्य का. वंक=द्वार+सं. नाल ]

**वकफीयत**—स्त्री. वाक्फीयत पहा.

**वकर**—पुस्त्री मान, प्रतिष्ठा, अब्रू, पत. 'अनास संदेह तुम्ही पाडोन वकर गमावला म्हणोन...कलह आरंभला आहे.' –पेद ६ २०३. [ अर. वकार् ]

**वकरा**—पु घोड्याच्या पायाचा एक रोग –अश्वप २.२७१.

**वकल**—न १ पत्नी. २ कुटुंब, खटलें. 'जोंवरि मिळविशि पैसा तोंवरी कुटुंब सारें तुझें वकल।'–राला १०. ३ (व.) आप्तपरिवार; नातेंगोतें. 'आमच्या वकलांत अशी मुलगी नाहीं.' ४ रांड; वेश्या 'वकील आणि वकल हे दोन, वकार वर्जावेत!' ५ भडवा, कुंटण्या. –व्यनि २५ ६ खातें, क्षेत्र, शाखा; प्रकरण; खटलें. 'स्वयंपाकाचें वकल या खोलींत असूं द्या आणि पालखीचें वकल पुढचे चौकात' [ अर वकूल् ]

**वकलात, वकालत, वकिलत, वकिलात, वकिली**—स्त्री. १ वकिलाची वृत्ति, धंदा, पेशा 'सेनकास वकालतीचे जावसाल लिहावयास प्रयोजन नाहीं.'–रा[१] २ शिष्टाई ३ मुखत्यारी; प्रातिनिधित्व [ अर वकिली, वकालत् ] ०**नामा**–पु वकीलपत्र.

**वकसणें**—अक्रि (प्रां) खरचटणें, घासटणें; सालटें जाणें. [ वसकणें ]

**वका, वकारणें, वकारा–री**—ओका, ओकारणें इ० पहा.

**वकाई–या**—स्त्री वातमी; वृत्तान्त 'पासा वकायाच्या फर्दा रोजच्या पाठविल्या'–दिमरा १ १२४. [ अर वकिआ–वकाइअ ]

**वकाई–नवीस**–पु. वातमीदार **वकाय(ये)निगार**–पु. वृत्त तलेखक, वाक्नीस, अखबारनीस. 'सर्व वकायनिगार चहूंकडे खबरा लिहितात.'–रा ६.४१९; 'गुलाम अहमद वकायेनिगार......

कर्जदारांनीं अटकावून ठेविले होते.' –दिमरा २.८५. [फा. वकाइअ-निगार्]

वकालद, वकलाद, वकिलद, वकिलाद्—स्त्री. (अप) वकलात पहा.

वंग्री—स्त्री. (खा.) मोठी विनतट्याची गाडी (भरतीची)

वकील—पु १ प्रतिनिधि; मुखत्यार; एखाद्यासाठीं अधिकारानें बोलणारा, वागणारा माणूस. २ न्यायसभेंत एका पक्षाचें म्हणणें पुढें मांडणारा, एक बाजू घेऊन तिच्या तर्फेनें पुरावे मांडणारा अखत्यारी माणूस. ३ एका राष्ट्राचा दुसऱ्या राष्ट्राच्या दरबारीं असलेल्या प्रतिनिधि. ४ कायदेपंडित. ५ मुनीम; एजंट; अडत्या. ६ सल्लागार; मंत्री. ७ देशमुखाचा दुय्यम; मदतनीस. हा वंशपरंपरा असतो. [अर. वकील्] ०इ-मुत्लक-पु पूर्ण अखत्यार असलेला राजप्रतिनिधि; (इं.) व्हाईसराय. हा किताब सवाई माधवरावाला दिल्लीच्या बादशहाकडून मिळाला होता.–ख४५८५; ४६२३. [अर.] ०मुत्लक-वकील-इ-मुत्लक पहा. 'कर्नेल मजकुरास वकील मुत्लक व आमचे ठिकाणीं जाणून, त्यांचें केल्यास आमचे व कुंपनीचे केलें जाणावें.' –ऐटि २.१४. ०मुत्लकी-स्त्री–स्त्री. वकील-इ-मुत्लकाची पदवी व काम. 'श्रीमंत पंतप्रधान यांचें नाव वकील-मुत्लकी व मीरबक्षीगिरी हे दोन्ही पदें घेऊन त्यांची नायबत आम्ही तुम्हांस देतों.'–दिमरा १.१०९. वकीलकी–स्त्री. वकीली. 'मन कठोर करून भावनारम्य तेच्या बळी न पडण्याचा अभ्यास वकीलकीमुळें होतो.' –सत्तेचे गुलाम ५९. ०नामा-पत्र–पुन विशिष्ट कामात वकील नेमल्याबद्दल दिलेलें अधिकारपत्र. 'गुन्ह्याच्या गुन्ह्या गुन्हेगारांची वकीलपत्रें घेणाऱ्या प्रतिष्ठित गुन्हेगारालाच सुचायच्या.' –सत्तेचे गुलाम ८.

वकूफ-ब—पु १ हुशारी; अक्कल, शहाणपणा २ सामर्थ्य; हिंमत; ताकद 'लोकांतला वकूब पाहिला तर कोणाच्या अंगीं हिंमत नाहीं.' –नि ९६७ ३ कर्तृत्वशक्ति, प्रभाव. [अर. वुकूफ्] ०दार–वि. जाणता, सुज्ञ, काबील. 'तुझा मातवर भाऊ वकूबदार असेल' –रा २० ६४ [फा वुकूफ्दार्]

वक्क(वख)ण्या—स्त्री.अव. (तंजा.) विपरीत, प्रतिकूल टीका. [सं. व्याख्यान, गु. वखाण=स्तुति]

वक्कर—पुस्त्री १ वकर पहा. २ (व) चेष्टा, नखरे.

वक्कल—वल्कल पहा.

वक्त—पुन. १ कालावधि, कालमर्यादा, ठराविक मुदत. २ विशिष्ट वेळ, घडी. ३ घडण्याचा एक प्रसंग, वेळ, संधि. ४ कठीण, खडतर वेळ, आणीबाणी. 'वक्ताची वेळ आली तर तो उपयोगी पडेल.' ५ अनुकूल, योग्य काल. 'नको आडवूं हा नव्हे वक्त श्रीं।' –होला ३७. [अर. वक्त] ०गुजराण–स्त्री. कालक्षेप. 'परागंदा होऊन परमुलखास जाऊन वक्त–गुजराण करीत असतां.' –रा १५.३१८. ०गैर–पु. अवेळ. ०बेवक्त–क्रिवि. वेळीअवेळीं. ०दीर–क्रिवि. १ वेळ, प्रसंग पाहून, अनुसरून. २ वेळेवर; वेळच्यावेळीं. वक्ताची वेळ–स्त्री. कठीण वेळ. वक्त अर्थ ४ पहा.

वक्तव्य—न. १ वचन; उक्ति २ नियम; अनुशासन. ३ (सामा.) भाषण, बोलणें. –वि. बोलावयास, म्हणावयास योग्य, क्रमप्राप्त, आवश्यक असलेलें. [सं.]

वक्ता—पु १ बोलणारा; व्याख्याता. 'होवोनियां श्रोता वक्ता। करी आपुली आपण कथा।'. २ भाषणपटु; चांगला, श्रोत्यांवर छाप पाडून बोलणारा. [सं.]

वक्तृत्व—न. १ बोलण्याचें सामर्थ्य, शक्ति. 'तैसें माझें वक्तृत्व साचार। परंतु नाहीं एक अक्षर'. २ चांगलें परिणाम कारक बोलण्याचें सामर्थ्य, वाक्पाटव. आपल्या मनांतील विचार व भावना दुसऱ्यास उत्तम रीतीनें पटवून देणें व त्याला आपल्या विचारानें भारून टाकण्याची कला. –के १३.१२.३५. ०ता–स्त्री. भाषणाची, व्याख्यानाची शैली. 'उजळली अजि वक्तृत्वता।' –ज्ञा १४ ६३. ०पाठ-पु अलंकारयुक्त भाषण; भुरळ पाडणारें वक्तृत्व ०शक्ति–स्त्री. वक्तृत्व अर्थ १ पहा. वक्त्री–स्त्री. उत्कृष्ट वक्तृत्व करणारी, भाषणपटु स्त्री.

वक्त्र—न. १ तोंड; मुख. 'धोयावया पवित्र वक्त्र। पसरली वैसे यशासी।'–सुदर्शनाख्यान(नवनीत पृ१८५). २ चेहरा. 'अवलोकिता तुझिया वक्त्रा। धनी माझी पुरेना।' [सं.] ०उजळ करणें–काळोखा घालविणें. 'यादवाचें वक्त्र उजळ। केलें तेव्हां मुकुंदें।' –ह १६.१८२.

वक्फ—पु दानधर्म, धर्मादाय; देणगी. [अर.]

वक्फा—पु थांबणूक; मुक्काम, खोळंबा. 'वीस दिवस कमठाण्यावर वक्फा...' –रा ७ ८६. [अर. वक्फा]

वक्र—वि. १ वांकडें, वांकलेलें; वांकदार –ज्ञा १३.१०६०. २ नागमोडी चालीचा; वळणावळणाचा. ३ प्रतिगामी; वक्रगति (ग्रह) ४ (ल) कपटी, अप्रामाणिक स्वभावाचा, वाकुडीचा; कुटिल –क्रिवि. शत्रुत्वानें; वाकड्या नजरेनें. 'समर्थाचिया सेवका वक्र पाहे।' –राम. ०गति–स्त्री. १ नागमोडी मार्ग; अशा मार्गानें जाणें. २ परागति; मागें जाणें. उदा० एखाद्या ग्रहानें मेषापासून वृषभराशीकडे न जातां मीन राशीकडे जाणें. ०गतिगामी–वि. १ प्रतिगामी. (ग्रह) २ (ल) वाकड्या चालीचा. ३ भलत्याच वाटेनें जाणारा. ०ता–स्त्री. १ वांकडेपणा. 'तुझी तोडीन रे वक्रता। सारिवक्रता पाहें माझी।' –एरुस्व ११४. २ (संगीत) तान वाकडी करून गाणें. ०तुंड-मुख–पु गणपति. 'सरळ सोंड वक्रतुंड त्रिनयना।' –आरती गणपतीची. –वि. १ वाकड्या तोंडाचा. २ तोंड वाकडें (आंवट) केलेला. ३ तोंड

एकीकडे फिरविलेला. ' जे तुल्याविषीं मूढ । तयां लागीं तूं वक्रतुंड।' –ज्ञा १७.४. [ सं. तुंड=तोंड ] ०दृष्टि–स्त्री. १ वांकडी, तिरपी दृष्टी; तिरळेपणा. २ ( ल. ) अवकृपा; विरुद्ध, दुष्ट भावानें पाहणें. –वि. १ तिरळ्या डोळ्यांचा; चकणा; काणा. २ मत्सरी; द्वेषादावा करणारा; बरें न पाहणारा. ०पातळी–स्त्री. जिचा केवढाहि भाग सरळ पातळींत नसतो अशी पातळी. –महमा २. ०पुरदीस–स्त्री. ( मिश्रित समास ) उलट तपासणी, सवालजबाब. [ सं. वक्र+फा. पुरसीश ] ०रेषा–स्त्री. जिचा केवढाहि भाग सरळ नसतो अशी रेषा. –महमा २. ०संस्था–स्त्री. वांकडी असण्याची स्थिति ( पृथ्वीची ). ०स्वर–पु. ( संगीत ) आरोह अवरोह करतांना ज्या स्वरावरून मागील स्वरावर गायक फिरतो तो स्वर. वक्रानन–वि. वक्रतुंड पहा. ' वक्रानना तूं सुखदायका । ' –भूपाळी गणपतिची ४. [ वक्र+आनन ] वक्रावलोकन–न. वोरून दृष्ट्या पाहणें; वक्रदृष्टि. [ वक्र+अवलोकन ] वक्रिय–वि. वांकडा. वक्रिमा–पुस्त्री. वांकडेपणा. वक्री–वि. १ ( ज्यो. ) विरुद्ध गतीनें ( मेषाकडून मीनाकडे ) जात आहेसा दिसणारा ( ग्रह ). याच्या उलट मार्गी. २ वक्रदृष्टीचा; मत्सरी; शत्रुत्वानें वागणारा. वक्री येणें–जाणें–असणें–वक्रगति होऊन येणें इ०. वक्री होणें–( कोणेकावर ) वक्रदृष्टि होणें. वक्रीक्रमण–न. ( ज्यो. ) ग्रहानें उलट जाणें; वक्री होणें. वक्रीभवन–न. ( पदार्थ ) पदार्थांचे किरण एका पारदर्शक पदार्थांतून दुसऱ्यांत जात असतांना आपला सरळ मार्ग सोडून थोडेसे जे वांकडे होतात तो प्रकार. ( इं. ) रिफ्रॅक्शन. वक्रोक्ति–स्त्री. १ वाकडें, लावून बोलणें. ' कृपावंता कोप न धरावा चित्तीं । छळूं वक्रोक्ति स्तुती करूं । ' –तुगा १५९०. २ एक शब्दालंकार. बोलणाराचा अर्थ एक असावा व दुसऱ्यानें त्याचा दुसराच अर्थ घ्यावा असा प्रकार. उदा० ' आज माझें फार पोट भरलें असें मी त्यापाशीं बोलतों असता, भरलें असलें तर धुवून टाक अशी तो वक्रोक्ति बोलला. ' ' ऐकोनि वक्रोक्ति छंद बंध । ' –एभा २५.८७.

वक्र–पु. प्रतिष्ठा. वकर पहा. ' यांत श्रीमंतांचा वक्र काय राहिला ? ' –ख १.४०७. [ अर. वकार ]

वखट, वखटवणी, वखटवाणा-णी, वखटा, वखटें–ओखट, ओखटवणी इ० पहा.

वखट्या तोंडाचा–वि. ( माण. ) तोंडावर देवीचे वण असलेला. [ ओखट+तोंड ]

वखडा–पु. ( ना. ) विसाडखाई. [ वखवख ]

वखत, वखुत, वख्त–पुन. वेळ. वक्त पहा. म्ह० वखत पडे वांका गधेको कहना काका. वख्त-गैरवख्त–क्रिवि. वेळीं अवेळीं. ' अंबारखाना चागला वक्तगैरवख्त कामा आला. ' –भाअ १७३४.४९.

वखद–न. औषध. ओखद पहा. ' वखद उपाय करूनि कांहीं। ' –दावि २६१. [ औषध अप. ] वखदी–वि. औषधी; औषधोपयोगी.

वखर-रा–पुन. १ शेतकीचें एक हत्यार. यानें शेतांतील तण, गवत मुळासकट उपटून काढतात. २ जमीन सपाट करण्याचें औत; कुळव. –शे १०.१९९. चारवेली वखर. –शे ६.७५ [ सं. विकृ-विकिर ] वख(खा)रणें–उक्रि. १ वखरानें तण इ० काढून टाकून साफ करणें. २ नांगरल्यानंतर जमीन सारखी करणें.

वखवख–स्त्री. १ खा खा सुटणें; क्षुधातिशय; तृप्ति न होणारी भूक. २ ( ल. ) अतृप्य लालसा; अभिलाषातिशय; तृष्णा; लोभ. ३ ( भिकारी, मुलें, तगादेदार इ० कडून ) छळणूक; त्रास; जाच. ४ पोटांत तुटणें ( भूक, पित्त यामुळें ). ५ खंगणें ( काळजीनें ). ६ तगादा; दपटशा ( कामाचा ). ७ वरील प्रकारची स्थिति. ८ ( व्यापक ) उपहास; दुर्लौकिक; छळ. ९ उपहासाची, बदलौकिकाची स्थिति. ( क्रि० करणें, होणें ). [ ध्व. तुल० सं. वप्-वस ] वखवखणें–अक्रि. वखवखीनें विशिष्ट होणें. वखवख्या–वि. १ वखवखलेला; अतिशय भुकेला. २ हावरा; लोभी. ३ त्रास देणारा; छळणारा; उपहास, बदलौकिक करणारा.

वखा–पु. १ शेर; शिधा; रतीब; भत्ता ( रोजचा इ० ). ( क्रि० घालणें, लावणें ). २ नियमितपणें ठराविक शेर घेणें ( क्रि० घेणें ).

वखा–पु ( ना. ) गोट्या खेळण्यासाठीं केलेला खळगा; गल.

वखार–स्त्री. १ विकावयाचा माल साठवून ठेवण्यासाठीं बांधलेली जागा, गोदाम. २ धान्य सांठविण्यासाठीं केलेलें भिंतीतील पळद. ३ मोठा सांठा; कोठार [ देप्रा. वक्खार; हिं. वखार ] ०दार, वखारी–पु वखारीचा मालक.

वखारणें–उक्रि. वखरणें पहा.

वग–स्त्री. १ कृपादृष्टि, मेहेरबानी; आश्रय ( मोठ्या लोकांचा ). २ ओळखदेख, स्नेहभाव; शरीरसंबंध; वळण ( अगत्यवाद पडण्याजोगें ). ३ वशिला; शिफारस. ४ प्रतिष्ठा; पत. ' जगजीवनाची बहीण खासा सुंदराबाई दमाजीच्या भावास ( दिली ) आहे. तिकडे यास वग मोठी आहे. ' –ऐच २४७ [ अर. वक्अ ] ०वशिला–वसीलत–पुस्त्री. वग पहा. ' आमचा वग-वशिला पायांखेरीज नाहीं. ' –ख १.१६८. ' परंतु वग-वसीलतीमुळें भिडेनें कागद पत्र करून घेऊन जोरावरीनें वतन खातात ' –वाडसनदा १३३.

वंग–न. १ कथील २ शिसें; जस्त. ३ –पु बंगाल प्रांत. ४ वांगें. [ सं ] ०भस्म–न. कथिलाचें भस्म; एक औषधी रसायन ०भंग–पु. बंगालची फाळणी. –टि ३.४५.

वंग–पु. कलंक; मळ; डाग. –ज्ञा १०.३१३. ' तुज म्यां अज्ञानपणें वग । समतेचा लाविला । ' –स्वानु ४.१.१६. [ देप्रा. वंक=कलंक ]

**वगड**—स्त्री (व.) असडीक तांदूळ. वगड पहा.

**वंगडी, वांगडी**—स्त्री. (लोखंडकाम) मध्ये रुंद असलेलें पसरट उतरतें लोखंडी चाक खोलगटपणा देण्यासाठीं याचा उपयोग करतात [वक्र=वाकडा]

**वंगण**—न करकर वाजू नये, झिजू नये, हलका यावा इ० साठीं गाडा, रहाट इ० कांचे कणा, चाक इ० अवयवांस लाविंतात तें तेल, ओंगण. [सं. व्यजन] **वंगणें**-उक्रि. १ वंगण लावणें. २ (ल) नरमणें; भिऊन वागूं लागणें 'शिवा जर इतका वंगला होता'–सुर्यग्र २५८, –वज्राघात ७२. ३ वठणीवर येणें. **वंगविणें**-उक्रि. १ वंगण लावणें. २ मऊ करण्यासाठीं, ताळ्यावर आणण्यासाठीं तूप चोपणें ३ नामोहरम करणें. ४ पैसे द्यावयास लावणें [वगणें प्रयोजक; भि. वंगणु=गाईचे दूध काढतेवेळीं मागचे पाय बांधणें]

**वगणें**—अक्रि. भडकणें, अनिवार होणें. 'विवादें वगलें तोंड। मनीं शोक काढी उदंड।'–सिस ३.१८१. [सं वग्–वंगन=हालणें]

**वगत**—पु वक्त, वखत पहा.

**वगतृत्व**—न. (अप) वक्तृत्व पहा 'येक वगतृत्व श्रवणीं पडे। तेणें झालें समाधान मोडे।'–दा ७ ८.१००

**वगदी**—वि. (अशिष्ट) वखदी. औषधी पहा.

**वगर**—वि. (तंजा.) अपत्र, तुरट (सुपारी)

**वगर**—स्त्री. म्हैस. वगार पहा. [ते.] ०**मासा**-पु (वे.) सुसर; मगर

**वगर**—शभ शिवाय. विगर, बगर पहा.

**वगर, वगरणें, वगराळें**—ओगर, ओगरणें इ० पहा.

**वगळ**—स्त्री १ निवडक अंश काढून घेतल्यावर खालीं राहिलेला भाग, गाळ २ (ल) गाळसाळ, टाकाऊ माल. –वि १ वगळलेला, खालीं राहिलेला २ (ल) टाकून देण्यायोग्य, वाईट, टाकाऊ (पदार्थ) [वगळणें] ०**सगळ**–स्त्री. गाळसाळ.

**वगळ**—स्त्री (को) गवतासाठीं मुद्दाम राखून ठेविलेली जमीन. **वगळणी**-स्त्री. गाळणें, सोडणें, बाहेर टाकणें. **वगळणें**-उक्रि १ बाहेर ठेवणें, सोडणें, टाकणें, अनादर दाखविणें, टाळून जाणें. २ (चुकीनें) वचळणें पहा. [स. विगलन]

**वंगळ**—वि. वाईट, ओंगळ पहा. ०**वाणा**-वि ओंगळवाणा. ०**सगळ**-वि वाईटसाईट, घाण, अमंगळ **वंगाळ**-वि. (कुण.) वंगळ. 'घाण्याचा जनुम हात लई वगाळ लागतुया' –याव २.२

**वगात**—पु (कु) वखत, वक्त पहा

**वगार**—स्त्री (गो व) म्हशीची पारडी, रेडी. वगारूं–न रेडकू [ते. बगार=म्हैस]

**वंगारी**—स्त्री. वंगण लावण्याची काठी, सळई. [वंग+अरी]

**वगी**—स्त्री. (जरतारधंदा) बारीक आणि जास्त जवळ जवळ तारा असलेली जर.

**वगीच, वग्गी**—शभ. (गो. कुण.) उगीच पहा.

**वंगु**—वंग पहा.

**वगैरे-रा**—अ. आणखी, आणि दुसरे; व इतर; इत्यादि; आदि करून. 'सुभेदार फडणीस वगैरे झाडून सारे आमचे घरीं आले होते' 'ते समयीं चाहुजी गोरे वगैरा कोळी...'–वाडबाबा १.११. [अर. फा. वगैरा]

**वग्र**—वि. (प्र) व्यग्र पहा. 'सोकट्याच्या खेळामंदी गुंतला वग्र'–ऐपो ३४०. [स. व्यग्र]

**वघळ**—पु १ ओघळ पहा. २ घळ, दरड. 'किनाऱ्यास मोठमोठ्या वघळी फार आहेत'–धर्मांजी १५०. **वघळणी**-ओघळणें धातुसाधित नाम **वघळणें**-सक्रि. १ ओघळणें पहा. २ वगळणें, बलांडून जाणें. –अक्रि १ ओघळणें पहा २ खरडून जाणें, खरकणें (पाण्याच्या झोताखालील जमीन, माती) ३ अंगावर धावून जाणें (रागानें अंध होऊन). (देशावर ओघळणेंचें रूप वोघळणें असें होतें ओघळणें याच्या अर्थाखेरीज देशावरील इतर अर्थ वर दिले आहेत) ०**निघळ**-ओघळ निघळ पहा.

**वच**—न (काव्य) १ भाषण, बोलणें २ बोल, शब्द. (काप्र.) 'मनस्येकं वचस्येकं।' =पोटांत एक आणि ओठांत एक.

**वचक**—पु १ दरारा; भीति, धाक (क्रि० खाणें, बाळगणें, पाळणें, राखणें, ठेवणें, धरणें) २ धसका, दचका, धस्स होणें. (क्रि० घेणें, बसणें) 'पाहता देवाही वचक पडे।'–ज्ञा ११. ३३६ ३ भय, भीति. 'देती दु खाचे सज्जनास वचक थवे।' –मोमत्र ३.१०. ४ कल्पना, विचार; अंदेशा. (क्रि०जाणें, होणें). 'म्या सावली पाहिली मला वचक गेला कीं रामाजीपंत आले असतील' [हिं. भचक, तुल० स भय+चक्] **वचकणें**-अक्रि. १ वचक बसणें, भीति, धास्ती वाटणें 'म्या तो किति वर्णावा बहु वचके श्वेतवाह वीरा ज्या।'–मोभीष्म १०.७४. २ एकदम भयचकित होणें, धक्का बसणें 'उगाच का मी वचकों निघालों।' –सारुह ५.३३. **वचका**-पु १ वचक पहा २ ओचका पहा. (क्रि० पडणें).

**वचक**—वि. घोड्याचा एक रंग –अश्वप १.२८.

**वंचक**—वि फसव्या, लबाड, ठक, सोदा. [स वञ्च्] **वंचणूक**-स्त्री फसवणूक **वंचणें**-उक्रि. १ फसविणें. –ज्ञा ४.३०. 'रिघ धारिला वंचिलें पक्षीं।'–मुआदि १०.७. –अक्रि. फसणें. –ज्ञा १७ ३५६. 'तो चपलांमें जन जो न वाची।'–सारुह १.३१. **वंचतुक**-स्त्री. वंचना, फसवणूक 'नावाजिलें तुम्ही म्हणा आपणासी बो। तरी का वंचतुक सुमनासि वो।'–तुगा १४२. **वंचन**-

ना-नश्री. प्रतारणा; फसवणूक; लबाडी. वंचित-वि. फसलेला; प्रतारित.

वचकन-कर-दिशीं—वमकन-कर-दिशीं पहा.

वचकनें—न. (चांभारी) लहान मुलाचा जोडा.

वचकवचक—क्रिवि. पाईनें खाणें, पिणें, बोलणें, लिहिणें, कापणें, मारणें इ० तोडणें वगैरे क्रियांच्या शब्दांचें अनुकरण करून.

वचका—वि. १ वसवस करणारा, खेकसणारा. २ वाचाळ; तोंडाळ. ३ हलका; क्षुद्र; मूर्ख; फुसका. [ध्व. वच!]

वचकाणा—पु. (क.) वचपा.

वचणें—अक्रि. जाणें. 'यालागीं नवचें वौंडिण्यपुरा।'-एरुस्व १४.५. -ज्ञा १.२४०. [सं. व्रज्; प्रा. वच्च]

व(वं)चणें—उक्रि. १ वेंचणें; खर्चणें. २ टाळणें; त्याग करणें. 'कीं मी वृथिवें प्राङ्मुखें। होऊनि वंचिजे तुज।'-ऋ ५०. ३ टाळणें; चुकविणें. 'प्रकाश तो प्रकाश वीं। यासी न वचे घेई चुकी।'-अमृ ७.२८९. ४ हरविणें; सांडणें. 'त्यानें दोन पानें वंचलीं.' ५ वगळणें.-अक्रि. मुकणें; आंचवणें; अंतरणें. 'हा वंदीस पडला आणि आपल्या सर्वस्वास वंचला.' [सं. वंच्]

वंचणें—अक्रि. वांचणें पहा. -ज्ञा १६.१०६. 'एन्हवीं न वंचमि निर्भ्रांत।' -उपा १८०८.

वचन—न. १ भाषण; बोललेली गोष्ट. २ शब्द; भाष; निश्चयपूर्वक सांगणें. ३ विधान. ४ उक्ति; सूक्त. ५ प्रमाणभूत आधार; प्रामाण्य. 'मुख्य प्रभुचें लक्षण प्रत्यक्ष ज्यास वचन भारती।'-ऐपो ३२०. ६ (कायदा) करार; प्रतिज्ञा. ७ अवतरण; ग्रंथांतील उदाहरण. 'सर्व देवांसि नमस्कारिलें। तें एका भगवंतासि पावलें। येदर्थी येक वचन बोलिलें। आहे तें ऐका।' -दा ४.६.११. ८ (व्या.) नामाच्या ठिकाणीं एकत्वरूपानें अथवा अनेकत्वरूपानें असलेली अर्थाची उपपत्ति. 'एकवचन, द्विवचन, अनेक -बहुवचन.' [सं.] म्ह० वचने किं दरिद्रता=तुमतें बोलण्यांत कमीपणा कशाला? बोलायला काय जातें? ०चिठी-ट्टी-स्त्री. कर्ज घेतांना लिहून दिलेला रोखा. (इं) प्रॉमिसरी नोट. 'एखाद्या चुकार ऋणकोनें हिशोबाची भानगड दाखवून वरीवशी सूट घेऊन वचनचिठी लिहून द्यावी.' -सासं २.१६६. ०भंग-पु. करार, शपथ मोडणें. ०भाक-स्त्री तोंडी करार, व्यवहार ०विरोध-पु. वचनाच्या विरुद्ध वागणें. वचनाचा खरा-धड-वि. वचनाप्रमाणें वागणारा; वचन पाळणारा. 'खरा लोककल्याणेच्छु व देशाभिमानी पुरुष म्हटला म्हणजे......तो वचनाचा धड असला पाहिजे.' -नि. वचनाच्या आंतेंत, अर्थ्या वचनांत असणें, वागणें-अतिशय आज्ञाधारक, विनीत असणें वचनीं गोवणें-एखाद्याला त्याच्याच शब्दांत, वचनांत गुंतविणें; वचनानुसार करावयास भाग पाडणें. 'म्हणती श्रीकृष्ण आमुचें जीवन। सत्यभामेसी वचनीं गोवून। वेंसें नेतोसी दयार्णवा।'-ह ३०. १४३. वचनीं राहणें-शब्दांत वागणें. 'वचनी राहुनि काम मनांतिल पुरवीं ऐशी त्यजिली रामा।'-मराठी ६ पु. (१८७५) १५६. वचनावचनी-स्त्री. तोंडी करार, व्यवहार; वचनभाक.

वचनीय-वि. १ बोलण्या-मांगण्यासारखें. २ शब्दांनीं व्यक्त करण्यासारखें; वर्णनीय.

वचनाभी—स्त्री. वचनाग. 'वचनाभी ते आधीं लागोनि गुळचट।' -दावि १२७ [सं. वत्सनाभि]

वचपा-वा—पु. (प्र.) वजपा पहा.

वचवच—स्त्री. वडवड. (क्रि० करणें). वचवच-चर्चा-क्रिवि. १ विसकटून, चिवडून, विसकाहून इ० रीतीनें (डुकराप्रमाणें किंवा अडाणी रीतीनें अन्न खाणें). २ निरर्थक व मूर्खपणानें (बोलणें, करणें). [ध्व. वच!] वचवच्या-वि. वटवट, वचवच करणारा; वडवड्या.

वचा—स्त्री. वेखंड. [सं.]

वंचा—पु. ओंचा पहा.

वंच्य-च्यु—वि. (महानु) कृपण. 'पैसाही दीनु वंच्यू। कहीं नव्हेचि तुज।' -ऋ ४७. [सं. वच्]

वछ, वच्छ—पुन. १ वांसरूं (गाईम्हशीचें). 'धेनु वछाचेनि लागें।'-दावि ४८०. 'गोप वच्छें गिळौनि ठेला।'-दाव १०५. २ बालक; लेकरूं. 'जे आर्तें वच्छा नंदनी।' -ऋ १. [सं. वत्स; प्रा. वच्छ] ०प-पु. गोप; गोपाळ. वछल-वि. (प्र) वत्सल 'भक्तवछल जगत्पती।' -वेसीस्व २.३७.

वछाड—न. घोड्याचें स्वारीचें सामान.

वच्छात—पु. दांडीवाल्यांना, दलालांना माल पुरविणारा शेतकरी, कूळ. हे दांडीवाले यांना आगाऊ रकमा देतात व मालांतून त्यांची भरपाई करून घेतात. विछायत अर्थ ४ पहा. [गु. वछियत]

वच्छावंगी—स्त्री. (वि.) तोंडी लावण्याची तांदुळाची फेणी.

वज, वजच, वजवज-जां, वजेनें, वजेवजे—क्रिवि. (अशिष्ट) हळू; सावकाश; धीमेपणें.

वज—स्त्री. (व) १ काळजी; व्यवस्था; ओज. २ सोय. [सं. ओजस्; का. ओजे, म. ओज] ०नीज-स्त्री. वज अर्थ १ पहा. ०वजेनें-क्रिवि. काळजीपूर्वक. वजणें-अक्रि. निगा राखली जाणें; काळजी घेतली जाणें. 'शेत चागलें वजलें.' ओजणें पहा. -रंयो १०.४०४. वजविणें-ओजविणें पहा.

वज—स्त्री. (कर्ना. कु वौं.) संवय; पद्धत; रीत. [अर. वज्ह्] वजावणें-संवय होणें.

वज—न. वेखंड; वचा पहा.

वज—अ. (कु.) पादपूरणार्थी अव्यय. 'माझाँ वज काय?' माझें काय?

**वंज**—स्त्री. (चंद्रपुरी) स्वारी. 'भावाची वंज बहीण पाहिली।' -मनोरंजन जुलै १९३२.

**वजडी-डें**—स्त्री. (मांसाहार) पोटांतील मांसाचा भाग.

**वंजण**—न. (घागरी इ० ना) घासण्याचोपडण्याचीं द्रव्यें. (तेल, चिव्वे इ०). [सं. अंजन; म. वंगण] **वंजणें**-उक्रि. तेल, चिक्ने इ०च्या मिश्रणानें (पाण्याची, मातीची घागर) माखणें, घासणें.

**वजणें**—अक्रि. जाणें; वचणें पहा. -तुगा १०५. 'न वजावें त्याचे घरां।' -व २४३.

**वजन**—न. १ पदार्थाच्या ठिकाणचा जडपणा; भार; गुरुत्व. २ याची इयत्ता समजण्यासाठीं (मासा, तोळा. धडा, मण, इ०) जी ठराविक वस्तु वापरतात ते ३ गुरुत्वाची इयत्ता समजण्यासाठीं करावयाचा तोल, तोलण्याचा व्यापार. ४ ओझें; भार. 'आपलें सर्व वजन दुसऱ्यांवर घालूं नये.' ५ इभ्रत; प्रतिष्ठा; मान. 'मनुष्याच्या आंगच्या सद्गुणांमुळें त्याचें लोकांत वजन वाढतें.' ६ महत्त्व; किंमत. 'हेस्टिंग्जचा प्रयत्न आपलें पेशव्यांशीं वजन रहावें म्हणून होता.' -विवि ८ ६.११४. ७ (शाप.) भार; प्रतिबंधाचें अतिक्रमण करण्यास लाविलेली शक्ति -यंस्थि ३. ८ वशिला; वर्चस्व, छाप. 'माझ्या कामांत त्यानें अधिकाऱ्याजवळ आपलें वजन खर्चीं घातलें' [अर. वज्न्] ०कशी-पु वजनेंमापें तपासणारा अधिकारी. -वाडमा १.१२०. [वजन+कस] ०दार-शीर-वि. १ विशेष जड, जास्त वजन असलेला. २ (ल) प्रतिष्ठित; तोलदार; छाप पडेल असा (माणूस) 'वजनदार गणोजी तांडेल.' -चित्रगुप्त १२४. [फा. वज्न्+दार; सं. शील] ०दारी-स्त्री. १ प्रतिष्ठा; महत्त्व; सत्ता. २ परिणामकारकता; चांगला बाधीवपणा. 'अशा योगानें वाक्य किंवा वाक्यांश याची वजनदारी राहत नाहीं.' -विवि ८.४.९२. ०पूर-वि. शेर, तोळा इ० विवक्षित वजनानें पुरा; पुऱ्या वजनाचा. **वजनी**-वि. १ तोलण्याचा; मापण्याचा नव्हे असा (शेर, मण, खंड इ० प्रमाण) याच्या उलट मापी. २ वजन करून देण्याघेण्याचा (तूप, गूळ इ० पदार्थ) [फा. वज्नी] ०माप-न. वजन करून पाहण्यासाठीं असणारें प्रमाण

**वंजन**—न. भाजीमध्यें तिखट चव यावी म्हणून मिसळतात ती डाळ इ० [सं. व्यंजन]

**वजपा-वा**—पु. १ वचपा, एखाद्या गोष्टींत कांहीं अधिक उणें झालें असतां त्याची बरोबरी त्या सारख्याच दुसऱ्या गोष्टींत करण्यासाठीं केलेला कमीअधिकपणा. (क्रि० काढणें; निघणें, घेणें, घालणें) 'असें असल्यामुळें अधिक उष्णता गेल्याचा वजपा निघून जातो.' -मराठी ६ वें पु. (१८७५) पृ. १२५ २ समतोलपणा; भरपाई; कमीअधिक असेल तें ठीक, बरोबर करणें. 'त्यानें मला मारलें खरें त्याचा वजपा मी काढवीन.' -शअ.क्रिवि. मोबदल्यांत; कमीअधिकपणा घालविण्यासाठीं म्हणून. 'इच्या वजपा दुसरी वस्तु द्यावी.' [अर. वज्ञा; म. वजा] ०निघणें-भरपाई होणें; कमीअधिकपणा (मागें झालेला) नाहींसा होणें.

**वजमजुरी**—स्त्री. (ना.) शेता-रानांतील कावाडकष्टावर मिळणारा रोजमुरा.

**वजर**—पु. (कु.) खोल डोह.

**वजरवट्ट, वजरावळ, वजरी**—(प्र.) वज्रवट्ट, वज्रावळ, वज्रा पहा.

**वजरो-रें**—वजडी-डें पहा.

**वजवज-जां**—क्रिवि. १ वज, वजच पहा. सावकाश. २ (व.) लौकर. हा विरुद्ध अर्थ चुकीनें झाला असावा. 'उन्ह फार आहे, वंजवज चाल.'

**वजविणें, वंजळ**—ओजविणें, ओंजळ पहा.

**वजा-वजे**—स्त्री. तऱ्हा; प्रकार. 'मुंबईस तोतया येत असता तुम्ही दस्तगीर करून नेला याची वजे काय?' -ख ७.३५७१. -वि. तुल्य, सदृश्य; सारखा, ह्या प्रकारचा. (समासांत) खरेडवजा; कुळंबीवजा; मातीवजा. [अर. वज्ह्] -क्रिवि. प्रकारें; प्रमाणें. 'चालीवजा.'

**वजा**—स्त्री. वर्जन; वजाबाकी; उणें करणें. -वि. उणा केलेला; कमती; कमी; काढून टाकलेला, घेतलेला. [अर. वज़्आ] ०करणें-कमी करणें, काढून टाकणें. 'नोकरीवरून लोक वजा केले.' ०ई-स्त्री. १ वजा घातलेली, सूट दिलेली रकम. २ खालीं आणणें; बढतीच्या उलट. 'रिसाल्यासंबंधानें बहाली, बडतर्फी, तरक्की किंवा वजाई करण्याचा पूर्ण हक्क तुम्हांकडे राहील.' -रा ७.१५. ३ न्यून; उणीव. ०बाकी-स्त्री. १ (गणित) मोठ्या संख्येंतून लहान संख्या कमी करून बाकी काढण्याचा व्यापार. २ वर्जन, वजा करणें. ३ हिशेबाची शिल्लक बाकी. (क्रि० करणें). ४ वजा करून आलेलें उत्तर. [अर. वज़्आ + बाकी] ०बाकी बेरीज-स्त्री. वजाबाकी आणि बेरीज. एकदम एकाच उदाहरणांत हे दोन्ही गणिताचे प्रकार शिकविणें. ०बाट-स्त्री. १ देणेंघेणें चुकतें करून, बाकी काढून हिशेबाचा केलेला उलगडा; हिशेबाचा मेळ मिटविणें. २ उचलपटी (व.) वजावाटोळें. ३ एकंदर रकमेंतून विशिष्ट रकम वजा घालून काढलेली बाकी. ०शिरस्तायाद-पु. शिवाजीच्या काळीं जमाबंदींत दर बिघ्यास ३ पाड जमीन वजा टाकण्याची असलेली पद्धत ०सूट-स्त्री. वजनामापांत विशिष्ट प्रमाणांत दिलेली सूट.

**वजा**—स्त्री. पाठविणें, रवानगी. 'कोणाचे हुजूर कैसे असतात हें कळत नाहीं. याकरितां वरचेवरीं गडाखालेंच जावसाल देऊन वजा करीत जावें. -रा ८.९१. [वजणें किंवा अर. विदाअ]

**वजा**—पु (राजा) १ लोहारकी आणि सुनारकी असे दोन्ही धंदे करणारा माणूस २ अशा माणसासाठीं सन्मानाची पदवी. –आडिवऱ्याची महाकाली ११.

**वजा**—स्त्री स्वरूप, आकार, तऱ्हा 'अनगरची रचना खेड्यात होत असली तरी रेल्वे स्टेशन झाल्यापासुन त्यास शहरी वजा आली होती ' –महाराष्ट्र शारदा, जानेवारी १९३७ [अर वजह्]

**वंजार-री-वंजारा-री**—पु वणजार-री पहा एक जात व तींतील व्यक्ति हे लोक बैलाच्या तांड्यावरून धान्य वगैरे घालून विकण्यासाठीं देशोदेशीं फिरतात ' त्या वनारें वृषभकटक। त्यानीं पडून त्याचा शोक।' –नव २४ १७६ [स वाणिज्यकार, फा बिरंजिारी] ०दांड-डा-वि वनाऱ्याप्रमाणें दणगट, दांडगा विशेषत आडदांड वजाऱ्याला हें विशेषण लावतात

**वजारत**—वजिरात पहा [अर विझारत्] ०मआब-मद्दा-पु श्रेष्ठ वजीर एक पदवी ही आमे सरदाराना असे –वाडशा २

**वजावजवी-वी, वजावाजव-जीव**—क्रिवि योग्य, न्याय्य, वाजवी [वाजवी द्वि]

**वजिरात**—स्त्री वजिरी, वजारत –दिमरा २ १३ [अर विझारत्] **वजिरी**-स्त्री १ वजिराचा हुद्दा, दिवाणगिरी, प्रधानकी २ (गंजीफा) वजीरास द्यावी लागते ती तलफ तल्फ पहा –वि वजिरासवधीं (रीत, डौल, भाषण इ०) **वजीर**-पु १मुख्य प्रधान, दिवाण, सामत २ बुद्धिबळाच्या खेळांतील राजाच्या खालचें मोठें मोहरें प्रधान [अर वझीर]

**वजीफा**—पु सरकारी तैनात, जहागिरी –वि बिनचाकरीचा 'गायकवाड याच्या अमलात वजीफा इनाम जमीन ७५ विघे' –वाडबाबा १४५ [अर वजीफा हिं] **वजीफदार**-पु जहागीरदार

**वजीभारा**—पु (क) कावट्याचा भारा [सं वंजु+भारा, वंजुल=वेत]

**वजीरमूठ**—स्त्री वज्रमुष्टि-मूठ पहा –शर

**वजु-जू-ज्जू**—न (मुसल्मानाचें) हात, पाय, तोंड धुणें, क्षालन (क्रि० करणें) 'मशिदींत प्रार्थना करण्यापूर्वी मुसल्मान लोक वजू करतात' –सह्याद्रि आक्टोबर १९३५ [अर वुजु, वुजू]

**वंजुळ**—स्त्री (प्र) ओंजळ पहा 'सरस होत त वजुळी मापें।' –दावि ८० [स अजलि]

**वंजुळ**—पु वेत, एक लता 'प्रवाळ वजुळ नारिकेळ घन।' –नरहरितनय (मार्कंडेयचरित्र) [स वजुल]

**वजूद**—पु १ अस्तित्व २ शरीर –आदिलशाही फर्मानें [अर वुजूद]

**वज्जर, वज्जेर**—क्रिवि वि (व) फार. पुष्कळ.

**वज्जीराज्ज**—स्त्री वजावाट पहा –मसाप २ २ २९.

**वज्र**—पुन १ इंद्राचें आयुध, (सामा) अमोघ शस्त्र २ हिरा 'माणिक मोती प्रवाळ। पाचि वैडूर्य वज्र नीळ।' –दा ८. ६ ३४. ३ वीज, विद्युत् ४ वज्रतुंड पहा –पु १ सत्तावीस योगा पैकीं पधरावा २ जाज्वल्य, दहशत बसविणारा माणूस (योद्धा, शास्त्री) हा शब्द पहिल्या पदीं येऊन पुष्कळ समास होतात काहींचे अर्थ पुढें दिले आहेत ०आंगठी-स्त्री त्रिकोनाकृति कोंदणांत हिरा व तीन कोनावर तीन रत्नें बसविलेली अशी आगठी –देहु ४९ ०कपाट-न वज्राचें, हिऱ्याचें कवाड, दार 'मुक्तिचे वज्रकपाट। कामीनि हे।' –भाए ७५६ ०कवच-न वज्राचें, वज्रासारखें अभेद्य चिलखत 'जैसें वज्रकवच लेइजे। मग शस्त्राचा वर्षावो साहिजे।' –ज्ञा २ १३२, –एभा १५ ७ ०कीट-पु खवल्या मांजर ०कीटकी-स्त्री (महानु) एक रोग-जतु 'कव्हणा एका अताचीए सवडी वज्रकीटकी लागली असे।' –दृष्टात पाठ २ ०कृत-वि घट्ट, घट्ट बसेल असें केलेलें ०गर्भ-स्त्री एक प्रकारची शिकवाळी (व) गिमडा –देहु ४५ ०गांठ-स्त्री. पक्की, न सुटणारी गाठ 'कर्माच्या वज्रगाठी। कळासे तो।' –ज्ञा १८ ३९२ ०घात-पु १ वज्राचा प्रहार, तडाखा २ (ल) मोठी आपत्ति, नुकसान, संकट. ०चुडेदान-चुडेदान पहा –ह ११.१२७ ०चूडेमंडित-वि १ हिऱ्याच्या कंकणानीं विभूषित, शोभायमान असलेले (हात), 'वजचुडेमडित हस्त। अवतार मुद्रा दाही झळकत।' –ह २७ ८० २ पत्नानून सुवासिनी स्त्रियास लिहावयाचा मायना अक्षय टिकणारे चुडे हातात असणारी, (ल) अखड सौभाग्यवती ०जिव्ह-वि खोंचदार, कडक भाषा वापरणारा ०जिव्हा-स्त्री खोंचदार, कडक भाषण ०टीक-टीका-स्त्री स्त्रियाचा गळ्यातील एक दागिना ०तडक-पु वीज –स्त्रिपु ०तुंड-पु वज्राचा एक जातीचा दगड स्फटिक, चद्रकात आणि अभ्रक या पदार्थाच्या कणाच्या अनियमित मिश्रणानें हा झालेला असतो (इ) ग्रॅनाईट ०देह-पु वज्राप्रमाणें अभेद्य, बळकट शरीर, रोगरहित, ताकदवान शरीर ०देही-वि असें शरीर असलेला; फार बलाढ्य ०द्रोह-पु दीर्घकालचा व फार तीव्र असा द्वेष ०द्रोही-वि हाडवैरी ०धर-पु इंद्र ०धार-वि तीक्ष्ण धार असलेलें, तिखट (शस्त्र) ०नाद-निर्घोष-पु विजेचा कडकडाट ०पंजर-पु (वज्राचा पिंजरा) दुर्भेद्य किल्ला, आश्रयस्थान; निर्भय आसरा 'तरि शरणागता वज्रपजर। तेहिं का म्हणवावें।' –भाए ६१४ –तुगा ७०६ ०पथ्य-न फार अवघड, कठिण पथ्य. ०परीक्षा-स्त्री १ हिऱ्याची परीक्षा २ (ल) कठिण कसोटी, फार अवघड तपासणी ०पाणि-पु इंद्र 'कृपा मागिता जाहला वज्रपाणी।' ०पात-पु १ वज्रायुधाचा प्रहार २ वीज कोसळणें,

पडणें ०पापी–वि मोठा पातकी –एभा २७ ४९४ ०प्रयोग–पु १ फार अवघड प्रयोग, उपाय २ मांत्रिक जादूगाराचा विशिष्ट मंत्रप्रयोग ०प्रहार–पु वज्रपात पहा ०प्राय–वि १ वज्रासारखा कठीण ( पदार्थ ) २ वज्रासारखा अमोघ आघात असणारा ( बाण, मुष्टि इ० ) ३ अतिशय वजनदार, खंडण करण्यास अव घड ( मुद्दा ) ४ झोंबणारें, मर्मभेदी, हृदयांत सलेल असें ( भाषण, इ० ) ०बद्ध–पु एक झाड –न त्याचें फळ वनरवद्द पहा ०बाण–वि वज्रासारखे घातक बाण असलेला ०बुद्धि–स्त्री १ खंबीर मन २ उत्कृष्ट ग्रहणशक्ति विशेषणासारखाहि उपयोग ०मणि–पु हिरा ०मय–वि १ वज्राचा, हिऱ्याचा केलेला २ अतिशय कठीण ०महाग–वि अतिशय महग ग ०महागाई–स्त्री अतिशयित, भरमसाट महागाई ०महाग्या–वि अतिशय महाग विकणारा ०माला–स्त्री हिऱ्याची माळ. ०मिठी–स्त्री. फार घट्ट मिठी 'मग तोंडा का वज्रमिठी पाडिजे।' –ज्ञा ७ १५० ०मुष्टि–पु मल्लाचें एक आयुध हें मुठीला लावतात –स्त्रीपु लोखंडासारखी, कठीण मूठ २ (बडोदें) एक खेळ –खाला ८० ३ लुनीचा कादा सुग्रण पहा –वि १ लोखंडासारखी मारक मूठ असलेला 'मी वज्रमुष्टि ।' –स्वयंवर २ वज्रमुष्टि हत्यारानें लढणारा, हत्यार वापरणारा ०मूठ–स्त्री वज्रमुष्टिपहा ०मूळी–मूळ–स्त्री एक क्षुद्रप, रानउंबीद ०योग–पु वज्रासन, हट योग 'एक वज्रयोग करमें । सर्वांहार सयमें ।' –ज्ञा ४ १४७ ०लेप–पु १ चुन्यामध्यें कात, गूळ इ० सरजाम घातल्यामुळें दृढता आलेला चुना २ अशा चुन्याचा दगड इ० वर करतात तो लेप ३ ( ल ) स्थायिता, अविनाशता, चिरतनपणा ( वचन, निश्चय सख्या इ०चा ) याअर्थी विशेषणासारखा उपयोग, पक्कें कायमचें स्थिर, अभंग 'महापापा प्रायश्चितविधान। वज्रलेप पूर्ण गुरुवाक्यावज्ञा ।' –भाराबाल ११ २७९ ४ ( महानु ) दृढता आणणारा पदार्थ 'ना तो सशृतीसि ताठ । वज्रलेप ।' –ऋ ११ ०लेप होणें–पक्कें कायम होणें 'आमच्या आजेसासुबाई एकदा कोणाचें नाव घ्यावयाचें नाहीं असें म्हणाल्या की मग तें वज्रलेप झालेंच समजावें !' –पकोघे ०वाट–स्त्री ( महानु ) वज्राचें वेष्टण 'काळ लोहें डवरिलें । वज्रवाटीं बाधिलें ।' –शिशु [ स वज्र+वृत्त, प्रा व॰ ] ०वाणी–स्त्री कठोर झोंबणारें भाषण –वि. असें भाषण करणारा ०वीर्य–न वानराचें वीर्य ( शुक्र ) हें इतकें उष्ण असतें म्हणतात कीं त्यामुळे दगडहि उलतात –वि १ अमोघ पराक्रमी वीर्याचा ( माणूस–ज्याची मुलें फार सशक्त आहेत अशा बद्दल हें विशेषण योजतात ) २ उत्साही, पराक्रमी, निश्चयी, सहनशील, ताकदवान इ० ०शरीर न वज्रदेह पहा ०शरीरी–वि वज्रदेही ०शलाका–स्त्री घरावर वीज पडू नये म्हणून लावतात ती तार. ०शील–( व ) वरिष्ठ, वरचढ 'सगळया कारकुनात तो वज्रशील होऊन बसला ' ०संकल्प–पु न फिरणारा निश्चय, दृढनिश्चय ०संकल्प–पी–वि फार दृढनिश्चयी ०सांखळ–ळी–स्त्री अभेद्य, अखड्य कोटिक्रम 'तार्किकां चिया वज्रसाखळा ।' –शिशु २५ ०हस्त–वि वज्राप्रमाणें कठीण हाताचा ०हस्तें–क्रिवि फार जोरानें 'तों मुकुदरायें काय केलें । वेताचे छडीस पहताळिलें । मारिलें आहळें वज्रहस्तें ।' –सवि १०११६ ०हृदय–यी–वि १ कठोर अंतःकरणाचा, अति निर्दय २ अति निग्रही, निधड्या छातीचा ०क्षार–पु एकें औषधी क्षार मीठ, सैंधेलोण, पादलोण, टाकणखार, बागडखार, जवखार, सज्जीखार, या खारांचें विशिष्ट कृतीचें केलेलें औषध वज्रांगी–स्त्री चिलखत, कवच 'वज्रांगी लेइला तैशी प्रलयमेघाची ।' –शिशु १००१ –ज्ञा ६ ४७५ [ वज्र+अंग ] वज्राग्नि–पु १मूलबंधापासून उत्पन्न होणारी उष्णता, वज्रासनरूप अग्नि –ज्ञा ११ ५० २ विद्युदग्नि, विजेचा अग्नि 'वज्राग्नी चिया जाळीं । करूनि सप्तधातूची होळी ।' –ज्ञा ११ ३७७ [ वज्र+अग्नि ] वज्राघात–पु १ वीज पडणें 'शिरिं वज्राघातचि गमला ।' –सप्रामगीतें १२ २ ( ल ) भयंकर संकट, आपत्ति [ वज्र+आघात ] वज्राधिकार–पु अनेक विद्या एका ठिकाणी वास असलेला अधिकार [ वज्र+अधिकार ] वज्रानल–पु वीज, विजेचा लोळ [ वज्र+अनल ] वज्रावट–वि अतिशय आंवट • [ वज्र+आंवट ] वज्राभ्यास–पु गुणाकाराचा एक प्रकार, वज्र वध [वज्र+अभ्यास] वज्रावळ, वज्राळें स्त्री न एका वलीच्या बियांची, मण्यांची केलेली माळ मुलाला दृष्ट लागू नये म्हणून ही त्यांच्या गळयात बाधतात [ वज्र+आवली ] वज्रासन–न १ ( योग ) एक आसन मुसलमान नमाज पढावयास बसतात त्याप्रमाणें बसून हात जोडणें –सयोग ३२० –एभा ६ १२७ २ मूळबंध, आधारबंध –ज्ञा ८ ४९ ३ स्थिर, दृढ आसन ( जसें घोडयावर ) ४ ( ल ) दृढपणें धारण करणें ( अधिकार सत्ता ) [वज्र+आसन] वज्रास्त्र–न इंद्राचें आयुध, वज्र, विद्युतास्त्र [ वज्र+अस्त्र ] वज्राहत–वि वज्राचा प्रहार ज्यावर झाला आहे असा [वज्र+आहत] वज्रिका–वि (संगीत) दहाव्या श्रुतीचें नांव वज्री–स्त्री पाय घासण्यास उपयोगी असा कठीण, खरखरीत दगड, वीट धातूचा पदार्थ इ० –पु इंद्र वज्रेश्वरी, वज्राबाई–योगिनी–स्त्री एक देवता वज्रोपचार–पु कडक उपचार, उपाय [ वज्र+उपचार ]

वजह वझ–स्त्री १ रूप, चेहरा २ पद्धत, चाल ३ स्थळ, जागा [ अर वज्ह् ]

वझरता, वंझळ, वर्झे वझेल–ली—ओझरता, ओंझळ इ० पहा

वझा—पु ( राजा ) वजा पहा

वड्झर—क्रिवि. ( व. ) लवकर; झरझर. [ झर ]

वट—पु. वड; वडाचें झाड. -एभा २.५८९. [ सं. ] ०पौर्णिमा, पूर्णिमा-पुनव-स्त्री. ज्येष्ठ पौर्णिमेस सुवासिनींनीं वडाची पूजा करण्याचा दिवस. ०व्रत-न. वटपौर्णिमेस वडाची पूजा करण्याचें व्रत; वडवत ( क्रि० धरणें ). ०श्राद्ध-न. यात्रा पुरी करण्यासाठीं गयेस वडाच्या झाडाखालीं करावयाचें श्राद्ध ०सावित्री-स्त्री. वटपौर्णिमा व्रताची देवता सावित्री. ०सावित्री व्रत-न. वटपौर्णिमाव्रत.

वट—स्त्री. १ दोरी; दोरा; वट. २ रक्षाबंधन; गंडा. 'कशी-वट कडा दोरा ऋषि तया दीजे ।' -वसा १०. [ सं. ]

वट—स्त्री. १ कच्चें रेशीम धुताना निघून जाणारे दोरे, तंतु, गाळसाळ. २ त्यामुळें येणारी तूट. [ का. ओट्टयसु=घटणें. ओट्टु ]

वट—वि. एकूण; एकत्र, वट. 'एवंदर भरपाईचा वट आंकडा किती असावा.'-सासं २.३४५. [ का. ओट्टु ] ०पट्टी-स्त्री. एकूण आकार, हिशेब 'साल अखेरीस वटपट्टी करते-वेळीं...' -मुंव्या ४. ०हुकूम-पु. १ सर्वांना दिलेला हुकूम, (इं) सर्क्युलर. -शे ९.४६. २ तावडतोब अंमलात येणाऱ्या काय-द्याचें फर्मान, (इं) ऑर्डिनन्स, जादा हुकूम. 'कांहीं प्रसंगीं अशा स्थानिक बाबतींतील कायद्याचें कार्य सरकारी वट हुकुमानें कर-ण्यांत येतें' -पालै १०६.

वट—स्त्री. ( दादर ) ऐट; डौल; मिजास.

वटक—पु. १ डाळीच्या पिठाचा वडा. -मुवन ११ ११९. २ मळाचा खडा, विष्टेचा गोळा, खडा होणें. ३ न पचणाऱ्या अन्नाचा पोटात होणारा गोळा. ४ अशा तऱ्हेचा होणारा रोग, विकार. ५ लहान मूल दूध प्याल्यानतर लहान लहान गेळ्या ओकतें तो विकार; लहान मुलाची ओकारी. 'वाटी वटक वाये-गोळा ।' -दा ३.६.२२. [ सं. ]

वटकण-न—न. १ ( पंढरपुरी ) टेंवण; टेकू. वडगण पहा. २ ( ल. ) दाब; दडपण, अडकवण्याची किल्ली. ३ ( ल. ) अहंमन्यतेचा ताठरपणा, हट्टीपणा. म्ह० पोराचें वटकण पंतो जीच्या हातीं, माकडाचें वटकण दरवेशयाच्या हातीं.

वटका—पु. रिकामी धडवड; गुन्हाळ; चव्हाट. (क्रि० करणें, लावणें, माडणें, चालवणें ). [ ध्व. वट ! वट ! ]

वटंग—न. ( वे. ) ( सोनारी ) विलवर ठोकण्याकरिता अस-लेली ऐरण; वटाग पहा.

वटगण-न—वडगण पहा.

वटणें—उक्रि. कापसातील सरक्या निघण्यासाठीं तो लोखंडी किंवा लाकडी दांडयानें लाटणें, लोढणें. [ वाटणें ] वटीव-वि. लाटलेला ( कापूस ).

वटणें—उक्रि. ( प्रां. ) रचणें; गंज घालणें ( गवत, भारे, दगड इ०ची ). [ का. ओट्टु ] वटीव-वि. रचलेलें; ढीग, गंज घातलेलें ( गवत, पेंढया इ० ).

वटणें—अक्रि. मनांत येणें; वाटणें पहा. 'गज धाडुं असें न वटे मनि इंद्रा ।' -वस्वलिंग, गजगौरीव्रत ४६.

वटणें—न. ( गो. ) उटणें पहा.

वंटभरण-णी—नपु. ( प्र. ) ओंटीभरण पहा.

वट(ट्)ला—पु. ( खा. ) ओटा.

वटवट—स्त्री. १ अप्रयोजक, कंटाळवाणी वडबड; टकळी. 'तुमची चुकविली वाट । करी वटवट या निमित्यें ।' -तुगा ६९५; -दा २.३.७. २ रिकामी कटकट. [ ध्व: वट ! ]

वटवटणें-अक्रि. वटवट करणें; टकळी लावणें. 'हा भलतेंच वट-वटी सदा ।' वटवटया-वि. वटवट, कटकट करणारा; वडबड्या.

वटवट्या—वि. १ मोठे; गरगरीत; वटारलेले ( डोळे ). २ वटवटीत डोळयाचा; डोळे वटारलेला. [ सं. वृत्त; प्रा. वट्टि. ]

वटवणें, वटविणें, वटाव( वि )णें—उक्रि. ( पैशाचा ) मोबदला घेणें, एका प्रकारचीं नाणीं ( रुपया, हुंडी इ० ) देऊन मोबदला कमजास्त किंमतीचीं तसल्याच प्रकारचीं दुसरीं घेणें. वटावणें पहा. [ सं. वृत्-वर्तन ] वटाव-पु. १ नाण्याचा मोब-दला. २ असा मोबदला करण्याबद्दलचा आकार. 'इसम पैवस्ती-पासोन वजावटाव दंडकप्रमाणें वजा करून ठरलें वेतन...' -वाडशा १२१. वट्टा पहा. ( क्रि० येणें; पडणें ).

वटवागू(घू)ळ—न. वडवागूळ पहा.

वटा, वंटा—पु. ओटा, ओंटा पहा.

वटांग—स्त्री. लोहाराचें एक हत्यार, एक प्रकारची ऐरण. संघन पहा.

वटारणें—अक्रि रागानें डोळे वासून पाहाणें; धाक, भीति दाखविण्यासाठीं डोळे मोठे करून टक लाविणें. [ सं. वृत्त; प्रा. वट्ट ]

वटाव( वि )णें—उक्रि. पार पडणें ( संकटादिकांतून ); मागें टाकणें; अतिक्रांत होणें. वाटविणें पहा. [ वाट ]

वटाक्ष—पु. वडा 'म्हणे मातें वटाक्ष झडकरी । माझें पदरीं घाल आता ।' -भवि २२.१०७, -संवि १५ १३६. [सं.]

वटिका—पु ( बुद्धिबळें ) प्यादा. 'वाटे त्या चेटविलें कोपानें युद्ध-केली वटिकांतें ।' -साधुदास. [ सं. ]

वटिका, वटी—स्त्री. १ वाफा, मळा (बागेंतील) २ गोळी. ३ वडी, थापटी ( साबण, लोणी, शेण, कणीक इ० ची ). ४ ( महानु. ) वडा; सानोरी. 'तारी तेचि गगनु । वटिका पूर्णे

वडाचें माजु।'–ऋ ८२ ५ (क) गोलाकृति दगडी चीप (खेळ ण्यासाठीं) [स]

**वटी, वंटी, वंटीभरण, वठ**—ओटी, ओटीभरण इ० पहा

**वटी**—स्त्री (हार) धान्य पेरतेवेळीं बी ठेवण्याची शिबी

**वटी येणें**—(व वटी) ओटी भरावयाची वेळ येणें, पदर येणें ऋतु प्राप्त होणें **वडभरण**–न फलशोभन ओटी भरणें [ओटी]

**वट्टी-ट्टी**—पु (व ना) पोची, परीट वरळी पहा

**वठणें**—अक्रि नरम होणें, मऊ येणें (मर्दनादि व्यापारानें) 'वाईल येना वाला। वाळे दाविती वाबुल्या।'–भारा बाल ९ ७४ [स शृ] **वठणीस-वर-येणें**–(रूढ प्रयोग) १ वठणें, मऊ येणें (दमन, मर्दन इ० व्यापारानें), ताळ्यावर येणें 'घोडा फार दांडगाई करीत होता, जरासा फेरफटका देताच चांगला वठणीस आला' २ वश होणें, ताब्यांत येणें 'तद्दुर्दशा न करितां निस्तेज मज वटेल काय मही।'–मोसभा ३ ३५

**वठणें**—अक्रि १ उमटणें, ठळक होणें, उठावदार दिसणें (शिक्का, रंग) २ फलद्रूप होणें, खरा ठरणें (शाप इ०) ३ (व्यापक) भरभराटीस येणें, फोफावणें, तरारणें (वनस्पति) ४ उग्र, घमघमीत असणें (स्वाद) ५ दरवळणें (वास) ६ शुष्क होणें, वाळणें (रोगादिकानें मनुष्य, वृक्ष, इ०) ७ (ल) उत रणें, वनणें 'हें विवेचन चांगलें वठलें आहे' 'या ठिकाणीं सर्व व्यवस्था पूर्वीप्रमाणें वठत असली तरी'–हिंदु ११ २ १९ १० [उठणें] **वठ(वि)णें**–(उपड) वठून दाखविणें, उठविणें पहा 'नायक अमुक अमुक कंपनी बरोबर बनून दाखविणें किंवा नाहीं या गोष्टीकडे शेंकडा ९० लोकांचें दुर्लक्ष असतें'–नाट्य ३ ५१

**वठम**—पु (व) १ आवड, हौस 'तिला खायचा मोठा वठम आहे' २ लटपट, श्रम 'हा वठम तुझ्यानें कसा होईल?'

**वठाण**—न घरातील खोली किंवा खोल्यांचा एक गाळा विशिष्ट व्यक्तीला किंवा कार्याला दिलेला घराचा भाग उदा० माजघर, स्वयंपाकघर इ० [स अवस्थान, आस्थान, प्रा अट्ठाण तुल सिं वथाणु=गोठा]

**वठार**—पु (कों) १ गांवची एक पेठ मोहल्ला २ वठाण पहा

**वठ्ठर**—रि (व) राठ खरखरीत

**वठ्या, वठ्या वठ्याया वठ्ठोवा**—वि लठ्ठ्या दांडगा थर, गलेलठ्ठ आळशी (माणूस) [स वठ्=लठ्ठ होणें] **वठ्याचें**–न (निंदार्थी सर्वेतानें) पोटभर जेवण 'दिवसांत तीनदा वठ्याचें पाहिजे आणि काम काडीचें नको' **वठ्या मारणें**–(क) (पदा र्थावर) ताव मारणें 'आज काय श्रीखंडावर वठ्या मारता?'

**वड**—पु एक झाड 'वड हें झाड फार पवित्र मानिलें जातें व औषधीहि आहे याच्या स्त्री व पुरुष अशा दोन जाती आहेत' [स वट, प्रा वड] **०पिकणें**–(ल) अननांना नोकरी व उपजीविकेचें साधन मिळणें, तयार होणें 'इ०० वड पिकला आणि कावळ्याला मुखरोग झाला, किंवा वडास आली वडफळें काव ळ्यास आले रोग'=चांगले दिवस आले असतां उपभोगाचें सामर्थ्य असणें **वडाची साल पिंपळाला लावणें**–१ सत्याचें खोटें व खोट्याचें खरें करणें २ नसता संबंध जोडणें, भलत्या गोष्टीचा संबंध प्रस्तुताशीं लावणें ३ वळणें, उलगनें फिरणें, बदलणें **०फाळिका**–स्त्री वडवागूळ 'कीं दिनउदयीं शाखेवर। वड फाळिका लोंबती।'–नव १० १८४ [स वट+फालिक] **०जखीण**–स्त्री वडाच्या झाडावरील स्त्री पिशाच, हडळ, **०जाई**–स्त्री एक क्षुद्र देवता –रोया **०पिंपळ**–(वडपिंपळास फळें धरत नसल्यानें निरुपयोगी यावरून) ब्रह्मचारी, फटिंग (निंदार्थी उपयोग) **०पुनव**–स्त्री वटपौर्णिमा पहा ज्येष्ठांतील पौर्णिमा **०वृक्ष**–पु वडाचें झाड 'तया वडवृक्षाखालि येतुजातु देखिला।'–पंच २ १ **०व्रत**–न (प्र) वटव्रत पहा **०व्रत**–न नव नूतन विवाहित स्त्रिया वडपुनवच दिवशीं वाणें वाटण्याचा जो समारंभ करतात तो **०वाघू(घू)ळ**–न एक पक्षी; वागळ, वागूळ पहा **०सावित्री**–स्त्री वटसावित्री पहा **वडागळें**–न वडाचें फळ **वडाची पुनव-पूर्णिमा**–स्त्री ज्येष्ठी पौर्णिमा; या दिवशीं सुवासिनी वडाची पूजा करतात **वडावरची जखीण**–स्त्री १ रागानें, तिरस्कारानें अज्ञान व्यक्तीबद्दल वापरतात २ वडजखीण पहा

**वड**—पु (सराफी) मोत्यांचें वजन करण्यापूर्वी सारख्या आकाराचीं मोतीं वेगळीं करणें (क्रि० लावणें) –जनि (परिभाषिक शब्द) ११ **०चार तोल**–पु अशीं मोतीं एकत्र तोलणें –जनि ११

**वड**—पु (क) वगळ ओढा पहा

**वंड**—वि (कों) खोल ओंड पहा

**वडकी-कें**—स्त्रीन ओंडकी-कें पहा

**वडग**—न (गो) मरायला टेंकलेलें किंवा मेलेलें जनावर

**वडग-गें**—न (ना चंद्रपुरी) रोपटें

**वडगण**—न १ अटकण (दगड, लाकूड इ० चें दार, चाक इ० ला) २ टेंकण (ताणाखालीं) हलू नये, मागेंपुढें होऊं नये म्हणून लावतात ती वस्तु

**वडजंबा**—स्त्री (महानु) एक देवी 'वडजंबेचा देऊळी। वस्ती जाली।'–ऋ

**वडजा**—पु (एक विशेषनाम) विरूप, कुरूप माणूस कृष्णाचा एक सोबती 'पेंद्या वडजा वाकुडा।'–दाव ६८ –वि कुरूप, वक्र, ढिडिस 'वडज वाकुडे गोवळ। तयासी म्हणे तमाळनील।'–ह ९ १३८

**वडणें**—न ओढणी ' झगडयात पुढें भिडणें म्हणुनी धरि येलीच क्चुकि श्री वडणें । '–भक्त ७ हरिराजकृत राधावर्णन ८ [ ओढणें ]

**वडप**—न १ वर्षाव, वृष्टि ' परिखतु रसाचें वडप । ' –दाव १३७, –ज्ञा ६ ४९० २ मळभ, अभ्र ' दिशावरी पडलें वडप । पश्चिमे प्रगटलें रसाचाप । ' –रुमुरा ६८ ८ [ दे प्रा वडप्प=निरंतर वृष्टि ]

**वडपड**—वि योग्य, पात्र ' वडपड जाहाली येम कोंडासी । ' –शिपु २ २९ ७५ वरपड पहा

**वडलो**—स्त्री ( व पारधी ) भाकरी

**वडव**—स्त्रीन ज्यात मोटचें चाक बसविलेलें असतें ते गिरिरी वरचें आडवें लांकूड, मोटवण

**वडवडणें**—अक्रि १ आरडणें पहा दार नरता मधीं सहात कस आज सकट वडवडलें । '–दाला ११२ २ मध्यें मध्यें येणें, अडमडणें

**वडवडित, वडवा**—क्रिवि त्वरित ' कृपावता आता वडवडित पावसि मजला । ' –सारह ६ ११० ' मला धीर धरवना वडवा । दावीला दावा तरी । –पला ४ ९

**वडवा**—स्त्री घोडी ' वडवा झाली व्याघ्र घोर । हें देखोनि भियाले सर्व वीर । '–नं २१ ०८ [ स ]

**वडवा**—स्त्री पाणधरण पाणवाव –हको ?

**वडवा**—पु ( मुस्लीमें ) वडवाग्नि, वणवा पहा

**वडवाग्नि, वडवानल**—पु समुद्रातील अग्नि ' आता धैर्याचा समुद्र शोखला । त्येजाचा वडवानलु विझाला । ' –भाए ९४, –ज्ञा १ ८९ [ स ]

**वडवाळी**—स्त्री १ घास ग्रास ' गासाची वडवाळी । आरोग्य लागे । '–ज्ञा ६ २३० २ आहुति

**वडस**—पु डोळयाचा एक रोग बुबुळावरील पडदा कवडा ' फुलें वडस आणि पडळें । '–दा ३ ६ ४० ' कमळाक्षीचे नयनीं वडस । '–दानि १०८ [ [१] तुल० दे प्रा वड्डास=अभ्र ]

**वडा**—पु डाळीच्या पिठाचें तळून केलेलें एक खाद्य [ स वटक, प्रा वडग, हिं वडा ] **वड्याची माळ**–स्त्री वडे तळून त्याची केलेली माळ ही हनुमानास घालतात ' वडयाचीही माळा रुचितर वाहीन तुजला । '–सारह ६ ११० **वडयाचें तेल वाग्यावर काढणें**–एकाचा राग दुसऱ्यावर काढणें **वडेल**–न ( गो ) वडयाचें तेल

**वडा**—पु ( प्र ) घोडा पहा

**वडा**—स्त्री वाव स्त्री मार्ग मूळ लग्नाची आमची वायको जन्माची वडा । '–पला ७७ [ स व या ]

**वडाग**—स्त्री कृपण, वई ( विशे कन्हेरी फायाची ) ग्रादो ६ ४४

**वडागरमीठ**—न समुद्रमीठ ( याचे खडे मोठे असतात )

**वडाण**—न ( प्र ) वडाण पहा ' तयात चित्रगीठ वडाण घेऊनि डोंगरा एका पैलाडि गेला । ' –पच ७ ७.

**वडार-री**—नपु १ एक हलकी जात ही कामाच्या जागीं जमावाने राहते धंदा दगड फोडणें, विहीर खणणें इ० २ या जातींतील व्यक्ति [ का ओड्ड, प्रा वड्डर ]

**वडिपडि**—वि उत्कंठित, उत्सुक ' म्हणती हा खेचा कवणु । काइ बोलैल म्हणउनु । तें ऐकावेया सकळे जनु । वडिपडि जाहाले । ' –शिपु २ १६ ४२

**वडी**—स्त्री १ लहान चपटा तुकडा ( पिठाच्या पदार्थाचा, साबण इ० जिनसाचा ), थापगी २ ( ल ) अळिता इ० कात कापून भिजवून जी पोळी करतात ती ३ शान, जमीन इ० जागीं जाळण्याच्या उद्देशानें किंवा लौकर वाळावें म्हणून विरळ पसरतात तें शाण, गोंवऱ्या थापणें ४ (तंजा ) साहगा [ स वटी, वडा अल्पार्थी, वप्रा वडी ]

**वडी**—वि ( कातोडी ) इतकी, एवढी [ एवढी अप ]

**वंडी**—स्त्री ( अव ) ( खा ) घरावरील धाब्याच्या बाजूस असलेल्या भिंती, परवडी

**वंडी**—स्त्री ( खा. ) मोठया बायका पसाडा( पदरा )वरून नेसतात ती साडी लहान मुलींच्या साडीला फडकी म्हणतात

**वडीचा**—वि ( वाई ) शेवटचा ' या औताच्या वडीची जोडी फार तापट आहे '

**वडीम**—स्त्री ( क ) गनी

**वडील**—पु बाप, तीर्थरूप ' सकळास आनंद जहाला । म्हणती आमुचा वडील आला । '–दा ३ ४ २३ –वि १ वाड वडील, बाप, आजा, पणजा इ० पूर्वज ' जे हे वडिल सकल आपुले । वधावया दिठी सुदले । '–ज्ञा १ २६४ २ वयानें मोठा ' तयामाजीं तो मदन । हरीचा वडील नंदन । '–क्या १ ३ १३९ ३ विद्या, मान इ०नीं श्रेष्ठ मोठा ४ ( सामा ) श्रेष्ठ, थोर –ज्ञा २ १५८ ५ विस्तृत, लांबलचक, मोठा ' हा आहे वडील वृत्तांत । '–बसा ७१ ६ फार, अतिशय ' क्याच्दी दीस भरेले वडील उठावें । ' –पवळे उ ४० [ स वृद्ध, प्रा वड्डिअ, देप्रा वड्डिल ] ०की–स्त्री १ पराण्याचा कारभार पाहण्याचा अधिकार पेशवाईत दप्तर–यादीवर मालक पेशवे 'यावें' असा शेरा व वडीलकीचा अधिकार असलेले त्याच कारभारी ' देवावें ' असा शेरा मारीत –अधिकारयोग ५२–५३ पहा २ वडीलपणा ०घराणें–न कुटुंबातील मोठ्या माणसाचें ( विभक्त झाल्यावर ) घराणें, वडील भावाचें घर ०तक्त–न वडील घराणें पहा 'वडील तक्ताची जागा सवन समार्क जोशी याकडे ठेवली आहे '–मसाप २ २ ५८ ०धारा-रें–पुन ( वडील आणि लहान ) घराण्यात

शिस्त राखण्याचा अधिकार असलेली व्यक्ति, घराण्यांतील वडील माणूस 'त्यांनी मासा सुद्धा घेण्यास तोंड पुढें केंच तर मी वडीलधारा न ओळखता एकदम त्याच्या मिशा उपटी' -वहक लेली तरुणी ६ ॰परंपरा-स्त्री, पूर्वजाची, वडील माणसाची मालिका ॰परंपरागत-वि पूर्वजापासून चालत आलेली; पिढी जात ॰मान-पु वडीलकीचा मान, पिढीजाद हक्क होळीपाळींचा वडीलमान मुरुड्गाकडे आहे ' **वडलाई वडलायाई**-स्त्री आपल्या ल्हान भावडावर अधिकार गाजविणें (निंदार्थी उपयोग) **वडलाचा अडकित्ता**-पु (उ) सुपारी फोडण्यास घेतलेले दगड **वडलांचा आहणा**-पु जुनी म्हण **वडलावडली**-वि बाड वडलांच्या वेळचें, परंपरागत, प्राचीन -क्रिवि वाडवडलापासून, वंशपरंपरा 'वडलावडली भार असे जन पडती।' -ऐपो २६९ **वडलोपार्जित, वडिलार्जित**-वि वाडवडलांनीं संपादिलेले ठेविलेलें (द्रव्य) [वडील + उपार्जित किंवा अर्जित] **वडलोरा**-पु आपल्या ल्हान भावडावर अधिकार गाजवणारा मुलगा; दादा **वडलोवडलीं**-क्रिवि वंशपरंपरागत वडग वडली पहा

**वडूवा**—स्त्री घोडी, वडवा पहा 'तीयें वडूवेसी हसली।' -उषा १७०७

**वढूसा**—स्त्री (माण) इच्छा (क्रि० धरणें)

**वडें**—वढें पहा

**वड्र**—स्त्रीपु १ वडार जात २ तींतील व्यक्ति [का ओड्ड] ॰खोरें-न खादणें, माती भरणें, भराव घालणें वगैरे कामास उपयोगी असलेलें हत्यार

**वड्डी**—स्त्री (क) घार चिचोक्याचा एक गट (मुलींच्या खेळात रूढ) [का ओड्ड=ढीग]

**वढ, वढक वढकर, वढगस्त, वढगस्ती वढण, वढणवाकी, वढणें वढदोरा वढव, वढवणें वढा, वढाताण, वढावढी वढलकी, वढाळी वढिस्त**—ओढ, ओढक इ० पहा

**वढम**—स्त्री (व) नाद आवड [ओढ]

**वढरी**—पु (महानु) प्रेतयानत भाग घेणारा, प्रेतावरोबर जाणारा मनुष्य 'वसात नत माडी सखिजन वढरी गुरी घाउ-निया।' -गस्तो ३२

**वढाय**—वि (व) उनाड बदमाष

**वढाळ**—न ओढाळ गुरू ओढाळ पहा 'वढाळें घरतीं घालीवेनें।' -सुसमा ३ ७९

**वढी**—स्त्री (व) शेतात घातलेला ल्हानसा बाध

**वढील**—वडील पहा -माउद्योग ८४

**वढें**—न १ सूड उट्टें (क्रि० घेणें उगवणें काढण) 'पण मी आताच त्याचें वढें काढीन' -बाळ २ १५४ २ मोबदला, भरपाई (क्रि० घेणें, काढण) 'यदा तो फसला तर त्याचें वढें पुढल्या वर्षी घेईना'' [म वृध्?]

**वढ्याळ**—ओढाळ पहा

**वण**—पुन दुवी, गळू क्षत इ० बरें झाल्यानतर त्या जागे वर राहणारें चिन्ह; डाग, व्रण, घट -मोरा १४०२ 'नामचि पुर न घ्यावे अशींही नमन करुन आठ वण।' -मो स्फुट आर्या (नवनीत पृ २५५) [स व्रण, प्रा वण]

**वण**—स्त्री (राजा) वताळ, म्हसोबा इ० दैवताम जो जना वरादि बलि देतात ती

**वण**—न (प्र) वन पहा 'तेव्हां तो भर एक वण मागें टाकतो तों दुसरें पुढें येनें' -मसाप १ २ -स्त्री वनचराई पाहणी इ०च्या सरकारी कागदपत्रांतून म्हैस शब्दामागें याचा योग होतो (वनचराई आकारण्याची या अर्थानें) 'वण म्हशी चौदापैरीं मयत तीन बाकी जमा अकरा' [स वन] ॰मस-म्हैस-(वण + म्हैस) वनचराईचा आकार 'हल्लीं वणमस (म्हशीमागें एक रुपाया) भरूनसुद्धा श्रावणापासून जनावरें घरीं बांधून ठेविलीं आहेत' -खया -वाडमा १ ११२ **वणीं देणें**-(में) वनात नेऊन मारणें -लोक २ ३१

**वणंग-गें**—न (गो) एक ल्हान जातीचा मासा

**वणज**—स्त्री व्यापारासाठीं प्रवास, फेरी, वाणिज्य [स वाणिज्य] **वणजणें**—अक्रि व्यापार करणें -ज्ञा १८ ९४८ (पाठभेद)

**वणजारा-री**—पु एक जात किंवा तींतील व्यक्ति लमाण, हे लोक परगावांहून धान्य गुरें इ० आणून विकतात 'मार्गी जाता अवधारा। भेटला साधक वणजारा।' -कथा १ ९ १४९ [स वाणिज्यकार फा विरज=तांदूळ; फा बिरिंजारी=धान्याचा व्यापारी] **वणजार-रा**-नपु १ वणजारी लोकांचा तळ, समुदाय २ (समुच्चयार्थी) वणजारी

**वणत**—स्त्री (कारवारी) भिंत -शर

**वणधा**—स्त्री (मुबई कों) कोठें दुखत असलें म्हणजे मांड्यात येणारी गाठ अवधणा पहा

**वणवण-वणवणवाणा-णी**—स्त्री १ दमणूक व्यर्थ श्रम, कुत्तेघाशी २ भणभण, गाजणूक श्रीरामाचें मदवचन। सुखी केलें अकिंचन। वण्वण निमाली पूर्ण। -भाराबाल ७ १५ -क्रिवि १ पुष्कळ श्रम होत असें निरर्थकपणें (क्रि० करणें) २ उगाच पुष्कळ दमणूक करून (क्रि० हिंडणें, फिरणें) 'उगेंच वणवण हिंडोन।' -दा १९ ६ २४ वनवन पहा **वणवणणें**-अक्रि धडपड करण कष्ट करणें 'जें चित्त वणवणी विषयालागीं।' -एमा २५ २४२ **वणवणा**-क्रिवि वणवणचा अतिशय 'सारा हिंदुस्थान वणवणा पायीं हिंडून पहाशा' -ऐया (प्रस्तावना)

**घणवणें-घणवा**—ओणवणें, ओणवा पहा **घणवा घेणें**-क्रि (बे) १ खांदा देणें २ जनावरानें जू काढल्यावर खालीं पडणें

**घणवा**—पु डोंगर, अरण्य इ०कांत पेटलेला अग्नि; दावानल, रानगा –ज्ञा १४ १९१ 'यदुवंशाचीं वेळवनें वणवाचि असती।' –भाए ५३ [स वन, प्रा वण देश्य वण्व=दावानल] **वणवणें**-अक्रि वणव्यानें व्याप्त होणें 'जैसा ग्रीष्म काळीं गिरिवर। वणवला का।' –ज्ञा २ ७६

**वणवी**—स्त्री रास, गंज 'जैसे तृणाचे वणवीसी। अग्नि स्पर्शी होता नाशी।' –मुच ३६ २२८.

**वणसावणें**—न. (मुंबई, कों) स्वप्नांतील बरळणें.

**वणिज**—स्त्री १ व्यापार; वाणिज्य वणज पहा –ज्ञा ६.११० २ (सामान्य) व्यवहार 'यया मौखाचिया घरा। विश्वाई धाडिलासि दातारा। ऐसा वणिजेसाठीं जागेश्वरा। निविन्नासि आम्ही।' –ज्ञा ११ ५४२ [सं वणिक्-ज्, वाणिज्य] **वणिक्-ज**-पु १ व्यापारी २ वाणी, वनिया 'मारिति हाक्रा नेवळ नागविला वनि जसा वणिक् सार्थे।' –मोकृष्ण ८६ २६.

**वणिज**—न ववादिकांतील ६ वें करण करण पहा [सं]

**वणी**—पु (महानु) घाव घालणारा, मारणारा 'रणीं जुझारू घायेवाटे। तरि वणियां न वधिजाति पाटे।' –भाए२४१. [सं व्रणिन्, प्रा वणि]

**वणी**—शअ (रूढ) वाणी पहा सारखा; प्रमाणें 'तो सागे पळाला भुतावणी।' –दावि ४७१

**वणी**—समासांत पाणी या अर्थानें हें रूप येतें उदा० गुळवणी (गुळाचें पाणी=मराठ्यांतलें कालवण), आखवणी (उसाच्या चिकास यावयाचें पाणी), चिंववणी, काढवणी इ० [सं वन, प्रा. वण=पाणी]

**वणोटा**—पु रंगाचा पट [स वर्ण, वणन पहा]

**वत्**—प्रत्यय जसा, सारखा, प्रमाणें, सदृश. उदा० तद्वत्, एतद्वत्, ब्राह्मण-क्षत्रियवत्

**वत-ती**—स्त्री वाजू वर्ती, वतीनें या विभक्तींत उपयोग. वर्ती-तीनें पहा

**वत**—पु व्रत पहा.

**वंत**—पु (कों) वाटा, हिस्सा (वडलार्जित मिळकत, व्यापार इ० तील) 'माझा ज्येष्ठपणाचा वतु। वेगळा करीं पां यज्ञदत्तु।' –कथा ५ १५ १०. **०दार**-पु भागीदार

**वंत**—पाळणारा, धरणारा, धनी या अर्थी नामाला जोडून येणारा प्रत्यय उदा० द्रव्यवंत, भाग्यवंत, धैर्यवंत इ० [स. वत, वान्]

**वतणी, वतणें**—ओतणी, ओतणें पहा.

**वतणें**—अक्रि (प्र.) वतणें पहा

**वतन**—न १ वंशपरंपरेची चाकरी, धंदा, अधिकार, नेमणूक, उत्पन्न, उपजीविकेचें साधन, –गांगा ७६ २ मालकीची जागा; जन्मभूमि, घर. ३ इनाम. 'वंशीं दिधलीं गुरु प्रसादप्रभुनें पूर्वोक्तमद्गुणां वतन।' –मोकर्ण २० २९ ४ वंशपरंपरा हक्क (जमीन, वृत्ति इ० त) [अर वतन्=जन्मभूमि, घर तुल० सं वर्तन=उदरनिर्वाह, वेतन] **०गाडणें**-एखाद्या जागीं मालकी, सत्ता असणें (नेहमीं नास्तिपक्षीं उपयोग) 'तूं नित्य येथें येऊन बसतोस, काय येथें तुझें वतन गाडलें आहे' **०गाडलें**-न (गाडलेलें वतन) जुनी किंवा फार दिवस ताब्यांत असलेली मिळकत 'माझी वंशपरंपरा ह्या जागेवर नांदून वतनगाडलें आहे तें मी सोडणार नाहीं' **०जप्ती**-स्त्री वतनी जमीन किंवा तीवरील उत्पन्नाची जप्ती **०दार**-पु वतन असलेला; वतन धारण करणारा 'वतनदाराचीं वतनें वतनदाराच्या दुमाला केल्या विरहित पोरतिडीक लागोन मुल्क मामूर होत नाहीं' –रा१६ ४४ (कायदा) वंशपरंपरेनें सरकारी काम करण्याचा हक्क असणारा इसम 'तीर्थोपाध्याय, मंदिरवाले, दरगेवाले, फिरस्ते, हुन्नरी व मनोरंजनाचा धंदा करणारे, भिकारचोरटे वगैरे वतनदार स्वतःला म्हणवितात. ...सर्व गांवकऱ्यांना मग ते कोणत्याहि धंद्यावर पोट चालवोत वतनदार ही सामान्य संज्ञा आहे –गांगा १५ [फा] **०दार-हिजडा**-पु हिजडा पहा **०दारी-दारकी**-स्त्री वतनाचा हक्क, मालकी, वतन असणें **०दारीकरी**-पु (वतनदार) (कों) फार जुना शेतकरी **०पत्र**-न वतनाची सनद, दस्तऐवज. **०बंधु-भाऊ**-पु १ वडिलोपार्जित मिळकतींत हक्क असणारा; भागीदार २ सह अधिकारी (वंशपरंपरागत), देशमुखबंधु वतनवहीण असाहि शब्द येतो **०वाडी**-स्त्री. वतन, वतनी शेत, वाडी इ० (व्यापकपणें), जमीनजुमला, इस्टेट 'वतनवाडी पाहून मुलगी द्यावी तर द्यावी' **वतनी**-वि १ वडलोपार्जित किंवा विकत घेतलेली (जमीन, मालमत्ता इ०) २ वतनासंबंधीं (दस्तऐवज, कागदपत्र, इ०). ३ वतन आहे किंवा जन्म झाला तें (ठिकाण) **वतनी मिळकत**-स्त्री (कायदा) वंशपरंपरेनें सरकारी काम करण्याच्या मेहनतान्याबद्दल मिळकत किंवा नक्त नेमणूक

**वतन-नी**—ओतणें-णी पहा.

**वतवळी**—स्त्री (क) काकण घट्ट बसावें म्हणून मध्यभागीं राख पाडून तयार केलेलें पत्र्याचें काकण [स वृत्त+वल्य]

**वतरणें, वतारणें**—अक्रि १ संचरणें (पिशाचानें शरीरांत). २ अशा संचारानें संचलनविशिष्ट होणें (माणसानें, जनावरानें), पछाडलें जाणें [अवतरणें]

**वतल-लें**—न (व है) अवेल, वैल 'वतलावर आधण ठेव.' ओतल पहा [स अव किंवा उत्+तल ?]

वतवत—स्त्री. १ रिकामें भटकणें, फिरणें. 'त्यां दिवसभर वतवत केलीस आतां जेवायाला तातडलास.' २ वटवट; वडवड; वकवक. ३ वदलणें [ध्व.] वतवत-तां-क्रिवि. १ वटवट लावून; वडवडून. २ वरवडून; भ्रमिष्टपणें (क्रि० करणें; बोलणें). ३ वचवच पद्धा. (क्रि० खाणें; जेवणें). ४ रिकामपणें; रमतगमत. (क्रि० फिरणें; करणें). वतवतणें-अक्रि. १ वटवट करणें; बडबडणें. 'तें नाहीं तरी किती । वतवतु ।' -अमृ ७.८४. २ तणतणणें; क्रोधावेशांत वडफडणें.

वंतसें—नकीअव. (रुढ) वनसें पहा.

वताणा—पु. (चांभारी) सागळ व आस्तर यांमधील भाग.

वतारणें—अक्रि. वतरणें पहा.

वतारी, वतींव—ओतारी, ओतींव पहा.

वतावत-तां—क्रिवि. वतवत-वनां या अतिशय.

वताळ—पु. धार; जसम. -मनवो.

वताळणें—क्रि. १ (व.) बडबडणें. २ गर्जना करणें. 'गजारूढ वताळे भाट ।' -कृमुरा २५.७२.

वतीं, वतीनें—क्रिवि. तर्फे; बाजूनें; बद्दल. 'ने.ना. दिवाण साहेब यांनीं श्रीमंतांवतीं स्वीकार करावा.' -अमेर.बहुमानपोषाक नियम ६. वतीचा-वि. बाजूचा; पक्षाचा. आमच्यावतीं व तुमच्यावतीं हे शब्द व्यापारी, पेढीवाले यांच्या हिशेबांतून सावकार-कूळ यातर्फे अशा अर्थानें येतात.

वत्त—न. १ (चि.) नदीला पूर आल्यावर पाण्यास येणारी फुग. ओत पहा. [का. ओतु=पूर]

वत्तर—स्त्री. (व. ना.) १ हंगाम; योग्य संधी. २ विपुलता; समृद्धि.

वत्स—पुन. १ गाईम्हशीचें पोर, बालक; वासरूं. -ज्ञा ७.१२०. 'तुका म्हणे वत्स धेनुवेचे चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत ।' -तुगा २२०१. २ बाळ; मूल. लहानाला प्रेमानें संबोधितात. 'भीष्म म्हणे वत्सा जरि पुससी सर्वांत कोण पूज्य असे ।' -मोसभा २.२८. ३ रत्नागिरीजवळील ब्राह्मणांची एक जात व तींतील व्यक्ति. [सं.] ०द्वादशी-स्त्री. आश्विन वद्य १२. या दिवशीं सवत्स धेनूची पूजा करतात. वसुबारस पहा.

वत्सनाभ—पु. एक प्रकारचें विष; बचनाग. [सं.] वत्सनाभाम्ल-न. (शाप.) बचनागांतील अम्ल. (इं.) ॲकोनिटिक ॲसिड.

वत्सर—पु. वर्ष; संवत्सर. [सं.]

वत्सल—वि. प्रेम करणारा; दयाळू; कृपाळू; आवडता; काळजीचा. -ज्ञा १३.३४२. (समासांत) अनाथवत्सल; दीनवत्सल; भक्तवत्सल. [सं.] वत्सलता-स्त्री. वात्सल्य; स्नेह; मायाळूपणा.

वथ—स्त्री. (व.) व्यथा (कुंथण्याची). [सं. व्यथा]

वंथ—पु. वांटा; वंत पहा.

वथऱ्या—क्रिवि. (ना.) तिकडे.

वथणें—अक्रि. मूर्खपणें बडबडणें; नको तें बोलणें.-अक्रि बडबड करणें; वदणें. [वदणें ?] वथून्याणें-क्रि (कु.) मोठ्यानें बडबडणें.

वथंवणें, वथंबा—ओथंबणें, ओथंबा पहा.

वद—न. (व.) दंव. वंदाड-न. (व.) १ दंव. २ सर्दी.

वंदक—वि. पूजा, भक्ति करणारा; भक्त. [सं.]

वंदट—न. (क.) वावळ; अभ्राच्छादित आकाश.

वंदण—न. (प्र.) ओंदण पहा.

वदणूक—स्त्री. १ स्पष्ट, उघड करणें; सांगणें; वर्णन करणें. २ कबुली; कबुलायत; मान्यता. ३ पंचाकडून इमान करवणें. -भाअ १८३२. [वदणें]

वदणें—उक्रि. १ उघड करणें; मनांतलें, लपवून ठेवलेलें बोलूं लागणें; कबूल करणें. २ प्रतिपादणें; जाहीर करणें; मोठ्यानें बोलणें. ३ -अक्रि. (सामा.) बोलणें; सांगणें. 'आतां पाल्हाळ टाकोनि सत्वर । मंतचरित्रें वदावीं ।' [सं. वद्] वदंता-स्त्री. बातमी; बोलवा; जनवार्ता. [सं. वदंती] वदंती-स्त्री. १ भाषण; बोलणें. 'हे ब्रह्मीची वदंती । तुज निवेदिली गा भूपती ।' -कथा ६.१२. ७४. २ वचन; वाक्य. 'अव्यक्त वादमतीं । अव्यक्त ऐसी वदंती ।' -ज्ञा १४.६९. ३ वार्ता; बोलवा. 'मग कल्पादीं पुढतीं । मींचि सृजीं ऐसी वदंती ।' -ज्ञा ९.१०५. ४ उपदेश; उच्चार. 'पै गुरुशिष्यांचिया एकांतीं । जे अक्षरा एकाचि वदंती ।' -ज्ञा १०.१२६. ५ वटवट; वडवड. 'गाडींतुन उतरल्यापासुन आपलीच एकसारखी वदंती चालू आहे. आम्हीं बोलावें केव्हां ?' -भयंकरदिव्य. [सं.] (वाप्र.) वदतोव्याघात:-उघड विरोध; स्पष्ट विसंगतता; उघड असणाऱ्या विरुद्धतेचें प्रतिपादन करणाऱ्याविषयीं योजतात. वदव(वि)णें-उक्रि. बोलविणें; बोलावयास लावणें; तोंडातून काढणें. (वदणें प्रयोजक)

वंदणें—उक्रि. १ नमस्कार करणें. २ सत्कार करणें; पूजा, भक्ति करणें. ३ आदर बाळगणें; मानणें. 'कोणी वंदा कोणी निंदा । आपला स्वहिताचा धंदा ।' [सं. वंदन] वंदन-न. वंदणें; नमस्कार. २ आदर दाखविणें; मान्यता; सत्कार. ३ सेवा; पूजा. [सं.] वंदनभक्ति-स्त्री. उपासना मार्गांतील नवविधा भक्तीमधील एक अंग. वंदनशील-वि. १ फार आदर दाखविणारा. २ सभ्य; प्रशंसापर; गौरवपर. वंदनीय-वि. वंदायास योग्य; पूज्य; सेव्य. [सं.] वंदित-वि. वंदिलेला; पूजिलेला. [सं.] वंद्य-वि. वंदण्यास योग्य; वंदनीय. -ज्ञा १.५४.

वदन—न. १ मुख; तोंड. 'वृथा गेली आंगवण । काय वदन दाखवितां ।' -एरुस्व ८.६. (समासांत) चंद्रवदन; पद्मवदन;

म्लानवदन इ० २ (गणित) श्रेणीतील पहिलें पद [ सं ] वदना मृत-न भाषण -ज्ञा १७ ९८८ [ वदन+अमृत ] वदनेंदु-न मुखचंद्र ( सुंदर मुखाच्या वर्णनांत उपयोग ) ' उदय अस्तावीण अपूर्व । वदनेंदु श्रीकृष्णाचा । ' -एरुस्व १ ५१ [ वदन+इंदु ]

वंदन—न १ विवाहचिन्ह, कपाळावरील गंध ( नेवणांत गळ्याची ) २ अस्ताव्यस्त पसरणें उधळणें, फेंकणें ( क्रि० करणें )

वदर—स्त्री भीति वदर ' टेकून चित्ताम ये वदर भिऊन या जना । -होला १०६ [ दर, डर, आदर ]

वदर—पु ( व ) घर [ सं दृ-दर ] वदरणें-अक्रि ( व ना ) १ चिरणें फाटणें २ गडून पडणें, ओघळून जाणें

वदळ—स्त्री परदळ पहा

वदळ—पु ( कों ) समुद्राच्या लाटामुळें किनाऱ्यावरील वाळूमध्ये होणारा उथळपणा, उथळटाई पहा

वदान्य—वि १ उदार, दाता ' धर्मिष्ठ वदान्य सत्यवचन । सन्मुख रणीं पावणें मरण । ' -जै २१ २९ २ वाक्पटु वक्ता [ सं ]

वंदारुता—स्त्री वंदन करावें अशी इच्छा आदर भक्ति ' वाढो सज्जनमर्मी गुरुकुळीं वंदारुता नम्रता । ' -वामन स्तुतिश्लोक ( नवनीत पृ १३७ ) [ सं ]

वद्य—पु कृष्णपक्ष महिन्याचा दुसरा पंधरवडा -वि या पक्षासंबंधी ( तिथि ) उदा० वद्य एकादशी [ सं ] ०पक्ष-पु कृष्णपक्ष याच्या उलट शुद्धपक्ष

वध—पु १ मारणें, घात, नाश संहार -ज्ञा १ २९८ ' परनिंदेनें परवध आत्मस्तवनेंहि आत्मवध होतो । ' -मोकर्ण ४२ ६१ ( समासांत ) पितृ-मातृ भ्रातृ-मनुष्य-राज-ब्रह्म-गो-वध २ ( गणित ) गुणाकार, घात [ सं ] ०घटी-स्त्री मरण काल ०स्तंभ-पु देहांतशिक्षा देण्यासाठीं पुरलेला खांब वधणें-सक्रि ठार मारणें, नाश करणें -ज्ञा १ २०६ वधिता-वि मारणारा -ज्ञा २ १३८ वध्य-वि मारण्यास योग्य शस्य वधार्ह -ज्ञा २ १३८ [ सं ]

वध( धा )णा—वाधणा पहा

वधणें—सक्रि ( व ) सुंदरीची दोरी वाख वगैरे लावून पुन्हा वळणें, वाढविणें [ सं वृध्, प्रा वड्ढ, गु वधवु ]

वधर—शअ ( व ) वर ' घराच्या वधर फादी आली ' [ सं उत्-धृ-धर ]

वधा—पु ( व ) पीळ सुरनी [ सं वध ]

वधारा—स्त्री ( बडोदे ) वाढ कल्या प्रमाणांत परिस्थित्यनुरूप वधारा करण्याची आवश्यकता वाटल्यास -बडोदें, सत्कार नियम ८ [ सं वृध्-वर्धय प्रा वड्ढार, गु वधारो ]

वधारणें-क्रि वाढणें, मोठा होणें

वधू—स्त्री १ नवरी, जिचें लग्न ठरलें आहे, चालू आहे अशी स्त्री -ज्ञा १८ ३ २ पत्नी ३ नवपरिणीत कन्या, स्त्री, विवाहयोग्य वयाप्राप्त यौवनदशा संपन्नेची स्त्री ' मुंगे गुरुविनागर हु तर सुणा अन्य या नग । -कथा ९९ ४ ( सामा ) स्त्री ' राजावाक्य गमा वियोगुनी वधू धाव जशी बावरी । ' -आहारी ९ [ सं ] ०पक्ष-पु सामान्य नवरीकडील पक्ष ०पक्षीय-वि वधूपक्षासंबंधी, नवरीमुलीकडील ०प्रवेश-पु १ विवाहानंतर नवरीनें नवऱ्याच्या घरीं समारंभानें येणें २ या वेळचा विधि, घरभरणी ०माय-स्त्री ( काव्य ) नवरीची आई ( लग्न समारंभात या नावानें तिचा सर्वाविण्यात ) [ माय=माता ] ०वरें-न अव विवाहसमारंभातील वधू आणि वर उभयता मिळून, जोडप नवरानवरी ०वस्त्र-न लग्नाच्या वेळचें वधूचें पातळ, अष्टपुत्री वधूटी-स्त्री आड वायको, सधवट प्रौढ स्त्री

वंध्य—वि १ फळें न धरणारा ( वृक्ष ), अनुत्पादक, वांझ २ निष्फळ, व्यर्थ ( प्रयत्न, इ० ) ' पसरोनि शीघ्र कवळी नमुनि म्हणे न करि व य आशातें । ' -मोकर्ण (नवनीत पृ ३३०).

वंध्या—स्त्री जीस मुलें होत न होत अशी स्त्री, वांझ वंध्यापुत्र-सुत-पु ( वांझेचा मुलगा ) ( ल ) अशक्य कोटींतील, असंभाव्य गोष्ट खपुष्प पहा वंध्येची सुता-स्त्री वरील प्रमाणेंच अशक्य गोष्ट ' वगळेपणाची माता । ते लकि वंध्येची सुता । ' -दा ६ १० ३५ वंध्यामैथुन-न ( वांझेशीं रतिक्रिडा ) अनुत्पादक, व्यर्थ, निष्फळ श्रम, निष्फळ व्यापार

वन—न पाणी ' अति-सहवासि-वच मना पतक कलुषिता वना निवळवील । ' -मोविराट ३ १६ [ सं ] ०द-पु मेघ

वन—न १ रान, अरण्य जंगल २ ओसाड, निर्जन प्रदेश ३ ( समासांत ) पान या अर्थी उपयोग ' तरी वद्यमूळें अज्ञानें । महदादिकीं शासनें । वदार्चीं योरवनें घेऊनिया । ' -ज्ञा १५ १४७ ४ ( समासांत ) वन्य रानातला, जंगली या अर्थी उदा० वनपुष्प-वृक्ष वनगाय -स्त्री १ चराई २ गुरचरण, गायरान ३ ( व ) कणसें खुडण्याबद्दलचा मोबदला [ सं ] ०कर-पु वनरक्षक, ' तव ते वनकर समग्र । गाऱ्हाणें सांगों पातले । ' -ह ३१ ८९ ०क्रीडा-स्त्री जंगलांतील खेळ, रानांतून भटकणें इ० ०गाय-स्त्री १ गायींची एक जंगली जात हें जनावर भात खातें २ कोचिनीडचा किडा ०चर-पु १ पौराणिक नाटकांतील विदूषक २ माकड ( ल ) इसम टोपीवाले ' वनचर हातें पृथ्वी केली निक्षेत्री । -ऐपो ४०४ -वि १ वनांत काळ कंठणारा वनवासी ( वाघ सिंह इ० प्राणी ) २ जंगली, रानवट ०चराई-स्त्री गुरांना सरकारी माळरानावर चारण्याबद्दल घाव याची पट्टी, चारणावळ ०देवता-देवी-स्त्री वनाची अधिष्ठात्री देवता ०पशु-पु जंगलांतला, न माणसाळलेला प्राणी

०प्रस्थ–न वानप्रस्थाश्रमातील माणसांना राहण्याचें जंगलांतील ठिकाण, एकांतवास ०भोजन–न अरण्य, उद्यान अशा जागीं जाऊन केलेला जेवणाचा समारंभ (इं) पिक्‌निक् 'शक्ति पूर्वोन वनभोजन। स्थानपोरीं सपादिलें।' –ह ३० २२ ०मक्षिका–स्त्री जंगली माशी ०माला–ळा–स्त्री १ वनपुष्पांची माळ २ देवाच्या गळ्यातील फुलें, तुळसी इ०ची गुडघ्यापर्यंत लोंबणारी माळ, विष्णूचें वटभूषण –एभा ३ ५१ ३ वनाची ओळ, रांग, पंगत ०माली–ळी–पु विष्णु कृष्ण 'घरीं ध्यानीं हरि वनमाळी।' –देप ७१ ०माशी–स्त्री वनमक्षिका पहा हिमालयांत अशा माशा असून त्या चावल्या कीं गळवें येतात –तीप्र ६५ ०राज–पु सिंह 'तुज वनराजा काय अद्दशा आली।' –विक ९० ०वाशा शी–वि १ हालअपेष्टा काढणारा, नेहमीं अभागी २ (व) वाईट पायगुणाचा, सत्यानास घडवून आणणारा ३ (व) नाश होणारा, नाश करणारा ०वास–न १ अरण्यांत राहणें, जग त्यातील वस्ती २ आयुष्याला स्थिरता नसणें, भटकत राहणें ३ प्रवासातील हाल, दुःख ४ वाईट दिवस, संकटकाळ 'आला कसा कपाळा वनवास।' –विक ३६ ०वास आणणें–१ छळून, त्रास देऊन घराबाहेर काढणें २ फार सतावणें, गांजणें 'ह्या पोरांनीं मला वनवास आणिला आहे' ०वासवन–वासवाडी–स्त्री (काव्य) सोयीचें आश्रयस्थान म्हणून पत्करलेला अरण्यवास. ०वासी–वि १ अरण्यांत राहणारा –ज्ञा ३ ३२५ २ वनवाशा पहा ०विहार–पु वनक्रीडा पहा 'राव चालिला वनविहारार्थ। विलोकीत वनश्रीतें।' ०विहारी–वि वनांत आनंदानें राहणारा विहार, क्रीडा करणारा ०शाई–ही–स्त्री वनवास 'कैकयीच्या फल्हानें तदुपरी वनशाई।' –राला ९ ०श्री लक्ष्मी–स्त्री फल-पुष्पसंभारानें वनाला आलेली शोभा, अरण्यशोभा –ज्ञा ३ १०० ०सरणी–स्त्री रानातील मार्ग 'चित्राव म्हणे दयिते गमली वन सरणि काय कोमळ ती।'–मोवन १२ ४१ ०हरिद्रा–स्त्री रानहळद वनाई–स्त्री वनचराई –केसरी २६ ७ ३०. वनानी–क्रिवि वनोवनीं, प्रत्येक वनांत 'अतीरती पुल्कल्पी झाले हिंडु लागले वनानीं।' –अफला ७६ [वन द्वि] वनाळी–स्त्री झाडांची रांग राई झाडी 'छाया तियेस दुसरी तिमिरी वनाळी। जे सावळी युवतितुल्य दिसे निराळी।' –र २३ [वन+आली] वनेचर वनौक–स–वि वनचर पहा 'अटवियें माजी जैसा। वन्हि रिघता सहसा। अधिनी की दिशा। वनौकें तिये।' –ज्ञा १८ १५३१ वन्य–वि १ वनांतील, वनांत राहणारें, वाढ णारें –ज्ञा १८ १०६५ २ जंगली रानवट ३ वनवासी 'सरलें मार्गे सर्वहि पुण्य। होउनि वन्य व न्य स्थिरु।' –मराठी ६ वें पु (१८७५) पृ १७४ ४ रानटी मनुष्य असंस्कृत मनुष्य, वृक्ष प्राणी वगैरेची पूजा करणारा (इं) ॲनिमिस्टला प्रतिशब्द. –शास्त्री वन्यता–स्त्री रानटी अवस्था 'वन्यता आणि सुधारणा यांची अजून व्हावी तशी फारकत झालेली नाहीं' –आगर ३ २० [स]

वन–पु गोसाव्यांचा एक पंथ व त्यांतील व्यक्ति [स]

वन–पुन चिन्ह, खूण, वण पहा

वनई–स्त्री निरगुडी –बदलापूर ६९

वनचंदी–स्त्री एक वाद्य 'घडयाळ वनचंदी झडु लागली।' –पाळणेसंग्रह (शाहूमहाराजांचा पाळणा) ६

वनवणें–अक्रि करपणें, जळणें 'तापानें कवळलें। भूत जात वनवलें।' –ऋ ३३

वनवन, वनवनवाणा–णी–क्रिवि वणवण पहा (क्रि० फिरणें, हिंडणें, बहकणें, भटकणें)

वनवलिया–वि वणव्यांत सांपडलेला 'कीं मळयागिरीचा माथा। वनवलिया चंदनलता।' –शिशु ७५१

वनवा–पु १ दावानल वणवा पहा 'रानतेला लागला वनवा जळती अग्नीं।' –ऐपो ४०४ २ (ना) त्रास, जिवाची आटापीट

वनसें, वन्सें–न स्त्री अव नवऱ्याची बहीण (नेहमीं अनेकवचनी प्रयोग (वनसें हें रूप स्त्रीलिंगांत सुद्धां येतें) [स भगिनी+सा, पतिस्वसा–वस्सा–वइसा–वयन्स–वन्स –भाअ १८३३, बहिणी+असा]

वनस्पति–स्त्री १ लता, वृक्ष, झुडप इ० २ औषधी झाड 'ही कांहीं तरी वनस्पतिच असली पाहिजे' –स्वप १५५ ०शास्त्र–न वनस्पतीविषयीं संपूर्ण ज्ञान करून देणारें शास्त्र (इं) बॉटनी

वनस्फुरा–वि (महानु) विस्ताररूप 'समीप वनस्फुरा। ते म्हणों भक्ति क्षेत्रिचा धुरा।' –ऋ ८७

वनाळ–वि अंगावर वण असलेला ? 'काळे माणूस गोरे होयेना। वनाळास चेतन चालेना।' –दा १४ ६० २ [वण+स आलय=आळें]

वनिता–स्त्री स्त्री, वधू, नारी –ज्ञा १ १८७ 'जोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी। जंव सुंदर वनिता दृष्टी पडली नाहीं।' –तुगा ३२३८ [स]

वनेर–पु मुंगसाच्या जातीचा एक प्राणी कडिचोर पहा

वन्तिक–पु (मुद्रण) मेटपायमर पेक्षा थोडा मोठा टाईप [इं]

वन्समोर–क्रिवि (नाट्य) पुन्हां एकदा, आणखी नाट कांतील एखादें पद फार आवडल्यास तें पुन्हां म्हणण्यास सांग ण्यासाठीं हा इंग्रजी शब्दप्रयोग योजतात 'हर्षे टाळ्या पिटुनि अवघे गर्जती 'वन्समोर।' –अर्वाचीन ३८८ [इं वन्समोअर]

**वन्हि**—पु अग्नि –ज्ञा १ ७५८ [ स ] ०रव–न आग, तप्तता –ज्ञा १८.२२० ०यंत्र-न तोफ 'त्याभोंवतीं कवळ वन्हियंत्रें।'–सारुह ८ ५१ –वामन विराट २ ११ **वन्हिधूम न्याय**-पु ( जेथें धूर तेथें अग्नि ) सतत साहचर्य दाखविण्यामाटीं योजतात

**वन्हार**—उ (व ) एक नीच जात, महार

**वपणी**—स्त्री ओप देण्याचें हत्यार ओपणी पहा.

**वपणी-णें**—ओपणी, ओपणें पहा

**वपन**—न १ बीं पेरणें, पेरणी २ (सामा ) हजामत, ० मधु. डोकें इ०चे केंस काढणें 'मस्तकवपन आणा पाणी। नाहीं आड ना विहीर वर्गी।'–एरुस्व १२ १४८ ३ (विशेषत ) विधवा स्त्रीचें क्षौर करणें [स ]

**वपविणें**—(प्र ) ओपविणें पहा **वपींव**—ओपींव पहा

**वपा**—स्त्री १ हाडामासाचा चिकचिकीत रस २ हाडांतील मज्जा ३ काळजावरील कठीच्या कोंवळ्या पानासारखा असणारा पापुद्रा 'दर्भमुष्टिच्या गर्भि धरुनिया निर्भर पशुच्या वपा।' –राला ८७ ४ चरवी [ स ] **वपिन**–न (शाप ) चरबीचा मुख्य घटक, (इ ) स्टिअरिन याच्या मेणबत्त्या करतात

**वपारी**—स्त्री (व ) पाळी, आवृत्ति

**वपु**—पुन देह शरीर –ज्ञा १ ३ 'जिकडे वपु तिकडे मन मुक्त न क्षोभेल अन्यथा नातें।'–मामीष्म ४५ २ त्वचा 'मृदु आणि कठिण। हे स्पर्शाचे दोन्ही गुण। जे वपूचेनि सर्गे कारण। सतोषखेदा।'–ज्ञा २ ११५ [ स ]

**वप्ता**—वि पेरणारा [ स ]

**वफा**—स्त्री नक्की इमानीपणा, निष्ठा. [अर ] ०फीश दार-वि इमानी, निष्ठावंत [अर ] ०दारी–स्त्री इमानीपणा 'तुम्ही इमानें इतबारें वफादारीनें चालोन चाकरीची सरबरा ठेवाल तों पावेतों जहागीर-बे-खल चालेल' –ममव १६

**वफात**—स्त्री मृत्यु 'वाटेंत लसलीन वफात पावले '–ख ७ ३५७३ [ अर वफात्]

**वंब**—स्त्री (तजा ) वाचाळता, वडवड [ ता ? ]

**वंबण, वबणें, वंबळणें वबी**—ओंबण ओंबणें इ० पहा

**वमक**—न वांति वमन पहा 'दिवसदिवस वमक वाढे।' –दावि ३० [ स ] **वमणें** अक्रि ओकणें –ज्ञा ६ २४१ 'तव वळिभद्रें दिधली लाथ। येरू अशुद्धातें वमित।'–एरुस्व १० ५१

**वमन**–न वांती ओकारी 'कोण नाहीं दक्ष करिता ससार। आम्हीं हा विचार वमन केला। –तुगा १६६७ [ स ]

**वय**—न १ उमर, आयुर्मान आयुष्य जन्मापासूनचा काल २ तरुणपणा, ज्वानी ३ उतार वय; वृद्धावस्था 'आमचें वय झालें '[ स वयस्] **वयात येणें**–१ तारुण्याच्या भरांत येणें, तरुणपणा प्राप्त होणें २ विवाहयोग्य होणें, समजू लागणें 'ती वयात आल्यावर तिच्या बापानें तिचें लग्न करून दिलें '–मराठी ३ रेंपु (१८७३) पृ २० ३ (कायदा) सज्ञान होणें, ०व्यवहाराला लायक होणें **वयसा**–स्त्री १ वय, आयुष्य 'सार्थकविण वेची वयसा। तो येक मूर्ख।' –दा २ १ ५४ ' २ तारुण्य 'एरीं वयसेचें जाड बाधलें। मग मन्मथाचिये कासे लागले।'–ज्ञा ७ ८५ **वयस्क, वयस्कर, वयस्थ**-वि १ प्रौढ, बरेंच वय उल्लंघिलेला, पोक्त २ तरुणदशा प्राप्त झालेला, वयात आलेला. 'माझा मुलगा वयस्क होऊन अविवाहित आहे' ३ वयानं मोठा, वडील (सापक्षतेनें) ४ (वयस्क) –वयाचा, वय असलेला समासात उपयोग उदा० समवयस्क **वयस्य**-पु ( सारख्या वयाचा ) मित्र, सखा (स्त्रीलिंगी रूप वयस्या ) 'चतुर तिज-समाना सर्व तीच्या वयस्या।'–सारुह २ ७१ **वयातीत**–वि वृद्ध, म्हातारा **वयो**–वि वय भरलेला, वयाचा समासात उपयोग उदा० अल्पवयी **वयेसा**–वयसा पहा **वयोगत-वृद्ध**–वि फार वृद्ध, जख्खड **वयोधर्मानें**–क्रिवि वयमानानें, वय झाल्यानें, वयाप्रमाणें **वयावस्था**–स्त्री आयुष्यातील अवस्था. या तीन आहेत बाळपण, तरुणत्व, वृद्धत्व

**वय**—स्त्री (व ) आजी (बापाची आई)

**वय**—स्त्री वई, कुपण –लोक २ २४ वै पहा ०**वाडा**–पु (को ) घर, शेत इ०च्या भोंवतीं असणारें कुपण

**वयफळ**—वि वायफळ पहा

**वयचणें वयरण-णें, वयरा, वयला, वयलाठी**—वैचणें, वैरण इ० पहा

**वयला**—वि वेगळा वायला पहा

**वया**—स्त्री अव ओंव्या, गाणीं, 'हळदी वया गाती।' –मसाप १ ० [ ओवी ]

**वयाळा-ळें**—पुन पाण्यातला एक बिनविषारी साप [वाळा]

**वर**—स्त्री प्रसुतीवळची वार वार पहा

**वर**—पु आशीर्वाद, शुभदायक वचन ऋषि, देव, ब्राह्मण इ० नीं दिलेला प्रसाद देणगी _ वर दमनऋषीनें दीधला वीं तयाला। –र १४ [स] ०**दान**–१ वर, आशीर्वाद देणें, देणगी, कृपेनें केलेलें दान २ एखाद्याच्या हातून हटकून घडणारी गोष्ट, नेहमीची, रूढ गोष्ट चोरीचें त्याला वरदानच आहे ०**दानी**–वि वर लाभलेला, भाग्यवान (वश, कुल व्यक्ति) ०**दी**–वि. वर प्राप्त झालेला (पुरुष, कुल, वश इ०) ०**प्रद**–वि अभीष्ट देणारा वरद **वरद**–पु गणपति देवता –वि १ वरदाता, प्रार्थिलेलें देणारा 'मग सहज सत्कारवादु। तो पद्मकर वरदु।'–ज्ञा १ १३ २ प्रासादिक कल्याणकारक 'हा हरिविजय वरदग्रंथ।' –ह २० २१९ ३ कृपाळु दयाळु ०**चतुर्थी-चौथ**–स्त्री

भाद्रपद शुद्ध चतुर्थी, गणेशचतुर्थी 'आम्हीं वरदचतुर्थीचा चंद्र अवचिना। वसिलू गोकुळीं।' –ह २५.१३७ ॰वाणी–स्त्री. आशीर्वाद, शुभचिंतन 'कीर्तनी रंग वाढे चौगुणी। वरदवाणी म्हणोनिया।' ॰हस्त–पु १ वर देण्यासाठीं (देवता इ० नें) ठेवलेला हात, दानशील, औदार्यदर्शक हाताची ठेवण २ शिष्याला विद्या देणारा गुरु, सर्व आश्रित किंवा मर्जीतला यांना उन्नतीला पोंचविणारा, किंवा ज्याचा आशीर्वाद खरा ठरतो असाला लाविनात ॰हस्त ठेवणें–१ पूर्ण कृपा करणें २ स्वतःमारखें करून सोडणें (निंदार्थी प्राय उपयोग).

**वर**—पु १ नवरा मुलगा (लग्नातील) –ज्ञा ११.३ २५नि, नवरा 'इंदिरावर'=विष्णु 'पर पुरुषाचे पायीं स्त्रियांनीं सोडून आपला वर।' –हाला ६५ [सं] ॰घोडा–पु १ वरात, लग्ना नंतर समारंभानें वधुवराची मिरवणूक २ लग्नाला जातांना नवरा मुलगा पालखी, घोडा, गाडी इ० तून वाजतगाजत जातो ती मिरवणूक ३ मुंजा मुलाची मिरवणूक ॰दक्षिणा–स्त्री वधूचा पिता कन्यादानाची सांगता करण्यासाठीं वरास देतो ती दक्षिणा, हुंडा, शुल्क. ॰धवा–पु नवरदेव, वरधावा पहा 'वटेश्वर चांगा वरधवा। तुम्ही नेऊनि मध्यें बैसवा।' –चांगदेवगाथा ॰धावा–पु १ नवऱ्यामुलास लग्नासाठीं घेऊन देण्याकरितां वाजत गाजत निघालेल्या मुलीचा भाऊ किंवा त्याचा बदला २ नवऱ्याला मूळ ३ (बडोदें) वरपक्षाकडून वराची स्वारी वधूगृहीं यावयास निघाली अशी खबर देण्याकरितां समारंभानें जाणारा वधूचा धाकटा भाऊ किंवा बदला –ऐरापुविवि ८३ वऱ्हाड–नागपुरा कडेहि हा 'वर्धाव' पाठविण्याची चाल आहे ॰निश्चय–पु वर निश्चित करणें, ठरविणें ॰पक्ष–पु लग्नांत नवऱ्यामुलाकडची बाजू, या बाजूची मंडळी याच्या उलट वधूपक्ष ॰पक्षीय–वि वर पक्षाकडील–कडचे (लोक, वऱ्हाडी, इ०) ॰प्रस्थान–न आपल्या जानवसेघरातून लग्नमंडपाकडे जाण्यासाठीं वराचें निघणें, वरघोडा निघणें ॰बाप–पु (लग्नांत) नवऱ्यामुलाचा बाप ॰माई–य–यी–स्त्री (लग्नांत) नवऱ्यामुलाची आई 'जाल्या वरमाय आळशीण। मग काय पहावी वऱ्हाडीण।' –नव २१ २९ ॰मायपण–न नवऱ्यामुलाची आई असण्याचा मान –एभा ? ॰मूठ–स्त्री १ लग्नांत वधूवराच्या वस्त्रांना एकत्र मारलेली गांठ सोडणाऱ्या मेहुणी वगैरे वधूपक्षीय स्त्रीला दिलेली देणगी २ वधूच्या पित्यानें मुलगी वराला देतांना दिलेली देणगी, हुंडा, शुल्क ॰मूळ–न वराला बोलावणें 'वरमूळा धाडिल्या सद्विप्र नारी।' –वसा ४८ ॰योजना–स्त्री कन्येसाठीं वराची केलेली योजना. **वरावर**–पु श्रेष्ठवर 'भीमकें अर्पूनिया अपार। कृष्ण वरावर पूजियेला' –एरुस्व १४ ८७ [वर+वर] **वरावर, वरेकाज**–स्त्री लग्न जमविणें, जुळविणें [वर+आवर, वर+काज] **वरेकज्या**–पु लग्न जुळविणारा, मध्यस्थ इसम **वरोपचार**–पु लग्नांत (कांहीं ठिकाणीं नंतरहि) वराचे सत्कार व सोहळे [वर+उपचार]

**वर**—वि १ श्रेष्ठ 'मी वर म्हणे मुधन्वा कीं साक्षात तात अग्रिरा वधाचा।' –मोमना ५ ९६ २ अत्युत्कृष्ट, अति सुंदर 'वरतनु दमयंती नंदिनी हे त्रितीय।' –नल ६५ ३ पहिला, अग्र 'वरसुत दम नामा दांत नामा द्वितीय।' –नल ६५ (समासांत) देव–द्विज–मनुष्य–तरु–पशु–पक्षी–वर. [सं] ॰कस–पु वर्चस्व, अधिकार, सत्ता, अम्मल (क्रि० असणें, चालणें, चढणें, मिळणें) –वि १ श्रेष्ठ प्रतीचें, कसाचें (सोनें) २ (सामा) सर्वश्रेष्ठ, सर्वोत्कृष्ट 'वरकस जिणता जिंकेना।' –दावि ३७१ ३ सर्वांवर सत्ता गाजविणारा, ताब्यांत ठेवणारा, दखलगिरी करणारा 'सर्व पशूंचा वरकस वाघ, पक्ष्यांचा वरकस घेंगसाणा, मुलांचा वरकस पताजी, उंदरांचा वरकस मांजर ॰कसदार–वि अंमल चालविणारा, अमलदार, दप्तरदार वरकस अर्थ ३ पहा **वरती**–वि श्रेष्ठ 'जे गतीहून वरती दुजेना अधिक नाहीं।' –एभा ३१ १५६ **वरांगना**–स्त्री श्रेष्ठ स्त्री [वर+अंगना] **वराचे**–वि श्रेष्ठ 'बहुतांतीं वराचे यादव।' –उषा ७३ ७ **वरान्न**–न १ पक्वान्न 'अन्न वरिष्ठ वरान्न।' –एरुस्व १४ १२५. २ वरण. 'अवघ्यांवरी वाढिलें जाण। वरी वरान्न स्वादिष्ट।' –एरुस्व १४ १२५ 'सोलीव डाळींचें वरान्न।' –मुवन ११ १२४. [वर+अन्न] **वराप्सरा**–स्त्री प्रमुख अप्सरा (रंभा, मेनका इ०) 'शक्रप्रेषित वराप्सरा नटल्या।' –मोमन २ ४६ [वर+अप्सरा] **वरांवर**–वि. श्रेष्ठांत श्रेष्ठ 'हेंचि निज ज्ञान साचार। वरांवर वरिष्ठ।' –एभा १० ७०६ [वरात् वर] **वरासन**–न श्रेष्ठ आसन, स्थान 'वरासनीं पाषाण। तो न मानावा सामान्य।' –तुगा ०६८ [वर+आसन] **वरिष्ठ**–वि श्रेष्ठ 'आम्हांचिया रजरिया। श्रेष्ठ देवता वरिया।' –ज्ञा १७ ९८ [सं वरिष्ठ]

**वर**—क्रिवि १ पर्यंत, काल, मर्यादा किंवा प्रमाण यांपावेतों. उदा० आजवर, वर्षावर, पायलीवर, खंडीवर २ उंच, उंच प्रदेशीं, उपरि याच्या उलट खालीं ३ नंतर, मागून 'औरंगजेब मेल्यावर कोण गादीवर आला ?' ४ अधिक, जास्त 'त्या सभेंत शंभरावर लोक नव्हते' ५ शिवाय, आणखी 'आम्हांकडून काम करून घेतलेंच, वर आम्हाला शिव्या पण दिल्या' ६ मुळें, कारणानें 'पुरुषोत्तमरावाचें घर आपणावरच चाललें आहे' –इप ३२ ७ अनुरोधानें, लक्ष्यविषय करून 'वाघावर एकटा कसा चालला आहे तो पहा' 'या विषयावर चार घटका बोलत होता' ८ परंतु 'हे सारि ते वर थोडे। आणीकही साधील गाडे।' –ज्ञा १६ ३५३ वरता, वरी पहा [फा वर; सं उपरि, प्रा उवरि तुल०] ॰डोकें काढणें–ऊर्जितावस्थेप्रत येणें 'दारा बाईनें नानवाला मातारची गादी सांभाळून देऊन वर डोकें काढलेलें

जिजाबाईला मानवलें नाहीं. '–भक्तमयूर केका५ ०तोंड करणें–निर्लज्ज बनणें, लाज न वाटणें ०पडणें–(–वस्तू, गोष्टी) तत्परतेनें करू लागणें 'अलीकडे तो यादवन्यावर पडला आहे ' ०पाहणें–लज्जा, शंका, भीति न वाटणें, धीटपणा असणें, उजागरीनें वागणें 'पापाला वर पाहण्याचा धीर होत नाहीं ' –पुण्यप्रभाव १३७ सामाशब्द– ०उपचार–पु अव १ वरवर सभ्यपणा, शिष्टपणा दाखविणें, खोटी नम्रता, शिष्टाचार २ रोगनिवारणासाठीं बाहेरून शरीराला केलेले उपचार ०कडी–वर्चस्व, वरचढपणा 'राज्यात मुधोजीची वरकडी झाली की आपला तो सुड उगवील अशी कारभान्यास भीति पडली ' –विवि ८६११० ०करणी–वि बाह्य, औपचारिक, कृत्रिम, दिखाऊ, वरकाती, पोकळ (भाषण, कृत्य, इ०) ०कर्मी–वि १ वरकरणी पहा 'याचें असलें वरकर्मी बोलणें तुम्ही जमेस धरू नका हो ! ' २ बाहेरचा, आत ज्याचा प्रवश नाहीं असा (रोग, औषध) ३ मूळचा झरा नसलेलें (जल इ०) ४ मूळ नसलेला, उपरी, स्थिरपणा, कायमपणा नसलेला ५ पोकळ, दिखाऊ, खोटें ०कर्मी आदर–पु पोकळ, कृत्रिम आदर, भाव, आदरसत्काराचा खोटा देखावा ०काती–कातीचा–वि १ दिखाऊ, सुदर, सुरेख दिसणारा २ वरकरणी पहा 'नाहीं शब्द र बोल्लास वर कातिचा।' –प्रला १५६ ०काम–न प्रत्यक्ष बनावाचें काम न करता त्याला साधनीभूत असणाऱ्या गोष्टी करणें उदा० स्वयपाकाला लागणारें साहित्य पुरविणें, धुणेंपाणी इ० ०कोट–पु थडी, पाऊस इ०साठीं कोटावर घालावयाचा लाब कोट (इ) ओव्हरकोट 'उलट वरकोट आणि हातमोजे हा नेहमींचाच पोषाक होऊन बसला आहे ' –सास २२३४ ०खर्च–पु १ अधिक, योजलेल्यापेक्षा जास्त खर्च २ इतर किरकोळ खर्च ०खाल–क्रिवि खालवर, उचसखल, विपरीतीनें ०घडी–स्त्री १ वस्त्राची घडी करताना दर्शनी चागला भाग यावा म्हणून अमळ बारीक विणून काढलेला पट्टा, वरची चागली बाजू २ (शिपी काम) बाहेरच्या बाजूला असलेली दुमड 'वरघडीच्या तळाची द्रावमर करावयाची असल्यास ५ च इंच कापड अधिक घ्यावें ' –काटकर्तन ८ ०घडीचा–वि १ बाह्य, वरचा २ वरघडी असलेलें (वस्त्र) ३ (ल) दिखाऊ भपकेदार ४ कृत्रिम, खोटें ०घाट–पु १ बाहेरचा आकार, घडण, बाह्य स्वरूप २ घाटावरचा प्रदेश, सह्याद्रीच्या पूर्वेकडील मुलूख ०घाटी–वि वरघाटासबधीं (माणूस, पदार्थ इ०) ०घाटीण–स्त्री घाटा वरची स्त्री ०घाला–पु जोराचा हल्ला घाला पड्रिपुवरता वरघाला।' –दावि ३७९ ०चढ–वि सरस, श्रेष्ठ, जास्त, वरच्या दर्जाचा ०चढपणा–पु सरसपणा, श्रेष्ठपणा ०चष्मा–श्मा–पु १ वरचढपणा, वर्चस्व (क्रि० करणें, होणें) 'काके शाही १ ४५ शियन वर्गाचा दुसऱ्या वर्गावर नेहमीं वरचष्मा असे ' –मराठी ६३०६ २ देखरेख करणारा, तपासनीस, वरचा अधिकारी ३ वर्चस्व गाजविणारा, अधिकार चालविणारा ०जोर–वि श्रेष्ठ 'सीरजोर वरजोर जोर हा।' –दावि ३१०. ०डगला–पु (बडोदें) वरकोट पहा –खानो ३ ०डोळ्या–ळा–वि १ उलटया बाहुल्या असणारा, अदूरदृष्टि, नेत्ररोगी 'परपुरुषातें नयनीं पाहे। उपजता वरडोळी होये।' –गुच ३१ ८५ २ आढयताखोर, रागीट ३ टक लावून वर पाहणारा, वर दृष्टि असणारा (निंदार्थी उपयोग) ०तगड–न. दागिन्यावरचा तगडाचा अश ०दळ–न भाजी· बरोबर चव येण्यासाठीं शिजविलेली डाळ [वर+दाळ] ०दळ–न १ घरावर कौलें, गवत इ० घालण्यापूर्वी वासे, पाजरण इ० पसरतात तें २ वरचें कवच, सात्र 'येक वरदळ बरें असतें। कठिण अतर्त्यागि दिसतें।' –ज्ञानप्रदीप ८३४ ३ वरचा भाग 'अग सांजिरें नाकहीन। वरदळ चाग चरण क्षीण –एभा ११११२८५. ४ मुलामा 'हावभावाचेनि वरदळें।' –भाए ३४५ –वि १ वरवरचा, बाहेरचा 'दाऊनिया वरदळ वेष। मना अगीं आशा· पाश।' –निगा २८० 'वरदळभक्ती करोनिया नमन।' –नव १८१६३ २ दाभिक 'तुका म्हणे आम्हा तुमचेचि फद। वरदळ छद कळों येती।' –तुगा ५०७ ३ हलकें, नीरस, किरकोळ. [वर+दल] ०दळ–स्त्रीन १ उपयोगात, वहिवाटींत असलेले जिनस 'चोर आले आणि वरदळ नेली ' २ नफा, वर मिळणारा फायदा 'लाख रुपये मूळ पुजी जें वरदळ मिळेल तें खातों ' ०दळखर्च–पु जास्त खर्च ०दळ जिंदगी–दौलत–स्त्री. सामान, जगम माल वरदळा–ळें–क्रिवि. वरून, बाहेरून 'सेवन हें शिरसा धरीं। अतरीं ही वरदला।' –तुगा ३२२३ 'तेविं मनुष्य वेशाचें रूपडें। वरदळें दिसे चोखडें।' –ज्ञाप्र ७५०. वरदळ सामान–१ जगम माल २ किरकोळ माल, सामान ०दक्षिणा–स्त्री चोरी इ०कानें गेलेला पैसा, पदार्थ परत मिळविण्यासाठीं व्यर्थ खर्चलेला पैसा ०दूध–न अगावरील दुधाखेरीज इतर दूध (लहान मुलास दिलेलें) वरचें दूध पहा ०नट–क्रिवि वरून, वरकाती 'लई अतरची खोल मोठी वरनट केवळ सात्विक दिससी।' –होला ८९ ०पंग–क–वि वरवरचा, बाह्यात्कारी (देखावा) 'अवघा वरपग सारा। पोटीं विषयाचा थारा।' –तुगा २८३२ ०पंगाचा–पंगीचा–वि क्रिवि वरकरणी, वरकाती पहा 'कीं वरपगी जेवि जारीण। दावी भ्रतारसेवा करून।' ०पंगी–पंगी–पागी–क्रिवि वरवर बाह्यात्कारी, बाह्यत 'सामाजिक व धार्मिक रीति इग्रजी शाळेंतला मनुष्य वरपागी पाळीत असतो ' –टि ४३७८ [वर+पग] ०पगतीचा–वरपगी पहा वर कानी 'हा स्नेह नाहीं वरपगतीचा।' –सारह १३६ ०पिका–पीक–वि झाडावर पिकलेला (फलादि पदार्थ) याच्या उलट

कोनपिका. 'वरपिका फणस असला तर मला दे. कोनपिका नको.' [वर+पिकणें] ०गुजारत-क्रिवि. वरवर; बाह्यतः [वर+हिं. गुजारत] ०घट्टा-पु. नाणें मोडतांना पडणारा वट्टा. बाहेरवट्टा पहा. ०घंचाई-स्त्री. बाह्य भपक्यावरून झालेली फसगणूक. [वर+घंचणें] ०घंचाईचा-वि. वरकर्मी पहा. ०घर-घरता-घरतों-क्रिवि.वि. १ आत प्रवेश न होतां-करता, बाहेरूनच (खोदणें, चोळणें इ०). २ थोडें फार, खोल नव्हे, अंतर्यामी नव्हे अशा रीतीनें. ३ वरकांती-वरपांगी; कृत्रिम; खोटें. 'तो मला वरवर प्रेम दाखवितो.' म्ह० वरवर माया करती आणि तोंड झांकून खाती. ०घर करणें-केल्यासारखें दाखविणें; करण्याचें ढोंग करणें. वरवर बोलणें-रहणें-हांसणें-रागें भरणें-कृपा करणें इ० प्रयोग होतात. ०घर उपचार-पुअव. बाह्य, दिखाऊ आदरसत्कार; नुसता, पोकळ शिष्टाचार. ०वळा-पु. वर्चस्व; बलाधिक्य. 'देखोनि वैरियांचा वरवळा। कांपिनली भीमक्वाळा।'-एरुस्व ८.५१. ०वेष-पु. बाह्य वेष; तुरखा; ढोंग. ०शेर-सर-सांड-स्त्री. भरपूरपणा; महामुरी; तुडुंब होऊन सांडणें. -वि. भरपूर; तुडुंब. ०सार, ०सार-पारसार-स्त्री. (व) संसारोपयोगी सामानसुमान, चीजवस्त. ०सास-पु श्वास; ऊर्ध्व (क्रि०लागणें). [वर+श्वास] वरचा-वि. बाह्य, वरच्या भागाचा. ०चें दूध-न. लहान मुलाला आईच्या दुधाऐवजीं-शिवाय गाईम्हशीचें जें दूध घालतात तें. -टि १ २९७. घरता-तीं-तें-शअ क्रिवि. सर्व अर्थी वर पहा. १ वर. 'त्यानें जे समर्थी वरतें बसावें ते समर्थी त्याची बुद्धि मोठी उदार व्हावी.' -सिंहासनबत्तीशी १. २ आणखी. ३ अधिक. 'त्याहूनि कोटियोजना वरता।'-भारा किष्किंधा ११.७९. ४ हून; पेक्षां. 'तरी स्त्री आणि स्त्रैणावरता। दु संग सर्वथा असेना।'-एभा २६.३०२. ५ श्रेष्ठ, उच्चतर ६ ('किनाऱ्याच्या बाजूनें) उत्तरेकडचा. ७ किनाऱ्यापासून आत. वरला-वरचा पहा. वरावरी-क्रिवि. १ वरचेवर; वारंवार.-तुगा. -शर २ शपाट्यानें, निमिषात वरि-रीं-शअ,क्रिवि. वर पहा. १ वर, उंच 'तूं काइसयावरी आहासि ऐसें। पाहिलें मिया।'-ज्ञा ११.२७५. २ आणखी. 'ऐसा जात्यंधु अघस्तु। वरि,भवरोगी ग्रस्तु।'-ज्ञ २. ३ वरवर; बाह्यतः 'सत्य धनंजय कर्में रूपें दिसतो उगाचि वरि नरसा।'-मोभीष्म ११.५२. ४ पर्यंत. 'तैसें आत्मेच्या महापुरीं।रिघताति कोटिवरि।'-ज्ञा ७.१३. 'देव जवळ अंतरीं। भेटी नाहीं जन्मवरी।'-तुगा. ५ (तृतियेचा अन्यय)नें; मुळें. " हो निर्मेळ का म्हणिजे। घोळवरी।'-ज्ञा ४.११३. वरिवरी-क्रिवि वरवर पहा. 'अवघे देखिले अधर्मरत। वरीवरी आचार दावित। जैसी शांनि मैदाची।'-वरीर-वि. श्रेष्ठ, उत्कृष्ट. 'प्रेमळ देखनाचि दिठीं। मीं मैं आपुलिये संवशटीं। नव्हता वरीव दे सुखकोटी। मयें तरी उद्धाउठी। सेवक होय।'-एभा १४.१५८. वरिमा-पु. १ वरचढपणा; श्रेष्ठपणा. 'जियें आपुलियां वरवां। नंदनवनातें मागती वरिवां।'-शिशु २४९. २ शोभा, उत्कृष्टपणा. वरिष्ठ-वि. विया, वय इ०कानीं श्रेष्ठ; सर्वांत मोठा; श्रेष्ठ. -ज्ञा १.३०. 'ईश्वर तो अति वरिष्ठ। येरु भूतभौतिक अति कनिष्ठ।'-भारावाल ११.१६५. ३ अत्यंत मोठें, जड. [सं. वरिष्ठ] वरीयान्-वि. श्रेष्ठ (मनुष्य, प्रश्न इ०) अत्युत्तम; अत्युत्कृष्ट. -पु. (ज्यो.) १८ वा योग. वरील-वि. वरच्या भागासंबंधीं; वरचा. वरुता-तें-शअ, क्रिवि. वर, वरता-तें पहा. 'पाळा माडिला शरीरावरुता।'-नव ११.१२०. वरून-शअ. १ वरच्या भागापासून. २ साह्यानें; साधनानें; कारणानें. 'तुला म्यां शब्दांवरून ओळखलें.' ३ परिणामतः; प्रसंगानें; मुळें. 'तूं सांगितल्यावरून मी गेलों.' ४ पुढून; समोरून, जवळून. 'तो माझे गावावरून गेला.' ५ पृष्ठभागास धरून. ६ नंतर; मागाहून. (कालसापेक्ष प्रयोग). 'स्नान केल्यावरून भोजनास बसलों.' ७ वर; उपरि. 'झाडावरून पांखरें बसलीं.' 'घोड्यावरून सगळीं माणसें बसलीं' (फक्त अनेकवचनात प्रयोग). ८ प्रमाणें. 'आपणावरून दुसऱ्याला। राखीत जावें।'-दा १२.१०.२८. 'आपणावरून जग ओळखावें' ९ वरील बाजूस, बाह्यप्रदेशीं. 'अंतर्वसन बाह्यवसन कंचुकीवरून प्रावरण।'-ह २४.१६३. वरौता-तीं-वि वर, वरता पहा. -ज्ञा ४ २०९. 'वरौतें एऔनी आनंदमरें।'-दाव १८८. 'सुकुमार पर्णे भूपति भृंग। घरोनि ठेली वरौतें।'-मुआदि १८ ३४. वरौनी-वरून पहा. 'वरौनि कापूरकेळीं। भ्रमरांची झांक फळिली।' -शिशु ६०५.

वरई—स्त्री. १ एक प्रकारचें धान्याचें गवत २ एक धान्य. वरी पहा. [देप्रा. वरइअ]

वरई—स्त्री. एक सुवर्ण नाणें. वराई पहा.

वरकड-ड—वि. इतर, बाकीचें; राहिलेले. 'तरी तपक्लेशा वरकडसनी। दु ख देणार नाहीं बा।-नव ११.२९. [?प्राकृत-पराकड-वराकड-वरकड. -भाअ १८३५]

वरकल, वरकोल—पुस्त्रीन. सोन्याच्या कसोटीचा दगड (हा पितळी कोंदणांत बसविला असतो), कसवटी; कसोटी. 'परी परिसाचा वरकलीं। नाहीं चोखाळिकाची बोली।'-ज्ञा१७.४०७; 'सोनारी वरकोल घातला।'-रावि १९.११७. [का. ओरेकल्लु, ते. ओरेगळ]

घरकस—वि.१ तांदूळ, गहूं, बाजरी, जोंधळा इ०मुख्य धान्यें व तूर, हरभरा, वाटाणा, मुग, मट हीं कडधान्यें सोडून इतर हलकें, गौण (धान्य). नाचणी, वरी, हरिक वगैरे २ अशा हलक्या धान्याला योग्य (जमीन); नापीक, माळरानाची. ३ (विशेषत भातशेताभोंवतालची, वरताची (जमीन). घरकसल-स्त्री. वरकस धान्यें, कडधान्यें यांत सामान्य संज्ञा. घरकशी-वि. वरकस धान्याच्या पिकाणच योग्य असी (जमीन). [वरं+सं. कृषि]

**वरकारी**—स्त्री (कुरुद) दुरडी, सुप यास गोठ घालण्या सारीं वापरतात ती जाड कांबीट

**वरख-ग**—पुन (कों कुण) आडनाव [स वर्ष]

**वरख**—पु १ पान (पुस्तकाचें) २ पान, पातळ पत्रा, वर्ख (सोनें किंवा इतर धातूचा) 'वर्खिल चांदिचे सारखे वरख।' –प्रला १९६ ३ कपटा, अर्धा तुकडा (कागदाचा) 'लिहिले असती वरखावरी।'–दावि ४ अर्धा बंद, चौबंदी घडी घातलेल्या देशी कागदाचा एकअष्टमाश भाग [अर. वरक] **वरखी** वि १ वरख लावलेलें, सोन्यानें मढविलेलें (पान) २ मुलाम्याची, खोटी 'ब्रह्म सबाह्याभ्यंतर भरलें परि भक्ति नसो वरखी।'–देप ७३

**वरखडणें, वरखाडणें वरखडा, वरखाडा**—ओर खडणें, ओरखडा इ० पहा.

**वरखणें**—अक्रि. वर्षणें पहा 'सुरेज्याच्या वारीं वरि सुमन वर्षे वरखिला।'–निमा १, त्र्यंबकदश स्तोत्र ३० [स वृष्-वर्ष, हि बरखना]

**वरखता-त्या**—पु वरकत्या-ता पहा भात कापून काढल्या वर त्याचे भार बांधण्यास, पेंढ्यास पीळ घालून वावभर लांब करतात तो दोर –कृषि २३८

**वरखल**—पु वरकल पहा

**वरखशी, वरखशील, वरखस, वरखसल**—वरकस इ० पहा

**वरखु**—स्त्री वृष्टि. 'पाणियावरी वरखु। होता कें असे विशेखु।'–अमृ ६६० [स वृष्-वर्ष]

**वरंग**—पु एक झाड

**वरगण**—स्त्री वाटणी, (प्र) वर्गणी 'जयाचिया अक्षौहिणी। तेणें तिहा आरणी। वरगण कवणक्वणी। महारथीया।' –ज्ञा १ २२ **वरगणी, वरगत**–वर्गणी, वर्गत पहा

**वरगणें**—क्रि (बे) वाकड होणें

**वरंगल-ळ**—पु भाताची एक जात (कु) वरगाळ याच्या तीन पोट जाती –साधा वरगल, दुधा वरगल व शेप्या वरगल

**वरग(घ)ळ**—स्त्री उतार, उतरण, घसरण [वरून+गळणें, घळणें ?] **वरंग(घ)ळणें, वरग(घ)ळणें**–अक्रि १ खालीं घसरणें, ओघळणें २ कोसळणें, गडगडणें, ढासळणें. ३ धोधो खालीं पडणें (पाण्याचा लोट, नदी) ४ पुष्कळसें खालीं, बाहेर पडणें, भसदिशीं बाहेर येणें, वाहणें 'कणसातून दाणा-पोत्यातून साखर, सरातून मोर्ती-नाकातून नय-खिशातून रुपये वरगळतो –ती–तें–तात.'

**वरघट-टी**—स्त्री १ भरभराट, उत्कर्ष 'धंदा वरघटीला आणणें'–केसरी २९ ९ ३० २ पुनरुज्जीवन [वर+घटणें]

**वरचणें**—क्रि (व) कापूस वठणें

**वरचस, वरचस्व, वरचस्वता, वरचस्वी**—वर्चस, वर्चस्व व त्याचे सामासिक शब्द पहा.

**वरचा**—वि जादा, ऐवजी, वाटचा, वारचा पहा.

**वरचा-ता**—वि. पश्चिमेकडचा, पाश्चात्य वरती पहा

**वरचेवर, वरच्यावर**—क्रिवि १ (खालीं न येता, पडता) वर, अधातरीं. २ जसें होतें, असावें तशा स्थितींत, अलगत, हातचे हातीं ३ वारवार, पुन्हा पुन्हा ४ झटदिशीं, चलाखीनें [वर द्वि]

**वरचिलें, वरचील**—वि १ इतर, अन्य, बाकीचें; उरलेलें, अवांतर 'जन्मासवें भ्रम वरचिलही गेले।'–ज्ञा ९ ४०४ २ वरील, वर सांगितलेलें 'आता येथें सि कवण भिडे। हें पांडवसैन्य कीर थोडें। वरचिले निपाडें। दिसत असे।'–ज्ञा १ ११९. ३ आणखी ४ किरकोळ, सामान्य 'ससप्तक ते राक्षस अर्जुन तो रघुपती न वरचील।'–मोकर्ण २ १२ वरकड पहा [वर]

**वरजणें**—उक्रि वर्जणें पहा १ टाकणें, त्याग करणें 'आपल्याला तुम्ही रूपासी समजा। कासया वरजा आरसिया।' –तुगा ३३३३ २ प्रतिबंध करणें 'नमन करुनिया निघता न सके माता सुतास वरजाया।'–मोरा १ १२ २६

**वरजाळी**—स्त्री भोंवरा खेळण्याची एक पद्धत

**वरजी वांकडा**—वि (वरजी आणि वाकडा असे कृष्णाचे दोन विरूप गोपगडी होते त्यावरून) अत्यंत बेडौल, विद्रूप, कुरूप वडजा वाकडा, वडजा पहा.

**वरट, वरटघाण, वरड, वरडणें, वरडा, वरडा-वरड**—ओरट, ओरटघाण इ० पहा

**वरंट**—पु (राजा) पेटका, वळ, (प्र) वरवट

**वरटा**—स्त्री १ हंसी २ गांधील माशी [स]

**वरंटा, वरंटापाटा**—पु वरवटा, वरवंटापाटा पहा

**वरठा-ठी**—पु (व कों) परीट, धोबी [सं वरटा= हंसी ?] **वरठीण**–स्त्री धोबीण 'गाडवीकरिता रहतो वरठिणी।'–दावि १८५

**वरठी**—स्त्री हंसी, वरटा 'निर्मळ वरठी गे। तयाचे दारीं मी घाली घरटी गे।'–मध्व ३९८. [सं वरटा]

**वरंड**—स्त्री १ डोक्यावर घेण्याकरितां बांधलेला गवताचा भारा. २ धान्याची रास ३ कापणी केलेल्या ताटाचा भारा. ०गवत–न कापून आणलेल्या तागाचा भारा असा भारा दरसाल कुळाकडून मिळण्याचा खोतास हक्क असतो [स वरड]

**वरंड-डा-डी वरांडा**—स्त्रीपु १ कठड्याची, कडेची भिंत (रस्ता, व्हराडा याची) २ दोन शेतामधील बांध, हद्दीची भिंत, पाळा ३ ज्याच्या मेंढा पाडतात ती मळलेली माती (तिच्या लावट ढिगाच्या आकारावरून) ४ भिंतीची मुंडेरी; व्रवड ५ छप्पराचें आढें, पाटेम [स वरड] **वरंडा**–पु (कु. कों.) दगडाची अव्यवस्थित रास.

घरंडा—पु. सज्जा; छप्पर असलेली गॅलरी. [ सं. वरंड; गो. वरांद; पोर्तु. वरंदा; इं. व्हरांडा ]

घरंडा—पु. ( गो. ) उच्च कार्यासाठीं देह ठेवणाऱ्या थोर पुरुषाच्या मृत्युस्थानीं असलेलें दगडाच्या ढिगाचें स्मारक. –राधादी १६०.

घरडे( डे )ल—न. तळणाचे शिल्लक राहिलेलें तेल. याचा वास फार उग्र असतो. ओरडेल पहा.

घरढाण—स्त्री. दुर्गंध; दुर्दर्प. ओरढाण पहा. ' झाली मिठेची सारणी । भोंवतीं उठली वरढाणी । ' –दा ३.३.२३.

घरढोक-ढोंक—पु. भातखाचरांतील एक मोठा पक्षी.

घरण—पु. क्षत; व्रण पहा.

घरण—स्त्री. ( कों. ) गवताचा भारा. वरंड पहा.

घरण—न. १ डाळीचें कालवण. याचे-दोन प्रकार: आंबट व गोड. २ शिजविलेली डाळ पातळ करून भातावर वाढतात तें. वरान्न पहा. [ सं. वर+अन्न ] म्ह॰ वरण दाटणी आणि बायको आटणी. ॰भात-पु १ नुसतें वरण आणि भात; साधें जेवण. २ (ल.) नवऱ्यापेक्षां बायको वय, उंची, बांधा इ॰ त मोठी असते तें जोडपें. ' आतां अंमळ मुलगा आहे असत्या बांध्याचा आणि मोरीची जात पडली उफाडयाची म्हणून वरणभात व्हावयाची भीति ! ' –गडकरी ( वेड्याचा बाजार ).

घरण—न. १ लग्न; विवाह. ' पट महिषीचें वरण । भौमासुराचें निर्दळण । ' –एमा ३१.३८३. २ नेमणूक; निवड; पसंती. [ सं. वृ-वरण ] वरणी-स्त्री. १ वधूवस्त्र, अष्टपुत्री. ' ती पिवळी वरणी नेसली होती. ' –झांमू ८१. २ पाळीनें अनेक ब्राह्मणांनीं करावयाचें अनुष्ठान, देवाची आराधना. ( क्रि॰ देणें; घेणें ). ३ अशा अनुष्ठानाची पाळी, वेळ ( दर एकाची ). ४ (दैवज्ञ) वरातीच्या वेळीं लागणारें-पांच नारळ, साडी व खण-इ॰ सामान. ५ ( दैवज्ञ ) तेलफळाच्या वेळचें सामान ( नारळ, खारका, खजूर, बदाम इ॰ ) –वदलापूर २३६, २४० ॰लावणें-१ सोय लावणें; पाळी देणें. २ प्राप्तीचें साधन मिळवून देणें. वरणीय-वि. वरावयाचा; निवडावयाचा; वरण्यास लायक, योग्य. वरणें-उक्रि. १ लग्न लावणें, विवाह करणें. ' बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें । ' –ज्ञा ६.४५३. २ नेमणें; अधिकृत करणें. ३ पसंत करणें; स्वीकारणें. –ज्ञा ९.३१०. ' कीं टाकावें सत्वर वपु निजरण धर्म सत्पथा वरुनी । ' –मोभीष्म ११.१०९. ४ धारण करणें; घेणें. –भाज्ञा १७.५८. ५ अंगिकारणें; घेणें, स्वीकार करणें. ' पाहवमर्से पलायन वरिलें असतां रणीं अनीकाहीं । ' –मोकर्ण १.२३.

घरणा—पु पावटा; वडवेवाल. [ वरण ? ]

घरणें—वैरणें पहा.

घरणें—न. ( व. ) वैरण पहा.

घरतनी—स्त्री. ( वै. ) रतीब. [ सं. वृत्त, वर्तन ]

घरतवळा,घरतावळा,घरताळा—पु. १ एका शिक्क्याचें नाणें देऊन दुसऱ्या शिक्क्याचें घेतांना पडणारा बटाव, वरकड; वर्तावळा. २ विवक्षित प्रमाणानें मोजल्यावर येणारा वाढावा. ३ व्यवहार केल्यानंतर हातीं राहणारा नफा किंवा भरावा लागणारा तोटा; शिल्लक; बाकी. ४ पुरें माप दिल्यावर वर आणखी थोडा जिन्नस घालतात तो. [ वर, वरता+ल ]

घरताणा—पु. ( सोनारी ) सोनाराचें एक हत्यार; कावळता पहा. यानें दागिन्याला गोल आकार देतात. [ सं. वर्तन ]

घरतावा—पु इजा; चढाई. –शर.

घरती, घरतीकडे—क्रिवि. पश्चिमेस. वरचा–ता पहा. देशावरचा माणूस कोंकणच्या बाजूस वरती म्हणतो. याच्या उलट खालती–कडे.

घरत्रा—स्त्री. दोरी; कातडयाची वादी, पट्टा. [ सं. ]

घरदळ—स्त्री. १ (रस्ता, जमीन, वस्त्र-पात्र इ॰ वर) नासधुसीची क्रिया; धुडगूस, तुडवातुडव, जोरानें, निष्काळजीपणें वापर; रावता. २ त्रास देणें; छळणें. ' पोरांनीं वरदळ लावली. ' ३ उपसर्ग; अडचण; त्रास. ' आमची काहीं वरदळ लागावयाची नाहीं. ' [ सं. वर+दल् ] घरदळणें-अक्रि. तोंड सोडणें; बाचाबाची करणें, भांडणें, तंडणें. –सक्रि. तुडविणें; नास करणें. घरदळीस-घर येणें-हमरीतुमरीवर येणें; फार कडाक्यानें भांडणें.

घरदाव—स्त्री. वरदळ पहा.

घरदावरद-दी—स्त्री. वरावर्दे, वर्दावर्द पहा.

घरदी—स्त्री. वर्दी पहा. ' शाहू राजाशीं वरदी वळली । ' –पाळणेसंग्रह ६.

घरदोळणें—उक्रि (महानु.) रगडणें; वरदळणें पहा. ' म्हाणौनि वरदोळि मुष्टिक । ' –गस्तो ८०.

घरधणी—पुन ( राजा. ) शिजणाऱ्या पदार्थावर ठेवलेलें झांकण [ सं. वर्धनी=विशिष्ट भांडें ]

घरंधार—क्रिवि. ( वर्षा ) मुसळधार; एकसारखा. ( पडणारा पाऊस ) [ वर+धार ]

घरधाविणें—उक्रि. खूप वरणें; खुलविणें; आजारणें गोंजारणें. [ स. वृधू-वर्ध ]

घरन—स्त्री. ( प्र ) वरण. ( व. ) व्हानसर भोल्या ज्वारीच्या ताटाचा ( जनावरास दिलेला ) चारा.

घरप—ओरप पहा. घरपणें-उक्रि. १ ओरपणें पहा. २ म्हशीच्या निरणांत हात घालून तिला फळण्यास उद्युक्त करणें. ३ ( सारवण, सांडलेला द्रव पदार्थ इ॰ ) हातानें निपटणें. ४ भुरकणें. 'मुखापासीं नेतो गजवर पितो तें वरपितो ।'–र (गजेंद्रमोक्ष).

घरपट बकरा —पु ( माण. ) खच्ची केलेला बकरा. [ वरपणें+बकरा ? ]

**घरपट्टी**—स्त्री (विणकाम) मागावरील कापड गुंडाळा वयाच्या लांकडास घालावयाची खीळ या दोन असतात फिरवणी पहा

**वरपड-डा, वरिपडा**—वि १प्राप्त –ज्ञा६ १६८,'पाड्वा वरपड न व्हावें ।' –मुवन १२ ४७ २ स्वाधीन, वश –ज्ञा २ ३४९ 'वरपडा होसि तू काळा ।' –देप ७१ ३ आसक्त, तावेदार वश 'जैसा योगी होय आत्मज्ञाना । वरपडा पै ।' –कथा ४ ६ ११२ ४ व्याप्त, मग 'दु खा वरपडा होता जाला ।' –दा ३ १ ४८ ५ विव्हल, दु खी 'तै वरपडा होय भरण्यशोकें ।' –मुसभा ८ १६३ –कथासा ३२ ११४ ६ पात्र, योग्य 'म्हणोनि स्वधर्मु हा साहसील । तरी पापा वरपडा होसील ।' –ज्ञा २ २०१. **वरिपडणें**–अक्रि १ प्राप्त होणें 'तेथ शब्दांकुर वरिपडी । श्रोत्रावाढी देव्हडी ।' –ज्ञा १५ १०० २ गुंतणें, वरपडा होणें 'वरिपडलें भवपाशें ।' –दावि ८४ ३ गोंधळणें, काहीं कळेनासें होणें ४ बुडणें, मग्न होणें 'सेवटी होए तापा वरिपडे । दु खाभिमानि ।' –क ५४ **वरिपडी**–स्त्री १ मिठी –एभा ६ ५७ २ उडी, झडप, लुब्ध होणें 'ऐशी डोळ्या आवडी । म्हणोनि कामिनी वरिपडी ।' –एभा १ २९४ ३ गर्दी 'ब्रह्मादिकांचिया वरिपडी । वखलुनि कवणाचे ताट काढी ।' –भाए १३२ ४ (महानु) पूर्वपद, आश्रयस्थान 'तया सन्निधानाची बेडी । जया नव्हेचि वरपडी ।' –भाए ५० [? वर+पडणें]

**वरपत्र**—न (जप्तीचा) सरकारी हुकूम, वारट 'मी तों महाराजाचा देशी जफ्तीदार । धाडिलेति वरपत्रासह ।' –दावि ३७७ [वर=श्रेष्ठ+पत्र?]

**वरपा**—पु दरोडा, लुटीचा हल्ला टकु तितरु वरपेकरी । वरपा घालिती ।' –दा ३ ७ ४९ **वरपेकरी**–पु लुटारू, दरोडेखोर मारकरी वरपेकरी । दरवडेकरी खाणोरी ।' –दा २ ३ ३१

**वरवडणें, वरवडा, वरवाडणें वरवाडा**—ओरबडण, ओरखडा इ० पहा

**वरवा वरभा वरभा**—पु १ बाध (वाफा, पाट, धरण इ० ला घालतात तो) (क्रि० घालणें) 'तों पाचेच्या वाफ्यांचे वरव नवेच बाधले होत त त्यांनेंच तुडवून टाकिले' –वाल २ ३७ २ पाण्याचा पाट 'वरवा खोल आहे त्यात पाणी अडकलें' ३ टेंगूळ ४ वरवी पहा

**वरम**—स्त्री (व) १ शेत पेरल्यानंतर शेतात उठणाऱ्या मातीच्या उंच रांगा २ पाणी जाण्यासाठीं बागाइतींत केलेल्या मातीच्या वरवड्या

**वरमणें**—अक्रि १ नाजुक भागाला धक्का लागणें (ल अंत करणाला झोंबलेला असणें, खोंचला जाणें, मर्मभेद पावणें २ वर्मे काढल्यामुळें ओशाळणें, शरमणें 'कृष्णेच्या देव रमे स्मरता विस्मयरमा मना दे वरमे ।' –मोकृष्ण २९ ६१ ३ खिन्न होणें 'सर्वे बळासह कीशवरा प्रभुच्या अनुजादि रणीं वरमाया ।' –मोरामायणें १ २८७ [स मर्म] म्ह० नाक खाजविलें नकटें वरमतें.

**वरमणें**—अक्रि दबलें जाणें, वसण (गळू, ठुमठुम, धडधड इ०) [विराम?]

**वरयिता-यतु**—वि वरणारा (नवरा), भर्ता 'इया लागीं दये वरयितु हा ।' –ज्ञा १३ १०२८ [स वरयितृ-ता]

**वरयी**—स्त्री वरी, वरई पहा

**वरला(ले फडे-फडून**—क्रिवि पश्चिमेकडे, वरती-कडे. 'वरिलेकडून मदानिळ । लोटोनि आणी दिव्य परिमळ ।' –मुआदि २३ ३

**वरलाशीं**—न अव (सांकेतिक) स्त्रीस्तन (ए व) वरलासें [वरील]

**वरली**—स्त्री (गो) तांदूळ धुण्याची (वावूची) रोवळी

**वरलें**—न (कु) १ राख साठविण्यासाठीं भिंत घालून केलेली खोलगट जागा. २ जमीन वाहून जाऊं नये म्हणून घातलेला चौरस बांध ३ दोन गावामधील सीमेची खूण

**वरव**—स्त्री १ एखादा पदार्थाचें वैपुल्य असल्यामुळें वारवार तोच खर्चण्याचा, वापरण्याचा प्रकार (तांदुळ, इतर धान्य, भाजी इ० बाबत) 'ज जें धान्य पिकतें त्याची काहीं दिवस वरव असती ' 'सजगुऱ्याची वरव पुरवठ्याची नव्हे ' २ तांदूळ, पीठ इ० मुख्य पदार्थास भाजी, कालवण इ० च्या साहाय्यामुळें किंवा काहीं कारणानें येणारी खर, शिल्लक 'फणसाचे भाजीनें अन्नास वरव येती ' ३ सारखा वापर, सेवन, खर्च 'लोभें आशीचीचि न मणिराशींची वरी वरव राया ।' –मोसभा ६ ४४ ४ पुरवठा, साठा संग्रह 'वर्षाची वरव केली नाहीं म्हणून तांदुळाचा तोटा आला ' ५ रेलचेल, समृद्धि. 'वरव घरामधें देकुण पिसा झुडवर दळु मी घिरा ।' –पला ८३ ६ तृप्ति, पुरवठ्यामुळें समाधानाची स्थिति [वर किंवा उरणें, उरविणें, तुल० स उर्वरित]

**वरवंट**—पु १ साडी नेसण्याचा एक प्रकार परवटा पहा. २ वरवंटा पहा **वरवंटयाचें नेसणें**–न वरवट अर्थ १ पहा.

**वरवंट-टा**—वि सुंदर, शुद्ध वरवटा पहा सुंदर स्त्री 'ऐसा शिंगार करूनि गोमटा । जात्या झाल्या त्या वरवटा ।' –नव १४. ९७ [स वर+वर्त]

**वरवंटा-ट**—पु चटणी, औषधें इ० पदार्थ पाट्यावर वाटण्यासाठीं केलेला उभट वर्तुळाकार घडीव दगड २ मोटेच्या निहिरीवरचें वरील आकाराचें बांधकाम ३ (वरवट) पेटका, वळ,

स्नायूमध्यें वरवण्याप्रमाणें गोळा उठणें, आल्याप्रमाणें वाटणें (क्रि० वर्ग उठणें) ४ जाणाऱ्यायेणाऱ्यानें एकेक दगड टाकल्यानें झालेला दगडाचा एक लांबट आकाराचा ढीग [ वर+स वृत्त, प्रा वट्ट=वाटोळें ? ] ०फिरविणें-(ल) एखाद्या वरून्चा सुराडा नाश करण 'सर्वांवर सारत्या वरवटा फिरविला जात आहे '-विंध्या ०पाटा-पु पाटावरवंटा पहा

**वरघंटी**—क्रिवि वरवर, वरकरणी -हार

**वरवटयाच्या शेंगा**—स्त्रीअव (व) चवळीच्या शेंगा

**घरवड**—स्त्री घोंगडी इ० कांस जी रवड घालतात ती रेवड पहा

**घरवंड-डा-डी**—स्त्रीपु बांध वरड-डा-डी पहा 'लहिये आगा लेंढा। न मनीं घालुवेचा वरवडा।'-ज्ञा १३ ६९३ वरंड हें वराचरचें रूप असून कोंकणी रूप वरंड आहे

**घरवंडणें**—क्रि कुरवडी करणें -हार ?

**घरवणी**—न (कृषि) १ पावसाळा सपल्यावर (ऊस इ० स) वरचें पाणी वेतात तें यानें पावसाचें पाणी धुवून टाकतात २ सटवणीचा पाउस [ वर+वणी=पाणी ]

**घरवणें**—उक्रि १ (सोनारी) वर टेवणें (छील, फासा इ० जिन्नस) २ उंच करणें 'या योपभेरें कितिमान वरवत असती हें साग खरें ?।'-र ६० [ वर ]

**वरवा**—पु (नाविक) नागर टाकणें ओरवा पहा (क्रि० करणें) 'हिंदुस्थानला जाणाऱ्या एका गलबतान घरवा केला' -पाव्ह ८५

**वरवा**—पु १ चाढावा, शिल्क 'वरतो वरतो वरवा वरतो।' -दावि ५७३ २ मुख्य धान्यावरावर पेरावयाच उपधान्य उताडा शेतीं धान्य पेरिती शेती । त्यामाजीं किंचित् वरवा घालिती। -कथा ४ ७ २२३ [ वर ]

**घरवा**—पु (व) उकाडा रतीव 'आमच्या घरीं रोज शेरभर दुधाचा वरवा आहे'

**वरशिका-शीक**—वि (राजा) ज्यास वर्षाच्या आत बीं येत नाहीं असा (माठ) (माठाची एक जात) [स वार्षिक]

**वरस**—न (प्र) वर्ष पहा 'घोस अम फणसाचे पणमासाचे कितक वरसाचे।'-र ८ ०गाठ-स्त्री (गु) वर्षगाठ पहा

**वरस**—पु वर्षाव वर्षणें [ स वृष्-वष् ]

**वरसणें वर्सणें**—(प्र) वर्षणें पहा 'पुढें चिक्कारीची झाडी काठवाडी मोठ्या धाडी वर्सल्या बाई।'-ऐपो १८३ ४३४

**वरस(सुं)दा**—क्रिवि (मुकीनें) सरसदा, एकसारखा बसेल अशा रीतीनें सरसदा जरी किनारी कोरदार तग चोळीवर रग उदा। उर्दी उमटल्या नूतन गरसा झाकी पदर वरसुदा।'-पला ४ ३५

**वरसल**—स्त्री। यज्ञ इ०चा उपभोग घेण्याची पाळी, वर्षेल पहा

**वरसाडा**—पु तुषार वसाडा, आसाडा पहा [स वर्षाव]

**वरसुणी**—वि (वे) वधाला निघणारी [ वरस+विणें ]

**वरसून**—शअ (प्र) वरून पहा (क्रि० घालणें, जाणें)

**वरळा-ळी**—रोवळा-ळी पहा

**वरळा-वरळें**—पुन तिमऱ्यानें वारवल्यानतर राहिलेलें सळपावरचें धान्य, हलकें धान्य व भुसा यांचें मिश्रण, वरळें यावर महाराचा हक असतो 'निवडिलें वरळाभूस।'-तुगा २१६६

**वरा**—पु (कों. कु) शेत नांगरतांना शोईचें पडावें म्हणून नांगरण्याच्या दृष्टीनें तेवढ्या वळपुरते जे जमीनीचे निराळे भाग करतात त्यांपैकीं प्रत्येक ओरा पहा

**वरा**—स्त्री जहाजाची मागची, सुकाणूकडील बाजू

**वराई**—स्त्री वरई, एक सोन्याचा होन यावर वराहाचें चित्र असून हा कर्नाटकी नाण्यांपैकीं आहे -शिदि २१० [ वराह ]

**वराई**—स्त्री वरी पहा

**वराक-का-की**—वि १ गरीव, दरिद्री २ दीन बापडा 'ज्या कारणें इ विल्पे वराकी।'-सारह ३ ९ ३ दुर्दैवी 'पहा त्या वराका किती।'-रास १ ९३५ ४ नीच, क्षुद्र ५ दुर्बल [स वराक]

**वरागणी**—स्त्री वर्गणी पहा

**वराटक-टिका**—पुस्त्री कवडी [ स ]

**वराटी**—स्त्री (संगीत) एक राग यांत षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, तीव्र मध्यम पचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति संपूर्ण-संपूर्ण वादी गांधार, सवादी धैवत गानसमय सायंकाल

**वराड**—न १ वऱ्हाड पहा -तुगा ३४६९ 'वराड निघालें समारंभें।'-नामदासी २ १७३ २ विऱ्हाड, घर दुजें नाहीं काम गेला कुब्जेच्या वराडा।'-राला ४६ **वराडिक**-न लग्न तेथ द्वैतेंसीं मांडिली। वराडिक।'-ज्ञा ७ १६६ **वराडी**-न वऱ्हाडी पहा -ज्ञा ११ ३ 'का भीमकीचा नव्हसी वराडी।' -सारह १ ३६

**वराड**—स्त्री ओरड पहा

**वराडा**—पु (कों) वरडा-ड पहा

**वरात**—स्त्री १ झोंपाळा, पाळणा इ० टांगण्यासाठीं जाड दोरी लोखंडी साखळी, सळई, इ० २ वादी, दोर [ स वरत्रा ]

**वरात**—स्त्री विवाहानतर वराच्या विऱ्हाडीं वधुवरांनीं मिरवीत जाणें हा समारंभ [ स व्रात=समुदाय किंवा वरयात्रा, हिं वरात ] म्ह० वरातीमागून (वरातमागे) घोडें=एखादी गोष्ट होऊन गेल्यावर तिची सामग्री येणें सबध म्हण अशी वरातेमागें घोडे, ज्याह्यामागें पिढ ०काढणें-(निंदार्थी) धिंड काढणें,

हाकून लावणें ०जेवण-न वरात मिरवून घरीं आल्यावर जें जेवण होतें तें वराती-त्या-वि १ वरातीसंबंधीं २ वराती बरोबर चालणारा 'लहान मोठे असले वराती। वरचें शिरोधान सुरग लेती।'-शशिसेना

**वरात**—स्त्री १ मामलेदार इ०कांकडून यावयाचा जो पैसा त्याविषयीं सरकारातून करतात जी चिठी ती, मागणीपत्र, हुंडी 'सरकारची वरात व ऐवज पावल्याचें ख्वज'-वाडसमा १ २७० २ (सामा) हुंडी, चेक, बिल [अर बरात] म्ह० वाऱ्यावर वरात आणि दर्यावर हवाला (किंवा भुसावर चिठ्ठी) ०दार-पु १ सरकारची वरात घेऊन मामलेदार इ०कांकडे वसुलाकरितां येणारा शिपाई, स्वार इ० २ (ल) मामलेदार खोत इ०कांकडून कुळाकडे येणारा तगादेदार [फा बरातदार]

**वरांदूळ**—न वऱ्याचे तांदूळ -कृपि २९२ [वरी+तांदूळ]

**वराम**—न नावेचा मागील भाग, वरा पहा

**वराय-यी**—स्त्री सोन्याचें नाणें वराई पहा

**वरावर्द**—स्त्री १ गणित करणें, हिशेब, त्याची रीत, गणना, गणित २ मागील महिन्याच्या जमाखर्चावरून केलेलें अदाज पत्रक (कमाविसदाराच्या खात्याबाबतचें इ०) ३ (सामा) अदाज [फा बरावर्द] वरावर्दी-स्त्री (वरावर्देचें अव) वरावर्द प्रमाणेंच वापरतात वरावर्दीचें सामान-न किरकोळ सामान

**वराह**—पु १ डुकर २ विष्णूचा एक अवतार -ज्ञा ११ ६२

**वराळी**—स्त्री बडीशेप, एक औषधोपयोगी बीज वरि आळी-स्त्री (गु) बडीशेप

**वरि(रु)खणें**—न वृष्टि 'समुद्रीं जालें वरिखणें।'-अमृ ९ १९ -अकि वर्षणें, वृष्टि करणें 'वरिखतु रसाचें वडप।'-दाव १३७ [स वृष्-वर्ष]

**वरिवंडणें**—अकि सफळ होणें -मनका 'वरिवडलें जया चिया। अनुज्ञा का।'-अमृ २ १७

**वरि(रो)स-ष**—न (प्र) वर्ष, संवत्सर [स वर्ष प्रा वरिस] ०खडया-वि (कों) वर्षाच्या बोलीने ठरलेला (चाकर) [वर्ष+खडणें]

**वरि(रु)सणें-षणें**—कि वृष्टि करणें वर्षणें 'येणें सात्त्विक रसें। जव दही मेहा वरिषे।'-ज्ञा १७१३२ [स वृष् प्रा वरिस] वरिसाव, वरषाव-पु वर्षाव 'हरिवरि वरिसाव करि सुमनाचे।'-र ९५ [स वर्षा प्रा वरिसा] वरिष-पु पाऊस 'मग वरिषु या अन्नातें। सर्वत्र प्रसवे।'-ज्ञा ३ १३४

**वरी**—स्त्री एक तृणधान्य, हें उपवासाला खातात वराई पहा [दे प्रा वरइअ]

**वरी**—स्त्री. (नाविक) टप्पणीला बांधलेली एक दोरी

**वरु**—पु मनुष्य, वर 'संपूर्ण सींहु ना वरु। देवता अगीचि वीभिचारु।'-ऋ ७२

**वरुख**—न वर्ष, वरिस पहा 'पक्षे शुक्र पराभवाब्दवरुख।'-भारि १० ३ ११५

**वरुण**—पु १ जलाची अधिष्ठात्री देवता, समुद्रदेवता, पश्चिम दिशेचा स्वामी २ सूर्यमालेंतील एक ग्रह (इ) युरेनस ३ (शाप) एक उपधातु (इ) युरेनियम् [स] ०दिक्-स्त्री पश्चिम दिशा 'तंव तो वरुणदिग्वधूचें सदन।' वरुणालय-न समुद्र

**वरुमा**—पु (माण) मातीचा लहान बांध वरवा पहा

**वरळें**—न वरळें पहा

**वरू**—स्त्री १ अत्युच्चता, थोर पात्रता (मर्यादित अर्थानें विशेषत साधावद्दल वापरतात २ (सामा) वरव पहा [स वर]

**वरूटा**—पु वरवंटा पहा

**वरें**—न नावेचा मागचा भाग वरा, वराम पहा

**वरेण**—न वरी धान्याचें काड [वरी+तृण]

**वरेत, वरैत**—पु (गो शि) वरणारा, भर्ता नवरदेव -ज्ञा १८ १०४९ 'आर्वी सभागा होति तव वरैतु आदिकरूनि तिएसि अधीनें होति।'-दुर्भगाप्रमेय [स वृ वर]

**वरो**—स्त्री १ अन्नसामग्री, एक दिवसाचा शिधा ओयरा पहा 'घुवा वरोचि विनवणी। एर काई साधो।'-माए ७२५ २ पोटगी, नित्याचें अन्न बीजचि वरोसि वेंच। तथ वाढती कुळवाडी खावे।'-ज्ञा १८ २५८ ३ धान्य 'वाइलपासी तें वरो वोपी।'-अज्ञान च० ५८ -गुच २२ २५

**वरो**—वि पुष्कळ, बहू, बहव पहा 'संताचिये गावीं वरो भाडवल। अवघा विठ्ठल धन वित्त।' -तुगा २२९३ [वर]

**वरोजा**—पु मुरूच्या झाडाचा चीक तलुवाद्याच्या तारास लावण्याकडे याचा उपयोग होतो गंधाविरुजा पहा -कृपि ७८४

**वरोटा**—पु मोटच्या विहिरीपुढची कुंडी, माटजण [वर+ओटा]

**वरोटा, वरांटा**—पु वरवंटा पहा

**वरोरू**—स्त्री सुदर स्त्री रंभोरु हे रुक्मिणी देववर वरोरु।'-सारुइ १४० [स वर+ऊरु]

**वरोळा**—पु रोवळा पहा

**वरोळी**—स्त्री १ रोवळी पहा २ मोजणी कामदारानें घालून दिलेली शेताची हद्द बांध -वहितमा १४३ ३ (व) मातीचें लहान टसाड

**वरोळें**—न वरळें पहा

**वर्क-र्ख**—पु पान, तगट पत्र पहा 'दुसरी अखबार दिल्ला-पत्याहून सौदागरानी लिहिली त्याचा एक वर्क रा ७ २२. [अर वरक्]

**वर्कशी, वर्कस, वर्कसजमीन, वर्कसल, वर्खेल**— वरकशी, वरकस इ० पहा.

**वर्कीण**—स्त्री नौकेचा एक प्रकार

**वर्के**—न (उत्तरकों) ३० हात लांब व ७॥ हात रुंद (किंवा ५० फूट×१२॥ फूट) जमिनीचा तुकडा

**वर्ख**—न (चि) वर्ष. –मसाप २ ४ १०८

**वर्खर**—पु एक हत्यार; वस्तरा 'सुरिया वर्खर परजिती। सिंह दात नखें विदारिती।'–शिपु १११०५

**वर्खाओ**—पु (प्र) वर्षाव, वृष्टि 'वरी देवीं पुष्पवर्खाओ केला।'–शिशु १०८४ [स वृष–वर्षु]

**वर्ग**—पु १ तुकडी, संघ, समुच्चय, गट, जात, एका सज्ञेखालीं येणारे अनेक प्राणी किंवा वस्तु उदा० ब्राह्मण–दास–मत्स्य–धान्य–वर्ग २ (शालेय) इयत्ता, अभ्यासक्रमाचा विभाग ३ (व्या) वर्णांचा समुदाय, गट उदा० कवर्ग, चवर्ग इ० ४ (गणित) गुण्यांक व गुणकांक एकच कल्पून गुणिलें असता होणारी अकसख्या. उदा० आठाचा वर्ग ६४ (८×८) ५ प्रत, दर्जा 'वैद्याचे अ–व–क असे तीन वर्ग असतात '६ ग्रथातील जीं ल्हान ल्हान प्रकरणें तीं प्रत्येक, ऋग्वेदातील अध्यायातील पोटविभाग, विशिष्ट ऋचाचा गट 'वर्ग ऋचा, श्रुतिस्मृति।'–दा १२.८ १६५ ७ थवा, रास. 'ते देखतखओ जळतुसें उभा। वर्गु अविद्येचा।'–ॠ २३ [स] ०**आमद्, वर्गरफ्त**–स्त्री (कारकुनी) या सदरांतून त्या सदरात घालणें (हिशेबातील रकम इ०) [वर्ग+फा आमद् (आगत) व रफ्त् (निर्गत)] ०**घन**–पु (गणित) घनाचा वर्ग ०**मूल–ळ**–न (गणित) ज्याचा वर्ग केला असता मूल सख्या येते तें उदा० ९ चे वर्गमूळ ३ ०**वस्तु**–स्त्री (बडोदें) समस्वरूपाच्या नियमा ज्या एका वर्गात मोडतात त्या वर्गापैकीं प्रत्येक जिनस –जनि, परिभाषा १४ ०**समीकरण**–न (गणित) ज्या समीकरणात अव्यक्त पदाचा दुसरा घात म्हणजे वर्ग असतो तें, (इ) क्वाड्रॅटिक इक्वेशन **वर्गावर्गी**–स्त्री १ वर्गप्रमाणें घालणें वर्गीकरण, निवडानिवड, प्रतवारी २ बदली, अदलाबदल **वर्गित**–वि वर्ग केलेली (सख्या) **वर्गी**–पु (गो) वर्गातील, कुटुंबांतील घटक –गोमातक रीतिभाति ९ **वर्गीकरण**–न वर्ग पाडणें, निरनिराळीं सदरें करणें –सेंपू ११ **वर्गीय**–वि १ वर्गाचा, वर्गासबधी २ वर्गीकृत

**वर्ग**—पु बदली 'माझा वर्ग बारामतीस होणेंबद्दल मी अर्ज केला आहे' ०**करणें**–(कायदा) योग्य कारणास्तव एका मॅजिस्ट्रेटपुढील खटला दुसऱ्या मॅजिस्ट्रेटकडे पाठविणें, बदलणें, स्थानांतर करणें (इ) ट्रॅन्सफर **वर्गावर्गी**–स्त्री विशिष्ट तत्त्वानुसार लावलेला क्रम, परंपरा, मालिका वगैरे वाढ (पगार, दर्जा इ०ची) 'तेथले कारकून वर्गावर्गीनें वाढतात' २ बदली करणें, अदलाबदल (कारकून, मामलतदार, अधिकारी इ०ची), नेमणुकें

**वर्गणी, वर्गत**—स्त्री १ वाटा, हिस्सा, विभाग (प्रत्येकाचा, समुदायांतून एका व्यक्तीचा) 'दोनशें बत्तीस तीन आणे। वर्गताचे आलें नाणें।'–पेमा २ दर, किंमत, पडणारे पैसे, आकार, पट्टी ३ पट्टी करून जमा झालेला पैसा, फंड, निधि [वर्ग] ०**दार**–पु १ हिस्सेदार, भागीदार, वाटा उचलणारा २ वर्गणी, आकार, किंमत देणारा, ग्राहक, सभासद

**वर्चस्, वर्चस्व, वर्चस्वता**—नस्त्री १ विद्या, अधिकार इ० परत्वें महत्त्व, प्रामुख्य, श्रेष्ठपणा २ तेज, प्रभा, सामर्थ्य. ३ (निंदार्थी) वरचढपणा [स] **वर्चस्वी**–वि १ वर्चस्व असणारा २ वरचढ, अरेराव

**वर्चील**—वि वरचड, वरचिलें पहा 'ते अर्चिली म्हणुनि वर्चिल सत्तमानीं।'–आ गणितोद्धार १२

**वर्ज**—वि (प्र) वर्ज्य १ वगळलेला, समाविष्ट न केलेला. २ टाकून दिलेला, फेंगाळलेला [स] ०**दिवस–वार**–पु १ धार्मिक आचार, सस्कार इ०ला निषिद्ध दिवस २ प्रयाण, नवीन कामाला सुरुवात इ० महत्त्वाच्या गोष्टींना अशुभ दिवस, घातवार **वर्ज(र्जि)णें**–उक्रि १ वगळणें, समावेश न करणें 'वर्जुनि वृषासि मज निज वदनींच प्रथम ने।'–मोकर्ण ३५ ९ २ एकटाच राहू देणें, लक्ष न देणें ३ बाहेर टाकणें, टाकून देणें 'तेवीं मातें जाणे तो सकल्पीं। वर्जूनि घालिजे।'–ज्ञा १० ८० ४ त्याग करणें, सोडणें 'प्रीति नाहीं राया वर्जिली ते कांता। परी तिची सत्ता जगावरी।'–तुगा १६७५ ५ परिपाठ सोडण, बद करणें 'येणें जाणें कांहीं वर्जिलें।'–लावणी ६ मना करणें, प्रतिबंध करणें 'या रात्रीच्या ठाईं। श्रीकृष्णाजवळ काज काहीं। ऐसें बहुताहीं। वर्जिलें त्यातें।'–रास १ २३२ ७ निषेध करणें, निर्भर्त्सणें 'तव राजपत्नी येऊनि जवळी। वर्जी आपुले पतीत।'–गुच ७ २८ [स वर्जन] **वर्जन**–न वर्जण्याचा व्यापार, वर्जणें (सर्व अर्थी) पहा [स] **वर्जनीय**–वि वर्जन करण्यास योग्य, त्याज्य **वर्जावर्जी**–स्त्री गाळागाळ 'हा वर्जावर्जी करण्यासबधीं कायदा'–इमू २५२ [वर्ज द्वि] **वर्जित**–वि वर्जिलेला वर्जणें पहा **वर्जिता**–वि निवारण करणारा 'कोणी वर्जिता नाहीं सबळ।'–कथासा ३ २६ **वर्ज्य**–वि वर्जावयास योग्य, अवश्य, शक्य **वर्ज्यस्वर**–पु (सगीत) 'विवादी स्वर पहा

**वर्जोर**—वि कडक 'वर्जोर नतिजा'–रा १५ ३८१ [फा वर्झोर]

**वर्डांणी**—वरडाण पहा

**वर्ण**—पु (प्र) प्रण पहा

नावाच्या एका हुषार गृहस्थानें पूर्वी पुण्यात चांगल्या तपकिरीचा धंदा सुरु केला त्यावरून ) अत्युत्कृष्ट तपकीर

**वर्तणीया**—पु ( बडोदें ) जागल्या, रखवालदार 'चौकी पहाऱ्याकरिता पोलिसचे लोक व गावनोकरापैकीं वर्तणीये वगैर लोक हजर ठेवावे '—वापसिंहाची शिकार २४, —खारीनियम २६, १५ [ गु वर्तणीयो ]

**वर्तणु**—पु ( महानु ) वर्तन 'जैसा वर्तणु जैसी आकृती।' —दाव २२ [ सं वर्तन ]

**वर्तणूक**—स्त्री १ वर्तन, वागणूक, राहाणी २ जीवन, आयुष्यक्रम, दिवस कढणें 'तो काय दुष्ट राजा हो! त्याचे हाताखालीं प्रजाची वर्तणूक होणें कठीण दिसतें ' [ वर्तणें ] ०जामिनी—स्त्री पंचायतीच्या निकालाप्रमाणें वागतीत असी वादातील पक्षाच्या स्नेहीमंडळीनें दिलेली हमी, जामिनकी **वर्तणें**—अकि १ वागणें, आचरण करणें —ज्ञा ४ ९३, 'पुत्र वर्ते पितृआज्ञेनें।' २ राहणें, असणें ( आत, वर, कडे ) 'नृप चित्र चित्रसेन युद्धाच्या सबळ वर्तती पृथ्वीं।'—मोकर्ण ७४६ ३ अमलात असणें, चालू, रूढ असणें ( चाल, विधि ) ४ ( काव्यात ) घडणें, होणें—ज्ञा ११३७ 'एकचि वर्तला आकांत।' ५ उपस्थित होणें, उद्भवणें 'ज्याला वर्तली चिंता।'—एपो ४१ [ स वृत् ] **वर्तन**—न १ वागणूक, आचरण 'नव्हे आणि वर्तन। ऐसें पैं तें।'—ज्ञा १३ ३५६ २ राहाणें, नांदण, अस्तित्व ३ धंदा, व्यवसाय, उपजीविकेचें साधन 'यज्ञा ऐसें वर्तन। जीविकें केलें।'—ज्ञा १७ ३३९ [ स ] **वर्तनीय**—वि ( एखाद्या कामाधंद्याला ) लायक्याजोगा, कामात गुंतविण्याजोगा **वर्तव( वि )णें**—उकि १ वर्तणेंचें प्रयोजक रूप २ ( ज्यो ) गणित करून निश्चित करणें ( ग्रहण, संक्रांति इ० ) ३ ( खलात तपकीर इ० ) घोटणें **वर्तित**—वि चालविलेलें, वर्तविलेलें, व्यवस्था केलेलें [ स ] **वर्ती**—वि राहणारा, असणारा वर्तणारा उदा० अग्रवर्ती, मध्यवर्ती, पुरोवर्ती इ०

**वर्तमान**—पु ( मर्तबानबद्दल चुकीनें ) बरणी रांजण 'गचास अवरेना अशी मुई असेल तर गच्चीपर्यंत करून थोरथोर कांचेच वर्तवान, झोल्माठ सर्व्हीं आणून त्यास मजबूत बसकं करून त्यात तेल तूप साठवावं '—मराआ ३२ [ अर मर्तबान् ]

**वर्तमान**—न १ वस्तुस्थिति 'ऐसें असता वर्तमानीं।' —गुच १७१ २ बातमी हकीकत 'व्हर्जिनियाकडील कांहीं वर्तमान कळत नाहीं '—पाव्ह १०२ ३ वृत्तांत कथा 'मागा समयें अवतारवर्तमानें।'—सप्र २१ ४ वर्तमानपत्र पहा —वि १ चालू विद्यमान हयात अस्तित्वात असलेल्या 'कै० रावसाहेब कृष्णासा वर्तमान असता सेवकासमक्ष चचा कली की '—इम २३६ २ अमलांत असलेलें, रूढ ३ ( व्या ) सांप्रतचा, चालू ( काळ ) ४ असलेला, राहिलेला ०काळ—पु ( व्या ) क्रिया मानीं चालत असणारा काळ, प्रस्तुत काळ ०पत्र—न बातमीपत्र, वृत्तपत्र ०भविष्य—पु एक काळ कर्त्याच्या मनात व्यापार करावयाचा आहे परंतु त्यानें अद्यापि त्या क्रियेस आरंभ केला नाहीं असा बोध होणाऱ्या क्रियापदाचा काळ —म भा व्या १६६ उदा० मी करणार आहे ०भूत—पु एक काळ भूतकाळीं आरंभ केली क्रिया वर्तमानकाळापर्यंत चालत आहे असा अर्थ उत्पन्न होणारा काळ —म भा व्या १६४ उदा० मी केलें आहे

**वर्तवळा, वर्ताळा, वर्तावळा, वर्तोळा**—पु वरतवळा, वरतवळा पहा —वाडसमा १ २६८

**वर्ता**—शअ वरता पहा 'दुजा चरण उभारिता। तो गेला एकवीस स्वर्गावर्ता।'—कथा २ ७ १५

**वर्ति-र्ती**—स्त्री १ दिव्याची वात, वत्ती २ ( वैद्यक ) सळई, वत्ती हिचा उपयोग क्रियांच्या गुह्येंद्रियात औषध घालण्यासाठीं होतो ३ ( गमाद्यय इ० चें ) छिद्र रुंदावण्यासाठीं केलेली कापसाची वळी, विस्तारक [ स वर्त्ती ]

**वर्तित( करण )**—न ( नृत्य ) दोन्ही हातांचीं मनगटें आकुंचित करणें व दोन्ही हातांचीं बोटें व्यावर्तित परावर्तित करून हात मांड्यावर टाकणें

**वर्तुल वर्तूळ**—न ( भूमिति ) ज्या आकृतीची मर्यादा एकाच वक्ररपेनें दाखविली जाते व जीमध्यें असा एक बिंदु असतो कीं, त्यापासून त्या वक्ररेषेपर्यंत कितीहि सरळ रेषा काढिल्या तरी त्या समान असाव्यात अशी आकृति —महमा ५ —वि वाटोळें, गोल [ स वर्तुल ] ०गति—स्त्री वक्रगति, वक्रगति वर्तुलाकार गती ( इ ) केन्द्रितनिभर मोशन ०पाद—पु व्यासावर रेष असणा या त्रिज्येनें अर्धवर्तुलाचे जे दोन समान भाग होतात त्यापैकीं प्रत्येक पादवर्तुळ 'क्षितिज आणि स्वस्तिक यांच्या मधचें अंतर व्रुत्तपादाइतकें असतें '—मराठी ६ पु पृ ३१४ ०मध्य—पु मध्यबिंदु पहा ०मय—वि गोलाकृति गोलीय ( इ ) स्फेरिकल **वर्तुला( ळा )कार**—पु १ पूर्ण नाश, फन्ना, उध्वस्तता 'परचक्रानें गावचा आणि इ०मळे ह्याचा अगदीं वर्तुळाकार केला ' २ पूर्णपणें खलास, खर्च, क्षय, अगदीं अकिंचनता —वि वाटोळें, गोल

**वर्त्म**—नपु १ मार्ग वाट 'कीं दावा वर्त्म जैसें परमनृपित जो पाथ त्या सदनाचें।'—मो अंबरीषाख्यान ( नवनीत पृ १६६ ) २ डोळ्याची पापणी [ स ] **वर्त्मावबंध**—पु पापण्याचा ताठरपणा

**वर्दळ**—स्त्री १ त्रास, उपसर्ग वरदळ पहा २ वापर ३ येजा, रावता ०घालणें वाद, भांडण करणें 'मेलमच्या

हातचा भात व विस्कुटें सोडून श्रीशंकराचार्यांशीं वदेळ घालीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं.' -आगर ३.१४३.

**वर्दावर्द-र्दी**—वरावर्द पहा.

**वर्दावर्द-र्दी**—स्त्री. १ हातातोंडाशीं गांठ; जेमतेम उदर निर्वाह. 'वर्दावर्दीवर संसार चालला.' २ देवघेव; प्रसार, व्यापार. 'धान्याची वर्दावर्दी होती.' [वर. वरच्यावर ! ]

**वर्दावळ**—स्त्री. (चाभारी, गों.) पायांत वहाणा अडकण्या साठीं असलेली पायाच्या घोटयावरची रुंद पट्टी. वर्दावळीची दोन्ही शेवटें कातडयामध्यें घालून शिवतात.

**वर्दी**—स्त्री. १ लष्करी पोषाख. २ सरकारी गणवेष. (इं.) युनिफॉर्म. [हिं.]

**वर्दी**—स्त्री. १ भेटीस आल्याचा निरोप 'जानकीबाईची वर्दी त्यांना अगोदर पोहोंचली होती.' -इप १३. २ बातमी; खबर. 'पाटलाला कांहीं वर्दी मिळाली नाहीं.' -के १.७.३०. ३ (बडोदें) हुकूम; आज्ञा. 'कारखान्याकडे समजण्याकरितां वर्दीपुस्तकांत हुकूम वाडणें.'-ऐरापुप्र २.५ [हिं] ०पुस्तक-न हुकूम लिहून ठेवण्याचें पुस्तक; (इं.) आर्डरबुक. 'उभय खात्याचे वर्दीपुस्तकांत हुकूम काढून...' -ऐरापुविवि ३०.

**वर्द्धा(र्धा)पन**—न. १ वाढदिवस, जयंति. २ या दिवशीं करावयाचा विधि. [सं.]

**वर्धक**—वि. १ वाढविणारा. २ उत्कर्ष, भरभराट करविणारा. [सं.] **वर्धणें**-अक्रि. वाढणें. **वर्धन**-न. १ मोठें होणें, वाढणें; वाढ. २ भरभराट, उत्कर्ष, प्रगति. ३ (वैद्यक) अंगाची उष्णता वाढविणें. सप्तोपचार पहा. -वि. (समासांत) वाढविणारा; आधिक्य करणारा. उदा० विरयवर्धन; वीर्यवर्धन; बालवर्धन इ०. [सं.] **वर्धनीय**-वि. वाढण्यास योग्य, लायक; वाढवितां येण्यासारखा. [सं.] **वर्धमान**-वि १ वाढता; मोठा होणारा. २ भरभराटणारा; उत्कर्ष पावणारा. ०गति-स्त्री. (शाप.) वाढत्या वेगाची गति (इं.) ॲक्सेलेरेटेड मोशन. ०पिंपळी-स्त्री. एक औषधी योजना. पहिल्या दिवशीं एक भाग, दुसऱ्या दिवशीं दोन भाग, अशा प्रकारें पिंपळी खाण्याचें कांहीं दिवस चढवून तशाच क्रमानें उतरवीत आणणें. श्वास, खोकला, क्षय इ० रोगावर हा उपाय करतात. ०संयुक्त हस्त-पु. (नृत्य) हंसपक्ष हात पाठीला पाठ लावून ठेवणें. **वर्धमानांतर**-वि. (शाप.) फाकणारा, पसरणारा (किरण) (इं.) डायव्हर्जंट. **वर्धावणें**-क्रि (गों.) चढविणें; खुलविणें (मुलांस) **वर्धित**-वि. वाढलेला. **वर्धिष्णु**-वि. वाढणारा.

**वर्धाव**—पु. (व. मा.) लग्न लागण्यापूर्वी नवरदेवाकडून नवरीकडे सुचना करण्याकरितां जाणारा मनुष्य. वरधावा पहा. [वर+धावणें] **वर्धाचा**-वरधावा पहा.

**वर्पणें**—क्रि ओरपणें पहा. 'वाणी शिखरणी वर्पेतो क्षीरी।' -सप्र १७२०.

**वर्वेडणें, वर्वाटणें, वर्वे(र्वा)डा**—ओरवाडणें, ओरवडा इ० पहा. 'बळें गाल सर्वांग तो वर्वडीतो।' -राक १.५.

**वर्म**—न चिलखत; कवच. [सं. वर्मन्] **वर्म-र्मा**-क्षत्रिय जातीच्या नावापुढें लावण्यात येणारा प्रत्यय. उदा० कृष्णवर्मा. **वर्में चर्में छेदणें**-(कवच, कातडी यातून पार खुपसणें) आतपर्यंत, आरपार भेदणें. (ल व शब्दशः)

**वर्म**—न. १ नाजुक, हळवा, दुखरा भाग. २ (ल.) नाजुक जागा;मर्म. 'वर्मी खोंचला रश्मिया।' -एरुस्व ६.४४. ३ ज्याचा उल्लेख केल्यास राग येतो अशी गोष्ट; विंग; जिव्हार. ४ रहस्य; तत्त्व, सार. -ज्ञा ५९६ 'तो आत्यंतिक क्षेमाचें वर्म। भागवत-धर्म उपपादी।' -एभा २.२७७. ५ मख्खी; खुबी; गुह्य 'देव सख्यत्वें राहे आपणाशीं। हें तों वर्म आपणाचिपाशीं।' -दा ४.८.१२; -अमृ ५५०. ६ बळी पडण्याचें, वश होण्याचें साधन. 'बायकाचें वर्म म्हणजे दागिने.' -शारदा ३२. ७ महत्त्वाची गोष्ट 'सर्व कांहीं धर्म आणि कर्माऽस्में। बुकलिया वर्म व्यर्थ जाती।' -रामदास, स्फुट अभंग (नवनीत पृ १५१) [सं. मर्म] ०कर्म-न १ उखाळीपाखाळी. 'हासोनियां काढिति वर्मकर्मा।', -आ उमारमासंवाद १. २ छिद्र, व्यंग (बहुधा अनेकवचनी प्रयोग, उदा० वर्मे कर्मे). ०स्पर्शी-वि. मनाला झोंबणारें; लागणारें (भाषण) -ज्ञा १३.२७०; 'का वर्मस्पर्शवचनीं निंदितां। मुक्तासी व्यथा उपजेना।'-एभा ११.४६७. **वर्मणें**-क्रि. वर्म जाणणें ? -अमृ.५५०. **वर्मी**-वि १ मर्मभेदक; बोंचक; टोंचणारें (भाषण इ०). २ मर्म, विंग, व्यंग, दोष जाणणारा. ३ गूढ, मर्म, रहस्य जाणणारा (एखाद्या धंद्याचें, यंत्राचें, कृतीचें); तज्ज्ञ. ४ मर्मज्ञ; मार्मिक; आतला अर्थ, रहस्य जाणणारा (एखाद्या ग्रंथांतील, वचनांतील). ५ कांहीं गुह्य गोष्टी, विंग असणारा; वर्म काढलेलें खपत नाहीं असा. 'वर्मी पुरुषास चौघामध्यें सभाकंप सुटतो.'

**वर्म**—न गर्द; दुखणें [अर वरम]

**वर्मणें**—वरमणें पहा. 'सखियेचिआ बोला वर्मेली। तें वैदर्भाची वाळी।' -शिशु २२७.

**वर्य**—वि १ निवडण्यास लायक, योग्य; आदरय. २ मुख्य; प्रधान, श्रेष्ठ 'जयजय आचार्या। समस्तसुरवर्या।' -ज्ञा १४.१. [सं] ०पण-न श्रेष्ठत्व 'देऊनि पुंबलिका वर्यपण।' -दावि २१६ **वर्या**-वि स्वयंवर करणारी (कन्या). 'जे तुर्या वर्यवर्या षड्गुणगुणमया आत्मना-पूर्ण पूर्णा।' -सुरा अयोध्या १०१. [सं.]

**वर्याळा**—स्त्री. एक औषधी.

**वर्याळी**—स्त्री. वराळी पहा.

**वर्शिली**—स्त्री. (वै.) नेम; व्रत. [वर्ष]

**वर्ष**—न. १ संवत्सर, बारा महिन्यांचा काळ; साल. २ सांवत्सरिक श्राद्ध; वर्षश्राद्ध 'सारी वर्षे प्रयागीं प्रभु पदनिरतां त्यांसि भेटोनि तारी।' –मो रामायणें २१. [सं.; तुल० फ्रेंजि. वेर्स] ०**गणना**–स्त्री. वर्ष मोजण्याची पद्धत. याच्या सौर व चांद्र अशा दोन गणना आहेत. ०**गांठ**–स्त्री. वाढदिवस. (पूर्वी दरसाल जन्मदिवशीं दोरीला एकेक गाठ देऊन त्या गाठींवरून वय मोजण्याची चाल असे). ०**घात**–स्त्री. वर्षाचें सामर्थ्य; वर्षफल (मानवी व्यवहारावर परिणाम करणारें) (क्रि० जपणें; सांभाळणें). [वर्ष+धातु=वीर्य] ०**प्रतिपदा**–स्त्री. चैत्र शुद्ध १; गुढीपाडवा. ०**फल**–न ज्योतिषाच्या आधारें नव्या वर्षांत घडणाऱ्या गोष्टींचें केलेलें भविष्य (पाडव्याच्या दिवशीं हें वाचतात); वर्षभविष्य. ०**वीण**–वि वर्षाला विणारी (गाय, म्हैस). ०**वृद्धि**–स्त्री. एकाच राशींत गुरु राहतो तें वर्ष. ०**सण**–पु. लग्नाला वर्ष पूर्ण होतें त्या प्रसंगीं जांवयास दिलेली मेजवानी, अहेर इ०. **वर्षेल**–स्त्री. वतन इ० उपभोगण्याच्या पाळीचें वर्ष; उत्पन्नाचें वर्ष –पु. वर्षाचा वतनदार, पाळीदार **वर्षाचा दिवस-सण**–पु १ वर्ष श्राद्धाचा दिवस. २ वाढदिवस. ३ सणाचा दिवस. (तो दिवस वर्षांतून एकदांच येतो म्हणून). 'वर्षांचा हा सण। कराना गोड सख्या आपण।' –प्रला. **वर्षादिसाचा दिवस**–पु. वर्षाचा दिवस अर्थ १, २ पहा. **वर्षानकाळ-वर्षे**–क्रिवि १ प्रतिवर्षी २ अनेक वर्षें (टिकणें, इ०) 'नवऱ्याला सोडून बायकांनीं वर्षानवर्षे माहेरीं राहणें म्हणजे वनवासच होय.' –सवतीमत्सर ९४. [वर्ष आणि (अन्) वर्ष] **वर्षायु**–वि.(खा) एक वर्ष टिकणारा कापसाची एक जात. **वर्षास(श)न**–न वार्षिक नेमणूक; उदरनिर्वाहासाठीं ब्राह्मण इ०कास प्रतिवर्षी नियमानें धन, धान्य इ० देतात तें (याबद्दल चाकरी करावी लागत नाहीं) २ दरवर्षी करावयाची गोष्ट, देण्याचें द्रव्य इ० 'तंव इंद्राचें वर्षासन। प्रतिवर्षी करावें हवन।' –कथा ४.५.९३ **वर्षासनदार**–पु वर्षासन असणारा माणूस; नेमणूकदार. **वर्षिल**–पु पाळटवाटा –आडिवऱ्याची महाकाली (प्रस्तावना) ११ वर्षेल पहा **वर्षिलदार**–वि. वर्षाच्या पाळीचा हक्कदार. **वर्षोगणति**–स्त्री वर्षोत, वर्षांनीं मोजणें –क्रिवि. वर्षांनीं (मोजणें इ०). **वर्षोवर्ष**–क्रिवि. १ कित्येक वर्षें; वर्षं पर्यंत. २ दरसाल **वर्सल**–स्त्री. वर्षेल पहा.

**वर्ष**—पु १ वर्षाव, वृष्टि. २ पाऊस पडणें; पर्जन्य. 'सांगें शातवर्षं आन्तु घरे। ऐसें अभ्रच्छायाचि जरी सरे।' –ज्ञा ५.११४. [सं.; तुल० जि. वेर्श] ०**ऋतु**, **वर्षर्तु**–पु षड्ऋतूंपैकीं एक. श्रावण-भाद्रपद या दोन महिन्यांचा काळ, पावसाळा. **वर्षण**–न. वृष्टि, पर्जन्य. [सं] **वर्षणें**–अक्रि. वृष्टि करणें (मेघानें) –उक्रि. (ल.) वर्षाव करणें; फेंकणें (बाण, फुलें, गारा इ०). 'तेथ बाणवरी धनुर्धर। वर्षताती निरंतर।' –ज्ञा १.१६६. **वर्षा**, **वर्षाकाल-ऋतु**–स्त्री.पु पावसाळा; वर्षर्तु. –ज्ञा १५.२८५. **वर्षाव**–पु. १ पाऊस. २ वृष्टि; फेंकणें, भडिमार (फळें, फुलें इ० चा) **वर्षित**–वि. वृष्टि झालेला (ल. व शब्दशः) **वर्षाव**–वर्षाव पहा. 'वाढावयालागीं पुढती। सरसावली द्रौपदी सती। जैसा मेघ वर्षोन मागुती। वर्षाव करी अद्भुत।' –ह १४.२७.

**वर्ष**—पु. आर्य पुराणग्रंथप्रमाणें खंडाचा विभाग. हे पुढील नऊ आहेत:–कुरु, हिरण्मय, रम्यक, इलावृत्त, हरि, केतुमाला, भद्राश्व, किंनर, भारत. [सं.]

**वऱ्हा**—पु गुळाचा रांधा निवळण्यासाठीं जमीनींत केलेल्या ज्या खाचेंत तो ओततात ती खांच.

**वऱ्हा, वऱ्हाय**—पु (अप.) वराह. 'मच्छ कच्छ वऱ्हा आठविना कोणी।' –दावि १५४. 'वसुंधरा कुचहेली। वऱ्हायाची दाढ कसकसली।' –शिशु ५४१. [सं. वराह]

**वऱ्हाड**—न. १ लग्न. 'सप्त वर्षें जातीं तत्वतां। चिंतित होती मातापिता। वऱ्हाड केव्हीं करावें।' –गुच ३५ १२०.–जगन्नाथ, शके १६६९ ग्रंथमाला. २ लग्नाची मिरवणूक (क्रि० काढणें; चालणें) ३ लग्नास जमलेली मंडळी, समुदाय (क्रि० निघणें, चालणें; जमणें, उतरणें; मिळणें) 'वर नसता व्यर्थ वऱ्हाड। शीर नसता कायसें धड।' –रावि १४४. ४ (ल) मुंग्या इ०चा क्रमानें चालत असलेला समुदाय; मुंग्याची रांग. [सं वर+हार, किंवा वर+आढ] म्ह० वऱ्हाडास घोडें गेलें तरी त्यास करह. =दुर्दैवी प्राण्यास सर्वच ठिकाणी हाल ०**गोष्टी**–स्त्री अव १ लग्नासंबंधीच्या गोष्टी, गप्पा, हकीकती. २ पोकळ प्रेमाच्या, सेवेच्या गोष्टी, बढाया. ०**घर**–न लग्नघर, वऱ्हाड उतरलेलें घर. ०**टक्का**–पु. लग्नावरचा कर. **वऱ्हाडणी-डिणी**–स्त्री अव लग्नासाठीं जमलेल्या स्त्रिया. (एव वऱ्हाडीण) 'नेटका वऱ्हाडी पुढें चालला। वऱ्हाडणी हांपती सकळा।' –ह २४ १०८. **वऱ्हाडणें**–अक्रि. १ विवाहसंस्कारविशिष्ट होणें; लग्न होणें (नवरानवरीचें) २ विवाहसमारंभात वऱ्हाडी लोकांनीं निमग्न होणें. ३ (ल.) मेजवानींत, आनंदाच्या गोष्टींत अगदीं तल्लीन होऊन जाणें. **वऱ्हाडीक**–पु बोलावणें, आमंत्रण. 'पैं परिसतु गाढासि निकियापरी। तेंचि वस्तुत्वा वऱ्हाडीक करी।' –ज्ञा ९.२३८. **वऱ्हाडीक-का**–स्त्री सोयरीक, लग्नसंबंध. 'तयेनें बोधिला अनिरुद्ध। म्हणे आतां करूं संबंध। वऱ्हाडिकेचा।' –कथा १६.११४. 'तयासी वऱ्हाडिका जालि।' –पंच ४.६. **वऱ्हाडी**–वि. वऱ्हाडांतील, वऱ्हाडाकडला (पाहुणा नोकर, वस्त्रपात्र इ०). 'सीतास्वयंवराच्या काजा। सिद्धलाडु गणराजा। पूर्णमोदक पंचखाजा। तुं वऱ्हाडी

आर्धी।' –वेसीस्व १.३. –ह २४ १०८. वन्हाड पहा. वन्हाडीण–स्त्री. लग्नासाठीं आलेली स्त्री. वन्हाडणी पहा.

**वन्हाड**—न. १ जनावरानें सकाळच्या प्रहरीं इतिरहा फुंकत फिरणें, इरड करणें. २ (ल.) व्यसनीपणाचा क्रम. [विरह] **वन्हाडी**-वि. इरड करणारा (बैल, गाय).

**वन्हाड**—पु. एका प्रांताचें नांव [सं वराट; सं. विदर्भ–वरदातट; प्रा. वराड] **वन्हाडी**-वि. या प्रांताचा, प्रांतासंबंधी.

**वन्हाडीण**—स्त्री. (व.) धान्य उपणतांना भुसा झाडण्याची केरसुणी.

**वन्हे**—शअ (खा.) वर. 'परिसाचे कमवटीवन्हें। जें जें तें तें साडेपंधरें।' –एभा २.४४१.

**वल, वलंडणें, वलंडा**—ओल, ओलंडणें इ० पहा.

**वल**—पु वेळ. –आदिलशाही फर्मानें. [अर फा. विला]

**वल**—स्त्री. (व.) १ खणाची घडी; खणाळें. 'या वलींत ४० खणें आहेत' २ हात टेंकून पाय वर करून मारलेली उडी. (क्रि० टाकणें). [सं. वल्]

**वलकट**—स्त्री. (जुनरी) पांघरण्याची पासोडी. [? तुल० सं वल्कल=वल्ल]

**वलखरणें**—अक्रि. (प्रां.) १ विसकटणें; विस्रणें (विशेषत. केंस) २ अस्ताव्यस्त पसरलेलें, पडलेलें असणें. [वळखर]

**वलगणें**—अक्रि. वल्गना करणें; रिकाम्या गोष्टी करणें. 'विचारितां निजनिवाडी। कृष्णावीण अर्धघडी। इकडील तिकडे नव्हे काडी। वृथा वेडीं वलगती।' –एरुस्व १५.११६. [सं. वल्गना]

**वलंगें**—न (महानु) लगाम, वागुरा. [सं. वल्गा]

**वलंज**—पु एक जातीचा मासा. हा एक फुटापेक्षा मोठा असून याच्या सेकर व शिलन अशा दोन जाती आहेत

**वलण**—न (कों.) चिरगुटें ठेवण्यासाठीं असलेली पाल खीच्या दांड्याच्या आकाराची वेळूची दांडी.

**वलद, वल्दद**—पु (चा) मुलगा. माणसाचें नांव लिहून संबंधार्थ बापाचें नांव लिहावयाचें झाल्यास मध्यें घालतात. उदा० गुलाम खान वलद याकूबखान. 'सूरज वल्द वापू जोशी ज्योतिषी वतनदार जुन्नर' –वाडसनदा ८५. [अर वलद् अव अवलाद]

**वलंदेज**—पु (ऐतिहासिक) हालंड देशांतील लोक; डच. 'या सिरहित शामल, फिरंगी, इंग्रज वलंदेज, रामनगरकर, पाळेगार, मौदे, विदनूर ...आदिवरून संस्थानिक...' –मराआ ३. [इं हॉलंड गु वलंदा=डच]

**वलन**—न. १ वळणें; हलणें, चलन २ (ज्यो.) खगोलाच्या ठिकाणीं दोन वृहद्वृत्तें करतात तो कोन. याचे अयनवलन, अक्षवलन, स्पष्टवलन इ० प्रकार आहेत. [सं.] ०ऊरु–पु. (नृत्य) अग्रतलगाद करून जानु आंतील बाजूस घेऊन उरु वळविणें. ०तारा–पु (नृत्य) डोळ्यांचीं बुबुळें बाजूस वांकडीं वळविणें.

**वलित(करण)**–न (नृत्य) उजवा हात, अपविद्ध करणें व उजवा पाय सूची करणें. यांत त्रिक फिरविलेलें असतें.

**वलभा**—स्त्री. आवड! –मनको. [वल्लभ]

**वलभी**—स्त्री. घराच्या छपरास आधारभूत असलेला वासा, कडणी, इ० 'वलभीवरी गोळांगुळ। अतिविचित्र शोभती।' –सुमभा २.४२ [सं. वड(ल)भी]

**वलय**—न १ कंकण; कडें; बांगडी. २ वर्तुलाकार. ३ (प्राणि.) पृष्ठवंशाचा मणि–मणका. –प्राणिमो ९७' [सं.] ०बाहु–पु. (प्राणि.) पृष्ठवलयार्धा(टर्गम)च्या दोन्ही बाजूंवर अधोगामी व कंटकांत शेवट पावणाऱ्या दोन भागांपैकीं प्रत्येक. –ज्ञाको (क) १९०. (इं) प्लुरॉन. ०रोग–पु घटसर्प. **वलयांकित, वलयित**–वि. भोंवतालीं वर्तुळ असलेलें; वेढलेलें; वेष्टिलेलें. उदा० समुद्रवलयांकित पृथ्वी. 'मी वलयांकित चक्रवर्ती।' –एभा २६. १३६ [वलय+अंकित] **वलयांकित संघ**–पु (प्राणि.) जमीनीवर सरपटणाऱ्या प्राण्याचा एक विशिष्ट संघ.

**वलव**—पु (वे) तोल.

**वलवटा**—पु वहिवाट; वळण 'ही गोष्ट जालियास बदनक्ष होऊन आमलाचा वलवटा मोडतो.' –पेद १०.१४२. [सं. वल्]

**वलवटी**—स्त्री. वळी, सुरकुती. 'टवटवीत गाल नाहिं पडली कुठें वलवटी।' –प्रला ११५ [सं. वल्+वटी प्रत्यय]

**वलवण, वलवणें, वलवा, वलसर, वला, वलाचिंब**—ओलवण ओलवणें इ० पहा.

**वलवणी, वलावणी**—स्त्री. वल्हविणें, वलविणें पहा. **वलव(वि)णें, वलावणें**–उक्रि. १ वल्ह्यानें चालविणें (नाव). २ (ल) पुढें ढकलणें–नेणें. ३ व्यवस्था पाहणें, चालविणें (कामाची) [वलें]

**वलवणी**—स्त्री. देवीचा कौल घेणें. –अडिवऱ्याची महाकाली १५०. [ओलें]

**वलव(वि)णें**—सक्रि (कों कुण.) ओझें डोक्यावर घ्यावयास मदत करणें, हात लावणें.

**वलाट-टी-ठी**—नक्रि. १ किनाऱ्यापासुन सह्याद्रीच्या पायथ्यापर्यंत चढती जमीन. याच्या उलट खालाटी. 'संदू या वलाटीनें उत्तरेकडे चालतांचालतां कोरलईकराच्या मुलखांत आला.' –कोरकि १३४. २ कोंकणांत या जमिनीच्या पूर्वभागाला म्हणतात. व खालाटी असें समुद्रालगतच्या भागाला म्हणतात. ३ (कु.) वरचें गांव. [? वरला+ठाय] ०कर–वि. वलाटीचा रहिवासी.

**वलांडणें, वलांडा, वलाणी-णें, वलादंड, वलादुकळ, वलावण, वलावणें, वलावा, वलास्ता**—ओलांडण, ओलांडा इ० पहा.

वलाणी—स्त्री. बांधणी, वळवणी. 'जाली पलाणा वलाणी।' —उपा ७३.१९. अवमा. [ सं. वलन ]

वलादांड—पु. ओला, कोंवळा दांडा (तोडण्याच्या स्थितींत नसणारा). ओलादंड पहा. 'मिरच्याचा वलादांड आहे.'

वलाव—पु ओलावा पहा.

वलावा—पु. १ माणसांचा किंवा मालवाहतुकीचा तांडा सुरक्षितपणें इष्ट स्थळीं पोंचावा म्हणून अधिकाऱ्याकडून घेतलेला शिपाई, लवाजमा इ०. पाटवळ. पावणी पहा. २ यासाठीं अधिकाऱ्यास द्यावें लागतें तें द्रव्य. ३ वळवणी पहा.

वली—पु. १ साधु; संत, सत्पुरुष. २ मालक; धनी; पालक. [ अर. ] ०अहद्द-पु. १ वारस. २ युवराज. 'कली गोहरचे पुत्रास वली अहद केलें.' –रा१.३६३. ०नियामत-न्यामत–वि. आश्रयदाता; श्रीमंत (पदवी). 'वलीन्यामत रावसाहेब पंडित प्रधान.' –रा १०.१६५. [ अर. वली–निअमत ] ०हद-पु. वली अहद पहा. युवराज. 'त्याचे पुत्रास बाहेर काढून वलीहद केलें.' –रा १.३६२. ०हद्दी-स्त्री. यौवराज्य. –रा १.३६३.

वली आग-ग, वली कूस, वली सरूज, वलें, वलेटा-ता, वलेटें-तें, वलेंपालें—ओली आग, ओलीकूस इ० पहा.

वलीत—न वळवून नेणें (गुरें, इ०) वळती पहा. 'मिरजेचा मोगल इसलामपुरास गुरांचें वलीत करावयास आला होता.' –वाड-बाछ ५ [ स. वलित ]

वलीबाळंतीण—स्त्री. दहा दिवसांतली बाळंतीण. [ ओली+बाळंतीण ]

वलीस—वि इवलासा, थोडासा. 'लघु लघु वलीसी।' –तुसुरा ७६ १३ [ सं. अल्पीयस ]

वलें-व्हें—न १ नाव चालविण्याचें लाकडी साधन, नौकादंड; अवलें पहा. २ लहान अवलें, दांडा. ३ (ल) पोहणें इ० प्रसंगीं हात, पाय.इ० शरीरावयव [ सं वल् ] ०करी-पु वल्हविणारा, नावाडी.

वले—उद्गा आज्ञार्थी रूप (व) आटोपा; त्वरा करा. (याचीं दुसरीं रूपें येत नाहींत) 'वले, आपणाला आणखी पुष्कळ काम आहे.' वल्हा–व्हे पहा

वलें—वि. ओलें पहा. ०अंग-न (लहान मूल, आजारी माणूस, नवीन बाळंतीण इ० चें) नाजुक शरीर. 'बाळंतिणीचें दहा दिवस वलें अंग असतें' ०कोरडें-वाळलें-न. १ ओलें-कोरडें लांकूड २ (ल) सर्व छोटीं विधानें.

वल्क—नपु १ झाडाची साल; त्वचा; वल्कल. 'झाली तपोधन ऋषीव हनि वल्क तापसी ते तें।' –मोवन १३.३०. २ माशाचें खवळ, खवला. [ सं. ] ०पर्ण-पु. (शाप.) खवला; खवली ०पक्ष-पु पंखांना खवले असणाऱ्या प्राण्यांचा वर्ग. यांत फुलपाखरें, रेशमाचे किडे इ० येतात. –प्राणिमो ११२. वल्कल—न १ झाडाची अंतर्साल, अंतस्त्वचा. २ यापासुन केलेलें वस्त्र. 'राम वल्कल जटादिक रीती। वेष तो उभय बंधु करीती।' –वामन, भरतभाव ४९. [ सं. ]

वल्गणें, वल्गिजणें—अक्रि. वल्गना करणें, व्यर्थ बडबडणें. 'इयें वायाचि सैन्यें पाहीं। वल्गिजत आहातो।' –ज्ञा ११. ४५८. [ सं वल्गना ] वल्गना—स्त्री. १ बडबड; पोकळ भाषण. २ बढाई; प्रौढी मिरविणें; फुशारकी मारणें. 'शशमंडळांत कोल्हा म्हणतो मी सिंह वल्गना करितो।' –मोकर्ण (नवनीत पृ ३३७). [ सं. ]

वल्गा—स्त्री. लगाम. 'या टोपा कवचाच्या भीमा वल्गा उगेचि आटोपा।' –मोकृष्ण ८६.२५. [ सं. ]

वल्मीक—नपु १ मुंग्यांनीं केलेलें वारूळ. 'शिरला भुजातरीं शर वल्मीकामाजि नागसायकसा।'. २ वातदोषानें मान, गळा, हातपाय इ० ठिकाणीं उत्पन्न होणारा गांठीचा रोग. [ सं. ]

वल्ल—पु बाल. 'जो भगवद्भक्ति जिवती धरिल न पावेल बाळ वल्ल भया।' –मोमंभा २.११८. [ सं. ]

वल्लकी—स्त्री पावा, मुरली. 'मग वल्लकी काढून। श्रुतिस्वर मेळवून। आरंभिलें शिवकीर्तन।' [ सं. ]

वल्लफ—पु. (व) एक पांढरा दगड. सफेतीसाठीं हा उगाळून भिंतीला लावतात.

वल्लभ—पु १ नवरा; पति. 'करी तिच्या वल्लभ सोडवाला।' –सारुह २.३४. २ प्रियकर; जार ३ (सामा.) प्रियजन; आवडता माणूस. –वि. आवडता; प्रिय. 'ब्राह्मणभोजन द्वादशीसी। भगवंताशीं वल्लभ।' –एरुस्व ४.३०. [ सं ] वल्लभा—स्त्री. १ पत्नी २ उपस्त्री; रखेली. ३ (सामा.) प्रिय, आवडती स्त्री. 'तो वल्लभा मी कांतु। ऐसा पढिये।' –ज्ञा १२.१५६. [ सं. ]

वल्लरी—स्त्री. वेली, वेल. 'ते वल्लरी होंचि महाविखारी।' –सारुह ३.१३०. [ सं वल्ली ]

वल्ली, वल्ह्ली—पु. १ साधु; वली पहा. 'वल्ली पीर पैगंबर।' –दावि ४७४ २ विक्षिप्त, विचित्र, स्वच्छंदी माणूस; वेडापीर. 'सॉक्रेटीस हा अथेन्स शहरांतील एक विलक्षण व्यक्ति किंवा वल्ली होऊं लागला होता.' –साक्रेस ८. [ अर. वली ]

वल्ली—स्त्री. १ वेली, वेल. –ज्ञा ६.१२. 'यमुनेच्या तिरि झाडें वृक्षवल्ली।' –तुगा ४६. २ (गणित) श्रेणी; माला. [ सं ]

वल्ली—स्त्री. (गो.) खळी.

वल्हंडणें, वल्हंडा, वल्हांडणें, वल्हांडा, वल्हाणी, वल्हाणें—ओलांडणें, ओलांडा इ० पहा.

**वल्हविणें, वल्हाटी-ठी, वल्हाविणें, वल्हावा, वल्हें.** वल्हेकरी—वलविणें, वलाट-टी इ० पहा.

**वल्हा**—पु (प्र) वल्हें, वत्रें पहा **वल्ही**—स्त्री लहान वल्हा ही बहुतेक स्त्रियांच्या काठीस पाते बांधून करतात ही वल्हविण्यास फार हलकी असते

**वल्हा, वल्हे, वल्हेवल्हे**—उद्गा जलदी, चहूंदिशीं, चला, आटोपा याअर्थी प्रेरकत्वेंकरून प्रयोग [? स लघु, प्रा लहु- वल्हा घरेण्यल्यासारखें] ०करणें-भाग पाडणें, आग्रह करणें

**वल्हाणें**—अक्रि (व) निवणें, थंड होणें

**वल्हो**—पु (महानु) वस्तु 'तया तोचि आवृत्ति सेरी तरी वल्हो आतु पडे।'-दृष्टांतपाठ ७७.

**ववंडा, ववंडेकरी, ववणें ववरा, ववरी, ववळा, ववा, ववांडा, ववाळणी, ववाळणें, ववो**—ओवंडा, ओवंडेकरी इ० पहा

**ववण**—स्त्री ओवणी, गुंफणी 'अक्षरीं मोत्याची ववण साधुनी हो।'-प्रला १०९ [ओंवणें]

**ववर**—न नवदपती, ओवर, वधूवर पहा 'ववर ज जन्म रिठया तोडतात '-मसाप ४४ २५६ [वधूवर]

**ववसणें**—अक्रि ओवसणें पहा सक्रातीच्या दिवशीं सुग वाणीं वाणें वाटणें [स उपासना, म वसा]

**वव्हण**—न वाहणी, वाहणें 'उष्ण ना शीतल ऐसें । मृग-जल वव्हणीं अस।'-गीता २ ७१३ [स वहनि]

**वश**—वि १ आधीन, अनुकूल केलेला, ताब्यांत, कह्यात आणलेला (क्रि० करणें) 'वश करी मन्मथ सरळाला। पण तो दूर जाळी त्याला।'-सौभद्र २ मंत्रतंत्रानीं मोहून, भारून टाकलेला, भुरळ पाडलेला [स] ०क्रिया-स्त्री १ मंत्रतंत्र मारणें, मोहून टाकणें, वशीकरण २ ताब्यात ठेवण्याचा प्रकार, स्वाधीन राखणें ०वर्ती-वि आज्ञेत वागणारा वश असलेला 'तेयहि विवेकू परमार्थी। त्याचा वशवर्ती मी असे।'-एभा २० १६९ **वशंगत**-वि स्वाधीन झालेला, शरण आलेला, हुकमाखालीं असलेला **वशता**-स्त्री अधीनता (समासात) पर वशता **वशंवद**-वि आज्ञा, स्वामित्व मानणारा **वशात्** शब्द (समासात पूर्वपदीं दुसरा शब्द असता उपयोग) वश असल्या कारणानें, स्वामित्वामुळें, सत्तेनें (सामा) योगानें, मुळें उदा० कालवशात्, दैववशात्, द्रव्यवशात्, एतद्वशात् इ० **वशिता, वशित्व**-स्त्रीन शिवाच्या अष्टमहासिद्धींपैकीं एक गूढ मन्त्कारानीं ही प्राप्त होते अष्टमहासिद्धी पहा 'माझे धर्मे जेथ वश होती। ते वशिता बोलिजे सिद्धीती।'-एभा १५ ४२ **वशी**-वि १ इंद्रियें स्वाधीन असलेला, संयमी २ आधीन असलेला, परतंत्र **वशीकरण**-न १ मंत्रादि साधनानीं वश करण्याची विद्या (मारणमारणाबरोबर हा शब्द येतो) २ कोणी आपल्याला वश व्हावा म्हणून जें मंत्रादि साधन करतात तें 'ती मुग्धा कैसी गे। मळवील स्वाभिमन वशीकरणें।'-मोवन ६ ६२ **वशें**-वशात् पहा 'व्योमवायुवशें । धाडिलेनि गर्भरसें।'-ज्ञा १४ ६९ **वश्य**-वि आधीन, अनुकूल, वश असलेला -ज्ञा १३ १०१२ 'जो वश्य न होय ब्रह्मादिका। तो हो भक्ता स्वाधीन।'-न वधूवरें इ०कांच्या राशींचें आनुकूल्य, पत्रिका जमणें **वश्यकर्ण**-वशीकरण (अप) पहा 'माकळ साडुन परतीं। लोक वश्यकर्णे करिती।'-दा ११ १९

**वंश**—पु १ कुल, कुटुंब, गोत्र वर्ग, जाति 'तव यदु वंशाची वेळुवनें। वनरावी असती।'-माए ५३ २ प्रजा, संतति ३ वेळू, बांबू 'स्वरें धाडिलें रानें नाचिकालें। वंदे गोपुरी तो धरी वंश हातें।'-मुरा युद्धकांड ७१ ०कांति-न (सराफी) एक प्रकारचें माणिक रत्न हें दुरून पेटलेल्या आगीप्रमाणें दिसतें ०चरित्र-न वंशावळ, वंशाचा इतिहास कुलवृत्तांत ०च्छेद-पु १ कुळाचा नाश, निसंतान २ बांबू फोडणें, तोडणें ०जाल-चन-पुन वळूचें बेट 'यदुवंशवंशजाळी। वाढली श्रीकृष्ण कृपा-जळीं।'-एभा १.२३० ०परंपरा-स्त्री कुळातील लोकांची मालिका (पूर्वज व वंशज यांची), कुटुंबाच्या मागच्या व पुढच्या पिढ्या -क्रिवि एकापासून दुसऱ्याला असें वंशातल्या प्रत्येक पिढीला प्राप्त होऊन, पिढ्यानुपिढ्या ०परंपरागत-यात-वि पिढ्यानुपिढ्या चालत आलेलें, आनुवंशिक -क्रिवि वंशपरंपरा पहा ०पात्र-न बांबूची परडी, टोपली इ०, झाल 'भवऐरणी सपादन। कृष्णासी वंशपात्रदान।'-एरुस्व१६ १५८ ०रोचना-लोचन-क्षीर-क्षीरी-स्त्रीन वेळूच्या पोटातील पिठासारखा औषधी पदार्थ ०वल-स्त्री वेलीप्रमाणें वाढणारा वंश 'का पेशव्याची ही वंशवेल खुडलिस।'-ऐपो ३१३ ०वाद्य-न अलगुज, पावा, मुरली वेणु ०वृद्धि-स्त्री कुळाची वृद्धि वाढ ०क्षय-पु कुलनाश वंशवृद्धीच्या उलट ०ज-वि १ वंशांत, कुळात जन्मलेला २ कुळात मागाहून होणारा, येणारा याच्या उलट पूर्वज ३ कुलीन चागल्या कुळात जन्मलेला ०धर्म-पु कुळधर्म, कुटुंबपद्धति -ज्ञा १ २ ४५ **वंशांकुर**-पु १ वंशातील एकुलती व्यक्ति, ज्यावर सबंध वंशाची वाढ अवलंबून आहे असें मूल 'हा एकटा वंशांकुर उरला (राहिला) आहे' २ कळकाचा कोंब, धुमारा [वंश+अंकुर] **वंशानुचरित**-न १ पिढ्यानु-पिढ्या, वंशपरंपरा आलेली चाल रीत २ वंशावळ, वंशवृक्ष ३ कुळाचा इतिहास [वंश+अनुचरित] **वंशावलि, वंशा-वळ-ळी**-स्त्री कुळाची, वंशाची परंपरा मालिका, कुळात झाले-ल्याची यादी २ वंशवृक्ष [वंश+आवलि=ओळ] **वंशिक**-वि १ वंशासंबंधी, वंशातील २ वंशज **वंशी**-स्त्री पावा, मुरली.

१०८३ [स वन्ध्या, प्रा वञ्झा, पं वझा, सिं वांझ, हिं बांझ, गु. वांझणी, ब बाझा, का बाजि ] ०खडा-पु गर्भधारणा न व्हावी म्हणून घ्यावयाचें औषध ०ट-टोळी-स्त्री वध्या, वध्येस उपहासात्मक शब्द (गो) वाझडो-टो -वि व्यर्थ 'तैसें द्रव्य कां द्रव्य या दोन्ही दशा वांझग।' -अमृ ७ २४४ ०तिथी-तीथ-स्त्री. ज्या दिवशीं कोणतेंहि कर्म, विधि विहित नसतो असा दिवस वांझा-वि वांझ पहा १ ज्या फुलापासुन फळ उत्पन्न होत नाहीं असें २ गरे नसलेला (फणस), दाणे नसलेली (शेंग, कणीस वगैरे) ३ ज्यास फुलें येतात पण फळें येत नाहींत असा (वृक्ष-पोपया, बकुल वगैरे) ४ निष्फळ, बेफायदा, निरर्थक (धंदा, श्रम, काम, हंगाम) ५ ज्या दिवशीं व्यवहार झाला नाहीं, जमाखर्च नाहीं असा (दिवस) वांझीतिथी-तीथ-वाझतिथी पहा वांझी पुनव-पूर्णिमा-स्त्री पौषशुद्ध पौर्णिमा या दिवशीं अनेक मुलें असलेल्या तीस सुवासिनी म्हणून चोळा वितात वाझें-वि निष्फळ, व्यर्थ -ज्ञा १८ ११९ वाझोदक-वा-पुनव बिनपाण्याचे, पाऊस न आणणारे मेघ, ढग वांझो-वि (गो) वांझा वांझोटा-टी-डा-ढा-वि (उप) वाझ, निपुत्रिक 'जैसी एकचिवये वाझोटी।' -ज्ञा ६ १२१ वांझोळें-ळ-ळें-वांझोळ-ळें-न वाझ फूल 'म्हणोनि वाझोळें व लगती देखा।' -ज्ञा १० ३३३ -वि व्यर्थ, निष्फळ 'ये दोन्हीहि वाझोळें। दोन्ही जालीं।' -अमृ ८.१७

वांझ-पु १ (कों) सुकत आलेला, बिनपाण्याचा नारळ २ (गो) खोबरें नसलेला नारळ

वांझा-झें-पुन बाधा, दिशोबासवधानें भानगड, गुंता, 'हें वांझें नाना फडणीसच काढून टाकील' -अस्तभा १६४

वांज-जा वाजंगणें, वाजसा-वाया, वायगणें, वायसा १० पहा

वाट-स्त्री १ रस्ता, मार्ग 'कीं मीप्में धरिली ती वरिलीच तुम्ह्याहि वाट केकाहीं।' -मोभीष्म १२८ २ (ल) वर्तनक्रम, पद्धति, परिपाठी, तऱ्हा, प्रकार, रीत 'पहिली जी नीट वाट वाहो ती।' -मोआश्रम ११ ३ (ल) उपाय 'मग पोट भरायां काढिली वाट।' -दावि ८१ ४ (ल) परिणाम, गति, निकाल 'माझ्या फिर्यादीची वाट काय झाली कोण जाणे' ५ बेंबीच्या खालीं पोटांत वाटीच्या आकाराचा जो उचवटा येतो तो (ही सरली म्हणजे पोट दुखू लागतें) [स वाट, पथिवस्तु निवाट स्यात्। -त्रिकांडशेष वर्त्मन् प्रा वट, हिं बाट] (वाप्र) ०करणें-क्रि १ मार्ग करून देणें २ (ल) वर्तनक्रम ठरविणें, मार्ग दाखवून देणें, व्यवस्था, मांडणी वगैरे करणें ३ नाहींसा करणें, दूर करणें 'तेव्हेंळीं शिशुपाळाचें राज्य। पारकेयांवरी वाट करितें।' -शिशु ९९४ ०घडणें-परिणाम होणें, गति होणें, मार्गी निघणें 'अद्वैतशास्त्र नावडे यासी। पुढें वाट घडेल कैसी।' ०चुकणें-आकस्मिक भेटणें, अनेक दिवसांनीं घरीं आलेल्यास म्हणतात 'आज फारा दिवसांनीं वाट चुकला' -मोर ११ ०धरणें-१ मार्ग अडविणें, रोखून धरणें 'एवढया रानामध्यें जाण। वाट धरून बैससी कोण।' -रावि २ मार्गप्रतीक्षा करणें, वाट पहाणें ०पाडणें-वाटेंत चोरी करणें, लुटणें, दरोडा घालणें 'विरातसगे वाट पाडित।' -रावि १ १०५ ०पाहणें-मार्गप्रतिक्षा करणें, खोळंबून राहणें, वाटेकडे डोळे लावून बसणें ०मारणें-मार्गांत गाठून लुटणें, वाटेंत दरोडा घालणें ०लागणें-निकाल लागणें, उरकणें, संपणें, खलास होणें, विल्हेस लागणें, दूर होणें, नष्ट होणें ०लावणें-१ निकालात काढणें, विल्हेवाट करणें २ खाऊन टाकणें, संपविणें ३ मोडून तोडून टाकणें, नाश करणें ४ मार्गांतून दूर करणें, हाकलून देणें ०वावरणें-१ निरर्थक खेप घालणें, व्यर्थ हेलपाटा घालणें ०वाहणें-रहदारी असणें, चालू असणें, वाटसरू, प्रवासी वगैरेनीं गजबजलेला असणें, वापर असणें 'तुका म्हणे वाहे वाट। वैकुंठींची घडघडाट।' ०वाहती करणें-वाट मोकळी करणें, चालवून देणें, वाटेस लावणें 'मग जाणतया जें विरू। तयाची वाट वाहती करू।' -ज्ञा १६ ५७ ०सरणें-ज्ञानमार्ग निरुद्ध होणें 'या धक्यानें क्षुधामांद्य होणार बहुधा वाट सरली असेल' -मौनयौवना ०सुधारणें-पळणें, चालतें होणें, पाय काढणें 'आपली वाट सुधार कसा' -तोब १७. ०होणें-परिणाम, गति होणें, निकाल लागणें चार वाटा करणें-उधळणें, दूर दूर करणें, विखुरणें, पळविणें, घालविणें चारहि वाटा मोकळ्या, बारा वाटा मोकळ्या-पूर्ण स्वातंत्र्य, सर्व जग फिरावयास मोकळें असणें, स्वैरस्थिति, अनिर्बंध गति तिवाटाची माती येत नाहीं समजत नाहीं-पूर्ण अज्ञान, काहीं न समजणें देखली वाट पाहणें-करणें-गेल्या मार्गानें परत येणें मधल्या वाटेस-दोहोंच्या मध्यें, दोहों मार्गापैकीं कोणताहि न पतकरतां, कोणाचाहि फायदा न घेतां (क्रि० येणें, जाणें, नेणें आणणें) वाकडी वाट करणें-आडवळणास जाणें, मुद्दाम मार्ग सोडून जाणें, वळसा घेणें वाटा घेणें-क्रि लुटणें, लुबाडणें 'तुजकारणें चोर घेती वाटा। तूं बुजविली वीरा सुभटा।' -कालिका १४ ६६ वाटा लावणें-वाटेस लावणें पहा 'लादन वाटा लाविलें। विचारें अविचारासी।' -दा ५ ९ ४८ 'पळें लाविती लोभ दादनि वाटा।' -दाति ३६४. वाटेग लायणें-(गो) रस्ता धरणें 'हांगा बसूं नाका वाटेग लागा' वाटेचा पाय-वाटेचें पाऊल आड वाटेस पडणें-कुमार्गास लागणें, चुकी होणें वाटे जाणें-खोडी करणें, कुचेष्टा करणें. वाटे-वाटेस लावणें-१ मार्गास लावणें, रस्ता मार्ग, दाखविणें २ निरोप देणें, पाठवणी करणें, रवानगी करणें. ३ हाकून

देणें, घालविणें **वाटेवर आणणें**–ताळ्यावर आणणें, सुधारणें, योग्य मार्गावर आणणें 'गगे जा वाटेवरि आण अभय द्यावया न हा मागे।'–मोरयोग १३ ५६ **वाटेवर पडणें**–सहज प्राप्य असणें, सुलभ असणें, सुसाध्य असणें 'माझी मुलगी वाटवर पडली आहे'–भाव १२ **वाटेवर येणें**–शुद्धीवर येणें, योग्य मार्गास लागणें; ताळ्यावर येणें, व्यवस्थित वागू, बोल, करू लागणें, वर्तनक्रम सुधारणें **वाटेस जाणें**–खोडी करणें, पुरा पत काढणें; त्रास देणें **वाटेस लागणें**–१ चलू होणें, योग्य मार्गानें जाणें २ नाहींसें होणें, संपणें. **वाटेस लावणें**–१ योग्य मार्गास लावणें 'सर्वत्र धर्म रक्षक राजे आहत लाविती वाटे।'–मोकर्ण २९ ४६ २ निरोप देणें, पाठवणी करणें, हाकून लावणें सामाशब्द– **०करी–काढू–काढ्या**–पु वाटाड्या, रस्ता दाखविणारा, मार्गदर्शक **०खर्च–खर्ची**–पुस्त्री प्रवासात खर्चावया-करिता लागणारा पैसा, प्रवासखर्च 'जरी हा वाटखर्चीस पीठ देता।'–कचेसुच ५ **०घेणा**–पु वाटमाऱ्या; लुटारू 'वाटघेणा वाल्हा कोळी । अजामेळा पडता जळीं।'–निगा १२७ **०चा चोर–पोर**–पु कोणीहि अनोळखी मनुष्य, उडाणटप्पु भटक्या **०चा वाटसरू**–पु अनोळखी प्रवासी, कोणताहि संबंध नसलेला मनुष्य, कोणीहि प्रवासी, पांथस्थ, वाटेनें जाणारा–येणारा **०चाल**–स्त्री प्रवास. **०चालन**–न (कातकरी) लग्नाच्या दुसऱ्या दिवशीं वधूस वरगृहीं नेतात त्यावेळीं वाटेंत देण्यात येणारी दारू –बदलापूर ११९ **०तीट**–स्त्री आक्रमावयाच्या मार्गांतील अडचणी, संकटें वगैरेस उद्देशून म्हणतात रस्ते व त्यातील सभाव्य विघ्नें इ० 'वाटेतिटेनें सभाऊन जा **०पाडी**–स्त्री दरोडा –गुजा [वाट द्वि] **पाडिया–पाडो–डू–ड्या**–पु वाटमाऱ्या; लुटारू, चोर; दरवडेखोर 'म्हणे आजि वाटपाडिया। कैसी दया उपजली।'–दे कृष्णजन्म १९ 'वाटपाड्यासी कैसी माया।'–ह २ १९१ **०भेट**–स्त्री रस्त्यात पडलेली गाठ, आकस्मिक भेट. **०माणूस**–पु सामान्य मनुष्य, कोणत्याहि दर्जाची व्यक्ति रस्त्यावरील मनुष्य –नवाकाळ १६ ८ २७ **०मार**–स्त्री १ रस्तालूट, रस्त्यावरील हल्ला २ रस्त्यावर मित्रत्वानें यावविणें, अडविणें ३ (बुद्धिबळ) प्यादें दोन घरें जात असता मध्येच एक घर आल्यासारखें धरून मारणें **०मारू–माऱ्या**–पु ठग लुटारू, रस्तेलूट करणारा **०मार्ग**–पु रस्ता, मार्ग रीत, पद्धति सामान्य नियम, साधारण व्यवहार, क्रम इत्यादि वाचक सामान्य शब्द प्रयोग वाट पहा **०मार्ग करणें–घालणें–दाखविणें–पाडणें–शिकविणें–सांगणें**–सामान्यत दिशा दाखविणें, सांगों उपदेश करणें, सल्ला देणें **०मार्गी**–पु प्रवासी, पांथस्थ **०वाटमार्गी लागणें**–१ योग्य दिशेनें जाणें, मार्गावर येणें २ मृत्युपयास लागणें **वाटमार्गी लावणें**–१ योग्य दिशा दाखविणें, मार्ग दाखविणें २ निरोप देणें, पाठवणी करणें, वाटेस लावणें. **०पाणी**–न १ वाटेंतील पाणी, गटारांतील, रस्त्यात वाहणारें पाणी 'नाहीं आड ना विहीरवणी। घाला वाटेचें वाटवणी। विनोद मेहुणीं माडिला।'–एरुस्व १२ १४८ २ (सांकेतिक क्रियामध्यें रूढ) मूत्र **०वधा**–पु वाटमाऱ्या 'किंबहुना ते चुकले। वाटवधेया।'–ज्ञा ७ १७४ १३ ५४७ **०वर्ध**–न वाटमार वाटमाऱ्याचा धदा, वाटेंनील अडथळा विघ्न 'तया इद्रादि पदें। करिताति वाटवधें।'–ज्ञा १२ ६१ **०शेक**–क्रिवि रस्त्याचे बाजूनें, दुतर्फा, वाटेनें **०सखा**–पु प्रवासातील सोबती **०सर–सरू–सारू–सुरू**–पु प्रवासी, पांथस्थ, मुसाफरी, रस्त्यानें जाणारा **वाटाडी–ड्या**–पु रस्ता दाखविणारा, मार्गदर्शक **वाटेकरू**–पु वाटाड्या 'विभक्तीचा वाटेकरू। ज्ञानाचा निढारू।'–भाए २५२ **वाटेचा चोर–वाटेचा वाटसरू**–पु कोणीहि जाणारायेणारा सामान्य मनुष्य 'वाटेच्या वाटसरूला देखील हें समजेल'–अस्तभा ३ **वाटेचें सोंवळें**–न (बायकी) सोंवळें वस्त्र नेसून मार्गक्रमण केल्यास त्या सोंवळ्यास दोष लागतो यावरून त्या वस्त्रास म्हणतात **वाटेंतील काटा**–पु अडथळा; विघ्न 'फडणविसांनीं आपल्या वाटेंतील वगभटाचा काटा नाहींसा केला'–अस्तभा ६८

**वाट**—पु तोळ्याचें वजन (सुमारें पांच शेर वजनाचें)

**वाट**—पु वाटिका, आश्रम 'गोमतीच्या तटीं वाट वल्मिकीचा।'–मोरामायण १ २५७.११७

**वाट**—स्त्री (प्र) वाट रेडी; रेडकी, म्हशीचें वासरूं.

**वाट–टं**—न (व) मोठी पसरट वाटी याचा ताटासारखा उपयोग करतात

**वाटकुळें**—वि (गो.) वाटोळें, गोल [स वृत्त] **०पण**—न गोलपणा, वाटोळेपणा

**वाटकोळ खोळ वाटकूळ, वाटखूळ**—पु उशीर, पुष्कळ वेळ, वाढवेळा [वाढणें+वेळ] –क्रिवि पुष्कळ वेळपर्यंत, दीर्घकालपर्यंत, उशीर होईतो.

**वाट(ड)गा**—पु मोठी पसरट वाटी [स वृत्त] **वाटगें**—न (खा) मोठी वाटी [वाटी]

**वाटगें**—न शिदारी, पाथेय [वाट]

**वाटघाट**—स्त्री १ खल, बारीक चूर्ण करणें; चिरडणें, ठेंचणें चूर्ण करून मिसळणें (औषधें, पदार्थ वगैरे) २ (ल) वाटाघाट बोलाचाली, खलबत, खटपट तजवीज, घडण, बनाव ३ (ल) खल, चर्चा, वादविवाद [वाटणें+घाटणें]

**वाटचा**—क्रिवि ऐवजीं, बद्दल, बदली, जागीं, जागचा. [वाटा+चा]

**वाटण**—न १ वरवन्ट्यानें बारीक करण्याची क्रिया २ अशा रीतीनें बारीक केलेला पदार्थ [ वाटणें ]

**वाटणा**—पु (प्र) वाटाणा एक द्विदल धान्य, एक कडधान्य.

**वांटणी**—स्त्री १ विभागणी, हिस्सेरशी २ पृथक्करण, निरनिराळे भाग पाडण्याची क्रिया ३ हिस्सा, वाटा, भाग. ४ (पत्ते) पिसल्यानंतर सर्व खेळणारास विशिष्ट संख्येइतके पत्ते देण्याची क्रिया व पाळी ०पत्र क-न ज्या लेखावरून सह मालक अथवा भागीदार आपले हिस्से निराळे करून घेतात तो लेख, विभागणीपत्रक, यादी

**वाटणें-वांटणें**—सक्रि १ निरनिराळे विभाग करून भागी दारास देणें, विभागणें, हिस्से, तुकडे करणें, भाग पाडणें २ निरनिराळ्या लोकास योग्य प्रमाणात देणें ' दक्षिणा वाटणें ' ३ पृथक् काढून ठेवणें ' जें महर्षी वाटलें । विरक्ता भागा फिटलें ।' —ज्ञा ५ १४७ [ स वट्=विभागणें ] **वांटप**-न विभागणी, वाटणी, मालमत्तेची हिस्सेरशी **वाटपपत्र**-न वाटणीपत्र **वांटपी**-पु वाटप करणारा **वांटा**-पु हिस्सा भाग, अंश (गो) वाटो, वांटे **वाटा उचलणें**-मध्ये सहभागी होणें अंशभाक् असणें, हात असणें, भागीदार होणें (पापाचा, यशाचा पुण्याचा)

**वाटणें**—सक्रि १ वरवंट्यानें घासून बारीक करणें, चूर्ण करणें, चक्काचूर करणें, पिष्ट करणें २ (ल) घासाघीस, चर्चा, खल छाननी करणें, खोदखोदून चौकशी करणें **वाटूनघाटून**—क्रिवि १ चिरडून भरडून बारीक चूर्ण करून २ (ल) अत्यंत त्रास देऊन छळ करून गाजून गाजून (क्रि०खाणं, पिणें गिळणें) ' हा वाटूनघाटून माझा प्राण खातो मला प्यायला पाहतो ' **वाटप**-न (कु) वाटून तयार केलेला पदार्थ, मसाला. –क्रि (गो) वाटणें चूर्ण करणें **वाटपण**-न (गो) घासाघीस **वाटपिठाचा**-वि वाटून केलेल्या पिठाचा (उडा, वडा इ०) **वाटली डाळ**-स्त्री चण्यांची डाळ भिजवून वाटून केलेला खाद्यपदार्थ **वाटली डाळ करणें**-(वाप्र) १ सपुष्टात आणणें २ नामशेष करणें अवळजवळ नाहींसें करणें ३ उगाच चवीपुरतें खाणें

**वाटणें**—अक्रि १ भासणें, भावना होणें, समजणें ' तुज वाटे हे जागृति । मज आली अनुभवा ।' —ज्ञा ७ २०८ २ मनांत येणें इच्छा होणें सुचणें ' सतार सोडावासा वाटतो '

**वाटमुशी**—स्त्री मुशी नावाच्या माशाची एक जात

**वाटरूं**—न म्हशीचें रेडकू, पारडें

**वाटला**—क्रिवि (अशिष्ट) (कों) वानोळा, समोवती, समोवार आसपास [ वागोळा ]

**वाटली**—स्त्री (गो) वाटी, पेज पिण्याचें भांडें, वाग्गा, तसराळें.

**वाटव**—पु वाटीव-मनवो

**वाटवें**—न (ना) पोतें

**वाटवणें**—क्रि पुन्हा मार्गस्थ होणें, थोडा वेळ थांबून पुन्हा चालावयास लागणें, मार्ग धरणें, रस्ता सुधारणें [ वाट ] **वाटविणें**—उक्रि. १ मार्गात बाजूस किंवा मार्ग टाळणें, पलीकडे जाणें, बाजूनें पुढें जाणें, वळसा घालून जाणें ' ही खादेरी वाटविली म्हणजे शहर दिसु लागेल ' २ ओलांडणें, उल्लंघून जाणें, मार्ग टाकणें, टळणें (काळ, समय इ०) ' एवढी अवस्था वाटविली म्हणजे यास गुण पडेल ' वगावणें पहा [ वाट ]

**वाटवा**—पु १ बटवा, वाटोळी सरकबंदाची पिशवी, सरा फाची नाणें ठेवावयाची पिशवी ' काच वाटव्यामाजी घालुन । तोंड बांधून टाकिती ।' —जै १६ ११ २ कप्पे, खण असलेली पिशवी, मोठी चंची ३ (ना) पोतें ' वाटव्यांत धान्य भरलें '

**वांटवा**—क्रिवि बद्दल, ऐवजीं, वाटचा —शर [ वांटा ]

**वाटवें**—न (व) पोतें, गोणता वाटव पहा

**वाटाउ**—पु वाटसरू ' तंव भीव तरि वाटाउवाजवळि । प्रमप्राती ।' —भाए ४९३

**वाटाघाट**—स्त्री १ चर्चा, खल, विचारविनिमय, वादविवाद २ कसून प्रयत्न, परिश्रमपूर्वक काम, त्रास मेहनत ३ श्रांत स्थिति, थकवा ४ दुर्दशा, कष्टप्रद स्थिति (ऋणकोची सावकारानें, मजुराची मालकानें केलेली) [ वाटणें+घाटणें ]

**वाटाणा**—पु एक द्विदल धान्य, कडधान्य, मटार [ स. वटधान्य वटदाण —भाअ १८३३ ] **वाटाण्याच्या अक्षता लावणें-देणें**-साफ नकार देणें विनंति अमान्य करणें (वाटाणे कपाळास लावल्यास चिकटत नाहींत यावरून) ' बाबा हातोहात तुम्हाला वाटाण्याच्या अक्षता देतील ' —भाउबंदकी १३७

**वाटादुळा-दूळ**—पु सडीक तांदुळांतील जाड कणी

**वाटारणें**—क्रि वटारणें पहा

**वाटाव-वो**—पु वटाव पहा उणीव, कमीपणा ' न पडेगा वाटावो । आणिकाचा ।' —ज्ञा १३ ७५२

**वाटावणें-विणें**—वटावणें पहा

**वाटावाट**—स्त्री सारांश समजण्याकरितां घोळघोळून केलेली चौकशी, चर्चा, खल, वाटाघाट वादविवाद [ वाटणें द्वि ]

**वाटावाट**—स्त्री अनेकांस वाटण्याची क्रिया [ वांटणें द्वि ]

**वाटाळ**—क्रिवि (व) रस्ता सोडून आडमार्गानें [ वाट ]

**वाटिका, वाटी**—स्त्री पुष्पझाड वगैरेचा बाग बगिचा म्हणसे उद्यान (समासांत) पुष्पवाटिका=फुलबाग वृक्षवाटिका= उपवन, इक्षुवाटिका=ऊसाचा मळा इ ' निकट पुरपतीची वाटिका रम्य पाहे।' —मुरामायण अयोध्या ११

वाटि(टी)व—स्त्री. (काव्य) १ अश. 'ते तुझिया प्रकाशाची वाटिव' –विउ ३.११. २ पुरुषार्थ, पराक्रम. 'वाटिवावीण हांव। वाधिती झुंजी।' –ज्ञा १.१७२. 'तरी तुझा मोडीन दरारा। वाटिवेचा।' –कथा ५.४.७२. तेवेळीं याची वीरवाटीव। कोठें गुप्त ठेविली होती सर्व।' –मुआदि ४२.६३. ३ प्रशंसा. 'वीजे मारिव थोर वाटिव तुझी गंधर्व–विद्याधरीं।' –आयझरक्षण ७४. [वाटणें]

वाटी—स्त्री. १ लहान वाडगा; बशीसारखें खोलगट भांडे २ नारळाचा अर्धा भाग; एक ववड. ३ गुडघ्यावरील हाड; गुडघी रोग. 'वाटी वटक वायगोळा।' –दा ३ ६ २२. ४ सामान्यतः खोलगट पदार्थ; फुलाचा पेला; पोकळ गोळ्याचा अर्धा भाग वगैरे. ५ रत्न बसविण्याकरिता केलेलें कोंदण. [सं. वर्तिका–वट्टिआ–वटी–वाटी–भाअ १८३२]

वाटीगर—पु. एक फुलझाड. वाटोगर पहा. 'जाईजुई राजसेवंती। मदार वाटीगर मालती।' –मुरंशु ५.१४.

वाटीव—वि. वाटलेलें; चूर्ण केलेलें; पीठ केलेलें.

वाटु—पु. (गो.) एक जातीचा मासा. –मसाप ३.३.

वाटु(ली)व—स्त्री. वाट; प्रतीक्षा. 'कैसी अवस्था सूतली। वांट पातां।' –शिशु १७१. 'वाटुली पाहतां शिणले नयन। बहु होतें मन आर्तभूत।' –तुगा ६१३.

वाटू(टो)ण—न. (तंजा.) वाटवण पहा.

वांटेकर–री–दार, वाटेलदार, वाटेली—पु. विभागी; भागीदार; हिस्सेदार; पातीदार.

वांटेचा—वि. वाटचा; ऐवजीं; बदली. [वांटा]

वाटेनसून—क्रिवि. (गो.) वाटेनें.

वाटेपत्र—न वाटणीपत्र पहा.

वाटेय—पु. विषय. –हंको.

वाटोगर–रें—पुन. वटमोगरा. 'ते नवे वाटोगरें उमलतांती।' –शिशु ३०१.

वाटोणी–णें—न. वाटवणी पहा.

वाटोली—स्त्री. वाट. 'डोळे माझे शिणले। पाहतां वाटोली।' –नामदेव, स्तोत्रमाला १५३९.

वाटोवा—पु. वटवा. वाटवा पहा.

वाटोळा—वि. १ गोल; वर्तुळाकार; गोलाकार, चेंडूसारखा. २ दीर्घवर्तुलाकार; लांबट व गोल; नळकांड्यासारखा. [सं. वर्तुल, प्रा. वट्टुल]

वाटोळा—वि. वाटोळें करणारा; नाश करणारा. 'उद्दंडवि घरें युद्धविलीं वाटोळया।' –ब ४९६. वाटोळा खूर–पु. १ अतिशय खर्चिक घोडा असल्यास त्यास म्हणतात. २ (ल.) उपल्या; भामटा; सोदा. वाटोळा गोटा–गोळा–धोंडा–पु (ल) वोलण्या मध्यें वगैरे कधीं सांपडावयाचा नाहीं असा मनुष्य; धूर्त मनुष्य; सर्वांशीं किंवा सर्व प्रसंगीं सारखा वागणारा, सर्वांशीं गोड असणारा, जमवून घेणारा मनुष्य. वाटोळें–वाटोळें लांबोळें करणें–(वाटोळें=शून्य यावरून) नाश करणें; नाहींसें करणें, समूळ नष्ट करणें. 'सुयशाचें करिल का न वाटोळें।' –मोउद्योग ७ २६. वाटोळें–वाटोळें लांबोळें होणें–नाश होणें, न होमें होणें; नष्ट होणें. वाटोळे चणे–पु अव. (गो.) वाटाणे. वाटोळया गंजिफा–स्त्री. एक खेळ. –मखेपु १५९.

वा(वां)ठ—स्त्री. म्हशीची रेडी. वांट पहा. वांठीचा पिता–पु (संकेत) मूर्ख, जड बुद्धीचा वांठरूं–न रेडक, रेडकू.

वांठ—वि. चकित, तटस्थ; आश्चर्ययुक्त. 'ऐसा महिव घनवट। गगा तैसी चोखट। जया देखी जगीं सुभट। वाठ जहाली।' –ज्ञा २.२११.

वांठणें, वांठरणें—अकि. (थंडी, वांब इ०मुळें) आखडणें; वाकडें होणें.

वाठाण—न. वठाण पहा. 'कीं वाठाणीं नलगे दीपु।' –गीता १२.१२.

वाठार—न वठार पहा. १ गांवाचा, शहराचा भाग; पेठ; पुरा; वॉर्ड. २ गल्ली; बोळ; आळी.

वाठि(ठी)व—पु वाटिव पहा. 'जेविं वाठिवेचे आदित्य उदेलें।' –शिशु १४७. 'कीं शृंघाराची वांठीव पान्हेली।' –शिशु ५१७.

वांठीं–ठयें—न. गवताचा, पेंढयाचा मुडा.

वाड—न. (राजा.कु.) वाढें; उंसाचा शेंडा. [सं. वृधु=वाढणें]

वाड—स्त्री. १ मोकळी जागा; रिकामी जागा; रिता ठाव. २ रिकामपण; फुरसत. [वाढणें]

वाड—वि. (काव्य) १ थोर; मोठें; पुष्कळ; प्रचंड. 'परि भीमकाचें भाग्य वाड। पुरत परमार्थाचें कोड।' –एरुस्व १४.८४. 'करा आतां मजसाठीं वाड पोट।' –तुगा १२९५. २ अफाट; विस्तीर्ण; अवाढव्य; अमर्याद 'कपी वीर तो वाड ज्याला उडाला।' –राक १.८ ३ भव्य; बलिष्ठ, भयंकर; आश्चर्यकारक; विस्मयकारक. 'अर्धी वाढुनि वाड धाड पहली तेणें घराती धरा।' –आपूतनावध ४१. 'वटवीजीं असें वाड। फोडूनि पाहतां वर दिसे झाड।' –दा १० ९.२. 'कुमारें सर्पास्त्र घातलें वाड।' –ह २८.१६१. [सं. वृध्–वृद्ध–वडु–वाढ–वाड] ०पण–न. विस्तार, मोठेपणा; भव्यपणा; अधिकपणा. 'वाडपणाचा डांगोरा। तो दंभु ऐसा।' –ज्ञा १६.२१७; –ज्ञा १०.१७६.

वाड, वाडणें—वाड, वाडणें पहा.

वांड—वि. द्वड; मात्य, खोडकर; रुनाड. [सं. वंड–भाअ १८१३; वड्=विभाजनें, वेगळा राहणारा. –ग्रंथमाला; प्रा. वंड= अविवाहित; का. डंडिग]

**वाडकर-री**—पु १ वाडीकर, वाडीचा मालक २ वाडींत राहणारा, सावंतवाडीकडचा मनुष्य ३ गांवढा

**वाडकुलें**—न (कों) लहान वाडी, लहानसें आवार, परसू

**वाडकोड**—न कौतुक, लडिवाळपणा, आवड 'उठोनि नृपति वाडकोड।'–दावि १५६ [कोड द्वि]

**वाडखो**—क्रिवि (व. ना) १ वाढूळचा, केव्हांचा, फार वेळचा २ इतक्यांतच, एवढ्यांतच, आताच [वाड वेळ]

**वाडगा**—पु मोठी वाटी

**वाडगी**—वि (कों) म्हातारा, वृद्ध, वाढलेला [वाढणें]

**वाडगें**—न आवार, परसू घराभोंवतालची मोकळी जागा, घर नसलेली किंवा पडक्या घराभोंवतालची कुडलेली जागा 'वाडग्यात गवताची गंज आहे'–मराठी तिसरें पुस्तक पृ ७५ २ (व) जनावरें कोंडण्याकरितां केलेलें आवार [स वाटक]

**वाडदिवस, वाडदीस, वाडप, वाडपी-प्या, वाडया, वाडलें, वाडवण, वाडवीस, वाडवेळ**—(राजापुर प्रांतीय) वाढदिवस-दीस इ० पहा

**वाडभर**—क्रिवि पुष्कळ वेळ

**वाडव**—पु वडवानल पहा 'दुर्वार वाडवाग्निसि न मानि-जेले।'–र १९.

**वाडवडील**—पु अव पूर्वज, बापजादे, वडील माणसें वगैरे [वडील द्वि]

**वाडवळ**—पु एक जात व तींतील व्यक्ति, बागवान [वाडी]

**वाडवळ**—न शेतकरी लोकांतील एक विधि, इवरा [वाड+मेळ]

**वाडसणें, वाडणें**—सक्रि (कों) (वाढलेला भाग) छाटणें तोडणें, कापणें 'झाड वाडसून टाक' 'वेत आंगलें तीं वाडी टाकी.'–भिक्षी [वाड]

**वाडा**—पु १ भव्य व मोठी इमारत, प्रासाद; थोरामोठ्यांचें घर, राजवाडा, सरकारवाडा 'मग गणेशा करूनि नमन। घाटि याल आला जाण।'–कथा ६ १९ १२६ २ शहरांतील पोट विभाग, आळी, वसती उदा० गौळवाडा, ब्राह्मणवाडा, कुंभार वाडा, देऊळवाडा ३ खेडेगांवाचा, मौजाचा भाग, कोंड ४ आवाड; आवार, कुंपण घातलेली जागा, बंद केलेली जागा 'वाड्यांचे कूपी खातीचे जळे।'–कमुरा ७४६ ५ गुरें मेंढ्या, शेळ्या बांधण्याकरितां केलेली जागा (उघडी किंवा छपर घातलेली) वेढें 'वृत्ती आपुलाला झाडा। गाई बैसविल्या वाडा।'–तुगा १८६ ६ शेळ्यामेंढ्यांचा वसलेला समुदाय 'शेतें खत घ्यासाठीं त्यात वाडे बसवितात' [स वाट; प्रा वाड] **वाडी वाडीं**-क्रिवि (महानु) घर वाड्यातून 'आर्तातें परमेश्वर वाडोवाडीं गिवसती।'–दृष्टांतपाठ ३७

**वाडाचार**—पु १ (वर) वंशविस्तार २ आचारविचार 'बहुत नाहीं वाडाचार।'–दावि १०. [वाड+आचार]

**वाडाळणें**—सक्रि वारणें, आसडणें, पाखडणें

**वाडि**—स्त्री वाट 'मज निपजा तिन्हियेर वाडि पाहों वे।'–पच ५ ७

**वाडी**—स्त्री १ कुंपण घातलेली लहान बाग, बगीचा, वृक्ष समूह, राई 'नारी सांडून कल्पतरूची वाडी।'–भाए १२१; –ज्ञा ८.१४० २ वाडगें, आवार, वाडकुलें, मळा ३ मोठ्या गांवाजवळील लहान वस्ती, शेतकऱ्यांचा समूह, लहान गाव 'जेथ पातां चहु वाडी। अठरा गाउआं बाहिरि वाडी।'–शिशु ३२१. [स वाटिका; प्रा वाडिआ, गु हिं वाडी, ब बाटी] ०वतन-न वतनवाडी पहा **वाड्या**-पु वाडीचा वतनदार, वाडीवाला, धरदाज, शेतीवाडीचा मालक

**वाडी**—(राजा गो) पिशाच्चादिक करितां थोडें अन्न वाढून ठेवतात तें, काकबली, भिकाऱ्यास वावयाची वाडी, गोग्रास [वाढणें]

**वाडु**—वाड पहा

**वाडूळ**—वाढवेळ पहा

**वाडें**—न १ वाढें, उसाचा शेंडा २ खजूराचें आलें, कंधें ओझें

**वाडें**—न माल, विकण्यास आणलेले जिन्नस, मालाचा साठा. [स वाणिज्य] **वाड्याचें वाडें**-सगळा माल, सर्व साठा

**वाडें**—न वाडी पहा देऊळवाडें, आईतवाडें

**वाडें**—क्रिवि कौतुकानें, आश्चर्यानें 'प्रत्यक्ष म्या कोंडु-निया कवाडें। लावूनि आल्यें निरखाल वाडें।'–आकृष्णचरित्र ४८ ३० [वाड] **वाडेंकोडें**-क्रिवि १ कौतुकानें; मोठ्या आव डीनें, लाडिकपणानें, प्रेमानें 'घावा प्रसाद हा सर्वांला मधु वाडेंकोडें।'–मोमुदाम ५४ (नवनीत पृ ३७८) –ज्ञा १५. ४४८ २ सहज लीलेनें, सहजपणें अनायासें 'एकेचि शरें वाडेंकोडें। मस्तक उडविलें आकाशीं।'–जै ६८ ८९ ३ लबाडीनें, धूर्तपणें 'ज मायनें ठकिलें वाडेंकोडें। ते माया समूळेंसीं उडे।'–एभा २ ९१ [कोड-कोडें द्वि]

**वाडें**—न रहाटाच्या माळेचा लोटा, मडकें

**वाडें**—न १ (कु) अचानक लाभ, घबाड २ रखेली, उपस्त्री

**वाडोवाड**—वि मोठमोठा वाड पहा [वाड द्वि]

**वाडोळ**—पु वाढवळ पहा

**वाड्डीक**—पु (गो) लग्नसमारंभ

**वाढ**—स्त्री १ शरीराची उत्तरोत्तर होत जाणारी वृद्धि, आकार मोठा होणें, जाडें होणें २ आधिक्य, प्रमाणात, मापात,

संख्येंत अधिक भरणें, वाढावा ३ व्याज, वाढावा ( उसनें धान्य वगैरे परत देताना जें अधिक देतात तें ) ४ –स्त्रीन मोड यण्याची जागा; डोळा, अकुर फुटण्याचें स्थान ५ –न ( वाढें ) उसाचा अग्रभाग, शेंडा –वि उच, थोर, मोठा 'क्री उपासकाची वाढ कीर्ति। विस्तारली।'–दा १७१२ [सं वृध्‌–वर्ध्; प्रा वड्ढ] वाढआर्विज, वाढाविज–स्त्री भ तलावणीची अखर, शेवट आर्विन पहा वाढणी–स्त्री वाढ, मोठें होणें, उच होणें, वाढणीस लागणें, वाढ लागणें [वाढ] वाढणें–अक्रि १ मोठें होणें, आकार, उंची, सख्या वगैरे अधिक होणें २ वय, काल इत्यादींनीं प्रगत होणें, पक्व दशाप्रत जाणें ३ पुढें जाणें, हल्ला करणें, समोर जाणें, चालून जाणें 'राउळापुढें वाढत। राजवाहन पुष्पाळित।'–शिशु ५३० 'पवार कहींसे पुढें वाढून गेले' –भाव ११५ ४ ( प्रत्यक्ष उच्चारानें येणारे अशुभ टाळण्याकरिता स्त्रिया वगैरेमध्यें रूढ ) कमी होणें, नाहींसें होणें, सपणें, खर्च होणें ( कुकु इ० ) ५ वारविलें जाणें ( धान्य ) ६ अगात येणें, सचार होणें ( देव, भूत, पिशाचादिकाचा ) –आडिवऱ्याची महाकाली १०३ [स वृध्‌–वर्ध्, प्रा वड्ढ; हिं बढना, व बदिवा उरि बढिवा, सिं गु वधणु–वु] वाढणें वर्तणें–अक्रि सामान्यत वाढणें व राहणें, आयुष्यक्रम चालविणें 'तुमच्या अन्नावर वाढलों व वर्तलों तो मी तुमचाच आहें' [वाढणें+वर्तणें] वाढता–वि १ वाढत जाणारा, पूर्णतेस जाणारा, मोठा होणारा २ अधिक होत जाणारा, वृद्धि पावणारा उदा० वाढता धदा–रोजगार–चाकरी–मुदत–बुद्धि–लक्ष्मी–राज्य–कळा ३ शुभदायक मंगलदायक म्हणून वर्तोळा दिलेला [वाढ] वाढत्या अंगाचा–वि १ जलद वाढणारा, मोठा होणारा उच होत जाणारा २ सैल, ढगळ वाढला तरी अगास येईल असा ( कपडा वगैरे ) वाढता चुडा–पु बागडया भरल्यावर शुभदायक म्हणून कासार जी अधिक बागडी भरतो ती वाढती–स्त्री १ मुलाच्या उचीस शुभदायक शब्द ( अमगल टाळण्यास ) २ वाढदिवस 'कीं वाढती करिती उल्हासें। उभविती गुढिया।'–ज्ञा ९५१२ वाढदिवस–दीस–पु जन्मदिवस, जन्मदिनीं करावयाचा विधि समारभ ( प्रारभीं मुलाच्या प्रत्येक महिन्याच्या जन्मदिवशीं हा विधि करतात व एक वर्षानतर वार्षिक करतात ) वाढवण–स्त्री १ वाढण्याची, अधिक होण्याची क्रिया २ वृद्धि वाढ, बढती ३ सपणें खलास होणें; खुटणें ( अभाव, नाश वगैरेचा प्रत्यक्ष निर्देश अशुभसूचक मानून त्याअर्थी उलट वृद्धिवाचक शब्द योजतात ) ४. केरसुणी, खराटा [स वर्द्धनी] वाढवणें–विणें–उक्रि ( वाढणें प्रयोजक ) १ मोठें करणें, अधिक करणें, विस्तृत करणें २ वाढण्यास लावणें, पालनपोषण करणें; सभाळणें ३ फुटणें ( बागडी वगैरे ), सपणें; खुटणें, नाश पावणें ( अशुभ निर्देश टाळण्याकरिता कुकु, बागडया वगैरेसबधीं ) ४ आखडणें, पाखडणें, वारवणें ( धान्य ) [स वर्धापनम्] वाढवा–पु वाढ, वाढलेला भाग, जास्तीपणा वाढविणें वर्तविणें–उक्रि पालनपोषण करणें, लहानाचा मोठा करणें, सभाळ करणें वाढवा–वाढव–स्त्री १ विस्तार, आधिक्य, वृद्धि करणें ( औत्सुक्य, पुरस्कार, नेट प्रगति इत्यादि ध्वनित होतात ) २ ( ल ) चेतवणी, भडकविणें, वाढविणें ( कलह, भाडण, तटा, आग ) वाढदीस–पु वाढदिवस, जन्मदिवस, वर्षगाठ वाढिनणें–निर्णें–ष्णें–क्रि वाढणें पहा 'यादव प्रतापतरु, वाढिनला।'–शिशु २ 'त्यावरी वाढिनली तृणजाळी।'–मुवन १५७६ वाढी–स्त्री १ वृद्धि वाढ २ उसना घेतलेला धान्यादि पदार्थ परत करावयाच्या वेळीं अधिक द्यावयाचा तो, व्याज ३ पातळ पदार्थ वाढण्याचें तोटीचें भाडें, झारी [वाढ] ०दिढी–स्त्री उसनें धान्यादि दीडपटीनें परत द्यावयाचा करार, रिवाज, रीत ०मोडी–स्त्री चढउतार –शर ( वाप्र ) उसात जाऊन वाढें आणणें–समृद्धीच्या स्थळाहून क्षुद्र वस्तु आणणें वाढीव–स्त्री थोरपणा, बडेजाव 'वाढिवेच्या गोष्टी बोलती। घाय घालिती अधर्में।'–रावि १९११५. वाढणीस, वाढीस लागणें–१ उच, रुंद, लठ्ठ होऊं लागणें २ खुटलेली वाढ पुन्हा सुरू होणें

वाढई वाढी–पु ( व ) सुतार बढई पहा 'देवदत्त नामें वाढई।'–पच १४० [स वर्धकि] वाढकाम–न सुताराचें काम, धदा

वाढकर–री–वाडकर पहा

वाढखो–वाडखो पहा

वाढण–णें–न १ पात्रावर अन्नादिक ठेवणें, जेवणाऱ्या मडळीस अन्नादि पदार्थ पुरविणें, देणें, पानावर घालणें, असें वाढलेलें अन्न २ •हाणवलीसाठीं जें पान वाढून आप्तादिक आणतात तें जेवावयास न आलेल्या व्यक्तीस अन्न वाढलेलें पात्र पोंचवितात तें ३ नोकरचाकर वगैरे लोकास जें अन्न वाढून देतात तें [का बडिसु] वाढणी–स्त्री १ अन्नादि वाढावयाचें भाडें, पात्र, वेळणी २ वाढण्याची क्रिया, वाढप 'सर्वांचा समाचार घेतात व वाढणीवर लक्ष ठेवून '–पुरवणी ऐरापुप्र २१७ वाढणें–उक्रि १ ( जेवणारास अन्न ) वाटणें देणें, घालणें २ ( दिव्यात तेल झाडास पाणी वगैरे ) घालणें, पुरविणें ३ ( भिक्षेकऱ्यास भिक्षा ) टाकणें, घालणें ४ सोडणें टाकणें, लोटणें समय हा मज काळाच्या मुखात वाढील।'–मोकर्ण २८४८ वाढून ठेवणें, वाढून ठेवलेला असणें, होणें–तयार असणें, वाट पहात असणें ( दुःख, सकट, त्रास इ ), दत्त म्हणून उभें असणें वाढून येणें–एकामागोमाग येणें, एकापाठीमागून एक येणें ( आजार, क्लेश, दुर्दैव वगैरे ) वाढता–वि. वाढपी म्ह० वाढल्यापक्षां

चढाहता गोड **वाढप**–न १ वाढण्यासाठीं घ्यावयाचे पदार्थ, जेवण्याचे पदार्थ २ वाढण्याची क्रिया, वाढण **वाढपी-प्या**–पु वाढणारा, जेवतांना खाद्यपदार्थ पानावर घालणारा **वाढलें**–न. वाढण अर्थ २, ३ पहा.

**वाढणी**—स्त्री केरसुणी, वाटवण पहा

**वाढवेळ, वाढुवेळ, वाढोळ**–पु उशीर, दीर्घकाल, पुष्कळ वेळ 'वाढवेळ बहु झाले यदैसच्या मल भेदे।'–दप ३३ 'मीं वाढुवेळ करितों किति फटशोपा।'–हरिराज मुद्गला यांचे भाषांतर २५ **वाढवेळ-ळा**–क्रिवि दीर्घकालपर्यंत, उशीरां, फारवळ 'जळीं राहिला वाढवेळ। तेव्हां विसर्जिली लीळा।'–कथा ४ ६ १३२ [स वृद्ध+वेला]

**वाढळ, वाढाळ, वाढाळू**—वि जलद वाढणारें, वाढलेलें (झाड, रोप प्राणि), भारीची (जमीन) [स वर्धाउ]

**वांढा**—पु वीण, प्रजा, संतति, अवलाद, विजवट, विस्तार (गुरेढोरें प्राणी यांचा) **वाघाचा वाढा वाढत नाहीं**–दुष्ट मनुष्याचा उत्कर्ष होत नाहीं

**वाढाघरचा**—वि नादल्या घरातील, मुलें, लेकरें वगैरे आहेत अशा घरातील 'सवुणाला काय करावें वाढाघरची सुन जेवू घालावी'–धरित्रीची कहाणी

**वाढाचार**—पु पाल्हाळ, विस्तार 'उगीच वाढाचार लावीत बसू नको.'

**वाढावा**—वाढवा पहा

**वांढाळ**—विक्रिवि (व)' १ वाकडें, समप्रमाण नसलेलं, सरळ रेषेंत न चालणारें 'वाक वाढाळ चालते' २ तेढ्या स्वभावाचा; वाकडा वागणारा 'वाढाळ माणूस आहे'

**वाढावज**—स्त्री वाढआविज पहा

**वाढी**—पु १ सुतार वाढई पहा २ सुतार नावाचा पक्षी. [स वर्धकि]

**वाढें**—न १ वाढ, उसाचा शेंडा, अग्र २ आचळ्या दरा, दोन लुगड्यामधील न विणलेला भाग

**वाढोळ-ळा**—वाढवेळ पहा 'मग वाढोळा उमजला।'–कथा ६ १५ ५२

**वाण**—पु १ वर्ण रग 'साजत मेघा ऐसा वाण।'–कीर्तन १ ७५ म्ह० दवळ्या शेजारी बांधला पोवळा वाण नाहीं पण गुण लागला २ नमुना प्रकार तऱ्हा लुगड्याचा वाण 'धर्मी या नामपाठाच। वाणे सारी।'–ज्ञा १८ ६०३ ३ बाजू तेथा कुसाचा यक वाणीं।'–लिपु २ ४४ ४१ [स वर्ण, प्रा वण्ण] **०चोर**–वि आपलें खरं स्वरूप लपविणारा, वेषधारी ढोंगी **०टाळ**–वि विटका, रग, चेहरा चर्या उतरलेला, निस्तेज, फिका (रत्न, मोती) **०पालटण**–स्त्री १ वर्णपालट 'श्रीकृष्णासी वाणपालटण। नामरूपाचें वाम संपूर्ण।'–एरुस्व १६.१५४ २ रग, चर्या, छटा बदलणें (चढता सोनें, मोतीं, हिरे यांचा) **वाण मारणें**–कळाहीन होणें, निस्तेज होणें, फिक्कें पडणें नि सत्त्व असणें 'आज घोडा वाण मारल्यासारखा दिसतो' **०मान्या**–वि निस्तेज, फिका; उतरलेल्या चेहऱ्याचा; दुर्मुखलेला **वाणलग, वाणेलग**–वि अनेक रंगांचें, मिश्रवर्णी, पचवर्णी 'वानल्यां पत्राचे वोसाडे।'–ऋ १४२३ 'वरि शिरा जाळ उमटे। वाणेलग।'–भाए २०२ **वाणवती**–स्त्री वर्ण, छटा 'ना तरी पण्ढरेया वाणवती।'–शिशु २९ [वर्ण]

**वाण**—न वायन, व्रताच्या सांगतेकरिता ब्राह्मणास सूप, खण, तांदूळ वगैरे साहित्य देतात तें 'कां वाण धाडिजे घरा। वोवसियाचें।'–ज्ञा १७ २८६ [स उपायन] **सुन्या घरीं वाण देणें**–निरुपयोगी स्थानीं सामर्थ्य वेचणें, बफायदा सत्कृत्य करणें, विनाकारण मोठें कृत्य करणें, दिमाख दाखविणें **वाणक**–न वायन वाण पहा 'सर्वस्व समर्पाया धर्मासि ब्राह्मणासि वाण करें।'–मोविराट ६ ७७ **वाणवसा-वंसा**–पु व्रत, नियम, उपासना 'अनन्य भावें शरण तुला स्वधर्म अमचा वाणवसा।'–प्रला ११४ [वाण+वोवसा]

**वाण**—स्त्री न्यूनता, कमीपणा; उणीव, तूट, टंचाई, कम तरता 'तयाची न वाण।'–विक ५ [उणा, ऊन=न्यून] **वाणि-णी**–स्त्री उणीव, वाण पहा 'तया प्रेमळासिगा काहीं। या कथामृताचि वाणि नाहीं।'–रास ३ २८७ 'शालिप्रदानीं न करुनि वाणी।'–वामन नृहरिदर्पण **वाणेपण**–न न्यून, कम तरता, उणीव वाण पहा 'न करी अवधानाचें वाणेपण।'–ज्ञा १८ ५९४ [वाण]

**वाण आमत्रण**—सर्वसाधारणपणें निमंत्रण आमंत्रण पहा

**वाणका**—वि धवल्कट, धडधाकट दणगट, धडोतीच्या उपयोगी (वस्त्र) [वाणा]

**वाणकी**—वि ल्हान तगायास तुझी तनु वाणकी रे।'–वामन, विराट ७ १५५ [वाण=न्यून]

**वाणगी**—स्त्री १ वानगी, नमुना 'म्हणती वाणगी भक्षाहो।'–मुआदि २९ ८७ २ भाजीपाल्यावरील एक कर 'शव सवजी व वाणगी देशमुखाचे निमे करार केली असे'–वाडबावा १ ३ [वाण]

**वाणणें**—क्रि वर्णन करणें, वाखाणणें, स्तुति करणें, प्रशंसिणें 'ते कवि वाणिजे चोखीं। श्रीकृष्ण मूर्ति।'–शिशु ३६७. 'चित्रकें परी गोचर केल्या। परी वाणिल्या परीक्षिकीं।'–मुआदि २५ ९१ [स वर्णन]

**वाणणें**—क्रि वाणणें, ठसण, प्रवेशणें 'योगियाचें परम भाग्य। आंगीं वाणे तें वैराग्य।' –दा १ १ ३१ (धुळें प्रत) [वाणणें]

**वाण धरणें**—क्रि. (राजा) कुणब्यांनीं पाऊसकाळ संप ल्यावर पहिल्यादा जोंधळे टाकून मासे धरून वेतााळास परडीचा नैवेद्य करणें –आदिवन्याची महाकाली (प्रस्तावना) ७

**वाणशी**—स्त्री (कु) माजघर

**वाणसी**—स्त्री वेश्या, पण्यागना 'वाणसियेचे उभले। कोण न रिग।' –ज्ञा १३ ७०० [स वणिक्+स्त्री]

**वाणा**—पु वस्त्रातील आडवा दोरा, सूत, वाणा 'दुग्धा क्षीरोदकीं। वाणे परी अनेकीं' –अमृ ७ १४७ [स वाणि= विणणें, माग] ०**ताणा**–पु वस्त्राचे आडवे उभे ततू

**वाणा**—पु सूसाचा एक हात, बाजू –खिपु २ ५०

**वाणिणी धनगरणी**—स्त्री एक मुलींचा खेळ –मखेपु २४१.

**वाणी**—स्त्री १ वाचा, भाषण 'जयाची सर्वे पूर्ण वेदात वाणी।' २ जिव्हा, रसना –ज्ञा ९.८१६ 'जेवीं वाणी न शके चाखों।' –अमृ ७ ११३ ३ वाक्‌देवता, सरस्वती 'मग मुख विवरामध्यें घटकरणाऱ्या सुरार्थे ते वाणी। शीघ्र पितामह वाक्यें शिरे गुहेमाजि संचले वाणी।' –मोरामायण १ १३८ ४ भाषा 'त्या शूर पूर्वजाची तुमच्याहि चालवी लशा वाणी।'

**वाणी**—शअ (कुण) सारखें, प्रमाणें, सदृश 'कुरुश्रेष्ठकांत मिसळला तोहि धनजय (अर्जुन) धनजया (अग्नि) वाणी' –मोकर्ण ४९ ७०. [स वत]

**वाणी**—स्त्री जोंधळयाची एक जात याचा हुरडा नरम असतो हिचे प्रकार –मालटी, चपटी, आधळी शिंगी, दुधी, पिवळी हळदी, दगडी इ०

**वाणी**—पु व्यापारी, वैश्य, दुकानदार [स वणिक्] समासात वाणी शब्दाचें पूर्वपदीं वाण असें रूप होतें सामाशब्द– **वाणकूट-गट-गड** पु (तिरस्कारार्थी) वाणी **वाण जिन्नस**–पु वाण्याकडील माल, किराणा, वाणसवदा [वाणी+ जिनस] **वाणपण**–न वाणीपणा, व्यापार **वाणपसारा**–पु १ वाण्याच्या दुकानातील माल, वाणजिनसाचें प्रदर्शन २ (ल) तन्हेत हेची व विस्तृत माडणी, एखाद्या कार्यातील अनेक गोष्टींची वस्तूंची माडामाड, प्रदर्शन रचना ३ अव्यवस्थित रचना, अस्ता व्यस्तपणा; गोंधळ ४ (बायकोचा) प्रसूतिसमयीं घोटाळा, अड चण, कठीण परिस्थिति (क्रि० पडणें) **वाणसवदा-सौदा**–पु हिंगजिरें इत्यादि वाण्याच्या दुकानातील जिनस, वाणजिनस, किराणा माल [वाणी+सौदा] **वाणिज्य-ज**–न व्यापार, उदीम, वैश्यवृत्ति 'गौरक्ष्य वाणिज्य कृषि।' –दा १४ २ १८ –ज्ञा १८.९१३ **वाणिया**–पु वाणी पहा व्यापारी **वाणी** ०**उदमी-वकाल**–पु (व्यापाक) व्यापारी, दुकानदार, क्रयविक्रयादि व्यवहार करणारा ०**वैलकरी**–पु बैलावरून वाहतुक करणारे –मसाप २ २ ३० ०**वेव्हार**–पु (साकेतिक) कर्ज. ०**शाई**–वि वाण्याच्या पद्धतीचें, एका विशिष्ट तऱ्हेचें

**वाणी**—पु एक किडा 'टोळ, झुरळ, पुगळ वाणी।' –दावि २४४.

**वाणीकिणीचा, वाणीतिणीचा, वाणीदेणीचा**—वि. बहुमोल, महागाईचा, दुर्मिळ, नवससायासाचा 'त्याचाही वाणीतिणीची एवढीच मुलगी।' –(शेक्सपियर नाटकमाला) रोमिओजुलिएट

**वाणें**—क्रि वाजणें, वाजवणें 'वाती सिंगे पावे।' –तुगा २३०, सुछद टाळघोळ वातु।' –दाव ८४ 'तेथ गाती वाती।' –शिशु ३४९ [स वान=फुंकलेला ?]

**वाणें**—क्रि वाहणें, अर्पण करणें 'महातपाचा पाउड वाइजे।' –शिशु ११३ 'मग मृगी सुताचे जुमार। वाति कामिनी।' –भाए ४३८ 'सवर्गा वाती वाकुलिया।' –ज्ञा ७ १९० [वाहणें]

**वाणें**—न वाहन 'टका मयूराचें वाणे।' –उषा १२२ ८१.

**वाणेउमट**—पु नाना प्रकार वाण पहा –दरो

**वाणेरा**—पु कर्न वाणीवेव्हार पहा 'मुद्दल देउनि वाणेरा फेडिजे।' –ज्ञागा ९१७

**वाणोवाण**—पु वाण जिनस, माल –तुगा ४४३२ [वाणी+ वाण]

**वात**—पु. १ वायु, वारा, हवा २ शरीरातील तीन धातू पैकीं एक, त्रिदोषापैकीं एक ३ सधिवात, पेटका, वळ वगैरे (क्रि० येणें) [स] ०**चढणें**–वाताचा पटका येणें, वातोन्माद होणें सामाशब्द– ०**कंटक**–पु त्रिदोषापैकीं वातविकाराचा प्रकोप, सुग्या येणें, हुळहुळणें ०**कफज्वर**–पु वात व कफ याच्या प्रकोपामुळें येणारा ताप ०**कोश**–पु (शाप) माशाची पिशवी, (या पिशवीमुळें माशास पोहता येतें) ०**गुल्म**–पु सधिवात रोग पोटातील वायु पोटशूळ वगैरेसहि हा शब्द लावतात ०**चक्र**–न १ झझावात वावटळ, भोंवरा २ वातावरण ३ पृथ्वीभोंवतीचा अवकाश, अतरिक्ष वायुलोक ०**ज्वर**–पु त्रिदोषापैकीं वात कुपित झाला असता येणारा ताप ०**नलिका**–स्त्री (शाप) अष्ठवश प्राण्याच्या शरीरातील वायुवाहक नळ्या ०**पित्तज्वर**–पु वात व पित्त कुपित झाल्यामुळें येणारा ताप ०**पूरक यत्र**–न (शाप) जोरानें वारा भरण्याचें यत्र (इ) फोर्सपप. ०**प्रकृति**–स्त्री वातुळ, वातप्रधान शरीर वात धातूचें आधिक्य असणारें शरीर ०**वर्द्ध**–वि वातुळ, वातप्रधान, फोपशा. ०**रक्त**–न १तीव्र सधिवाताचा विकार; दूषित वायूच्या योगानें सचित रक्ताचा विकार –योग २ २ २ रक्तपित्ति, महाव्याधि 'वातरक्त कपरक्त।' –गीता १३ २४९७ ०**रोग**–पु सधिवात, पेटके,

पित वातदोष ०रोगी–वि वातरोग झालेला ०विकार–पु वातरोग ०विध्वंस–पु वातविकारावरील रसायन, वायूची मात्रा ०व्याधि–पुस्त्री वातविकार ०शूल–पु पोटशूळ, वायगोळा, पेटका ०श्वासी–वि (शाप) वायूने श्वासोच्छ्वास करणारे, श्वसन करणारे, हवा आंत घेऊन बाहेर सोडणारे (प्राणी) वाताकर्षक यंत्र–न वायु ओढून घेणारें यंत्र वाताकृति–वि चपल, वेगवान् 'अश्व मिरवले वाताकृती।'–नव११ ६३ [वात+आकृति] वातात्मज–पु १ मारुति २ भीम वाताम्बुपर्णाशन–वि वायु पाणी व पाला यावर निर्वाह करणारे –एभा १४ २५६ [वात+अंबु+पर्ण+अशन] वातायन–न खिडकी; झरोका, गवाक्ष [स वात+आयन] वातासन–न एक योगासन, दोन्ही पायांचा चवडा उजव्या मांडीवर ठेवून खुब्यावर टेकून उभे राहणें –सयोग ३३५ वातावरण–न १ पृथ्वीच्या भोंवतालचें वायूचें वेष्टण २ (ल) परिस्थिति सभोवतालची स्थिति 'पुण्याचें वातावरण हल्ली बरेंच स्वच्छ झालें आहे'–कले २ २४ [स वात+आवरण] वाताशा–पु सर्प; दोष –वि वायुभक्षण करणारा 'आगे काजळ डोंगरु उमचला वाताश सेवी भला।' –गस्तो ८४ वातूल–न वावटळ वादळ, भोंवरा वातिक–वि वातजन्य, वातदोषामुळें उत्पन्न होणारा वातूल–ळ–वि १ वातकारक, ज्यामुळें वातविकार उत्पन्न होतो असा २ वातप्रकृतीचा, फोपशा वातानें फुगलेला [वात] वात्या–पु वादळ वावटळ 'जसा पर टिको न दे वात्या।'–मोकर्ण ११ ५४ [वात] वातोदर–न वातयुक्त उदररोग, गुबारा वातोन्मान–न वायुभारमापक यंत्र वातोर्मि–स्त्री वाऱ्याची शुद्रक लाट लहर

वात–स्त्री १ वत्ती दिव्यातील कापसाची, सुताची पेद्र देवापुढें लावावयाच्या निरनिराळ्या फेऱ्याच्या वळया उदा० बोटवात–१ सुत वेल्वात–३ सुतें विष्णुवात–५ सुतें माणिकवात–१सुत रुद्रवात–११ सुतें पुरुषोत्तमवात–१५ सुतें गणेशवात–२१ सुतें गोकुळवात–८ सुतें रामवात–१२ सुतें शिवराववात–१००० सुतें इतर वाती–फुलवात काडवात, पचरत्नवात अनंतवात, अधिक वात 'घरोघरीं दीप अखंड त्याच्या सरसावुनि वाती।'–घनशामाची भूपाळी २ कोवळें बारीक पडवळ शेंग, काकडी वगैरे ३ (ल) (नाविक) गुंडाळलेलें शीड ४ दिव्याचें नाक निमूळता भाग समईतील वाती ठेवण्याची जागा ५ तेल्वात या शब्दाचें संक्षिप्त रूप नंदादीपासाठीं लावून दिलेली जमीन ६ (ल) दिवा 'रश्मि वातीविण न देखती।'–ज्ञा ९ ३०१ [स वर्ति] ०दोरा–पु गाभण प्राण्याच्या योनींतून स्रवणारा चिकट द्रव ०पोत–पु (दिव्याची वात व देवीचा पोत) (ल) सरळ सडसडीत, किरकोळ, बारीक व लांब वस्तु 'अवयव आकृति खिली वातपोतसारखी। निवडणार निवडील असे जो रत्नाचा पारखी।'–पला ४ ३४ वातेरें, वातेरें, वातयेरें–न १ समईतील वाती लावण्याची खोबण 'दोन वातेऱ्यांत दोन ज्ञुळ्या वाती जळत होत्या'–कोरकि ५४ २ वाती करावयाच्या उपयोगी फडकें ३ (ल) फाटकें वस्त्र; लक्तऱ्या, चिंध्या [वात]

वांत–स्त्री १ वांति, ओक, ओकारी, ओकलेले पदार्थ २ ओकारी, ओकण्याची क्रिया 'पाटीं फळा कीजे अशाचा। वाताचे वाना।'–ज्ञा१८ १२५ ५५६ ९१९ –वि ओकलेला [स वम्]

वांत–रि ज्याच्या अखेरीस व हें अक्षर आहे असा; प्रयोजक धातु उदा० करव, निजव, बोलव, मारव इ० (कर, नीज, बोल, मार या धातूंपासून) [स व+अंत]

वातग–पु (को) बैल (तुळीचा) [स वात+अग]

वात(ता)ट–ड–वि १ चिवट, चिकट; लोचट, लवकर न सुटणारा, गुमसुशीत नव्हे असा, दडदडीत २ (ल) हेकट, हट्टी, लागट, लोचट म्ह० शेळी जाते जिवानिशी, खाणार म्हणतो वातडशी [वात] वातट(ड)णें–क्रि १ वातट होणें २ लोचट होणें वातडला–वि (ना) कृश सडसडीत

वातणें–क्रि भाजणें 'सुताल तार घोळ मोदरा। वाताती।'–दाव ३५४ [स वा–वाति]

वातलणें–क्रि (व) वातलणें; वाता मारणें

वातवेल–पु स्त्री एक मोठी वेल

वाता–पु दाराचें कुसु वात्या वात्या–पु वाता पहा १ दरवाज्याच्या फळीचें कुसु, दार फिरवण्यासाठीं दोन्ही टोंकास पुढें काढलेले भाग प्र २ (कारवारी) वात्या फिरण्याचें भोंक

वाताडें–न अचानक लाभ, वाऱ्यानें येऊन पडलेलें [वात= वायु] ०पडणें–क्रि थोडया किंमतींत पुष्कळ मिळणें, अचानक लाभ होणें [इ विंडफाल्ला प्रतिशब्द]

वाताहत–हात–स्त्री दाणादाण, पागापाग, फाटाफूट, नाश, धुव्वा; सत्यानाश, उधळपट्टी (संपत्तीची). 'सुधारणाप्रिय लेखकांनीं शास्त्राची वाताहत करून सोडली आहे'–केले ४४. –विकिवि विस्कळित, नष्ट, उधळलेलें 'नातरी गगनतरंग वाताहत जेवि दिसती।'–भाए ७१३ 'कापवूनि टिरी शूरत्वाची मात। केलें वाताहत उचितकाळें।'–तुगा २८०३ –दा ३५४९ [स वात+आहत]

वाताळ–वि (व) वाचाळ; बडबडया वात्रट [वार्ता+ळु]

वाति–स्त्री १ ओकारी, उल्टी, वमन २ ओक, ओकलेला पदार्थ –ज्ञा १८ ६२० [स वम्=ओकणें]

वातेर–तेरें वातेरपट्टी–फळी–नस्त्री दरवाजाच्या फळीचा वात्या फिरण्यासाठीं वरती फळयात बसविलेला तुकडा. [वात्या] वात्येरें–वात्या

**वात्रट-ट**—वि. वात्रट-ड पहा. १ निरर्थक; ओंगट. २ (ल.) निर्लज्ज; वाचाळ. 'माझे बोलणें वात्रट । बाबा मानूं नको धीट।'-भज ६६६.

**वात्सल्य**—न. मुलाविषयींचें प्रेम, कौतुक, मायाळूपणा, स्नेह; लाड. (सामा.) ममता; प्रेम. [सं. वत्स]

**वात्सी, वात्सी**—स्त्री. दक्षिणभाग; ओटीपोट; पोटाखालचा भाग. [सं. वस्ती]

**वायंग-ग्या**—वांयग-ग्या पहा.

**वायरणें**—क्रि. (कुणबी. राजा) पसरणें; अंथरणें. [सं. वि+आ+स्तृ]

**वाया**—पु वाता-ग्या पहा.

**वाया-व्या**—पु. बस्तिभाग, ओटीपोट. 'बाईनें डाविले गन्दवार स्थान। थिरुटें घालून वाफयाला।'-तुगा २८७५. [सं. बस्ती]

**वाव्या**—पुणीभर बाबा या शब्दाएवजीं त्याचअर्थी वापरतात. **वाव्या सुटणें, वठविणें**-निरर्थक वाद करणें; रिकामा वाद घालणें; बाष्या सुटणें. बाध्या पहा.

**वाद्**—पु १ चर्चा; खल; वादविवाद 'ऐसा प्रतिपादनामाजीं वादु।'-ज्ञा १०.२२६. २ भांडण, कलह; तकरार. ३ संभाषण; मुलाखत; बोलाचाली; वाटाघाट. ३ वर्तमान, वार्ता, ऐकीव बातमी; प्रवाद. 'आम्ही नेमानुरूप हरितिथि करितों त्या वृथा वाद पांचा।'-मोअंबरीष २० (नवनीत पृ. ३६२). ४ फिर्याद, दावा; कज्जा. ५ (ल.) गुन्हा, अपराध. 'तुमचा काय वाद केला।'-ऐपो ३४. ६ संज्ञा; नांव. 'ऐसी कोण्ही एकी दशा। तिये वादु अज्ञान ऐसा।'-ज्ञा १४ ७९. [सं. वद्=बोलणें] ०सांगणें-क्रि. आव्हान करणें; बरोबरी करणें, स्पर्धा करणें. 'अजगव शार्ङ्गांसीही स्वचळें सांगेल वाद धर्मातें।'-मोकर्ण २४.१८. ०क-वि. वाद करणारा; वादी; द्वंद्वी. 'मनहि चचळ वादुकें।'-ऋ ५५. 'गेटीं वादकें अचाटें।'-दा ३.९.५५. ०ग्रस्त-वि. १ ज्यासंबंधीं फिर्याद चालू आहे असें. २ तंट्यांतील, वादांतील, भानगडींचें. ०चंचु-चू-वि वाद करण्यात चतुर, निष्णात; वादकुशल. 'शेंकडों ग्रंथांचें अध्ययन करून मोठा वादचंचू किंवा महान् ग्रंथकार झाला.'-नि ४८. ०ट-वि वाद करणारा; भांडखोर. 'आत्महत्यारी धीट वादट'-कृमुरा १५.६४ ०प्रतिवाद-पु १ उलटसुलट बाजूंनीं चर्चा; पूर्वपक्ष उत्तरपक्ष करून होणारा वाद विवाद, खल. २ संभाषण, संवाद, बोलणें, वाटाघाट ०वळ-पु तंटयास उत्तेजन. 'उपरोधु वादवळु। प्रतिताप झाळु।'-ज्ञा १३ २७० ०विवाद-वेवाद-पु चर्चा, खल, भवति न भवति, वादप्रतिवाद 'जनीं वादवेवाद सोडूनि यावा।'-राम १०९ **वादानुवाद**-पु १ चर्चा उलटसुलट प्रश्नोत्तरें, पूर्वपक्ष उत्तरपक्ष करून खल. २ (कायदा) फिर्याद आणि प्रतिपक्षाचें उत्तर; मूळ तकरार व तीवर उत्तर **वादावादि-दी**-पुस्त्री. वारंवार, मोठी चर्चा; वादविवाद. **वादाळू**-वि. वादग्रस्त पहा. **वादी**-वि. १ भांडखोर, भांडकुदळ; तंटेखोर; हुज्जत घालणारा. 'वादी अथवा भेदा ऐसा सेवक कासाला।'-स्फुट पदें (नवनीत पृ. ४५१). २ (अशिष्ट) वैरी; शत्रु.

**वाद्**—स्त्री. (प्र) वादी. चामड्याची पट्टी; (वहाण इ०करितां) **वादडणें**-क्रि. वादी, पट्टा इत्यादींनीं मारणें **वादडा**-पु. थप्पड; थपाटा, थापटी; रट्टा. [वादी] **वादाडणें**-उक्रि. वादडणें; वादीनें, चाबकानें झोडपणें; फटके मारणें. [वादी] **वादाडा देणें**-(माण.) थप्पड मारणें; ठोकणें.

**वाद्**—पु बधिरता; जाडय (गात्र इत्यादींस आलेलें). [वात]

**वाद्**—स्त्री. (रा.) आठवण, स्मरण. [याद]

**वादगार, वादगारी**—वि. स्मारक, आठवणीचा; स्मृतिदर्शक. 'जो उपकार आपण करितील तो आपलें नाव राहील वादगारी.'-रा ६.६०२. [फा. यादगार-री]

**वादंग**—पु वादविवाद, चर्चा. 'हा रिकामा वादंग नकोच आहे मुळीं।'-मावं ५९. [वाद]

**वादघाई**—स्त्री. (प्र.) वायघाई पहा.

**वादट-ड**—वि. सर्द, दमट; ओलसर होवोनें दूषित.

**वादणा**—पु. (प्र.) वावणा, अवघणा पहा.

**वादडणें**—उक्रि. १ धूर्तपणानें एखादी गोष्ट मिळविणें, संपादन करणें; लाटणें. २ बलात्कारानें, धाकधानें एखादी गोष्ट करणें. [सं. अद्]

**वादन**—न. १ वाजविणें; शब्द काढणें. २ वाद्यादिकांतून सूर काढण्याची क्रिया. 'गाण्याची साथ करणें. गायनाची निर्जीव पदार्थापासून तयार केलेल्या यंत्रानें केलेली नक्कल.'-संगीत शास्त्रकार व कलावंतांचा इतिहास. **वादक**-वि. १ वाद्य वाजविणारा. २ शब्द करणारा, बोलका. 'फेडुनि जन्माची जवनिका। वैखरियेतें करी वादका।'-भाए ५०४. [सं.] **वादित**-वि. १ वाजवलेलें. २ म्हटलेलें, सांगितलेलें. **वादित्र**-न. १ वाद्य; वाजंत्री. 'वादित्राची होतसे थोर घाई।'-सारुह २ ४१. [सं.]

**वांदर, वांदरखट, वांदर तेल इ०**—वानर इ० पहा.

**वादलें**—न. (जरतार) चपटें केलेलें धातूचें सूत. [वादला]

**वादळ**—न १ वावटळ, झंझावात, तुफान, वायुक्षोभ. २ (ल.) संकट [सं वातुल, दे. वाद्दल, प्रा वद्दल, हिं बादल]

**वादळणें**—अक्रि क्रोधानें मोठ्यानें बोलणें, उसळणें; अंगावर धसरणें, शिवीगाळ करणें

**वादा**—पु रोगाची साथ; गुराचा भयंकर आजार; मरी; मर. [सं. बाधा]

वादा—पु. १ वावराचा फटकारा. २ मोठा चामड्याचा पट्टा; मोठी वादी. [वादी]

वादांग, वादांग्या—वाधंग, वाधंग्या पहा.

वादाडणें—सक्रि. गट्ट करणें; खाणें, फन्ना करणें. वादडणें पहा. 'किती मोळख्या वादाडल्या.' [सं. अद्=खाणें ?]

वावाळणें, वादळणें—अक्रि. १ दमट हवेनें शेपट होणें; सर्द होणें. २ तुफानांत सांपडणें; झंझावातानें नाश होणें; वादळानें पडणें वगैरे. (झाड वनस्पति इ०)

वादी—स्त्री. चामड्याची पट्टी, दोरी, नाडी; पखवाजाच्या दोवटी लावावयाची चामड्याची पट्टी; तबला, डग्गा आवळण्याची पट्टी. [सं. वार्धी; प्रा. वद्धी] ०फोडें-कुटें-फोडें-न. चामड्याचें बेटाळें. वादीचें कोडें; सच्छिद्र वादीचा जुगार. 'नाडेल जो वादीकोडें।'—अमृ ७.११६.

वादी—पु १ तकारी; वाद घालणारा; भांडखोर. २ वादांविषयीं उत्सुक किंवा वादांत कुशल. ३ फिर्यादी; अग्रवादी, कोर्टीमध्यें प्रथम कब्जा मांडणारा; दावा मांडणारा. ४ वैरी; शत्रु. ५ मांत्रिक; मंत्रवादी. 'वादी म्हणेल उरविन बाधा घालीन रामरक्षे मी।'—मोविराट ६.६९. ६ विशिष्ट तत्त्व, मत इत्यादींचा पुरस्कार करणारा. उदा० द्वैतवादी; अद्वैतवादी. 'वेदात्मवादी घे नर। न जाणती ते परमेश्वर।'—ज्ञे ५७४. ७ बोलका; बोलण्यांत चतुर; वक्ता. ८ (संगीत) रागांतील मुख्य स्वर. [सं. वद्=बोलणें]

वादीक—न वाद्याचें काम, वह्याणेचें शिंकें; वह्याणेचा वाद्यांनीं केलेला वरचा भाग. [वादी]

वादें—न. वादा पहा.

वादेली—वि. (कु. कों.) १ वाद घालणारा; तकारी; भांडखोर. २ एका पक्षाचा, तर्फेचा, बाजूचा.

वादो—पु. (कु.) वादा पहा.

वाद्य—न वाजविण्याचें, आवाज काढण्याचें एक साधन, ध्वनि उत्पन्न करण्याचें साधन, हत्यार उदा. चर्मवाद्य, तंतुवाद्य, रणवाद्य इ०. याचे प्रकार—तत, सुषिर, अवनद्ध आणि घन. [सं.] ०घाई—स्त्री. अनेक वाद्यांच्या आवाजाचा नाद, वाद्यांची झड, अनेक वाद्यांची धुंवड, गर्दी.

वाधंग—पुन. झाल्यागेल्या गोष्टीबद्दल निष्कारण धुसफुस, कुरकुर; चिडखोरपणाची वटवट; कुत्सितपणाची टीका; आढेवेढे; वितंडवाद; दगदग. (क्रि० लावणें, मांडणें; सांगणें; घेणें, घालवणें; करणें) 'हा रिकामा वाधंग तुला सांगितला कोणीं.'—खरादे ६८. [सं वाद] वाधंग्या—वि. वाधंग लावणारा; नेहमीं धुसफुस करणारा, हरकती सांगणारा, हुज्जतखोर.

वाधणा—पु. अवधणा पहा.

वांधा, वांधें—पुन. देण्याघेण्यासंबंधीं वादविवाद, तंटा; तकार; भानगड. वांधा पहा.

वांधा—पु. मिरचीवरील एक रोग. —कृषि ५५०.

वाधांग-ग्या—वाधंग-ग्या पहा.

वाधावणें—न. १ वरधावा; वरागमनप्रसंगींचीं मंगलवाद्यें; आगमनसूचक वाद्यवादन; आगमनाची सूचना. 'मोहरेवीण वाधावणें। तो विरंचु गा।'—ज्ञा १३.८३७. 'सभविलीं गुढितोरणें। नगरीं जाहलीं वाधावणें।'—कथा १.१०.१६०. २ आमंत्रण; मूळ धाडणें. 'येथ प्रवृत्ति वोहटे जिणें। अमृतीं वाधावणें।'—अमृ ९.२७. 'फळलें पांडवांचें वाधावणें।'—गीता १.११६०.

वाधावा-पु. १ वरधावा; वरागमनाची सूचना. 'वाधावा सांगे रुक्मिणी।'—आद्य मराठी कवयित्री २९.३. २ आगमनवार्ता; शुभवर्तमान; वार्ता. 'तो अष्टभोगाचा कुडावा। की ऋतुरायाचा वाधावा।'—शिशु ६२३. 'पाहीं आत्मज्ञान सुदिनाचा। वाधावा सांगत या अरुणाचा।'—ज्ञा १८९०३. ३ आगमनप्रसंगीचें वाद्य; शुभवाद्य. 'वाधावे वाजली।'—वसा २८. [वरधावा]

वाधावी-पु वार्ताहर; बातमी आणणारा. 'तये वेळीं वाधावियातें। रायें हार दिधला उचितें।'—कथा ७.१०.१२९.

वाधी—स्त्री. वादी पहा.

वांधें—न. (को.) १ थांडगुळ. २ वांधा पहा.

वान्—एक संस्कृत प्रत्यय. अंतीं अ किंवा आ असणाऱ्या नामास हा प्रत्यय लागून विशेषणें होतात, व त्यांचा अर्थ तत्तद्वस्तुयुक्त असा होतो. उदा० धनवान्, भाग्यवान् वगैरे. हा पुल्लिंगी प्रत्यय आहे. स्त्रीलिंगी 'वती' असा आहे [सं. वत्]

वान—पु. वर्ण, रंग, रूप, प्रकार, तऱ्हा. वाण पहा. 'वान ते सांवळी नांव तें श्रीधर।'—तुगा ३३६४. ०सर—वि. तऱ्हेतऱ्हेचे. 'मुदियाचे हीरे। आपुलिया तेजाचे वानसरे।'—शिशु ४०३.

वान—न. (कों. गो.) उखळ. वाईन, वहान पहा.

वान—न. घटकद्रव्य (मिश्रणांतील औषधांतील). 'कांहीं कषायाच्या वानांच्या यादी घोकून पाठ केल्या.'—व्यनि ७६.

वानकी—स्त्री. (गो.) चिचोळें तारूं.

वानगी—स्त्री. १ नमूना, मासला २ कोणत्याहि पदार्थाचा थोडासा चवीसाठीं घेतलेला अंश. 'तीं होऊन इच्छ्च आंत शिरली—दे माउली वानगी।'—केक १४०. ३ जकातीच्या नाकेदारानें जकातीशिवाय कोणत्याहि मालाचा नमुन्याकरितां, चव पाहण्याकरितां म्हणून घ्यावयाचा अंश, दुकानांत विकलेल्या पदार्थाचा खंडकऱ्याकडून मालकास मिळावयाचा नमुन्यादाखल अंश. ४ भेट म्हणून आणलेली दूरदेशाची अगर दुर्मिळ वस्तु. [वाण]

वानणें—सक्रि. वर्णन करणें; स्तुती करणें, प्रशंसा करणें. वाणणें पहा. 'उदारतेसी वाय वानूं।'—एरुस्व १.८२.—ज्ञा ५.१४०.

**वानती**—स्त्री (गो) (सोनारी) उजळा, लेप [स वर्णवती?]

**वानप्रस्थ**—पु चार आश्रमापैकीं तृतीयाश्रम (गृहस्थाश्रमा नंतरचा वनात राहण्याचा काळ), त्यात राहणारा ब्राह्मण, वान प्रस्छ, वानप्रहस्त अशींहि रूपें आढळतात 'वानप्रस्थ यती सुस्नात।' –दाव १९१ 'गृहस्त्याश्रमी वानप्रहस्ती।' –दा १ ८ २४. –न वानप्रस्थाश्रम [स]

**वानर**—पुन मर्कट, माकड, काळ्या तोंडाचा, लांब शेपटीचा एक प्राणी 'सत्वर जाऊनि वनाप्रति। वानर धरूनि आणावे।' –इ ३१ १०० (अप) वादर, वानर 'अंगीकारिले वानर।' –दावि ४६ [स] ०किरण–खत–खट–न (वानरास एखादी जखम झाली असता त्याचे सर्व जातभाई येतात व त्यास सहानु भूति दाखवितात, पण प्रत्येकजण ती जखम उपडून पाहतो त्यामुळें ती बरी न होता त्यास फार दु ख होतें यावरून) उपद्रवकारक, अपायकारक सहानुभूति, दु ख कमी व्हावयाच्या ऐवजीं वाढण्यास कारण होणारे प्रयत्न, मायेचे वरून दिसावयास कमी करण्या करिता पण प्रत्यक्ष दु ख वाढविण्याकरिता होणारे सहानुभूतिक प्रयत्न ०धाड–स्त्री वानराची धाड, (ल) लुटालूट, नासाडी, उपद्रव ०चेष्टा–स्त्री १ वानराप्रमाणें केलेल्या खोड्या २ अविचाराच्या गोष्टी ०तेल, **वानरी तेल**–न (पचतत्रातील (५९) चद्रराजाच्या कथेवरून–प्रबलाच्या आश्रयानें स्वत स निर्भय समजून अविचाराची वागणूक करणाऱ्यावर आपत्ति येते यावरून) सर्वनाश, सत्यनाश (क्रि० काढणें) 'पुढें विनाशकाळें येणार भविष्य आलें तेव्हा वानरीतेलाचा जैसा प्रकार तैसा प्रकार घडला' –भाव २ ०तोंड्या–वि माकडतोंड्या, विद्रूप, कुरूप ०थेर–पुन माकडचेष्टा, चाळे, खोड्या ०दु ख–न वानर किरण पहा ०दृष्टि–स्त्री सुक्ष्म व काळजीपूर्वक पाहणें, सूक्ष्म निरीक्षण –वि सूक्ष्म दृष्टीचा ०भोजन–न वानरासारखें प्रथम तोंडात अन्न भरून घेऊन सावकाश खात, चावत बसणें ०यूथ–पुन वानराची झुंड, जमाव समूह, थवा 'तव तेथें वानरयूथ आलें।' –पच ०लाकडी–स्त्री (वानर शेकण्याकरिता लाकडें जमवितात पण तीं पेटवता न आल्यामुळें त्यास शेक लागत नाहीं यावरून) न पेटता धुमसणारीं लाकडें ०विचका–पु अनेकाचा सल्ला घेतल्यामुळें कामाचा होणारा विघाड, कामाची फुरवणा ०विच कल्या–चेंचकुल्या–स्त्रीअव वानराप्रमाणें वेडीवाकडीं तोंडें करून केलेल्या चेष्टा, वेडावणें वाकुल्या दाखविणें ०शेक, **शेकणी–शेकणीचीं लाकडें**–पुस्त्रीन (वानर लाकडें जमवितात पण तीं न पेटवताच त्याजवळ शेकण्याकरिता बसतात यावरून) न पेटणारीं लाकडें, पटावयास कठिण असणारीं लाकडें ०क्षत–न वानरखत पहा **वानरी**–स्त्री वानराची मादी, वानरीण **वान्या**–वि वानरतोंड्या किंवा वानरासारख्या चेष्टा करणारा

**वानेर–वार–न्नेर**–पुन (अशिष्ट) वानर पहा **वान्येरूं**–न (कों) वानर

**वानवटें**—न भाजकट वीं 'परी शेती वानवटें। पेरूं नये।' –विउ ७ ६४, [स वाण=अग्नि?]

**वानवणें**—सक्रि (ना) चिरणें 'आपण, साक वानवतो व धुवून शिजण्यास टाकतो'

**वानवती**—स्त्री उजळा 'साडेपधरया दिधली वानवती।' –ज्ञाप्र ४९५ वानती पहा

**वानवळा**—पु प्रथमच पिकणाऱ्या फळावर, भाजीपाल्या-वर वगैरे घ्यावयाचा कर वानगी वानोळा पहा –योमारो २. ३४१ [वान–ना+वळा प्रत्यय]

**वानवा**—पुस्त्री १ अनिश्चितपणा, संदिग्धता, शंका, सशयित स्थिति 'ग्रहगतीचीं मान नक्की कळलीं आहेत कीं नाहींत याची वानवाच आह' –टिले ४ ७७०. २ होय किंवा नाहीं, अस्तिपक्षीं कीं, नास्तिपक्षीं याची निश्चिती 'तो देतो कीं नाहीं याचा सशय ठेवू नका, कायती वानवा करून घ्या' [स वा न वा]

**वानवा**—स्त्री वर्णन, वाखाणणी [वानणें] **वानवानों**–क्रिवि वारवार वर्णन करून पुन्हा पुन्हा वर्णन करून 'वानवानों वर्णिती कीती।' –दावि ३१५ [वानो द्वि]

**वानवसा–सें**—पुन १ माजघर, मध्यगृह 'तें वानवसां आघळें। जैसें टाक।' –ज्ञा १७ १०२ २ भोजनशाळा भाण-वसा पहा

**वाना**—पु १ वान, वाण पहा विक्रीचा माल, जिन्नस. २ घटकद्रव्य (औषधातील), वान पहा.

**वानावानाचें**—वि (व) तऱ्हतऱ्हेचें, वान पहा

**वानिवसें**—क्रिवि अकस्मात्, दैववशात, यदृच्छया 'जैसा घरीं आपुला। वानिवसें वन्ही लागला।' –ज्ञा १ २५८

**वानी**—स्त्री वाण–न पहा मासला, प्रकार 'नातरी अधकाराची वानी। जैसा सूर्यो न देखे स्वप्नीं।' –ज्ञा ५ ९१, –एभा १३ ४०४ **वानेपरी**–वि नाना प्रकारची, तऱ्हतऱ्हेची. –अमृ ७ २७२ –ज्ञा ११ २८३

**वानी**—स्त्री उणेपणा, कमीपणा 'तरी कामनची का तेथें। वानी कीजे।' –ज्ञा ३ २२

**वानी**—स्त्री कस शुद्धाशुद्ध परीक्षा 'तया परिमळाची वानी धवधविली।' –शिशु ६११ –ज्ञा ९ ९६, १२ २५, –अमृ १० २७

**वानीर, वानेर**—स्त्री (महानु) पाणवेत, एक जगली झुडप 'डोहए वानेराची पेंढी।' –दृष्टातपाठ ५४

**वानोळा**—पु वानवळा पहा १ किराणा माल, वेर्ये, विक्रेय जिन्नस २ देशमुख, देशपाडे यानीं प्रथम तयार होणाऱ्या फळें,

भाज्या वगैरे पदार्थांवरील वाणगी म्हणून घ्यावयाचा अंश 'सांगितलें परी न सोडसी । घरोघरच्या वानोळ्या ।'–होला १०२ ३ नमूना, मासला ४ दूरदेशची, बहुमोल, दुर्मिळ वस्तु ( भेट म्हणून दिलेली ) [ वान ]

**वाप**—पु पेरा, पेरणी, धान्य रुजत घालणें [ स वप्=पेरणें, वाप ] –स्त्री ( कों ) नुकतेंच पेरलेलें शेत ज्यामध्यें पेर लेलें धान्य उगवलें आहे असें शेत **वापणें**–क्रि ( ना ) उगवणें, फुटणें **वापारी**–पु ( कु ) धान्य पेरणारा, कुशल पेरा करणारा [ स वाप ] **वापित**–वि १ पेरलेलें २ वपन केलेलें हमश्रू केलेलें [ स ] **वाप्य**–वि १ पेरावयाचें, पेरण्यास योग्य, शक्य, लायक २ वपन करण्यास योग्य [ स वप् ]

**वापणें**—क्रि ( व ) व्यापणें, भरणें

**वापर**—पु उपयोग, वहिवाट, रावता (यंत्र, साधन हत्यार वगैरेचा) ( क्रि० करणें ) [ स व्यापार ] **वापरणें**–उक्रि १ उपयोग करणें, उपयोगात आणणें, ( वस्त्रपात्रादि ) पायरणें २ वहिवाट असणें, रावता, सराव, अभ्यास असणें ( एखाद्या गोष्टीचा )

**वापस**—क्रिवि परत, माघारा, उलट, फिरून 'अम्मल मुबईकरानीं कौल्करारासरीज कब्जा कला तो वापस करविते' –ख ६ ३५७३ [ फा वापस् ] ०**जमा-रकम**–स्त्री खजिन्यात पुन्हा भरणा करावयाचा पैसा ०**करणें**–वजा करणें, न दाव-याची रकम पुन्हा खजिन्यात भरणें

**वापसणें**—अक्रि १ ( जमीन ) वाफ येऊन पेरण्यास योग्य होणें २ ( वासरें वगैरे ) वियहून बफाम होणें, वारा खाणें ३ ( ल ) मनास लावून घेणें, हलुवार होणें, क्षुल्लक गोष्टीवरून भर तीच कल्पना करून घेणें [ वाफ ] **वापसा**–पु १ जमिनीची पेरण्यायोग्य स्थिति, पाऊस पडल्यानंतर जमीन दमट, उबदार झालेली स्थिति ( क्रि० होणें ) २ पावसानंतर जमीनींतून निघणाऱ्या वाफा [ वाफ ] **वापसें**–न ( व ) शरदृतु **वाप स्याचें ऊन**–न ( व ) शरदृतूतील ऊन, विश्वामित्राचं ऊन ( ३ ) आक्टोबर हीट

**वापा**—पु वाफा पहा **वापी**–स्त्री लहान वाफा [ स वप्=पेरणें ]

**वापिक**—पु कुलधर्म –मनको

**वापी**—स्त्री विहीर पुष्करणी पायऱ्याची विहीर बारव 'वापी दूप अरण्यदेश ।' –एरुस्व ४ १९ –ज्ञा १८ ६९ [ स ]

**वाफ**—स्त्री १ वापसा, पेरणीची घात, पेरण्यास योग्य भूमि 'मृगाची-हस्तीची-चित्राची-कृत्तिकची-रोहिणीची वाफ २ ( ल यावरून ) शुद्ध भूमि, योग्य संधि 'तेथ केवळ जाली वाफ । निजबोधाची ।' –ज्ञा १७ २३१ 'मग विधीची वाफ सुटली ।' –ज्ञा १६ ३० **वाफणें** अक्रि ( कों ) फळणें, ( गाय, म्हैस ) गर्भधारणा होणें –उक्रि धान्य मुठीनें उडवून पेरणें [ स वप् ] –अक्रि १ उगवणें, रुजणें २ कणीस येणें पक्व होणें **वाफ धाणी-नी, वाफधावनी**–स्त्री ( व ) पेरणी संपल्यानंतर औताची पुजा करून जेवण वगैरे करतात तें **वाफविणें**–सक्रि. रुजविणें, पेरणें उत्पन्न करणें –ज्ञा १३ ३० 'पृथ्वी निववूनियां जाण । नर धान्य वाफवी ।' –एभा २३ ८५७

**वाफ**—स्त्री १ पाणी किंवा द्रव पदार्थ यास उष्णता लागल्या-मुळें त्याचें जें वायुरूप बनतें तें २ गरम हवा, उष्ण हवा उदा० आगीची वाफ [ स बाष्प प्रा बप्प, ब उ भाप प भाफ ] **वाफणें**–अक्रि वाफेनें शिजणें उकडणें [ स बाष्प ] **वाफर-फोर**–न ( गो ) वाफेनें चालणारें जहाज 'वाफोरची वेळ टळली, सुक्ती तर झाली अन् या चिखलात होड्या कशा तरून राहिल्या आहेत' –सागराच्या लाटा ६८ [ स बाष्प वाफर पोर्तु वापोर तुल० इं व्हेपर ] **वाफलणी**–स्त्री वाफ देण्याची वाफेनें शुक विण्याची क्रिया **वाफलणें** उक्रि १ वाफेनें सुकविणें २ वाफ देणें [ वाफ ] **वाफसाडा**–वि वाफ गेलेला निवलेला [ वाफ+ साडणें ] **वाफारा** पु वाफेचा शेक औषधीयुक्त पाण्याच्या वाफेनें दिलेली उष्णता ( क्रि० देणें, घेणें ) 'गजचर्म रोगात वाफाऱ्या पासून पुष्कळ गुण येतो' –बालरोग चिकित्सा २९ [ स बाष्प ] **वाफोळें**–न तांदुळाच्या पिठाचें उकडून केलेलें खाद्य –मूदि २९५ [ वाफळणें ]

**वाफ**—न ( कों ) शेतीसाठीं बैल इ० वापरावयास घेतला असता त्याबद्दल द्यावयाचें धान्य अथवा द्रव्य भाडें

**वाफडणें**—अक्रि भिणें, दचकणें 'पान खडपडिता वाफडें । मरणा भेण चौकडे ।' –भाए ६७१

**वाफरें**—न कापरें शिरशिरी, काटा ( थंडी, पिशाच इ०च्या उपद्रवानें येणारें ) थरकाप ( क्रि० भरणें, येणें ) [ ध्व ? कापरें ]

**वाफवा**—स्त्री ( अशिष्ट ) वाफवा पहा

**वाफसा**—पु वापसा पहा 'वरी अवधानाचा वाफसा ।' –ज्ञा ६ ४९१

**वाफा**—पु १ अळें, लहान खाचर, बागी, मिरच्या वगैरे लावण्याकरिता पाणी देण्याच्या सोईचा तयार केलेला जमिनीचा तुकडा, निग्रपाकरिता केलेलें अळें २ कढविलेला उसाचा रस ओतण्यासाठीं तयार केलेला खड्डा ढेपेचा खड्डा ३ मोटेच्या पाण्याकरिता बांधलेला हौद, थारोळा [ स वप्=पेरणें-वाप ]

**वाफारा**—पु शुधारा, फुगारा 'गलाबानें वाफारा धरला'

**वाय**—स्त्री नदी तीरावर वाढणारी एक कडू पानांची वेल

• वांब—पुस्त्री ( भारामुळें येणारी ) बधिरता, जडत्व, पेटके, वळ, गोळा ( क्रि० येणें )

वांब—पु एक बिन कल्याचा, गोड्या पाण्यांत सापडणारा मासा –प्राणिमो ७९ [ हिं बाम ]

वांब—वि दोन किंवा अधिक वेताची ( गाय, म्हैस ) याच्या उलट पहिलार किंवा पहिलटकरीण

वांबणें—अक्रि ( प्र ) ओंवणें पहा

वांवळ, वांगाळ, वामळ—स्त्री मळभ, अभ्रें, कुंद, दमट हवा ( क्रि० पडणें, होणें, असणें, जाणें ) 'तो वावाळीचा चिलीम ओढीत बसला ' –ससादे

वामरूं—न तुफान, वादळ [ वायु+भिरें ]

वाभळ—स्त्री ( कों ) भराभर वाढलेलें पण पोलकट भात

वामळणें–अक्रि वाभळ होणें, अतिशय जलद वाढल्यामुळें भाताची कणसें पोल होणें

वामा, वाभाडा वाभारा—पु १ मोठी चीर, भेग, मेख लागल्यामुळें निघणारा वस्त्राचा फाळा, धादोटी, चिरफळी 'निशाणाचे वाभाडे काढले ' –कोरकि ५ २ (ल ) कडक टीका (क्रि० काढणें, निघणें ) 'तो स्वत न्यायाधिशाच्या खुर्चीवर बसेल तर त्याचे वाभाडे निघण्याला वेळ लागणार नाहीं ' –सास २ ६

वाभाळ—स्त्री वावाळ पहा

वाभेरें—न सापास टोंचून सांधी बिळातून बाहेर काढ ण्याचें काटेरी हत्यार कावेरू पहा

वाम—वि १ डावा, उजव्याच्या उलट –ज्ञा ५ १५३. 'वामांगीं वेल्हाळ रखुमादेवी । ' –तुगा ३ २ सुंदर 'परवाम लोचनेच्या ऐकों न शकेंचि या विलापरवा । ' –मोसभा ५ ३५ ३ ( ल ) कठिण, वाईट ' ना सारथी म्हणुनि फारच वाम लागे।' –वामन, विराट ५ ११६ ४ उलट, विरुद्ध, वाकडा [ सं ] ०कुक्षि–स्त्री ( शब्दश ) डावी बाजू (ल ) दोनप्रहरीं जेवल्या नंतर (डाव्याकुशीवर पडून) घ्यावयाची विश्रांति, निद्रा (क्रि० करणें, घेणें ) 'दुपारची वामकुक्षि सुरू देऊ नय ' –नि ०बाहु–पु डावा हात, दंड ०मार्ग–पु ( डावा, वाकडा रस्ता ) १ सामान्य पद्धतीच्या विरुद्ध उपासनामार्ग, मद्यमांसादि उपचारयुक्त पूजा पद्धति, अभिचार कर्म शाक्त वगैरे पंथ २ आडमार्ग, वाकडा, कपटी मार्ग ०मार्गी–पु अभिचारक–वाममार्गाचें अवलंबन करणारा, शाक्त 'तो मोठा मनशास्त्रज्ञ असून शक्त्युपासक वाममार्गी होता '–कम १ ०सव्य–वि डावाउजवा 'वामसव्य दोहींकडे। ऐसे कृष्णाचें रूपडें । ' –एरुस्व १६ ८५ ०हस्तभुजासन–न डावा पाय डाव्या खांद्यावर चढवून डाव्या हातानें मान धरणें –सयोग ३२९ वामांग–न १ डावी बाजू २ ( नवऱ्याचें डाव अंग ) पत्नी, बायको वामांगी–स्त्री १ सुंदर स्त्री २ पत्नी शको ६. ५१

'वामांगीचा लास्य विलास । '–ज्ञा १७८ वामाचार–पु शाक्त पंथापैकीं एक उपासनाप्रकार, याच्या उलट दक्षिणाचार वामाचारी–पु वामाचारास अनुसरणारा वामावर्त–र्ती–वि. डाव्या बाजूस वळलेला ( शंख, जिना, भोंवरा, मळसूत्र ) वामा–स्त्री सुंदरी, स्त्री 'चापल्य कौतुकानें वरुते चित्तात सर्व वामांचे ।' –कम २ २ वामी–वि वाममार्गी ' वामी आम्हीं मुक्त असेचि होतों । ' –कम १ ३५ –स्त्री घोडी

वाम—न कर्ज शब्दास जोडून त्याच अर्थी वापरतात, कर्ज-वाम, देणें, ऋण [ अर वाम ] ०दाम–पु ( गो ) कर्जदार, धनको.

वाम—स्त्री. पेटके वाब पहा

वामक—वि वमनकारक, ओकारी आणणारें ( औषध ). [ स वम्=ओकणें ]

वामणें—अक्रि दुरावणें, नाखूष करणें 'तें पाहूनि विराट आदि जन तो चित्तामध्यें वामला । ' –वामन विराट [ वाम ]

वामन—पु १ विष्णूचा पाचवा अवतार २ वामनद्वादशीचे दिवशीं जेवावयास बोलविलेला बटु मुलगा –वि. १ (ल.) खुजा; बुटका, ठेंगू ( मनुष्य ) २ ( विष्णूनें वामन अवतारात बलीस फस-विल्यावरून ) लबाड, ठक, फसव्या [स ] ०जयंती–द्वादशी–स्त्री. भाद्रपद शुद्ध द्वादशी, वामनाचा जन्मदिवस व बलिनिग्रहण ०त्व–न ठेंगणपणा, हीनता 'आशा उपजली वामनासी । नीच वामनत्व आलें त्यासी । ' –एभा ८ ३११ ०मूर्ति–स्त्री ठेंगणा मनुष्य, खुजा मनुष्य ( विशेषत एखाद्या लहान पण पराक्रमी पुरुषाबद्दल वापरतात. ) –वि ठेंगणा, खुजा

वामळ, वामाळ—वावळ, वावाल पहा

वामोग—पु ( कु गो ) कौतुक व प्रेम, माया

वाय—पु (समासात) वायु वारा [स वायु] ०झर–झार–झोर–वि ( गो ) वातुळ, वायुप्रकोप करणारें ०गमन–न आंतड्यात वायूमुळें निघणारी कळ, वायगोळा ०कळा–स्त्री अव. सधिवाताच्या वेदना ०कुंभा–पु एक औषधी वनस्पति –प्रसुति-कृत्यादर्श ६ ०कळणें–चळणें–अक्रि १ चळणें, भ्रमिष्ट होणें; बेफाम होणें, वेडें होणें २ स्वैर, स्वछंदी वर्तणूक करणें, धंगी-भंगी होणें, अनिर्बंध, मोकाट वागणूक करणें ०गोळा–पु आंत-ड्यात वायु धरल्यामुळें यणारी कळ, होणारा रोग 'पोटसुळीं निरंतर वायगोळा । ' –दा ३ ५ २६ ०चळ–कळ–पु वातभ्रम; वायु झाल्यामुळें होणारा उन्माद बुद्धिभ्रश, वेड –वि वेडा; भ्रमिष्ट, बडबड्या ०चाळ–ळा–पु वेड, भ्रम, बडबड 'अन्याय तो त्याचा नव्हे वायचाळ । ' –तुगा ३०७८ 'जनीं व्यर्थ संसार हा वायचाळा । ' –स्तोत्रमाला, रामदास करुणाष्टक ७ –वि बड-बड्या, वेडा ०जाळ–न उन्हाळ्यात उष्णवातानें हातापायांस भेगा पडणें ०दमन–न ( गो ) एक वातरोग, वायूचा गोळा छातींत धसणें

.- वाय—क्रिवि. (वायां-वाव) व्यर्थ; निरर्थक; निष्फळ; मिथ्या. 'ते वेळीं तुझा आक्षेप वाय।' -विपू ७.७; ३.४०; -ज्ञा १५.३२७; १७.११७. [सं. वि+अय्] ०आभाळ-न. पोकळ अभ्र; विन पावसाचें मळभ, ढग. ०करणी-वि. व्यर्थ; निष्फल; पोकळ. 'कासया दोसी धामधूम। वायकरणी मैदा झा।' -अफला १४. ०फळ-वि. १ शुष्क; पोकळ; निरर्थक, कुच कामाचें (भाषण, कृत्य). २ अनिर्बंध; बेफायदा; स्वैर. ०कांड-पु. निष्फळ बाण. 'काय पिनाकपाणीचिया भाता। वायकांडीं आहाती।' -ज्ञा ११.२०७. ०घळ-वि. वायफळ पहा. ०घट-घट-वि. व्यर्थ; मिथ्या. 'तैसा आत्मा भुंजे वायवट्ट। संसारु हा।' -भाए ५९९. ०फट-वि. १ निष्फळ;. निरर्थक; वाल्लिल; पोकळ (बोलणें, बोलणारा). २ स्वैर; स्वच्छंदी; हट्टी; तन्हेवाईक; लेहरी; हूड; उनाड. (मूल वगैरे). ३ क्षुद्र, फुकट; क्षुल्लक; बेफायदा (काम). ०फळी-फूल-वि. फळें, फुलें न देणारें, वांझ (झाड, रोप). ०फळ-वि. पोकळ; पोल; अर्थशून्य; रिकामें; वावगें (बोलणें). 'या वायफळ गप्पांत कांहीं अर्थ नाहीं' -टिले ४. १९. [वायु+फल] ०फूल-न. वांझ मोहोर; फळ न धरणारें फूल. 'अष्टलोकपालांसहित। स्वर्गसुखें वायफुलें समस्त।' -द १२.६. ०बार-पु. वाया, फुसका बार; गोळी न घालतां नुसती दारू भरून उडविलेला बंदुकीचा बार. वायबारचें काडतूस्-न. विन गोळीचें, नुसत्या दारूचें काडतूस. ०भुंथी-स्त्री. भुरला; भ्रामक आवरण 'तरी नामाची वायभुंधी। सांडीचि ना।'-अमृ २.३२. ०बुद्धि-स्त्री. भुरळी, व्यर्थ, भ्रामक समजूत. 'मा येती न येती हे वायसी। वायबुद्धि।' -ज्ञा १५.३२७. वायवाय-क्रिवि. व्यर्थ; निष्फळ; वायां. 'ऐकुनि मोकलुनी धाय रुदन करीत वायवाय।' -अमृत, ध्रुवचरित्र ३. वायां, वांया-विक्रिवि. व्यर्थ; पोकळ; निष्फळ; मिथ्या; फुकट; निरर्थक. 'वेंचून वायां वय सर्व गेलें।' -सारह ११८. -ज्ञा २.१४०. [सं. वि+अय्] वायाणी-णें-वि. व्यर्थ, मिथ्या, लटकें. 'तैसे सर्व कर्मी असणें। तें फुडे मानूनि वायाणें।' -ज्ञा ४.९८. वायांविण-वि व्यर्थ; निष्फळ; निष्कारण. 'तोंडे पाप घेती कांदसें। वायांविण।' -शिशु ३१६.

वायंगण-णा-णें—नपुन उन्हाळ्यातील एक भाताचें पीक. एक प्रकारचें भात. [वायंगें-वागें]

१ वायंगीं, वायंगीभात, वायंगें, वायंगें भात—(कों.) वागें पहा.

२ वायघोय—न. (कों.) कळपातील मेलेलें जनावर (गाय, बैल, म्हैस वगैरे).

१ वायंच—वि. थोडेंसें. वाईंच पहा.

वायंचणें—उक्रि. प्र. वैंचणें पहा.

वायट—वि. (गो.) वाईट; दु:खकारक. ०कार-वि. दुखणेकरी. ०वरें-वि. बरेंवाईट.

वायटळ-टूळ-टोळ—वावटळ पहा.

वायंडा—वि. (प्र) वावंडा पहा. रिकामा; मोकळा; व्यर्थ.

वायण-न—न. उखळ. वाईन पहा.

वायणें—क्रि. (प्र.) वाहणें. 'मना वाचे काये। जे आपुली आप वाये।' -ज्ञा १३.१२८.

वायदा, वाईदा—पु. करार; मुदतीचा ठराव, वचन, ठराविक वेळ; नेमलेली वेळ. 'सोळा दिवसांचा वाईदा करून गेले आहेत.' -ख ४.१८३१. 'तीन दिवसांचा वायदा जो केला।' -ऐपो २४. २ (व्यापार) ठराविक मुदतीनें व्हावयाचा खरेदी-विक्रीचा व्यवहार. उदा० आश्विन वायदा, एप्रिल वायदा. 'विला-यती मालाचे खरेदी-विक्रीचे वायदे शहरांतून बंद करा.' -केसरी २६.७.३०. ३ (व.) शेतसारा; सरकारी महसूल, काळीचा वसूल. [अर. वअदा] वायदेचिठ्ठी-रोखा-स्त्रीपु. १ मुदतबंदीचा लेखी करारनामा; मूळचे मुदतीस अंतर पडल्यास पुन: दुसरी मुदत ठरवून जी चिठ्ठी लिहून देतात ती. २ कर्जफेड मागाल त्या वेळीं करण्याचें विनशर्त वचन दिलेला विनसाक्षीचा लेख. (इं.) प्रॉमिसरी नोट. ३ (ल.) तात्पुरता इलाज, तावडतोबीचें तात्पुरतें औषध; कायमचा नव्हे, तेवढ्यापुरता उपाय. वायदेबंदी—स्त्री. मुदतशीर ठराव. 'याशी वायदेबंदी मार्गेश्वर अखेर ५०० रुपये, पौष अखेर ५०१.' -वाडबाबा २.५ वायद्याचा व्यापार-पु. तावडतोब खरेदीविक्रीचें करारपत्र करून कांहीं ठराविक मुदती-नंतर मालाची देवघेव करणें. -केसरी २८.७.३६.

वायदेव—पु. वायु. 'धन्य धन्य हा वायदेव।' -दा १६. ६.१. [सं. वायु+देव]

वायदेश—पु. वाई प्रांत.

वायदेशा—वि. घरदार, ठावठिकाण नसलेला; भटक्या; उपरी, फिरस्ता. [सं. वायु+देश]

वायधूळ—न. वावटळ, वादळ; झंझावात. (क्रि० येणें, सुटणें, चालणें; वाहणें).

वायन—न. वाण अर्थ १ पहा. [सं. उपायन]

वायन, वायीन, वाय्न, व्हायीन—न. वाईन पहा. दगडी उखळ. [फा. हावन, सं. वाहन?]

वायना—स्त्री. अबाई.

वायपोय-ळ—स्त्रीन. (राजा.) गुरंढोर मरणें; नुकसानी होणें; नासाडी. -मसाप २.४.१०५.

वायबेर—स्त्री. भातखाचरांतील चिखलाच्या वेळची तिसरी नांगरट. -कृषि २२५.

**वायभरक**—वि. (व.) वायु झालेला; कोठें तरी वाहवणारा. 'वायभरकाखारखा वाटेल तें वडबडत होता.' [वायु+भरणें]

**वायंभाळ**—स्री. (वे.) वांवळ पहा.

**वायरी**—स्री (व.) सुन.–वशाप ८.५१.२४५. [वायरी?]

**वायल, वैल**—पु. चुलीच्या वाजूस जाळ जाऊन वर भांडें ठेवण्याकरितां केलेली रचना. [वायला=वेगळा]

**वायला**—विक्रिवि. (अशिष्ट) १ वेगळा; अलग; विभक्त; निराळा. २ भिन्न; पृथक्. 'गोसावी त्यामधीं वायले।' –ऐपो १०८. ३ एकीकडे; वाजूला. 'वायले व्हा.'

**वायवरणा**—पु. एक औषधी वृक्ष; हाडवर्णा; वाटवर्णा. यास पांढरीं फुलें येतात. हा वातहारक आहे. [वायु+वरुण]

**वायवस**—वि. लटिका; मिथ्या. **वायवसा**–पु. वातभ्रमांत केलेली चेष्टा, चाळा; व्यर्थ गोष्ट. 'म्हणोनि वायांचि वायवसे।' –विपु १.३३.

**वायवाट, वायवाटणें**—वहिवाट, वहिवाटणें पहा.

**वायवी**—स्री. वायव्य दिशा; उत्तर–पश्चिम यांमधील दिशा. [वायु]

**वायव्य**—स्री. वायवी; उत्तर व पश्चिम यांमधील दिशा. –वि. वायुसंबंधी; वायुदेवताधिष्ठित.

**वायशी-शो**—वि. (व.) विचित्र; तारतम्य नसणारा; बेमुर्वत; फाजील. [वायस, वायु]

**वायस**—पु. कावळा; काक; एक काळा पक्षी. –हा ३. १९८. 'मधुघृत पायस वायस खाय सदा पक्षियां सर्वे भांडे।' –मोकर्ण (हंसकाकीय). °पिंड–पु. उत्तरक्रियेच्या वेळीं कावळ्या करितां ठेवावयाचा–भाताचा पिंड, गोळा; काकवलि. [वायु]

**वायसट, वायसी**—वि. (व.) मूर्ख. वायशी पहा.

**वायसर**—पु. स्क्रू किंवा बोल्ट पक्का बसावा म्हणून मध्यें घालावयाची चामड्याची किंवा लोखंडाची चकती. [इं. वॉशर]

**वांयसा**—वि. अल्प; थोडा. वांईच पहा.

**वायसें**—वि. व्यर्थ. [वायां]

**वाया**—पु. (सोनारी) अर्धवर्तुळाकार सोन्याची किंवा चांदीची तार. **वायाची अपटी**–स्री. सदर तार काढण्याचा कसा.

**वायु**—पु. १ वात; हवा; वारा; रूपरहित परंतु स्पर्शयुक्त असें एक द्रव्य. २ वातदेवता; वायुरूप देवता. ३ शरीरांतील प्राण (पांच मिळून किंवा दहा मिळून) ४ शरीरांतील एक धातु (कफ, वात, पित्त यांपैकीं वात हा). ५ वातधातूच्या विकृतीमुळें किंवा क्षोभामुळें होणारा रोग उदा० उन्मत्तवायु, शिरोवायु, धनुर्वायु, धंधिवायु इ० [सं.] (काव्य) वायूची मोट–स्री. (ग्रा.) वाऱ्याची मोट; अशक्य गोष्ट. °सरणें–मोकळा होणें–पाद देणें; अपान वायु बाहेर पडणें. °सोडणें–मोकळा करणें–अपानवायूस मार्ग देणें; पादणें. सामाशब्द– °कर्षक–वि (शाप.) वायु शोषणारा; वायु ओढून घेणारा. (इं.) ॲस्पिरेटर °कोश–पु (शाप.) वायूची पिशवी. (इं.) पल्मनरी चेंबर; एअर सॅक. °ग्रस्त–वि. १ वाऱ्यानें फुगलेला; फोपशा; वायु भरलेला. २ वातरोगानें पछाडलेला; वातुळ. ३ वाताचे झटके येणारा; फेपरें येणारा; फीट येत असलेला. °चक्र–न. वातावरण. °चक्रशास्त्र–न. वातावरणांतील निरनिराळ्या व्यापारांचा विचार करणारें शास्त्र; हवेंतील घडामोडी स्पष्ट करणारें शास्त्र. °धारक–पु. वायु धरून ठेवण्याचें पात्र; वायुपात्र. (इं.) गॅस होल्डर. °धारणा–स्री. प्राणायाम; वायु धरून, कोंडून ठेवण्याची क्रिया; योगमार्ग. °पात्र–न. वायु धरून ठेवण्याचें भांडें; वायु बाहेर पडणार नाहीं असें भांडें; (इं) गॅस जार; न्युमॅटिक ट्रफ. °पुराण–न. अठरा पुराणांपैकीं शिवभक्तीवरील एक पुराण. °बद्ध–वि. वातुल (प्रकृति–वातानें लवकर बिघडणारी). °बद्धक–वि. वातकारक; ज्यामुळें गुबारा धरतो असें; वातुळ (पदार्थ). °भारमापक–न. (शाप.) वातावरणाचा दाब मोजण्याचें यंत्र; (इं.) बॅरोमीटर. °मापक–न (शाप.) वायु मोजण्याचें यंत्र. (इं.) इंडिओमीटर. °रूप–रूपी–वि वातरूपी; वाऱ्यासारखें. (इं) गॅस. °वाहिनी–स्री. (शाप.) हवा नेणारी नळी. (इं.) ब्रॉंकिओल. °विश्लेषण–न. (शाप.) वायूचें पृथक्करण. (इं.) ॲटमॉलिसिस. °सख–पु. वायूचा मित्र; अग्नि. 'तेथें शुक्र बृहस्पति जलद हरिश्चंद्र सर्व वायुसख.' –मोसभा १.२४. °सुत–पु मारुती. 'महाराज तो स्वामि वायुसुताचा।' –राम २२. °स्थितिशास्त्र–न. (शाप.) हवेचा, वातावरणाचा, अभ्यास करणारें शास्त्र. (इं.) मीटिऑरॉलॉजी.

**वाये-ए-यें**—विक्रिवि. व्यर्थ; वायां पहा.

**वायो**—पु वायु पहा.

**वार**—पु. १ दिवस; अहोरात्र; आठवड्यांतील प्रत्येक दिवस. उदा० रवि–सोम–मंगळ–बुध–गुरु–शुक्र–शनि–वार. 'त्या शुद्ध सत्त्व तुला भेट गुरुबंधु ज्यात तो वार।' –मोकृष्ण ८१.१. 'वार दिवस वाजार तेथिचा वार करुनि त्वरें।' –राला १६. २ ठराविक दिवस, आठवड्यांतील ठराविक दिवस, ब्राह्मणास, विद्यार्थ्यांस जेवावयास घालण्याचा ठरीव दिवस. 'गरीब मुलें वारानें उदरनिर्वाह करतात.' –टिले ४.१६५. ३ नियमित दिवस; पाळीचा दिवस (वेश्येस यजमानाकडे जाण्याचा–यावरून वारवधू, वारांगना, वारयोषित्, वारयुवति, वारनारी, वारस्त्री इ० शब्द बनले) 'ज्याचा वार त्याचचि हेतु पुरो की दया स्वामि धरल्या।' –मोमादि ३१.९९. 'देवीपुढें नाचत वारनारी।' –वाद्द ८.६१. ४ खेप (दोन वार पुन्हा येण्याला लागणारा काळ दाखवून). 'तो गल्याला आज दोन वार आले.' ८ (गा.)

भाऱ्यमडयाच्या हप्त्यानीं फेडावयाचें कर्ज 'मी चुटीचा वार काढला आहे' -क्रिवि वेळा; आवृत्तिवाचक अव्यय, एकवार, अनेकवार, त्रिवार, दोनवार **वार करणें-असणें**-नियमित वारीं उपवास करणें ०**कर-करी**-पु १ ठराविक वारीं जेवावयास येणारा विद्यार्थी ब्राह्मण, खंडोबाचा भक्त इ० २ ठराविक वारीं वसूल करावयाचा हप्ता उगविण्याकरिता फिरणारा सावकाराचा मनुष्य, कारकून **वारनारी**-स्त्री वेश्या वारमध्यें पहा **वारमुख्या**-स्त्री मुख्य वारांगना 'मध मधें चालति वारमुख्या।' -साह्६ ८ ५० **वारयुवति**-स्त्री वेश्या वार पहा **वारवधू**-स्त्री वेश्या वार पहा **वारस्त्री**-स्त्री वेश्या वार पहा

**वार**—स्त्री (कों) भात भरडल्यानतर तुसापेक्षा तांदुळा मध्यें जी वाढ दिसून येईल ती तांदुळ काढल्यास तांदुळ व कोंडा निर्माण होतात त्यात जर कोंड्यापेक्षा तांदूळ अधिक भरले तर ती वार; वाढ

**वार**—पु १ जखम, दुखापत तडाखा, मार (शस्त्राचा) २ (ल.) दोष, भार [फा]

**वार**—स्त्री १ फुरसत सवड, रिकामपण 'तुज मन वार येथें कोण म्हणे टिर।'-न ५९३ २ विलंब,उशीर, वेळ 'वार लावू नको'

**वार**—पु लांबी मोजण्याचें एक माप, तीन फूट लांबीचें प्रमाण, गज, (इं) यार्ड

**वार**—स्त्री. मूल जन्मतें त्यावेळचें त्यावरील आवरण, वेष्टण, वार 'पाहे तव स्वयवीत वार।'-क्या ५ १ ३९ [स वृ]

**वार**—पु (चुकीनें) वारसा, हक्क

**वार**—पु १ समुदाय, रास, ढीग, जमाव 'श्रीं मथिला स्वीहारस्य मरिवार।'-मोवन १३ १५

**वार**—(अरबी फारशी शब्दास लागणारा प्रत्यय) १ सादृश्य, पद्धति, रीति इत्यादि बोधक प्रत्यय उदा० तपशील वार, ययादवार, नावनिशीवार २ साहचर्य सबध, इत्यादिबोधक प्रत्यय उदा० शिफायतवार, तरिकेवार [स]

**वारकरी**—पु १ वारी करणारा २ (ठराविक दिवशीं क्षेत्राच्या ठिकाणीं जाणारा भक्त नियमित दिवशीं यात्रा करणारा. 'पढरीचा वारकरी') [वारी+करी] ०**करी धर्म**-पु वारकरी लोक परस्परामध्यें जो आचार धर्म पाळतात तो

**वारकोंड**—वि कोंदट बंदिस्त मोकळी नसलेली (जागा) [वारा+कोंडणें]

**वारंग**—पु (कों) कोयता सुरी, तरवार वगैरेचा मुठींत अडकविण्याचा निमुळता भाग [वार+अग]

**वारगी पारगीचा-नें**—पारगी वारगी पहा

**वारगुळा वारगोळा-गुळें गोळें**—पुन बदला बदल आळीपाळी, आलटापालट, हरचीक, हाळें; एकमेकाचें काम सह कार्यानें करण्याची शेतकऱ्याची पद्धति [वारगी+गोळा]

**वारचा**—क्रिक्रिवि ऐवजीं, आगीं, बाटचा, पाळीचा. 'माझ्या वारचा तो गेला' 'त्यात जे वारचे वतनदार लागले ते आपापल्या आणेवारीप्रमाणें स्वत किंवा गुमास्त्यामार्फत काम करतात'-गागा ७५ [वार, वारी=वेळ, पाळी]

**वारंट**—न धरणें पकडहुकूम, पकडण्याचा हुकूम 'त्यांच्यावर वॉरंट बजावण्यात आलें'-केसरी १७ ६ ३० [इं वॉरंट]

**वारट**—पु अत, शेवट -मनवो.

**वारडें**—न शिळें अन्न

**वारण**—पु हत्ती 'पद्माचा जो शत्रु तो वारणाग्न। वारायाला पै म्हणे सिद्ध झाला।'-वामन स्फुट श्लोक (नवनीत पृ १३४) [स धरण=जाणें]

**वारणें**—न १ परतविणें, प्रतिकार, निवारण, मागें फिरविणें; परावृत्ति २ टाळा, चुकविणें 'दया प्रकट दाखवी कवण साग त्या वारणीं।'-केका ६ ३ रक्षण 'मी आजि साम्प्रतानुज शक्रसुताचें करीन वारण गा।'-मोभीष्म ४ १० [स वार्=टाळणें]

**वारणें**—उक्रि १ परावृत्त होणें, करणें, प्रतिबंध करणें, प्रतिकार करणें, टाळणें, चुकविण, बाजूस करणें सारणें (एखादें अनिष्ट वगैरे) 'शरणागत व्यसन तों स्वयें वारणें।-केका ५६. २ हात वगैरे हालवून घालवून देण, दूर करणें, हाकून देणें (माशा वगैरे) 'तुम्हा लागोनिलिया गोमासिया। तरि वारां जा श्रीं।' -शिशु २१९ ३ फेडून टाकणें, मुक्त करणें (कर्ज वगैरे) ४ फिरविणें, हलविणें, ढाळणें (चवरी, मोरचेल वगैरे) 'तें चामरे वारिती निर्विकारी।'-साह्६ ५ २९ ५ सांगण, कथन करणें 'वैद्य पथ्य वारूनि जाय।'-ज्ञा ३ ८ ६ वाटस लावणें, संभावना करण 'भाटातें उचितीं वारितु।'-शिशु ५२१ -अक्रि १ (लाक्षणिक) मरणें २ सपणें, नाहींसें होणें दूर होणें, टळणें, निभावणें 'हरइर त्याचें पुण्य जातें वाढ। वारतें हें आड तिमिराचें।' -तुगा ४० 'हाशीं गडबडही वारली।'-समारो १९ [स वार्= टाळणें]

**वारणें**—उक्रि (कों अशिष्ट) हांक मारणें पुकारणें

**वारती**—स्त्री १ झोंपाळ्याची कडी, पाळण्याची दोरी, कातड्याचा दोर वादी वगैरे 'जननिया बाळकार घातलें पाळणा। पचतत्वीं जडियेल्या वारतिया म्हणोना।'-तुगा २६५ २ शिडी, दोर (चढावयाचा) 'वारत्या लाविजती आकाशीं। यागाचिया।' -ज्ञा १८४८२ [स वरत्रा वारत्र]

**वारद, वारीद**—वि दाखल प्रविष्ट प्राप्त 'खैरियत खत खलिता वारीद होत नाहीं'-रा ३ ९० 'शिरावर वरसात वारद झाली'-होके १२ [अर वारिद]

**वारसानी**—पु (नाविक) पावसाळ्यातील दक्षिणवारा.

**वारघट**—पु (माण) वारा

वारधारीं—क्रिवि. मोकळ्या हवेंत; उघड्या वाऱ्यावर.

वारधुंद—स्त्री. (व.) खूप जोराची वावटळ; वादळ; झंझावात.

वारनीस—न. रोगण, एक प्रकारचा तेलकट पदार्थ. 'लाकडांस वारनीस द्यावें.'–मॅरट ७७. [इं व्हार्निश]

वारपार—क्रिवि. वारंगीपारंगीनें, पाळीपाळीनें. 'सरकारच्या कोट्या नेमणुकेप्रमाणें सनदेबरहुकूम वारपार चालतात...'–थोमारो २.८७.

वारया वेधणें—क्रि वायुचक्रांत सापडल्याप्रमाणें मन भ्रमणें. 'त्यांचा वारया वेधला जीव।'–दा ३.३.४७. धुळेप्रत. 'तेणें जीव वारया वेधला।'–दा ३.२.६३.

वारली—पु. उत्तरकोंकण, ठाणें जिल्हा यांतील एक जात व तींतील व्यक्ति.

वारलें—न. बहुल्याभोंवतीच्या वह्यांतील मडकें वही पहा.

वारवंडा—पु. एक औषधी वृक्ष. वायवरणा.

वारवण-णें—न. मेंढ्या चारण्याबद्दलची मजूरी, वेतन. [वारणें]

वारवणें-विणें—सक्रि उपणणें; वाऱ्यानें धान्यांतील भूस उडवून लावणें. [वारा]

वारवा—पु. एक जातीचा घेवडा.

वारंवार—क्रिवि पुन्हापुन्हां; वरचेवर; सतत, नेहमीं, फिरून-फिरून. [सं. वारम् द्वि]

वारविलासिनी—स्त्री. वेश्या; वारवधू, वार पहा.

वारवो—पु (गो.) जननेंद्रियाच्या वरचा भाग

वारशी—स्त्री. महार जातींत मोहतुराचे वेळीं पाच रुपये घेऊन वधूच्या पहिल्या नवऱ्याच्या वारसास देतात त्यास म्हणतात. –बदलापूर १७१. [वारस]

वारशीक-षीक—वि (अप) वार्षिक पहा.

वारस-सी—पुस्त्रीन. एक इमारती लाकडाचें झाड.

वारस, वारीस—पु उत्तराधिकारी, वडिलार्जित धनाचा हक्कदार, मालक, वाली. 'पाटिलबावा जमिनीचा वारस होऊं पाहतो.'–जोरा ११७. [अर वारिस्] ०नामा–पु मृत्युपत्र

वारसट—न. (हेटकरी) भयंकर वादळ. [वारा]

वारसंडणें—उक्रि वारवणें, वाऱ्यानें भूस उडविणें. [वारा]

वारसंडणें—अक्रि वाऱ्याच्या, उघड्यावरील हवेच्या योगानें फटीस, लाकडास वगैरे चिरा, भेगा पडणें [वारा]

वारसा वार्सा—पु १ पैतृक हक्क, वडिलार्जित मालमत्तेवरील हक; मालकी; स्थावरादि द्रव्यावरील स्वत्व 'मामलत देत असता जमिनीचा वार्सा करूं लागले.'–जोरा १३०. २ वंशपरंपरागत आलेली मालमत्ता, संपत्ति, पित्रादि नातेवाईकांकडून मिळालेलें धन. [अर. वर्सा] वारसान–पुअव. वारस; हक्कदार. वारसेदार–पु. वारस, वारसा आलेला; पैतृक हक्कदार; मालक–महाराष्ट्र कृषीवल, आगष्ट ३०.

वारसा—पु दोर, (जूं वगैरे बांधण्याकरितां).

वारसी—स्त्री. वृष्टि; पाऊस. [सं. वर्षा. हिं. बारस]

वारळी—पु. वारली पहा.

वारा—पु. १ वात, चलित वायु, हवा; न दिसणारें परंतु स्पर्शास समजणारें पंचमहाभूतांतील एक तत्त्व. –ज्ञा १५.३७६. २ (ल.) वीरश्री; स्फुरण. 'शिवाना भरला वारा।'–संग्रामगीतें ७३. ३ संचार; अंगांत येणें 'कंपु नोहे आंगीं वारा।जगदंबेचा।'–ऋ ६५. [सं. वा=वाहणें] (वाप्र.) ०घालणें–पंखा, चवरी वगैरे साधनांनीं हवेस चलन देऊन वारा लागेल असें करणें. ०घेणें–खाणें-पिणें–१ (वासरें वगैरे) मोकाट सैरावैरा पळूं लागणें; उड्या मारूं लागणें. २ (ल) निर्बंध झुगारून देऊन स्वैर वर्तन करणें; मोकाट सुटणें; अद्वातद्वा वागणें. 'स्वरूप तुमचें पाहून पापिणी जीव आमचा प्याला वारा।'–होला १०२ 'तेणें करून रागहे बहुत वारा प्याले।'–पेद २१.१७७. ०न घेणें किंवा न पडूं देणें–अगदीं अलिप्त, दूर राहणें, किंचितहि संबंध न येऊं देणें; संसर्ग टाळणें. ०पडणें–वारा वहावयाचा बंद होणें. ०पिणें–१ वारा घेणें पहा. २ दुःखी, उदासीन, उत्साहहीन, खिन्न, उद्विग्न होणें. ०फिरणें–मत बदलणें; स्थिति पालटणें. ०मोकळा करणें–सोडणें–अपानवायु सोडणें; पादणें. ०मोकळा होणें, सरणें–अपानवायु सुटणें, पश्चिमद्वारें वायु बाहेर पडणें; पादणें. 'वारा सरता मोठी फजीति।'–दा १८.१०.२०. ०वाजणें–वारा वाहणें; जोराचा गार वारा सुटणें. 'वारा वाजता वरपती ओलीं पिकें।'–दा १८.२९. ०वाजेल-वाहील तशी पाठ करावी–ओढावी, द्यावी, वारा पाहून पाठ द्यावी, वारायाहेल तसें करावें-पाठीवर घ्यावा–१ वाऱ्याच्या प्रवाहाबरोबर जावें, वारा वाहील त्या दिशेनें जावें, वाऱ्याच्या अनुरोधानें जहाज हाकारावें. २ (ल) वेळ पडेल तसें, प्रसंग ओळखून वागावें. ०होणें–वाताहात होणें. 'हळहळ बहु झाली होय संसार वारा।'–सारुह ३ ७३. वाजता वारा लागूं न देणें–किंचितहि त्रास न सोसणें, स्वतःस अणुमात्र तोशीस लागूं न देणें, अजीबात त्रास टाळणें. वाऱ्याचा उपद्रव–पु १ हवेंतील फरकामुळें होणारी पीडा, बाधा. २ पटकीची साथ वाऱ्याचा थुंद-पु. हवेचा अल्पांश, किंचितहि वायुचें वाहणें, वारीकशी झुळूक (बहुधा नास्तिपक्षी) वाऱ्याची मोट–स्त्री. (ज्याप्रमाणें वारा एका गाठोड्यांत बांधणें अशक्य त्याप्रमाणें) परस्परांपासून दूर व भिन्न अशा अनेक वस्तु अथवा व्यक्ति एकत्र आणण्याची व ठेवण्याची क्रिया; अनिर्बंध वस्तूंचें एकत्रीकरण. (हें अशक्यप्राय असतें)

०बांधणें-क्रि अशक्य गोष्ट करू जाणें वाऱ्याचें घोडें-न (वाऱ्यानें चालणारें) जहाज गलबत, नौका वाऱ्यावरीवर-शीं भांडणें-अतिशय भांडखोरपणा करणें, नसते कल्ह उकरून काढणें वाऱ्याला लाथा मारणें-निष्फळ काम करणें वाऱ्या वर टाकणें-अजिबाद सोडून देणें, टाकून देणें, पूर्णपणें त्याग करणें, हयगय, दुर्लक्ष करणें वाऱ्यावर भारे बांधणें-मनोराज्य करणें वाऱ्यावर वरात मुसावर चिठी-भूसपर ठेंगा-बेजबाबदारीचें, निष्काळजीचें काम (वरात म्हणजे पैसा देण्या विषयीं चिठ्ठी ती वाऱ्यावर देणें म्हणजे काहीं तरी करणें), ताळ मेळ नसलेली गोष्ट करणें वाऱ्यावर सरणें-१ फुटें तरी भग्न होणें, वहावत जाणें, काहीं तरी भरमसाट बोलत सुटणें २ अवखळ होणें, आडदांडपणा करणें, स्वैर वागणें वाऱ्यावर्शीं वाऱ्या सोई-वाऱ्याराग-क्रिवि वाऱ्याच्या गतीच्या अनुरोधानें, प्रवाहाबरोबर, प्रवाहाच्या दिशेनें वाऱ्यास उभा न करणें-राहूं न देणें-न राहणें-स्वत पासून दूर ठेवणें, संबंध न ठेवणें, संसर्ग टाळणें वाऱ्यास देणें-उपणणें, वारवणें, वारसडणें सामाशब्द-

वारापाणी-न १ वारा व पाणी यांच्या सुलभतेमुळें क्षुल्लकत्व दर्शक दुर्लक्षित, उपेक्षित स्थिति, अवहेलना उपेक्षा, हेटाळणी, तिरस्कार, हेळसांड 'मी बोलतों याचें उगीच वारापाणी करून टाकू नको' 'झालें वारापाणी वज्र तव मर्येचि देव का पावे।' -मोअश्व १ ९०६ २-नक्की निरवानिरव वारासार, फेड, भागवा भागवी (कर्ज-वाम वगैरेची) ३ निरास, निवारण अनिष्ट निरसन ४ हवापाणी, मोकळी स्वच्छ हवा एखाद्या ठिकाणचें हवा मान, आबहवा 'चार दिवस वारापाणी खा मग बरा होशील' [वारा+पाणी]

वारें-न १ वारा, विशेषत वाहणारा, हलणारा वारा २ साथ प्रसार प्रादुर्भाव (रोग वगैरेचा) उदा० पटकीचें वारें, खोकल्याचें वारें (क्रि० वाजणें, वाहणें, वाजणें, सुटणें) 'वारीं रोम्याची वाजतीं।' -दावि २७७ ३ संचार, अंगांत येणें, पिशाच्चबाधा (क्रि० येणें, भरणें) 'अंगीं घेऊनियां वारें दया देती। तया भक्ताहाती चाट आहे।' -तुगा २८४२ 'वारें निराळें बोले। देहामध्यें भरोनि डोले।' -दा ९ ८ २२ ४ झाक छटा, चर्या, सुरत गुणसमुच्चय (विशिष्ट गोष्टींकडे कल आवड, विशिष्ट बौद्धिक सामर्थ्य, कौशल्यदर्शक) 'कारकुनीचें वारें' ५ लहर लाट ऊर्मि, प्रवृत्ति कल उदा० प्रीतीचें-ममतेचें-रागाचें-शोकाचें-आनंदाचें-वारें ६ जोम, उत्साह सामर्थ्य, आनुवंशीक ओज तेज रग वगैरे उदा० तारुण्याचें-बळाचें-शक्तीचें-वारें 'हिंदुलोकांत स्वातंत्र्याचें वारें कसें तें माहित नाहीं' -नि 'अंगीं भरलें नूतन वारें।' -विक ३ ७ सामान्यत एखादी चमत्कारिक कल्पना, वेड खूळ वगैरे 'सुधारणेचें वारें महाराजांच्या डोक्यांत शिरलें' -टिले ४ ३१६ ८ स्पर्श, बाध 'एखा राज्य व्यवस्थापकानें राज्यास संपत्तीचें वारें लागू नये म्हणून कडक कायदे केले' -नि ५४ ९ अंश, भाग 'त्यांतलें बिलकुल वारें ऐन सांठीच्या अमलांतहि प्रस्तुत प्रयकाराचे ठिकाणीं आढळत नाहीं' -नि १० आविर्भाव, देखावा, आव, अवसान 'चोरापुढें त्यानें पहिलवानगिरीचें वारें अंगीं आणण्याचा प्रयत्न केला' ११ अर्धांगवायु, पक्षवात 'वारीं अगावरून जातीं।' -दा ९ ८. २१ ०फिरणें-बदल होणें, पालटणें, वर्तणूक निराळी होणें 'गोविंदरावास नोकरी लागल्यापासुन सखूबाईचें वारें फिरलें' ०लागणें-संसर्ग होणें, संगति लागणें संबंध येणें 'संपत्तीचें वारें आजपर्यंत कसें तें मुळींच लागलें नाहीं असे देश पृथ्वीवर पुष्कळ आहेत' वारें सुटणें-परिस्थिति, वातावरण उत्पन्न होणें 'कायदे भंगाचें हिंदुस्थानांत वारें सुटलें' -के १२ ७ ३० ०सत्र-न (गो) पिशाच्चाचा फेरा वारेंवर्शीं-क्रिवि उघड्यावर, वाऱ्यावर दैवावर 'रसाची घागर तुळशीपाशीं उतरली व वारेवर्शीं ठेविली।' -खरादे ६१ वारेंमाप-क्रिवि १ प्रमाणाबाहेर भलती-कडेच, बेअदाज, बेहूद २ बेताल, असंबद्ध विसंगत, अद्वातद्वा (बोलणें भाषण) वारेंलग-क्रिवि वाऱ्याच्या प्रवाहांत, स्रोतांत. 'का वारेंलगें पाखिरू। गगनीं भर।' -ज्ञा १३ ११४ वारें हळक-वि वारा लागुन वाळलेलें, वाऱ्यावर टाकुन वाळलेलें

वारांगना—स्त्री वेश्या वार पहा

वारागुळें—न अव्यवस्था, अस्ताव्यस्तपणा, उडवाउडव, दाणादाण, नासधूस (वाऱ्यानें धान्य वगैरे उडून जातें त्याप्रमाणें) (क्रि० करणें, करून टाकणें) [वारा+गोळा]

वाराणसी-शी—स्त्री काशी, बनारस शहर 'जपतुसें वाराणशी तिअेदीनी।' -शिशु १३२ 'मोक्षाचें तीर्थ नलगे वाराणसी।' -तुगा २२७४ [वारणा+असी या दोन नद्यांच्या संगम स्थानावरून] ०कर-पु काशीकर पहा

वारानी—वि (व) हवाशीर वाऱ्याची [वारा]

वाराव—पु (गो) खिडकीचा गज [इ बार]

वाराव(वि)णें—१ वारवणें पहा २ वाऱ्याकर घरून वाळवणें (वस्त्र वगैरे)

वारावार—स्त्री निरवानिरव, कर्जफेड, कामाची व्यवस्था, भागवाभागवी [वारणें]

वारासार—स्त्री १ निरवानिरव, आवराआवर, व्यवस्था, नीट व्यवस्थित मांडणी, रचना आटोपाआटप 'जिकडे तिकडे करूनि टाकसी कशी वारासारी।' -होला ८९ २ वारावार. [वारणें+सारणें]

वाराही—स्त्री एक वनस्पती वाराहीकंद-पु वाराही वनस्पतीचा गड्डा, मूळ, कांदा

वारि, वारिया—शभ ऐवजीं, बद्दल 'तुझीया वारिया मज नार्चोनये।' –भाए २४२ [ वार पहा ]

वारि—न उदक, पाणी [ स ] ०ज–न कमल, अब्ज ०राशी–सी–पु समुद्र 'न हें नभोमंडल वारिराशी।' –अन्योक्ति ०वाह–पु मेघ

वारिक–कें—न १ वाहन 'गरुडाचें करौनि वारिकें। दाटौनि आलासी कवतिकें।' –शिशु ४४७ 'यादव आरूढ गजवारिका' –धवळेउ ५२ 'पवनाचा वारिका वळघे।' –ज्ञा ६ २७० 'गरुडाचें वारिकें कामें पीतांबर।' –तुगा ३ २ शिंगरू, घोडें, तट्टू 'दाडियाचा सरकौनि वारिकेआवरी।' –शिशु ५५२

वारि(री)क—पु न्हावी, म्हाली, नापीक 'तंव त्याचीं नखें फेडावया। वारिकु।' –पच ५१ 'तंव हक्किनी वारिकी दुमाळिलीं। तिजें पुटिला वारिआ सुआलीं।' –शिशु ५५८ 'धनासीं वारिक पोरगी आणूनी।' –दावि २९२ [ स वार, टरा विक वारी येणारा ]

वारिका—स्त्री वेग गति

वारिशदार वारिसदार, वारीश—वारस पहा

वारिजणें—अक्रि वर्ज्य होणें, बंद होणें, मिटणें, लागणें 'जेयकाळा वारीजती दारवठे।' –भाए ६३ [ स वर्जे ]

वारी—स्त्री १ यात्रा, नियमित फेरी, व्रत, वरसार 'आपाढी कार्तिकी पंढरीची वारी।' –रामदासी २ २२ –ज्ञा ६ ३७७ २ पाळी, खेप, क्रम, वाटा 'आता कर्मठा कैं वारी। मोक्षाची हे।' –ज्ञा १८ ६८ ३ गती, जाणें 'सरली द्वैताची वारी।' –ज्ञा १४ ५६ ४ देवाच्या नावानें मागितलेली भिक्षा 'वारी मागतां पोट भरेना बहु श्रम पावली हो।' –भज ५९ ५ वेळ, प्रसंग, सबब 'तंव जाणुनि आयुष्यावसार वारी।' –भा मार्कंडेयाख्यान ६ २६ 'गरुडास जातो म्हणून नाहीं पुसाया वारी।' –पला वारीस येणें–वाटपास येणें, क्रमप्राप्त होणें, उरणें, राहणें

वारी—स्त्री नाश 'विषाराची होत वारी। दपत देखनां।' –दा ११ ४ ९ वारा सोडवणें–क्रि (वो) ग्रामदेवतेसमोर महारानें तरवार हातात धरून ती आपल्या पोटावर (स्वतःला इजा न होता) आपल्याच हातानें मारून पेजें दारा सोडून देणें असेंहि म्हणतात असा येथीं देवीपाशीं गाऱ्हाणें म्हावदाचें असतें या दिवशीं महाराष्ट्र उपवास करावा व त्यो या कृत्याबद्दल महा राष देणगी देतात –आदिवन्यांची महाकाली ३२

वारी, वारीं—शभ १ नें साहाय्यानें, साधनानें, तृतीया बोधक अव्यय उदा० देवणीवारीं 'पल्ल्यावारीं धरा प्यावा' 'तें तें भगवन्मेवे वारीं। स्वयें कृष्णार्पण करी।' –एभा ३ ५६५ ५.४०२ –ज्ञा १८ २२५; ५०७, ५४६, ५५०. २ प्रमाणें, अनुलक्षून, रीतीनें, वजा 'पाण्यावारी पैका खर्चला पाहिजे' 'तृणावारी मोजणें' ३ बरोबर, सह; म्हणून, पोटात, खालीं, मुळें, योगानें उदा० हसण्यावारी, बोलण्यावारी, विनोदावारीं 'आवे प्रसादावारी गेले' 'सर्व बोलणें थट्टेवारी गेलें' 'तुका म्हणे कामावारीं। आळस घरीं करमेना' –तुगा ६७५ ४ ऐवजीं, जागीं, वाटचा ५ साठीं, करिता 'मी पोटावारी काम करतों.'

वारी(रि)दत—वि १ हजर, उपस्थित, आलेला; प्रविष्ट झालेला, दाखल २ हातीं आलेला, मिळालेला [ अर व रिद ]

वारीस–दार—वारसदार पहा

वारु–रू—पु घोडा, अश्व 'भणओनि उपमा न घडे। तेजआवारूवासी।' –शिशु ९९३ 'कोल्हरीचे वारू। न येती धारकीं घरू।' –अमृ ७४ –ज्ञा ९ २१६ –वि उत्तम, सुंदर. 'वारू तो वारू' [ स ] वारुडा–पु घोडेवाला; अश्वपाळ, खासदार 'वारुडे नी मेळविला। झाडकरौनी।' –शिशु ५११ 'तव वारू मेळविला। वारुडेनि' –शिशु ९८९

वारुणा—स्त्री एक नदी 'दक्षिणेकडे काशिच्या असी। उत्तरेकडे वारुणा त्यशी।' –नरहरी गंगारत्न ला (नवनीत पृ ४३५)

वारुणी—स्त्री १ पश्चिमदिशा २ मद्य, दारू 'वारुणी माध्वी मधोदक। आवश्यक सेविती।' –एभा ११ १२०. ३ एक अस्त्रविद्या 'तुज नियाभार्गवी वारुणी।' –वामन निगमसार १४५ –वि वरुणदेवतासंबंधी, वरुणदेवनाधिष्ठित [ स वरुण ]

वारूळ—न १ मुग्यांचें घर भुवन, सापाचें बिळ 'वारूळास वाल्मीक बोलिजे।' –दा १६ १ १४ 'त्या मणिप्रकाशीत वारुळी।' –नरहरी, गंगारत्नमाला (नवनीत पृ २४१) २ एक मणरोग [ स वल्मीक, स वामलुर वामलुर, म वाल्ह+घर ]

वारूळ—न वाळा, एक सुगंधी गवत

वारें—न वारा पहा

वारें—वि वारीचें, घरी मागून आणलेलें 'आपली भिक्षा सोडू नये। वारें अन्न खाऊं नये।' –दा १४ १ ५६

वारें—न सूत व रेशीम यांच्या मिश्रणात जें रेशीम असतें तें

वारेंग—वि रंगहीन, ज्याचा रंग उडालेला 'रंग आणि वारेंग।' –दावि ११५

वारेंगणें—अक्रि रमणें, रममाण होणें, गुंग होणें 'सुन्दरु दों विसलें। रिघदारीं वारेंगल। धीरगर्णी।' –दा ३ १०. ३५.

वारेंवणें—अक्रि (कु) वावरणें पहा

वारेसा—पु एक इमारती झाड वारसा पहा.

वारेटूं—न (राजा) वाळा, एक प्रकारचें सुगंधी गवत व त्याची मुळी

**वार्ता**—स्त्री १ वृत्त, बातमी, हकीकत २ वदंता, ऐकीव बातमी ३ संवाद, संभाषण (क्रि० करणें) ४ राजनीतींतील तिसरें अंग, अर्थविचार अथवा अर्थानर्थ विचार (आन्वीक्षिकी, त्रयी व दंडनीति हीं बाकीचीं तीन अंगें होत) ५ गोष्ट, संबंध 'वार्ता हरीची सहसा स्पर्शवी।'–शारद ३ २५ ६ अल्पांश, किंचित् भाग 'मन्नका संशय वार्ता।'–रत्नकांता१५ ७ प्रसिद्धि, ख्याति लौकिक 'लोकांत ज्याची वार्ता आहे तेंच ह'–दम १ ८ बाता, गप्पा 'अशा तो सारख्या वार्ता झोंकीत आहे'–स्वप ९० [सं वृत्–हाणें] **वार्ता नसणें**–अस्तित्वांत नसणें, अत्यंत अल्प प्रमाणांत असणें 'दृष्टीची नाहीं वार्ता। तेथें सर्व ही ऐक्यता।'–दा ५ ६ ४९. 'वार्ता नाहीं जन्ममृत्याची।'–दा १ ९ १३ **०हर**–पु बातमीदार, दूत निरोप सांगणारा जासूद

**वार्ता**—स्त्री दोरी रज्जु 'मग कोता खेंव देणें। वार्तेवरील धावणें। साडी पडे खेळणें। नागिणीचे तें।'–ज्ञा १८ ६५ [सं वर्ती, वरत्रा]

**वार्तिक**—पु बातमीदार, जासूद दूत भाट; बातम्या लिहिणारा 'आपण वार्तिका समागमें पत्र पाठविलें'–पेद ३ १०४ 'वार्ता वार्तिक कीर्तिली प्रभुपुढें।'–आसी १३ ९ 'देखिलें वर्तमान वार्तिकें लेहावें'–सप्र १२ ८० [वार्ता]

**वार्तिक**—न १ सूत्रावरील व्याख्यान स्पष्टीकरण टीका 'तो बौद्धमत संकटु। वार्तिकाचा।'–ज्ञा १ १२ –एभा ७ २५५ २ (संगीत) चार मात्रा प्रमाण –पु टीकाकार वार्तिककार 'ब्रह्म वार्तिकू। रसाळ पुराणिकू।'–शिशु ३५० [सं वृत्ति]

**वार्धक्य**—न म्हातारपण, वृद्धपण उतारवय वार्धिक्य, वार्धिक्यदशा अशीं अपभ्रष्ट रूपें काव्यांत येतात [सं]

**वार्धुषिक**—पु व्याजबट्ट्यावर उपजीविका करणारा सावकार [सं] **वार्धुष्य**–न व्याज, नफा, किफायत, वाढ मिळकत [सं]

**वार्याब**—वि भेटीची, प्रवेशाची परवानगी मिळालेला [फा बार्याब्] **वार्याबी**–स्त्री भेटीची परवानगी राबता 'तो दिवसरात्र दौलाची प्रकृत अस्वस्थ कोणाचीवार्याबी नाहीं'–रा ७ १११

**वारांशि**—पु समुद्र वारांशि वानर विलंधित होय तो वीं'–र १५ [सं वारिराशि]

**वार्षिक-की**—नस्त्री १ सालीना नेमणूक दर वर्षाचें वेतन २ दरसालचा उत्सव श्रम समारंभ –वि १ दरसालचा दरवर्षीचा, प्रतिवार्षिक २ पावसाळ्यांत होणारें पावसासंबंधीं पावसाळी. [सं वर्ष]

**वार्षिया**—पु पावसाळा, वर्षाऋतु –ज्ञा ९ १०२.

**वार्षी, वार्षिची**—स्त्री १ पर्जन्यकाळ, पावसाळा, वर्षा ऋतु वृष्टि 'अथवा घनावळी आकाशा। वार्षिये येवी।'–ज्ञा ९ ११९ २ वेश्या 'वार्षियेचे उमळें। कोण न रिघे।'–माज्ञा (पाठ) १३ ७०१ [सं वृष्]

**वान्हाव**—पु मराठ डुक्कर 'शेषकूर्म वान्हाव जाले।'–दा २० ८ २१

**वाल**—पु १ तीन गुंजाभार वजन, व्यवहारांत हें दोन किंवा अडीच गुंजाभार धरतात 'मग वालुवांउ ज्ञान मांगारा। एक धर्म कथिलाचा पुरा।'–भाए ६३५ २ कडवा, एक द्विदल धान्य, वरणा, एक कडधान्य ३ बिब्बारीची बी, पताड्या गुंजेची बी. [सं वल्ल प्रा वल्ल, का आवरे] म्ह० भटता वाल पिटता वाल वाल वाल निसतान

**वाल**—पुन १ (गो) वेत २ (गो कु) गलबतावर सप योगानें आणावयाचा काथ्याचा मोठा दोर –कृषि ७५१ ३ (कर) धनुष्याकृति आसन [का वद्दे=दोर]

**वाल**—वाला, संबंधदर्शक प्रत्यय उदा० अग्रवाल, पोरवाल, खंडेलवाल.

**वाल**—पु पडदा [इं व्हाल्व]

**वालकफा**—पु पाटावरील एक वृक्ष याच्या तांबडा, जांभळा व पांढरा अशा तीन जाती आहेत

**वालका वालों-ला**—पु (कु गो) पेचा [सं वल्कल्]

**वालखिल्य**—पु अंगुष्ठमात्रप्रमाण अशा साठ हजार ऋषीं पैकीं एक व्यक्ति हे ब्रह्मदेवाचे मानसपुत्र होत 'मार्गीत वालखिल्यदि तुज येतां भेटले निराहार।'–मोआदि ४ १३० २ –न लहान मुलांचा समुदाय **०स्वामी**–पु लहान मुलांत वावरणारा वयस्कर मनुष्य

**वालथर**—वि दुर्बल पुळपुळीत पोकळ (भाषण प्रश्न) फुसके निर्वेत्र कमजोर (प्रयत्न, उपाय) [वालु+थर]

**वालदाणी-नी**—स्त्री वालुकापात्र वाळु ठेवण्याची डबी, रेतीदाणी वाळुदाणी [वालु+फा दान]

**वालपापडी**—स्त्री एक शेंगभाजी, एक भाजीचा वेल व त्याच्या शेंगा (गुज) मरचला=एक प्रकारचा घेवडा

**वालभ**—न १ प्रेम आवड प्रीति 'परि पुढें वालभाचें ओझां नाचत असे।'–ज्ञा ६ १२३ 'अहिंसेचें परमवाल्भ।'–स्वादि १ ६ १६ २ तादात्म्य [सं वल्लभ] **वालभणें**–अक्रि लोभावणें, प्रेमयुक्त होणें 'रूपाचिआ मूळी। पेंबा लक्ष्मी वालभैली।'–शिशु ३६९

**वालय वाल**—स्त्री एक जातीचें भात

**वालरस**—पु समुद्रांत राहणारा, मासे खाणारा एक प्राणी.

वालशिंगट—न. एक मासा.

वालशीट-शेट—न. मेणवत्तीचा दिवा; मेणवत्तीची ठाणवी. [इं. वॅलशेड]

वालसांबळ—स्त्री. एक शेंगभाजी.

वाला—वि. (ना.) वायला; वेगळा. 'माझा राम झाला मजहुन वाला।' –आपद ६९.

वाला—कर्ता, विक्रेता; मालक; रहिवासी; तज्ज्ञ इत्यादि अर्थ-बोधक प्रत्यय. हा नामास किंवा क्रियापदास लागतो. उदा० बोलणे-वाला; करणेवाला; देणेवाला; घेणेवाला; बंदूकवाला; पैसेवाला; अन्नवाला; दाणेवाला; दारूवाला; दिल्लीवाला; नाटकवाला. [सं वत्]

वाला-ल्हा—वि. आवडता; प्रिय. 'विसरु हा तीस वैसा याचा जाला। जीवाहूनी वाल्हा दिसतसे।'–तुगा २०. [सं. वल्लभ]

वालॉ-लो—पु. मोटेचा दोर; सोल. [का. वल्लेदोर]

वाला—वि. थोर; मोठा; उच्च. [फा. वाला=राजा, मुख्य] ०कद्र-वि. उच्च पदवीचा. –रा १५.१७१. [फा. वाला+कद्र] ०जाह-वि. सन्माननीय; श्रेष्ठ; उच्च पदवीचा. –रा १५. ३६३. ०जाही-स्त्री. थोर कीर्ति; प्रसिद्धी. 'जिकडे इन्साफ तिकडे फत्ते, हे वालाजाही झाली व जुहुरांत आलें.' –ख ७. ३५७२. ०मनाकब-वि. थोर गुणांचा; श्रेष्ठ गुणांचा. [फा. वाला+मनाकिब्] ०शान-वि. वालाजाह पहा.

वाला—पु. (गो.) पंचा. [सं. वल्कल]

वाली-ल्ही—पु. १ त्राता; रक्षणकर्ता; कैवारी; आश्रय दाता. 'अनाथाचा वाली ईश्वर.' २ मालक; धनी; पति; प्रियकर 'तूं माझा वाली इस्काची शिपायावाणी बांधलीस ढाली।'–होला .९४. [अर. वाली=राजा, मालक] ०वारस-पु. धनी; उत्तरा-धिकारी; हक्कदार; मालक (व्यापक अर्थानें).

वाली—वि. वेडा; आश्चर्यचकित; प्रेमवेडा. [अर. वालीह्]

वाली—स्त्री. (खा.) हातोड्याचें चापट टोंक.

वालीद—पु. पिता; बाप. [अर.] वालीदवारस-पु मातेवाईक. त्याच्या वालीद-वारसांच्या रक्षणाची जबाबदारी घेतली काय?'–दुर्दैवी मोहरे.

वालीप-फ—वि. (वस्त्राच्या) तंतूंचा झिरझिरीतपणा, बारीकपणा, नाजुकपणा. –स्त्री. झिरझिरीत आच्छादन; ओढणी; ओढणी; बुरखा; कौपीन. 'आंगिचेनि गौरपणें रंगली। वालीप आली पींवळी।'–शिशु २७५. 'आहाच बोलाची वालीफ फेडिजे।'–ज्ञा ६.२५. 'तेयावरी वालिपेची झुंपी।'–उषा ३४.

वालुका—स्त्री. वाळू; रेती. [सं] ०तैल-न. (वाळूचें तेल निघूं शकत नाहीं यावरून)खपुष्प, शशशृंग याप्रमाणें अशक्य गोष्ट याअर्थी हा शब्द वापरतात. ०यंत्र-न. १ वाळूचें घड्याळ; ज्यांत वाळू घातलेलीं दोन कांचपात्रें उलट सुलट बसवून केलेलें घटिकायंत्र. २ (वैद्यक) एक रसायन करावयाचें कांचेचें पात्र. ०लिंग-न. १ वाळूची शाळुंका व पिंडी. २ वाळूची केलेली खूण. [सं.]

राको. १.५२

वालुंकी—स्त्री. वालुक; काकडीची एक जात; कर्कटी. –गाथासप्तशती.

वालुसरा—पु. एक पिकांचा रोग. 'मौजे मजकुरावर वालु-सरा पडोनि पिकें गेलीं.'–समारो २.२३५.

वालूग—न. (माण.) लक्ष्मीचे किंवा बहिरोबाचे नांवानें पुष्कळ माणसें मिळून ढोल बांधून नाचतात त्यास म्हणतात. (क्रि० घालणें).

वालेंटुलें—वि. वाल्हेटुलें पहा.

वालो, वालको—पु. (कु. गो.) पंचा. वाला पहा.

वालोवाल—क्रिवि. निःशेष, समूळ; सर्व; अजीबाद; वाल पहा. [वाल+वाल] वालोवाल निसंतान-पूर्ण नाश; सर्वनाश

वाल्मीक, वाल्हा—पु. रामायणकर्ता ऋषि. 'वाल्हा विश्वा-मित्र वसिष्ठ नारद। याचें पूर्व शुद्ध काय आहे।'–तुगा ३२५०. [सं. वाल्मीकि]

वाल्ही—पु. कैवारी; रक्षक. वाली पहा.

वाल्हीटुल्ही, वाल्हेटुलें—वि. प्रिय; आवडतें, जिवलग; अपूर्व, नाजूक. 'कौतुकें कवळितां मुठी। जिये चवदा भुवनें थेकुटी। ते भ्रांति तिये धाकुटी। वाल्हीटुल्ही।'–ज्ञा ३.२४७. [सं. वल्लभ]

वाव—पु १ वायु; वारा; हवा. 'लागनां श्रीकृष्णाचा सुवावो। अवघा संसारचि होय वावो।'–एभा १.२५१; १२.३०४. २–पुस्त्री जागा; अवकाश; रीघ. 'पुढें कनकवेत्रधारी धांवोन। वाव करिती चालावया।'–ह ३३.११९. ३ सवड; अवसर; फुर-सत; योग्य वेळ. ४ (ल.) सबब; कारण; निमित्त; आधार; योग्य प्रसंग, स्थान, वेळ. ५ शिरकाव; प्रवेश; शिपाव. ६ –न. तण; कस्तण; निरुपयोगी गवत. [सं. वायु] वावझड-स्त्री. वाऱ्या-मुळें पावसाचे येणारे तुषार; शितोडे. [वाव+झड] वावझडी-स्त्री. १ वावझड; पावसाचे वाऱ्यानें आलेले तुषार, शिंतोडे. २ अशा तुषारामुळें येणारी हुडहुडी; गारठा; शिरशिरी. (क्रि० लागणें; भरणें, येणें.) [वाव+झडी]

वा(वां)व—स्त्रीन. दोन्ही हात पूर्ण पसरले असतां होणारें अंतर; लांबी मोजण्याचें एक परिमाण; ५ हात. 'पवनातें वावीं मवावें।'–ज्ञा १०.१७८; १२.६३. 'पसरूनि वृत्तिचीं वावें। दिठी रूपातें दे सेवे।'–अमृ ९ २०. 'न मिळे गुरुक धनुसीं ओ गुण सो व्यर्थ लास वावें हो।'–मोवन १०.९५. [सं. व्याम]

वाव—क्रिवि. व्यर्थ; निष्फळ; मिथ्या; निरुपयोगी. 'देह मुळीच केला वाव।'–दा १५५८. वसुनीत दुजें वावो।' –मुआदि १३७. [सं. वि+अय्]

वाव—पु विनखवल्याचा मासा. –मदुलापूर ११२.

वाव—स्त्री. (गो.) विहीर; बाव [सं. वापी]

वावकळ, वावकळणें—वायकळ, वायचळणें पहा.

वावगा—वि. १ व्यर्थ; रिकामा; पोकळ; निरुपयोगी. 'मनुष्याच्या शरीराचा अवयव वावगा नाहीं' –नि २५३. २ स्वैर; स्वच्छंदी, विपरीत, अनिर्बंध, गैरशिस्त, गबाळ (मनुष्य, कृत्य, भाषण वगैरे). [वाव]

वावट(ड)णें—अक्रि. निश्रामणें, विश्राम पावणें, निश्रांति घेणें. 'शिणली कमळा जेथ वावटे।'-ज्ञा ११.२१९. 'ऐसा जो वाडे चहूंकडे। तेव जो तो प्राणी तेथें वावडे।' –स्वादि १०.४. १६. २ लीन होणें; ओहटणें; निवृत्त होणें 'तें सुषुप्तिकाळीं वावटे। जेथें ज्ञान।' –माझा १८.४६५. 'तया नाद वावटे। आपणपयां।' –अमृ ७.१५४. [सं. वि+अय्]

वावट(टू)ळ—स्त्री. १ वाऱ्याचा भोंवरा २ वादळ; तुफान, सोसाट्याचा वारा ३ (ल.) वावगें, चंचल, लहरी, अस्थिर वर्तन, भाषण वगैरे ४ स्वैर वर्तन करणारी, भटकणारी, पायांवर नक्षत्र पडलेली स्त्री. ५-न (ल) निटाळ, आळ; तोहमत. 'कृष्णरावावर या खटल्याचें सध्या वावटळ आलें आहे.' [सं. वातुल]

वावड—वि. ओढाळ, नाठाळ; उनाड (मूल, अथवा गुरें). [वाव] ०की-स्त्री. उनाडकी, भटकेगिरी.

वावडंग—स्त्री (प्र.) वावडिंग पहा.

वावडणें—अक्रि (कों.) वावरणें, भटकणें, फिरणें (मुलें, गुरें वगैरेंनीं). 'पाचविशें धारें वावडतु।' –शिशु ५२४. 'तेही वाचा वावडे।' –अमृ ९.१९ 'सङ्कल्पा न जोडे। आणि भलतीकडे वावडे।' –दा ५.१.३७. –उक्रि. फिरविणें, परजणें, (शस्त्र वगैरे) [वाव]

वावडा—वि वातुल, वायुप्रकोप करणारा [वाय]

वावडा—वि १ अपथ्य, बाधक, अपायकारक, वर्ज्य २ (ल.) प्रतिकूल, विरुद्ध जाणारा [सं व्यावृत्ति]

वावडा—पु (नाविक) लोखंडी मोठा नांगर

वावंडा—वि रिकामा, मोकळा, व्यर्थ, सुना; कोरडा; फुकट; निष्फळ (दिवस, उद्योग, वेळ) 'नित्य मला थोडा बहुत पैका मिळतो. एक दिवस काहीं वावंडा जात नाहीं' [वाव]

वावंडा, वावंडेकरी—ओवडा, ओवडेकरी पहा

वावडिंग—स्त्री एक झाड हें पुरुषभर उंच वाढतें पानें लांबट असतात –न या झाडाचें बीं हें कृमिनाशक असून जुलाबर देतात [स विडंग, हिं वायविडंग, ब विडंग, गु वावडींग, का वायुविडंग, ते वायुविडंगमु]

वावडी—स्त्री. १ पतंग, आकाशांत वाऱ्यानें उडवावयाचें कागदाचें एक खेळणें. 'वावडी उडे अंबरीं।' –मंयराज १०८.२ धान्य वारवण्याकरितां केलेली तीन पायांची उंच घडवंची. [वायु, वाव] ०करणें–फजिती करणें, पतावळ उडविणें, घोड्याला ढकलून देणें; लज्जित करणें.

वावडी—स्त्री लहान विहीर, बावडी. [सं. वापी]

वावडें—न. १ वातरोग, संधिवात, पेटके, गोळे. २ अपथ्यकारक पदार्थ, कुपथ्यापासून झालेला रोग. ३ (ल) वर्जनीय, त्याज्य गोष्ट; हानिकारक गोष्ट. 'त्याला खेळाचें वावडें आहे.' [वाव, वायु. व्यावृत्तक]

वावंढळ, वावंढा—वि वावडें; वावगें. [वाव]

वाव(व्ह)णें-नें—न (व.) धुराडें, धारें 'वावनावा उजियेंनु पडे।' –वृद्धासंगमलीळा ११. [वायु–वाव]

वावदळ—न. प्र. वादळ पहा. 'वावदळू पडूनि ठाये। सावळु डाहारला आहे। तैसें तीरा तो साये। जें वावेविण रुपे।' –ज्ञा १७.१४३. वावदळणें–अक्रि सैरावैरा धावणें 'घोडा इकडे तिकडे वावदळत चालला.' –लोकमित्र १८९६.

वावदूक—वि. १ बोलका; वाचाळ, बडबड्या, बहुभाषी. [सं]

वावधण–न, वाउधाण, वावधाण-धान, वावधणी वावधूळ—नस्त्री. वावटळ, वादळ, वाहदळ, तुफान, वायधूळ; चक्रवात. 'अग्निमाला वाउधाणा। वरपडा जैसा।' –ज्ञा १७. १९३ 'वावधणीतें उपणावें' –मयराज ८९.

वावनी—पु घोर. –मनको

वावन्स—न खद्रासारखा पण फार मोठा मासा, एक माशाची जात.

वाववाय—पु एक वृक्ष

वावभिडंग—स्त्रीन वावडिंग पहा.

वावर—न शेत, मळा; कुरण, लागवडीची जमीन, रान 'ठाके वाजूस वावरांत पडक्या देवालयीं मारुती।' –विवि ५८. ८ [सं. व्याप्ट-वापर]

वावर—पु १ राबता, वापर, वर्दळ, हालचाल, २ उद्योग, व्यवहार, कामधंदा, घरकाम [स व्यापार] वावरणें–उक्रि १ वापर करणें, काम करणें, उद्योग, कामधंदा करणें, राबणें, हिंडणें; फिरणें 'तरी याहीं आपुलिये चाडें। वावरों नये।' –शिशु १८५ २ उपयोगात येणें, आणणें, काम करणें, लागू होणें, प्रहार करणें, वापरणें 'देवा नवनिशतीं शरीं। वावरोनि याच्या जिव्हारीं।' –ज्ञा २.४८ वावरिजे(जे)णें–अक्रि व्यवहार करणें, वापरणें 'तेथ नादासळु तुटी। मा वावरिजेल ओठीं। हे कें आहे।' –अमृ ५.६३. वावरभारा-पु (माण) कणसाड

कडवा गोळा करतांना एक भारा महार आपल्या करिता ठेवतो तो

**वावरमोड**–स्त्री. फाल्गुनापासुन ज्येष्ठापर्यंत ( मृगापर्यंत ) फुळवून वगैरे पावसाळ्यांत जमीन पड ठेवावयाची यास म्हणतात ( क्रि० राखणें ) **वावरी**–स्त्री. शेतांतील,वावरांतील काळी माती. घटस्थापनेच्या वेळीं उपयोग. [ वावर ]

**वावराडी**—स्त्री. ( गो. ) मोलकरीण.

**वावरी, वावरीचें जाळें**—स्त्रीन (कों.) एक खुप लांब जाळें. वुरीच्या जाळ्याप्रमाणें यास नांगर नसतो व हें खुंटयास बांधतात.

**वावरूल-ळ**—न. वाहुळ. ' कोण्हे येके वावरुलि । '-पंच ३.१३. ' पक्षिये करीति अविसाळे । वोळींवें वावरुळें । ' -भाए ४९०.

**वावरें**—क्रिवि. व्यर्थ; फुकट; निष्फळ ' तान मान हें तुफान वेवधान वावरें । ' -दावि १२२.

**वावरें**—न. एक लहान जाळें.

**वावली**—स्त्री. १ ( गो. ) विडी. २ केळीचा दोर

**वावली**—स्त्री. विस्तार. -मनको.

**वावली**—स्त्री. (खा.) विहीर. ' भिल्ल समाजाकरितां... नदीचे पात्रात हातानें खोदून ज्या वावल्या करतात... '-केसरी ६.१०.३६. [ सं. वापी ]

**वावशी**—स्त्री. १ ( कों. ) डोळयातील शैत्य, थंडी, सारा. (क्रि० धरणें). २ डोळयांतील फूल, डाग, ठिपका. (क्रि० येणें). [ सं. वाव-वायु ] **वावसंडणें**–अक्रि. वारवणें; वाऱ्यानें कोरडें होणें; वाऱ्यावर वाळणें. [ वाव ]

**वावसळणें**—अक्रि. वावचळणें, भ्रमिष्ट, वेडें होणें, चळ लागणें, चाळे करणें. [ वाव-वायु ] **वावसा**–वि. १ भ्रमिष्ट; मूर्ख; वेडगळ. ' तेथें वावशासारखी नजर टाकून ती माजघरात गेली. ' -कोरकि ३००. २ अनिश्चित; चंचल, अस्थिर. ३ अव्यवस्थित; गवाळा; अस्ताव्यस्त, गैरशिस्त ( कारभार, वर्तन, भाषण, परिस्थिति ). **वावसी**–वि. निष्फळ; फुकट. **वावसें**–न. वेड, भ्रम. ( क्रि० भरणें ).

**वावसाव**—पु. कामधंदा; उद्योग; व्यापार; व्यवहार. [ सं. व्यवसाय ]

**वावसें**—न. (कों.) तीन कोंपऱ्या झुंमाचें गुंडाळें. ' दोन वावशी झुंभ असलें म्हणजे एका बाजेची बेगमी होईल ' [ वांव ]

**वावहणें**—अक्रि. पळणें, पळून जाणें. ' देखोनि ईला हरि वावहाला । ' -सारुह १. ७४. [ वाहवणें ? वाव=वायु ? ]

**वावळ**—स्त्री. (गो.) पुष्कळ गऱ्या एकत्र पंक्तिनें ओवून केलेलें मासे पकडावयाचें साधन.

**वावळ-ळा**—पु. एक इमारती लाकडाचा वृक्ष. याचीं पानें नाण्याच्या पानासारखीं लांबट व दर्पयुक्त असतात.

**वावळी**—स्त्री. ( गो. ) केळीचा दोर. वावली पहा.

**वावळें**—न. ( राजा. ) पड जमीन; गदेताळ जमीन.

**वावाची अवटी**—स्त्री. (सोनार) वावा करण्याची अवटी, ठसा वायाची अवटी पहा.

**वावाची माशी**—स्त्री. १ गवाळ, ओंगळ स्त्री, वेश्या; पोतेरें, जोगम्मा; माभळभटीण. २ सोनकिडा.

**वावारणें**—उक्रि. (कु) वावरणें पहा.

**वावी**—स्त्री. गवाक्ष, खिडकी, झरोका. [ वाव ]

**वावीर**—न १ भाताचें निक्स शेत; निक्स मांडीव; योंत भात वरवशीप्रमाणें पेरतात व लावणी करीत नाहींत. २ रोह; मोड आलेलें भात ( पेरण्याकरिता ). ३ तण; निरुपयोगी झाडेंझुडपें. [ वाव-वायु ]

**वावुगा**—वि. वावगा पहा. ' दे टाकनि हे छद वावुगे फंद। ' -अफला ६१.

**वावून**—न. धारें. वावणें पहा

**वावो**—क्रिवि. व्यर्थ. वाव पहा. ' हे अवघेचि वावो। ' -भाए ५८.

**वावोवावीं**—क्रिवि. जेथें तेथें, सर्वत्र. ' पवनमेवा वावोवावीं निरंतर। ' -सिसं ५२३३. [ वाव द्वि ]

**वाव्य**—क्रिवि. वायव्य. ' संभुमात्रा वाव्यकोणीं । ' -उषा ९८. [ सं. वायव्य ]

**वाम्र, वाम्राडी**—पु ( गो. ) वावर, वावराडी पहा.

**वाव्हटळ-टूळ**—स्त्री. वावटळ पहा.

**वाव्हण, वाव्हणी, वाव्हणें, वाव्हरा**—प्र. वाहण, वाहवणी, वाहवणें, वाहवरा. वाहणें पहा.

**वाव्हा**—उद्गा (प्र ) वाहवा पहा. शाबास; भले; उत्तमोत्तम. -राव्य. ' वाव्हा फार चांगलें शुद्ध म्हटलें । ' -वाळ २. १७४. ' वाव्हां वाव्हा वदती घडी घडी । ' -दावि ३४५.

**वाश**—स्त्री. वाट, वाम पहा. ' कव्हणाची पाहों वाश । अनाथे आम्हीं । ' -ऋ २८.

**वांशिक**—वि वंशसंबंधी. १ कुलासंबंधीं, घराण्यासंबंधी. २ बांबूचे, कळकाचें; कळकासंबंधी. [ वंश=१ कुल २ बांबू ]

**वाशिंग**—न (विणकाम) नकशीच्या खोपळयास व धकाच्या दोरीच्या ताणास जी मध्यें दोरी असते तीस वाशिंग म्हणतात.

**वाशिष्ठ**—पु. वसिष्ठ गोत्रांतील मनुष्य.

**वांशीक**—न. घरावरील वाशाची रचना. घराच्या छपराचा सांगाडा. [ सं. वंश; म. वाशा ]

**वाशील**—वि उणें, कमी, वजा (क्रि० करणें, होणें, पडणें) [अर वासील] ०**वाकी**-स्त्री शिल्लक, शिल्लक काढणें (क्रि० करणें)

**वाशेरा-ळा, वासट**—वि वाईट वास येणारा, घुरसट, दुर्गंधियुक्त, घाणेरा [वास]

**वास**—पु १ गंध, परिमळ, पुष्पादिकाचा बरावाईट गंध, दर्प. २ (ल) झाक; छटा, स्वाद अंश, सुगावा; रूप, अस्तित्वाचा दर्शक अंश वगैरे 'तिज क्रोधाचा वास काय आला' –नाल्कु ३ ८४ ३ अवशिष्ट अंश, अल्पांश, लेश, किंचित्हि भाग 'विहिरींत पाण्याचा वास नाहीं' ४ हिंग (रात्रीचे वेळीं सांकेतिक नांव) [स वास्=गंध सुटणें] **वास काढणें-घेणें-पाहणें-शोधणें लावणें**-माग काढणें, सुगावा, पत्ता लावणें **वास निघणें-लागणें**-पत्ता लागणें, सापडणें **वास मारणें**-दुर्गंध येणें;घाण येणें **वास सुटणें**-चांगला वास येणें, सुगंध येणें, दरवळणें, घमघमाट सुटणें **वासाचा**-वि झाक, छटा, रूप, गुण वगैरे असलेला **वासाचें पोतें**-न १ (पदार्थाचा अभाव असून केवळ वास राहिला आहे अशी वस्तु यावरून ल) श्रीमंती जाऊन गरीब झालेला मनुष्य, गरीब मनुष्य २ (वास असलेली वस्तु यावरून ल) श्रीमंत, गबर मनुष्य **वासकट, वासट**-वि १ दुर्गंधयुक्त, घाणेरा, वाईट वास येणारा २ वाशेरा-ळा पहा **वासन**-न सुवासिक करण्याची क्रिया, गंधयुक्त करण्याची क्रिया, सुगंधित करणें [स वास्] **वास वारा**-पु अत्यंत अल्प अंश केवळ वास (निषेधात्मक उपयोग) [वास+वारा] **वासळणें**-अक्रि (फळें वगैरे पक्कदशेस आल्यामुळें) गंध पसरणें, दरवळ लागणें (पर्याय) वासाडणें [वास] **वासाळ**-वि वाशेरा-ळा पहा **वासित**-वि सुगंधित, सुगंधयुक्त, वास लावलेलें [वास]

**वास**—पु वस्ती, वास्तव्य, रहिवास, राहणें, निवास, मुक्काम, घर, बिऱ्हाड, आश्रय, स्थान 'असें विदित वास ही मज सदा धर्मीचा करा।' –केका २२ [स वस्=राहणें] **वासन**-न १ निवास, वस्ती, रहिवास २ ध्यानाची स्थिति, आसन [स वस्=राहणें] **वासी**-वि वसणारा, राहणारा; वस्ती केलेला (समासांत) वनवासी, गृहवासी, कैलासवासी, वृक्षवासी **वासु**-पु वास्तव्य, वास पहा [स वस्=राहणें]

**वास**—स्त्री १ वाट, मार्ग प्रतीक्षा 'आझा कृतांता वास पाहो नए।' –ऋ ७ 'वास न पाहाती काळदूत।' –उषा १६५६ 'इहीं आमुची वास पहावी।' –ज्ञा ३ १६७ २ चर्या, चेहरा मुद्रा 'तव देवें हास्य केलें उद्धवदेवाची पाहिली वास।' –धवळेपू ४५४ 'एसें तो विस्ताओ योलतु वास पाहे गुरूची।' –शिपू १४३८ ३ क्रम रीति –माज्ञा १६ १८७ [स वस्]

**वास**—पु ली वस्त्र, कपडा –एभा १२ ५३८ [स वासस्=वस्त्र] **वासित**-वि वस्त्र नेसलेलें, आच्छादित [स वासस्]

**वासकटी, वासटी**—स्त्री लहान वासा, बारीक वासा. [स वंश, म वासा]

**वासकसज्जिका**—स्त्री एक प्रकारची नायिका; प्रियसंगमोत्सुक स्त्री; नटलेली, वस्त्रें, शृंगार करून तयार असलेली 'होतिआ बहुती वासकसज्जिका।' –शिशु १५२ [स]

**वासकूट**—न बिन बाह्यांचा आखूड आंगरखा, जाकीट 'इंग्रजी वासकूट घालणें आमच्या तरुणांना आवडूं लागलें।' –नि ११३ [इं वेस्ट कोट]

**वासणें**—उक्रि उघडणें, पसरणें, मोठें करणें, फाडणें (तोंड, भोंक, छिद्र, फट वगैरे) –अक्रि १ विद्रुपता व्यंजक, प्रमाणबाह्य उघडणें, पसरणें, विस्तारणें (तोंड, डोळे, भोंक, तगडया, बोटें वगैरे) 'आम्ही कोणापाशीं तोंड वासूं।' –तुगा ५७२ २ (ल) दिवाळें निघणें, नाश होणें, बसणें (धंदा, व्यापार) [स वि+अस्–फेंकणें]

**वासंत, वासंतिक**—वि वसंतऋतुसंबंधीं, वसंतविषयक [स वसंत]

**वासन**—न १ कापडाचें दिंड ज्या वस्त्रांत बांधतात तें वस्त्र, गाठोडयाचें फडकें, बासन २ सामान्यतः कोणतेंहि वस्त्र, कपडा, कापड [स वसन] **वासनी**-वि वासन करण्यास योग्य, गाठोडें बांधण्यासारखा; रुमाल करण्याच्या उपयोगी 'वासनी खारवा'

**वासनवेल**—स्त्री तान्हीचा वेल, भुईंपाडळ, पातालगरुडी या वेलीच्या टोपल्या करतात –वगु ५ ६७ [वासन+वेल]

**वासना**—स्त्री १ मनाचा कल, प्रवृत्ति, स्वभाव, चित्तस्वभाव 'वासनेसारखें फळ' 'कर्म करणाऱ्या पुरुषाची वासना किती शुद्ध आहे हें पाहूनच ठरविली पाहिजे' –गीर ४७९ २ इच्छा, वांच्छा, अंतःकरणप्रवृत्ति 'चित्तीं धरिली वासना। सिद्धि न्यावी नारायणा।' 'मना वासना दुष्ट कामा नये रे।' –राम ४ ३ परिचय; पारंगतता, अभ्यास, ज्ञान; प्रावीण्य, संस्कार उदा० शास्त्रवासना, गणितवासना, न्यायवासना 'कांहीं शास्त्राची वासना असली म्हणजे बोलणें प्रौढ पडतें' ४ मृत्युसमयींची इच्छा हेतु आकांक्षा [स](वास्) ०**ओढाळ असणें**-मनाची अनेक ठिकाणीं तीव्र प्रवृत्ति होणें, निरनिराळ्या तीव्र इच्छा उत्पन्न होणें ०**फजीत होणें**-कधींच इच्छा पूर्ण होणें अर्धवट तृप्ति होणें, आकांक्षा विफल होणें ०**फोडणें-मारणें**-इच्छेचा नाश करणें, आकांक्षा दडपून टाकणें, सर्व प्रवृत्ति निरोधून टाकणें

**वासपणें**—अक्रि भिणें वासिपणें पहा

**वासपूस**—स्त्री. वास्तपुस्त पहा. चौकशी; विचारपूस. (क्रि० करणें; घेणें).

**वासंबा, वासमसडी**—पुस्त्री. (गो.) एक भाजीचा वेल.

**वासर**—पु. १ दिवस. 'होती वासर दीर्घ जे धनपति द्वारीं तयां प्रार्थितां।'—वामन, स्फुटश्लोक (नवनीत पृ १४१). २ वार. 'वासर असत सौम्य।'—रामदासी २.६०. 'ते मध्य घावेरिचा वासर सौम्य जागा।'—देपद ४६. ०मणि-पु. सूर्य [सं.]

**वासरी**—स्त्री. (गो.) ओसरी; ओटी; पडवी; माजघर. [सं. वस्]

**वासरूं, वांसरूं**—न. १ गाईचें पारडूं; जावपें; पोर, वघडें. २ (लाडिकपणें). वत्स; बालक, लहान मूल. 'मन्माताशि म्हणे रे, हो न यशोहानि वासरा। मन मीं।...'—मोउद्योग १३.१६७. 'म्हणे वासरा घात झाला असारे।'—वामन भरतभाव १५. [सं. वत्स; प्रा. वच्छ; पं. वच्छा; सिं. वछ; हिं. बाछा; बटा; वछ; गु. वछ, वाछरडुं; बं. बाछुर; उ बाछुरी] **वासुर-करीण**-स्त्री. १ पिलें वासरूं असलेली गाय किंवा म्हैस. २ जिला पान्हवावयास वासरूं लागतें (आंबोणानें केवळ पान्हवत नाहीं) अशी गाय किंवा म्हैस. [वासरूं] **वासुरटें**-न. (चांभारी) वासराचें चामडें, कातडें. [वासरूं] **वासुरू**-न. वासरूं पहा. वासुर्लें-वासरें. 'राखे वासुरुवें।'—दाव ६६.

**वासरूं**—न. १ (नाविक) शिडाच्या दोरखंडाच्या टोंकास बांधलेला एक लांकडी दांडा. २ (नाविक) दमान बांधलेली दोरी. 'वासरूं जोरानें खेचल्यावरोबर केळीचे वद (शिडाला बांधलेले) तटातट तुटतात. शीड मोकळें होतें.'

**वासला**—पु सुताराचें लांकूड तासण्याचें हत्यार; वाकस.

**वासलात-द, वासलत**—स्त्री. १ वसूल; जमा; उत्पन्न व त्याचा हिशोब, जमाखर्च. 'तहापासोन वासलातीचा ऐवजही माघारा देविला.'—रा ७. २ हिशोब लिहितांना काढावयाची एक रेघ (या रेघेच्या आरंभीं मोडी वा हें अक्षर असतें). या रेघेप्रमाणें एकोणात, दद्दारी, बीत हीं दुसऱ्या रेघांचीं नांवें आहेत. रेघ पहा. ३ हकीकत; गोष्ट; खटला; कज्जा; काम. ४ निकाल; शेवट; फैसला. 'वादविवादाचे जे पर्वत माजले आहेत त्यांची वासलाद कशी लावावयाची.'—आगर १.५६. ५ व्यवस्था; तजवीज. 'त्याना आपल्या हिशाची वाटेल ती वासलात लावतां येईल.'—पक्का ५७. ६ परिणाम; अखेर. 'त्या निकालाची जी वासलात होईल तीच .. कार्याकार्य निर्णयाची होईल.'—गीर १२४. ०लावणें-१ निकाल लावणें; फन्ना करणें. [अर. वासिलात्] २ लांबलचक हकीकत सांगत येणें; कंटाळवाणी कथा लावणें.

**वांसली**—स्त्री. (गो.) लहान वांसा. [वांसा]

**वासव**—पु. इंद्र. 'धर्म म्हणे सिद्धि भजे यन्मंत्रा जेवि वासवा रंभा।'—मोसभा १.५३. [सं.] **वासवी शक्ति**-स्त्री. १ इंद्रानें दिलेलें एक अमोघ शस्त्र. २ (हें कर्णास मिळालें असून तें हटकून परिणामकारी व्हावयाचें होतें. यावरून ल.) अमोघ शस्त्र; हटकून परिणामकारक होणारी गोष्ट.

**वासा, वांसा**—पु. १ दांडी; काठी; सोट; वेळू; बांबू; घराच्या आढ्यापासून वळचणीपर्यंत जोडलेला तीर, सोट, दांडा. 'गृहा पांच वासे असे एक आडें।'—कचेसुच २. २ (ल.) पृष्ठवंश; पाठीचा कणा. ३ (ल.) नाकाचें हाड. ४ (ल.) मोठी लेखणी. [सं. वंश] म्ह० खाल्ल्या घरचे वासे मोजणें=कृतघ्नपणा करणें. **वासेबीं**-न वंशबीज; कळकाचें, वेळूचें बीं; एक उपधान्य. [सं. वंशबीज] **वासोंडी-ळी**-स्त्री. लहान वासा; निरुपयोगी; निकामी वांसा. [सं. वंश; म. वांसा]

**वासिप-पु**—पुन. भय; भीति; वचक. 'जो मी काळाचियाही तोंडा। वासिपु न धरी।'—ज्ञा ११.३८७. **वासिपणें**-अक्रि. भिणें 'समुद्र जरी वासिपे।'—विपू ७.४७. 'ज्या मज संहाररुद्र वासिपे। ज्या मज भेणें मृत्यु लपे।'—ज्ञा ११.३५१. 'तुका करी जागा। नको वासपूं वाउगा।'—तुगा ३८६६. [सं. वत्सप्राय होणें]

**वासि(सी)ल, वासि(सी)ल बाकी, वासिलात**—वाशील, वाशीलबाकी, वासलात पहा.

**वासो**—वि. व्यर्थ; निष्फळ.

**वासुकी**—पु. सर्पाचा राजा.

**वासुके**—न हंसपाद.

**वासुदेव**—पु १ विशेषनाम; श्रीकृष्ण. २ मोरांच्या पिसांची लांब टोपी घालून भिक्षा मागणारी एक जात.

**वासे**—न. लांब बांसास लांकडी करवतीसारखे कोयते जोडून केलेलें हत्यार. [वंश]

**वासोंडी**—स्त्री. (म.) खरवडी.

**वास्कट**—न. वासकूट पहा. [इं. वेस्टकोट]

**वास्ट**—वि. (गो.) वाईट; वांकडें. **वास्टेपण**-न. वांकडेपणा.

**वास्त, वास्ता**—स्त्री. विचारपूस; चौकशी; काळजी; काळजी. (क्रि० टाकणें; टाकून देणें; सोडणें). 'तो वादास प्रवृत्त होतो म्हणून कर्जाची वास्त सोडली.' 'त्या कोणाचीहि वास्ता ठेविली नाहीं.' [पुस्त शब्दाची द्विरुक्ति होऊन वास्त पुस्त शब्द होतो त्यावरून हा शब्द बनला आहे] **वास्तपुस्त**-स्त्री विचारपूस; चौकशी 'सहा महिनेपर्यंत या माणसानें बायकोची वास्तपुस्त केली नाहीं.'—मादेचा बाजार. [सं. पृष्; हिं. पुछापाछा]

वास्तव—वि. १ प्रत्यक्ष; खरोखरीचें; वास्तविक; मूळचें, खरें. ' प्रकार वास्तव दिसतो कसा हे प्रत्यक्ष पहावें । ' –मराठी सहावें पुस्तक पृ. ४३७. २ भरींव; मुख्य; पोकळ, दिखाऊ टाकाऊ नव्हे असें. [ सं. वस्तु-वास्तव ] ०क्षितिज-न. दृश्य गोलार्धापासून अदृश्य गोलार्धास निराळें करणारें वर्तुळ. –मराठी सहावें पुस्तक, पृ. ३१४.

वास्तवशास्त्र—न. वस्तु आणि शक्ति किंवा तेज यां विषयीं विवरण करणारें शास्त्र. यांत उष्णता, प्रकाश, ध्वनि, वीज इत्यांचा समावेश होतो. –केसरी ३०.६.३६.

वास्तविक—वि. १ यथार्थ; प्रत्यक्ष; खरोखर; सत्य. २ वस्तुस्थितीस धरून; योग्य; न्याय्य; रास्त; बरोबर. ०सत्ता-स्त्री. नित्य किंवा सत्य तत्त्व, खरें अस्तित्व. वस्तुसत्ता पहा.

वास्तवान—पु. रहिवासी; वास्तव्य करणारा; राहणारा. ' सकळ कलेनें असतोसी । वस्तींत वसतोसि वास्तवान । ' –ज्ञानप्रदीप ३३७.

वास्तव्य—न. १ वसति; राहणें; निवास. २ वसतिस्थान; राहण्याची जागा; निवास. –वि. वसतीस योग्य, अवश्य, शक्य. [ सं. वस्=राहणें ]

वास्तह, वास्ता—पु मध्यस्थी; कारण. ' तुमचे वास्ता दरम्यान आहे यांजकरितां तहमूज आला, नाहीं तरी याचा तदारूक करणें लाजम आहे. ' –रा २२.६१. [ अर. ]

वास्तु—स्त्री न घर, वसतिस्थान; राहण्याची जागा. निवासस्थान, गृह [ स वस्=राहणें ] सामासशब्द- ०देवता-पुरुष-स्त्री.पु. १ निवासस्थानाची, घराची अधिष्ठात्री देवता; स्थानदेवता, गृहदेवता. २ गृहदेवतेची लहानशी प्रतिमा. ०प्रवेश-पु नवीन घरात रहावयास जाण्याचा विधि, समारंभ. ०विद्या-स्त्री. शिल्पशास्त्र, घर बांधण्याचें शास्त्र, ज्ञान, कला, गृहरचनाशास्त्र. ०विधान-न. घर, वास, वास्तव्य ' केलें वास्तुविधान एणनयनगात्रीं वसाया भलें । ' –विठ्ठल, रसमंजरी ४. ०शांत, शांति-स्त्री. नवीन घरात रहावयास जाण्याच्या वेळीं करावयाचा एक विधि; नवीन गृहदेवतेची वगैरे शांति; स्थानदेवताची पूजा वगैरे. ०शास्त्र-न. शिल्पशास्त्र, स्थापत्यशास्त्र, घर बांधण्याची कला, विद्या. ०सौंदर्यशास्त्र-न सुंदर इमारती वगैरे बांधण्याचें शास्त्र; गृहमंडनशास्त्र.

वास्तु-स्तू—शअ. नें; कडून; तृतीयाबोधक अव्यय. [ अर. वास्तह् ]

वास्ते—शअ. साठीं, करितां. ' कित्येक पोरीस मस्लतीच्या मजमुना व म्तै अजन गोवो विठ्ठल याम किरस्ताद केले असत..' –पया ३८७. [ अर. वासिता ]

वास्तेय—वि. ओटीपोटासंबंधीं; पोटाच्या खालच्या भागा संबंधीं. [ सं. वस्ती ]

वांस्वेल—न. (गो.) आस्वल. [ आस्वल ]

वाह—उद्गा. ओहो ! शाबास ! भले ! [ फा. वाह् ]

वाह—पु. गति. ' अघोरंध्राचेनि वाहे । ' –ज्ञा १८.३३८. [ सं. वह् ]

वाह, वाहक—पु. नेणारा; वाहून नेणारा; हमाल. –वि. वाहणारा; वाहून नेणारा. (समासांत) रथ-भार-शव-वाहक. वाहक(त्व)-न. उष्णता, विद्युत् इत्यादि वाहून नेण्याचा धर्म. वाहक शक्ति-स्त्री. उष्णता, विद्युत् इत्यादि वाहून नेण्याचें सामर्थ्य, गुण.

वाहदळ-दूळ-टोळ-डूळ—स्त्री वादळ; तुफान; सोसाट्याचा वारा. [ सं. वातुल ]

वाहडणें—क्रि. (प्र.) वाढणें पहा. ' जालें वाहडणें संकल्प जोडणें । ' –दावि १७५.

वाहण, वाहाण—स्त्री. चप्पल; पादत्राण; पादुका. ' ते विंचो आडोचिया न लेचि वाहणा । ' –ज्ञा १२९. (–मव.) वाहाणा. [ सं उपानहौ=वाहणा ] ०घर-पु जोडे उचलणारा. ' जीवें संतांचें होत । वाहणघर । ' –ज्ञा १३.११३२.

वाहण—न. मार्ग; गति; रीत. ' अनुसरले या मार्गिचे वाहणीं । ' –ज्ञा ६.३३८. ' ऐका सुंदर काहणी चतुर हो भक्ताचिया वाहणी । ' –आ मृगीचरित्र १. [ सं. वह् ] वाह( हा )णी, वाहण, वाहणें-स्त्रीन. १ प्रवाह; ओढा, ओघळ; लोंढा. ' आपण पडे पाहे वाहणींत । ' –दावि ७७१. ' कां वसंताचिया वाहाणीं । ' –ज्ञा १६.१६४. २ पीक वगैरे वाहून नेण्याची क्रिया; नेणें. [ सं. वह् ]

वाह( हा )णी—स्त्री. १ (ल.) मार्ग; प्रकार, रीत; पद्धत; क्रम. ' एवं धर्माचिया वाहणी । गाळूं आदरिलें पाणी । ' –ज्ञा १३.२३४. ' म्हणोनि इया वाहणी । केली म्यां उपलवणी । ' –ज्ञा १३.८५२. [ सं. वह् ]

वाहणें—उक्रि. १ उचलून नेणें; एका जागेवरून उचलून दुसऱ्याजागीं नेऊन ठेवणें. ' वाहतिये वेळे जड । शिदोरी जैसी ।' –ज्ञा १८.१८५.–एभा ३.८७. ' शीतलजल कलश शीघ्र वाहोन ।' –मोभीष्म १२.४. २ भार सहन करणें, सोसणें; आधार देणें; आश्रय देणें. ' गेल्या पळोनि गायी पृष्ठावरि पुच्छभार वाहोनी । ' –मोविराट ४.८८. ३ मनात बाळगणें, धरणें. ' परी ते चाड एकी जरी वाहे । ' –ज्ञा ४.१९५ ' वाहतसे हृदयाब्जीं अत्युत्सुक मीं ' –मोमंभा २.३२. ' मरे येक त्याचा दुजा शोक वाहे । ' –राम १७. ४ चालू ठेवणें; पुढें चालविणें (व्यवहार, धंदा वगैरे). ५ अर्पण करणें; पूजेमध्यें देणें; पुढें ठेवणें. ' उडवी किरीट विधिनें जें

निर्मुनि यासी वाहिलें होतें ।' –मोकर्ण ४७ ७६ ' वाहुनि मस्तक धरणीं ।' –मोअनु ४.५५ ६ (शपथ) घेणें ७ देऊन टाकणें, स्वत्वनिवृत्ति करणें, टाकून देणें, सोडून देणें, त्याग करणें ८ काढून देणें; पुढें करणें, स्वत जवळचें देणें ' जामीन रहा आणि गाठेचें वाहा ' ९ चढविणें, बसविणें, सज्ज करणें ( धनुष्यास गुण वगैरे ) ' कैकेयाचीं चापें राहुनी...अन्य धनुर्ध्ये वाहुनी ते ।' –मोकर्ण ९ ८ ' जो या धनुष्या वाहील गुण ।' –रावि ७ ५४. १० ( जमीन ) वसणें, लागवडीस आणणें, पेरणें, मशागत करणें. ' काय जाहालें न वाहता भुईं पेरिजे ।' –ज्ञा ११ १६२ ११ धारण करणें, नेसणें, वापरणें ' वाहे वल्कल जटा ।' –मोरामायणें २३. ' हे विपरीताक्षिति असतीसी नवनवा गुणा वाहे ।' –मोमभा १ ७३. १२ चालविणें, उपयोग करणें. ' शेती घाणे वाहती ।' –पाटण शिलालेख १३ इच्छा करणें, चाल करणें ' मग तेणें विक्रमसेनु प्रौढवर्धनावरि सवळु वाहौनु आला ।' –पंच १ ३२ चिंता वाहणें–काळजी वाहणें, अस्वस्थता वाळगणें वाहणें–अक्रि १ वारा, पाणी हलणें, एका जागेवरून दुसऱ्या जागीं जाणें, सरकणें, पुढें जाणें, गतिमान् असणें ( सैन्य, पशूंची, गाड्याची रांग वगैरे ) ' वाहे हिममद सुगध पवन ' –मोभीष्म ११ ८७ २ ( नाक, व्रण, गळतें भांडें यातून ) पाणी, पू वगैरे बाहेर येणें, स्रवणें, पाझरणें; गळणें, ठिबकणें ३ एका दिशेनें जाणें, लांबवर पसरणें, रांगेनें असणें ( रस्ता, किनारा, डोंगराची रांग ) ' परमाणु वाहाती सदैवें । जेआलागीं । ' –ऋ १०० ४ चालू असणें; गति मान असणें, कार्य करीत राहणें ( यत्र, हत्यार, साधन ) ५ तीक्ष्ण असणें, उपयोग होण्याच्या स्थितींत असणें, धार असणें ( शस्त्र, हत्यार वगैरे ) ६ प्राप्त होणें, चालू असणें ' रुपयाचें दीड शेर पाणी अशी कठिण वेळा वाहली ' –ऐपो २२५ [ स वह् ] वाहता झरा–री–पुस्त्री जिवत झरा, ज्यातून नेहमीं पाणी वाहात असतें असा झरा, प्रवाह २ चालू प्रवाह, वर्षाव ( देणगी, खर्च वगैरेचा ), चालू पुरवठा, रेलचेल; चगाळी वाहतवणा–पु रानांतुन चालणारा; प्रवासी ' आणि जन्मशताचा वाहतवणा ।' –ज्ञा ७ १२९ वाहत वाटोळें–न १ जुजवी किंवा तात्पुरती व्यवस्था, दुरुस्ती, उपाययोजना, मिटवामिटव ( वाद, भाडण, रोग यासबंधी कामचलाऊ योजना ) २ आरभ, सुरुवात, चालू होण्याची क्रिया ( काम, धंदा वगैरेची ) ३ सत्यानाश, पूर्ण नाश, फन्ना, वाटोळें ( धदा, कार्य, व्यवहार, सत्ता वगैरेचा ) वाहता–वि १ मोकळेपणानें वावरणारें, हलणारें, फिरणारें, वागणारें; तीक्ष्ण धारेचें, कुशाग्र ( शस्त्र, बुद्धि वगैरे ) उदा० वाहती कुन्हाड २ चालू कार्य करीत असलेलें, चालन, सुरू ( काम, धदा, व्यवहार, कारखाना वगैरे ) वाहता घाणा–पु चालू असलेला, उपयोगात असलेला तेलाचा घाणा वाहता झरा, वाहती झरी–वाहत झरा पहा वाहता रस्ता–पु रहदारीचा रस्ता. वाहती–स्त्री. १ प्रारभ, सुरुवात. २ चाल, वहिवाट, शिरस्ता; प्रघात. वाहतीकूस–स्त्री गर्भधारणा करण्यास योग्य अशी स्त्रीची अवस्था, मुलें व्हावयास लागण्याची अवस्था. ' एकदां वाहतीकूस झाली म्हणजे वाटेल तितकीं मुलें होतील ' 'पावसाची वाहतीकूस झाली '=पावसाळा सुरू झाला वाहतीगंगा–स्त्री. अनुकूल परिस्थिति, चालू काम, भरभराटलेला धदा; सुकाळ, चंगळ, सपनता (क्रि०चालणें, होणें ) वाहत्यागंगेंत हात धुवून घेणें–अनुकूल काल असेल तों आपलें कार्य साधून घेणें वाहती धार–१ तीक्ष्ण पाजळलेली धार (हत्याराची), याच्याउलट पडती धार २ वाहत असलेला, चालू असलेला पाण्याचा प्रवाह ( नदी, ओढा वगैरेचा ), पाणी, रस वगैरेचा पडता प्रवाह, स्रोत ३ ( ल ) धंद्याची, कामाची चलती, भरभराट, घाई, धुमश्चक्री उदा० लढाईची–धर्माची–वादाची–वाहती धार वाहती वाट–स्त्री १ रहदारीचा रस्ता, मोकळा, वद न केलेला रस्ता, चालू रस्ता २ मुलें होत असलेला स्त्रीचा गर्भाशय, कूस ३ ( ल ) सुरुवात; आरभ, ओनामा ( धदा, व्यवहार इत्यादींचा ) वाहतु(तू)क–स्त्री रहदारी, येजा, वापर, नेआण –पु वाहणारा, लाकडाची नेआण करणारा. –नस्त्री व'हतुकीची मजुरी. वाहतुरा–वि वाहती, तीक्ष्ण ( शस्त्राची धार ) वाहतें–वि चालू, तीक्ष्ण; धारचें, उपयोगात असलेलें ( शस्त्र वगैरे ) वाहतें नांव–न चालू, व्यावहारिक नाव

वाहती—स्त्री एक फुलझाड

वाहदीय(ये)त—स्त्री ऐक्य, स्नेह, मैत्री, सलूख ' दोन्ही दौलतींची अशी वाहदीयेत ' –रा ७ १५२ [ अर वाहिदीयत् ]

वाहन—न गाडी, घोडा इत्यादि प्रवासाचें साधन, यान, ( समासात ) गरुडवाहन, नरवाहन, आखुवाहन, अश्ववाहन [ स. वह् ]

वाहन—न ( कों ) उखळ [ फा हावन, सं वाहन ? ]

वाहर—स्त्री पीडा, बाधा, दु ख ' तरि आताचि ये सेंहार वाहरे । तुम्ही पाडव असा वाहिरें ।' –ज्ञा ११ ४५४ ' आता हे जोहरवाहर दुसरी । चैतन्या सकट । ' –ज्ञा ११ ६०

वाहलो—स्त्री ( कों ) ओहोळ, वाहाळ –देशीनाममाला [स. वह् ]

वाहलकड—पु पुढें आलेलें टोंक ' मिहिंतले येथील कंटक चैत्याची स्तूपसाफसुफी मन्यानें केली गेली याच स्तूपाच्या चारी बाजूस चार वाहलकड असुन त्यापैकीं पूर्वेच्या वाहलकडावर गणाची एक रांग कोरलेली आह ' –केसरी २२ ९ ३६

वाहवट—स्त्री प्रवाह, ओघ, पात्र, मार्ग ' तैसे इंद्रियांच्या वाहवटीं । धावतया ज्ञाना जेथ ठी ।' –ज्ञा २८ ४७६. –वि.

-प्रवाहानें वाहून गेलेला; धुऊन गेलेला. [ सं. वह् ] वाहवटळ-स्त्री. १ प्रवाह; ओघ; धार. २ ( सामान्यतः वावटळ ) तुफान; वादळ; झंझावात. [ सं. वह् ]

**वाहवण**—स्त्री. १ प्रवाह; ओघ; लोंढा. २ वहात जाण्याची क्रिया; प्रवाहाबरोबर जाण्याची क्रिया. [ सं. वह् ]

**वाहवणी**—न. १ वाहतें पाणी; पाण्याची धार, प्रवाह. २ ( याच्या उलट शिरवणी ) वाहात जाणारें पाणी; जोरानें वाहणारा प्रवाह; पाणी वाहील इतका पाऊस. [ वाहणें+पाणी ]

**वाहवणें**—अक्रि. १ प्रवाहाबरोबर खालीं वाहात जाणें; लोंढ्यांत सापडणें; वहावटींत लागणें. २ शिरणें; पासरणें; थेंब-थेंब गळणें, पडणें. ३ (ल.) बोलतांना विषय सोडून बोलणें; बहकणें; भलतीकडे वळणें, घसरणें. ४ (प्रयत्न, कल्पना, योजना) निष्फळ होणें; वेत वगैरे फसणें; वायां जाणें. ५ सैरावैरा जाणें; भलतीकडे जाणें. 'ऐसी पाचवटें जवळिके । करूनि वाहावितो अभिलाषें।' -ऋ ५५. [ सं. वह् ]

**वाहवरा**—वि. वाहणारा; वाहून जाण्यासारखा; अर्धवट पातळ (गूळ, चिखल, गाळ वगैरे); ढिसूळ, ढिसुळ, शिथिल, पलपलीत, लिबलिबीत ( शरीर ). २ (ल.) स्वैर; विषय सोडून; मुद्द्याशिवाय (भाषण); बेशिस्त; अनुसंधानरहित (बोलणें). [ सं. वह् ]

**वाहवा**—उद्गा. शाबास! भले! फार उत्तम! ( प्रशंसापर उद्गार-वाचक अव्यय ) -स्त्री. प्रशंसा, वाखाणणी; स्तुति; शाबासकी; तारीफ. [ फा. वाह्वाह्, तुल. वै. सं. स्वाहावाट् ] वाहवाह-उद्गा. वाहवा पहा. 'करणी केल्यानें वदों जी वाहवाहा।' -दावि १९६.

**वाहविणें**—सक्रि. घालून देणें, मोडणें, घालविणें. 'कां धर्म व्यर्थ तुवां, गांजुनि हा निरपराध वाहविला।' -मोआदि २.३. 'परकरण स्वकलत्र स्पर्शेचि महायशासि वाहविते।' -मोवन १२. ८७.

**वाहळ, वाहाळ**—पु. ओढा; नाला, ओहोळ. 'वाहळ घोहळ दरे दरकुटे।' -मुवन ७.१४४. [ सं. वह् ]

**वाहळी**—स्त्री. (राजा.) ओघळ; ओढा, नाला; पन्हाळ; ओहोळ.

**वाहळी**—स्त्री. तेरड्याची एक जात. [ सं वह् ]

**वाहा**—स्त्री. बाबद 'वाजिखर्च कागद वाहा व रोशनाई वगैरे खर्च.' -वाडबाबा ३.३२०. [ फा. ]

**वाहाकविद्या**—स्त्री (प्र) वाहकविद्या, चाबुकस्वाराची कला; वाहनविद्या. 'तळवागेवर वागे निर्वाळिला। वाहाकविद्ये वहिला।' -शिशु १०००. [ सं. वाहक+विद्या ]

**वाहाटळ**-टूळ, वाहाडणें, वाहाणी, वाहाणें, वाहान, वाहार, वाहाल, वाहावट, वाहावटळ, वाहावण, वाहावणी, वाहावणें, वाहावरा—वाहटळ, वाहडणें इ० पहा.

**वाहाण**—स्त्री. (प्र.) वहाण पहा. धर्मपादुका; पादत्राण; जोडा. 'जेयाची वाहाणा। चिंतामणि खेवणा।' -ऋ ५२. [ सं. उपानह् ] ०धर-वि. पादुकाधारक. 'पायटें मळिवटें। वाहाणधरू दीवटें।' -शिशु ३५३.

**वाहाण**—स्त्री. ओढा; नाला; ओहोळ. [ सं. वह् ]

**वाहातिक**—स्त्री. वाहतुक पहा.

**वाहारी**—स्त्री. (को.) सून. 'माझी वाहारी गुणाची आहे.' [ सं. वधू ]

**वाहाळ, वाहाळी**—(राजा) (प्र.) वहाळ पहा. 'क्षेमेयांची चिखल वाहाळ।' -भाए ३९६ 'वाहाळ मानिजे जगें।' -दा १.४.१४.

**वाहाळ**—वि. लागवड केलेली; वहित. [ सं. वह् ]

**वाहाळी**—स्त्री. शिकार. -शर.

**वाहिद, वाहेद**—वि. एक; एकटा. -मराठी सहावें पुस्तक पृ. ११६. [ अर. वाहिद ]

**वाहिनी**—स्त्री. पृतना; सेना; सैन्य. [ सं. ] ०पति-पु. सेनापति. 'तें देखोनि वाहिनीपती।' -रावि २७ ५०.

**वाहिला**—वि. वेगळा, निराळा; पृथक्; वायला पहा. 'तरि शब्दझडोनि वाहिला निच।' -ज्ञा ९.५१६. [ सं. व्यवहित+ल ]

**वाहिला**—पु. गोंपळा; पोहणाऱ्याची सांगाडी. [ सं. वह् ]

**वाहिलें**—प्र. वहिलें पहा.

**वाहि(ही)वा**—पुस्त्री. शेताची लागवड; वहिवाट; कारभार.

**वाही**—स्त्री. १ (ना) नाला; ओढा. २ मार्ग; रीत; ओघ, क्रम. 'प्यावें त्याचें देणेंचि नाहीं। येचि वाही देखतसों।' -तुगा ३६७. ३ शेताची मशागत; औताची पाळी, लागवड. -वि. १ वाहून नेणारा; उचलून नेणारा; जो वाहतो, नेतो तो. २ वाहणारा. 'दक्षिणवाही.' [ सं. वह् ]

**वाही**—वि. खोटें, निष्प्रमाण; असत्य; वेडगळ. 'सदाशिव राही अलाहिदा राहिल्यानें तहलीक किंवा वाही वर्तमान हें खचित समजल्यावर मागाहून विनंति लिहिण्यात येईल' -रा ५.१९९. [ अर. वाही ]

**वाहीक**—वि. नेणारा; वाहणारा; वाहून, उचलून नेणारा. [ सं. वह् ]

**वाहीत**—वि वहीत पहा. लागवड केलेली.

**वाहीन**—न. (गो.) उखळ. वाहन पहा. [ फा हावन ]

वाहीम—वि. खोटें. ' जेथें द्विजावांचुनि देव नाहीं। वाहीम वाटे नवयौवना ही।'—वामन विराट १.३९.

वाहीम—न. नांगर, रहाट वगैरे ओढणारें जनावर; ओढ कामाचें, ओझ्याचें जनावर. [ सं. वह् ]

वाहीयात, वाह्यात—वि. (ना.) मात्य; सोडवर; त्रास दायक. [ अर. वाहियात् ]

वाहील, वाहेल—स्त्री. १ मशागत, लागवड; नांगरट वगैरे शेतकाम. —न. २ पोकळ नारळ; वाझा नारळ. ३ पोहण्याची सांगड.

वाहुटळ, वाहुटूळ—स्त्री. वावटळ पहा. ' गजहरनरशर ततिस वाहुटळ लाजो। '—मोभीष्म ३.६०.

वाहुटा—पु. (व.) मुलाची हातांतील वाकी [ बाहु ]

वाहुटी—स्त्री. बहिराट पहा. [ वाहणें ]

वाहुदार—पु. जमीन वसणारा. ' वाहुदारानीं जमीनीचें उत्पन्न दडऊं नये. '—के १६.४.३०.

वाहेर—पु. खवळ्या मासा. —बदलापूर १३२.

वाहो—पु. १ मशागत, लागवड. ' पैं प्रतिवर्षीं क्षेत्र पेरिजे। पिके तरी वाहो नुबगिजे। '—ज्ञा १०.५५. २ प्रवाह, ओघ, धार. ' स्वप्रतीति धारेचा वाहो। करील तैसें। '—ज्ञा १५.२६४. मार्ग, रूढि, प्रघात, गति. ' वालीचाचि वाहो वहुतेक। '—तुगा ९३१. [ सं. वह्=वाहणें ]

वाहोळ-की-दारी—स्त्री. लागवड; शेतकाम; शेतीची मशागत. (क्रि० करणें, चालवणें; वाहणें). -वि. लागवडीची, वहीत; नागरटीची; पडित नव्हे ती. [ सं. वह् ] वाहोळकर-करी-दार—पु. शेतकरी; शेतीकरणारा.

वाह्य—वि. उचलून नेण्यास शक्य, योग्य, आवश्यक; नेण्या-आणण्यास सोईचें [ सं. वह् ]

वाह्या, वाह्याची अवटी—वाया, वायाची अवटी पहा.

वाह्यात—वाहियात पहा.

वाळ—स्त्री. (वों.) कुंडींत लावावयाची एक वेल.

वाळ—न. पुच्छ; शेंपूट, शेंपटीचे केस. ' वाजीवाळ धवळ कैसें। तें मज दाखवी डोल्से। '—मुआदि ५ १९ वाळाग्र—न. वालाग्र; केंसाचें टोंक. ' चिरलें वाळाग्र तें ही प्रकाशी। '—दा १.५.८. [ सं. वाल ]

वाळ—स्त्री. १ प्रचारातून जाण्याची क्रिया; चलनातून जाणें (नाणें) (क्रि० पाडणें; पडणें). २ जातिबहिष्कार, जातिबाह्यता, समाजभ्रष्टता; जातिभ्रष्टता. (क्रि० काढणें, निघणें, पाडणें, घालणें, पडणें). ३ नाश; कुजकेपणा; जीर्णता; सुकेपणा. (क्रि० पडणें, होणें; असणें). ४ लोप, प्रचारातून जाणें; रद्द होणें. —वि १ प्रचारबाह्य, नाचलाऊ, अव्यवहारित, बंद पडलेलें (नाणें वगैरे). २ जातिबाह्य ३ (ल.) बेकार; प्रचारांतून गेलेली (चाल, रीत, प्रघात, नियम). [वाळणें=टाकणें] वाळीस-वाळींत-घालणें-टाकणें-जातिबाह्य करणें, जातिभ्रष्ट करणें. वाळींत-वाळीस-पडणें-जातिबाह्य, भ्रष्ट होणें.

वाळ—स्त्री. १ मासे मारण्याकरितां तयार केलेली जागा. २ (गो.) ओढा. [ वहाळ, ओहोळ ]

वाळई—स्त्री. (कु.) खडपात राहणारा चरटया जातीचा मासा.

वाळका, वाळकुजा-कुडा-कुंडा—वि. १ कोरडा; शुष्क; नीरस; रुक्ष; सुका, सुकट. २ किडकिडीत; बारीक, कृश; रोडका; काटकुळा. [ वाळणें ]

वाळकी—स्त्री. वालुकाचा वेल.

वाळखो—पु. (व.) वेळ —वशाप ५२.१.

वाळगणें—अक्रि. शिजविताना, भाजताना लागणें; करपट घाण यावयाजोगें होणें; करपणें; जळणें. [ सं ज्वल्; गु. बळणें=जळणें ] वाळगघाण—स्त्री. करपट दुधाची घाण.

वाळंज, वाळुंज—स्त्रीपु एक झाड.

वाळंजी—स्त्री. विन खवल्याचा मासा. —बदलापूर.

वाळटी—स्त्री. (गो.) वाळवी.

वाळण—स्त्री (कु) १ भातातून पेज काढण्याची क्रिया. २ भातातून पेज काढण्याचें भांडें. वाळणी शीत—न. (कु.) पेज काढलेला भात वाळवण—स्त्री. (कु.) पेज काढण्याकरिता भाताच्या तपेल्याच्या तोंडावर लावावयाची मूठ असलेली फळी.

वाळणें—अक्रि. १ सुकणें, नीरस होणें; रुक्ष होणें; रस, रक्त इत्यादि आटून आर्द्रतारहित होणें. २ कृश होणें; रोडणें, रोडावणें, क्षीण होणें. [ सं. ज्वल् ] वाळवण—न. वाळण्यासाठीं उन्हात घातलेलें धान्य. २ वाळल्यामुळें कमी होणारा अंश. वाळत राहणें-(कर) उपाशीं राहणें. वाळवणें-विणें—सक्रि. १ सुकविणें. २ कृश करणें [ वाळणें प्रयोजक ]

वाळणें—सक्रि. खिळा वगैरे उपटून येऊं नये म्हणून वळविणें, मोळविणें. [ स वल्=वळविणें ]

वाळणें—उक्रि १ वर्ज्य करणें, टाकणें; त्याग करणें. ' वस्तु घेऊनि वाळिजे। जैसें रत्नासि दूषण ठेविजे। '—ज्ञा ११.६४२. ' परमेश्वराचा डोळा। वाळुनि देवताचकाचा मोळा। '—माए ५४३. २ वाळींत टाकणें, बहिष्कार घालणें, टाकणें. ' मी रे गोरी चापेकळी। तुझ्या दर्शनें होईन काळी। मग हे वाळी जन मज। '—तुगा १२९. ' कुळें वाळिती जातिभ्रष्टातें। '—मुसभा ३.८७. ३ वजा करणें, परत करणें; निकालात काढणें. ' तसलमात टाकून वाळणें. '—(बडोदें) खानगीखातें पृ. १५६.

'खर्च पडलेली रकम मोडून वाळण्यास उपरी अधिकारी.' -खानखातें १५५. [वळणें] 'वाळता करणें-घेणें-देणें- वळता करणें पहा.

वाळती-टी-धी—वाळवी पहा.

वाळंवा—पु. १ चावड; एक प्रकारची तांबड्या मुंग्यांची जात. २ वाळवी; उधई.

१ वाळय—पु एक जातीचा मासा. वाळई पहा.

वाळवंट-ठ, वाळवट—न वाळूचें मैदान, रण. वाळवट-वि. वाळुयुक्त; वाळूचें; वाळूमिश्रित. [ सं. वालुका ] वाळसर-वि. वालुकायुक्त, वाळुमिश्रित (जमीन, जागा); रेताड. वाळसरा-पु वाळवंट; वाळूची जमीन. 'तेथें जावुलवुडीं वाळसरा असे।' -पंच ४.१. [ वाळु ] वाळुव(वं)ट-न वाळवट पहा. 'मग हीवें पीठें देइजे वाळुवंटी । मंदाकिनींचा ।' -शिशु ७९०.

· वाळवट—न. (व.) घोड्याच्या किंवा जनावरांच्या केसाचें केलेलें चन्हाट. [ वाल=पुच्छ; वेंस ]

वाळवत—न. (वों.) केळीचें वाळलेलें पान. [वाळणें+पत्र]

वाळवांगी—स्त्री. वेलवांगी पहा.

वाळवी—स्त्री. १ लाकूड खाणारा एक किडा; उधई. २ लाकूड, वस्तु वगैरे वाळवीनें खाल्ल्याप्रमाणें ज्यामुळें दिसावयास लागतें असा रोग कीड, कसर. ३ (ल.) चिंता, काळजी, भीति वगैरे शरीर कृश होण्यास कारणीभूत होणारी गोष्ट. 'चिंता या वाळविला पाळुनि तुम्ही स्वदेह तरु वाळविला।' -मोकृष्ण ४५. ८. 'तिकडच्या जिवाला वाळवी लागली.' -निचं १३९. वाळवेणें-अक्रि. (वों.) वाळवी लागणें.

वाळशिंगटी—स्त्री. शिंगटी माशाची एक जात.

१ वाळा—पु एक सुगंधि मुळ्यांचें गवत, या गवताच्या मुळ्या; खस. [ स. वल्लर, वाल, हिं. सुगंधवाला; गु वालो; का. वालेदेवर; ते. वादिवेलु ] वाळागीर-वि. वाळयाचे. 'वाळागीर पडदे आणवा.' -पला ४.२२.

वाळा—पु. १ पायातील एक दागिना; पदभूषण. 'ते वाल हे तुचलेत वाळे।' -साह्द २.७२. २ हातात घालावयाचा एक दागिना; कडें; लहान कडें. 'नांव सोनूबाई हातीं कथलाचा वाळा.' ३ कडें, वलय, वाटोळी कडी; भाइयाच्या भोंवतीं असलेला फुगीर कंगोरा; ताम्या, चंबू वगैरेचा फुगीर भाग. ४ सापाच्या जातीचा एक प्राणि, सापाचें पिलूं, जिवाणू. ५ खोबऱ्याच्या वाटीची कापलेली वाटोळी कड; खोबऱ्याचे वलयाकार वाटोळे तुकडे. ६ एखाद्या कड्यानें वगैरे दिलेला वाटोळा डाग. ७ वळ, वाटोळी गांठ. ८ सामान्यतः वाटोळा उंचवटा, वळ, उदा० उंसाच्या पुळणावर कढई ठेवविण्यासाठी केलेला वाटोळा उंच-वटा. (गो) वाळो. वाळाकरू-वि. वाळे घातलेला; लहान. 'तो वाळा करूंवाळु । लाल्हातु दिसे।' -शिशु १०४. वाळ्याचा तांब्या-पु. ज्याच्या खालीं वाटोळें स्वतंत्र बूड (वैठक) बसविलेलें असतें असा तांब्या.

वाळांव—पु एक मुलींचा खेळ. -मखेपु १३७.

वाळांव—पु. (गो.) तरस.

वाळियेणें—सक्रि. (नाविक) वाऱ्याच्या दिशेनें चालविणें, वाऱ्यांत ठेवणें (गलवत). [ वळणें ]

वाळी—स्त्री. १ वाळी; नाकांतील किंवा कानांतील एक सोन्याच्या तारेचें भूषण; बुंकलें; (कु.) नथ. २ वेलवांगी नावाची वेल. [ वाळा ]

वाळीत—न. जातिबहिष्कार-स्थिति व क्रिया; जातिभ्रष्टता; जातिबहिष्कृति. उपयोगः-एखाद्यावर वाळीत टाकणें; -ला वाळीत घालणें; -वर वाळीत पडणें-येणें; -ची वाळीत निघणें-काढणें. -वि. बहिष्कृत, जातिभ्रष्ट; जातिबाह्य. [ वाळणें ] ०पत्र-न बहिष्कारपत्र.

वाळु(ळू)क—न १ एक प्रकारची काकडी; चिबूड; सुरती काकडी. २ आवाळूं [ सं. वालुक ] म्ह० वाळकाची चोरी आणि बुक्क्यांचा मार=लहान अपराधास हलकी शिक्षा.

१ वाळुं(ळूं)ज—क्लीपु एक झाड. वाळुंजीचें झाड.

वाळू—स्त्री. १ पुळण, बारीक रेती. २ कंकर; बारीक खडयाची रेती; जाड रेती. 'जमविला पैका जसा वाळुवा नदीच्या।'. -पला ६८. [ सं. वालुका; प्रा. वालुआ; गु: वाळू, हिं. बालू ] (वाप्र.) वाळूची भिंत-स्त्री. न टिकणारी गोष्ट. वाळूंत-वाळूवर-वाळूमध्यें मुतणें-निरर्थक गोष्ट करणें; निष्फळ काम.

वाळू—स्त्री. वाळवी पहा.

वाळू—स्त्री (गो.) जेवणी

वाळेरूं, वाळेस, वाळो—न. (गो.) वाळा (गवत) पहा.

वाळोंय—स्त्री. (गो.) वाळवी पहा.

वाक्षण—स्त्री. (गो.) लज्जा.

वि—१ शब्दाच्या पूर्वी लागणारा एक उपसर्ग. हा (अ) वियोग, असंधान (उदा० विगत, विघटन); (आ) पराङ्मुखता, प्रातिकूल्य (उदा० विसदृश, विमनस्क); (इ) जाति, भेद (उदा० विभाग), (ई) वैरूप्य; वैपरीत्य (उदा० विलोम),) ह्या अर्थांचा द्योतक आहे. २ केव्हां केव्हां स्पष्टीकरणार्थ अगर निरर्थकहि जोडतात. ३ वैशिष्ट्य; आधिक्य (उदा० विनिपात, विहित). 'दिनिर्मिलें झांकण अहतेचें।' -वामन, स्फुटश्लोक ४ (नवनीत पृ. १३३). [ सं ]

वि—पुस्त्री १ पक्षी, खग; गरुड उदा० विपति 'इच्छी कुल्हित नाग वि भाग न अर्पूनि सधि धरवीना।' -मोउद्योग ३४१ [स ]

वि॥—( संक्षेप ) १ विनति २ विशेष ३ विद्यमानें ४ विद्यमान

विइनें—क्रिवि ( खा ) पाहून 'रामानें तिमा थोरोंहानें टोंचें पोडलें विइने तिचिल '-भिल्ली २७ [स वीक्ष्]

विकट—वि १ मोठें, प्रचंड २ भयंकर, भयानक भय कारक स्वरूपाचा 'विकट देखोनियां हाक। वेगीं सन्मुख लोटला।' -एरुस्व १२ १३३ २ छिन्न, मोडलेला 'तोचि सहस्रार्जुन साचार। विकटबाहो।' -कथा ३ १७ १९ -दावि २९३ ३ हिडीस स्वरूपाचें, कुरूप 'पूजिती विकट दोंद। पशु सोंड गजाची।' -तुगा ४१६, -ज्ञा ११ १३९ ४ विरुद्ध विचित्र, अघटित 'क्षीराब्धीं काळकूट। हें येकि परीचें विकट।' -अमृ ७ २८६ ५ ( गो ) अशुभ, अमंगल ( बोलणें, करणें, ऐकणें ) ६ कंटाळवाणें 'सारखें सुख मनुष्यास विकट वाटतें' -( लोहोकरेकृत ) विसावा पृ ४४ [स ] **विकटांत अध्ययन, विकटोपर्यंत अध्ययन-ज्ञान**-न १ देवपूजेच्या आरंभींचा 'सुमुखश्चैकदंतश्च कपिलो गजकर्णक। लंबोदरश्च विकटो विघ्नराजो गणाधिप। हा श्लोक सुद्धा 'विकटो' पर्यंतच म्हणजे अर्धवट येणें २ ( ल ) अगदींच थोडें अपुरें अध्ययन ज्ञान, टोंबेपणा 'धार्मिक व सामाजिक विषयासंबधानें आमच्या लोकांचें ज्ञान विकटोपर्यंत जाऊन थडकलें होतें' —आगरकर **विकटोपशास्त्री**-वि मंद दगड, टोंब्या ( विद्यार्थी माणूस )

**विकडी**-स्त्री चातुर्याचें, आलंकारिक भाषण 'आता असो हे विकडी।' -ज्ञा १० ६०; -एरुस्व १६ १३० [स विकत्या]

**विकण**—वि १ कणरहित २ ( ल ) जवळ धान्य, अन्न नसलेला 'विकणास कण निधनास धन' [स ] **विकणवा**-वि धान्याचा कणहि जवळ नसलेला ( शेतकरी ) विकण 'मग फिटे दु खाचा ठावो। तव राहटवी रात्रीदिवो। विकणवातें का रावो। जया परी।' -ज्ञा १८ ५०४

**विकणें**—सक्रि मोल घेऊन देणें, विक्रय करणें किंमत घेऊन देऊन टाकणें 'पिता विकी कन्यासुता। हें अपूर्व काय गा ताता।' -कथा १ ५ १७१ -अक्रि १ काहीं किंमतीस दिला जाणें, विनिमय होणें २ (ल) पटणें, मान्य होणें, चागला व योग्य म्हणून चालणें 'एथें तुमचें शहाणपण विकणार नाहीं' [स वि+क्री; प्रा विक्कणय ] म्ह० पिकेल तसें विकेल **विकणाऊ**-वि विकावयास ठेवलेला, मांडलेला पुढें केलेला, विकाऊ **विकणी**-स्त्री विक्रय, विक्री 'युदु म्हणे तिसा पासौनि विकणी। करितों गुरुयें।' -शिपु २ ४५ ३३ **विकलेला असणें-१** एखादाच्या आधीन असणें, त्याचा गुलाम असणें २ ( प्रेम किंवा कृपा यानीं ) दुसऱ्याचा गुलाम बनणें, असणें **विकत-ता**-क्रिवि मोलानें, विक्रीत, पैसा देऊन ( क्रि० घेणें, मिळणें, देणें ) [ विकणें] ( वाप्र ) **विकत घेणें-१** खरेदी करणें, मोलानें घेणें २ ( ल ) प्रेमानें किंवा उपकारानें एखाद्यास गुलाम करणें 'राम म्हणे साधो त्या वाचविलें घेतलें विकत मातें।' -मोवन ११ १३० २ ( एखादा अनर्थ ) मुद्दाम आपणावर ओढून आणणें 'सावध रे का घेसी मदा खळनायका विकत मरण।' -मोविराट ४ ४४ ( वाप्र ) **विकतआळ**-विकत खरूज पहा ०**कज्जा, विकता कज्जा-कलागत-कुरापत**-पुस्त्री आपल्या हातानें, मूर्खपणानें आपणावर ओढून घेतलेलें भांडण, लचांड, नसता उपद्व्याप ०**खरूज-खोकला विकता खोकला**-पु स्वत च्या पैशानीं कृतीनीं, ओढून घेतलेला त्रास लचांड ०**घोर-पाप-पीडा फजिती-मौत-रोग-लचांड-विघ्न-श्राद्ध**-पुनस्त्री ( सामान्य अर्थानें ) विकत खोकला, आपणच स्वत वर ओढून घेतलेलें संकट, त्रास इ० 'हें पाहून शेटजी भिऊन जाऊन आपल्या अंगावर घेतलेलें विकत श्राद्ध टाकून देतील असें पुष्कळास वाटलें' -टि ४ ९० **विकतश्राद्ध घेऊन सव्यापसव्य करणें**-( मृताची उत्तरक्रिया श्राद्ध करण्यास वारस नसल्यास कोणी तरी त्या वेळेपुरता वारस होतो यावरून ) आपल्या मागें काहीं तरी उपद्याप, लचांड लावून घेऊन त्रास भोगीत बसणें ०**तंटा**-पु विकत कज्जा पहा **विकता-१** विकत पहा २ विकणारा -पाटण शिलालेख, शके ११२८ ३ विकाऊ 'कीं सभोग सुखाचिये हाटधारणें। विकते देखौनि सुखाचें केणें।' -शिशु ४७ **विकताईचा**-वि विकत घेतलेला 'गुरें विकताईच्या पेंढ्यावर पाळावीं लागतात' -बदलापूर २२ **विकतेकरी**-पु रोजच्या खाण्याचे, खर्चाचे जिनस विकत घेणारा मनुष्य, स्वत शेतीभाती इ० न करणारा, खाद्यादि पदार्थ उत्पन्न न करणारा केवळ विकत घेऊन निर्वाह करणारा मनुष्य [विकणें] **विकाऊ**-वि विक्रीस ठेवलेला, विकणाऊ पहा **विक्या**-वि विकणारा, विक्रेता ( समासात ) ताक-तूप-दूध-पान-विक्या

**विकथन**—न बदनामी, निंदा, एखाद्याविषयीं वाईट बोलणें [स वि+कथन]

**विकंपित**—वि कांपणारा, जलद क्षोभ पावणारा [स वि+कंप्]

**विकरण**—न १ विकार, बदल २ ( व्या ) गणाचा प्रत्यय पहिल्या गणाचें अ हें विकरण आहे [स ] **विकरणें**-अक्रि १ विकार पावणें, क्षोभणें 'वैरी ते दुर्मति जे। बहुधा असे विकरती।' -ज्ञा २ २४३; -ज्ञाप्र ९९ २ बिघडणें, मोडणें 'ज्याचे हृदयींचे न विकरे ध्यान।' -एभा ३,

८२५ –सक्रि विकार करणें विकरविणें ' प्रथम माया जीवातें विकरे । ' –चसिसुत्रें ३९ [स वि+कृ] विकरवणें-विणें-क्रि विकार उत्पन्न करणें ' परी मनोधर्मु न लोट । विकरविलाही । ' –ज्ञा ३.४१ ' आपण विकरे आनजीवातें विकरवि । ' –चसिसुत्रें ३९

विकरणें—सक्रि विखरणें, पसरणें ' मज पासौनि जाणावें विकरलें असे । ' -माज्ञा ७ ५२ ' विकरलेंपणाचें आठागुळें वेलें । ' –शिशु ९० [स वि+कृ]

विकरा-री—पुस्त्री १ विक्री विकण्याची क्रिया ( क्रि० करणें मांडणें ) ' शरीर तुला अर्पिलें प्रचित पहा, कर याचा विकरा । ' -होला ९९ ' स्वहस्तें गोणी उसपोनि हातें । मिरच्या विकरी मांडिली येथें । ' २ विकलेपणा, विकलेली स्थिति ३ विक्रीचें उत्पन्न [स वि+क्री-क्रय]

विकराल-ळ—वि भयंकर, भयानक, हिडीस, विक्राळ [स वि+कराल]

विकर्तन—पु सूर्य [स]

विकर्तन—न (संगीत) आकर्षण करून ताणलेली तार तिच्या पहिल्या जागेवर आणणें

विकर्षण—न १ ओढणें [स वि+कर्षण] विकर्षित-वि ओढलेला

विकल—वि १ असमर्थ, अधू हीन, मोडलेला, विकृत, विरूप, क्षीण, व्यंगयुक्त (अवयव इंद्रिय, मनुष्य) २ विव्हल शोकयुक्त ३ अपुरा, असपूर्ण साधनाभावीं हीन दशेस पोंचलेलें (काम, व्यवहार) विकळ पहा [स] ०ता–स्त्री १ वैकल्य, न्यूनत्व २ (संगीत) गाण्यात कमजास्त श्रुति लावणें [स] विकलांग-वि १ विकृत व्यंग शरीराचा, एखादें इंद्रिय किंवा अवयव अधू न्यून असलेला २ (ल) अपुरा, उणीव असलेला, अपूर्ण [स. विकल+अंग] विकलेंद्रिय-वि एखाद्या इंद्रियानें उणा, व्यंग इंद्रिय असलेला [स विकल+इंद्रिय]

*विकला—स्त्री १ कलेचा (वर्तुळाच्या एकवीसांशाचा) साठावा अंश २ एक वेळाचें परिमाण अर्धी काष्ठा ३ वर्तुळाच्या अंशाचा साठाव्या भागाचा साठावा भाग [स]*

विकल्प—पु १ भेद फरक २ विरोध, मतभेद ' दोहींशी घटिताव विकल्प । द्वन्द्वसंकल्प सोयरीके । ' –एरुस्व १ ९६ ३ विरुद्ध, प्रतिकूल, भिन्न मत ४ अंदेशा, कुतर्क आशंका, वाईट किंवा चुकीचा तर्क, विचार ' तेंसें साहिल कवणी । विकल्पीं जे । ' –ज्ञा १५ २८८ ६ संशयितपणा, संशय अनिश्चय मताचा किंवा हेतूचा दुटप्पीपणा ' ऐसे दिवस लोटतां फार । अवलीस विकल्प पातला घोर । ' ७ (–अव) विचार, कल्पना; तर्क. ८ भ्रम ' उभेच एकल्प विकल्प दोषे । ' –साह १ २२ ९ (व्या) एकापेक्षा अधिक रूपाचा किंवा नियमाचा स्वीकार [सं ०घालणें–सशय उत्पन्न करणें, वितुष्ट, बिघाड आणणें ' आमुचें तेथें रत होतें चित्त । त्यात विकल्प घातला तुवा । '

विकसणें—अक्रि उमलणें, उकलणें, खुलणें, फुलणें [स विकसन] विकसन-न उमलण्याचा व्यापार [स.] विकसित-वि उमललेलें, प्रफुल्लित ' विकसित लोचनपकज ज्याचे जननी म्हणे हे चिपडे । ' –मध्व [स] ०दृष्टि–स्त्री (नृत्य) वरच्या पापण्या वर व खालच्या खालीं ठेवणें व बाहुल्या स्थिर ठेवणें गर्व राग, क्रूरपणा इ०चा दर्शक हा अभिनय आहे [स]

विकळ—वि विकल पहा १ दु खित; गलितगात्र ' परम विकळ मी तू या स्मृती ही उडाल्या । ' –वामन भामाविलास (नवनीत पृ ९९) २ विस्कटलेला, अस्ताव्यस्त ' विकळ देखोनि दळभार । मागधवीरीं केला मार । ' -एरुस्व १० ४२ ३ अधू व्यंग ' बाण खोंचला अति निगुती । विकळ गेला दोहीं हातीं । –एरुस्व ११ ४४ ४ हीन दशा पावलेला, हतबुद्ध, असहाय्य ' *निज मंडपीं शिशुपाळ । करीत होता गदारोळ । भीमकी* घेऊन गेला गोपाळ । ऐकोन विकळ पडियेला । ' –एरुस्व १२ १ ५ विव्हळ, दु खी ' लिंग देखिलें भूमीवर । मनीं विकळ जाहला । ' –गुच ६ १८३ ६ निस्तेज, नि सत्व ' विकळ करि शिखंडीतें गुरुसुत । ' –मोभीष्म ८ २१ ७ उलट, विपरीत ' तव ग्रह नक्षत्रं सानुकूळ । म्हणोनि तव बुद्धि विकळ । ' –दानि ३७१ ८ उणाख, अपूर्ण ' जो साम्यचि परी विकळ । तो दृष्टांत नव्हे निर्मळ । ' –विपू ७ ३३ ९ अमेळ, संबंधशून्य, विसंगत ' आतां जाहालिया भ्रमहत । जैसें पिशाचाचें चित्त । मग इंद्रियांचें चेष्टित । विकळु दिसे । ' –ज्ञा ५ ५७ १० जड अस्पष्ट ' ययाती म्हणे वाचा विकळ । सागों जातां होतसे । ' –मुआदि २० १३७ [स विकल] विकळणें-अक्रि (वों) १ बुद्धीची ग्राहकशक्ति जाणें, नष्ट होणें (वार्धक्य, विकार इ०मुळें) ' साधक आळसें विकळे । ' –एभा २० २०२ २ बारगळणें, भ्रम होणें, वेड्यासारखे मूर्खासारखे चाळे करणें, *बडबडणें (विशेषत म्हाताऱ्यानें लहान* मुलानें) ' तो म्हातारा अलीकडे विकळला, त्याबरोबर तुम्ही बरोबर बोलता ! ' ३ अतिशय विव्हल, जेर होणें (उष्णतेनें, श्रमानें) ४ नासणें व फुटणें (दूध, ताक दहीं) [विकळ] ०ता–स्त्री १ शिथिलता, विकळता पहा विकळता उपजत । गात्रांसी । ' –ज्ञा १ १९६ २ व्याकुळता, खेद दु ख ' ऐश्वर्यहानीची विकळता । कळुमात्र नाहीं मानसिया चित्ता । ' –मुआदि २० ४४ ०मति–स्त्री (ग्राम्य) १ बुद्धिभ्रंश, भ्रष्टमति ' नळाची विकळमति होऊन । तटस्थरूप राहिला । ' –वि ज्याच्या बुद्धीला विकळता आली आहे असा विकळा-वि विवर्ण, निस्तेज, फिकट (वर्ण, चेहरा) [वि+कळा]

विक्ला—क्रि विक्ला पहा.

विक्लाप—स्त्री (गो) दातारे, विलाप, शारीरिक हालमपेष्टा

विक्ली, विक्स्रूत—स्त्री भिवस, किळस, शिसारी (क्रि० यणें)

विकार—पु १ विकृति, बदल, रूपांतर, पदार्थाचें रूपांतर किंवा बदललेलें रूप 'दहीं हा दुधाचा विकार वाफ, गारा हा जलाचा विकार सुवर्णाचा विकार अलंकार मृत्तिकेचा विकार घट' २ दुखणें, व्याधि, रोग, अस्वास्थ्य ३ भाव, इच्छित भावना (कामक्रोधादि), क्षुब्ध मनोवृत्ति, जीवाची स्वाभाविक, निश्चल स्थिति जाऊन आलेला बदलाहि क्षोभ 'काम क्रोध लोभ मोह विकार, मनोविकार.' 'तिहीं विरक्तीचि ज्वाला घेतली। तव विकारांचीं इंधनें पडिपलीं।'-ज्ञा ४ १२९ ४ विनाश 'ब्रह्म याचा हेत भवानी सुदर। अंदुष्टें विकार आणिदेला।'-च १२८ ५ विस्तार -हको ५ १३८ ६ भेद, निरनिराळा प्रकार 'आणि विकाराची जे थारी। ते विपरीत ज्ञानाची परी।' -ज्ञा १५ ५२१ ७ परिणाम -ज्ञा १७ ५९ [स] विकारक, विकारी-वि (रसा शाप) विकार करणारा १ रासायनिक क्रिया घडवून आणणारा, (इ) ॲक्टिनिक २ (तर्क) ज्याची क्रिया दुसऱ्यावर पडते तें, (इं) एजंट -न्यायप २९ विकारणें-अक्रि आकाराला येणें, भिन्नरूप धारण करणें, विकासणें 'आता वस्तुजातचि आघवें। मजपासूनि जाणावें। विकारलें असे।'-ज्ञा ७.५२ विकारवणें-सक्रि विकारवश करणें 'बहु प्रकारें विकारावें, चित्त तयाचें तपोवित्त हळु जपुनि घ्यावें।' -अमृत शुकचरित्र २१. विकारी-पु. साठ संवत्सरांपैकीं तेहती सावा संवत्सर -वि. विकारयुक्त, दुखणेकरी, आजारी, (रोगानें किंवा मानसिक क्षोभानें) पीडिलेला ३ विकार करणारें, बाधक ४ परिवर्तनशील, बदलणारें, विकार पावणारें ५ नाशवंत [विकार] विकार्य-वि रूपांतर किंवा बदल केला जाण्यास योग्य, शक्य, आवश्यक इ० [स]

विकाल—पु अपराह्न, भरतीच वेळ, विलंब [स]

विकास, विकासन—पुन १ उमलणें, विकसन पहा २ प्रफुल्लितपणा 'विकासें स्वीतें उपजवी।' -ज्ञा १८ २७६ ३ विस्तार, वाढ, परिणति 'जो विकासाहीवरी उरता।' -ज्ञा१५ ५४९ [स] विकासणें-अक्रि १ उमलणें, फुलणें उकलणें 'प्रेमें विकासलीं कमळें शुद्ध।' -एरुस्व ३ ६ २ शोभणें 'वात्सल्य मोठें तुजला विकासे।' -सारुह १ ३ ३ परिणति होणें प्रगति होणें [विकास] विकासवाद-पु १ अनुक्रमानें होणारी वाढ, गुणोत्कर्ष, गुणपरिणामवाद -गीर १६९ २ प्राणी हीन कोटीपासून उच्च कोटीप्रत जातात असें मत उत्क्रांतिवाद (डार्विनाचा) (इ) एव्होल्यूशन [स] विकासित-वि उमललेला; उघडलेला, विकसित [स] विकासी-वि प्रफुल्लित करणारें किंवा होणारें 'सूर्ये-चंद्रविकासी कमल' [स]

विकिर—पु श्राद्धविधींत ब्राह्मणभोजनानंतर पिंडदानाच्या वेळीं ब्राह्मणांच्या उच्छिष्ट पात्राजवळ ग्रासमात्र बलि घालतात तो 'जैसें न करिता विकिरदान। पितृपिंडास होय विघ्न।'-कथा १. १५० विकीर पहा [स वि+कॄ] विकिरण-न १ पसरणें; विखरणें २ फेंकणें [स वि+कॄ] विकिरणें-क्रि १ पसरणें, विखरणें २ उडविणें, फेंकणें [स विकीरण]

विकीर—पु १ प्रसरण, पसरणें २ विकीरपिंड, विकिरण पहा ३ विकिर पहा [स वि+कॄ] ०पिंड-पु १ धर्मशास्त्रदृष्ट्या प्रत्यक्ष पिंडदान करण्याचा अधिकार ज्यांना पोचत नाहीं अशा असंस्कृत मृत पितरांस उद्देशून श्राद्धीं विकिरलेली भाताची शिथिल मूठ विकिर पहा २ (निंदार्थी) विकृत, कुरूप मूल [स. विकिर+पिंड] ०वत्-क्रिवि १ विकिरलेल्या भाताच्या मुठीसारखा, मुठीप्रमाणें २ (ल) अनादरानें, उपेक्षापूर्वक [विकिर+वत्] विकीरान्न-न विकीरपिंड अर्थ १ पहा [विकिर+अन्न] विकीरण-न १ पसरणें, विखरणें, पसापसार २ (शाप) विकिरण करणें, पृथक्करण उदा० प्रकाशविकीरण [स] विकीर्ण-वि पसरलेला, विखुरलेला [स वि+कॄ]

विकुंचित(करण)—न (नृत्य) डावा हात आकुंचित करून बाजूस ठेवणें व उजवा हात नाकाच्या शेंड्यासमोर आणून ठेवणें [स]

विकुरणें—सक्रि पसरणें, विखरणें, सडा घालणें 'एकेच शरें तो सारथी। केला यमाचा अतिथी। चहू अश्वांचीं शकलें निश्चितीं। करूनि भूमि विकुरली।' -जै १८ ९३ विकरणें, विकिरणें पहा [स वि+कॄ]

विकूणन(अधर)—न (नृत्य) खालचा ओठ वळविणें. हा अभिनय वेदना, मत्सर, अपमान, आळस वगैरे दाखविताना करतात [स] विकूणित(नासिका)-स्त्री (नृत्य) नाकपुड्या संकुचित करणें हा अभिनय दुःख, मत्सर याचा द्योतक आहे [स]

विकृत—न १ वीट, किळस, चिणका २ विकृति पहा -वि १ रूपांतर बदल झालेला, बदललेला २ तिटकारा, वीट आलेला ३ मन उडालेला, विन्मुख झालेला, तोंड फिरविलेला ४ दुर्दशे विकाळ ५ बिघडलेला [स वि+कृ=करणें] सामाशब्द- ०जाति-स्त्री (संगीत) ज्या स्वरावरून एखाद्या जातीस तिचें नाव दिलेलें असतें व जिच्यात तोच न्यास स्वर असून बाकीच्या स्वरांबद्दल नियम नसतो ती जाति याची संख्या अकरा आहे. षड्जकैशिकी, षड्जोदीच्यवा, षड्जमध्यगा, गांधारोदीच्यवा,

रुपगांधारी, कैशिकी, मध्यमोदीच्यवा, कर्मारवी, गांधारपंचमी, आंध्री, नंदयंति. [ सं. ] ०स्वर-पु. ( संगीत ) शुद्ध स्वरापेक्षां ध्वनीनें कमी किंवा अधिक असा स्वर, विकृतस्वर हल्लींच्या पद्धतीमध्यें पांच मानितात. रागवर्गीकरणास पांचापेक्षां जास्त विकृतस्वर मानणें सोयीचें नाहीं, हें मत पंधराव्या शतकापासून आजपर्यंतच्या ग्रंथकारांस मान्य झालें आहे. कलावंत शास्त्रज्ञ नसल्यानें त्याच्यांत त्याबद्दल एकमत नाहीं. पांच विकृत स्वरांत ऋषभ, गांधार, धैवत, निषाद हे चार कोमल आहेत व मध्यम तीव्र आहे. ३६ इंच लांबीच्या तारेचा ध्वनि व २४० आंदोलनसंख्या षड्जस्वरास गृहीत धरल्यास, पांच विकृत स्वरांची आंदोलनसंख्या व तारेची लांबी खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

| स्वर | नव्या मताच्या श्रुति | जुन्या मताच्या श्रुति | तारेची लांबी इंच | आंदोलन संख्या |
|---|---|---|---|---|
| कोमल ऋषभ | ३ | ६ | ३३ ३/४ | २५६ |
| कोमल गांधार | ७ | १० | ३० | २८८ |
| तीव्र मध्यम | १२ | १५ | २५ ३/५ | ३३३ १/३ |
| कोमल धैवत | १६ | १९ | २२ १/२ | ३८४ |
| कोमल निषाद | २० | १ | २० | ४३२ |

विकृति-ती—स्त्री. १ दुखणें; आजार. २ बिघाड; विकार. ३ राग. ४ शंका; संशय. –पया २४६. ५ भाव; वृत्ति; मनाची खळबळ; मानसिक स्थिरतेचा विघात करणारी खवळलेली वृत्ति, मनोविकार. ' नाथिली विकृति निपजे । ' –ज्ञा १३.४७६. ६ कुबुद्धि. ७ त्रास; दुःख ' आणि संसारदुःख मूळवणें । विकृती विणें । ' –ज्ञा ४.२२२ ८ तिटकारा; चिळस; किळस. ९ चोविसाव्या संवत्सराचें नाव १० प्रकृतीपासून पुढें होणारे पदार्थ; मूलभूत द्रव्याचे विकार. –गीर १५५. ११ द्रव्याचा रूपभेद; रासायनिक रूपांतर; कोणतेंहि पालटलेलें रूप १२ विपाक (इं) फर्मेंटेशन. –वि अकराळ विकराळ; विकृत. ' हें रूप जरी घोर । विकृती आणि थोर । ' –ज्ञा ११.६३२. [ सं. ]

विकृती—वि. १ विकत घेतलेला (पदार्थ); घरीं केलेल्याच्या उलट. २ जें विक्रीकरितां आहे तें, विकावयाचें. [ सं. विक्रीत ]

विकृष्ट—वि ओढलेला; आकृष्ट. [सं. वि+कृष्] ०नासिका–स्त्री .( नृत्य ) नाकपुडया फुगविणें. तीक्ष्णवास, भय, दुःख, राग, जोरानें श्वास सोडणें ह्या भावाचा द्योतक वरील अभिनय आहे.

विकेंद्रीकरण-भवन—न. ( शाप ) मुख्य ठिकाणापासून फाटाफूट, ऐक्य, एकाग्रता यांचा भंग (इं.) डिकॉन्सेन्ट्रेशन. [ सं. वि+केन्द्र+कृ किंवा भू ]

विकोप—पु. १ संताप, क्षोभ ( क्रि० जाणें ). ' आपणपें लोपे वारा । विकोपीं जाय । ' –ज्ञा १५.२५३. २ अनर्थ, वाईट परिणाम ( क्रि० होणें ). ' गव्हर्नरांच्या धमकावणीचा आम्ही निषेध करतों. या पुढें तेथें (बारडोलीस) कांहीं विकोप झाल्यास त्याची जबाबदारी सरकारवर आहे. ' [ सं वि+कुप्=कोपणें ]

विकोपा(प्या)स, विकोप्यास–जाणें–१ अतिशय राग होणें राग भडकणें. २ कुपथ्यानें, विरुद्धोपचारानें जास्त बिघडणें ( रोग, गांठ, जखम, क्षत ). ३ विकोपावर जाणें ( वाद, तंटा). ४ फाजील, बेसुमार होणें ( किंमत, मोल ). ५ अतिशय वर चढणें; शिखरास पोंचणें. ६ नष्ट होणें; नाश पावणें ( मैत्री, प्रीति ). ७ बिघडणें; नासणें (मसलत, बेत, उपाय, गोष्ट). (कोणी हा शब्द विस=विष पासून व्युत्पन्न झाला असें समजून तदनुरूप अर्थ करतात. )

विक्की—स्त्री. ( राजा. कु. ) युक्ति.

विक्रतणें—अक्रि. विकार पावणें. [ सं. विकृति ]

विक्रम—पु. १ शौर्य; पराक्रम; मर्दुमकी. 'तुज नमो अमितविक्रमा ।' –ज्ञा ११.५१३. २ विक्रमादित्य नामक उज्जनीचा एक शककर्ता राजा. ह्याचा शक इ.स. पूर्वी ५६ सालीं सुरू झाला व तो अद्यापि नर्मदेच्या उत्तरतीरीं चालत आहे ह्या नांवाचे पुष्कळ राजे होऊन गेले आहेत. ३ चवदाव्या संवत्सराचें नांव. [ वि+सं. क्रम्=जाणें, चालणें ] ०शक–संवत–पु. विक्रमादित्यानें स्थापिलेला शक. याचा आरंभ काल इ. स. पूर्व ५६. हा शक बंगाल खेरीज करून सर्व उत्तरहिंदुस्थानात चालू आहे. याचा वर्षारंभ कार्तिक शुद्ध प्रतिपदेला होतो. [ सं. ]

विक्रमा—स्त्री. गतिप्रकार; विक्रांति. –अश्वप १.१८५. [सं.]

विक्रय, विक्रयण—पुन. विकणें; विक्रा; मोल घेऊन देणें. [ सं. वि+क्री=विकत घेणें ] विक्रयानुशय–पु. ( कायदा ) परत करण्याच्या बोलीनें केलेली खरेदी; जांगड. [ सं. विक्रय+अनुशय ] विक्रयी, विक्रेता–वि. विकणारा. ( समासांत ) अश्व–घृत–तैल–रस–कार्पास–गो–धान्य–अपत्य – सुवर्ण–प्रतिमा – वेद – विद्या – पशु–शरीर–भार्या–विक्रयी. हे सर्व विक्रेते निषिद्ध आहेत. [ सं. क्री ] विक्रा–स्त्री. विक्रा पहा. विकणें. ' पैशाच्या मोहांत अब्रूचा विक्रा करणारी अमंगळ स्त्री मी. ' –बदफैली तरुणी १. [ सं. विक्रय ] विक्रीत–वि. विकलेला. [ सं. क्री ] विक्रूत–वि. (अशिष्ट) विकलेला; विकत घेतलेला. ( क्रि० देणें=विकणें, घेणें=विकत घेणें ). [ स. विक्रीत अप ] विक्रेता–वि. विकणारा. [ सं. ] विक्रेय–वि. विकला जाण्यास शक्य, जरूर, योग्य; विकाऊ. [ सं. ]

विक्रांत—वि. प्रतापशाली, शूर; पराक्रमी. ' चेकितान धृष्टकेतु । काशीश्वरू विक्रांतु । ' –ज्ञा १.९९. [ सं. ]

विक्राळ—वि. भयंकर, भयावह. अकराळ विकराळ पहा. ' दाढा विक्राळ तिखटा । ' –एरुस्व १२.१०८. [ सं. विकराल ] ०नामा–वि. खालच्या व वरच्या जबडयाचे दांत लांब असणारा ( घोडा ). घोडयाचें एक अशुभ चिन्ह.

**विक्रिया**—स्त्री १ बदल, विकार २ चित्तक्षोभ ३ अकर्म (यट्टा, इ०) -शिदि २४० **विक्रिय**-वि ज्यावर क्रिया घडते तें -न्यायप २९

**विक्रीडित**—न. लीला, खेळ 'शार्दूलविक्रीडित' [सं. वि+क्रीड्]

**विख**—न विष, जहर 'बुडालें सोहळयाचें सुख। हरिखीं विख कालविलें।'-एरुस्व १२ ७ -ज्ञा ९ १४२ -अमृ ५.१ [सं विष, प विह, विस, सिं विहु-खु] म्ह० विख घेववतें भीख घेववत नाहीं **विखणें**-न विषार, विष -खिपु सामाशब्द- **विखमोगरा-री**-पुस्त्री एक फुलवेल, मोगरीची, जाईची एक जात, रानमोगरा **विखार**-वि विषारी -शर ०**वणी**-न १ विषाचें पाणी २ (ल) पावसाळयातील अगदीं पहिली वृष्टि हिनें पिकाची खराबी होते, तेव्हा हिच्यानतर लगेच दुसरी चागली वृष्टि पाहिजे असते [विख=पाणी] **विखार**-पु १ विषाश, विपारी गुण, (विषारी पदार्थाचा, सापाचा, औषधीचा) 'राव णासी झोंबला विखार।' २ विषाचा विकार, उपद्रव, विषबाधा (क्रि० होणें) ३ (काव्य) साप, सर्प 'परपीडेविषयीं तत्पर। जैसे विंचू आणि विखार।'-दा ५ ३ ९१, -ज्ञा ९ १४८ ४ विषारी पदार्थ; विषासारखा पदार्थ 'चदन आगरु नाना उपचार। गमती विखार हरिवीण।'-च १६० [स विषार] **विखारणें**-अक्रि विष चढणें, विषबाधेनें युक्त होणें [विखार] **विखारा**-पु तालीमखाना, विषारी औषध -वदलापूर ३४० **विखारा-री**-वि विषारी (प्राणी, वनस्पति, औषध) [विखार] **विखारूं**-न साप, विखार पहा 'विखारू कालिमा जिंतीला।' -दाव ५२ **विखाहार**-पु साप -खिपु विखार पहा. **विखख**-न १ विष, विख २ अतिशय कडू पदार्थ ह्याअर्थी कडू शब्दासह येतो 'हें औषध कडू कडू विख्ख आहे' [विख]

**विखड, विखण**—न कीन आऊत, हत्यार (शतकामाचें, हातकामाचें विळा, खोरें, कुदळ इ०) -मोमभा (पृ ४१ वरील टीप) [स वि+खड] **विखडणें**-सक्रि १ फोडणें, नाश करणें, तुकडे करणें, तोडणें 'ते ते जाण द्वद्वी। सर्पा ऐसे विखडीन।' -मुआदि ५४२, -मोभीष्म ११५० २ ताटातूट करणें 'करूनी वधु वेडा। जोडा माझा विखडिला।' -तुगा ४०८७ [सं]

**विखम**—वि विषम (संख्या) [स विषम] **विखण**-वि (गो) विषम, विजोड, अपूर्ण [स विषम]

**विखरणी**—स्त्री इकडे तिकडे पसरणें इ० [विखरणें] **विखरणें**-अक्रि १ अव्यवस्थित रीतीनें इकडेतिकडे पसरणें, उधळणें 'दहींभात विखुरला चहुकडे। अद्यापि शुभ्र दिसती सूक्ष्म खडे।'. २ निष्काळजीपणानें टाकणें, टेवणें, इकडे तिकडे लोळवणें (स्त्रीच्या डोक्यावरील केस) ३ चदामेंदा, तुकडे तुकडे करून फेंकून देणें 'भीम गदा हाणुनि त्या सद्विरद क्षेम धूर्तिला विखरी।' -मोकर्ण ८ ३० ४ वृष्टि करणें, शिपडणें 'माते, ज्याचें नाम स्वरतावरि अमृत नित्य विखरीतें।' -मोहनुमद्रामायण १६ -अक्रि विस्कटणें (केंस, इ०) [सं वि+कॄ-विकिर, प्रा विखर, हिं विखरना, गुज विखरवु पं विखुरना] **विखरा**-पु १ विखरलेली स्थिति २ अस्ताव्यस्त पडलेल्या वस्तू पसारा ३ उधळपट्टी, खर्चे 'ओटीभरणाचा गजर पुढें आहे। द्रव्याचा विखरा।' -पला ९२ **विखुरणी**-स्त्री विखरणी पहा **विखुरणें**-क्रि विखरणें पहा १ पसरणें 'विखुरले विकल्याचे काटे।'-ज्ञा ७ १७०, -अमृ २ ७ २ तळमळणें 'आम्हा नाहीं त्याचा घडला आठव। त्याचा बहुजीव विखुरला।' -तुगा ६०६ ३ फुटणें 'माझें करुणावचन। न ऐकती तुझे कान। ऐकोनि पाषाण। विखुरतसे।' -गुच १ ११८ **विखु(खू)री**-स्त्री प्रसार, पसारा 'चादाचिया दोंदावरी। होत चादणियाची विखुरी।' -अमृ १.५६ [विखुरणें]

**विखळ**—वि अति दुष्ट, दुराचारी 'मीच विखळ मीच विखळ। येर सकळ बहु बरें।'-तुगा ३९४७, -सारुह ४ ६७' [वि+खल]

**विखळणें, विखळाविखळ**—उखळणें, उखळाउखळ पहा

**विखळणें**—(प्र) विखुरणें अस्ताव्यस्त पसरणें, इतस्तत फेंकणें

**विखास-सें**—पुन भ्रम वेखासें पहा

**विखीं**—शअ विषयीं -ज्ञा १७ ३२०, -एभा १० २४२ 'देंवि तुला सुत यो विखि कारण तें मज साग कसें।' -शिवराम शिवकथामृत अ १९ [स विषये]

**विखो**—पु विषय 'हा प्रकृतीविखो माधवा। तुवां माग परिसिलासे पाडवा।' -ज्ञा ९ ९९ [स विषय अप]

**विखाप**—(प्र) विक्षेप पहा

**विख्यात**—वि प्रख्यात, सुप्रसिद्ध नामांकित 'हें गीता नाम विख्यात। सर्व वाङ्मयाचें मथित।' -ज्ञा १८ १३२१ [स ख्या=सागणें] **विख्याति**-स्त्री प्रसिद्धि, कीर्ति तो फारच विख्यातीस चढला' -नि ७०७ [स] **विख्यापन**-न १ निवरण, स्पष्टीकरण २ जाहीर करणें [स]

**विगटणें**—अक्रि भिडणें 'त्यास विगटले।' -ऐपो २६९.

**विगडणें**—सक्रि १ विघडणें, मोडणें [स वि+घट्]

**विगडणें**—क्रि मोकळा करणें, टेवण, उघडा करून टेवणें 'विगडुनि टेविति मद झगडया।' -आ गोरसक्रीडा ९ [स वि+घट्]

विगत—वि १ गेलेला, गत २ वेगळा केलेला, वियुक्त ३ (समासात) ज्याचें गेलेलें आहे असा जसें–विगतैश्वर्य–ऐश्वर्य गेलेला, विगत–श्री–संपत्ति–प्राण–मत्सर–काम, विगतक्रोध, विगतधवा गत शब्द पहा [ स ] ॰विधवा–स्त्री ( शुद्ध प्रयोग विगतधवा ) ( काव्य ) विधवा स्त्री 'कोरडें तप। जैसें विगत विधवेचें स्वरूप। यौवन काय जाळावें।' ॰विषय–वि विरक्त, वैराग्यशील 'जयजय देव सकळ। विगतविषयवत्सल।' –ज्ञा १८ ३. [ स ] ॰विषयवत्सल–वि विषयवासना दवडलेल्याचा कैवार घेणारा [ स ] ॰श्रीक–वि १ भिकेस लागलेला, विपत्ती प्रत पावलेला २ दुर्दैवी, हतभाग्य, अकृतार्थ [ स. वि+गत+श्री ]

विगत—न ( गुज ) अहवाल, तपशील [ स गुप्त ] ॰वार–क्रिवि ( गुज सिं ) सावत, सपूर्ण, तपशीलवार [ गु ]

विगत—स्त्री ( अशिष्ट ) युक्ति विगुत

विगमन—न ( तर्क ) ज्यात एक किंवा अनेक विशेष गोष्टींच्या निरीक्षणानें सामान्य नियम स्थापित करण्यात येतात तें अनुमान, ( इ ) इडक्शन् –न्यायप १ १२१ [ स ]

विगर्हणा—स्त्री निंदा, तिरस्कार [ स गर्ह् = निंदा करणें ]

विगर्हित–वि निंदिलेला, तिरस्कृत [ स गर्ह् ]

विगलित—वि १ पडलेलें, गळलेलें, टाकलेलें, झाडलेलें ( फुल, फळ ) २ ( समासात उत्तरपदीं ) ज्याचें पडलेलें, गळलेलें आहे असा उदा॰ दंत–इंद्रिय–केश–गात्र–नख–वीर्य–विगलित त्याचप्रमाणें समासात पूर्वपदीं विगलित केश–दंत–धैर्य–पर्ण–शक्ति, विगलितांग ३ शिथिल ढिला झालेला, खच लेला, यलथलीत व अशक्त झालेला, ताजेपणा, दार्ढ्य, ताठपणा, दम इ॰ गेलेला ४ घट्ट, दृढ ( वि = विशेष असा अर्थ घेऊन ) 'विगलित मन माझें तु करी देवराया।' –दावि ४८२ [ स ]

विगळ–ळा–ळी, विगाळ—इगळ, इगळा इ॰ पहा [ याप्रमाणें इबद्दल विचा व निबद्दल इचा उच्चार करून झालेले पुष्कळ शब्द अशिष्ट लोकांच्या भाषेत आहेत उदा॰ ईश्वर–विश्वर, इच्छा–विच्छा, इंग्रज–विंग्रज, विचार–इचार, विघ्न–इघ्न इ॰ ) १ निखारा 'कीं पद्मरागभानुनि जो पदरीं विंगळाशि ओतुनि घे।' –मोवन ९ ४६ ( वाप्र ) विंगळ वर्षणें–१ आग पाखडणें 'करुणाशील का हा विंगळ वर्षतो ?।' –यथादी १८ २२७१ २ अग्निवृष्टि होणें 'जणु वर्षति विंगोळ। उठति मृगजळ कल्लोळ।'' –अमृतघुव

विगीत—न गायन गाणें [ स ]

विगीत—वि नीच हलकट दुष्ट, अधम; वाईट ( मनुष्य, वर्तन, कृत्य ) [ स ]

विंगीत—न खूण, मर्म गौप्य, अभिप्राय ( प्र ) इंगित 'वनराज, आपण हें विंगीत स्वर न्हयना ?' –वाय ३ २

विगुण—पु विरुद्ध किंवा न जुळणारा गुणधर्म, प्रकृति –वि १ भिन्न गुणाचा, असदृश २ विरुद्ध, प्रतिकूलगुणाचा, ३ ज्याचा गुण दूषित, भ्रष्ट, बिघडलेला आहे असा, गुणहीन [ स वि+गुण ]

विगुत—स्त्री ( राजा कुण ) युक्ति, इगुत, विगत पहा [ युक्ति अप ]

विगुं(गु)तणें—क्रि १ गुतणें, आडकणें 'उद्धव भाव॰ डला पुरुषोत्तमा। त्याचिया प्रेमा विगुतला।' –एभा ११ ७५६ २ गढणें, मग्न असणें, 'तो विगुतला असे अतरीं। महासुखीं।' –ज्ञा २ ३६२ ३ स्पर्श करणें, भिडणें 'पारव्या भेदूनिया घरा। धराधरा विगुतल्या। –एभा १२ १५ ४ जडणें, 'चीत चैतन्यीं वीगुतलें जेन्हळि देखियले यदुरायाचे पाय।' –धवळे ६२

विगै(गे)रे—अ ( गुज ) वगैरे –मौज २ ६ ३० [ अर वघैरा ]

विगोवा—वि ( महानु ) मुक्ति देणारा 'सिद्धाणेआवेवा विगोवा।' –शिशु १५३ [ वि+गोवा–गोवणें ]

विग्रह—पु १ युद्ध लढाई, भांडण २ परमात्म्याचा अंश, स्थूल देह शरीर 'ब्रह्मांड तो विराटदेहो। त्याचा मुख्य भाग विग्रहो।' –एभा २४ १४६; –रास १ ४१४ ३ ( व्या ) समासांतर्गत शब्दाचा संबंध व्यक्त करून दाखविण्याची रीति समासाची किंवा शब्दाची फोड पृथक्करण याच्या उलट संधि [ स ग्रह्=स्वीकारणें ]

विग्रही–वि ( समासात ) १ करणारा, पसरविणारा, मांडणारा, याअर्थी 'लीलाविग्रहि अवतारी हा।' –उद्धवचिद्धन, नागनाथ चरित्र १५ २ भांडण करणारा, लावणारा [ स विग्रह ]

विघटणें—सक्रि विघडणें पहा –अक्रि ( महानु ) तुटणें 'सवधुर वीघटिली। परब्रह्माची।' –भाए ९० [ स वि+घट् ]

विघ(घा)टन—न १ मोडून टाकणें, निर्दलन, फाडून, फोडून, आपटून तुकडे तुकडे करणें २ सामान्यतः फट, फूट, भेग फाटणें ३ ( विघटन ) ( रसा ) पृथक्करण [ स वि+घट् ]

विघटनात्मक–वि ( शाप ) मूळ पदार्थाचें पृथक्करण होऊन तो मूळ स्वरूपात नाहींसा होईल असें ( इ ) डिस्ट्रक्टिव्ह् उदा॰ येलिक विघ(घा)टित–वि १ विभिन्न केलेला, फाडून किंवा फोडून तुकडे तुकडे केलेला, विध्वंसित, विनाशित २ भग्न, फोड लेला ३ दूर, पृथक् केलेला

विघड—पु १ ( व ब ल ) भाग, अवयव यांची फूट, भेद; पृथक्करण त्यापासून उत्पन्न होणारी भिन्नता, भग्न वस्था, विघाड ( यंत्र, अनेकावयवी रचना, संस्था, पक्ष, इ॰ कामांमध्यें ) 'परि अवधा नित्य स्वभावो। विघड नाहीं।' –ज्ञा ८ २५७ २ वियोग, वियुक्तता, अढी ( स्त्री, पुरुष, मित्र

इ०काची ) ( क्रि० पाडणें, पडणें ) 'विकविला जीव होंवा धरीं। पाहिला विघड नळदमयंतीमधी।' –तुगा ४१३८ ३ विकलता, विरूपता 'कळा वोहट चढु। परि चंद्रि नाहीं विघडु।' –माए २९४ [ स विघट ] विघडणें-न (महानु) विघाड, भाडण 'भणती दामूसी विघडणें। एणेंची केलें।' –दिशु १३० विघडणें-उक्रि १ नाश करणें, फोडून तुकडे करणें २ विघाड करणें, खराब करणें, नासणें 'प्रचितीविण औषध घेणें। तरी मग घडचि विघडणें।' –दा १० ८ ६ ३ ताटातूट, वियोग करणें 'मंजुळ वदनीं वचनागाची काडी। शेवटीं विघडी जीव प्राण।' –तुगा ३००१ ४ सोडणें, टाकणें, दूर करणें, विमुख करणें 'स्त्री कारणें विघडिलीं। सकळहीं जिवलगें।' –दा ३ २ ५० –अक्रि १ नाहींसें होणें, नाश पावणें 'तवीं गुरुकृपा उजि येडें। ज्याचें लिंगदेह विघडे।' –एभा ११ २५२ २ तुटणें, भंगणें 'जव जव भक्तांचें पुट चढे। तव तव अविद्या वध विघडे।' –एभा १४ ३४०; –ज्ञा ९ १७० ३ ताटातूट होणें, अंतर पडणें, वियोग होणें 'वत्स विघडलिया धेनु भेटली। जैसी कुरंगिणी पाडसा।' –ज्ञागा २२१ ४ विलयास जाणें, गळणें, मोडणें ( निश्चय, पण, इ० ) 'घडिघडि विघडे हा निश्चयो अंत रीचा।' –राम करुणाष्टक [ स विघट ] विघडविणें-सक्रि शिथिल करणें 'नाडीतें सोडवी। गात्रातें विघडवी।' –ज्ञा ६ २१९ विघडाविघड-स्त्री १ मोडून तोडून टाकणें, नाश करणें, मोडतोड 'परि व्हावया तथें विघडाविघड।' –दावि २४९ २ विघडविणें, खराब करणें ३ विघडवलेली, खराब केलेली स्थिति [ विघडणें ]

विघ(घु)रणें—अक्रि १ द्रवणें वितुळणें, विरघळणें, पातळ होणें ( तूप, गूळ इ० ) 'विघरलें तें तूप होय। थिजलें त्या परीस गोड आहे।' –एभा ११ १४५८ 'थिजल्या विघुरल्या घृताची। ऐक्यता न मोडे।' –दा ८ २ ३८ २ कमी होणें 'पुष्टि लागे विघरों। कांति पाहे निसरों।' –ज्ञा १३ ७५६ ३ (ल) गर्भगलित होणें 'म्हणे, मार्गे जाय, द्रुत परिमवें दाघु विघरे।' –मो रामायणें युद्धकांड [ स विघरण ]

विघस—पुन अतिथि इ०कांचें भुक्तशेष अन्न 'अतिथि वगैरे जेवून उरेल तें विघस' –गीर ६७९ [ स ]

विघाटणें, विघाटत, विघाटित—विघटणें इ० पहा

विघात—पु १ मोडणें, फोडण २ मोडून तोडून टाकलेली, नाश केलेली स्थिति ३ नाश, विघाड (कामाचा मसलतीचा) ४ विघ्न ५ पृथक्करण –दसिय १४ विघटन पहा [ स ] विघातक, विघाती–वि नाशकारक [ स ]

विघोटाई—स्त्री (बडोदें) जमीनीचें क्षेत्र व कस पाहून त्या मानानें कर उगराणीची एक जुनी पद्धत 'शावगी विघाटाई नावाची एक पद्धत असे परंतु जुन्या॰काळीं ती क्वचितच उपयोगांत आणीत' –बडोद्याचे राज्यकर्ते पृ ३५९

शद्वो १ ५४

विघ्न—नपु १ प्रतिबंध, अडचण, अंतराय, अडथळा २ संकट, आपत्ति 'सुखकर्ता दुखहर्ता वार्ता विघ्नाची। नुरवी।' –आरती २ (ल) भूत 'प्रहररात्रीसी विघ्न यईल येथें।' –रामदासी २ ६६ ३ अपमृत्यु व उत्पात याअर्थी योजतात अपमृत्यु उत्पात पहा [ स वि+हन्=मारणें ] सामाशब्द– ०कर्ता–वि अडचणी, विघ्नें उत्पन्न करणारा [ स ] ०कार–वि (गो) विघ्नें करणारा, विघ्नकर्ता ०नाशक-नाशन-राज-हर-हर्ता–पु गणपति, गणेशाचें नाव ही देवता सर्व विघ्नें दूर करणारी आहे [ स ] ०संतापी–वि दुसऱ्याच्या कामांत विघ्न आल्लें पाहून आनंद मानणारा [ स ] विघ्नित–वि विघ्न, अडथळा केलेला [ स ] विघ्नो–पु बिघाड, विघ्न पहा 'मध्येंच विघ्नो आला, नाहींतर मजा झाली असती'

विंच—स्त्री (को) तडा, चीर, भेग, फट (जमीन, लाकूड, इ० कास असणारी)

विंच-चें—न (चित्पा) सध्याकाळ

विचकट—वि १ बीभत्स, अश्लील, वेडेंवाकडें (भाषण इ०). २ बीभत्स कृत्य करण्याचा स्वभाव असलेला 'विचकट पोर' –नि ९७१ [ वि+चकोट ] (ग्राम.) ०बोलणें–अश्लील भाषण करणें, असभ्य बोलणें ०पणा–पु वाह्यातपणा, अनियमितपणा, असभ्यपणा 'गायनांत विचकटपणा होऊ देता कामा नये' –(बडोदें) कलावंतखातें ५४

विचकटणें—सक्रि १ ओढणें व फाडणें, जोरानें, घाईनें, वेडयावाकड्या रीतीनें, अव्यवस्थितपणें इकडे तिकडे फेकणें किंवा ढवळणें, चिवडणें, ओरबडून इ० छिन्नभिन्न करणें, विचवुरणें, विदारणें २ विसकटणें पहा ( विसकटणें या शब्दापेक्षा हा विघातक अर्थानें निराळा व जास्त कडक आहे ) ३ उचकटणें पहा [ वि+शकट?, स विच्=वगळें करणें+कट=जाणें ?, वि+चिकटणें ?, स विष्कदन ] विचकटा विचकट–स्त्री घाईचें व जोराचें ओढणें, विदारणें विचकटणें पहा [ विचकटणें द्वि ] विचकडणें, विचकडाविचकड-विचकटणें इ० पहा

विचका—पु १ अव्यवस्थित रीतीनें इकडे तिकडे फेकलेला रचलेला, किंवा कालविलेला ढीग ( धान्याचा, पुराचा, फळाचा इ० ), चिवडाचिवड, पसरलेली, चिवडलेली रास २ (ल) विस्कळलेली, नासलेली, भंगलेली, बिघडलेली स्थिति ( कामाची, मसलतीची ) ३ बिघाड, विसकळलेली, नासलेली, उघडी पडलेली स्थिति ( अन्नाची, नावाची इ० ) 'बंगाल्यांतील ब्राह्मो धर्माचा विचका बाबू केशवचंद्रांनीं आपल्या मुलीचा बालविवाह केला म्हणून झाला' –निले ४.१४७ ४ घोंगडा, गोंधळ ५

वाईट गोष्टीचें प्रदर्शन. [ स विच् ] विचकणी—स्त्री १ उघडणें, दोहींकडे करणें, विदारणें इ० २ ( 'तोंडविचकणी' चें संक्षिप्त रूप ) तोंड वेडेवाकडें करून वेडावणें [ विचकणें ] विचकणें—उक्रि व अक्रि १ उघडणें, दोहींकड करणें, होणें, माटयान किंवा विरूप व किळसवाण्या रीतीनें पसरणें, वासणें २ ( ल ) उघड करणें, पाडणें, पडणें, जाहीर करणें, होणें ( गुप्त दोष, व्यंगें ) ३ ( ल ) नासणें मोडणें, भग्णें, विघडणें ( कट, मसलत, काम ) ४ ( राज्दश ) पाकळ्या, पानें, ओढून काढणें, फाडणें ( फुलें, पुस्तकें यांच्या ) ५ विचकटणें पहा उसकटणें [ स विच्=वगळे करणें स विरोचन, विकचीकृ=विकचणें ] विचकणें शब्दापूर्वी नाम-जोडून अनेक वाक्प्रचार होतात जसें- तोंड विचकणें=१ वाकुल्या, वेडावण्या दाखविणें २ तोंड उघडणें, बोलणें दात, बत्तिसी दिच कणें=( उपहासार्थी ) दात, बत्तिशी दाखवणें, वाढणें, हासणें केस विचकणें=केस विसकटणें ( त्याचें ) विचकणें=(तो) नाश पावला, धुळीस मिळाला विचकून पाहणें—सूक्ष्म दृष्टीनें बारकाईनें पाहणें विचकोपा पु ओरबडलेली, विचकुरलेली, विदारलेली, छिन्न भिन्न केलेली स्थिति विचक पहा [ विचकणें ] ०होणें—विसकटणें

विचका—पु १ पांढरें फूल येणारा एक प्रकारचा गाठींचा वेल, वनस्पति २ ( प्र इचरा ) शिंक्याचा एक साधा प्रकार

विचकु( खु )रणें—सक्रि ओरखडणें, चिमटा घेणें, बोच करणें, हातानखांनीं ओढून फाडणें [ विचकुरा ] विचकु(खु)रा, विचकोरा—पु १ नखांनीं धरणें, तोडणें, ओढणें, ओरखडणी ( क्रि० घेणें ) २ चिमटा ( क्रि० घेणें ). ३ नखानीं ओरखडून केलेला व्रण, ओरखडा [ स विच्+कृ ]

विचखेण—वि विचक्षण -खिपू

विंचटा—पु मोठा विंचू [ विंचू ]

विचंवणें—न श्रम, त्रास, कष्ट 'तैसें स्वर्गसुख लोभें। विचवणें जें।' -अक्रि १ श्रम पावणें, कष्टांत पडणें, कुंचवणें 'जैसा छाल्लुलियां रेणु एकु। सर्वेचि लाविजे आणिकु। तैसेनि आग्रहाचा पाइकु। विचवे वायां।' -ज्ञा ६ ४९ २ ( महानु ) विटवना होणें 'मग अनेगी जाचकणुका। विचविजे हा।' -भाए ५०१ विचंवविणें-१ कुचबत टेवणें विचवती रोडा घालुनी। हाडांचा यां।' -ज्ञा १८ १०५१ २ भिन्न करणें विचंवु-पु १ संकट 'साधुसज्जना विचवु अही।' -एभा २३ ३९८ २ गरज, चाड 'मज काय तीर्थी विचवु।' -एभा २९ ८०१ [ वि+चिर-विचणें ] विचंवतु मारणें-क्रि सकम्प्रश्न करणें 'आराधितां अनेकी परी। जो तिहीं लोकांतें विचवितु मारी।' -शिशु १६३

विंचमोरा—पु स्त्रियांचा पायातील दागिना ( विंचू सारखा ) 'विरवल्या विंचमारे।' -स्त्रीगीतमाला ६६ [ विंचू+मोहरा ]

विचरण—न आचरण, वर्तन, चलन 'काई सिंहाचें विचरण।' -दाव ३७९ [ स वि+चर् ]

विंचरणी—स्त्री १ फणी, कगवा २ विंचरण्याची क्रिया; केस साफ करण्याची क्रिया विंचरणें-सक्रि फणीनें केस साफ करणें, केसांतील जटा वगैरे मोडून मोकळे करणें, पिंजणें, काप सातील सरकी काढून साफ करणें 'मग म्हणतसे माता। सखये तुझा विंचरूं माथा।' -कथा १ ८ ७४

विचरणें—अक्रि १ फिरणें; हिंडणें, भ्रमण करणें, भटकणें 'विचरे विश्व होऊनि। विश्वाचि माजी।' -ज्ञा २ ३६७ २ अनिर्बंध रीतीनें वागणें, चेष्टा करणें ३ संचार करणें ४ वावरण, व्यवहार करणें 'निजाकारें विचरत। रविप्रकाशें असे वर्तत।' -विपू ३ २७ 'विचरती जैसें साच भावें लोक।' -तुगा २५ [ स वि+चर् ]

विंचवी—स्त्री १ ( सोनारी ) तारेची कडी, तारेची दम्या नामाच्या आकृतीची जोडणीची कडी २ एक त्वचारोग, इसब विंचवी खरूज—स्त्री विंचू उकळलेल्या तेलानें बरी होणारी खरूज [ विंचु ]

विंचवी-ण—स्त्री विंचवाची मादी [ स वृश्चिक ]

विचळणें—अक्रि चावचळणें, भ्रमिष्ट होणें, वेडें होणें, भ्रमणें 'न निघे हा नद विचळला म्हातारा।' -मोकृष्ण ३९ ३१ 'दुराचारी रेक्मा निपट सखिये हा विचळला।' -सारुह ६ ११५ २ मोडणें, सोडणें, सोडून जाणें 'शास्त्राचिये सोयरिके। विचळिजे वर्णेचि एकें।' -ज्ञा १३ १६ [ स वि+चल् ]

विचक्षण—वि १ ज्ञाता, जाणता, दूरदृष्टि, शहाणा, बुद्धिमान् 'साधु हो तुम्ही विचक्षण।' -मुआदि २० ११५ -ज्ञा ४ ८५ 'धूर्त तार्किक विचक्षण। -ज्ञा ११ ३२ २ चिकित्सक, सूक्ष्मपणें व खोलवर चौकशी करणारा 'मैंदाचें स्वीकारील कवण विचक्षण अमूल्य निष्कपट।' -मोउद्योग ६ ४९ [ स वि+चक्ष्=पहाणें ] विचक्षणा—स्त्री चिकित्सा, बारकाईची चौकशी, परीक्षा; फोड करून तपास ( क्रि० करणें, लावणें, मांडणें ) विचक्षणता—स्त्री चौकसबुद्धि, दूरदृष्टि 'शोधानीं एक विचक्षणता प्राप्त होते' -टिळे ४ ४३४

विंचा—पु ( सोनारी राजा ) दुवेळकी बारीक खिळा, नक्षी उठवण्याचें साधन [ विंचु ]

विंचाचें घर—न १ विंचवाचें घर २ ( ल ) त्रासदायक वस्तु

विचार—पु १ कल्पनाशक्ति, बुद्धि यांचा व्यापार, शोध, अभ्यासपूर्वक चिंतन, खल्बत, चर्चा, तारतम्य, विवेक, तर्क, मनन २ विवेक, चिंतन, मनन करून केलेला निश्चय, निर्णय, निकाल, मत ३ विधिनिषेध, महत्त्व, क्षिति 'तुझें तुज नव्हे

शरीर। तेथें इतरांचा काय विचार।'–दा ३ १० ५३ ४ गोष्टीची विवचना, आग, कच्चे 'पृथ्वीप्रलय होता तैसा विचार आहला' –भाव १५ 'मग तुम्हांस विचार भारी पडेल'–शारो ८१ ५ गोष्ट, हकीकत, खरी स्थिति 'कळतो तेथिचा विचार।'–दा ८८४३ 'हाराचा सागावा विचार। तरी पृथा म्हणाल तुम्ही सर्व।'–शनि १८१ ६ मत अभिप्राय, बेत 'परंतु गुरू नये हा विचार। कोठेंच नाहीं।'–दा १६ १३ ७ युक्ति, उपाय मनसुबा, मसलत 'दयानिधि रूपभरू। सागता झाला विचार।' –गुच ३४ १६ 'चला आमुचे मदिरा। बोलो पुढील विचारा।' –कथा १.३ ११८ 'यहा येण्यास कोणता विचार'–रत्न काता २१ ८ धर्मन 'याहीं वेगळे आणीक गुरु। ऐक तयाचा विचारु।'–दा ५ २ ६९ ९ इच्छा मर्जी, मनोदय 'तदनामा तुमच्या विचारें केला जाईल,'–विवि ३ ५ १८०६ [स वि+चर्] या शब्दाचे अनेक सामासिक शब्द होतात उदा० **सारासार विचार**–पु गुणदोष पाहून केलेला विवेक, बनविलेलें मत **सद सद्विचार**–पु योग्यअयोग्य यांची निवड, चागलें वाईट ठरविणें **कार्याकार्य विचार**–पु साधकबाधक प्रमाण वरून कर्तव्य किंवा अकर्तव्य तें ठरविणें, करावयास योग्य किंवा अयोग्य यासबधी अनुकूल प्रतिकूल प्रमाणावरून मत बनविणें याप्रमाणें इष्टानिष्ट–कर्माकर्म–कर्तव्याकर्तव्य–कार्यकारण–गमनागमन–ग्राह्याग्राह्य–धर्माधर्म–पात्रापात्र–पापपुण्य–भक्ष्याभक्ष्य–योग्यायोग्य–वर्ज्यावर्ज्य–वाच्यावाच्य–विधिनिषेध–विहिताविहित–शुभाशुभ–साध्यसाधु–सगासग–विचार इ० (वाप्र) **विचार जागविणें**–(प्र) विवेक जागविणें पहा **विचारांत पडणें**–चिंता उत्पन्न होणें काळजी वाटणें **विचारक**–वि विचारी, विचार करणारा, शोधक **विचारगम्य**–वि विचार केल्यानतर समजण्यासारखें, तपास करण्यासारखें बुद्धीस आकलन करता येण्यासारखें चिकित्सा करता येण्याजोगें **विचारण**–न १ शोध, चिकित्सा विवेक **विचारणा**–स्त्री १ शोध, चौकशी, विचार तर्क, कल्पना 'विचारणा देवाची।'–दा १६ १० २८ २ पचाईत चिंता, काळजी, गूढ ३ व्यवस्था, तजवीज 'लग्नविचारणा न पुसता माडिली।'–सप्र २ ३७ 'विधियुक्तादि विचारणा सकळिकीं।'–दावि ७ २ १२ ४ सप्त भूमिकातील दुसरी भूमिका –हको **विचारणीय**–वि १ विचार करण्यासारखें, शोध, तपास चिकित्सा करण्यासारखें २ विचारण्यासारखें, ज्याबद्दल माहिती मिळवावयाची आहे असें प्रश्न करण्याजोगें, प्रष्टव्य **विचारणें**–उक्रि १ प्रश्न करणें चौकशी साठीं पुढें माडणें चर्चा करण्यासाठीं प्रस्तावना करणें २ परामर्श घणें विचारपूस करणें, पुसणें, परिस्थिति वगैरेसबधीं सहानुभूतिपूर्वक किंवा मदत करण्याच्या दृष्टीनें चौकशी करणें मायेवहीण न विचारी। जाहला पापी पद्धारी।'–दा ३ ३ १५ ३ आदर दाखविणें; आज्ञापालन करणें, काळजीपूर्वक लक्ष्य देणें ४ महत्त्व देणें; क्षिति बाळगणे, पर्वा करणें, किंमत देणें ५ विचार करणें, चौकशी, तपास, चर्चा करणें, 'ल्गुपतनें विचारलें'–पच २ १ 'एथ सारासार विचारणें। कवणें काय आचरावें'–ज्ञा १.२४६ 'पुन हें अवघें विचारितो। ऐसें देत असे माझेया चित्ता।'–भाए ६४ ६ चालविणें, चालू करणें 'याचेनि वीर्यें क्रियेच्या पोटीं। सतनी विचारू गोमटी।'–मुआदि २४ ३४ **विचारणें**–अक्रि चिंतन करणें, मनन करणें, विचार करणें 'मनीं विचारी एकानाथ।' –राथि 'विचारिल्यावीण करू नये तें।'–साह्द ३ २ **विचारपूस**–स्त्री १ वास्तपुस्त, चौकशी, शोध २ परामर्श, कुशलप्रश्न (क्रि० करणें) [विचारणें+पुसणें] **विचार-वंत-वान-शील, विचारी**–वि सुज्ञ, विचार करून वागणारा ०**शक्ति**–स्त्री बरें-वाईट वगैरे विवेक करण्याचें सामर्थ्य, मननशक्ति ०**संगति**–स्त्री विचारमालिकेंतील निरनिराळ्या विचाराचा सुसगतपणा, परस्परसबध, एकसूत्रता एका कल्पनेवरून तत्सदृश दुसरी कल्पना सुचत तेव्हा त्या दोहोंमधील साहचर्यसबध ०**संक्रांति**–स्त्री विचाराचें परिवहन एक विचार दूरस्थ व्यक्तींच्या मनात एकाच वेळीं येण (इ) टलेपॅथी नीतिशास्त्रप्रवेश ३९० ०**स्थित**–वि विचार करण्यांत, चिंतनात मनन करण्यात निमग्न, गुग झालेला. 'ऐसें बोलती श्री गुरुनाथु। तव शिष्य झाला विचारस्थितु।' ०**क्षम**–वि विचार करण्याचें सामर्थ्य असलेला, विवेकी **विचारित**–वि विचार करून ठरविलेलें, निश्चित, बुद्धीनें स्वीकृत **विचार्य**–वि विचार करण्यास योग्य

**विचिकित्सा**—स्त्री १ बारीक चौकशी, तत्त्वनिर्णय २ शका, सशय [स]

**विचिंतित**—वि चागलें मनन केलेलें, विशेष विचार केलेलें [स]

**विचित्र**—न आश्चर्य –वि १ चित्रविचित्र अनेक रगाचा, नाना रगी, रगीबेरगी, निरनिराळ्या अनेक रगानीं युक्त २ आश्चर्यकारक, अचबा वाटण्यासारखा 'पाहे तटस्थभावें दोघाचें रण विचित्र सेना तें।'–मोकर्ण ९ १९ ३ तऱ्हेवाईक, नाना प्रकारचा, अनेकविध 'विचित्र अन्नें वाढिलीं तारीं।' 'रचना विशेषें विचित्रीं।' –रू २० ४ विलक्षण तऱ्हेवाईक लोक-विलक्षण 'कोणी एक वर्णीं विचित्र पुतळा जखावया बैसला।' तो फारच विचित्र मनुष्य आहे' [स] ०**ता**–स्त्री वैचित्र्य, भिन्नता, तऱ्हेवाईकपणा, सौंदर्य, नानावर्णयुक्तता, रमणीयता, विस्मयकारिता 'विचित्रता भूताचिया।'–ज्ञा १८ ५३९. ०**वाडा**–पु (व ना) वैचित्र्य **विचित्रित**–वि विचित्र

**विचित्रगड**—पु किल्ला रोहिडा

**विचीण**—स्त्री १ विंचवी पहा २ विंचवी खरूज पहा

विचुक-का—क्रिवि. (प्र) विचूक; असंबद्ध, अव्यवस्थितपणें. '' ना तरी बालक योबडा बोलीं । बरीं बांकुडा विचुका पाउलीं ।' –ज्ञा ९.६. ' विचुक बोल्ती शब्द पदोपदीं हृदयांतरीं आयुनी ।' –ऐपो ३०५. विचूक-वि. असंबद्ध; भलभलतें; विसंगत. –क्रिवि. असंबद्धपणें. [ वि+चूक ]

विचुंबा—पु. अचंबा; आश्चर्य; चुचकळा; विस्मय. ' विचुंबा पडला देखोनी दृष्टि । ' –मुक्तेआदि २०.१०८.

विचुरणी-णें—विचरणी-णें पहा.

विंचू—पु १ एक अष्टपाद विषारी प्राणी. हा नांगीनें दंश करतो. (अप.) विंचु, विंचु; इंचु २ वृश्चिकनक्षत्र (विंचवाच्या आकारावरून). ३ भाजलें विणतांना गातावरील दोन्या पुढें सरकूं नये म्हणून गांठ दिलेले काठ्याचे तुकडे वापरतात ते. [ सं. वृश्चिक; प्रा. विच्छुअ, विच्छूअ, विछुअ; हिं. बिछु; सिं. विछुं ] विंचूकांटा-पु विंचू अगर इतर दंश करणारा प्राणि. विंचुपेव-न. विंचवांनीं भरलेलें पेव. ' विंचुपेवीं जळीं, गर्तेत ढकलितां । ' –दावि २७६.

विंचू—स्त्री. हिमालयांत सांपडणारी एक वनस्पति. हीस स्पर्श केला असतां विंचू चावल्याप्रमाणें वेदना होतात.

विचेतन—वि. बेशुद्ध. [ सं. वि+चेतना ]

विचेष्टित—न. कृत्य; हावभाव; कार्य. [ सं. ]

विच्चड, विच्छड—पु समूह. –हालसप्तशती. [ दे. सं वि+चि ]

विच्छाय—वि. पांढरें; फटफटित; निस्तेज; फिकें. ' मुखकमल तियेचें स्वच्छ विच्छाय झालें । ' –सारह ३.५७. [ सं. वि+छाया ]

विच्छिन्न—वि. १ तुटलेलें; विभागित; भाग अलग झालेलें. २ छिन्नभिन्न, पूर्ण मोडलेलें, चुराडा झालेलें; नष्ट. ३ (ल.) मोडलेला; उल्लंघन केलेला; अतिक्रमण केलेला ( नियम, विधि, वगैरे ). ' ज्या मनुष्याचे कुलधर्म विच्छिन्न झाले त्यांना हे जनार्दना ! नरकवास निश्चयेंकरून घडतो. ' –गीर ६१०. ४ बंद पडलेला; स्थगित, लुप्त, खंडित; बाधित; प्रतिबंध, हरकत आलेला (वंशपरंपरेचें वतन, हक्क, व्यवहार, धंदा, स्थिति वगैरे). ' तुका म्हणे होय दरिद्र विच्छिन्न । ' –तुगा १९७. [ स वि+छिद् ] ०किरण-पु पृथक्कृतकिरण (इं) स्पेक्ट्रम. ०किरणदर्शक-पु प्रकाशपृथक्करणयंत्र. (इं) स्पेक्ट्रॉस्कोप. ०किरणपट-पु पृथक् झालेल्या प्रकाशाचा पट्टा. (इं) स्पेक्ट्रम.

विच्छेद—पु १ विभागणी; वियोग, भेद; विभाजनक्रिया अथवा विभाजित स्थिति, निरनिराळे भाग करणें. २ मोडतोड; फोडाफोड; चुराडा, चूर्ण स्थिति. ३ खंड; लोप. ' नॉर्मन जेत्यानीं केलेल्या स्वारीमुळें या संस्थेच्या परंपरेंत कांहीं कालपर्यंत कांहींसा विच्छेद पडला. ' –पार्लमेंट ४. ४ पृथकरण. (इं.) डिसेक्शन. ' त्याचा श्वासनलिकेच विच्छेद होऊन वेगळे वायु होतात. ' –रसा १२४. [ सं. वि+छिद् ] ०क-वि. विच्छेद करणारा.

विज—स्त्री. वीज पहा. ' पायांस लावी विज एक हातें । ' हरिराजकृत रामायणाचें भाषांतर ८८.

विजणा-ना—पु. पंखा. ' चवरी हन विजणा । तेय ल्यो करीन प्राणां । ' –ज्ञा १३.४३४. [ सं. व्यजन; प्रा. विजण; गु. विंझणो ] विजणवारा-पु. पंख्याचा वारा. ' मज नलगे विंजणवारा । ' –एरुस्व ५.७१. विजणें-न. पंखा, विजणा हालणें. विजणें, विजणें-क्रि. वारा घालणें. –ज्ञा ९.१०. ' एकीं चवरी विजती सुंदरा । ' –निगा ३१. ' विजिला प्राणसांडीं । ' –ज्ञा १३.७२०. ' कनकदंडे विजिजताल । ' –पैठणचरित्र. ' तिर्या विजीजती गामयनीं । कापूरकेळींचा । ' –शिशु ३४४. विजणें जाणविणें-पंख्यानें वारा घालणें. ' अनुपद तिस कोणी विंजणें जाणवीती । ' –सारुह ३.६९.

विजन—न. एकांत. –ज्ञा १३.१९८. –वि. लोकवस्तीरहित; ओसाड; निर्जन, मनुष्य फिरकत नाहीं असा. [ सं. वि+जन=लोक ]

विजना—वि. कृश; बारीक; सडपातळ. ' सडक पातळ विजना केवर पीतांबर नेसली । ' –पला ४.३५.

विजवळ—स्त्री. ( व. ना. ) इजवळ पहा. विलाप.

विजमायली—वि. इजमायली पहा.

विजय—पु १ जय; यश, जिंकणें; जयोत्सव. २ विष्णूच्या एका द्वारपालाचें नांव. ३ सत्ताविसावा संवत्सर. ४ अर्जुन. ' हांसे विजय मनि म्हणे कां गोपउल्या मला भुजाल्या हो । ' –मोविराट ४.८७. [ सं. जि=जिंकणें ] ०ध्वज-पु. जयाची खूण, जयचिन्ह; जयाची पताका; निशाण विजयी-वि. जेता; यशस्वी; जय पावलेला. [ सं. ] ०माळ-स्त्री. जयकारक माला; यशोदायक चिन्ह; शुभ वस्तु. विजित-वि. १ पराभूत, जिंकला गेलेला; पराभव झालेला २ जिंकून घेतलेला; युद्धांत मिळविलेला, द्यूतांत मिळवलेला. [ सं. वि+जित ] ०जाणें-हरणें; पराजय कबूल करणें; कमीपणा पतकरणें. विजेता, विजैया-वि. (महानु.) विजयी; यशस्वी; जय मिळवणारा. ' गिरिसम वधुनी कृष्णराजा विजैया ' –यस्तो २०.

विजया—स्त्री. १ भांग २ तृतीया, अष्टमी, व त्रयोदशी या तिथींस नामाभिधान. ३ आश्विन शुद्ध दशमी. या दिवशीं दसरा हा सण असतो. ४ पार्वती; दुर्गा. [ सं ] ०दशमी-स्त्री. दसरा; आश्विन शुद्धदशमी. या दिवशीं रामानें रावणास मारिलें.

विजयाख्य—वि कर्णमूळ स्थानीं दोन भोंवरे असलेला घोडा –अश्वप २५. [ सं. ]

विजयाभिनंदन—पु पुढें होणाऱ्या एका शकल्याचें नांव.

विजयावर्त—वि कर्णमूळाचे ठिकाणीं एक व उरावर एक असे भोंवरे असलेला (घोडा) -अश्वप १.८८ [सं]

विजरे—पु प्रांताधिकारी, पोर्तुगीज गव्हर्नर, व्हाइसरॉय 'गोवेकर विजरे याचा व स्वामींचा स्नेह झाला आहे' -शारो १.९२ [पोर्तु इं व्हाइसरॉय]

विजवटा—वि मात्य, द्वाड, खोडकर; उच्छृंखल, दुर्वर्तनी; कुलकलंक; दुर्गुणी. 'शिवाजीच्या मरणानंतर त्याच्या विजवट्या लेकानें.' -नि १६८. 'उगीच विजवटी हे आणिली काल भाची' -सारुह ४ ६६. [सं बीज+वत्। वियावत्=दीडशहाणा-भाम १८३४ विजयवर्तिक-भाम १८३४]

विजवरा—पु विजवरा पहा

विजवा—स्त्रीअव (अशिष्ट) वीज याचें अनेकवचन 'स्वरुपाचे तुटती तारे कडारे कड निजवा पडतील तुटून।' -पला ४ १७ 'मूकपा उलका भालु रीत घन विजवा कडकडती।' -ऐपो ३११ [सं विद्युत्]

विजळणें—अक्रि विलविलीत होणें; (भावे, कण वगैरे नासून) लिबलिबीत होणें, चोयापाणी होणें (दुधाचें), नासणें. [सं वि+चल्]

विजाई—स्त्री एक क्षुद्र देवता 'विंजाई देवी म्हणे मी विंजवनी।' -सप्र ५ २७ [स विध्य+आई]

विजात—स्त्री भिन्न जात -वि १ भिन्नजातीचा, निराळा, वेगळा 'माणसासी भुके। विजातीनें घावे थुके।' -तुगा २११३ २ (अपशब्द) द्वाड, मात्य, त्रासदायक, अवखळ (मूल) [स वि+जाति] विजाती-वि भिन्न जातीचा, निराळा, वेगळा, असाधारण, असामान्य विजातीय-वि. १ भिन्न जातीचा, वर्गाचा, प्रकारचा, कुळाचा, अन्य २ विलक्षण, अपूर्व, नवीन व आश्चर्यकारक, तऱ्हेवाईक ३ तऱ्हेतऱ्हेचा, नानारूपी, बहुविध, अनेक प्रकारचा 'परमेश्वराचे विजातीय चातुर्य, उपकारबुद्धि व अपारशक्ति हे गुण दिसून येतात' -मराठी सहावें पुस्तक पृ ७७ [सं]

विजायली—वि इजायली पहा

विजार, विजारत, विजारदार, विजारा—इजार इजारत, इजारदार, इजारा इ० पहा

विजावळी—स्त्री वेगळेपणा, भिन्नता, वेगळीक 'तें तरी गा सुवर्मा। विजावळी आत्मया कर्मा।' -ज्ञा १८ २६९

विजु, विजुका, विजू, विज्जु—स्त्री वीज विद्युत्, विद्युल्लता 'सहारमेघाचा पोटीं। उडलेति चोळ विजुचिआ पुटीं।' -शिशु १०१९ -ज्ञा ११ २०४ 'जैसे विजुचे कल्लोळे।' -ज्ञै ४३.१८ 'जैसी मेघांत विज्जुनगा' -ज्ञाप्र ४२४ [स विद्युत्]

विजृंभणें—अक्रि १ जांभई येणें २ प्रगट होणें, दिसु लागणें 'आनंदसमुद्रीं संक्रीडत घडिघडि रोमांच विजृंभती' -भाविश्रा. [स]

विजोगत—स्त्री अपघात, आपत्ति, अनर्थ, दुःखकारक घटना (क्रि० येणें, पडणें) [स वि+युज्] विजोगाचा दिवा-पु (व) विचित्र माणूस; विलक्षण व्यक्ति 'तुमच्यासारखे विजोगाचे दिवे जगांत नाहीतच'

विजोड—वि १ विशोभित, विषम, न शोभणारें, विसंगत. *'असल्या विजोड संबधानें नावाजलेल्या कुटुंबास कलंक लागतो.'* -टि ४ १३५ २ न जुळणाऱ्या रंगाचें, भागाचें, न बसणारें, जमणारें [स वि+युज्]

विज्वर—वि भयंकर, प्राणांतिक, दुर्धर, धाईट, नाशकारक. 'संभाजी महाराज औरंगजेब याणीं नेऊन विज्वर प्रसंग गुजरला' -मराचिथोशा २

विंझण-णा-णें, विंझवणा-विंझणवारा—विंजणा, विंजना पहा (अशिष्ट) इझणा-वा 'उखा घाली विंझणवारा' -कथा १ ६ १९७.

•विझणें—अक्रि १ माल्वणें, शांत होणें, थंड होणें (दिवा, अग्नि वगैरे) २ (ल) थंडावणें, शांत होणें, मिटणें, दबणें (भांडण, राग वगैरे) [सं उपशमन, सिं उझणु] विझण-न विझवण्याची, मालवण्याची स्थिति [विझणें] ०घालणें-विझविणें ०पडणें-विझणें विझवणें-सक्रि माल्वणें, शांत करणें [विझणें प्रयोजक, सि उझाइणु, गु विसामणु]

विझणें—उक्रि. भोंक पडणें, छेदणें, टोंचणें 'विझती शल्याचे पायटे।' -दा ३ ७ ४ [सं विध्, म विंधणें]

वि(विं)झणें—न सुताराचें च्छेद पाडण्याचें हत्यार. [स. विध्]

विंझुणवारा, विंझुणा, विंझुणें—विंजणा पहा.

विट—पु १ जार, उपपति, ठक, लुच्चा मनुष्य, धूर्त, व्यसनी, छंदी 'भीष्मा मर्दाया अरि, विट जेंवि सतीकुचा मरायास।' -मोभीष्म ११ ५४ 'जपति जसे पाडाया व्यसनीं सुजनासि सर्वकाळ विट।' -मोआदि २८ ८ २ गाढ, गाढमराळ. ३ जावई -हंको ४ (नाट्य) राजाचा मित्र, रंगेल मनुष्य. [स]

विटक-र, विटका—वि १ नासलेलें, विटलेलें 'आंबट तिखट विटक जाणोनि। करी त्याग स्वीकार।' -स्वादि ५ २. ३४ २ विटणारा, उडणारा, फिका पडणारा (रंग, कपडा). [विटणें]

विटंक—न घरटें, खुराडें 'कपोत हुंकार करी विटंकीं।' -सारुह ५ १४ -वि उच व घनदाट, निबिड, अयादव्य 'ऐसा हा एकु। विश्वाकार विटंकु।' -ज्ञा १५ ६२. [स]

**विटकणी**—स्त्री. १ वेडावणी; विचकणी; वाकुली. ( क्रि० दावणें; दाखविणें ) २ कुचाळी; टवाळी; थट्टा. [ विट ]

**विटकर, विटकूर**—स्त्री. १ वीट; विटेचा तुकडा; रोडा; ढोला. २ विटेची पूड; इटकर-कुर. **विटकरी**-वि. विटेसारखा; विटेच्या पुडीसारखा ( रंग ).

**विटकळणें**—अक्रि. सुरें होणें; फांवणें.

**विटकुली**—स्त्री. ( प्र. ) विडकुली पहा. लहान विडी.

**विटगळला**—वि. ( व. ) विटका; वेडाविद्रा; किळसवाणा.

**विटणें**—अक्रि. १ निस्तेज होणें; मळकट होणें; तजेला नाहींसा होणें; फिका पडणें ( रंग, रंगित वस्तु ). 'क्षऱ्याच्या पाण्यानें तांब्याची भांडीं विटतात.' -पदाव १.१४२. २ शिळें होणें; आंबणें; ताजेपणा, तजेला, सौंदर्य, तेज, तकाकी नष्ट होणें. ३ कोमेजणें; मलूल होणें; शिळपणें; म्लान होणें ( एखादें दुष्ट-प्रकारी अथवा फार वृष्टि झाल्यामुळें ). ४ ( व ) कंटाळणें; तिरस्कार वाटणें; ओकारी येणें; नकोसें होणें. 'जरि तूं करुणाळा गोसावी। भणौनि विटसीना।' -कृ ५२. 'स्वकन्येच्या ठायीं सदय परि झालाचि विटता।' -मोकृष्ण ६२.३४. [ सं. विट= घाण; विट् ध्वनि करणें, शाप देणें ]

**विटप-पी**—पु वृक्ष, झाड.

**विटंबणें-विणें**—उक्रि. १ उपहास, थट्टा, फजिती करणें; अनमानणें; चेष्टा करणें; लाजविणें. 'विटंबिले भट। दिला पाठी वरी पाट।' -तुगा २३६. २ विघडविणें; कुरूप करणें. 'रूप विटंबील श्रीपती।' -एरुस्व १६.२७. [ सं. विडंब् ] **विटंब**-पु. विटंबना; फजिती; चेष्टा. 'वोहरेवीण वाधावणें। तो विटंबु गा।' -ज्ञा १३.८३७. **विटंबना-णा**-स्त्री. फजिती; मानहानि, अप्रतिष्ठा. 'काय विटंबना सांगों किती। पाषाण फुटती ऐसें दु:ख।' -तुगा २२६०. **विटंबवाणें**-वि. अपमानकारक, मानहानीचें. 'त्या कृष्णासी सोयरिक करणें। तेंचि आम्हां विटंबवाणें।' -एरुस्व २.२७.

**विटबंदी, विटेबंदी**—वि. विटांनीं बांधलेलें; इटबंदी. [ वीट+बंदी ]

**विटवणी**—न हानिकारक पाऊस, अकालवृष्टि; अतिवृष्टि; ( अशा वृष्टीवर विहिरीचें पाणी पिकास वावें लागतें ) [विटणें+पाणी]

**विटवणें**—सक्रि वेडावणें, कंटाळा आणणें. 'मातलें माकड विटवी पंचानना।' -तुगा २४०३. 'हा टायवरी पांडवा। पदार्थ जातीं आपवा। विटवी तो होआवा। वैराग्य लादु।' -ज्ञा १५.२५७. [ विटणें प्रयोजक ]

**विटविट**—स्त्री. विषाद; नाश; विस्कटलेली स्थिति, अवस्था. -क्रिवि. किडयाच्या बुजबुजाटाप्रमाणें, किडे घोंगावूं लागतात तसें. [ विट द्वि. ]

**विटा**—पु. एक प्रकारचा भाला; इटा पहा. 'त्यामागें विटे वाण भाले.' -मराचियोशा ६९. **विटेकरी**-पु विटा नांवाचें शस्त्र धारण करणारा; इटेकरी. 'पुढें धावती विटेकरी।' -ऐपो १४५.

**विटावणें**—सक्रि. वेडावणें. 'कीं विटावूं लागे फुंजे।' -ज्ञा १३.७६०. 'हरिदासासी विटावी।' -एभा २३.२५८. [ विटणें प्रयोजक ] **विटावीट**-स्त्री. फटफजिती. 'तेथ विटावीट आपवी। होइजे जे स्वभावीं।' -सिंसे ४२.१०१.

**विटाळ**—पु. १ दोष; अपवित्रता; अशुद्धता; विशिष्ट प्राणि-मात्र, वस्तुजात यामध्यें असणारी अशुचिता. 'तरी आतां दिठीचा विटाळु गेला।' -ज्ञा ११.१९२. 'या स्त्रीजिता नित्य विटाळ पाही।' -सारुह ८.११. २ अशुद्ध, अपवित्र वस्तूच्या संसर्गानें प्राप्त होणारा दोष, अशुचिता, अस्पृश्यसंसर्गजन्यदोष. ३ स्त्रियांचा ऋतुस्राव; रज स्राव. 'रजस्वलेचा जो विटाळ। त्यामध्यें जन्म यासि।' -दा ३.१.११. ४ अभाव, अलिप्तता वगैरे दाखवि-ण्यास हा शब्द योजतात. 'आम्हां विषयाचा विटाळु सदा।' -शिशु २०१. 'त्यांस देशभापेचा विटाळहि सोसत नाहीं.' -नि २. [ सं. विष्ठा; प्रा. विट्ठा; प्रा. विट्टाल ] ( वाप्र. ) ०काढून घेणें-विधवेनें वपन करून घेणें. ०कालवणें-विटाळ पसरणें; एकापासून दुसऱ्यास याप्रमाणें दोष सर्वभर होणें. ०जाणें-१ वेळीं अवेळीं रज.स्राव होणें. २ रज स्राव होण्याचें अजिबात बंद होणें. **विटाळणें**-उक्रि १ अशुद्ध, दूषित, भ्रष्ट, अपवित्र करणें; विटाळ करणें, होणें. 'जैसे पुत्र विटाळले।' -विपू १ ८४. २ केवळ स्पर्श होणें, नाममात्र संबंध येणें. 'जेवण न जातां तोंड मात्र विटाळलें.' ०चंडाळ-पु. नानाप्रकारचा विटाळ, सर्वसामान्य विटाळ. **विटाळशी**-स्त्री. रजस्वला; ऋतुस्नात स्त्री. ०चंडा-ळशी-स्त्री. विटाळशी.

**विटाळी**—स्त्री. ( व ) विटवर; विटेचा भुगा.

**विटाळें**—न. विटा पाडावयाचा लाकडी सांचा.[स इष्टकाल्य]

**विटी**—स्त्री. विटदांडूच्या खेळांत दांडूनें उडवावयाचा लहान लांकडाचा तुकडा. [ सं. यष्टि ] **विटीदांडू**-पु. विटी आणि दांडू घेऊन खेळावयाचा एक खेळ. 'मराठी राज्य काबीज करणें म्हणजे विटीदांडूचा खेळ.'

**विटी**—स्त्री. विडा 'मदरसित सुस्वर विटी।' -लक्ष्मी-नारायण कल्याण, ग्रंथमाला [ सं. वृत=वळणें; वीटिका ]

**विटोरिया**—पु सुरळंडा; शुद्रा. 'जैसे दाणे काढी कणसाचे। मग काय प्रयोजन विटोरियाचें।' -अफला २९.

**विटोला**—पु ( ना. ) तात्पुरता घातलेला चुला. [ वीट ]

**विट्ट**—पु. १ अतिशय वीट. २ बेरंग, पाणउतारा; तेजोभंग; फटफजिती.

**विठलाई**—स्त्री. एक क्षुद्रदेवता. ' विठालाईदेवी म्हणे सांगो कायी।' –सप्र ८.५.२४.

**विठाई, विठावाई, विठोवाई**—स्त्री. विठोबास प्रेमांतील लाडकें नांव. ' विठाई माउली। ग माय माझी विठाई माउली।'

**विठी, विठीदांडू**—विटी, विटीदांडू पहा.

**विठीव**—स्त्री. पौरुष. 'आंगीं कस धरिती पण विठिवेवीण. –गीताचंद्रिका २३.

**विठू, विठुमिया**—पु. पोपट.

**विठू, विठो, विठोबा**—पु विठ्ठल देवाचीं नावें.

**विठूबोका, विठ्या**—पु. बोका; माजलेलें माजर.

**विठोबारखमाई**—पु (अव.) १ विठ्ठल व रुक्मिणी. २ (ल.) समवयस्क वधूवर; योग्य जोडपें.

**विठ्ठल**—पु. पंढरपूरची प्रसिद्ध देवता. [स. वित्=ज्ञान+ठ=शून्य, +ल=परिपालक. अज्ञानाचा वैवारी; विष्णु–विठु+ल, का?] **विठ्ठलपंती तांब्या**–पु. विठ्ठलपंत नांवाच्या मनुष्यानें प्रचारांत आणलेल्या घाटाचा तांब्या. **विठ्ठल सवाशीण–सवाष्ण**–स्त्री. जीस विठ्ठल हाच केवळ आधार आहे अशी स्त्री, विधवा; विशेषतः विधवा. ' गतभर्तृकेच्या मनात तसला श्लोक पाहिजे असेल तर तिनें अगोदर विठ्ठलसवाष्ण झालें पाहिजे ' –आगर ३.११.

**विठ्ठलसुंदरांतक**—पु. (सांकेतिक) राघोबादादा. (विठ्ठलसुंदर हा निजामाचा दिवाण होता त्यास मारणारा). ' म्हणे म्यां बहुतेक दिधलीं दुःखें। त्या विठ्ठलसुंदरांतकें।' –अफला.

**विडकुली**—स्त्री. लहान विडा; पट्टी.

**विडनिंबू–लिंबू**—न. ईडनिंबू–लिंबू पहा.

**विडंब**—पु डौल; थाट; तन्हा; ठेवण. ' जेवीं आरिशाचें प्रतिबिंब। दिसे समरूपें स्वयंभ। तैशी स्वरूपतेची शोभ। सम विडंब दोहींचा।' –एभा २४.३०९. [सं.]

**विडंबन–ना**—नस्त्री. १ उपहास, फजिती; टवाळी; थट्टा; चेष्टा. एखादी गोष्ट वस्तुतः आहे त्याहून भिन्न स्वरूपात दर्शवून तिची टवाळी करणें; उपहास करणें; कुचेष्टामिश्रित दोषदिग्दर्शन. यांत कुचेष्टा हा एकच हेतु नसून विडंबित गोष्ट सुधारण्याचाहि हेतु असतो. २ नक्कल; सोंग, बतावणी. ३ दुसऱ्याचें रूप धारण करणें; दुसऱ्याची आकृति धारण करणें [सं.विडंब्] **विडंबित**–वि. १ फजित, उपहास केलेला, झालेला. २ ज्याची नक्कल, अनुकरण, बतावणी केली आहे तो.

**विडवर**—न. निकृष्टावस्था; पूर्ण विनाश; फजिति; गाळण; इधेलंडी. –विकिवि अव्यवस्थित; हिडिस; ओंगळवाणा; भ्रष्ट; निकृष्ट ' राज्य झालें असें बहु विडवर। उपद्रव फार प्रजेसी।' –कयासारामृत २७.७५.२५.४७. [सं. विट]

**विडा**—पु. १ नागवेलीचीं पानें, सुपारी, कात, चुना, लवंग, वेलदोडे वगैरे घालून केलेली पट्टी; तांबूल. विड्याचे प्रकारः–कातरविडा; कापूरविडा; कुलपीविडा; गोविंदविडा; गोंदविडा; मोडविडा; मोदकविडा इ०. २ विड्याचें साहित्य, पानसुपारी वगैरे. [सं. वीटिका; प्रा वीडिआ] **०उचलणें**–(पूर्वी एखादें बिकट काम करण्याचा प्रसंग आला असतां दरबारांत मध्यें विडा मांडून ज्यास तें काम करावयाची ईर्षा असेल त्यानें तो विडा उचलून घ्यावा अशी पद्धति होती. त्यावरून) प्रतिज्ञा करणें; पण लावणें; कार्याची जबाबदारी घेणें. ' जो धरून आणील गनुखाल्वाला। तेणें विडा उचलावा।' –जै १३.९. **०देणें–१** निरोप देणें, पाठवणी करणें (समारंभ पुरा झाल्यावर विडे वांटावयाची चाल आहे यावरून). ' केशवपति रायाचा। विडा घेऊन आज्ञेचा।' –ज्ञाप्र १०२९. २ कामावरून कमी करणें. **०पाऊड**–पु. विडादक्षिणा; विडा पैसा. ' विडा पाउड भीतरां। घेऊनि रिघती गाभारा।' –ज्ञा १८.४६.

**विडाल–क, विडालक**—पुन्पु विडाल; बिडालक पहा. माजर. ' बदके विडालके पावोव्था।' –होला ११४.

**विडाळ**—न. पोटांतील आतड्याचा भाग. ' सात अंगुळें स्नेहाळी। आठ अंगुळें पित्ताची खोली। विडाळ बोलिजे जवळीं। दोन अंगुळें।' –कथा ५.७.१७५.

**विडि, विडी**—स्त्री. १ विडा; तांबूल. ' विडि करूनि समर्पि महासती।' –नरहरि, दानव्रत १७. ' राव होता सुखसदनीं। विडिया देतसे मोहिनी।' –कथा २.९.९३. ' धरा शातता खाउंद्या विडी।' –होला ८३. २ तंबाखू घालून केलेली पानाची सुरळी; विडीचे प्रकार.–फर्मास, तोकडी, लवंगी, बीचबंद. ३ लग्नसमारंभांत वधूवरास तोडण्याकरितां देण्यात येणारी पानाची सुरळी, लवंग, सोनऱ्याची काचळी इ०. ४ वसवी; शेंबी; माडळ; वलय, कडें; लोखंडाची वाटोळी चापट कडी (ही मुसळ, काठी, दिवटी यांच्या शेवटीं, नांगराचा फाळ बसविण्याकरिता, चाकाच्या तुंब्याभोंवतीं व तुंब्याच्या आतील भागास, रहाटाचा आंस फिरण्याकरिता, जात्याच्या मायणींत, हत्याराच्या मुटीस वगैरे बसवावी लागते). ' विद्युल्लतेची विडि। वन्हिज्वाळाची घडी।' –ज्ञा ६.१२४. [सं. वीटिका; विटि]

**विडुळणें**—अक्रि. बिलबिलीत, लिबलिशीत, यलथलीत होणें (एखादें फळ अधिक झाल्यामुळें, उबून, नासून); नासणें; चोथापाणी होणें (दूध, दहीं वगैरे). **विड्ढळ**–वि. १ नासलेलें; नासलेलें, कुजट झालेलें; शिळें; बेचव; पाचट (पाणी, दूध, दहीं, फळें वगैरे). २ निस्तेज, फिका; उतरलेला (चेहरा,मुद्रा). ३ मुळमुळीत; रुक्ष, पाणचट, नीरस (भाषण). ४ किळसवाणा; घाणेरडा, तिरस्करणीय (मनुष्य, कृत्य). [विट] **विडोळ, विढ्ढळ, विढोळ, विढोळणें**–विड्ढळ, विडुळणें पहा.

विढार—न. विहार पहा. विऱ्हाड; राहण्याची जागा; निवासस्थान. ' पावे सुरवाटिका विढार। ' –विपू २.४.

विढाळ—वि. तेजःपुंज; देदीप्यमान; चकचकीत. ' की मुक्ताफळांचा गोळा विढाळ। ' –राक्रि ४. [ वि+ढाळ ]

विण—शअ. वांचून; वीण पहा. ' तें उकललियाविण। ' –विउ १.२.११७.

विणची वेळ—स्त्री. संध्याकाळची वेळ; सूर्यास्तसमय; तिन्हीसांजा. विणचां–क्रिवि. ( राजा. ) संध्याकाळीं; सुमारें चार घटका दिवसा.

विणणें—उक्रि. १ प्रथन करणें; गुंफणें; तंतु वगैरे एकमेकांत गुंतवून वस्त्रादि तयार करणें. २ पलंग, माचा, खाट इत्यादि नवार, सुंभ, दोरी वगैरेनीं जाळीसारखें काम करून भरणें; गुंफणें. ३ टोपली, चटई, वेणी वगैरे गुंफणें; तंतु, दोरे, पेड एकत्र प्रथन करणें. ' कर्पूरकर्दळीचे दिंदोळे। मृणाळसुताचेनि पाटें विणिले। ' –शिशु ७७४. ४ तुणणें; दोरा भरणें; जाळीकाम करणें. [ सं. वे; सिं. उणणु; गो. विणय ] विणकर–स्त्री. वीण; पोत; विणण्याची तऱ्हा; सफाई. [ विणणें ] विणकर–री–पु. विणणारा; कोष्टी; साळी. विणकाम–न. विणण्याची कला; कृति. विणणा-वळ–स्त्री. विणण्याची मजुरी. विणतर–स्त्री. ( बडोदें ) विण-काम; जाळी; वीण. ' एक विणतरीची टिपाई व खुर्च्या ठेवाव्या. ' –स्वारीनियम ७१. विणाई–स्त्री. १ विणकर. २ विणणावळ. विणपी–पु. ( गो. ) विणणारा; विणकर. विणावणी–स्त्री. वीण; विणकर, विणण्याचें कार्य. ' मगतिये विणावणीचेनि आधारें। ल्हाला चौकडिया पटल्व भरे। ' –ज्ञा ९.१०७. ' म्हणौनि अविवेकिया विणावणी। ब्रह्मी पडति प्रपंच रंगाची वाणी। '–माए ५८२. विणीव–वि. १ विणलेलें. २ वेणी घातलेलें.

विणती—स्त्री. १ देवास फूल, तांदूळ, सुपारी वगैरेचा लावलेला कौल. ( क्रि० लावणें; देणें; ठेवणें ). २ देवानें असा कौल लावून दिलेलें उत्तर, कौल. [ सं. विनति ]

विणवणी—स्त्री. कण्हणें, कुंथणें, वेणा देणें, या क्रिया. विणवणें–अक्रि. कण्हणें; कुंथणें; विव्हळणें; वेणा देणें. [ वेण ]

विणवनी—स्त्री. विनवणी पहा. ' ऐसी आइकोनी विण-वनी। ' –शिशु १६६.

विणा—पु. वीणा पहा. तंबोरा.

विणा—शअ. ( प्र. ) विना पहा. वांचून, खेरीज, शिवाय.

विणावणी—स्त्री. उपाधि; यातायात. ' प्रपंचाचिया विणावणी। ' –विपू १४३. [ विणवणें ]

विणी—स्त्री. वेणी पहा.

विणुढणें—अक्रि. रुजणें; अंकुर येणें. ' अभ्यासें बीज विणुढलें। ' –गीता १३.१७७. [ विणें ]

विणूं—शअ. विना; वांचून. ' ऐसेनि काळ गेले बहुतां। तुम्हां विणू। ' –शिशु १०४. [ सं. विना ]

विणें—अक्रि. १ प्रसवणें; जन्म देणें; उत्पन्न करणें. ( प्राणि, पशु, पक्षी, किडे यांचे बाबतींत उपयोग. घोडी, गाढवी प्रसवणें म्हणतात, मानवी स्त्रीच्या बाबतींत तिरस्कारानें वापरतात ). ' दोघे एके ठायीं केलीं नारायणें। वाढविली तेणें आणि व्याली। ' –तुगा ९३. ' हे गांधारी जरि शतपुत्र मुनीच्या अनुग्रहें व्याली। ' –मोकर्ण ६.२५; –ज्ञा ८.८८. २ ( वेल वगैरे ) प्रस-वणें; बोंडा बाहेर येणें. ३ ( डोळ्यांतून ) पू येणें. ४ उत्पन्न करणें; तयार करणें. ' विती व्यर्थ काव्यें। अलवण हरीविण कविता। ' –वामन, नृसिंहदर्पण ३७. [ सं. वी ] म्ह० व्याली आणि घाटा-यास विसरली. १ ज्या आईनें मुलास नीट वळण लावलें नाहीं *तीस म्हणतात. २ अर्धवट काम करणाऱ्यास म्हणतात.* विती-फळती–वितीगाभती–स्त्री.वि. विणारी व फळणारी; विणारी व गाभण राहणारी; वांझ नव्हे अशी; दूधदुभतें देणारी ( गाय, म्हैस वगैरे ).

विणें—शअ. विना; वांचून; शिवाय. ' विणें त्याच्या देहीं तेचित आपुला प्राण अबला। ' –विवि १.२०.१८७६.

विणेकरी—पु. वीणा धरणारा; तंबोरावाला. ' विणेकरी रेवाव वाले। ' –दावि ७.२.९१.

वितकळणें—अक्रि. विद्रूळणें; नासणें; चोथापाणी होणें ( दूध; दहीं, ताक ). [ विटणें ]

वितंड—वि. १ प्रचंड; विशाळ; मोठें; प्रशस्त. ' तेथी सुद्धीं सुरें वितंडें। पसरलीं देखे। ' –ज्ञा ११.३७५. ' मत्स्यरूप वितंड। ' –दा १.३.१०. ' शिवधनुष्या ऐसें वितंड। ' –ह २६. ७८. २ मिथ्या; खोटें. ' नियोजिलीं वितंडें। ताळासि येती। ' –ज्ञा १३.२१. ' अवघें मायामय वितंड। स्वप्नवत क्षणिक हें। ' –ह ६.६५. ३ विचित्र; अघटित; चमत्कारिक. ' यम वर देतसे वितंड कीं तूं सुख पावसी उदंड। ' –कथा ६.१६.१०५. [ सं. वि+तड् ] –क्रिवि. कुटिल बुद्धीनें; विनाकारण; अट्टाहासानें. ' येणें मांडिलेसे पाखांड। ऐसा निर्भर्त्सितां वितंड। ' –एभा २३. ५१५. ०वाद–पु. अट्टाहासानें खोटा पक्ष स्थापन करण्यासाठीं वादविवाद, मिथ्या वाद, दुराग्रहपूर्वक वाद. ( समासांत ) वितंड-मत–भाषण–कथा–प्रलाप. वितंडा–स्त्री. ( न्याय ) व्यर्थ काथ्या-कूट, वादविवाद अट्टाहासाचा वादविवाद ( प्रतिपक्षस्थापनाहीनो जल्प वितंडा ). [ सं. ]

वितंडणें—क्रि. ( महानु. ) वेगवेगळें करणें. ' ताट ताटांतु घाली। परजु परजांतु घाली। ऐसी वितंडौनि सांडी। ' –दृष्टांत-पाठ ४०.

वित्ताणें—न वितान पहा 'वित्ताणें तुरुरे असरुये मातु।' –धवळेपु ४८. (पाठभेद)

वितपत्ति, वितपन्न—व्युत्पत्ति, व्युत्पन्न पहा 'नांवासाठीं नेघे भार। नलगे फार वितपत्ति।' –तुगा ४५८२

वित्रस्त, वित्रास—वि भयभीत, म्यालेला, घाबरलेला, विषादयुक्त, शंकित 'इतकी खबर ऐकून मग भाऊ झाले वित्रास।' –ऐपो ४४६. [स वि+त्रस्त] वित्रास–पु भय, भीति, दरारा

वित्रिभलग्न—न (ज्यो) त्रिभोनलग्न पहा [सं]

वियर—पु पागापाग, विस्कटलेली स्थिति, गोंधळ, अस्ताव्यस्तपणा (कामधंदा, व्यवहार वगैरेचा) –वि १ ओळंब्यांत नसलेली (भिंत, दगड, वीट) २ मिश्र, भेसळीचा, अनेक प्रकारचा, वाणाचा, वर्णाचा (कपडा, माणें, वस्तु). ३ (ल) विचित्र, अनियमित, गैरशिस्त, असबद्ध (वर्तन, भाषण, कृत्य) विसंगत, असबद्ध (बोलणें, वरलणें) [वि+थर] वियरणें–अक्रि. अनिर्बंध वागणें, वेताल होणें, मार्ग सोडून जाणें

वियवियं—पु (चित्पा) बडु, त्राज. –मसाप २ ३६७

वियानक, वियानीक—वि (अशिष्ट) व्यथानक पहा.

वियापाक—पु (अशिष्ट) विघडणें, नासणें (तयार होत असलेला पदार्थ, घटना), विघाड, नाश

विथिका—स्त्री मार्ग 'अशा प्रकारची नवी विथिका त्यांत निर्माण केली' –नि ४४२ [स वीथिका]

विद्—पु जाणता, ज्ञाता, ज्ञानी पुरुष –वि ज्ञानी

विदगुदणें—उक्रि (कों) ल्वचणें, उसण, करक भरणें, मुरगळणें

विदग्द—वि (अप) विदग्ध 'तव विदग्द मालतियां बोलिजे। हा हो जी राहिजे।' –शिशु ६७२

विदग्ध—धावि १ करपलेलें, जळलेलें. 'शुष्कें अथवा स्निग्धें। सुपक्कें का विदग्धें।' –ज्ञा १५९ २ अर्धेकच्चें, अर्धवट शिजलेलें (अन्न) ३ अर्धवट करपलेलें व अर्धवट कच्चें (अन्न) ४ उत्तम शिजलेलें, चांगलें भाजलेलें (अन्न वगैरे) 'शुष्कसुपक्व विदग्ध। चतुर्विध अन्नें उत्तम खाय।' ५ (ल) कुशल, चतुर, हुशार, निष्णात [स वि+दह्–दग्ध] विदग्धाजीर्ण–न अन्न अर्धवट पचल्यामुळें होणारें अजीर्ण. यात घशाशीं आंबट येतें चार प्रकारच्या अजीर्णांपैकीं एक प्रकार

विंदणी—स्त्री (ओसवाल) सुन –वदलापुर २८३.

विदध्दी—वि (ना) मातताई, विक्षिप्त व खोडसाळ [विदग्ध अप]

विद्रा—वि कुरूप 'सुत कोणासही नको विदरें।' –मोमतु ६ १० 'डाडाळुळें गंगाणें विदरें।'–दा २ ६ ४२ [स विरूप]

विदरूं—न (कों) ल्हान छिद्र, भोंक [स विध्]

विदर्भ—पु वऱ्हाड 'पूर्वी चेकपुरीं विदर्भविषयीं दीपे द्विजाती भले।' –विरेश्वर, सोमवारचरित्र ५ [स]

विदविदणें—अक्रि. १ मऊ, विलविलीत होणें (फळें वगैरे). २ घाबरणें, वितवितणें. विदविदा–वि विलविलीत झालेला, अतिक्लेला, अधिक झालेला, उतरलेला (आंबा वगैरे फळ)

विदळ—वि १ डाळलग, डाक लावलेलें, हीणकस 'विदळ बहु चोखा। मीनलिया वाला एका।' –ज्ञा १३ १००८ २ ज्यांत दळ, गर, सार नाहीं असें [स वि+दल]

विदळणें—सक्रि (महानु) नाश करणें, निर्दालन करणें, मारणें 'विदळीतु मवदुखा नास्तिविया प्रकोपा।' –गस्तो ७ 'कयजय देव प्रवल। विदळितामगळकुळ।' –ज्ञा १८ २ [सं विदलनम्]

विद्ळा—पु मापात विकणारा कुळीथ. –कृवि ३२७

विदा—पु पाटवणूक, निरोप देणें, रामराम करणें, आशीर्वाद, शुभचिंतन. [अर विदाअ] विदाई–स्त्री निरोप, पाटवणूक, वियोग, पाटवणी, जातेसमयीं दिलेली भेट, देणगी विदा करणें–निरोप देणें, पोंचविण्यास जाणें

विंदाण-न—न १ कौशल्य, चातुर्य, कारागिरी, लाघव. 'जिया अहंकाराचेनि विंदाणें। जगचि धरिजे।' –ज्ञा ७ २१ 'माडिलें विंदान। ख्याल सुखाचें सधान।' –तुगा १३३ 'वेगीं विंदान पाहे मासें' –एरुस्व ९ १४ २ कपट कारस्थान, युक्ति, व्यूह, कावा 'छलितया विंदाणा–। माजीं जू तें मी विचक्षणा।' –ज्ञा १० २८४ 'आदु वेगु विंदाणु। आशा मका प्रतारणु।' –ज्ञा १३ २७१ ३ निदह, वेध, लक्ष 'जैं इंद्रियां विंदाण लागे।' –ज्ञा ६.३६५ 'मुकलें पूर्वस्थान। स्वरूपाचें विंदान।' –भज २६. ४ लीला, चमत्कार, चरित्र, करणी, गती 'मायेचें परम विंदाण।' –रावि ६ ६७ 'ऐसें कर्माचें विंदाण। भोगिल्याविण सुटना।' –शनि २०३ 'केलें विंदाण टाईच।' –दावि २ ९५ [स विज्ञान] विंदानी–वि कुशल, कारागीर 'भटपाची रचना इरुये करी विश्वकर्मा विंदानी।' –धवळे उ १४ 'ऐसा व्यासें विंदाणियें। गीता प्रासादु सोडणियें।' –ज्ञा १८ ४४ –पु कारागीर 'तरी आता कोकुनामें विंदानी।' –कथा २ १५ १०१

विदारणें—उक्रि १ फाडणें, चिरणें 'तें चौभेरी गिरीं विदारिजे।' –ज्ञा २ २०० 'विदारिन कुंभस्थळें।' –एरुस्व १० ५५ २ फोडण, तोडणें, तुकडे करणें ३ (काव्य) ठार मारणें, वधणें, कत्तल करणें 'हिरण्यकश्यप विदारिला। भक्त प्रल्हाद रक्षिला।' –तुगा ३५२७ ४ (ल) विचिकित्सा करणें, उघडणें, उकलणें, फोड करून सांगणें (विषयाची) ५ (ल?) पांगापांग करणें, फाटाफूट करण, फाकाफाक करण, पळवून, हुसकून लावणें 'जैसा गज घटा आंतु। सिंह लीला विदारितु।'

–ज्ञा १ १६२ [ स वि+दृ=फोडणें, चिरणें ] विदारक–वि फाडणारा चिरणारा विदारण-णा-णी–नस्त्री विदारण्याची क्रिया (सर्व अर्थी) विदीर्ण–वि फाडलेलें, भग्न विदारणीय, विदार्य–वि फाडण्यासारखें विदारित–धावि फाडलेलें विदारक–धाव ( गो ) फाडावयास विदारून सांडणें–सोडणें–पागापाग करणें, उधळून लावणें, पळवून लावणें 'कीं जलदजाल प्रभंजन। विदारून साडी जैसा।' विदारण्या–वि भांडाभाडी लावणारा; भेद करणारा, चहाड, चुगलखोर आगलाव्या

विदारणें—अक्रि ( कु ) स्वैर, स्वच्छंदी होणें; उधळणें, व्यसनी होणें, अनिर्बंध वर्तन करणें [ स वि+दृ ]

विद्धारी—पु १ मणि किंवा मोती यास वेज, छिद्र पाडणारा २ क्षत्रिय माता व वैश्य पिता याची संतति [ स विध् ]

विदाह—पु १ ज्वलन, पेटणें, जळण्याची क्रिया २ भयंकर आग, धगधगित उष्णता, उष्मा [ स वि+दह् ] विदाहक, विदाही–वि १ जाळणारें २ ( ल ) पाचक, खाणारें गज चढविणारें ( धातुस ), नाशकारक, क्षुजविणारें

विदित—धावि १ ज्ञात, माहीत, ठाऊक, प्रख्यात 'विदित पायापाशीं सर्व आहे।' –तुगा १५१२ २ कळविलेलें, जाहीर केलेलें, सूचित. [ स विद्=जाणणें ]

विदिशा—स्त्री पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर या चार मुख्य दिशातील प्रत्येकीं दोहोंपैकीं उपदिशा, आग्नेयी, नैर्ऋत्य, वायव्य व ईशान्य या दिशा [ स ]

विदुर—वि ज्ञानी; शाहणा, माहितगार, अनुभवी [ स विद्=जाणणें ]

विदुर—पु १ धृतराष्ट्राच्या धाकट्या भावाचें नाव २ अनौरस मूल, मिश्र संतति मिश्र संततीची एक जात ३ ( साकेतिक ) माहादजी शिंदे, पुढें दौलतराव शिंदे 'विदुर पुढें गेलें'–ख ४७५९ 'इनामगाव विदुराकडून जप्त झालें।' –अस्तभा ८१ [ स ] विदुर चाभार–पु मराठा चाभारापैकीं एक पोटजात

विदुर—पु (शाप) एक अल्कमृत्तिकाधातु (इ) वेरिलियम

विदुषी—स्त्री विद्वान स्त्री

विदू—वि जाणता, जाणणारा, ज्ञानी 'मावे क्रीडा सर्व विदूस माजी।' –मॅगीस राधाविलास ३

विदूपक—पु नाटकातील एक विनोदी पात्र, खुषमस्कऱ्या [ स ]

विदूसणें—सक्रि तोडणें, फोडणें नाहींसें करणें खराब करणें, बिघडविणें [ स वि+दूष् ] 'इन्यारत्नाची जोडी विदूसलि।' –ऐपो १४४

विदेश—पु परदेश, अन्यदेश भिन्नदेश 'मार्ग चुके विदेशी एकले।' –तुगा १५३८ 'विदेश पळणीं नागवण।' –दा ३० ७ ८१ [ स वि+दिश् ] ०गमन–न परदेशीं जाणें, दशत्याग, देशातरास जाणें ०वास–पु परदेशात राहणें, रहिवास ०स्थ–वि परदेशीं राहणारा विदेशी-य–वि परदेशी, परदेशातून आलेला, परदेशाचा 'विदेशी कापडाची होळी केली।' –के १७ ५ ३०

विदेह—पु १ जनक राजा २ एक देश ३ एक नगर –वि १ देहरहित, अशरीर 'विदेहासि देहधर्म। आरोपिती।' –ज्ञा ९ १५६ २ देहातीत, मुक्तदेह, देहाचा विसर पडलेला, देह असून नसल्यासारखा 'तैसा देहींच जो असे। विदेह दृष्टि।' –ज्ञा १८ ४३५ [ स वि+देह ] ०मुक्त–वि जीवतपणींच मुक्त झालेला 'अचेतन ते विदेह मुक्त।' –दा ७ ६ ४६ ०मुक्ति–स्त्री ब्रह्मलोकातील अखेरची मुक्त अवस्था 'ब्रह्मलोकीं जाऊन जेथें अखेर मुक्ति मिळत असल्यामुळें विदेहमुक्ति अशीं दुसरीं नावें आहेत।' –गीर २९५ ०स्थिति–स्त्री १ देह व आपण निराळे अशी मानण्याची प्रवृत्ति मनाची अवस्था २ देहाची स्मृति नष्ट झालेली अवस्था, ज्ञानी पुरुषाची निर्विकल्प स्थिति, समाधि 'तुकयास उबग न येई चित्तीं। विदेह स्थिति आहाला।' विदेही–वि १ देहातीत देहभान विसरलेला २ शारीरिक अथवा ऐहिक विषयाची आसक्ति नष्ट झालेला

विदोर—पु ( विणकाम ) ताणा ताठ करण्यासाठीं हात खुंट्यास बाधलेली दोरी

विदोशा, विद्दोशा, विधोशा—वि विध्वंस करणारा, नाश करणारा, उधळ्या [ स विध्वंस ] विदोस, विधोस–पु ( अप ) विध्वंस, नाश, धाटोळें

विद्यावळी—स्त्री ( गो ) खरडपट्टी

विद्रोग—पु ( गो ) दैन्यावस्था [ विपत्ति+भोग ]

विद्वाट—स्त्री ( गो ) नासाडी [ विध्वंस ]

विद्ध—धावि १ वेधित; सच्छिद्र, भोंक पाडलेला, टोंचलेला २ आकर्षित, गुंग केलेला 'मादे विद्धा मुरारी।' –गस्तो २५ [ स विध्=भोंक पाडणें ]

विद्यमान—स्त्रीन साक्षी, समक्षता, हजेरी, गुजारत –धावि १ अस्तित्वात असलेला, हयात असलेला २ वर्तमान, साम्प्रतचा –शअ देखत, समक्ष हजेरींत, मार्फत करून [स विद्=असणें]

विद्या—स्त्री १ ज्ञान, विद्वत्ता 'विद्या याचा अर्थ ज्ञान असाच विवक्षित आहे।' –गीर २७३, २ अध्यात्मज्ञान, ब्रह्मात्मैक्यज्ञान 'यासच विद्या असेंहि म्हणतात।' –गीर २७२ ३ उपासनामार्ग, ज्ञानप्राप्तीचें साधन 'विद्या म्हणजे ईश्वर प्राप्तीचा मार्ग आणि तो ज्या प्रकरणात सागितला असतो त्यासहि

विद्या द्रव नांव अमर देण्यांत देते।' -गीर २०४. ४ कला. (विप्र, वैश वगैरे) चौदाविद्या पहा [स विद् = जाणणें] •गुरु-पु १ शिक्षण देणारा, शास्त्रादि ज्ञान देणारा गुरु पर मार्थज्ञान देणारास मोक्षगुरु म्हणतात २ अध्यापक, कोणत्य हि विषयांत प्राविण्य मिळविलेला विद्वान मनुष्य •धन-न १ ज्ञान रूप संपत्ति 'ऐसें एकचि विद्याधन अद्भुत गुण न हा दुजा त पमें।' -विद्याप्रशंसा २ अविभक्त कुटुंबांतील भागीदाराने स्वश्रमें त्या विद्येपासून मिळविलेलें धन हें स्वसंपादित म्हणून खाजगी समजलें जातें •परिषद्-स्त्री शिक्षणपरिषद 'मुसलमानांची अलीगड येथें विद्यापरिषद भरली होती' -टि १९१८ •पात्र-न विद्येचें स्थान; विद्वान मनुष्य 'विद्यापात्रें कल्पापात्रें।' -दा १८ २१ •पीठ-न १ विद्यामंदिर, ज्ञानमंदिर, विद्या शिकविणारी संस्था, स्थान २ विश्वविद्यालय; (इं) युनिव्हर्सिटी •बंधु-पु गुरुबंधु सहाध्यायी •वान्-वि (विद्व) विद्यावंत, विद्वान, विद्येंत प्रवीण, निपुण, शास्त्री •वेतन-न शिष्यवृत्ति विद्या र्थ्यास आर्थिक मदत 'दोन होतकरू विद्यार्थ्यांस सरकारी विद्या वेतन देऊन युरोपांत पाठविण्यात आलें' -ऐरा ५६ (प्रस्तावना) **विद्यानंद**-पु ज्ञानापासून होणारा आनंद **विद्यानुराग**-पु विद्येची आवड, गोडी; विद्याप्रेम **विद्यानुरागी**-वि विद्येची आवड असणारे 'अँनराणीचे कारकीर्दीत बहुतेक सर्व विद्यानुरागी लोक राजनीतिविषयक ' -इमृ ४५० **विद्याभ्यास**-पु शास्त्राचें अध्ययन शिक्षण **विद्यार्थी**-पु १ शिकणारा, अभ्यास करणारा, विद्यार्जन करणारा २ (ऐतिहासिक कागदपत्रांत) शागीर्द ३ शिष्य चेला, विद्येकरितां गुरूची सेवा करून राहणारा **विद्या लय**-न शाळा

**विद्याधर**—पु एक देवयोनि

**विद्युत**—स्त्री वीज, विजली, एक नैसर्गिक शक्ति, (इं) लाइटनिंग, इलेक्ट्रिसिटी. [स] •कण-पु विद्युच्छक्तियुक्त अत्यंत सूक्ष्म परमाणु (इं) इलेक्ट्रॉन 'पदार्थविज्ञानशास्त्राला विद्युत्क णाची मालिका दिसत' -विचारविलास २८ •गतिशास्त्र-न विजेच्या गतीसंबंधीं शास्त्र (इं) इलेक्ट्रो डायनामिक्स •घंटा-स्त्री विजेनें वाजणारी घंटा •चक्र-न वीज वाहण्याचा वाटोळा मार्ग (इं) सर्कीट •चुंबक-पु विजेच्या प्रवाहामुळें ज्यांत लोह चुंबकाची शक्ति उत्पन्न होते असा लोखंडाचा तुकडा (इं) इलेक्ट्रो मॅग्नेट •चुंबकत्व-न विजेच्या प्रवाहामुळें लोहचुंबकाची शक्ति उत्पन्न होण्याचा धर्म (इं) इलेक्ट्रोमॅग्नेटिझम •जन्य-वि विजेपासून उत्पन्न झालेला •जागृति-स्त्री विद्युत्तेचे परिणाम दिसून येणारी स्थिति (इं) इलेक्ट्रिफिकेशन, चार्जेऑफ इले क्ट्रिसिटि •धनु-न वीजेचें वलय (इं) इलेक्ट्रिक आर्क •दर्शक-पु विजेचें अस्तित्व दाखविणारें यंत्र (इं) इलेक्ट्रो स्कोप •दीप-पु विजेचा दिवा •दृक्शास्त्र-न विजेचा आणि दृष्टीचा संबंध अभ्यासिणारें शास्त्र (इं) इलेक्ट्रोऑप्टिक्स •धातुशोधन-पु विजेचा धातूवर परिणाम अभ्यासिणारें शास्त्र (इं) इलेक्ट्रोमेटालर्जी •रोधक-वि विजेच्या गतीस अडथळा करणारा अप्रवाहक (इं) नॉनकंडक्टर •परमाणु-पु विद्युत्कण (इं) इलेक्ट्रॉन. •पात-पु वीज पडणें, विजेचा धक्का •पृथक्क रण-न विजेच्या साहाय्यानें पदार्थांचें पृथक्करण (इं) इलेक्ट्रॉलिसिस •प्रकंपन-न विजेमुळें होणारीं आंदोलनें (इं) इलेक्ट्रिक ऑसि लेशन •प्रवाह-पु विजेचा प्रवाह (इं) इलेक्ट्रिक करंट •प्रवाह मंडळ-न विद्युच्चक्र (इं) इलेक्ट्रिक सर्कीट •बल-न विजेची शक्ति (इं) इलेक्ट्रिक पोटेन्शल •मत्स्य-पु विजेची वाव, एक मासा (इं) इलेक्ट्रिक ईल •मानसशास्त्र-न मनुष्याच्या चर्येवरून त्याच्या मनांतील रहस्य शोधून काढण्याची विद्या •मापक-पु वीज मोजण्याचें यंत्र (इं) इलेक्ट्रोमीटर •यंत्र-न विजेनें चालणारें यंत्र (इं) इलेक्ट्रिक मशीन •रोधक-वि विजेच्या प्रवाहास प्रतिबंध करणारा (इं) नॉन-कंडक्टर, इंस्यु लेटर •लहरि-स्त्री विजेची लाट विजेनें उत्पन्न होणारें कंपन (इं) इलेक्ट्रिक वेव्ह •वहन-न वीज वाहण्याची, जाण्याची क्रिया (इं) कंडक्शन •वाय-स्त्री विद्युन्मत्स्य, एक मासा (इं) इलेक्ट्रिक ईल •वाहक-वि वीज वाहून नेणारा विजेच्या प्रवाहास अनुकूल (इं) कंडक्टर •वाह कत्व-न वीज वाहून नेण्याची शक्ति (इं) कंडक्टिव्हिटी •विच्छेदन-न विजेच्या साहाय्यानें पृथक्करण (इं) इलेक्ट्रो लिसिस •संग्राहक-संचायक-पु वीज साठवून ठेवण्याचें पात्र (इं) अक्युम्युलेटर •स्थापक-वि विद्युद्रोधक •स्फुलिंग-न विजेची ठिणगी •क्षेत्र-न विजेनें व्यापलेली जागा (इं) इलेक्ट्रिक फील्ड

**विद्युन्माला**—स्त्री एक समवृत्त याच्या चरणांत आठ अक्षरें असून म म ग ग हे गण असतात [स]

**विद्युल्लता**—स्त्री चमकणारी वीज, चपला 'जैसी विद्युल्लता झळके मेघीं।' -तुगा ७३३ [स]

**विद्योत**—पु प्रभा, तेज, चकाकी [स वि+द्युत्]

**विद्रधि**—पु क्षत करणारा व्रण गळू उठाणूं काळपुळी, पूयुक्त फोड वात-पित्त-कफ-रक्त-क्षत-त्रिदोष-ज विद्रधि [स]

**विद्रा विद्रूप**—वि विरूप, कुरूप [स विरूप]

**विद्रावक**—वि वितळणारा **विद्राव्य**-वि वितळण्या सारखा, विरघळण्यासारखा, पाण्यांत विरघळणारा (इं) सोल्युबल **विद्रुत**-वि विरघळलेलें, द्रवरूप झालेलें (इं) डिझॉल्व्हड

विद्रुम—न पोवळें, प्रवाळ 'जीचा घरीं अधर विद्रुम भावना कीं।' -र.[सं] ०वर्ण-वि पोंवळयासारख्या रंगाचा 'विद्रुमवर्ण अधर सतेज।'

विद्रोह—पु शत्रुत्व, वैर [स]

विद्वये—वि (गो) विजवटा पहा नाश करणारा

विद्वान्—वि ज्ञानी, जाणता, पंडित, पारंगत, व्युत्पन्न [स विद्=जाणणें] समासांत याचें विद्वत् असें रूप होतें सामा शब्द- विद्वत्कुल-न पंडिताचा समूह [स] विद्वज्जन-पु विद्वान, तत्त्वज्ञानी, ज्ञानी, शहाणा विद्वत्ता स्त्री पांडित्य, ज्ञान, शहाणपणा विद्वन्मंडल-न पंडितसमूह विद्वन्मान्य-वि पंडिताकडून सन्मानित, पंडितास पसंत, आदरार्थी पत्रांत लिहि तात विद्वत्संन्यास-पु ज्ञानप्राप्तीनंतर केलेला त्याग विद्वास-वि विद्वान 'विद्वासास, अधिक प्रीति।' -दा ७ ९ ४५ [स विद्वान्चे अव]

विद्वेष—पु द्वेष, तिरस्कार, मत्सर, हेवा विद्विष्ट-वि द्वेष केलेला, तिरस्कार केलेला [स] विद्वेषक विद्वेषी, विद्वेष्टा-वि मत्सरी, हेवेखोर, वैरी, शत्रु, अत्यंत विरोधी

विध—पु प्रकार, तऱ्हा, जात, घाट, आकार उदा० द्विविध, त्रिविध, बहुविध, नानाविध [स.]

विध—पु विधी; नियम, रीति 'नेणें चालु विध करुणा भाकी।' -तुगा १५६६ [स विधि]

विंध—न छिद्र, भोंक, वेज [स विध्=छेद पाडणें] ०काम-न (कों) छिद्रें, वेजें पाडण्याचें काम विंधणें-न छेद पाडण्याचें हत्यार, किकरें -क्रि भोंक पाडणें, छेद, छिद्र, वेज पाडणें; टोंचणें, शस्त्रानें आघात करणें 'दूर देखोनि विंधिला बाणीं।' -मुआदि ७ ६५ विंधरू-रू-न (कों) छिद्र, भोंक

विघडणें—क्रि विघडणें, नासणें 'प्रचीतीविण औषध घर्णे। तरी मग घडचि विघडणें।' -दा १० ८ ६ [स विघटन, वि+घट]

विधणू—स्त्री अकालप्रसूतिमुळें प्राण्याच्या गर्भाशयात उत्पन्न होणारी शुष्कता, रुक्षता [स विदहनम्]

विधरणें—क्रि छिन्नभिन्न होणें, घायाळ होणें 'विधरे ध्रद जिनाचा दु खभर।' -विक ३८ [स विध्]

विधर्मी—वि १ अन्य धर्माचा २ अधर्मानें वागणारा, पाखंडी, धर्मशत्रु [स]

विधवटा—वि विजवटा पहा

विधवा—स्त्री गतभर्तृका, पति निवर्तलेली स्त्री, नवरा मेलेली स्त्री [स वि+धव=नवरा] ०विवाह-पु गतभर्तृकेचें पुन्हां लावलेलें लग्न, पुनर्विवाह [स]

विधवार—स्त्री नाश, फडशा, उधळपट्टी (क्रि० लावणें, लागणें, होणें) (गो) विधवाडचें=नाश करणें [स विविध+वाट]

विधाता—पु १ निर्माणकर्ता, व्यवस्थापना करणारा, नियमन, स्थापना करणारा, सृष्टिकर्ता. २ ब्रह्मदेव 'काय विधात्यानें घातलीसे रेखा।' -तुगा १६१५ [स]

विधान—न १ स्थापना, आधान, स्वाधीन करणें, ठेवणें, कर्तव्य 'तेथें राजा कौंडण्यपती। विधान स्थिति करितसे।' -एरुस्व ५ १४ 'पल्गीं पुतळ्याचें करा गं विधान।' -प्रला १३९ २ सांगणें, कथन, अस्तिनास्ति पक्षीं म्हणणें मांडणें. 'धर्मशिक्षणाची आवश्यकता नाहीं असें बेधडक विधान करणें या सारखें धाडस नाहीं' -कले १ १४९ ३ आदेशणें, नियम घालणें, स्थापित करणें ४ आज्ञा, नियम, अनुशासन 'मनुष्याचाचुनि विधाना। विषय नाहीं।' -ज्ञा १५ १७८ ५ (कार्यास, कृत्यास, कामास) लावणें, नेमणूक, योजना 'जे ते वैदिक विधानीं। योग्य म्हणौनि।' -ज्ञा १८ ८१९ ६ विधि, पद्धति, क्रिया उदा० पूजाविधान, होम विधान, व्रत विधान 'यज्ञीच विधान सरे।' -ज्ञा ४.१५० 'प्रायश्चित्ताची विधानें। सांगेन ऐका स्थिर मनें।' -गुच २८ ८०. ७ (व्या) उपसर्ग, प्रत्यय लावणें. [स धा=ठेवणें]

विधायक, विधायी—वि १ स्थापना करणारा, नियमन करणारा, योजना, नेमणूक, व्यवस्था करणारा, उभारणी, जोडणी, आखणी करणारा २ प्रत्यक्ष कृतिरूप, दृश्य परिणामी, कार्यकारी, परिणामकारक 'त्याचें कार्य विधायक स्वरूपाचें नसून विध्वंसक स्वरूपाचें होतें' -पस्व ५ [सं धा=ठेवणें]

विंधान—न संधान, नेम, योजना (क्रि० करणें, बांधणें, धरणें, लावणें) [स वेधन]

विंधारी—पु मोत्यास वेजें, छिद्रें पाडणारा [स विध्]

विधि-धी—पु १ नियम, शास्त्राची आज्ञा, वेदविहित क्रिया, कर्म वगैरे 'विधीतें पाळित। निषेधातें गाळित।' -ज्ञा १२ ७७ २ पद्धति, कर्म करण्याची रीत, धार्मिक कृत्याचा प्रयोग उदा० उद्यापनविधि, उपासनाविधि, दानविधि, स्नानविधि, होमविधि, व्रतविधि, पूजाविधि 'क्रियाविशेषें बहुतें। न लोपिती विधीतें। निपुण होऊन धर्मातें। अनुष्ठिती।' -ज्ञा २ २४९. ३ सामान्यतः नियम आज्ञा, विधान, अनुशासन; आदेश, कल्प 'विधि हाचि मान्य आहे।' -मोआदि ४ १४ ४ दैव, प्रारब्ध, नशीब 'स्थिर न राहे माझी बुद्धि। तरी हा आपुलाचि विधि। सुजाण राया।' -कथा ६ १९ १५९ ५ ब्रह्मदेव, सृष्टिकर्ता 'हें निर्मिलें विधि विभूषण मुनिकडे।' -वामन स्फुटश्लोक (नवनीत पृ १४१) 'अतर्क्य महिमा तुझा गुणहि पार याहे विधी।' -केका १४० ६ शास्त्रवचन, धर्मग्रंथातील वाक्य, आधार, प्रमाण

टाकणें ०आक्षितक फरण-न (नृत्य) हातपाय हवेतसे दूर फेकून पुन्हा जवळ आणावयाचे ही क्रिया

विक्षेप—पु १ (शब्दश) वर, बाजूला इकडेतिकडे टाकण्याची क्रिया २ चित्ताची व्यग्रता, लक्ष्य न लागणें, विचाराचा, मनाचा गोंधळ, गडबड, घोटाळा, मनाची चचलता 'तेणें बहुतीं जन्मीं मागिलीं। विक्षेपाची पाणिवळें झाडिलीं।' –ज्ञा ६ ४७१ ३ विषाद आश्चर्य, अचबा –पया २०६ 'कीर्तनामाजीं वंताचि विघ्न। विक्षेप पावलें सकळांचें मन।' ४ बुद्धिभ्रंश, भ्रम, भ्रांति (जादूटोणा, मन्त्रतन्त्र भूतबाधा वगैरेमुळें) ५ विपरीतज्ञान भ्रम उत्पन्न होण्याचें एक कारण (दुसरें कारण आवरण) 'तो विक्षेप जडभ्रांति।' –यथादी १ २३७ परी दोन्हींमध्यें विक्षेप। शून्यत्वाचा।' –दा ८ ५ ६१ ६ (ज्यो) शर ग्रहाचें याम्योत्तर अंतर ७ अडथळा, विघ्न [स वि+क्षिप्] ०केंद्र-न (ज्यो) शरकेंद्र ध्रुव-पु (ज्यो) ग्रहाच्या कक्षेचा परमक्रांति ०वृत्त-न ग्रहाची कक्षा

विक्षोप—विक्षेप पहा 'विक्षोप आणिला राज्याला।'–ऐपो १३१

विज्ञ—वि विद्वान जाणता, ज्ञानी पुरुष, विशारद 'तदुचित करवीती विज्ञ दैवज्ञ दानें।' –सारुह २ ५

विज्ञप्त विज्ञप्ति—स्त्री विनति विज्ञापना पहा विज्ञप्त वि विज्ञापित विनति कलेलें सांगितलेलें 'यास पूर्वी विज्ञप्त केलेल्या गोष्टींची आठवण करून द्यावी' –विवि ७ १४१ १८७६ [स वि+ज्ञा]

विज्ञात—धावि विशेष माहितीचा, ओळखीचा, माहीत असलेला; ठाऊक असलेला, कळलेला, समजलेला

विज्ञाता—वि जाणता, जाणणारा

विज्ञान—न १ विशेषज्ञान शास्त्रीयज्ञान, तत्त्वज्ञान २ ब्रह्मज्ञान; ईश्वरविषयक सत्यस्वरूपाचें ज्ञान, अपरोक्षज्ञान 'एकाच मूलभूत अव्यक्त द्रव्यापासुन भिन्नभिन्न अनेक व्यक्त पदार्थ प्रत्यक्ष कसकस निर्माण झाले हें ज्यानें समजतें तें विज्ञान होय –गीर १६६ 'मुक्तीचा ठेवा हारतला। विज्ञानाचा मठ फुटला। –भाए ८८ ३ सामान्यज्ञान, माहिती, परिचय आवरा ४ अनुभवज्ञान जाणीव ५ प्रपंच जग 'जें ऐसेंही परि विरुळे। इय विज्ञानाचिय खाळे। हालविलेंही गळे। तें परब्रह्म।' –ज्ञा ८ १७ [स] ०परंपरा–स्त्री ज्ञानपरंपरा पहा ०मय कोश पु आत्मा अथवा चैतन्याच्या आवरणाच्या पांच कोशांपैकीं चौथा कोश याच्यामध्यें जीवाची, चैतन्याची जाणीव पंचकोश पहा ०शास्त्र–न ज्ञानाचें व स्वरूप व उत्पत्ति याचें शास्त्र (इं) एपिस्टेमॉलॉजी ०संतति–स्त्री ज्ञान विषयाची किंवा कल्पनाची परंपरा, येथील बौद्धमताप्रमाणें आत्मा पंचस्कंधात्मक असता व विज्ञान हा पांचवा स्कंध होय बौद्धाच्या एका पंथाच्या मतें विज्ञान म्हणजेच पूर्ण आत्मा होय ०स्थिति–स्त्री सिद्धावस्था, सिद्धदशा, ब्रह्मस्वरूपाचें ज्ञान झाल्याची अवस्था 'ज्ञान प्राप्ति होतां सोहपण। नाहपणें विज्ञान स्थिति।' –स्वादि ११ ४ ८७ विज्ञानात्मा–पु वस्तुमात्राचें ज्ञान, आधिभौतिक ज्ञान म्हणजेच विज्ञान अथवा आत्मज्ञान ऐहिकापलीकडे आत्मा असा निराळा पदार्थ नाहीं हें मत बौद्ध अथवा नास्तिकाचें असें मत आहे

विज्ञापक—वि ज्ञान देणारा, उपदेशक, शिक्षक [स वि+ज्ञा] विज्ञापणें–उक्रि १ ज्ञान देणें, सांगणें, कळविणें, ठाऊक, माहीत करणें २ विनति करणें विज्ञापन–न ज्ञानदान, शिक्षण, उपदेश, शिकवण विज्ञापना–स्त्री १ नम्रपणें श्रेष्ठ थोर गृहस्थास केलेली विनति, प्रार्थना, अर्ज, सांगणें, माहिती देणें, ठाऊक करणें २ वरप्रमाणें केलेली विनति, दिलेली माहिती, सांगितलेली गोष्ट, खुलासा, तकरारअर्जी 'भवतारका जी सुजाणा। एक विज्ञापना पायापाशीं।' –तुगा ७३१ ३ सामान्यत ज्ञान देणें, शिकवण, उपदेश, दिग्दर्शन ४ वडील मनुष्यास पत्र लिहितांना विनतीवजा वापरावयाचा शब्द मायना विज्ञापनीय–वि सांगण्यासारखें, विनति करण्यासारखें, माहिती देण्यासारखें विज्ञापित–धावि १ आदरपूर्वक सांगितलेलें, कळविलेलें, सुचविलेलें, दिग्दर्शन केलेलें २ ज्यास विज्ञापना केली आहे तो विज्ञाप्ति–स्त्री (प्र) विज्ञप्ति विज्ञापना पहा विज्ञाप्य–वि विज्ञापनीय पहा विज्ञेय–वि जाणण्यास योग्य, ज्यासंबंधीं ज्ञान करून घ्यावयाचें तें

वी—विण, प्रसवणें या क्रियापदाचें रूप 'धरा जनक तु जरा इतर कोण हा देव वी।' –कका ४ २६ ९३ 'नवी रीति प्रेमा निरवुनि दयासागर नवी।' –मोरामायणें १ ४०६ [विणें]

वी—पुस्त्री १ गमन २ पक्षी –हंसो [स वीक]

वीकर—वि चचळ 'होत वरकर चित्त वीकर।' –दावि ८१ [स विकृत]

वीस—न विष; विख पहा [विष] म्ह० वीस घेववतें पण भीक घवत नाहीं (भिक्षा मागण्यापक्षा मरण सोपें वाटतें) विखार–री–विषार–रा पहा

वार्खी—विषयीं, विखीं पहा 'विर मस्ति पीर्ती टळवे।' –दावि ३५१ वाखो–पु विषय वीखया–विषयी 'कवडुणी एउ वाखया असे –दृष्टानपाठ ३७ [स विषय]

वीचि—पु लाट लाग, जललहरी 'देहाभिमाचा वारा। लागतां वाजा टला वीरा। तें ऐक्य वीचि सागरा। जीवदशा दे।' –ज्ञा १४ ३०५ [सं] वीचितरंग न्याय–पु पाण्यांत एक लाट उत्पन्न होत तिला मागची लाट पुढें ढकलते, हिला निघ्या

मागची, असें होत होत क्रमाक्रमानें सर्व लाटा किनाऱ्यावर आपटून फुटत असतात त्याप्रमाणें एका पिढीचीं माणसें मरण पावतात त्याच्या मागून त्याच्या जागीं दुसऱ्या पिढीचीं माणसें येतात, पुढें तींहि मरतात ही जगाची रहाटी

**वीज**—स्त्री १ घर्षणानें उत्पन्न होणारी एक निसर्गशक्ति, विद्युत्, सौदामिनी, बिजली 'जैसी वीजुची दाटी।' –उपा ७३ २ मेघगर्जना, विजेचा कडकडाट 'वीज कडकडली' 'कडकडून वीज पडली' ३ वज्र, कुलिश, वीज पडणें [स विद्युत्, प्रा विज्ज, प विज्ज, सिं विजु गु वीज] विजेचें चमकणें–विजेचें लखलखणें करणें (ल) क्षणिकपणा. 'पाण्यावरचा बुडबुडा पहा विजेसारखा–वि चपल, क्षणिक वीजविहिरा–पु वीज पडून तयार झालेली विहीर, हवके हा केव्हांहि कोरडा पडत नाहीं अशी समजूत आहे [वीज+विहिरा] वीजुलता–स्त्री विद्युल्लता 'कल्पांताचीया वीजुलता।' –उपा ९८

**वीजण-णें**—न विंझण्यानें–पख्यान वारा घालणें [सं व्यजन] वीजणें–कि वारा घालणें, पखा वारणें 'मग पत्नि नीचा पाणि–वाळा। वीजितीं हळुहळु।' –शिशु ७८८ –एभा १५ १७४ वीजन, वीजण–णा–पुन पखा 'न घालि वो मारें वीजनें। कमळदळाचें।' –शिशु ८३४ 'व्यामरें वीजणे विळासनी।' –वेसीस्व १ ८४ [स व्यजन]

**वीजन**—न (महानु) बैठक, आसन 'भिक्षुकाचीं वीजनें। तेणें होळे घाती।' –ऋ १५ [हिं. बिछाना]

**वीट**—पु १ कंटाळा, ओकारी, तिरस्कार शिसारी 'मनीं वीट मानु नये। शिकवणीचा।' –ज्ञा २ २ १० –मोभीष्म ४ ५० २ मेकाड, मोवा, एक रोग. ३ अनादर, अपमान, वाईट प्रकारें वागविणें विपाड विचका झालेली स्थिती (मसलती, कामें, पदार्थ इ० ची) ४ खेद 'का दरिद्रलिये वुद्धी वीट। तोही नाहीं।' –ज्ञा १४ ३२८ [विटणें] वीटणें–विटणें पहा 'परतु बहु मद मी म्हणुनि सत्स्तुती वीटली।' –केका ५९

**वीट**—स्त्री ईंट इमारतीच्या बांधकामासाठीं मातीचा भाजलेला किंवा कच्चा चतुष्कोनी एक पदार्थ, ईंट पहा 'पयनातील हेमाच्या बदल्यानें त्यांसि भार घनवीट। जाणीं म्हणती सख्या पायुनचि इष्टकेसि जन वीट।' –मोअश्व [स इष्टका, प्रा इट्टा, हिं ईंट] ०बंदी–स्त्री विटांनीं बांधणें विटांचे बांधकाम –वि विटांनीं केलेलें (बांधकाम)

**वीट**—पु १ विट पहा २ वाईट चालीचा माणूस 'समूह जेथें वसती विटाचें।' –सारुह ६ ५५ [स विट]

**वीटा**—स्त्री विटी (खळातील दाडू बरोबरची) 'वीटा हस्तीं ओपिली' –मुआदि ३० १११, –मोआदि २४ ९

**वीटा**—पु एक प्रकारचा भाला इटा पहा. 'भवुरे रंगीत भाले। वीटकरेवाले।' –होला १६६

**वीटि-टी, वीटिका**—स्त्री १ विडा. (संस्कृताचा डौल आणून पद्येनें महुर्या योजनात) 'सकल शोयरि आणिती वीटिका।' [स] 'मुखीं घेतसे कापुरें युक्त वीटी' –लक्ष्मीनारायण कल्याण नाटक शक १६०४

**वीड**—पुन १ मनगटाचें माप (बांगडी वगैरेसाठीं) 'तुझ्या हाताचा वीड मजपाशीं आणवा' २ माप, नमुना ३ जात, प्रकार वीड पहा

**वीड**—स्त्री ईड, एक प्रकारचें लिंबू (झाड व फळ), ईड लिंबू

**वीडी**—स्त्री १ विडा 'मीं नेदीं पोडी। तरि गोसावी नेसति वीडी।' –भाए १३८ २ धूम्रपानाची विडी, बिडी [स वीटिका, विटी]

**वीण**—स्त्री १ निपज, जन्म, वेत, खोप, जनन 'वाङ्मया चिये खाणीं। लागली शब्दरत्नाची वीणि।' –ऋ २५. २ विण्याचा काल, निपज होण्याचा ऋतु, काल, हंगाम [विणें]

**वीण**—स्त्री १ सणग, थान, विणलेली वस्तु २ विणायाची धाटणी, प्रकार, बनावट, विणकाम [विणणें]

**वीण**—शअ शिवाय, खेरीज 'परि श्रवणें वीणु सुख पाविजे।' –दाव १०, –ज्ञा १३ ३२ विना पहा [स विना]

**वीणा**—स्त्री एक प्रकारचें भोपळ्याचें ततुवाद्य, तबोरा याचे पुष्कळ प्रकार आहेत 'हा गे नाद वीणे। तुज न साहे उच्च गाणें।' –शिशु ६९४ 'सुरमुनिस रुचों दती निजवीणे चाहि न राजन्य।' –मोभीष्म ११ ७६ [स] ०काव्य–न (वीण्याच्या नादाबरोबर गावयाची कविता) रसात्मक, भावपूर्ण काव्य, भावगीत (इ) लीरिक [सं] ०पाणी–स्त्री सरस्वती [स]

**वीत**—वि गेलेला, नाहींसा झालेला [सं] सामासशब्द– ०कल्मष–वि ज्याचें पाप व दोष नाहींसे झाले आहेत असा वीतकाम–क्रोध–लोभ–मोह–ज्याचा काम, क्रोध, मोह इ० नाहींशी झाली आहेत असा [स] ०राग–वीतरागी– (अशिष्ट) विरागी ज्याच्या इच्छा, आकांक्षा नाश पावल्या आहेत किंवा ज्यानें विकार ताब्यात ठेविले आहेत असा २ विरक्त, वैराग्यशील –ज्ञा ४ ६१, –भाए १८४ –पु विरक्तता, वैराग्य ०रागता–स्त्री वैराग्य 'वीतरागतेसारिखा। जोडूनि ठेविला सखा। तो आपवीयाचि भूमिका। सर्वं चाले।' –ज्ञा १८. १०४३ ०शोक–वि शोकरहित [स]

**वीत**—न १ वत पहा २ प्रसुति, जनन, वीण पहा

**वीत**—स्त्री. करंगुळी व आंगठा हीं ताणलीं म्हणजे त्या मधील अंतर ( आंगठा आणि तर्जनी यामधील अंतर ती टीच ). बारा अंगुळाचें माप. वितस्ति पहा [ सं. वितस्ति ] ( **आपल्या पुरती, आपल्या भोंवती** ) **०काढणें**-( संकटाच्या वेळीं ) आपल्या पुरतीच फक्त सावधगिरी व काळजी बाळगणें, दुसऱ्या-संबंधीं बेपर्वाई दाखविणें ( निंदार्थी ) **०काढणें**-( पेरण्या-साठीं जमीन भाजतांना ) गवत इ० उपटून भाग पसरूं नये म्हणून भाजण्याच्या व न भाजण्याच्या जमीनीमध्यें अंतर सोडणें किंवा फट पाडणें. **वीतभरपोट**-पोटाचा आकार फार मोठा नसतो, त्याला फार लागत नाहीं या अर्थानें वापरतात. ' या वीतभर पोटासाठीं सर्व उठाठेवी. ' -विवि ८ २ २१.

**वीत**—न. द्रव्य. ' भ्रमें नाडळें वीत तें गुप्त जालें ' -राम १३८. [ सं वित्त ]

**वीतका .पुंजी**—मुलींचा एक खेळ. -मखेपु ३४२.

**वीतणें**—क्रि. वर्तणें, घडणें ' तें कवतिक वीतलें आइका। शरीरौनीं निगाली ज्योतिकळिका। ' -शिशु १०८३ [ सं वृत्-वर्ते ]

**वीतरेक**—व्यतिरेक ( अप. ) पहा ' अन्वये आणि वीत-रेक। हा शब्दभेद कोणी एक। ' -दा ९.२ २१, ६.६ ४९.

**वीतुटि**—स्त्री. वियोग ' देवेंसीं जाल्या वीतुटि। आपणेया माणावी जीविताची क्रुटी। ' -भाए १४४. [ वि+तुटणें ]

**वीथ**—स्त्री. वितस्ति; वीत पहा.

**वीद्**—स्त्री. ( व. ) उकिरडा [ सं. वीथि-बीद, विदी पहा. ]

**वीद्**—स्त्री ( गो. ) दुर्बुद्धि.

**वींदान**—विंदान पहा. ' अया-घडीता लोची वींदानी। ' -उषा ७४. ' तीये वींदाने लागती डोळा ' -उषा ९७

**वीध**—पु १ लग्नानंतर पहिल्या वर्षी करावयाचे मानपान, सणवार इ०; एकमेकांकडे मिठाई, फराळाचे जिन्नस इ० पाठविणें. २ असें पाठविलेले जिन्नस, केलेला मानपान. ३ ( सामा. ) विधि. ४ मंत्र, प्रयोग, उतारा, विधान ' वीध केलिया प्रेतें। सावध होती। ' -दा ९.८.२०. -स्त्री. ( अशिष्ट ) उत्सव, समारंभ; कोणताहि संस्कार, विशेष प्रसंग [ स विधि ]

**वीधवाट**—स्त्री. निर्देवाट [ विधि+वाट ]

**वीधान**—न. ( प्र ) विधान, विघ्नसंहारक संस्कार, उपाय. ' स्वामियाशीं वीधान काय कीजे। ' -देवनाथ, श्रावणाख्यान ४

**वीधोळणें**—क्रि उधळणें, नाहींसें होणें ' तेणें वीधोळले मेघ। ' -उषा १५४. [ उधळणें ]

**वीप**—स्त्री. ( महानु. ) लाज ' हां घालितां गति विलासी। हंसा वीप लाविली राजहंसी। ' -शिशु ८०४

**वीप्सा**—स्त्री. २ सर्वत्र व्याप्ति, अवयवाच्या, घटकांच्या बरोबर संबंध गोष्टीचा समावेश. २ द्विरुक्ति ( आज्ञा, भाषण शब्द इ० ची ) [ सं. ]

**वीभाडणें**—क्रि. पराभव करणें. ' वीभाडीलें भुमासुरातें। ' -उषा ७३. [ सं. वि+भंड् ]

**वीभिचारु**—पु संचार; अवतार.' संपूर्णसींहुं नावरु। देवता अंगीचि वीभिचारु ' -ऋ ७२. [ सं. व्यभिचार ]

**वीर**—स्त्री. १ ईर शक्ति; जोम, रग, ( ल. ) पर्वा; भीड-भाड ' मराठे मनुष्य पर्डे लागल्यावर कोणाची वीर कोणास नाहींशी होते ' -भाब ८४. २ तेज, गुण; प्रभाव. ३ श्रेष्ठता; उत्कृष्टपणा. ( बुद्धिबळें ) अधिकाराचें क्षेत्र, टापू ३ ( बुद्धिबळें ) राजास बचावण्यासाठीं एखादें मोहरें मध्यें घालणें. ( क्रि० सोड-विणें ) [ सं. वीर्य ] **विरेंत घालणें**-मध्यें घालणें, मध्यें टाकणें. बुद्धिबळाच्या डावांत राजास शह देणारें मोहरें व राजा यामध्यें मोहरें टाकणें. ईर पहा.

**वीर**—पु. योद्धा; लढवय्या; शूर पुरुष; उत्साही मनुष्य ( लढाईंत, दुसऱ्याची आपत्ति दूर करण्यांत किंवा दान करण्यांत ). ' आणीकही द्रौपदीकुमर। हे सकळही महारथी वीर। मिती नेणिजे परी अपार। मीनले असती। ' -ज्ञा १.१०२. २ नवरसांपैकीं एक -उत्साह, शौर्य, पराक्रम दाखविणारा भाव. ३ ज्याचा कोणी पूर्वज लढाईंत मेला असून, जो फाल्गुन वद्य प्रतिपदेचे दिवशीं, योद्धयाच्या समारंभानें देवदर्शनासाठीं जातो असा. ४ वरील मृत मनुष्याचा देवामध्यें बसविलेला टाक ' वीर बैसविला देव्हारां।' -दावि ६३. ५ मोठ्या मनुष्याची मरणोत्तर दशा. -बदलापूर ४९२. ६ विशेषनाम, हुद्दा किंवा वर्णनपर नाव यास जोडून येतो; त्यावेळीं पुढारी, प्रमुख, श्रेष्ठ असा अर्थ होतो. उदा० रघुवीर, कुरुवीर, यदुवीर, दैत्यवीर, कपिवीर, भक्तवीर, वदान्यवीर इ० ' तैसा तुका वैष्णववीर। रुवीट आवडी त्याची थोर। मोजुनि त्याहि कृष्णवीर। स्वहस्तें चौगुणें घेती वर ' ७ एक पदवी कोण-तेही धाडस, उत्साह, औदार्य, परोपकार, जनकल्याण इ० गुणा-विषयीं प्रसिद्ध असलेल्या पुरुषास लावतात. उदा० वीर नरीमन, वीर वामनराव -वि १ शूर, पराक्रमी. २ वैराग्यशील. [ सं ] सामाशब्द- **०कंकण**-न वीर पुरुषाचा मान म्हणून, पराक्रमाचें द्योतक असें मनगटांत घातलेलें कडें ' वीर कंकण घालितां मादीं। परी तें शोभा पावेना थीं। ' -दा ७ ९ १५ **०कन्या**-स्त्री. ( वीर पुरुषाची मुलगी ) शूरप्रिय, धाडसी, खंबीर मनाची स्त्री. वीर-भार्या, वीरपत्नी, वीर भगिनी हे समधर्मी शब्द होत [ सं. ] **०कल्लु**-पु ( गो ) वीराचा दगड, वीरगळ [ का कल्लु=दगड ] **०गड**-पु घोमाळा विड ' -शिदि १५१ **०गंठी**-( महानु ) वीरगुंठी पहा ' निरली रुटनी वीरगंठी। ' -दाव २४४. **०गर्जना**-

स्त्री. वीराच्या आरोळ्या ( आव्हान, उत्तेजन देणाऱ्या ). [ सं. ] ०गांठ-स्त्री. विशिष्टप्रकारची केसांची गांठ, वीरगुंठी पहा. 'वासींगे हीरियाची जोती मीरवती वीती वीरगांठी।'-धवळेपू ६९. ०गुंठी-स्त्री. विशिष्ट प्रकारानें केस बांधणें; वीराला शोभण्यासारखी डोक्यावरील केसांची गांठ. 'अविरळ कुरळांची मस्तकीं वीरगुंठी।'-सारुह ८.११८.' सरसावुनी वीरगुंठी।'-मुसभा ७.१७; -ह १९.३७. ०घंटा-स्त्री. दौंडी पिटण्याचें साधन अशी घंटा; एकच वाद्य. 'डौंडीची ढवंस ढोला। वीरघंटा तांबकिया।' -शिशु १०२६. ०घोषणा-स्त्री. वीरगर्जना; योद्धयांना युद्धास निमंत्रण. [ सं. ] ०जननी-स्त्री. जिची मुलें शूर, पराक्रमी आहेत अशी स्त्री, वीरमाता. [ सं. ] ०जयंतिका-जयंति-स्त्री. युद्धप्रसंगीं किंवा युद्धांत विजय मिळाल्यावर योद्धयांनीं केलेला नाच; युद्धनृत्य. [ सं. ] ०ठाण-न. वीरासन. [ सं. वीरस्थान ] ०दृष्टि-स्त्री. ( नृत्य ) डोळे लाल करणें, भुवई उंच नेणें; डोळ्याचा मध्यभाग विकासित करणें ( वीररसाचा अभिनय ). ०पट्ट-पु वीराचें ललाटपदक; शिरताज. ०पत्नी-स्त्री. वीराची भार्या, बायको; वीरकन्या पहा. [ सं. ] ०पाण-न-न युद्धापूर्वी किंवा युद्ध चालत असतांना, जोर येण्यासाठीं वीरानीं नवचैतन्यवर्धक पेय पिणें. [ सं. ] ०पार-वि. १ थोंबल्या, अरेराव, रगडमल्ल; धटिंगण माणूस. २ ( प्रशंसार्थी ) उत्साही, धाडसी माणूस. ०प्रसू-स्त्री. शूर अशा पुत्रांना प्रसवणारी स्त्री; वीरमाता. [ सं. ] ०भगिनी-स्त्री. वीराची बहीण. [ सं. ] ०भद्र-पु. १ दक्षयज्ञाचा विध्वंस करण्यासाठीं शंकरानीं जटेपासुन निर्माण केलेला वीर पुरुष, अकरा रुद्रापैकीं एक. २ ( ल ) उग्र स्वरूपाचा व विनाशक प्रवृत्तीचा मनुष्य. ३ शिवगणाचा एक वर्ग. ४ लिंगायत लोकांमधील एक विशेष दीक्षा. ५ रागीट, हट्टी व सुधारणार नाहीं अशा मुलास म्हणतात. [ सं. ] ०भाग-पु वीराचा भाग, शूर पुरुषाची वस्तु. 'मी तेंव तुझेचि अर्धांग । केंवि शिशुपाळ शिवेल माझे भाग। पैं शिरावरी असता श्रीरंग। मी वीरभाग यदुवीरा।'-एरुस्व ४.१६. ०भार्या-स्त्री वीरपत्नी, वीराची बायको, वीरकन्या पहा. [ सं. ] ०भाषण-न वीराची भाषा, वीराचें वचन. [ सं. ] ०माता-स्त्री. शूरांची आई, वीरजननी पहा. [ सं. ] ०मुष्टि-पु मद्रासइलाख्यांतील एक भिकाऱ्यांची जात हे लोक शारीरिक करामतीचे खेळ करून पैसे मिळवितात हे लिंगायत धर्माचे आहेत. ०रस-पु वीराला युक्त अशी भावना, विकार, नवरसापैकीं एक, याचे चार विभाग पडतात:-विद्या, युद्ध, दया व दान. वीररसाचें उदा० गर्वोक्ति फाल्गुन वदे जगदंकराया। आहे मशीं कवण सो समरा कराया। ज्यां कालखंज वधिले अतुलप्रतापी। पौलोमही असुर गोसुर वित्रतापी।'-वामन, भीष्मप्रतिज्ञा. [ सं. ] ०राणा-वि. वीरश्रेष्ठ 'पाटीं धरा बाइक वीरराणा। चाके करीं दोमुंगि बाणा।'-मुरामायण अयोध्या. ०वाद-पु. वीराचें प्रतिपक्षीयास युद्धासाठीं केलेलें आव्हान, युद्धास निमंत्रण. [ सं. ] ०विलास-पु. वीराची क्रीडा. -वि. वीराना ज्यांपासून विलास ( आनंद ) होतो असा ( अर्जुन ). 'हारपलें दावूनि जैसा। मागु सरे वीरविलासा। ज्ञानचि कळस वळघे तैसा। कर्मप्रसादा।'-ज्ञा १५.५८६. ०वृत्ति-स्त्री. वीराची प्रकृति-शौर्य, पराक्रम. 'तयाचि शुलगासवें। वीरवृत्तीचेनि थावें।'-ज्ञा १.१२७. ०वैष्णव-पु. १ वैष्णवाचें आचार कडकडीत पाळणारा एक वर्ग. याच्याप्रमाणें वीरशैव असा एक वर्ग आहे. २ वैष्णववीर; कट्टर, थोर वैष्णव. 'तैसा तुका वैष्णववीर। अवीट आवडी त्याची थोर।' [ सं. ] ०शय्या-स्त्री. रणभूमि. [ सं. ] ०शैव-पु. लिंगायतांचा एक वर्ग. ०श्री-स्त्री. १ अंगांत संचरणारें शौर्याचें वारें; स्फुरण; वीराचें यश; भूष. २ शौर्य. 'कीं अतिथीविण भोजन। कीं वीरश्रीविण रण।' [ सं. ] ०सभा-स्त्री. योद्धयाची सभा. [ सं. ] ०सू-स्त्री. वीरमाता, वीरजननी पहा. [ सं. ] ०हंता-वि. वीरांचा पराभव करणारा किंवा त्यास ठार करणारा. ०क्षेत्र-न. बडोदें. 'वीरक्षेत्रीं महाराज प्रभुत्तम खंडेराव राजे बहादूर।'-ऐपो ११. ०क्षेत्री-पु. क्षत्रीयवीर. 'वरी विराजे वीर-क्षेत्री। हरिश्चंद्र नृपनाथ।' -मुहरिश्चंद्राख्यान नवनीत पृ. १८३. वीराशंसन-न. युद्धांतील वीरांनां प्रिय अशी जागा; प्राणावर बेतण्याचा जेथें प्रसंग येतो अशी धोक्याची जागा. [ सं. ] वीरासन-न. १ डावा गुडघा मोडून व उजवा उभा करून, किंवा दोन्ही गुडघे जमीनीस टेंकून बसणें; आसनाचा एक प्रकार. योद्धयाची बसण्याची रीत ( युद्धांत बाण सोडताना, दरबारात किंवा सभेंत बसणें झाल्यास ). ( क्रि० घालणें, धरणें ). २ वीराची बसावयाची जागा, आसन इ० ३ रणभूमि. [ वीर+आसन ] वीरेंवीर-क्रिवि. एकूणएक वीर. 'वीरेंवीर बुडाला। अवघा हुळकल्लोळ जाला। महाबळ खवळला। ज्ञाते लोक जाणती।'-दावि ४९६. [ वीर+वीर ]

वीरंग—पु. वेरंग. 'लोभें आइला वीरंग।'-रामदासी अभंग ( नवनीत पृ. १४९ ). 'अभिनव नटलीला रंग वीरंग माजे।' -दावि ३७. [ वि+रंग ]

वीरडें—न. ( महानु. ) पालखी; ( प्र. ) विरडा-डें. 'तुझे या अनुरोगाचें वीरडें। जयाचिये हृदये भूमिके चढे।'-भाए २३३.

वीरस—पु. स्नेहाचा पान्हा. कोरस पहा.

वीळ—न. ( प्र ) वैर पहा. 'आणि मग तुज वीळ करील।' -पंच ३.१०. 'काई वीळ घेतलें। तें तु जाणेसी।'-शिशु १०५.

वीर्य—न १ शुक्र; रेत. २ पराक्रम, प्रभाव; सामर्थ्य; जोम; धैर्यता. ३ पदार्थमात्राचेअंगीं जो तत्कार्यसंपादक शक्तीविशेष असतो तें. 'वेशी वनस्पति गोळा करून त्याचे गुणधर्म व त्यांतील

वीर्यें आणि उपयुक्त पदार्थ याची माहिती करून घेण्याच्या मार्गे लागला '–सेंपू २ १० ४ वस, रग, बल, निश्चय, चिकाटी, धैर्य (जडाजड वस्तूमधील) (समासात) मदवीर्य, हतवीर्य, नष्टवीर्य उष्णवीर्य, तीव्रवीर्य, इ० ५ शौर्य; वीरता [स वीर्=पराक्रमी होणें] ०वान्–वि १ ज्याच्या शरीरात शुक्र किंवा रेत आहे असा २ (ल) बलवान्, जोमदार, गुणवान, श्रेष्ठ ३ सपादनशक्ति किंवा चिकाटी असलेला, समर्थ ४ शूर, पराक्रमी, धैर्यशील [स] ०विलास–पु पराक्रमाचें कृत्य –वि पराक्रम हाच ज्याचा खेळ आहे, हातचा मळ आहे असा 'एव मागील जैसे तैसें। तेणें दाखिले वीर्यविलासें।'–ज्ञा ११ ६६३ ०हीन–वि बलहीन, शौर्यरहित शक्तिहीन, निर्बल ०शाली–वि वीर्यवान पहा **वीर्यावीर**–वि शूरत्वानें शूर 'तुका म्हणे वीर्यावीर। सतधीर समुद्र।'–तुगा १८१४

**वीलु**—स्त्री वेळ 'येक पदमात्र योजिता। वीलु न पुरे।' –गीता २ ३४५४ [स वेला]

**वीवर**—न विवर पहा १ पाताळ 'शख फुंकिला यादव वीरें। नाद माजला सात वीवरें।'–वामन, विराट ७ ३२ २ गुहा, भुयार 'कपाटे कडे वीवरे आणि टाकी।' –दावि ३४९ [विवर]

**वीवा**—उद्गा (गो) नमस्कार करताना व 'चिरजीव' या अर्थी म्हणावयाचा शब्द [इ पोर्तु व्हीव्हा!]

**वीष**—न विष पहा **वीषार–री**–पु सर्प 'कस्णु वेढील विषारी।'–उषा ५० –वि. विषार–री पहा [विषारी]

**वीषइ–यी**—वि विषयी पहा 'अती वीषई सर्वदा दैन्य वाणा।'–राम ६४

**वीस**—वि २० सख्या [स विंश(ति) प्रा वीस प वीह सिं वीह प्रे जि वीश–स] म्ह० वीसा नाहींतर तिसां नाहीं तर जशाचा तसा=विसाव्या वर्षी शहाणपण नाहीं आलें तर तिसाव्या वर्षी येईल पण तिसाव्या वर्षीहि न आलें तर मात्र तो (मनुष्य) आहे तसाच जन्मभर राहणार **विशी एकूणविशी**–वीस होते ते एकुण वीस होणें म्हणजे कमी प्रमाण असणें 'आता आपली प्रकृती कशी आहे? काहीं विशी एकूणविशी वाटते का?' –रंगराथ ०नखी–नखीचा–वि १ (ना) वीस पाय असलेला (एक क्षुद्र विषारी प्राणी) २ स्त्रीबद्दल साकेतिक शब्द –सगीत घोटाळा ११ ३ वीस बोटें असलेला (मनुष्य इ० प्राणी) ४ गरमी रोग **वीस नखीची–नखाची बाधा**–स्त्री १ (बायकी) गर्भारपण, पोटिशी राहणें 'कमला रोग अन् कसलें काय? –वीस नखांची बाधा झालेली '–शामू २ गरमी ३ व्यभिचाराचें व्यसन **वीसोपा**–पु विसावा हिस्सा पाटण दिलालेख शके ११२८. [स विंशोपक]

**वीसदेओ**—पु (महानु) विस्तव 'का गा ओंवीया बाजा ना का जी जि वीसदेओ नाहि'–लीळाचरित्र [स विश्वदेव]

**वीसादय**—पु (महानु) विस्तव बीसदेओ पहा 'वीसादयास सेणी लावीत '–पूजावसर

**वीसाहाणी**—स्त्री (महानु) विसावणी, विसावा? 'कुण वीसाहाणीचें राऊतु परितिलें। तें साहातीचि ना।'–शिशु ९६३ [स वि+श्रम्]

**वीळ**—पु वेळ पासुन झालेला अशिष्ट अपभ्रश, दिवसाचा वेळ, सबध दिवस, सकाळ किंवा दुपार, समय काल या अर्थी वापरतात 'पिंगा अवघा वीळ वो। स्वरूपी माझ्या मीळ वो।' –मध्व ३७८ –राला ८४ 'वीळभर (दिवसभर) काम केलें' –स्त्री भरती (समुद्राची), वेला (क्रि० लागणें, येणें, होणें) [स वेला, म वेळ]

**वीक्षण**—न १ अवलोकन, पाहणें २ पाहण्याचें साधन (नेत्र इ०) [स] **वीक्षणें**–क्रि पाहणें, बघणें, दर्शन घेणें, अवलोकणें [स वीक्ष्] **वीक्षित**–वि अवलोकित, पाहिलेले [स]

**वु, वू**—हीं अक्षरें मूळ मराठी शब्दाच्या सुरवातीस आढळत नाहींत काहीं ठिकाणीं हीं अक्षरें बोलण्यात व लिहिण्यातहि आढळतात परतु तसा उच्चार व तसें लिहिणें हें व्याकरणशुद्ध नाहीं ते उ, ऊ यांचें चमत्कारिक व कटु उच्चार होत उदा० 'तुट जळे वुडे वुडे।'–दा ६ ६ २२ वुन (उन्ह) –मोआदि ३५ ८१ वून (ऊन) मोविराट २ ६८ वु–वू नें सुरवात होणारे शब्द उ–ऊ मध्यें पहा

**वुइल**—न मृत्युपत्र [इ]

**वुगदा**—पु (व) भुगा, चुरा

**वुड**—पु लाइ, पिंड, उड–डा पहा 'तिघींचि करीं तीन वुड, पुत्र जन्मती हो।'–भज ८२. [प्रा उडी, का उडे]

**वुंडी**–स्त्री बलिदान, उडी पहा

**वुंथ**—स्त्री (व) ओठ

**वृक**—पु लाडगा 'ते व्याघ्र वृक आटवे। तैसिये करी।' –माज्ञा १६ ४०८ [स] ०युद्ध–न गनिमी लढाई, लपून हल्ला करणें –शिदि १७९ ८० **वृकोदर**–पु भीम 'तो पूर्वदिशे वृकोदर।'–शिशु ७३१ –वि (लांडग्याचें पोट किंवा लांडगा पोटात असलेला) फार खादाड, खाणारी

**वृक्क**—पु मूत्रपिंड, गुर्दे (किडनी) [स]

**वृख**—पु वृक्ष 'श्री भूक्तिभामध्ये कल्पतरु।'–शिपू १.१. १२४. वख पहा [स वृक्ष]

**वृजिन**—न १ दुःख क्लेश 'निस्तरणें पडे वृजिन।'–रास १ ३३१ २ पाप, दुराचरण 'अमुख्य गोवधाचें वृजिन।'–रयोवा ४ ३३० [स]

**वृंत**—न देंठ पुष्प किंवा फल ज्याशीं संबद्ध होऊन राहिलें असतें असा वृक्षादिकांचा अवयव [स]

**वृंतबंध**—पु (प्र) व्रतबंध 'आधीं गौळनी भोगिजे। पाठीं वृतबंध कीजे। हें कीं वैराग्य दवावें।'–शिशु ७००

**वृंताक**—नपु वांगें (फळ व झाड) 'वृंताक माष मधुर लवण।'–गुच ३२ ३४ [स]

**वृत्त**—न १ भाकित 'घपरोरीं बोलवी वृत्तें।'–विपू ७ ४७ २ आचरण, वर्तन, पद्धत, वहिवाट, शिरस्ता 'शील त्याचें अत्युच्चरम्य वृत्त।'–टिक ६९ ३ उद्योग धंदा निर्वाहाचें साधन म्हणून व्यवसाय, वृत्ति पहा ४ बातमी, वार्ता हकीकत, माहिती 'सांग तें वृत्त तुझ्या जननीचें।'–आङ्चरित्र १८ ५ छंद, कवितेच्या प्रत्येक चरणात किती अक्षरें असावीत याचें मापन ६ वर्तुल, मंडळ, गोलाला कोठेंहि सरळ पातळानें कापिलें असतां होणारा वर्तुळाकार ७ गोल पदार्थ, गाळा –वि वर्तुलाकार, वाटोळें, मंडलाकार [स] ०खंड–न (गणित) वर्तुळाचा अर्धा भाग; वृत्तांश, (इ) सेक्टर ०चिति–वर्तुळस्तंभ नळ, पंचपात्र यासारखा आकार. (इ) सिलिंडर ०पत्र–न १ वर्तमानपत्र जाहीर बातमी खबर किंवा तत्संबंधी कांहीं मतप्रदर्शन, टीका, जाहिराती इ० ज्यात असतात तें पत्र ०पाली–स्त्री परीघ (वर्तुळाचा) [स] ०मध्य–पु वर्तुळाचा मध्यबिंदु, केंद्र [स] **वृत्तांश**–पु (भूमिति) वृत्तखंड पहा [स] **वृत्तांत**–पु वृत्त बातमी, वार्ता, माहिती, हकीकत [स] **वृत्ति**–स्त्री १ आचरण वृत्त, शिरस्ता वहिवाट २ रीत ओळ पद्धत, वर्तनक्रम निर्वाहक्रम हरिनीं स्ववृत्ति वरिली। –मोविराट १ १०० ३ धंदा, पेशा निर्वाहाचा उद्योग चरितार्थाचें साधन –ज्ञा १८ ८२० 'सापविलें वृत्ति करुनि पक्वापक्वा उदुवरीं वदरी। –मोकृष्ण ८७ ६६ 'तुझ प्रभु तूं यातें दयाया वृत्ति दावया स्वामी।' –मोसभा ३ ७४ 'गुरुचे शेती न चढे वारी। प्राणत्यजीन निर्धारीं। गुरुचें वृत्तिनिमित्त। –गुच १६ ५४ ४ आवृत्ति नेहमीं उपयोग, वापर (विशिष्ट अर्थानें एखादा शब्द किंवा वाक्प्रचार याचा) ५ मनाची स्थिति, भावना (राग करुणा भीति, काळजी इ० ची), मनोव्यापार रडत रडत मूर्छेमाजि वृत्ती उडाल्या।'–वामन, भामाविलास (नवनीत पृ ९९) –ज्ञा ९ २५२ –एभा ७ २८४ (समासात) उदास–औदार्य–खिन्न–तामस–प्रसन्न–म्लान–शांत–शोक–संतोष–सौम्य–हर्ष–हास्य–वृत्ति ६ (साहित्य) काव्य–नाट्यप्रबंध रचनेचे चार प्रकार–कौशिकी, भारती, सात्वकी व आरभटी प्रत्येकीं ७ टीका, विवरण, स्पष्टीकरण टीका पहा ८ वर्तुळ किंवा वर्तुळाचा परीघ, वृत्त पहा ९ स्फूर्ति, स्फुरण –मनको १० वाचकता, व्यंजकता, लक्षणा इ० अर्थबोधाचे प्रकार प्रत्येकी ११ दान, इनाम जमीन, वतन सालीना मिळणारी रक्कम इनि राजाला काढून घेतां येत नाहीं किंवा बक्षीसहि देतां येत नाहीं –भाद्रिसह 'अनादि जे प्रकृती। सांख्य जियेतें गाती। क्षेत्र हे वृत्ती। तियेची जाणा।' –ज्ञा १३ ३५ 'नव्हे मठपति। न हीं चाहुरांची वृत्ति।'–तुगा १८१६ 'होता वृत्ति राम्नीत।'–गुच १९ ८ १२ स्वभाव, धर्म [स] ०क–पु वतनदार 'अगा मानस हें एक। माझ्या स्वरूपीं वृत्तिक।'–ज्ञा १२ ९७ ०च्छेद–च्छेदन–पु न वंशपरंपरागत असलेल्या निर्वाहसाधनाचा नाश, वतनजप्ती, वंशपरंपरागत हक्क काढून घेणें [स] ०पत्र–न ज्यावर किंवा ज्यामुळें वृत्ति नेमून दिली जाते तें पत्र, आज्ञा–वतनपत्र ०पंथ–पु वृत्तीचा, व्यापाराचा मार्ग 'ते भेदली वृत्तिपथें। वायुशक्ति गा एथें। कर्मकारण चौथें। ऐसें जाण।'–ज्ञा १८ ३४३ ०शास्त्र–न व्यापार, धंदा इ० चा विचार–चर्चा करणारें शास्त्र, अर्थशास्त्र (इ) एकॉनॉमिक्स –मसाप ३ १०३ ०शून्य–वृत्तिरहित 'शून्य सांडोनि निरवकाश। तेंचि कृष्णहृदय सावकाश। सती केला रहिवास। वृत्तिशून्य होउनी।'–एरुस्व १ ३८ ०स्थिति–स्त्री समस्थिति, दोन्हीं बाजूस वजन व तोल सारखे राहतील अशी स्थिति (इ) ईक्विलिब्रियम 'पक्ष्यांची आकृतीहि त्यांच्या वृत्तिस्थितीस फार सुंदर रीतीनें जमते'–मराठी ६ वें पुस्तक (१८७५) ५ ०मंत–मान–वत–वि १ उपजीविकासाधन जी जोशीपणा इ० नियत वृत्ति ती ज्यास आहे तो, वतनदार २ स्थिर स्थायिक **वृत्तीचा विचका**–पु १ एखाद्याच्या निर्वाहाच्या साधनाचा नाश वृत्ति बुडणें २ वृत्ति गेलेली स्थिति **वृत्त्यंश**–पु संपत्ति, हक्क किंवा निर्वाह साधन यांतील भागी [स] **वृत्त्यंशी**, **वृत्त्यांशी**–वि वृत्तींतील वांटेकरी, भागीदार. [स वृत्त्यंशी]

**वृत्ती**—स्त्री वृत्त वार्ता 'वृत्ती कोण्ही मेणती।'–मुआदि २९ १३२ **वृत्तीक**–१ वार्ता जाणविणारे 'जे वृत्तीक जाले हृदेंइ। अनुरागाची।'–भर ६६ २ वृत्तिक पहा

**वृत्त्यनुप्रास**—पु अनुप्रास अलंकाराचा एक पोटभाग एकच अक्षर फिरून फिरून येणें याच्या उलट छेकानुप्रास वरीच अक्षरें पुन्हा पुन्हा येणें

**वृत्रघ्न, वृत्रारि**—पु वृत्रासुराला मारणारा (इंद्र) [स] ०शत्रु–पु इंद्रजित [स]

**वृथा**—क्रिवि व्यर्थ, विनाकारण, निष्फळ [स] ०दान–न निष्फळ, विन फायदेशीर देणगी (खुशामत्या, वेश्या, मल्ल इ० स दिलेलें बक्षीस, खेळात घालविलेला पैसा) [स] ०पुष्ट–पु (व्यर्थ खाऊन माजलेला) १ आळशी, निरुद्योगी

निरुपयोगी. ' सार सेविजे श्रेष्ठीं । असार घेइजे वृषापृष्ठीं । ' –दा ६.९.१०. २ फुकटखाऊ; भोजनभाऊ; खाउपासरी. [ सं. ]

वृंद—न. १ सभा; समाज; मंडळी; जमाव; मनुष्यादिकांचा समुदाय. ' देवा संतवृंद नमस्कारिजे। कां घडे तरी पूजिजे। '–ज्ञा ३.३१. २ मोठी रास; ढीग. ३ नांवाजलेला, प्रसिद्ध मनुष्य, प्रस्थ (जाडा विद्वान्–सावकार इ०). [सं.] ०गायन-वादन–न. ज्या गायनांत–वादनांत गाणाऱ्या–वाजविणाऱ्या व्यक्ती एकापेक्षां जास्त असतात तें. ०नर्तन–न सामुदायिक नाच. ०संगीत–न. सामुदायिक गायन. ह्या गायनपद्धतीमध्यें स्त्रीपुरुषांची मिसळ असते. ' वृन्दसंगीताचा परिपाठ फार प्राचीन आहे. '–ज्ञाको (व) २२६. वृंदी–स्त्री समुदाय, वृंद ' घडलें जें आसुरिया दोषवृंदीं। ' –ज्ञा १६.२८०.

वृंदारक—पु देव; अमर. ' पुष्पसभार उदंड । वृंदारक वर्षिती। ' ' जयजयकारा प्रवर्तले ते वृंदारक संभारानें –होला २८.–वि. १ सर्वोत्तम; श्रेष्ठ, सर्वां कृष्ठ २ आदरणीय; सन्मान्य; सुप्रसिद्ध. ३ नेता; पुढारी, प्रमुख [ सं. ]

वृंदावन—न १ ज्यांत तुळशीचें झाड लावतात असें दगड-मातीचें लहान चौकोनी विशिष्ट बांधकाम; तुळशीची कुंडी. २ गोकुळाशेजारील एक पौराणिक वन जेथें पूर्वी श्रीकृष्णाची क्रीडा करण्याची जागा असुन हल्लीं हें यात्रेचें स्थान आहे. ' कशी आलें मी वृंदावना । वाटे आहवा येतो कान्हा । ' ३ एकप्रकारचें झाड. कडु–गोड वृंदावन असे याचे प्रकार आहेत. –तुगा २९०७. कडु वृंदावन पहा. ' द्राक्षापेक्षां वृंदावन सुंदर दिसतें. '–नामगा ३. [ सं. ]

वृद्ध—वि. १ वयातीत; म्हातारा; जरठ. ' वृद्ध तपस्वी पितृ पद सेवन सर्वस्व पुंडरीक मुनी। ' –भक्तमयूरकेका १२. २ पूर्ण वाढ झालेला; योग्य विकास पावलेला. ३ मोठा ( गुण,दिकांनीं), ( शहाणपण, ज्ञान इ० त ) प्रगति झालेला. ( समासांत ) विद्या वृद्ध; वयोवृद्ध; तपोवृद्ध; ज्ञानवृद्ध. ४ श्रेष्ठ ' तरी अवघाचि गुणीं वृद्ध। जे महर्षींमाजि प्रबुद्ध। काश्यपादि प्रसिद्ध। सहऋषी। ' –ज्ञा १०.९२. ५ वृद्धि पावलेला; जमून, साठून वाढलेला; पुंजीभूत. [सं.] ०कपि–पु १ जख्ख, फार म्हातारा. २ ( ल ) चांगला अनुभवी; मुरलेला. ' पंचवीस वर्षे काम केलेले वृद्धकपी कौन्सिलर सांगतात '–टि २ १४६ ३ ( विशेषत: अनादरानें ) वृद्ध गृहस्थ. ' तुमच्या ओळखीच्या गृहस्थाकडे गेलों आणखी ते एखादे जर कां वृद्धकपी असले तर आपल्या हिंडण्या फिरण्याला विनाकारण अडथळा यायचा. ' –पिंगळा. [ सं. ] ०काक–पु. ( म्हातारा कावळा ) टणक, निरोगी वृद्ध गृहस्थास योजतात. काटक म्हातारा. ०गंगाधर चूर्ण–न. एक प्रकारचें औषधी चूर्ण ( संग्रहणी, अतिसार यांवर देतात ) –योर १.४४८. ०पतंग–पु. मावळणारा सूर्य ' तया गीती तेणें उचित क्षण ये वृद्ध पतंगा। ' –वामन, विराट ८ १२ -[ सं पत(तं)ग=सूर्य ] ०परंपरा–स्त्री. १ मागच्या वृद्धवृद्ध माणसाकडून चालत आलेली वहिवाट, चाल. २ ( ल. ) प्रमाणभूत, पूज्य आचार, वर्तन. ०प्रमदा न्याय–जरठ-तरुणी दांपत्य न्याय, ( प्रमदा=अतिशय मदनावेग असलेली स्त्री तिच्यापुढें वृद्ध पुरुष न टिकून त्याची फजिती होते यावरून ). ' हे अवहेलना करणारे मात्र कल्पनेचे जड टरून वृद्धप्रमदा न्यायानें उपहास्य होतात. ' –नि ७९. ०संघ–पु. वयोवृद्ध मंडळीची सभा; वडील माणसाचा संघ -[ सं. ] वृद्धाचार–पु. वृद्ध-परंपरेनें चालत आलेली, पूर्वापार वहिवाट, रिवाज; पूर्वजांची, वडील माणसाची अतएव आदरणीय रीत. ' परमामृते भरूनि वाटी। देवकी लावी सुनेच्या वोटीं । सुमे वृद्धाचार गोष्टी। सुने घालीसी पोटीं निजमाये। ' –एरुस्व १८.३८. –एभा १३.१५४. वृद्धाचारीचे देव–पुअव. जुने देव; कुलदेवता. ' वृद्धाचारीचे पूजिले देव। '–दावि ३३ [वृद्ध+आचार] वृद्धापकाळ–पु. म्हातारपण; म्हातारपणचा काळ; वार्धक्य. ' कठिण काळीं वृद्धापकाळीं। सर्वकाळीं अंतकाळीं। नामस्मरण असावें. ' –दा ४ ३.१४. वृद्धाप्य पहा. वृद्धाप्य–न म्हातारपण.' मजही वृद्धाप्य आलें। लेंकीं वेंकळें घातलें। ' –दा ३.५.३३. –ज्ञा ७.८६. [ वृद्ध+आप्–आप्य ? ] वृद्धावस्था–स्त्री. म्हातारपण. [ वृद्ध+अवस्था ] वृद्धि–स्त्री. १ वाढ; विस्तार; प्रमाणाधिक्य; वाढलेली अवस्था ( आकार, वय, संपत्ति, दर्जा इ० ची ). ' रिगे मन्वंतर मनुपुढें। वंशावरी वंशांचे माडे। जैसी इक्षुवृद्धी कांडेनकांडें। जिंके जेवीं। ' –ज्ञा १५.१२८. २ व्याज; वाढ; ( उसना दिलेला पैसा, धान्य इ० ची ) वाढी. ३ सोयेर; घरात कोणी प्रसुत झालें असतां येणारें अशुचित्व. ४ चंद्र व सूर्य यांच्या कलांची वाढ; चढती दशा. ५ सूर्योदयापूर्वी सुरू होऊन दुसऱ्या सूर्योदयानंतर संपणारा चांद्रदिवस किंवा तिथि. नक्षत्र, योग यांचें आधिक्य. ६ अंशवृद्धि. ७ ( व्या. ) अ, इ ( ई ), उ ( ऊ ), ऋ यांच्या बद्दल अनुक्रमें आ, ऐ, औ व आर हे वर्ण येणें. ८ –पु. ज्योतिषशास्त्रातील सत्तावीस योगांपैकीं अकरावा योग. ०जीविका–स्त्री. व्याजावर किंवा सावकारीच्या धंद्यावर उपजीविका; सावकारी. ०प्रमाण–न. ( गणित, भूमिति श्रेढी ) वाढीचें प्रमाण. [ सं ] ०श्राद्ध–न. नांदीश्राद्ध. ०सूतक–न. सोयेर सूतक पहा. वृद्धिंगत–वि. वाढीस लागलेलें; प्रगति होत असलेलें, वाढणारें; वृद्धि पावत चाललेलें. वृद्ध्याजीव–पु. सावकारी करणारा; पैसे व्याजानें लावून, वाढीदिढी करून उपजीविका करणारा माणूस.

वृद्धि—स्त्री. घामटें. –माहा १८ २७. [ सं. वर्दी ]

वृष—वि. १ संतुष्ट. ' दाऊनि गुरुराजा वृष कीज। ' –दावि ४५७. २ धुत. ' वृष दंडक त्याचा देखा असे। ' –दावि ४५८.

**वृश्चिक**—पु १ विंचू 'व्याघ्र वृश्चिक आहवे। तैसिये करीं।' —ज्ञा १६.४०८. २ आठवी रास या राशींत विशाखा पाद, अनुराध व ज्येष्ठा या नक्षत्रांचा समावेश होतो. [ सं. ] ०करण—न. (नृत्य) दोन्ही हात वर नेऊन डोक्याच्यावर वांकडे करून ठेवणें, उजवा पाय पाठीकडे उंच नेणें, व पाठ खूप वांकविणें. ०निकुट्टित करण—न. (नृत्य) उजवा पाय पाठीकडे डोक्यावर उंच नेऊन दोन्ही हात जमिनीवर टेकविणें व त्यांची बोटें जमिनीवर आपटणें. ०रेचित करण—न. (नृत्य) उजवा पाय वृश्चिक करून हाताचें स्वस्तिक करणें, व हात एकमेकांपासून दूर करून रेचित करणें. **वृश्चिकापसृत(अंगहार)**—पु. (नृत्य) वृश्चिकचरण करून उजवा हात लताख्य करणें; नंतर तोच हात नाकासमोर आकुंचित करून उद्वेष्टित करणें. नंतर नितंब फिरवून करिहस्त आणि कटिच्छिन्न हीं करणें.

**वृष**—पु. १ बैल. वृषभ पहा. 'वृषगजीं बैठिला। केला रावो।' —ज्ञा १४.३६२. २ पंधरावा संवत्सर. ३ कर्णराज; कुंतीपुत्र कर्ण. 'तो वृष भूमिग्रस्तस्यंदनचक्रासि उद्धरायातें।' —मोकर्ण (नवनीत पृ. ३४३). वृषसेनाचा पुत्र. कर्णाचा नातु यालाहि म्हणतात. ४ पुरुषाच्या चार जातींपैकीं एक. [ सं. ] ०स्कंध—पु. बैलाचें मशिंड. **वृषिन्**—वि. (शाप) बैलाचें. (इं.) टॉरीन. —सेंपू २. **वृषोत्सर्ग**—पु मृताप्रीत्यर्थ वस्तु सोडणें, इष्टकामनासिद्ध्यर्थ विशेषतः उत्तरक्रियेंत गोन्हा आणि कालवड सोडणें. [ वृष+उत्सर्ग ]

**वृषण**—पु. अंडकोश, अंड. 'गंगाधर तात्या याचे वृषण घागरीयेवढे आले घोडियावर बसता नये असें जालें.' —भाव ८१.

**वृषदुमा**—पु. बैलासारखा एक प्राणी, बैलाची एक जात. 'वेहे थोकड येडके वृषदुमे सौगंधिकें मांजरें।' —सारुह ३.४७. [ सं. वृष+फा दुम्म ]

**वृषभ**—पु. १ बैल; नंदी. 'तंव वृषभासि दाणा। तृण मागों नये जाणा।' —तुगा ५४५५. २ बारा राशींतील दुसरी रास. हींत कृत्तिका त्रिपाद व रोहिणी या व मृगशीरार्ध नक्षत्रांचा समावेश होतो. ३ (समासांत उत्तरपदीं) श्रेष्ठ व्यक्ति. [ सं. ] ०क्रीडितकरण—न. (नृत्य) आधीं टाळी देऊन दोन्ही हात रेचित करणें व मग ते वांकवून वक्षःस्थळासमोर नेणें. ०ध्वज—पु शंकर. [ वृषभ+ध्वज=पताका ]

**वृषल**—पु. १ शूद्र; कुणबी. २ चंद्रगुप्त राजा. ३ बहिष्कृत झालेला, अधार्मिक दुराचारी माणूस. [ सं. ] **वृषल स्त्री**—स्त्री. १ शूद्र स्त्री. 'दासी वेश्या भुजगणेसीं। वृषल स्त्री रजस्वलेसी।' —गुच २९ २२५. 'माझ्यावर कुभांड रचून मला वृषली ठरविलें.' —चंद्रगुप्त ५८ २ व्यभिचारिणी. ३ लग्नापूर्वी रजोदर्शन होत असलेली ऋतुमती स्त्री. **वृषलीपति**—पु ज्यानें उपभोगार्थ शूद्र स्त्री बाळगिली आहे असा ब्राह्मण.

**वृषा**—पु. ग्रामाचा एक प्रकार. —अश्वप १.१८५.

**वृषाकपि**—पु. १ एक वैदिक देवता. २ शिव. 'तीं स्वायुधें शमीवरि टेवविता राघवा वृषाकपिला। स्मरुनि कपि उडे विजयश्री ज्यासि भजे जसी वृषा कपिला।' —मोविराट ६.५८.; ३ विष्णु इ० देव. 'अक्षयवटीं शक्रवटीं संधानीं लाघवी वृषाकपिसा।' —मोभीष्म १२.४७ [ सं ]

**वृष्टि**—स्त्री. १ पाऊस; पावसाचा वर्षाव. २ (ल.) (बाण, फुलें, दगड, अस्त्रें इ०चा) वर्षाव; सारखा प्रहार; पुष्कळ पतन. ३ (शिव्या, शाप, उपमा, शुद्ध वचनें इ०चा) भडिमार (क्रि० एकसारखे देणें, सोडणें, टाकणें). [ सं. वृष्=शिंपणें ]

**वृक्ष**—पु. झाड; झुडुप, रोपटें. (सामा) वनस्पति. [ सं. ] ०राज—पु (झाडांचा राजा) झाडातील प्रमुख वृक्ष (वड, पिंपळ, आपटा, शमी, चोबचिनी इ०). ०वाटिका—वाटी—स्त्री. १ राई; वन. २ बाग, उद्यान; उपवन; (विशेषत. विलास—क्रीडा करण्यासाठीं). ०संवर्धन—न. झाडांची जोपासना करणें; झाडें लावून काळजीपूर्वक वाढविणें. **वृक्षायुर्योग वेद**—पु. वृक्षाचें आयुष्य वाढविण्यासंबंधी शास्त्र [ सं. वृक्ष+आयु+योग+वेद ] **वृक्षासादक, वृक्षोपवेशक**—पु झाडावर बसणारा एक पक्षिवर्ग. असे पांच वर्ग आहेत. चटक पक्षी. —मराठी ६ वें पुस्तक (१८७५) पृ २१९. —प्राणिमो ६३. [ वृक्ष+आसादक, उपवेशक ]